# THE TWENTIETH CENTURY
# ENGLISH-MARATHI DICTIONARY

(2 VOLUMES)

VOLUME 2

J – Z

N. B. Ranade

**Price. Rs. 750.00**
(Set of 2 Volumes)

**Shubhada-Saraswat Prakashan, Pune 411 005.**

First Edition 1916

1st Reprint 1977

2nd Reprint 1984

3rd Reprint 1991

4th Reprint 1996

ISBN : Set of 2 Vols. 81–86411–16–X

Vol. II 81–86411–18–6

**Published by**

Shubhada-Saraswat Prakashan 67 Patil Estate, Pune - 411 005.

**Printed by**

Latali Printers,
22, Budhwar Peth, Anandashram,
Pune - 411 002.

## ACKNOWLEDGEMENTS

As publishers we are greatly indebted to number of institutions and individuals who have helped us in reprinting this dictionary. Tarkatheerth Laxmanshastri Joshi. Dr. N. G. Kalelkar and other members of the State Board for Literature and Culture, M. S. enthused and encouraged us to take up this project.

Dr. H. S. Bhide inspite of his indifferent health wrote preface to this reprint.

Shri. J. S. Tilak kindly permitted us to reproduce in this reprint an editorial by the late Lokmanya Tilak.

The librarians and staff of B. J. Wadia Library and of Deccan College were very helpful and co-operative.

We sincerely thank all these individuals and institutions.

**15th August 1977** **Sharad Gogate**

**J** ( jā ) इंग्रजी वर्णमालेंतील दहावें अक्षर आणि सातवें व्यंजन. ह्याचीं अनेकवचनें *J's*, J's, *j's*, j's अशीं लिहितात. इंग्लंडमध्यें सुमारें ख्रिस्ती सन सोळाशें तीसपर्यंत 'ज्' हा उच्चार दाखविण्याकरितां 'J' ह्या स्वतंत्र अक्षराची योजना झालेली नव्हती. पण वरील सनानंतर *i* ह्या अक्षराला एक वक्राकार शेंपटी काढून झालेलें 'j' हें नवीन अक्षर 'ज्' ह्या उच्चार दाखविण्यासाठीं लेखक लोक वापरूं लागले. अर्थात् ख्रिस्ती सन सोळाशें तिसापूर्वी इंग्रजी वर्णमालेंत 'J' हें अक्षरच नसल्यामुळें 'J' अक्षरानें सुरू होणारे अव्वल इंग्रजी शब्द फारच थोडे आढळतात. वरील सनानंतर 'J' ह्या अक्षराची इंग्रजी वर्णमालेंत जरी भर पडली होती, तरी सुद्धां बराच काळपर्यंत इंग्रजी कोशकार *i* आणि *j* ह्या अक्षरांनीं सुरू होणारे शब्द एकाच ठिकाणीं देत असत. ह्या 'J' अक्षराच्या मूळ उत्पत्तीचा इतिहास असा आहे कीं, हें अक्षर मूळ *i* ह्या अक्षरापासून उत्पन्न झालें आणि *i* ह्या अक्षराची उत्पत्ति, सेमिटिक् yod या अक्षरापासून असल्यामुळें, yellow शब्दांत असलेल्या *y* चा 'य्' हा उच्चार *i* या अक्षराला प्राप्त झाला होता, जसें;—*maior*, *iactus*. तसेंच *i* ची मूळ उत्पत्ति सेमिटिक् yod पासून जरी झाली होती तरी ती ग्रीक भाषेंतील iota ( आयोटा ) ह्याच्या द्वारें असल्यामुळें *i* ह्याचे 'इ' व 'आय्' असे आणखी दोन स्वरोच्चार होऊं लागले; जसें,—*ibidem*, *militis*. अशा प्रकारें *i* चे दोन्ही उच्चार ( स्वरात्मक व व्यंजनात्मक ) बऱ्याच शतकांपर्यंत होत असत. पुढें कांहीं काळानें *i* चा जो 'य्' असा उच्चार होत होता, तो कांहीं शब्दांत 'य्' चे जागीं 'ज्' असा होऊं लागला. 'य्' चे ठिकाणीं 'ज्' असा उच्चार होण्याची प्रवृत्ति आपल्या इकडील प्राच्य भाषांतही आढळून येते, जसें:—यजुर्वेद=जजुर्वेद, यज्ञ=जज्ञ, यजमान=जजमान, यात्रा=जत्रा, यति=जति. याप्रमाणें पूर्वी 'य्' होत असलेला *i* चा उच्चार 'ज्' असा लोक जेव्हां करूं लागले तेव्हां 'ज्' चा उच्चार स्पष्टपणें व्यक्त करणाऱ्या अक्षराची लोकांना जरूरी वाटूं लागली. ह्याच वेळीं म्हणजे इसवी सनाच्या चौदाशेंपासून सत्राशें पर्यंत *m*, *n*, *u* सारख्या अक्षरांच्या फाट्यांत *i* हें अक्षर लोपून जाऊं नये म्हणून *i* ह्या अक्षराला वर किंवा खालीं वक्राकार शेंपटी काढून लेखक लोक निराळें वळण देत होते. अशा रीतीनें *i* चें बदललेल्या स्वरूपाचें *j* अक्षर घेऊन त्याला प्रथम 'जी' व नंतर 'जे' हें नांव देऊन 'J' ह्या अक्षराची इंग्रजी वर्णमालेंत स्वतंत्र स्थापना झाली. अजूनही डाक्टर लोकांच्या चिकित्सापत्रकांत ( medical prescriptions ) *j* या अक्षराचा उपयोग अंकाच्या शेवटील *i* अक्षराचे जागीं करीत असतात, जसें:—vj = 6; xij = 12. व्युत्पत्तिशास्त्राच्या दृष्टीनें *j*, *i*, *y* आणि *g*, ह्या अक्षरांचा अति निकट संबंध आहे; जसें,—*jot* = *iota*, *join* = *yoke*, *jest* = *gesture*. २ *a curve or figure of the shape of the letter* 'j' 'J' ह्या अक्षरासारखी आकृति किंवा वक्र. ३

J-pen, 'जे' अक्षर वर असलेला टांक. ४ श्रेढींतील दहाव्या स्थानाचें दर्शक अक्षर. ५ John, James, Joseph, Jane ह्या विशेष नामांच्या संक्षेपार्थी 'J' चा उपयोग करतात; J. P. = Justice of the Peace. Jr = Junior. (६) गणितांत किंवा भौतिक शास्त्रांत जूलच्या यांत्रिक सममूल्याकरितां 'J' हें अक्षर वापरतात.

Jabber ( jab'ėr ) [ O. Fr. *jaber*, to mock. ] *v. i. to talk rapidly and indistinctly, to chatter* वटवट -वचवच -वटावटा *adv.* -वचावचा *adv.* बोलणें -करणें, बकणें, बडबडणें, जाबडणें, अगडतगड बोलणें. J. *v. t. to utter indistinctly* अस्पष्ट उच्चारणें, अर्धवट -मोडकें -तोडकें बोलणें; as, to J. French. J. *n. rapid indistinct speaking* वटवट *f*, वचवच *f*, बडबड *f*. Jabb'ered *pa. t. & p. p.* Jabb'erer *n.* बडबड्या, वटवट्या, बकबक्या, बडबडणारा, अर्धवट -मोडकें तोडकें बोलणारा. Jabb'ering *pr. p.* Jabb'eringly *adv.* वटवट करून.

Jacent ( jā'sent ) [ L. *jacere*, to lie. ] *a.* ( *R.* ) *lying at length* आडवा पडलेला, लांब निजलेला; as, "The J. posture."

Jacinth ( jä'sinth ) [ Contr. of Hyacinth. ] *n. a precious stone of a red or dark purple colour* ( a variety of Zircon ) 'सुगंधी' नांवाचा मौल्यवान् दगड *m.* See Bible, Rev. XXI. 20.

Jack ( jak ) [ F. *Jacques*, the most common name in France, hence used as a substitute for John, the most common name in England. ] *n. a familiar nickname or substitute for John* ( जान् ह्या नांवाऐवजीं किंवा जान् मनुष्याचें टोपण नांव म्हणून वापरलेलें ) जॅक् नांव *n.* २ *an impertinent or silly fellow, a simpleton* आडदांड, गांवठी -आडमुठ्या मनुष्य *m.* ३ ज्याचें नांव माहित नाहीं अशा नोकरास हांक मारण्याचा शब्द *m*, जॅक् *m.* [ ज्याप्रमाणें आपलेकडे गुजराथी लोकांत घरकामाकरितां ठेवलेल्या मराठी गड्याला त्याचें नांव माहीत नसल्यामुळें 'रामा' असें ते म्हणतात.] ४ *a popular colloquial name for a sailor* ( खलाशांस साधारणपणें ) जॅक् ( म्हणतात ). ५ *a mechanical contrivance rendering convenient service and often supplying the place of a boy or attendant who was commonly called 'Jack'* यांत्रिक योजना *f.* ६ *a device to pull off boots* ( बूट ओढून काढण्याचा ) जॅक् *m.* ७ *a contrivance for turning a spit* कालथा *m*, उलथणें *n.* ८ *the male of certain animals* ( कांहीं जनावरांतील ) नर *m*; as, "The J. of the ass." ९ *a flag hoisted on a jack-staff* आंखूड काठीला अडकवलेलें निशाण *n.* [ Union Jack ऐक्यतासूचक निशाण *n.* ] १० *the knave of a suit of playing cards* ( पत्त्यांच्या खेळांतील ) गुलाम *m.* [ Jack शब्दाचा 'आंखूड' ह्या अर्थी उपयोग करतात. ] J. boots ( लोखंडी पत्र्यानें मढ-

विलेले) गुडघ्यापर्यंतचे मजबूत बूट. Jack-plane खडबडीत लांकूड घांसण्याचा रंधा *m.* J. screw *n. a portable machine for lifting or moving a heavy body through a small distance* दुमकलस *m.* Blue J. *sulphate of copper* मोरचूद. Jack-at-all-trades or Jack-of-all-trades कोणतेंही काम अर्धवट जाणणारा *m.* Jack-of-all-trades and Master-of-none cf. Marathi idiom एक ना धड आणि भाराभर चिंध्या. Jack-with-a-lantern, Jack-o'-lantern, *ignis fatuus, a will-o'-the-wisp* भुताची कोलती *f* or कोलीत *n*, भूतकोलित *n*, पिशाच्चदीपिका *f.* २ (*fig.*) *a misleading influence* (फशीं पाडणारा) मोह *m*, भूल *f.* J. pudding *n. a buffoon* हंडीबाग, भांड.

Jack, Jak (jak) [Port. *jaca*; (मलयाळम्) *tsjaka.*] *n. an Indian tree allied to the bread-fruit tree* फणसाचें झाड *n*, फणस *m.* २ *-the fruit* फणस *m.* ३ *-the seed* आठीळ *f.* [END PIECE OF THE FRUIT OF THE J. टेबली *f.* FUNGUS ON THE J. -TREE फणसंवें *or* फणसांवें *n*, फणसांबा *m.* JUICE OF J. -FRUIT मध *m or f.* LUMP OF PULP OF THE J. गरा *m.* PULP OF THE FRUIT MASHED AND ROLLED OUT INTO A CAKE AND DRIED फणसपोळी *f*, फणसाचें साट *n.* SEEDLESS LUMP OF THE PULP OF THE J. -FRUIT चांपें *n.* SHREDS OR FILAMENTOUS PORTION AROUND THE PULP OF THE J. FRUIT चार *m or f*, चिवर *n.* YOUNG, UNRIPE J. fruit कुइरी *or* कुंवरी *f*, पारा *m.*] J. wood फणसाचें लांकूड *n*, फणशी लांकूड *n.*

*N. B.*:—Two important distinctions are made of this fruit *viz.* कापा फणस (hard or firm jack), and बरका or रसाळ फणस (soft, flaccid, oozy, &c. jack.); and to these is added a third, *viz.* सकल्या फणस expressive of the middle quality.

Jackal (jak'awl) [Pers. *shaghal*, Sk. शृगाल.] *n. a wild, gregarious animal closely allied to the dog* कोल्हा *m*, (कोल्ही *f*, and without ref. to sex कोल्हें *n.*), जंबूक *m*, शृगाल *m*, *n*, (शृगाली *f*,) शिवा *f.* [CRY OF THE J. कुई *f*, हुकी *f*, हूक *f*, कोल्हेहूक *f*, कोल्हेभुंक *f.* OLD J. -PURVEYOR (as believed) TO THE TIGER भालू *f*, भलूक *m* (Sk.).] २ *colloq. one who does mean things for another's advantage* दुसऱ्याचा फायदा साधून देणारा, कोल्हा *m* (*fig.*).

Jackanapes (jak'a-nāps) [For 'jacko'apes,' being one who exhibited monkeys, with an *n* inserted to avoid the hiatus.] *n. a monkey* वानर *m*, माकड *n*, केलटें *n.* २ *an impudent fellow, a coxcomb* दांडगट मनुष्य *m*, उद्धट -बढाईखोर मनुष्य *m.*

Jackass (jak'as) [Jack = the male, & Ass.] *n. the male of the ass* गाढव *m*, गर्दभ *m* (Sk.). २ *a blockhead* ठोंबा *m*, गधडा *m*, मठ्ठ मनुष्य *m*, गद्धा *m.*

Jackdaw (jak'daw) [Jack and Daw.] *n. a species of crow* डोमकावळा *m.*

**Jacket** ( jak'et ) [ O. Fr. *jaquette*, a jacket, or sleeveless coat, a dim. of O. Fr. *jaque*, a coat of mail. ] *n. a short coat* लहानसा कोट *m*, कुडतें *f*, कुडतें *n*, डगलें *n*. २ *an outer covering for anything* आच्छादन *n*, आवरण *n*. J. *v. t. to put a jacket on* लहान कोट घालणें. Jack'eted *a*. [To dust one's jacket *colloq. to give one a beating* (-ला) मार *m* -चोप देणें. (-ला) लोळविणें -तुडवणें. Steam jacket, *a space filled with steam between an inner cylinder and its outer covering in order to prevent priming or condensation.* ( सिलिन्डरच्या भोंवतालचें ) वाफेचें ज्याकिट *n*. Blue Jacket, See under Blue.]

*N. B.*—ज्याला आम्ही मराठींत जाकीट म्हणतों तो इंग्लिश Jacket शब्दाचा अर्थ नाहीं. मराठी जाकीट शब्दाला इंग्रजींत Waistcoat हा शब्द आहे.

**Jacobin** ( jak'o-bin ) [ Fr. –L. *Jacobus*, James. –Gr. *Jacobos* –Heb. *Ja'akob.* ] *n.* ( *Eccl. His.* ) *a Dominican Friar so named from their original establishment in the Rue St. Jacques* ( St. James's street ) Paris, डोमिनिकन पंथाचा रोमन क्याथोलिक महंत *m*, ज्याकोबिन *m*. २ *one of a society of revolutionists in France* (so called from their meeting in a Jacobin convent) फ्रान्समधील क्रांतिकारक मंडळीचा सभासद *m*, ज्याकोबिन *m*. ३ (hence) *a plotter against an existing government* (प्रचलित राज्याविरुद्ध कट करणारा) बंडखोर मनुष्य *m*, बंडखोर *m*. Jacobin'ic, –al *a. pertaining to the revolutionists of France* फ्रान्समधील क्रान्तिकारक मंडळीसंबंधीं, ज्याकोबिनासंबंधीं. २ *holding revolutionary principles* बंडखोर, दंगेखोर, क्रान्तिवाला, क्रान्तिकारकमतांचा अभिमानी. Jac'obinism *n*. ज्याकोबिनपणा *m*, बंडखोरपणा *m*. Jac'obite *n. an adherent of James II and his descendants* दुसऱ्या जेम्स राजाच्या पक्षाकडील मनुष्य *m*, ज्याकोबाईट *m*. Jac'obite *a*. Jacobit'ical *a*.

**Jacob's-ladder** ( jā'kobs-lad'ėr ) [ From the *ladder* which *Jacob* saw in his dream. ] *n. naut. a ladder made of ropes with wooden steps* आगबोटीवरील लांकडी पायऱ्यांची दोरीची उंच शिडी *f*.

**Jaconet** ( jak'o-net ) [ Fr. *jaconas.* ] *n.* ( written also *jacconet* ) *a thin cotton fabric* जगन्नाथी कापड *n*, सुताचें पातळ कापड *n*, जगन्नाथी *f*.

**Jaculate** ( jak'ū-lāt ) [ L. *jacere*, to throw. ] *v. t. to cast or throw out* ( as a dart ) ( भाला ) फेंकणें. Jacula'tion *n*. फेंकणें *n*. Jac'ulatory *a. throwing out suddenly* एकदम बाहेर फेंकणारा. २ *uttered in short sentences* पुटपुटलेला; as, "J. prayers."

**Jade** ( jād ) [ Fr.– Sp. *ijada*, the flank, –L. *ilia*. It was believed to cure pain of the side.] *n. a dark-green stone used for ornamental purposes* मर्गझ *m*. हा एक प्रकारचा मौल्यवान् दगड आहे. मुंबईच्या बाजारांत ह्याला गुजराथी व्यापारी मर्गझ म्हणतात.

Jade ( jād ) [ Ety. dub. ] *n. a mean and tired horse* घोडकें *n*, घोडकट *n*. २ *a woman* (in contempt or irony) वायरूं *n*, रांडरूं *n*, सांडरूं *n*, रांड *f* ( *colloq.* ), छिनाल *f*. J. *v. t. to tire by severe and tedious tasks, to harass* (पुष्कळ काम करावयास लावून) दमविणें, श्रमविणें, भागवणें, शिणविणें, थकविणें. J. *v. i. to become wearied* दमणें, थकणें, भागणें, श्रमणें, वेंगणें, रेंगळणें, लंघणें. Jad'ed *p. p. a.* दमलेला, थकलेला, भागलेला, श्रमलेला, श्रान्त, वेंगलेला. Jad'edly *adv.* Jaded'ness *n.* खुरदा *m*, खुरदमा *m*, आट *m*, आटाआट *f*, आटापिटा *m* or -टी *f*. Jad'ish *a. worn out* थकलेला, दमलेला. २ *ill-tempered* (applied to a horse) खोडकर. ३ *unchaste* ( applied to a woman ) उनाड, छिनाल or शिनळ.

Jag ( jag ) [ Celt. *gag*, a cleft. ] *n. a notch, a denticulation* खांड *f* or खंडा *m*. dim. खांडोरें *n*, दांता *m*, कातरा *m*, सड *m*, हीर *m*. [ Jags — AS OF A ROUGHENED SICKLE खरे *m. pl.* ] २ *a part broken off, a fragment* तुकडा *m*, खंड *m*. ३ *bot. a cleft or division* दांता *m*, कातरा *m*. J. *v. t. to cut into notches or teeth* ( as a saw ) (करवत इत्यादिकांस ) दांते पाडणें, खांडे -सड &c. पाडणें. Jagg'ed *pa. t.* & *p. p. a.* दांते पडलेला or पाडलेला, दांताळ, दांत्यांचा, खडबडीत. Jagg'edly *adv.* Jagg'edness *n.* Jagg'er *n. a jagging iron, a brass wheel with a notched edge for cutting cakes &c.* कातणें *n*. Jagg'ing *pr. p.* & *v. n.* Jagg'y *a.* खडबडीत, खांडे पडलेला or पाडलेला.

Jaggery ( jag'ger-i ) [ Hind. *jagri.* ] *n. raw palm-sugar* गूळ *m*.

Jaghir, Jaghire, Jahagir ( ja' gēr ) [ Pers. *jagir.* ] *n. grant of land from government* जहागीर or जाहगीर *f*.

Jaguar ( jag'ū-är *or* jag-wär' ) [ Brazil. *janouara.* ] *n. a powerful beast of prey, allied to the leopard, found in South America* ( दक्षिण अमेरिकेंत सांपडणारा) एक जातीचा चित्ता *m*, बिबळया वाघ *m*, जाग्वार *m*.

Jah ( jä ) [ Heb. ] *n.* abbrev. of Jehovah, *q. v.*

Jail ( jāl ) [ See Gaol. ] *n.* तुरुंग *m*, कैदखाना *m*, बंदिशाळा *f*, कारागार *n*, &c. J. bird *n.* (वारंवार तुरुंगांत येणारा ) कैदी *m*. J. fever *n. med. typhus fever* ( so called because once common in jails ) दाटीच्या वस्तींत उद्भवणारा भयंकर ज्वर *m*. तुरुंगी ताप *m*. [ To break jail तुरुंगांतून पळून जाणें. ] Jail'er *n.* Same as Gaoler.

Jain, Jaina ( jīn, ji'nä ) [Sk. जैन = जिनस्य उपासक = a worshipper of a जिन or तीर्थंकार. जिन (जयति इति) means a deified mortal who has conquered his passions and has thus been deified.] *n. the follower of a religion consisting of the worship of the jinas or Tirthankaras deified* जैनधर्मी मनुष्य *m*. There are two sects of the Jainas श्वेताम्बर and दिगम्बर. Jain'ism *n.* जैनधर्म *m*.

Jakes ( jāks ) [ Prob. from Fr. *Jaques*, a proper

name. ] *n.* (*Shakes.*) *a privy* शेतखाना *m*, शौचकूप *m*, पायखाना *m*, संडास *m*. [ CLEANER OF J. हलाल-खोर, भंगी. ]

Jalap ( jal'ap ) [ From *Jalapa* or *Xalapa*, in Mexico. ] *n.* *the purgative root of a Mexican plant called Jalap* जालाप नांवाची कडक जुलावाची औषधी मुळी *f*.

*N. B.* Jalap is certainly not our जेपाळ. The plant found in our country निशोत्तर (*Ipomœa Turpethum*) is Indian Jalap. The plant known in Marathi as गुलबास is *Marabilis Jalapa*. It is an exotic from the West Indies, introduced into India probably by the Portuguese.

Jam ( jam ) [ Ety. dub.; perhaps from *jam*, to squeeze. ] *n.* *a conserve of fruit boiled with sugar* मुरंबा *m*; as, "grape J."

Jam ( jam ) [ From the same root as *champ.* ] *v. t.* *to press or squeeze tight* चेंगरणें, चिरंगटणें, चिरडणें, बेचकुळींत धरणें -सांपडवणें; as, "To J. a finger." J.*n.* *a mass of people or objects crowded together* गचडी *f*, गर्दी *f*, दाटी *f*. २ *the pressure from a crowd, a crush* ( गर्दीमुळें होणारी ) चेंगराचेंगर *f*; as, "J. in a street." ३ *an injury caused by jamming* ( हात अथवा बोट चेंगरल्यामुळें होणारी ) दुखापत *f*, इजा *f*. Jammed' *pa. t. & p. p.* Jamm'ing *pr p. & v. n.*

Jamb ( jam ) [ Fr. *jambe*, O. Fr. *gambe*, Ital. *gamba*, a leg. ] *n.* *the side-piece of a door &c.* दारकस *f* or *n*, बाही *f*, सुळका *m*.

Jangle (jang'l) [O. Fr. *jangler*, from the sound, like Jingle & Chink.] *v. i.* *to sound discordantly* (as in wrangling ) कर्कशणें, कर्कश आवाज करणें, कचकचणें, करकरणें. २ *to wrangle or quarrel* भांडणें, भांडण करणें, ( शीं ) कटकट *f* -खटपट *f* -कचकच करणें. J. *v. t.* *to cause to sound harshly* कर्कश आवाज करावयास लावणें. J. *n.* *a discordant sound* किलकील *f*, कलकल *f*, किलबील *f*, कटकट *f* ( intens. कलकलाट *m* ), कचकच *f*, किलबिलणें *n*. २ *contention* खटखट *f*, भांडण *n*. Jang'ler *n.* Jang'ling *pr. p. & v. n.*

Janissary *n.* Same as Janizary.

Janitor ( jan'i-tor ) [ L. from *janua*, a door. ] *n.* *a doorkeeper, a porter* द्वारपाल *m*, द्वाररक्षक *m*, देवडीवाला, *m*, (देवडीवरचा) पहारेकरी *m*. Jan'itress, Janitrix *n. fem.*

Janizary ( jan'i-zar-i ) [ Fr. *Janissaire* –Turk. *yeni*, new, & *askari*, a soldier. ] *n.* *a soldier of the old Turkish foot-guards, formed originally of a tribute of children, taken from Christian subjects* जुन्या तुर्की पायदळांतील 'ज्यानिझरी' नांवाचा शिपाई *m*, ज्यानिझरी *m*.

January ( jan'ū-ar-i ) [ L. *Januarius* –*Janus*, the sun-god.] *n.* *the first month of the year* (dedicated

by the Romans to Janus, the god of the sun ) (इंग्रजी ) सनाचा पहिला महिना *m*, जानेवारी महिना *m*, जानेवारी *f*. *N. B.* :—This month corresponds to the months of पौष and माघ according to the Hindoos. Before the adoption of the New Style, the commencement of the year was usually reckoned from *March 25*, instead of from *Jan.*

Janus ( jā'nus ) [ L. See January. ] *n. a Latin deity represented with two faces looking in opposite directions* (प्राचीन रोमन लोकांतील ) जेनस नांवाची द्विमुखी देवता *f*. हिला दोन तोंडें असून हिची दृष्टि दोन दिशांकडे असे. J. cloth *n. a fabric having both sides dressed, the sides being of different colours* (निरनिराळ्या प्रकारच्या रंगांनीं) दोन्ही बाजूंनीं रंगविलेला कपडा *m*, गंगाजमनी कपडा *m*. J. faced *a. double-faced* द्विमुखी, दोन तोंडें असलेला. J. -headed *a. double-headed* दोन डोक्यांचा.

Jap ( jap ) [ Abbreviation of Japanese, which see. ] *n.* & *a.* ( *colloq.* )

Japan ( ja-pan' ) [ From *Japan*, the country. ] *v. t. to varnish after the manner of the Japanese, to lacquer* जपानी रोगण देणें -चढविणें -लावणें. २ *to make black and glossy* ( जपानी रोगण लावून ) काळा व तुळतुळीत करणें. J. *n. work japanned* जपानी रोगण लावलेलें सामान *n*. २ *the varnish or lacquer used in japanning* जपानी रोगण *n*. J. *a.* जपान-चा -संबंधीं. २ *of or pertaining to the lacquered work of that country* जपानांतील रोगणी सामानाचा. Japanese' *n.* ( a ) *sing. a native or inhabitant of Japan* जपानी मनुष्य *m*, जपानी. ( b ) ( collectively ) *the people of Japan* जपानी लोक *m. pl.* २ *sing. the language of Japan* जपानी भाषा *f*, जपानी *f*. J. *a. of or pertaining to Japan or its inhabitants* ( a ) जपान देशाचा -संबंधीं. ( b ) जपानी लोकांचा -संबंधीं. Japanned' *pa. t.* & *p. p.* जपानी रोगण लावलेला. Japann'er *n.* Japann'ing *pr. p.* & *v. n.* Japan'ish *a. after the manner of the Japanese* जपानी वळणाचा, जपानी -धर्माचा -पद्धतीचा. २ *resembling japanned articles* जपानी रोगण दिलेल्या वस्तूंसारखा.

Jar ( jär ) [ See Ajar. ] *n. a turn* फिरवणें *n*, फेरा *m*, वळसा *m*, used only in the phrase *on the jar* = on the turn अर्धवट उघडलेला.

Jar ( jär ) [ From an imitative Teut. root, *kar*, conn. with Jargon, & L. *garrire*, to prattle. ] *v. i. to make a harsh discordant sound* करकरणें, करकर -कर्कश वाजणें -आवाज करणें, कर्कश शब्द *m*. करणें; as, "The notes *jarred* on my ears." २ *to quarrel, to clash* बेबनाव करणें, भांडणें, कुरापत काढणें; as, "*Jar* not with liberty." ३ *to be inconsistent* (-शीं ) विजोड -विसंगत -विलग पडणें -असणें, ( -शीं ) जम *m* -जवा *m* -जुगल *f*. &c. न बसणें *g. of s.* J. *v. t.*

*to shake, to shock* डळमळवणें, डळमळीत -लटपटीत करणें, धक्का देणें; as, "To *J.* one's faith." J. *n. a harsh rattling sound* कर्कश शब्द *m* -आवाज *m*, करकर *f.* २ *clash of interests or opinions, discord* विरोध *m.* ३ *a regular vibration* (as of a pendulum) हेलकावा *m*, झोका *m.* Jarred' *pa. t. & p. p.* Jarr'ing *pr. p. & v. n.* Jarr'ingly *adv.*

Jar (jär) [ Fr. *jarre* –Pers. *jarrah*, a water-pot. ] *n. a deep broad-mouthed vessel of earthenware or glass* (रुंद तोंडाचें खोल) भांडें *n*, मडकें *n*, घडा *m*, घट *m* (Sk.) [ THE COMMON JARS ARE:— बरणी *f*, रांजण *m*, माठ *m*, माधण *f*, मांद *f*, नांद *f*, कळसा *m*, कळसुली *f.* ] २ *measure of what is contained in a jar* घडाभर, हांडाभर, or idiomatically घडा *m*, हांडा *m*, &c.; as "A J. of oil &c."

Jargon (jär'gun) [ Fr. *jargon*. See Jar, to quarrel.] *n. confused talk* हेंगाडी -कोंगाडी -रांगडी भाषा *f* -बोली *f*, कानडें बोलणें *n*, राक्षसी -पिशाचभाषा *f.* २ *confused mixture of language* धेडगुजरी भाषा *f*: धेडगुजरी *f*, खिचडी *f*, मिश्रभाषा *f.* J. *v. i.* कानडें बोलणें, हेंगाडी &c. भाषा बोलणें. २ धेडगुजरी भाषा बोलणें. Jar'gonist *n.* धेडगुजऱ्या, मिश्रभाषी *m.*

Jargon (jär'gon) [ Fr. *jargon* –It. *giargone*; perh. fr. Pers. *zargūn*, gold-coloured, from *zar*, gold.] *n. min. a variety of zircon* एक प्रकारचा 'झिर्कोन'च्या जातीचा मौल्यवान् दगड *m*, हा इंग्रजी जवाहिऱ्यांच्या दुकानांत विकत मिळतो. See Zircon.

Jasmin (jas'min), Jessamine (jes'amin) [ Ar. & Pers. *yasmin.*] *n. a genus of plants, many species of which have very fragrant flowers* जातीपुष्पाची जात *f.* [ JASMINUM SAMBAC Aiton मोगरा *m* JASMINUM SAMBAC Aiton. बटमोगरा *m.* (double variety) PLENOFOLIA. J. S. Aiton. मदनबाण *m.* (double variety). J. S. (musk-scented) कस्तुरी मोगरा *m.* J. S. (of Poona) मोतीया मोगरा *m.* (small size). J. GRANDIFLORUM (Linn.) चमेली *f*, ALSO CALLED मालती *f.* (Dymock). J. OFFICINALE (Linn.) सायली *f.* J. AURICULATUM (Roxb.) जुई *f*, जाई *f*, जाती *f.* (Dymock) (N. B. जाई and जुई are the same). J. AURICULATUM VARPARVIFLORA (K.R.K.) तांदळी जुई *f.* J. ARBORESCENS (variety) LATIFOLIUM (Roxb.) कुसरी *f*, माधवी *f*, (Dymock). J. HIRSUTUM (synonym-J. pubescens (Roxb.) कुंद *m* (Wild). J. ANGUSTIFOLIUM (Roxb.) रानमोगरा *m*, रेवती *f.* J. GLANDULOSUM वनजाई *f.* J. AUREUM (Don.) पिवळी जुई *f.* (Dymock) सोनजुई *f.* J. REVOLUTUM पिवळी चमेली &. J. PUBESCENS विखमोगरा *m.*]

Jasper (jas'per) [ Fr. *jaspe* –L. & Gr. *iaspis* – Arab. *yasb.* ] *n. a precious stone, being a hard siliceous mineral of various colours* एक जातीचा मौल्यवान् दगड *m.* ह्याला पर्शियन भाषेंत 'याशेफ' असें म्हणतात.

See Bible. Rev. XXI 21. राहूचा खडा (?) *m*, or briefly राहू *m*, गोमेद (?) *m*. Jas'pery *a. like jasper* राहूच्या खड्यासारखा. २ *mixed with jasper* राहूच्या खड्याशीं जोडलेला.

Jaundice ( jän'dis ) [ Fr. *jaunisse* –*jaune*, yellow –L. *galbanus*, yellowish –*galbus*, yellow. ] *n. a disease characterised by the yellowness of the eyes, skin, &c. caused by bile* कावीळ *f*, कावीण *f*, कामिण *f*, कामला *pop.* कामळ *f*, हळद्या *m*. J. *v. t. to affect with jaundice* (-ला) कावीण *f* -कावीळ *f*. &c. होणें *in. con.* २ *to prejudice, to colour by prejudice or envy* ( -चें मन ) विकारवश करणें, मात्सर्यानें भरणें, ( -चे कान फुंकणें ( *colloq.* ), विरुद्ध ग्रह करणें. Jaun'diced *a.* कावीळ झालेला; as, "J. eyes." २ *prejudiced* विकारवश, मात्सर्यपूरित, मत्सरदूपित; as, "J. judgment."

*N. B.*—Jaundice means कावीळ and nothing else. Anæmia and Leucocythæmia are the two words for पांडूरोग or पंडू.

Jaunt ( jänt ) [ Old form *jaunce* –O. Fr. *jancer*, to stir ( a horse ). ] *v. i. to go from place to place, to stroll* जागोजाग -दारोदार हिंडणें -भटकणें. २ *to make an excursion* सहल -सफर -सैर -फेरफटका -फेरी करणें. J. *n. a ramble* भटकणें *n*, हिंडणें *n*. २ *an excursion* सहल *f*, सफर *f*, सैर *f*, फेरफटका *m*, फेरी *f*.

Jaunt'y, Jant'y ( jänt'i ) [ From Jaunt. ] *a. airy, showy, finical* दिमाखी, नटवा, थाटमाट्या, नट, ठाकठिक्या, छिचोर, अक्कडबाज. Jaunt'ily *adv.* दिमाखानें, अक्कडबाजपणानें, &c. Jaunt'iness *n.* अक्कडबाजपणा *m*, दिमाख *m*, नटवेपणा *m*, छिचोरपणा *m*, चोखंदळपणा *m*.

Javelin ( jav'lin ) [ Fr. *javeline*, cf. O. Irish. *gabul*, a fork. ] *n. a spear about six feet long, anciently used by both infantry and cavalry* बरची *f*, भल्ली *f*, सांग *f* ( ? ), सैती *f*, शक्ति *f* ( ? ), शलाका *f* ( ? ).

Jaw ( jaw ) [ Old spelling *chaw*, akin to Chew.] *n. the bones of the mouth in which the teeth are set* जबडा or जाबडा or चाबडा *m*, जांभाड *m*, जांभाडें *n*, चाभाड *n*, दाभाड *n*, दाढ *f* (?), बचेली *f* or बचाळी or बेचाळी *f* -ळें *n*. – in cant or covert phraseol. दांताळपुरी *f*. [ARTICULATION OF THE J. दांतांची खिळ *f*, दांतखिळ *f*. TO LOCK ONE'S J. दांतांना खीळ घालणें, दाढ बांधणें. TO PUT IN ONE'S J. तोंड घालणें, मध्यें लुबलुब बोलणें, आपलें घोडें ढकलणें. LOCKED J. दांतखीळ *f*, दांतखिळी *f*. ] २ *pl. the mouth* तोंड *n*, जबडा *m* ( *fig* ). ३ (esp. *pl.*) *anything resembling the jaw of an animal in form or action* जबडा *m*, ( *fig.* ), झपाटा *m*, तडाखा *m*; as "the *jaws* of darkness, death &c." ४ ( *slang* ) *abusive talk* बडबड *f*, वटवट *f*, अगडतगड *n*. J. *v.i. to prate* वटवटणें, बडबडणें, तोंड वाजवणें -करणें, जाबडणें. [J. bone *n.* जबड्याचें हाड *n*. J. fall *n.* जबडा-चाबडा पडणें *n*. २ *depression of spirits* नाउमेद *f*, हिरमोड *m*, उत्साहभंग *m*. J. -fallen *a.* विन-

जबड्याचा. २ *dejected* नाउमेद-हिरमोड &c. झालेला. J. lever *n. an instrument for opening the mouth of a horse or cow to admit medicine* घोटा *m*. J. tooth *n*. दाढ *f*, दंष्ट्रा *f*.]

Jay ( jā ) [ O. Fr. *jay*, Fr. *geai*; from root of Gay.] *n. a bird of the crow family with gay plumage* चाष *pop*. चास *m*, मणिकंठ *m*, मयना or मैना *f*.

Jealous ( jel'us ) [ Fr. *jaloux* -L. *zelus* -Gr. *zēlos*, emulation. ] *a. vigilant, anxiously watchful* सावध, हुशार, डोळ्यांत तेल घालून बसणारा, अभिमानी (colloq.), फारच जपणारा; as, "J. of one's repute." २ *suspiciously watchful, incensed at rivalry, impatient of another's success* मत्सरी, समत्सर, मत्सरपूर्ण, मत्सराचा, परोत्कर्षद्वेषी, परोत्कर्षासहिष्णु, हेवा -द्वेष करणारा, हेवेखोर. ३ *suspicious in love* प्रीतीबद्दल संशय आलेला, (दांपत्यधर्माबद्दल) संशयग्रस्त, व्यभिचारशंकी. Jeal'ously *adv*. अतिहुषारीनें, अतिसावधपणानें. २ मात्सर्यानें, मत्सरपूर्ण मनानें, हेवा करून. Jeal'ousy *n. strong suspicion of rivalry, painful apprehension of rivalship in cases nearly affecting one's happiness* ( दुसरा मनुष्य आपल्या सुखाचा वांटेकरी होईल म्हणून केलेला ) मत्सर *m*, मात्सर्य *n*, सवतमत्सर *m*, सापत्नभाव *m*. २ *painful suspicion of the faithfulness of husband, wife or lover* प्रीतीचा संशय *m*, प्रेमसंशय *m*, प्रीतिव्यभिचारशंका *f*. [J. OF A HUSBAND RESPECTING A WIFE परपुरुषशंका *f*, जारशंका *f*. J. OF A WIFE RESPECTING A HUSBAND परस्त्रीशंका *f*. ] ३ *earnest concern or solicitude* विशेष काळजी or सावधगिरी *f*, दक्षता *f*, (*idio*.) अभिमान *m*.

*N. B.*—It is better to adopt the following restrictions:—Jealousy = मत्सर. Envy = परोत्कर्षद्वेष *m*, परोत्कर्षासहिष्णुता *f*.

Jean ( jān ) [ From *Jaen*, in Spain. ] *n. a twilled cotton cloth* जीनचें कापड *n*.

Jeer ( jēr ) [ According to Skeat, this is from the Dut. phrase *den gek scheeren*, meaning lit. 'to shear the fool,' to mock, the words *gek scheeren* being run together and corrupted into *jeer*.] *v. t. to make sport of, to treat with derision* ( -ची ) थट्टा *f* -उपहास *m* -करणें, उपहासणें, टर उडविणें *g. of o.*, टवाळी *f* -टवाळकी -मस्करी *f*. करणें. J.*v.i.* (दुसऱ्याची) टवाळी -टवाळकी -थट्टामस्करी &c. करणें. J.*n. a railing remark, a biting jest, mockery* थट्टा *f*, उपहास *m*, मस्करी *f*, चेष्टा *f*, कुचेष्टा *f*, कुचाळी *f*, टवाळी *f*, टवाळकी *f*, कुचाविंध्या *f. pl*, टर, or टेर *f*. Jeer'ed *pa. t. & p. p.* Jeer'ing *pr. p. & v. n.* उपहास -थट्टा &c. करणारा, उपहासक, टवाळ, टवाळखोर, कुचाळखोर. Jeer'ingly *adv*. उपहास करून, उपहासानें, उपहासपूर्वक, टवाळपणानें.

Jehovah ( je-hō'va ) [Heb. *yahovah* or more correctly, *yahveh*, the Lord.] *n. the eternal or self-existent*

*Being, the chief Hebrew name of the Deity* जेहोव्हा *m*, सनातन व स्वयंभू परमेश्वर *m*. हिब्रू लोकांमध्यें परमेश्वराला किंवा परमात्म्याला 'जेहोवा' हें नांव आहे. ह्याचें इंग्रजीमध्यें God किंवा The Lord ह्या शब्दांनीं भाषान्तर करितात.

Jejune (je-jōōn') [ L. *jejunus*, abstaining from food, hungry. या शब्दाचा धात्वर्थ 'रिकाम्या पोटाचा, भुकेलेला, क्षुधार्त' असा आहे. ] *a. empty, void of interest, barren* फुसका, पोकळ, निर्जीव, निरस, रसहीन, रसशून्य, बेचव, बेकस, भुकड, भुकिस्त, रुखा, रुक्ष, निकस. Jejune'ly *adv.* Jejune'ness *n.* फुसकटपणा *m*, नीरसपणा *m*, रसशून्यता *f*, बेचवपणा *m*, निकसपणा *m*, &c.

Jejunum (je-jōō'num) [ L. *jejunus*, empty. ] *n. anat. a part of the smaller intestine* (so called because generally found *empty* after death) मध्यांत्र *n*, रिक्तांत्र *n*, लहान आंतड्याचा मधला भाग *m*, पक्वाशयाचा दुसरा भाग *m*, हा भाग प्रेतांमध्यें नेहमीं रिकामा दिसतो.

Jelly (jel'i) [ Anything *congealed* or *frozen*, *Fr. gelee*–L. *gelare*, to freeze. ] *n. a soft, transparent, tremulous substance obtained from animal matter* प्राण्याच्या शरीराच्या कांहीं भागांपासून काढून गोठवलेला रस *m*. मांसरसपक्वान्न *n*. २ *the juice of fruit boiled with sugar*, (शर्करामिश्रित) फलरसपक्वान्न *n*. Jel'lied *a. in the state of jelly* जेलीसारखा गिलगिलीत, बिलबिलीत. Jel'ly-fish *n.* घटाकार श्लेष्ममय जलचर *m*. हे प्राणी मऊ आणि चिकट असतात. कांहीं, माणसाच्या हाताच्या मुठीसारखे, कांहीं सपाट, कांहीं गोलार्ध, कांहीं कांचेच्या हांडीसारखे, व कांहीं छत्राकृति असे असतात. ज्याला आपण सामान्य भाषेंत मासे (fish) असें म्हणतों ते हे नव्हत. यापैकीं कांहीं समुद्रकांठच्या वाळूवर मरून पडतात, त्यास कोणी 'समुद्रफेण' किंवा 'समुद्रफेंस' असें म्हणतात. Cuttle नांवाच्या प्राण्याच्या पाठींत जी एक कवची सांपडते, तिलाही 'समुद्रफेण' असें म्हणतात.

*N. B.*—पेरू, लाल अंबाडी किंवा करट फळें (currant,) यांचा रस काढून तो साखरेबरोवर शिजवून गोठविला असतां जो एक घन पदार्थ बनतो त्याला fruit jelly म्हणतात. जनावरांचे स्नायू, हाडें, खूर, संधिबंधनें हीं पुष्कळ शिजवून जो चिकट व दाट पदार्थ होतो तो गोठविला असतां त्याचा meat jelly तयार होतो. ह्याचे पनीरासारखे अगर खरवसासारखे तुकडे पाडतां येतात. जेली हा पदार्थ आपण ज्याला 'पंचामृत' म्हणतों त्या वर्गांत येत नाहीं. ह्याला 'पक्वान्न' म्हणावें. jelly is not सरस.

Jennet (jen'et) [ Fr. *genet* Sp. *ginete*, a nag, orig. a horse-soldier. ] (also spelt Gennet, Genet.) *n. a small Spanish horse* स्पेन देशांतील जेनेट जातीचा घोडा *m*, हा हिंदुस्थानांत आढळत नाहीं.

Jenny (jen'i) [ From root of *gin*, a machine. ] *n. a gin or machine for spinning* (कापूस) पिंजण्याचें यंत्र *n*, जेनी *f*, जिन *n*.

Jeopardy (jep'ard-i) [ Fr *jeu parti*, lit. a divided

game, one in which the chances are even-Low L. *jocus*, a game, *partitus*, divided -*partiri*, to divide.] *n. hazard, danger* धोका *m*, जोखीम *n*, भय *n*, संकट *n*. २ (of life) अरिष्ट *n*, प्राणसंकट *n*, जिवावरची पाळी *f*, -गोष्ट *f* -प्रसंग *m*, सुळावरची पोळी *f*, प्राणांत *m*. [To BE IN J. प्राणावर -जिवावर बितणें -येणें *impers. con.* प्राणांशीं -जिवाशीं गांठ पडणें *g. of s.*] Jeop'ard, Jeop'ardise *v. t. to put in jeopardy* धोक्यांत -जोखमांत -संकटांत घालणें -पाडणें -टाकणें -आणणें, (-वर) अरिष्ट -संकट &c. आणणें. [To. J. ONE'S LIFE काळाच्या तोंडीं OR दाढेंत जाणें OR पडणें. To J. ANOTHER'S LIFE काळाच्या तोंडीं OR दाढेंत घालणें OR देणें.] Jeop'ardous *a. exposed to danger* धोक्याचा, जोखमाचा, संकटाचा, भयावह. २ *exposed to loss* नुकसानावह, तोटा आणणारा. Jeop'ardously *adv.* धोक्यानें, जोखमानें.

Jeremiad (jer-e-mī'ad) [From *Jeremiah*, the prophet, author of the book of *Lamentations.*] *n. a lamentation, wailing* विलाप *m*, दुःख *n*, आक्रोश *m*, रोदन *n*. २ *the tale of grief, a doleful story* दुःखाची काहणी *f*, कर्माची कहाणी *f* -काहाणी *f*.

Jerk (jĕrk) [Orig. *to strike*, Scot. *yerk*, by-forms being *jert* and *gird* and conn. with *yard*, a rod.] *v.t. to give a sudden movement* असडणें or हासडणें or आसडणें, हिसडणें, अचकणें, हिसका *m*. -हिसडा *m*. -आंचका *m*. -झटका *m*. -झटकारा *m*.- &c. देणें. [To be jerked गचकणें, कचकणें, हिसका *m*. खाणें -बसणें.] २ *to throw with a quick smart motion* झटकारणें, झटकारून -झटकून-&c. फेंकणें-टाकणें, आड हातानें फेंकणें -मारणें-&c. J. *v. i. to move with a start* झटकारून -हिसकत जाणें. २ *to flout with contempt* तिरस्कारानें वागविणें. J. *n. a short, sudden movement* हिसका *m*, हिसडा *m*, असडा *m*, आंचका *m*, झटका *m*, झटकारा *m*. २ *a striking against with a sudden motion* हिसडा देणें *n*, हिसका मारणें *n*. ३ *an involuntary spasmodic contraction of a muscle* आंचका *m*, गचका *m*.

Jerkin (jĕr'kin) [Dut. dim. of *jurk*, a frock.] *n. a jacket* लहान कोट *m*.

Jersey (jĕr'zi) [From the island Jersey.] *n. the finest part of wool* अत्युत्तम-नरम लोंकर *f*, लोंकरींतील अत्युत्तम नरम भाग *m*. २ *a close-fitting woollen shirt* आंगाबरोबर बसणारा लोंकरीचा शर्ट *m*. -कुडतें *n*.

Jessamine, See Jasmine.

Jest (jest) [Orig. *a deed, a story*, M. E. *geste* -L. *gestum* -*gerere*, to do.] *n. a joke, something uttered in sport* (दुसऱ्याला रिझविण्याकरितां केलेली) निंदात्मक थट्टा *f*, उपहासात्मक थट्टेचें भाषण *n*, मस्करीचें भाषण *n*, परिहासोक्ति *f*, विनोदोक्ति *f*, विनोदभाषण *n*, खेळ *m*, खेळकुडी *f*. २ *object of laughter or sport* विनोदास्पद *n*, विनोदपात्र *n*, उपहासपात्र *n*, उपहासास्पद *n*. [Jest'-book *n. a collection of funny stories* विनोदाच्या गोष्टींचें पुस्तक *n*, विनोदकथासंग्रह *m*.] Jest'er

*n. one who jests* थट्टा &c. करणारा, थट्टेबाज, थट्टेखोर, मस्कऱ्या, विनोदी, विनोदकारी, विनोदभाषी. २ विदूषक. Jest'ful *a. given to jesting* थट्टेबाज, थट्टेखोर, विनोदी, गमती, मस्कऱ्या. Jest'ing *pr. p.&v. n.* [Jesting-stock *n. a butt for jests* थट्टेचा विषय *m.*] Jest'ingly *adv.*

*N. B.*—A Jest is for the sake of others; a Joke for one's own. A Joke is less personal and more harmless. Joke has more of pure hilarity, wit or humour; Jest more of ridicule and satire.

Jesuit (jez'ū-it) [From Jesus.] *n. one of the society of Jesus founded in 1534 by Ignatius Loyola, the members of which are reputed to be notorious for craftiness* (रोमनक्याथोलिक ख्रिस्ती पंथांतील) जेझुईट-नामक उपपंथांतील मनुष्य *m*, जेझुईट *m.* २ (hence) a *crafty person* कावेबाज -लुच्चा -लफंगा -लबाड मनुष्य *m.* Jesuit'ic, Jesuit'ical *a.* जेझुईटपंथी मनुष्याचा. २ *crafty, cunning, designing* कावेबाज, कपटी, हिकमती, लबाड, लुच्चा. Jesuit'ically *adv.* जेझुईट मनुष्याप्रमाणें. २ कावेबाजपणानें. Jes'uitism *n.* जेझुईट संप्रदाय *m*, जेझुईटसंप्रदायाची मतें *n. pl.* जेझुईटपणा *m*, लुच्चेपणा [JESUITS' BARK *n. cinchona, quinine,* सिंकोनाची साल *f*, रोमशहरांत जेझुईटलोकांनीं प्रथम इचा प्रसार केल्यामुळें तिला हें नांव पडलें आहे.]

Jesus ( jē'zus ) [L. *Jesus* –Gr. *Jesous* –Heb. *Joshua, Jehoshua,* whose help or salvation is Jehovah, the Saviour-Heb-*yasha*, to save.] *n. the saviour of mankind* (ख्रिस्ती धर्माप्रमाणें) मानवजातीचा तारणारा *m* -तारक *m*, येशू *m*, प्रभु येशू *m.*

Jet (jet) [Fr. *jaiet*–L. -Gr. *gagates*, -*Gagas*, a town and river in Lycia, in Asia minor, where it was obtained. ] *n. min. a mineral very compact and black used for ornaments* (एक जातीचा कृतीनें तयार केलेला) डामरासारखा काळा दगड *m.* साहेब लोक सुतकांत ह्याचीं कांकणें किंवा आंगठ्या हातांत घालतात. हे दागिने इंग्रजी जव्हाहिऱ्यांच्या दुकानीं असतात, कार दगड (?) *m*, कार (?) *m.* [ Jet-black *a. black as jet, the deepest black colour* अतिशय -फार काळा, काळाकुळकुळीत. ] Jett'y *a. made of jet* कार दगडाचा केलेला. २ *black as jet* कार दगडासारखा, फार काळा. Jett'iness *n.* काळेपणा *m*, कुळकुळीतपणा *m.*

Jet (jet) [Fr. *jeter*–L. *jacto*, freq. of *jacere*, to throw.] *v. t. to throw or shoot forward* (धारेसारखा -फवाऱ्यासारखा) सटकन उडणें. J. *v. t. to emit in a stream* धार *f* -फवारा *m.* सोडणें *g. of o.* J. *n. a spouting stream* फवारा *m*, कारंजें *n*, उडती धार *f*, चिरकांडी *f.* [BASIN MADE FOR THE WATER OF A J. हौद *m.* ELEVATED CISTERN FOR A J. धमधमा *m.* THOUSAND STREAMED J. हजारी कारंजें *n.*] २ *short pipe emitting a flame of gas* (ग्यास बाहेर सोडण्याची) नळी *f.* Jett'ing *pr. p.* Jett'ed *pa. t.* & *pa. p.*

Jetsam ( jet'sam ), Jetson ( jet'sun ), Jettison

(jet'isun) [O. Fr. *getaison*–L. *jactare*, to cast see Jet.] *n. the throwing of goods overboard in a case of great peril to lighten a vessel* (गलबत वादळांत सांपडून बुडण्याची भीति वाटूं लागल्यास गलबताचें वजन हलकें करण्यासाठीं) गलबतावरील माल पाण्यांत फेंकणें *n.* २ *the goods so thrown away which remain under water* गलबतावरून पाण्यांत फेंकलेला माल *m.* J. *v. t.* (वादळांत सांपडलेल्या तारवाचा भार हलका करून तें बचावण्याकरितां) तारवावरून माल समुद्रांत फेंकणें-टाकणें.

Jetty (jet'i) [Fr. *jete'e*, thrown out –*jeter*. See 2nd Jet.] *n. a projection* पुढें -बाहेर आलेला भाग *m*, फुगा *m*, फुगावा *m*. २ *a kind of pier* (समुद्राच्या पाण्याचा जोर कमी करण्यासाठीं बांधलेला) धका *or* धक्का *m*.

Jew (jōō) [O. Fr. *Juis* –L. *Judæus*, Gr. *Ioudaios* –*Ioudaia*, Judea.] *n. an inhabitant of Judea* (एशिया मायनरमधील) जूडिआ प्रांतांतील रहिवाशी *m*. २ *a Hebrew or Israelite* यहूदी, इस्राएल, ज्यू. [JEW'SHARP चंग *or* मोरचंग *m*, मुखवाद्य *n*.] Jew'ess *n. fem.* Jew'ish *a.* यहूदी, यहूद्याचा, यहूद्यासंबंधीं. २ यहूदी चालीचा. Jew'ishly *adv.* Jew'ishness *n.* यहूदीपणा *m*. Jew'ry *n.* यहूदी मोहल्ला *m*.

Jewel (jōō'el) [O. Fr. *jouel*, Fr. *joyau*; either a dim. of Fr. *joie*, joy –L. *gaudium*, joy, *gaudere* to rejoice (See Joy), or derived through Low L. *jocale* –L. *jocari*, to jest.] *n. an ornament of dress* (स्त्रियांचा रत्नखचित) दागिना *m*, अलंकार *m*, भूषण *n*. २ *a precious stone* रत्न *n*, मणि (Sk.) or मणी *m*, जवाहीर *n*, माणिक *n*, हिरा *m*, &c. [J. WORN IN A CREST चूडामणि *m*. J. HOUSE, J. OFFICE रत्नशाला *f*, जवाहीरखाना *m*.] ३ *anything highly valued, an object of special affection* मूल्यवान् वस्तु *f*, अति आवडीची गोष्ट *f*, रत्न *n* (*fig.*), परीस *m* (*fig.*) कालिजा *m*, जीव *m* (*fig.*), प्राण *m* (*fig.*). J. *v. t. to dress or adorn with jewels* रत्नभूषित -रत्नमंडित-अलंकारविभूषित -अलंकारमंडित करणें. २ *to fit with a jewel* रत्न -मणि बसविणें, रत्नखचित करणें. Jew'elled *pa. t. & p. p.* Jew'eller, Jew'eler *n. one who makes jewels* मणिकार *m*. २ *one who deals in jewels* जवाहिऱ्या or जवाहिरी *m*, (vulg.) जोहरी, जव्हेरी *m*, जवाहिराचा व्यापारी *m*. Jew'elry, Jew'ellery *n. the art or trade of a jeweller* जवाहिरी *f*, जवाहिराचा धंदा *m*. २ *jewels in general* जवाहीर *n*, रत्नें *n. pl.* जडित *n*, जडिताचे or जडावाचे दागिने *n. pl.*, दागिने *m. pl.*, जडजवाहीर *n*.

Jib (jib) [Dan. *gibbe*, Dut. *gijpen*, to turn suddenly.] *n. a triangular sail borne in front of the foremast in a ship* (so called from its shifting of itself) पोगी *f*. २ *mech. the projecting arm of a crane* (from which the load is suspended) (ओझें उचलण्याचा) यारीचा हात *m*, यारीची पोगी *f*. [The

cut of one's J. *colloq. one's outward appearance* बाह्यांग *n*, बाह्य देखावा *m*, बाह्य शोभा *f*.] J. *v. t. to shift a boom sail from one tack to the other* **पोगी दुसरीकडे नेणें.** J. *v. i. to move restively* (said of horse) **( अडेल घोड्यासारख्या ) अडखळत चालणें.**

Jibe ( jīb ) Same as Gibe, which see.

Jig ( jig ) [ Fr. *gigue*, a stringed instrument –Ger. *geige*; conn. with Gig. ] *n. a quick lively tune* **भराभर वाजविलेली गत** *f.* २ *a quick dance* (suited to such a tune) **जलद पावलांचा नाच** *m.* J. *v. i. to dance a jig* **जलद पावलांचा नाच नाचणें -करणें.** Jigg'ing *pr. p.* Jigged' *pa. t.* & *p. p.*

Jilt ( jilt ) [ Scot. *jillet*, dim. of *Jill* ( L. *Juliana*, –*Julius* ), a female name, used in contempt. ] *n. a woman who encourages a lover and then neglects or rejects him* **( प्रथम प्रेमपाशांत अडकवून नंतर ) फशीं पाडणारी स्त्री** *f*, **ठक बायको** *f*, **प्रतारिका** *f*, **संकेतितान्यगामिनी** *f*. २ *a flirt* **उडाणटप्पू बायको** *f*. J. *v. t. to encourage and then disappoint in love* **(प्रेमपाशांत गुंतवून अखेर) फशीं पाडणें, प्रेमवंचना करणें, गोड गोड थापा देऊन-मधाचें बोट लावून फसवणें, चकविणें, ठकविणें, झोका देणें, ( -ची ) प्रतारणा करणें.**

Jingle ( jing'l ) [ Formed from the sound, like Jangle. ] *n. a jingling or clinking sound* **छणछण** *f*, **छणछणाट** *m*, **खळखळ आवाज** *m*, **खळखळ** *f*, **झणकार** or **झणकारा** *m*, **झंकार** *m*, **झणत्कार** *m*, **छमछमाट** *m*, intens. [ J. OF TOE-ORNAMENTS रुणझुण *f*, झंकार *m*, रुणत्कार *m*. ] २ *that which makes a rattling sound* **( रुणझुण आवाज करणारी ) घुंगरूं ( वगैरे वस्तु ).** ३ *a correspondence of sounds in rhymes* **प्रास** *m*, **अनुप्रास** *m*. J. *v. t.* **छणछणणें, खळखळणें, झणझणणें, झणत्कार -खळखळ -छणछण** &c. **करणें.** Jing'ling *pr. p.* **खळखळणारा, छणछणणारा.** Jing'lingly *adv.* **खळखळ** or **खळखळां, छणछणां, घणघणां** (—intens. **छणाणा, झणाणा, झमझम** &c. [ J. bell &c. on the toes रुणन्नूपुरें *n. pl.* ] Jingl'ed *pa. t.* & *p. p.*)

Jingo ( jing'ō ) [ Said to be the Basque name for 'lord.' ] *n.* ( *cant Eng.* ) *a statesman who pursues or favours an aggressive, domineering policy in foreign affairs* **परराष्ट्रीय प्रकरणांत पहिल्यानें कुरापत काढून आपलें वर्चस्व गाजवूं पाहणारा मुत्सद्दी** *m*, **युद्धप्रिय -संग्रामप्रिय मुत्सद्दी** *m*. Jing'oism *n. nickname for a phase of the military spirit in England* **युद्धकंडू** *m*, **युद्धेच्छातिरेक** *m*, **युद्धप्रियता** *f.*

Job ( job ) [ Gael. *gob*, W. *gyb*, a beak; conn. with Gobble, Job. ] *n. a sudden stroke or stab with a pointed instrument like a beak* **( तीक्ष्ण शस्त्र ) भोंसकून केलेला प्रहार** *m*, **भोंसका** *m*. J. *v. t. to strike or stab suddenly* **( अचानक ) भोंसकून प्रहार करणें, शस्त्र खुपसणें.**

Job (job) [A Biblical personage. Through Heb. *Iyob*. an Arab of the land of Uz.] *n. the hero of the book of that name in the Old Testament* (जुन्या करारांतील ईयोब किंवा जोब प्रकरणाचा नायक) ईयोब *m*, जोब *m*. २ सहिष्णुतेचा -क्षमेचा -धैर्याचा पुतळा *m*. Job's comforter *n. colloq. an unsympathetic person, an aggravator of one's misery* (under pretence of sympathy) मनाचा उद्वेग किंवा दुःख वाढविणारा मनुष्य *m*, कपटमित्र *m*, व्याजमित्र *m*, जाबचा मित्र. २ *a boil* गळूं *n*, अवाळूं *n*, उठाणूं *n*. Job's news, *bad news* दुःखवार्ता *f*, अशुभवार्ता *f*, वाईट बातमी *f*.

Job (job) [Lit. 'a lump' or 'portion,' and formerly spelt *gob*, –O. Fr. *gob*, a mouthful.] *n. any piece of work, esp. of a trifling or temporary nature* बारिक सारिक -किरकोळ काम *n*, आडकाम *n*, अडपझडप काम *n*, बारिक धंदा *m*. २ *any undertaking with a view to profit* प्राप्तीसाठींच पत्करलेलें काम *n*, फायद्याचा व्यापार *m*. ३ *a mean transaction in which private gain is sought under pretence of public service* (नफ्याचें) हलकट सार्वजनिक काम *n*, फायद्याचें सार्वजनिक काम *n*. ४ *colloq. a situation or opportunity of work* काम *n*, धंदा *m*, जागा *f*, (loosely) नोकरी *f*, संधि *f*; as, "He lost his *job*." [By the J. उक्ता, खंडून, खंडणुकीनें, उक्त्या ठरावानें. J. lot उधडा माल *m*.] J. printer *n. one who does miscellaneous printing* किरकोळ -बारिकसारिक छपाईचें काम करणारा. J. *v. t. to sublet* (work) (काम) खंडून देणें, खंडणुकीनें देणें; as, "To J. a contract." २ *com. to buy and sell, as a broker* (घाऊक माल घेऊन गिऱ्हाइकांस) किरकोळ विकणें; as, "To J. goods." ३ *to hire or let by the job or for a period of service* उक्त्या ठरावानें वापरण्यास देणें, उक्त्या भाड्यानें देणें; as, "To J. a carriage." J. *v. i. to work by the piece, to do petty work* खंडणुकीचें काम करणें, आडकाम पतकरणें -घेणें, अडपझडप काम करणें; as, "Authors of all work, to *job* for the season." २ *to turn public matters to private advantage* सार्वजनिक कामांत स्वहित साधणें, अधिकाराचा विक्रय मांडणें -करणें; as, "And judges *job*, and bishops bite the town." ३ (घाऊक खरेदी करून) किरकोळ माल विकणें, दलाली करणें. Jobbed' *pa. t. & p. p.* Jobb'ing *pr. p. & v. n.* Jobb'er *n. one who works by the job* खंडणुकीचें काम करणारा -घेणारा, उक्तें काम करणारा, (गिरणींतील तीस चाळीस कामकऱ्यांवरील) मुकादम *m*. २ *one who buys and sells as a broker* दलालीच्या नात्यानें (घाऊक) खरेदी व (किरकोळ) विक्री करणारा, दलाल *m*. ३ *one who turns official or public business to private advantage* (नोकरी बजावतांना किंवा सार्वजनिक काम करितांना) स्वहित साधणारा, अधिकारविक्रेता *m*, स्वार्थसाधु अधिकारी, स्वार्थी पुढारी. ४ (hence) *one who engages in a mean lucrative af-*

*fair* स्वार्थसाधु, कांचनभट (*fig.*). Jobb'ery *n.* खंडणुकीनें काम करणें *n*, उक्त्या ठरावानें काम करणें *n*. २ *unfair means employed to procure some private end* (स्वार्थदृष्टीचा -स्वहिताचा) लुच्चेगिरीचा धंदा *m.* or briefly लुच्चेगिरी *f.*

Jockey (jok'i) [Dim. of *Jock*, northern E. for *Jack*, which see.] *n. a professional rider of horses in races* शर्यतींतील धंदेवाईक घोडेस्वार *m.* २ *a horse-dealer* घोड्यांचा व्यापारी *m*, अश्वविक्रयोपजीवी मनुष्य *m.* ३ *a cheat* ठकव्यापारी *m*, ठक *m*, वंचक *m*, लबाड -लुच्चा &c. -मनुष्य *m.* Jock'eys *n. pl.* J. *v. t. to jostle by riding against* घोडा आंगावर घालून ढकलणें -हबकणें -धक्का देणें. २ *to cheat* ('जाकी'प्रमाणें लुच्चेगिरीनें फायदा मिळविण्याकरितां) फसविणें, ठकविणें, छकविणें, डोईवर हात फिरवणें *g. of o.*, हातीं धुपाटणें देणें *g. of o.*; as, "To J. a customer." J. *v. i. to act the jockey, to cheat* (जाकीप्रमाणें) लबाडी -छकबाजी -लुच्चेगिरी &c. करणें. Jock'eyism, 'जाकी' लोकांची भाषा -पद्धत -सराव -चाल. Jock'eyship *n. the art of a jockey, skill in horse-racing* जाकीचें कसब *n*, शर्यतींत घोडा धांववण्याचें कसब *n.* २ *trickery, artifice, adroit management for unfair advantage* लुच्चेगिरी *f*, कसब (अनीतीच्या फायद्याकरितां). Jock'eyed *pa. t. & p. p.* Jock'eying *pr. p.*

Jocose (jo-kōs') [L. *jocus*, a joke. See Joke.] *a. given to jokes and jesting* थट्टेखोर, थट्टेबाज, थट्टेवाईक, विनोदी, विनोद्या, विनोदकारी, मस्कऱ्या, गमत्या. २ *full of jokes, humorous, sportive, merry* थट्टापूर्ण, विनोदाचा, विनोदात्मक, विनोदपूर्ण, गंमतीचा, मजेचा; as, "J. or comical airs." Jocose'ly *adv.* थट्टेवारी, मस्करीनें, विनोदानें, हंसतहंसत, थट्टापूर्वक. Jocose'ness *n.* Jocos'ity *n.* थट्टेबाजी *f*, थट्टेखोरी *f*, विनोदीपणा *m.* Joco-se'rious *a. mingling mirth and seriousness* गांभीर्ययुक्त विनोदी. Joc'ular *a. given to jokes* थट्टेखोर, मस्कऱ्या. २ *sportive, merry, laughable* विनोदात्मक, थट्टेचा, हास्यपूर्ण, &c.; as, "The style is partly humorous and partly *jocular*." Jocular'ity *n.* थट्टेबाजी *f.* &c. Joc'ularly *adv.* थट्टेबाजपणानें.

Jocular (jok'ū-lar) *a.* See under Jocose.

Jocund (jok'und) [L. *jocundus*, pleasant -*jocus*, a joke. See Jocose.] *a. merry, cheerful, pleasant* आनंदी, उल्लासी, उल्लासवृत्ति, गमती, गमत्या, विनोदी, हौशी, खुशमौजी, खुशमौज्या, खुशदिल, आनंदवृत्ति. Joc'undly *adv.* आनंदानें, मजेनें, हौसेनें. Jocund'ity *n.* आनंदीपणा *m*, उल्हासवृत्ति *f*, गमत्या स्वभाव *m*, हौशी स्वभाव *m*, खुशमौज *f.*

Jog (jog) [A weakened form of Shock.] *v. t. to push or shake with the elbow or hand* (कोंपरानें किंवा हातानें) धक्का देणें -ढकलणें -डंवचणें -खुपसणें, आंचकणें, हबकणें, धक्का *m* -हिसका *m* -आंचका *m* -हबका *m.* देणें किंवा मारणें. २ *to suggest to, to*

*remind* आठवण -स्मरण करणें -देणें, आठवून देणें, टोंचणें, डवचणें; as, "To J. the memory." J. *v. i. to move by shocks, to travel slowly* खुडुरुडु -रुडुखुडु -रडतरडत -रखडतरखडत चालणें -जाणें, हळूहळू -आस्ते आस्ते -हलके हलके -सावकाश जाणें -चालणें. J. *n. a slight shock, a push* (intended to awaken attention) (लक्ष वेधण्यासाठीं मारलेला) धक्का *m*, डोंचणी *f*, डवचणी *f*, टोंचणी *f*, हिसका *m*, ढुमणी *f*, ढुसणी *f*, उटाळा *m*. Jog'trot *n. a slow jogging trot* क्षुद्रक क्षुद्रक चाल *f*. Jogged' *pa. t.* & *p. p.* Jogg'ing *pr. p.* & *v. n.* रडतखडत, रुडुखुडु, तुनुमुनू, &c Jogg'ingly *adv.*

Joggle (jog'l) [Dim. of Jog.] *v. t. to jog or shake slightly, to jostle* हळूच धक्का देणें -मारणें. J. *v. i. to shake* हालणें, कांपणें. Jogg'led *pa. t.* & *p. p.* Jogg'ling *pr. p.* & *v. n.*

John (Jon) [Heb. *yokhānān*, one whom Jehovah has favoured.] *n. a masculine Christian name* ख्रिस्ती मनुष्याचें 'जान' असें पुल्लिंगी नांव *n*. [JOHN, THE BAPTIST AND JOHN, THE EVANGELIST ARE TWO VERY FAMILIAR NAMES IN THE NEW TESTAMENT.] इंग्लंडमध्यें जॉन हें नांव पुष्कळच प्रचारांत आहे. २ *also used as a representative proper name for a foot-man, butler, waiter, messenger or the like* इंग्लंडांत हमाल, बबरजी, वाढपी, हुजरे वगैरे नोकर लोकांस त्यांचें खरें नांव माहित नसलें तर हांक मारण्याकरितां 'जान' हा शब्द वापरतात. John Bull [NAME OF A CHARACTER REPRESENTING THE ENGLISH NATION IN ARBUTHNOT'S SATIRE.] *n. a personification of the English nation* इंग्रजी राष्ट्रांतील गुणदोष दाखविणारें पात्र *n*, जानबुल *m*. २ *English-men collectively* इंग्रज लोक, इंग्रजी राष्ट्र *n*. ३ *the typical Englishman* राष्ट्रस्वरूपी इंग्रजी मनुष्य *m*. ४ *an individual Englishman who exemplifies the national character* (राष्ट्राचे सर्व गुणदोष ज्यांत आहेत असा) राष्ट्रस्वरूपी इंग्रजी मनुष्य *m*.

Join (join) [Fr. *joindre* –L. *jungere, junctum*, Sk. युज्, to join. See Yoke.] *v. t. to connect, to unite* जोडणें, सांधणें, सांधवणें, सांधा *m*. बसाविणें, एक -एकत्र संयुक्त -संलग्न करणें, जडणें, जडवणें, सांधप *n* -जडप *n* -संयोग *m* -संयोजन *n* -करणें *g. of o.*, सांधपणें, (*in league*) (-ची) जूट करणें, (*in marriage*) (-चा) जोडा जोडणें, विवाहसंबंध *m*. जोडणें, लग्न करणें. २ *to associate* (शीं) संबंध करणें -ठेवणें -राखणें, व्यवहार करणें. ३ *to add or annex* (ला) मिळवणें, जोडणें. ४ *to engage in* (as an encounter, battle, issue) आंगावर घेणें, पत्करणें, (ला) तयार -सिद्ध -सज्ज होणें, (लढाई, सामना, वाद, इ० कांस) तोंड देणें -उभें राहणें, झुंपणें. J. *v. i. to be connected with, to be in close contact, to unite* (with) (शीं)

See Lie.] *v. t. to cause to lie down. to place or set down, to deposit* (खालीं -भुईवर -जमिनीवर- भुईसपाट) ठेवणें, निजविणें, पाडणें. २ *to beat down* (खालीं) बसविणें; as, "A shower *lays* the dust." ३ *to arrange with regularity, to place in position* (जागचे जागीं -जाग्यावर) बसवणें, मांडणें -ठेवणें, रचणें, बसविणें; as, "To L. a corner-stone." ४ *to prepare, to contrive* तयार करणें, लावणें, बनविणें, योजणें, करणें, रचणें, ठरविणें, शोधून काढणें, डोक्यांतून काढणें; as, "To L. a snare or plan." ५ *to spread on a surface* (-वर) लावणें, चढविणें, देणें, बसवणें, माखणें, फांसणें; as, "To L. plaster or paint." ६ *to calm, to allay, to appease* शांत -थंड करणें -पाडणें, शमविणें, बसविणें, शमन *n* -सांत्वन *n* -शांति *f* &c. करणें *g. of o.*, दाबणें, (दाबून) नरम पाडणें, पाडणें (as wind); as, "To L. the winds." (b) *to exorcise* (भूत इ.) काढणें, घालवणें, दवडणें, नाहींसें करणें, गाडणें, गाडून टाकणें, बसवणें, खिळवणें; as, "To L. an evil spirit." ७ *to cause to lie dead or dying* (-चें) प्रेत पाडणें, (-चा) मुडदा पाडणें, (-ला) गारद करणें, लोळवणें, ठार करणें. ८ *to stake, to risk* पण *m.* लावणें -करणें -घालणें *g. of o.*, होड *f* -पैज *f* करणें -घालणें -मारणें *g. of o.*, सरत लावणें, पणाला घालणें -ठेवणें -टाकणें -लावणें, मांडणें; as, "To L. one's honour." ९ *to bring forth and deposit* (as eggs) (अंडीं) घालणें, गाळणें, टाकणें. १० *to apply, to put* (one's hand to) (-ला) हात घालणें, (कामाला इ०) लागणें. ११ *to impose* (as tax, burden, &c.) (-वर) बसवणें, लावणें, ठेवणें, घालणें, स्थापणें, टाकणें, आरोपणें. १२ *to impute, to allege* (a crime &c.) (-च्या) आंगीं चिकटविणें -लावणें, (-च्या) माथीं मारणें, आरोपणें, आरोप *m* -तोहमत *f.* ठेवणें -घालणें -लादणें. १३ *to impose* (as a command) (-ला) हुकूम *m* -आज्ञा *f* &c. देणें -करणें -सोडणें. १४ *to present or offer* (as a scheme &c.) (विचारासाठीं) पुढें ठेवणें -मांडणें, (-ला) रुजू -सादर -हुजर करणें. १५ (*law*) *to state, to allege* (damages &c.) दाखवणें, सांगणें, पुढें करणें -आणणें. १६ (*mili.*) *to point, to aim* (a gun &c.) रोंखून धरणें, रोंखणें, (-वर) नेम धरणें *g. of o.* [To L. bare, *to disclose* उघडकीस -बाहेर -चवाठ्यावर आणणें, फोडणें, उघडा करणें. To L. before (as plans), *to submit to* (-च्या) पुढें ठेवणें -मांडणें, (-ला) दाखवणें. To L. by, *to keep for future use* जतन करून -राखून ठेवणें, शिलक ठेवणें, (भावी तरतुदीकरितां) राखणें, निराळा काढून -सांठवून ठेवणें, संग्रह करणें *g. of o.* २ *to discard* बाजूस सारणें, एकीकडे टाकणें, टाकून देणें, त्याग *m.* करणें *g. of o.* To L. by the heels, *to imprison* (-ला) बंदींत -कैदेंत -अटकेंत टाकणें, (-ला) कैद करणें, तुरुंगा दाखविणें, तुरुंगांत घालणें, (-ला) बिड्या *f. pl.* ठोकणें -घालणें. To L. down, *to stake as a wager* पणाला लावणें -घालणें -ठेवणें, २ *to give up, to surrender* (as arms, life,

&c. ) खालीं ठेवणें, (दुसऱ्याच्या) स्वाधीन करणें, सोडणें, टाकणें, देणें. ३ *to affirm, to assert* ( as a proposition ) उपपादणें, उपपादन *n.* करणें *g. of o.*, विधान करणें, मांडणें. ४ *to delineate* रेखाटणें. To L. hands on, *to seize* पकडणें, धरणें, (-वर ) झडप घालणें. To L. hands or violent hands on one's self, *to injure one's self* (स्वतःला ) इजा करून घेणें. २ (specif.) *to commit suicide* आत्महत्या करणें, हत्या करून घेणें, स्वतःचा जीव -प्राण घेणें. To L. heads together, *to consult together* सहविचार करणें, मसलत -विचार करणें, चार डोकीं एकत्र करणें. To L. hold of *or* on, *to seize, to apprehend* पकडणें, धरणें. To L. in, *to get in a supply of* घेऊन ठेवणें, सांठवणें, जमविणें, (-चा ) पुरवठा होणें *in con.*, संचय करणें *g. of o.* To L. on, *to inflict* लगावणें, चढवणें, मारणें, तडकावणें, भडकावणें, चोपणें, चोप देणें. To L. off, *to cast aside* बाजूस सारणें -ठेवणें -टाकणें. २ *to mark off* (खुणा करून) निराळा काढणें. To L. one's self out to, *to put forth one's best efforts for any thing* झटून करणें, (-ला, -साठीं) झटणें, बळ खर्चणें.
Lay'er *n. that which lays* ( as hen etc. ) अंडें घालणारा. २ *a stratum* थर *m*, पडदा *m*, स्तर *m*, परवड *f*; ( detached ) पदर *f*; ( of earth and stones ) थरणी *f*. ३ *a shoot of a plant laid for growth* झाडाचा फांटा *m* -कोंब *m*. Laying *n. -act.* ठेवणें *n*, स्थापणें *n*, घालणें *n*, &c. रचणूक *f*, रचना *f*, स्थापन *n*. -ना *f*, न्यास *m*, निक्षेप *m*, योजणूक *f*, योजना *f*; ( of a charge ) आरोपणें *n*, आरोपण *n*, आरोप *m*. ( esp. in comp. as दोषारोप &c. ); ( out ) मांडणें *n*. &c. मांडणी *f*, मांडणूक *f*, मांड *m*, मांडवळ *f*, मांडणावळ *f*. २ *the act of laying eggs* अंडीं घालणें *n*. ( b ) *the period of laying eggs* अंडीं घालण्याचा समय *m*. ( c ) *the eggs laid* अंडीं *n. pl.*, वीण *f* (?). ( d ) *the first coat of plaster* प्लास्टरचा पहिला हात *m*.

Lazar ( lā'zar ) [ Fr. *lazare*—L. *Lazarus*-Gr. *Lazaros*, the name of the beggar in Luke XVI. 20—Heb. *Eleazar*. ] *n. a poor and diseased person usually one afflicted with a loathsome disease, espec. a leper* महारोगी, कुष्ठरोगी, (विशेषतः) रक्तपित्या, गळत्कुष्ठी, महाव्याधिग्रस्त. La'zar -house *n.* महारोगी-घर *n*, महारोग्यांचें इस्पितळ *n*, महाव्याधिस्थशाला *f*. La'zar-like *a. full of sores, leprous* महाव्याधिग्रस्त, गलितकुष्ठ झालेला.

Lazaretto ( laz-a-ret'o ), Lazaret ( laz'a-ret ) [ It. *lazzeretto*, Fr. *lazaret*. See Lazar. ] *n. a public hospital for persons affected with contagious disease* संसर्गजन्य रोगांनीं ग्रस्त झालेल्या रोग्यांचें इस्पितळ *n*, संसर्गजन्यरोगिशाला *f*.

Lazy ( lā'zi ) [ M. E. *lasche*-L. *laxus*, loose. ] *a. averse to labour, idle, shirking work, inactive* आळशी, धिमा, थंड, मंद, आंगजड, सुस्त, जड, पड्या, चुकारतट्टू, कामचुकार, कामचुकाऊ. [ Some terms and phrases for a *very lazy person* are साताळशी, झाता-

ळशी, आळशांचा राजा, आळशांचा मायबाप, उंटावरून शेळ्या वळणारा, काठीनें पाणी शिवणारा -संध्या करणारा, पिकल्या झाडाखालीं उपाशीं मरणारा.] २ *slow* मंद, मंदगति, धिमा. [L. weight उणें -कमी वजन *n.*] Laze *v. i.* (*colloq.*) *to be lazy* आळसणें, आळसावणें, सुस्तावणें. L. *v. t.* (*colloq.*) *to waste in sloth, to spend in idleness* (as time) आळसांत घालवणें, (फुकट) दवडणें, बसून घालवणें. La'zily *adv.* आळसानें, आळस करून, आळसत आळसत, गमत गमत, टंगळमंगळ, अळमटळम, अळमळीत, आलस्यपूर्वक. २ सुस्तीनें, सुस्तीखालीं, सुस्तपणानें. La'ziness *n.* आळस *m*, सुस्ती *f*, ढिलेपणा *m*, आलस्य *n*, निरुद्योगिता *f*, उद्योगविमुखता *f*, उद्योग -द्वेष *m*, कार्यानुत्साह *m*. La'zyback *n.* गाडींत पाठ टेंकण्याची उशी *f*, पाठउशी. La'zybones *n. colloq. a lazy person* आळशी माणूस *m*.

Lea, Ley (lē) [A. S. *leah*, a meadow.] *n. meadow* कुरण *n*, चरणीची जमीन *f*, गुरचरण *n*.

Lead (led) [A. S. *lead*, Ger. *loth.*] *n. a well-known metal of a bluish white colour* शिसें *n*, सीस *n*, सीसक *n*. [BLACK L., *graphite* शिसपेन्सिली करण्याचा शिशाचा दगड *m*. RED L., शेंदूर *m*, सिंदूर *m*, शोण *m*, सौभाग्य *n*. WHITE L. or CARBONATE OF L., सफेता or सफेदा *m*.] २ *an article made of lead* शिशाचा डागिना *m* -नग *m*; as, (a) *a thin plate of lead separating lines of type* (जुळलेल्या टाईपांच्या ओळींमध्यें जागा सोडण्याकरितां घातलेली) सीसपट्टी *f*, शिशाची पट्टी *f*, लेड *f* (लेडी pl.). (b) *plummet for sounding at sea* बुडीद *n*, गळ *m*. (c) (*pl.*) *sheets of lead for covering roofs* (छपरावर घालण्याचे) शिशाचे पत्रे *m. pl.* (d) *a flat roof covered with sheets of lead* शिशाचें धाबें *n*, शिशाच्या पत्र्याचें छप्पर *n*. ३ *a small cylinder of black lead used in pencils* पेन्सिलींतील शिसें -शिशाची कांडी *f*. Lead'-mill *n. a leaden disc charged with emery for grinding gems* जवाहिरी दगड कापण्याचें शिशाचें चाक *n*. Lead'-pencil *n.* शिसपेन *f*, शिशाची पेन्सिल *f*, शिसपेन्सिल *f*. L. *v. t. to cover or fit with lead* (-वर) शिसें चढविणें, शिशानें मढविणें. २ (*printing*) *to separate lines with leads* (जुळलेल्या टाइपांच्या ओळींत) लेडी घालणें. Lead'ed *a. fitted with or set in lead* (as windows) शिशाचा पत्रा घातलेला. २ (*printing*) *separated by lead* लेडा घातलेल्या (ओळी). Lead'en *a. made of lead* शिशाचा, सीसमय. २ *like lead in colour* शिशाच्या रंगाचा, सीसकवर्ण. ३ *heavy, dull, sluggish* सुस्ती आणणारा. Lead'en-hearted *a. having an unfeeling heart* निर्दय, कठिणहृदय, घट्ट मनाचा. २ *stupid* मूर्ख, मंद, मठ्ठ, लठ्ठ. Lead'ing *n. lead, or articles of lead, collectively, lead-work* शिशाचे जिन्नस *m. pl.*, शिशाचें काम *n*. Leads'man *n. a seaman who heaves the lead to ascertain the*

*depth of water* समुद्रांत बुडीद सोडणारा -टाकणारा नावाडी -खलाशी *m.*

Lead ( lĕd ) [ A. S. *lædan*, to make to go, causal form of *lidan*, to go. ] *v. t. to guide by the hand* हात धरून नेणें *g. of o.*, हातीं धरून नेणें -फिरवणें -घेऊन जाणें. २ *to show the way by going first* ( स्वतः पुढें होऊन ) वाट *f.* दाखविणें, नेणें, घेऊन जाणें, वाट *f.* दाखवून नेणें, मार्गदर्शन *n.* करणें. ३ (*hence fig.*) *to direct, to instruct* माहिती देणें, उपदेश *m.* करणें, तालीम *f.* देणें, पढविणें. ४ *to have charge of, to conduct with authority* पुढें जाऊन -पुढाईत होऊन नेणें, चालविणें, पुढाकार करणें *g. of o.*, पुढार घेणें *g. of o.*, पुढारी -पुढाईत असणें *g. of o.*; as, "to L. a party, an excursion, an army." ५ *to go in advance, to precede*, ( hence ) *to be foremost among* अग्रगण्य -अग्रेसर असणें, पहिला नंबर असणें *in. con. g. of o.*, पुरोनयन करणें; as, "the pioneers L. the attack," "Cicero Ls. the orators of Rome." ६ *to direct by influence good or bad, to prevail on, to induce* फुसलावून -मन वळवून नेणें, मोह *m.* घालून नेणें, ओढणें, ओढून नेणें, -ओढ *f* ओढा *m.* लागणें *in. con.* ७ *to spend, to pass* (as life &c.) काढणें, घालवणें, लोटणें, गुजराण -गुजारा *m.* करणें *g. of s.* ८ *to begin a game, round or trick with* पहिल्यानें खेळणें, सुरवात करणें (पत्त्याचें पान वगैरे ) प्रथम उतरणें; as, "to L. trumps." [To L. ASTRAY, *to draw is to a wrong course* आडमार्गास नेणें, खोट्या मार्गास नेणें. To L. BY THE NOSE, *to make one follow submissively* कान धरून नेणें -वळवणें, वाटेल तसें वळवणें. To L. OFF, *to begin or take the start* एकदम सुरवात करणें. To L. ON, *to persuade to go on* मन वळवून पुढें नेणें. To L. CAPTIVE, *to carry or bring into captivity* कैद *f.* करून -बंदिस्त करून नेणें. To L. THE WAY वाट दाखविणें. To L. UP TO, *to bring about by degrees* ( मध्यें ) हळूहळू पर्यवसान *n.* होणें *g. of s.*, हळूहळू ( अमुक एक ) स्थितीला नेणें. ] L. *v. i. to go before and show the way, to be first or chief* पुढें जाणें -होणें, ( पुढें जाऊन ) वाट *f.* दाखविणें, पुढाईती *f* -पुढाईतपणा *m* -मोहोरपी *f* -पुरस्कार *m.* करणें, आघाडी *f* -पुढार *m.* घेणें. २ *to tend or reach to* ( with *to* ) वळवणें, नेणें, परिणाम *m* -शेवट *m.* होणें *in. con. g. of s.*, (अमुक) थरास जाणें; as, "The road Leads to the station," "Gambling Leads to other vices." Lead *n. direction, guidance* पुढार *m*, पुढारीपणा *m*, पुढारीपण *n*, पुढाकार *m*, पुरस्कार *m.* २ *advance position, precedence* पहिली -पुढची जागा *f*, पहिली पायरी *f.* ३ (a) *the act of playing first in a game* पहिली उतारी *f.* (b) *the right of playing first in a game* पहिल्यानें खेळण्याचा हक्क *m.* (c) *the card, suit or piece so played* पहिली उतारी *f*, पहिल्यानें खेळलेलें पान *n.* ४ (*naut.*) *the course of a running rope from end to end* वळण *n.* ५ *a main conductor in the electric*.

*al distribution* मुख्य विद्युद्वाहिनी *f*, विद्युन्नायिका *f*, *or briefly* नायिका *f*. Lead'er *n.* हात धरून नेणारा, (वाटेनें -वाट दाखवून) नेणारा, नेता *m.* २ *one who goes first* अग्रेसर *m*, अग्रगामी *m.* ३ *a chief* नाईक *m*, नायक *m*, पुढारी *m*, मोहरपी *m*, म्होरप्या, म्होरक्या *m*, पुढाईत *m*, पुढाकारी *m*, मोहरकाळ्या, *m*, पुरस्कर्ता, अग्रगामी, अग्रेसर, मुखरण, मुखरीण, बिनीचा, प्रमुख, पुरस्सर (in comp.); L. (of a religious order or sect) आचार्य; (of a team or train) मोहरकाळ्या, मोहरक्या, मोहरपी, मोहर -चा -ला, मोहरा, सरजा; (bullock) सरज्या, नायकाबैल, (L. of an army) सेनापति, बक्षी. ३. *mus.* गायन-बाजा सुरू करणारा, नायक *m*, गुरु *m.* ४ *the leading editorial article in a newspaper* अग्रलेख *m*, वर्तमानपत्रांतील मुख्य लेख *m.* –(Also Leading article). Lead'erette *n. a brief newspaper leader* उपाग्रलेख *m*, उपलेख *m*, दुय्यमलेख *m.* Leader'ship *n.* पुढारीपणा *m*, म्होरकेपणा *m.* २ अग्रेसरत्व *n.* See Lead *n.* Lead'ing *pr. p.* (पुढें जाऊन) वाट दाखवणारा, प्रमुख, &c. २ प्रधान, मुख्य, मोठा. L. case (*law*) *a reported decision which has come to be regarded as setting the law of the question involved* एखाद्या (मुद्द्यावरील) महत्वाचा -आधारभूत ठराव *m.* L. -QUESTION (*law*) *a question so put to a witness as to suggest the answer that is wished or expected* सूचक प्रश्न *m.* Leading *n.* See Lead *n.*

Leaf (lēf) [Anglo-Saxon word. Leaves *pl.*] *n.* पान *n*, पर्ण *n*, पत्र *n*, दल *n*, दळ *n.* [TRIPARTITE L. तिकटें *n*, तिवण *f*, त्रिदळ *n.* L. USED AS A PLATE OR DISH जेवणवत *n.* DRY AND LITTERED LEAVES पातेरा *m*, पाचोळा *m.* LOAD OF LEAVES (esp. of those used as dishes) पानभारा *m*, पानपेंडा *m.* VENDER OR BRINGER OF LEAVES FOR DISHES पानारी *m.* VESSEL OR DISH MADE OF LEAVES पत्रावळ *f*, (A SMALL ONE) टिकोळें *n*, ठिकोळें *n*, ठिगोळें *n.* UNBLOWN SPIKE OF LEAVES शिगरी *f*, सुईरा *m.* ] २. *anything beaten thin like a leaf* पान *n*, पत्र *n.* ३ *two pages of a book* (पुस्तकाचीं दोन पृष्ठें मिळून झालेलें) पान *n*, पत्र *n.* ४ *side of a window, shutters* (खिडकीची) फळी *f*, कवाड *n*, कपाट *n*, तलफ *n*, फरदा *m*, झडप *n.* ५ (of a hand-mill) तळी *f*, पेड *n.* ६ *the movable side of a table* (मेजाची) खालवर करण्याची फळी *f*, मेजाचें पान *n.* ७ (of an ornament) पान *n*, पदक *n.* Leaf *v. i. to shoot out or produce leaves* पानें *n. pl.* -पालवी *f.* फुटणें -येणें *in. con.*, पालणें, पालेजणें, पालवणें. Leaf'-metal, *metal in thin leaves for decoration* तकट or तकटें *n*, (धातूची) बेगड *f*, बर्ख *m*, पत्रा *m.* L. -mould, *earth formed by decayed leaves, used as a soil for plants* पातेरा कुजून झालेली -कुजलेल्या पातेऱ्याची माती *f.* L. -stalk पानाचे देंठ. [ TO TURN OVER A NEW LEAF. (*colloq.*) *to take up*

*a new and better course of conduct* (स्वतःची) वर्तणूक अजिबात सुधारणें, (Guj.) नवीन पागडी घालणें -बांधणें. Leaf'age *n. leaves collectively* पानें *n. pl.*, पालवी *f*, पल्लव *m. pl.*, पाला *m*. Leaf'ed (अमुक तऱ्हेचीं) पानें असलेला ( used in comp. as broad *-leafed*, four*-leafed*). Leaf'iness *n*. पर्णबाहुल्य *n*, पर्णप्राचुर्य *n*. Leaf'less *a*. निपानी, सडसडीत, निष्पर्ण, निष्पत्र, अपत्र, पर्णशून्य, नागटा, बुचा. [ L. tree झाडाचा खराटा *m*. ] Leaf'lessness *n*. निष्पर्णता *f*, पर्णशून्यता *f*. Leaf'-let *n. a little leaf* लहान पान *n*, पर्णक. *n*. (b) *a tract or printed leaf* थोडा -बेताचा मजकूर छापलेलें पान *n*, छापील पत्रक *n*. २ *bot. one of the divisions of a compound leaf* दल, दळ *n*. ३ (*zool.*) *a leaf-like organ or part* पर्णसमेंद्रिय, पर्णेंद्रिय *n*. Leaf'y *a. full of leaves* दाटपानांचा, बहुपानी, बहुपर्ण, पर्णबहुल -प्रचुर -वान् -मय. २ *consisting of leaves* पानांचा, पर्णरचित, पर्ण (in comp. ) as, "L. bed" पर्णशय्या *f*.

League ( lēg ) [ Fr. *lieue* –L. *leuca*, a Gallic mile of fifteen hundred Roman paces. ] *n. a nautical measure of length about three miles* दीड कोस, सुमारें तीन मैलांइतकें अंतर *n*, एक लीग अंतर *n*. लीग *m*.

League ( lēg ) [ Fr. *ligue* –L. *ligare*, to bind. ] *n. an alliance, a bond, a union for mutual advantage* जूट *f*, कट *m*, कूट *m*, कटाव *m*, संधि (*Sk.*) *m*, एकोपा *m*, ऐक्य *n*, एकवळा *m*. L. *v. i. to form a league, to confederate* जूट *f*. करणें, मिळून असणें, संघ *m*. करणें, जुटणें, जुडणें. L. *v. t. to combine, to unite* (ची) जूट -संघ करणें, जोडणें. Lea'gued *pa. t. & pa. p.* जुटलेला, जुडलेला. Lea'guer *n*. जूटवाला *m*, जूट करणारा *m*. Lea'guing *pr. p.*

Leak ( lēk ) [ Icel. *leka*, to drip, to leak as a ship. ] *n. a hole that admits water* गळतें *n*, गळती *f*, बुळकी *f*, भोंक *n*, तड *f*, फाट *m*, छिद्र *n*, चीर *f*. [ To SPRING A L. *to begin to let in water* पाणी घेणें, फूट घेणें, झरा लागणें *in con*. To STOP A L. गळतें काढणें, भोंक बुजवणें, गावडी मारणें. ] २ *oozing of a fluid through a crack* पाझर *m*, गळ *f*, गळती *f*. L. *v. i. to let fluid in or out* गळणें, झरणें, पाझरणें, टिपकणें, वाहणें; (in the case of a boat) पाणी घेणें. [To LEAK OUT, *to get to the public ears* षट्कर्णी होणें, (बातमी इत्यादि) फुटणें, बाहेर येणें -पडणें, उघाडीस -उघडकीस येणें. ] Leak'age *n. a leaking* पाझर *m*, गळतें *n*, गळती *f*, गळण *f*. २ *allowance for leaking* घट *f*, घस *f*. Leak'iness *n*. गळकेपणा *m*. Leak'ing, Leak'y *a*. गळणारा, गळका, गळता, पाझरता, पाणी घेणारा. २ ( *colloq.* ) *tattling, apt to disclose secrets* भडभड्या, गुप्त गोष्ट एकदम बोलून जाणारा.

Leal ( lēl ) [ M. E. *lel*, Same as Loyal. ] *a. true-hearted, faithful* विश्वासू, राजनिष्ठ, स्वामिनिष्ठ.

Lean ( lēn ) [ A. S. *hlinian* –L. *inclinare*, to bend. ] *v. i. to incline, to deviate from a vertical*

*position* लवणें, नमणें, ओठंगणें, ओणवणें, ओणवा होणें, कलणें, झुकणें, तोल जाणें, कलता- झुकता होणें; (*specif.*) रेळणें, एकारणें. २ (*fig.*) (with *to* or *toward,*) *to incline in opinion or desire, to bend* कलणें, मनाचा कल *m* -झोंक *m* -असणें, लवणें, झुकणें, वळणें, मोडणें. ३ (with *against, on* or *upon*) *to rest for support* टेंकणें, ठेपणें, ओठंगणें. L. *v. t. to cause to lean, to rest* ओणवा करणें, ओणवणें, टेंकणें. Lean'ing *pr. p.* & *v. n.* कल *m*, झोंक *m*, ओढा *m*. Lean'ed or Leant (lent) *pa. t.* & *pa. p.*

Lean (lēn) [A. S. *hlæne,* lean -*lean* to bend on account of thinness or from want of substance or support. ] *a. thin, wanting flesh* कृश, रोड, रोडका, पातळ, सडपातळ, रोडंग, रोडंगा, सडकपातळ, काटकुळा, काटकोळा, पातळांगी (ग्या), लुकड, लुकडा (ड्या), लुक्कड, किडकिडीत, किरकाड्या, किचकाड (डा), कृशतनु, सुकट, सुकड्या, हडहडीत, सडसडीत, हाडळ -गळ, वाळका, वाळकुंजा, कृश, क्षीण, सुकटलेला, सुखलेला; (intensive) रोडांग्या, रोड्या, लकड्या, काठांग्या, काड्याळा, फाटक्या आंगाचा, एकेरी आंगाचा, एकफांसोळीचा, मरतुकडा, मरतमडें *n*, बांगडीसारखा, खपाटें बसलेला, पाठीस लागलेला, हाडांचा पिंजरा *m*, पाप्याचा पितर. [To BECOME L. *to waste away* वारीक होणें, कृश होणें, रोडणें, रोडावणें, रोडंगणें, गळणें, सुखणें, अटळणें, झडणें, खंगणें, मरीस जाणें, काचावणें, डगावणें, (intensively) चुंवणें, चोपटणें, खंगणें; some colloquial expressions for the same are हातापायांचें पडवळ होणें, हातापायांच्या -हाडांच्या फुंकण्या होणें, आंगाचें पाणी -हाडांचे मणी होणें, पोटाची पत्रावळ आणि हातापायांचें पडवळ होणें, पाठीस पोट लागणें, पाठ आणि पोट एक होणें, कडप वळणें *g. of s.*, हातापायांचा ढीग होणें, संक्रांत बसणें *in. con.*, पोट वाढणें आणि हातापायांच्या काड्या होणें.] २ *wanting fullness, deficient in quality or contents, barren* (used *lit.* & *fig.*) भुकिस्त or भुक्कड (land), रुखा, रुक्ष, निरस, (discourse) निकस, पुळपुळीत, फारच कमी (wages), कमी ऐवजाची (purse). ३ (*printing*) *unprofitable* (as opp. to fat) बिनकिफायतीचा, बिनमिळकतीचा, श्रमाइतकी देखील मजुरी मिळत नाहीं असें (काम); as, "L. copy, matter or type." L. *n. flesh without fat* बिनचरबीचें मांस *n*, तांबडें मांस. २ (*printing*) *unremunerative copy or work* बिनकिफायतीचें छपाईचें काम *n*. Lean'-faced *a. having a thin face* चपट्या -बसक्या -रोड चेहेऱ्याचा. २ (*printing*) *slender and narrow* (as letters) उंच व पातळ (अक्षरें). Lean'ly *adv.* Lean'ness *n.* रोडपणा *m*, रोडकेपणा *m*, कृशता *f*, कृशांग *n*, पातळाई *f*, लुकडाई *f*, कृशत्व *n*, क्षीणता *f*, भुकिस्तपणा *m*. ३ (*printing*) पातळपणा *m*, विरळपणा *m*, सुटेसुटेपणा *m*. Lean'-witted *a. of little sense* बेताच्या बुद्धीचा.

Leap (lēp) [A. S. *hleapan,* to run. ] *v. i. to jump*

**उडी मारणें, उडणें, कुदणें, उडी घालणें, उडी मारून जाणें, क्षेप** *f* **-क्षाप मारणें -घालणें, टाकणें.** [ LOOK BEFORE YOU L. उडी मारण्यापूर्वीं पुढें पहा, cf. पाऊल जपून टाकावें -ठेवावें, फुंकून पाय टाकावा, पाय धुवून टाकावा (?)]. २ *to bound, to move swiftly* ( also *fig.* ) **( आनंदानें ) उसळणें-उडणें -उड्या मारणें.** L. *v. t. to pass over by leaping* (a wall, ditch &c. ) **( वरून ) उडून जाणें, ( वर ) उडी** *f.* **मारून जाणें.** २ *to copulate with* ( a female beast ), *to cover* **( वर ) उडणें, चढणें.** ३ *to cause to take a leap* **उडी मारण्यास लावणें, उडी घ्यावयास लावणें, उडवणें;** as "To L. a horse across a ditch." L. *n.* **उडणें, उडी मारणें.** २ *a bound* **उडी** *f,* **उड्डाण** *n.* [L. WITH THE LEGS CLOSED, चिपी उडी *f,* चुबकति उडी *f.* L. HEELS OVER HEAD, कोल्हांटउडी *f,* कोल्हांट *f.* L. WITH THE LEGS CAUGHT UP मोटकुळी उडी *f,* मेटकुळी उडी *f.* LEAPS AND BOUNDS, मोठ्या झपाट्यानें, जोराच्या उड्या मारीत मारीत. ] ३ *space passed by leaping* **उडी** *f.* ४ *a hazardous act or step* **जोखीम** *n,* **जोखमाचें काम** *n,* **उडी** *f* ( *fig.* ). [ L. in the dark, *an act of which we cannot foresee the consequences* काळोखांत घेतलेली उडी *f,* अविचारानें केलेलें ( जोखमाचें ) काम *n.* ] ५ *copulation with a female beast* **( वर ) उडणें.** ६ *a sudden transition* **एकदम झालेलें स्थित्यंतर -फेरफार** *m* **-पालट** *m.* Leap'ed or Leapt *pa. t.* & *pa. p.* Leap'er *n.* **उड्या मारणारा, उडणारा, उड्या, उड्डाण करणारा.** Leap'-frog *n.* **कुदाकुदी** *f,* **बेडुककुदी** *f,* **एकमेकांच्या पाठीवरून बेडकासारखी उडी मारण्याचा खेळ** *m.* Leap'ing *pr. p.* & *v. n.* **उडी मारणारा, उडणें.** [ LEAP'YEAR, *every fourth year of three hundred and sixty six days, adding one day in February,* प्रत्येक चौथें वर्ष. या वर्षांत फेब्रुवारी महिन्याचे 'एकोणतीस' दिवस धरितात. अतिवर्ष *n,* प्लुत -प्रसृत -दीर्घ -वर्धित वर्ष *n.* ]

Learn ( lérn ) [ A. S. *leornian,* to learn. ] *v. t. to acquire by study* **शिकणें, शिकून घेणें, अभ्यास** *m.* **करणें** *g. of o.* २ *to gain the knowledge of* **शिकणें, ज्ञान** *n* **-माहिती** *f-* **माहितगारी** *f-* &c. **करून घेणें** *g. of o.,* **समजणें, ऐकणें, श्रुत -अवगत -**&c. **करणें, कळणें, समजणें** *in. con.,* **बातमी** *f -*&c. **लागणें** *g. of o. with in. con.;* **ऐकण्यांत येणें** *in. con.* ३ *to gain power of performing* **(करावयास) शिकणें, करण्याची ताकत आंगीं आणणें.** L. *v. i. to gain knowledge* **शिकणें, पढणें, म्हणणें, अभ्यास** *m* **-विद्याभ्यास** *m.* **करणें.** [ To L. BY HEART, पाठ -तोंडपाठ -मुखोद्गत करणें. To L. BY ROTE, घोकंपट्टीनें तयार करणें, पोपटपंची करणें. To L. TO READ AND WRITE लिहिणेंपुसणें शिकणें. ] २ *to take pattern* ( with *of* ) **पाहून करणें, कित्ता** *m* **-वळण घेणें** *g. of o.* **-गिरवणें, शिकणें.** Learn'able *a. that may be learnt* **शिकण्याजोगा, समजण्याजोगा.** Learn'ed *a. possessing knowledge* ( said of *persons* ) **शिकलेला, शिक्षित, शिकून घेतलेला, शिकणाऊ, ऐकलेला, पढलेला, पढीक, विद्वान्, विद्याविशिष्ट, साक्षर, अक्षरस्थ, शिक्षित, व्युत्पन्न,**

विद्यासंपन्न, अक्षरसंपन्न, विद्यावान्. [ THE L., विद्वज्जन *m. pl*, पंडित लोक *m. pl*, साक्षरवर्ग *m*. A. L. FOOL, पढतमूर्ख *m*. ] २ (of books, discourse) विद्वत्तेचा, विद्वत्तादर्शक, विद्वत्ताप्रचुर, विद्वत्तापूर्ण, पांडित्याचा, खोलबुद्धीचा (discourse), खोल, गहन, गूढ, शास्त्रीय. ३ *skilful, conversant* माहितगार -दार, वाकबगार -दार, अभ्यस्त, जाणता, वहिवाटलेला, निपुण, प्रवीण. Learn'edly *adv*. पांडित्यानें, पांडित्य दाखवून, विद्वत्तेनें. Learn'er *n*. शिकणारा, (नवीन) शिकून घेणारा &c. २ *a scholar* शिकणारा, पढणारा, अभ्यास करणारा, विद्यार्थी, शिकणाऊ, शिकाऊ. Learn'ing *n. acquisition of knowledge or skill* शिकणें *n*, पढणें *n*, म्हणणें *n*, अध्ययन *n*, अभ्यास *m*, विद्याभ्यास *m*, शिक्षा *f*. २ *knowledge of science or literature* विद्या *f*, व्युत्पत्ति *f*, पांडित्य *n*, ज्ञातृत्व *n*, विद्वत्ता *f*, वेत्तृत्व *n*, विद्यासंपत्ति *f*, साक्षरता *f*, अध्ययन *n*, &c. (b) *literature, science* विद्या *f*, अक्षर *n*. [ BOOK L. पुस्तकी विद्या *f*. CULTIVATION *or* PURSUIT OF L. विद्याव्यासंग *m*, विद्यानुसेवन *n*. PATRONISING L. विद्यानुपालन *n*. THAT CULTIVATES L. विद्यानुसेवी. ]

Lease (lēs) [O. Fr. *lesser* –Fr. *laisser*, to let, leave –L. *laxus*, loose.] *n. a letting of tenements for a term of years* कांहीं मुदतीपर्यंत (इस्टेट वगैरे) कौलानें देणें, घुमावानें -शर्तीवर भाड्यानें देणें. २ *the contract for such letting* कौल *m*, कौलनामा *m*, पट्टा *m*. ३ *duration of tenure* कौलनाम्याची मुदत *f*. L. *v. t. to let by lease* (sometimes with *out*) कौलानें देणें, (शर्तीवर) भाड्यानें देणें, मुदतीचा ताबा देणें. २ *to hold under a lease* कौलानें घेणें, मुदतीनें ताबा घेणें. Leas'able *a*. कौलानें द्याया -चा -जोगा -जोगता -सारखा &c. Lease'-hold *n. a tenure held by lease* कौली, कौलाचा, कौलानें घेतलेला. Lease'-holder *n*. कौलीमक्तेदार *m*, कौलदार *m*, कौल्या *m*. Les'sor *n*. (*law*) *one who lets or leases* कौलानें देणारा *m*. Lessee' *n*. (*law*) *the person to whom a lease is given* कौली मक्तेदार, इजारदार *m*.

Leash (lēsh) [O. Fr. *lesse*, Fr. *laisse*, a thong to hold a dog by, a thong held *loosely* –L. *laxus* loose. ] *n. a thong of leather by which a hawk or hound is held* काढणी *f*, सडा *m*, पारध्याची शिकारी कुत्र्याला बांधावयाची दोरी *f*, सडक *f*. २ *a brace and a half, three* तिकडी *f*, त्रीक *n*, त्रिपुटी *f*. L. *v. t. to hold by a leash* काढणीनें –&c. बांधणें.

Leasing (lēz'ing) [A. S. *leasung* –*leas*, false, loose. ] *n*. (*Bible*) *falsehood* असत्य *n*, खोटें *n*.

Least (lēst) [A. S. *lest*, contr. from *læsest*, from root of Less.] *a. smallest in size or degree, little beyond all others* सर्वांत लहान, सर्वांपेक्षां -सगळ्यांपेक्षां -सर्वांहून लहान -धाकटा, कनिष्ठ, अल्पिष्ठ. N. B. Least is often used with *the* as if a noun. [ AT LEAST OR AT THE L., *at the lowest rate, at the lowest*

*estimate* कमींत कमी, किमानपक्ष, कनिष्ठपक्ष, निकृष्टपक्ष, निदानपक्ष, निदानपक्षीं, गेलाबाजार, अगदीं कांहीं नाहीं तरी, गेला गतलातरी, तर, तरखरा, तरी. LEAST OR IN THE LEAST अगदीं थोडें तरीं. NOT IN THE L., मुळींच नाहीं, अगदीं नाहीं, कांहींच नाहीं, किमपि नाहीं.] Least *adv. in the smallest or lowest degree* **सर्वांहून, सर्वांपेक्षां कमी -थोडा** *decl.* Leas't-ways, Least'-wise *adv. at least, however* **निदान तरी, गेला बाजार, किमानपक्ष.**

Leather (leth'ėr) [A. S. *lether*, leather.] *n. skin of an animal tanned or otherwise dressed* **चामडें** *n*, **कमावलेलें कातडें** *n*, **कातडें** *n*, **चर्म** *n.* (b) *dressed hides collectively* **चामडीं** *n. pl.* २ (*ironical* or *sportive*) *the skin* **चामडी** *f*, **कातडी** *f*. L. *a. made or consisting of leather* **कातड्याचा, चामड्याचा, चर्माचा, चर्मी, चर्ममय, चर्मनिर्मित, कातडी.** २ *relating to leather* **कमावलेल्या कातड्यासंबंधीं.** ३ *like leather* **कातड्यासारखा.** Leath'er-dresser *n.* **चाम्हार, ढोर, चांभार, चर्मक, चर्मकार.** Leath'ern *a.* **कातड्याचा, चामड्याचा.** Leath'ery *a. resembling leather, tough* **चामड्यासारखा, चिवट, चामट, लापट.**

Leave (lēv) [A. S. *leaf*; conn. with Lief, Love, Believe, Furlough.] *n. permission; liberty granted* **परवानगी** *f*, **आज्ञा** *f*, **हुकूम** *m*, **मोकळीक** *f*, **सुटी** *f*, **अनुज्ञा** *f*, **अभ्यनुज्ञा** *f*. २ —(of absence) **रजा** *f*, **रुखसत** *f*, **सुटी** *f*. [CASUAL L. किरकोळ रजा *f*, विशेष कारणाकरितां आकस्मिक घ्यावी लागणारी रजा *f*, प्रासंगिक रजा *f*. PRIVILEGE L., हक्काची रजा *f*. SICK L. 'सिक' रजा *f*, आजारीपणाची रजा *f*.] ३ *farewell, formal parting of friends* **निरोप** *m*, **आज्ञा** *f*, **हुकूम** *m*, **रजा** *f*. [TO TAKE L., *to take permission* परवानगी *f* -रजा *f* -घेणें. २ *to say farewell* येतों म्हणून सांगणें, निरोप *m.* आज्ञा *f*. घेणें. FRENCH L. परवानगीशिवाय घेतलेली रजा.]

Leave (lēv) [A. S. *læfan*; Gr. *leipein*, to leave., the primary meaning is 'to let remain.'] *v. t. to allow to remain* **मागें ठेवणें, सोडणें, ठेवणें, राखणें, राहूं देणें, शेष ठेवणें.** २ *to cease from, to abstain from* **सोडणें, (पासून) दूर राहाणें, सोडून जाणें -देणें, वर्जणें, वर्ज करणें**; as, "To L. complaining." ३ *to quit or depart from* **सोडणें, सोडून जाणें -देणें, वर्जणें, टाकणें, त्याग करणें.** ४ *to let be or do without interference* **असूं देणें, राहूं देणें**; as, "He *left* me to my reflections; I *leave* (=refer) you to judge." ५ *to put, to deposit* **ठेवणें, राखणें**; as "L. your hat here, I *left* my card." (b) *to submit* **स्वाधीन-हवालीं -करणें -देणें, हवालणें, सोपणें, सोंपवणें**; as, "L. the matter for arbitration." ६ *to have remaining at death*, (*hence*) *to bequeath* (best rendered in Marathi by *in. con.*) **मागें ठेवणें, मृत्युपत्रांत लिहून देणें.** [TO L. ALONE, *to leave in solitude* एकट्यालाच -एकटा सोडणें. २ *to refrain from having to do with* सोडणें, सोडून देणें. TO L. IN THE DARK, *to conceal information from*

अंधारांत ठेवणें (*fig.*), (ला) न सांगणें. To L. OFF, (as *work*) सोडणें, टाकणें, वर्जणें, वंद करणें, वंद ठेवणें.; (b) (as a *garment*) सोडणें, (वापरावयाचें) सोडणें, टाकणें; (c) (as a *habit*) सोडणें, टाकणें, सोडून देणें, त्याग करणें. To L. OUT, *to omit* सोडणें, गाळणें, टाकणें, वगळणें. To L. to one's-self, *to let one be alone, to cease caring for one* (ची) गोष्ट न बोलणें -न काढणें (-च्या) वाटेला न जाणें, (च्या) विषयीं भाषण न करणें, एकटा राहूं देणें. ] L. *v. i.* (*colloq.*) *to depart, to set out* **निघणें, (प्रवासास) बाहेर पडणें**; as, "by the time, I *left* for Scotland." २ *to cease, to desist* **थांबणें, राहाणें**; as, "He began at the eldest and *left* at the youngest." Leav'er *n.* **सोडणारा, टाकणारा,** &c. Leav'ing *n.* **सोडणें** *n*, **त्याग** *m*, **वर्जन** *n*. For Leavings see below.

Leave (lēv) *v.i. to put out leaves, to leaf* (often with *out*) **पानें धरणें, पालवी फुटणें** *in. con. with* **ला** *of s.* **पालवणें.** Leaved *a. furnished with leaves* **पानांचा, पर्णांचा, सपर्ण, पानी** (in comp. as **दुपानी**). २ *having folds or leaves* **फळयांचा, घड्यांचा.** [Two -L. दुफळी. ]

Leaven (lev'n) [ Fr. *levain* –L. *levamen, levere.* to raise– *levis*, light. Leaven means that which raises.] *n. the ferment which raises dough* **आंबवण** *n*, **फुगवण** *n*, **खमीर** *n*, **मंड** *m* or *n*, **किण्व** *m*. २ *anything that makes a general change whether good or bad* **खमीर** (fig.), **अन्तःक्षोभकारण** *n*, **अन्तःक्षोभजनक कारण** *n*; as, "Beware of the L. of the Pharasees, which is hypocrisy." L. *v. t. to cause to ferment* **आंबवण घालणें -घालून फुगवणें, आंबवणें, आंबवून फुगवणें.** २ *to taint, to vitiate* **बिघडविणें, खराब करणें, नासून टाकणें.** Leav'ened *p. p.* **आंबवण घातलेला, आंबवलेला, फुगवणाचा.** Leav'ening *pr. p.* Leav'enous *a. containing leaven* **आंबवण असलेला.**

Leavings (lēv'ingz) *n. pl. things left, relics, refuse* **उरलीं सुरलीं** *n. pl*, **उरवण** *n*, **उरवा** *m*, **गदळ** *n*, **शेष** *m*, **अवशेष** *m*, (of food) **उष्टें** *n*, **अन्नशेष** *m*, **भुक्तशेष** *m*, **उच्छिष्ट** *n*, **उच्छिष्टान्न** *n*; (*crumbs, dirty dishes*) **उष्टावळ** *f*, **खरकट (टां) वळ** *f*, **खरकटवडा** *m*, **खरकट -वड** *f*, **उष्टींपाष्टीं** *n. pl*, **उष्टीमाष्टीं** *n. pl.*

Lecher (lech'ėr [ Fr. *lecheur* –*lecher*, to lick; from O. Ger. *lecchon*, Ger. *lecken*, E. Lick; L. *ligurio* to lick up what is dainty. ] *n. a man given to lewdness* **रांडबाज, छंदी, व्यसनी, लंपट, इष्कबाज, बिसनी.** L. *v. i. to practise lewdness* **रांडबाजी** *f.* –&c. **करणें.** Lech'erous *a. lustful* **कामी, संभोगी, छिनाल, स्त्रीव्यसनी, रांडव्यसनी, छंदी, स्त्रैण, बहिर्व्यसनी, इष्की.** २ *provoking lust* **कामोत्पादक.** Lech'erously *adv.* Lech'erousness *n.* **कामीपणा** *m*, **कामासक्ति** *f*, **रांडव्यसन** *n*, **स्त्रीव्यसन** *n*. Lech'ery *n. lewdness* **रांडबाजी** *f*, **इष्कबाजी, कटिशूलाची व्यथा** *f*, **कटिशूलाचें व्यसन** *n*, **बदफैली** *f*, **बाहेरख्याल (ली)** *m*, **बहिर्व्यसन** *n*, **इष्क** *f.*

Lectern (lek'tėrn) [ Late L. *lectrinum*, a reading-

desk -*lectrum*, a pulpit -Gr. *lektron*, a couch, and so a support for a book. ] *n. a reading desk in churches from which the Scripture lessons are read* (ख्रिस्ती देवळांतील बायबल ठेऊन वाचण्याचें) सछत्र उंच पीठ *n*, छत्रीदार उच्चासन *n*.

Lection (lek'shun) [ L. *lectio-legere, lectum*, to read. See Legend. ] *n. a portion of a sacred writing appointed to be read in a church, a 'lesson'* (वाचन) पाठ *m*, धार्मिक पाठ *m*, or briefly पाठ *m*; as, "On Passion Sunday, the first Lections were from Jeremiah." २ *a reading, a variation in the text* पाठांतर *n*, पाठभेद *m*. Lec'tionary *n. a book of lections for use in worship by Roman Catholics* ( रोमन क्याथलीक लोकांच्या देवळांत म्हणण्याचा ) पाठ-संग्रहग्रंथ *m*. २ *the collection of such lections* (धार्मिक) पाठसंग्रह *m*. Lec'tor *n. a reader of lections* (धार्मिक) पाठ वाचणारा, पाठक, (रोमन क्याथलीक देवालयांतील) पाठक, पाठ म्हणणारा. २ *a reader or lecturer in a University esp. in Germany* (युनिव्हर्सिटींतील) उपगुरु, उप-अध्यापक *m*, उपव्याख्याता *m*.

Lecture ( lek'tūr ) [ See Lection. ] *n. a discourse on any subject,* ( *esp. professional or tutorial* ) व्याख्यान *n*, भाषण *n*. २ *a formal reproof* कान-उघाडणी *f*, तोंडची शिक्षा *f*, शब्दाचा मार *m*, शब्ददंड *m*, वाग्दंड *m*, वाग्शासन *n*. ३ ( *Eng. Univ.* ) *a rehearsal of a lesson* धड्याची तालीम *f*. L. *v. t. to read or deliver a lecture to* ( -ला ) व्याख्यान देणें. २ *to instruct by discourse* पाठ *m*. सांगणें, भाषण करून सांगणें, ( व्याख्यानरूपानें ) पाठन *n*. -अध्यापन *n*. -&c. करणें. २ *to reprove* तोंडची शिक्षा *f* -शब्दाचा मार *m*. -&c. करणें -देणें, कानास खडा *m*. लावणें, कान *m. pl.* उघडणें -उपटणें, खरड *f* -खरडपट्टी *f*. काढणें. ( To be constantly lecturing = कानीं कपाळीं रडणें -ओरडणें, रड गाणें. ) L. *v. i. to deliver a lecture* व्याख्यान देणें, भाषण करणें. Lec'turer *n. one who lectures* ( व्याख्यानरूपानें ) पाठ सांगणारा, अध्यापक, व्याख्या-नकार, अध्यापन करणारा, व्याख्याता *m*, भाषणकर्त्ता *m*. २ (R.) कानास खडा लावणारा &c. Lec'tureship *n. office of a lecturer* व्याख्यात्याचा हुद्दा *m* -जागा *f*.

Led (led) *pa. t.* and *pa. p.* of *lead*, which see. हातीं धरून नेलेला, &c., नेलेला, वाटेनें नेलेला, प्रापित; पूर्वक and पुरस्सर ( in comp. as अकारपूर्वक वर्ण, मनुष्य-पूर्वक प्राणी, सिंहपूर्वक श्वापद, गरुडपुरस्सर पक्षी &c. ) [ L. HORSE, *a spare horse led by a servant for show* कोतवालघोडा *m*, कोतवाल *m*, कोतल *m*. ]

Ledge ( lej ) [ A. S. *lecgan*, to lay. See Lay *v. t.*] *n. a shelf on which articles may be laid* ( चीजवस्त ठेवण्याची ) फळी *f*, तक्ता *m*. २ *a ridge or shelf of rocks* ( एकावर एक चढत गेलेले ) खडकांचे थर *m, pl.* पाण्यांतील खडकाचा कंगोरा *m* -कड *f*, कडा *m*. ३ *a layer* थर *m*, परवड *f*. ४ *a piece of timber to support the deck* बरोद *m*, बरगा *m*.

Ledger ( lej'ėr ) [ See Ledge. ] *n. a book in which a summary of accounts is 'laid up' or 'preserved* **( पक्की ) खतावणी** *f*, खातेवही *f*. [ACCOUNT ABSTRACTED FROM THE L. ताळेबंद *n*.] २ *a large flat stone esp. one laid over a tomb* **( थडग्यावरची ) शिळा** *f*. [ENTERING INTO THE L. वार करणें *n*, खतावणी *f*. ]

Lee ( lē ) [Lit. *a sheltered place*, A. S. *hleow*, shelter cf. Prov. E. *lew*, a shelter. ] *n. the quarter toward which the wind blows* **वाऱ्याचे समोरची दिशा** *f* **-जागा** *f* **-बाजू** *f*, **वाताभिमुख दिशा** *f*. २ *a sheltered place, a shelter* **निवाऱ्याची जागा** *f*, **थारा** *m*. [ L. SIDE, *the sheltered side of a ship* दमान *n*. UNDER THE L. OF, *under shelter from the wind* निवाऱ्यांत, अडोशांत. ] Lee'ward *a.* **वाऱ्यासमोरचे दिशेकडचा, वाऱ्यासमोरचा, वायुसम्मुख.** L. *adv. toward the lee* **वाऱ्यासमोरचे दिशेकडे.** [ To MAKE UP FOR THE L. *to make up for time lost* फुकट गेलेला वेळ भरून काढणें.]

Leech ( lēch ) [ A. S. *læce*, one who heals. ] *n. a blood-sucking worm* **जळू** *f*, **जोख** *f*, **जलोका** *f*, **जळूका** *f*. २ *a physician* **वैद्य** *m*, **चिकित्सक** *m*. L. *v. t. to apply leeches to and bleed* **( रक्त काढण्यासाठीं -ला ) जळवा लावणें, ( जळवा लावून ) रक्त काढणें.**

Leek ( lēk ) [ A. S. *leac*, a leek, a plant which is present also in Char-lock, Garlic, Hem-lock. ] *n. a kind of onion* **( एका जातीचा ) कांदा** *m*, **पलांडु** *m*.

Leer ( lēr ) [ A. S. *hleor*, face, cheek. ] *n. a sly, sidelong look* **वांकडा-आडवा डोळा** *m*, **आडवी दृष्टि** *f*, **कानाडोळा** *m*, **नेत्रकटाक्ष** *m*, **अपांगदर्शन** *n*, **दुष्ट -वाईट नजर** *f*. L. *v. t. to look askance* **आडवे दृष्टीनें -अर्धे दृष्टीनें -वांकड्या डोळ्यानें -काण्या डोळ्यानें** &c. **पाहाणें, डोळे** *m. pl.* **मारणें, दुष्ट -वाईट नजरेनें पाहणें, दुष्ट नजर ठेवणें, डोळा मारणें -घालणें, अपांगदर्शन** *n* **-कटाक्षावेक्षण** *n* **-कटाक्ष -वीक्षण करणें.** L. *v. t. to entice with a leer or leers* **डोळे मारून वळविणें.** Leer'er *n.* **डोळे मारणारा** *m*, **अपांगदर्शी** *m*, **कटाक्षवीक्षी** *m*, **नजरबाज** *m* (loosely). Leer'ing *n.* **आडवे दृष्टीनें पाहाणें, अपांगदर्शन** *n*. L. *pr. a.* **डोळे मारणारा.** Leer'ingly *adv.* **डोळे मारून -घालून, वांकड्या डोळ्यानें.** Leers *n. pl.* **( डोळ्यानें केलेल्या ) गमजा** *f. pl.*

Lees ( lēz ) [ Fr. *lie*. Ety. Dub. ] *n. pl. sediment or dregs that settle at the bottom of liquor* **दारूंतला गाळ ( ळा )** *m*, **रेंदा** *m*, **गाळसाळ** *m*.

Left ( left ) *pa. t.* and *pa. p.* of *Leave*. **सोडलेला, वर्जित, रहित, टाकलेला, त्यक्त, ठेवलेला, उरता, बाकी, अवशिष्ट, मृत्युपत्रांत दिलेला, गाळलेला, अंतरित, अंतरीक.** [ TO BE L. *to remain* उरणें, वांचणें. L. OFF, *laid aside, cast off* बाजूला सारलेला, बाजूला टाकलेला, सोडून -टाकून दिलेला, त्यक्त. ]

Left ( left ) [ M. E. *lift, luft*, prob. a contr. of *lefed p.* of A. S. *lefan*, to weaken *-lef*, weak. ] *a.*

*not the right* डावा, वाम, डावका, सव्य, दक्षिणेतर. २ *being on the left side* डाव्या हाताचा, डाव्या हाताकडचा, डावा, डाव्या बाजूचा, डावीकडचा. [OVER THE L. SHOULDER OR OVER THE L., (colloq.) expression used to indicate insincerity, negation or disbelief उलट्या अर्थानें; as, "He said it and it is true, -over the Left."] L. *n. the side opposite to the right* डावी बाजू *f.* २ *the part of an assembly who are in the opposition, the left hand side of the president* (अध्यक्षाच्या डाव्या बाजूस बसणारी) विरुद्ध पक्षीय मंडळी *f*, उलट बाजू *f*, विपक्ष *m*, विरोधी पक्ष *m*, विरोधपक्ष *m*. L. hand *n.* डावा हात *m*. Left-handed *a. having the left hand stronger and readier than the right* डावखुरा, डावखोरा, डावरा, डावका. २ *awkward, clumsy* अडाणी, आडमुठ्या. ३ *unlucky* अशुभ, अभाग्य, अभागी. ४ *insincere* कपटी, खोटा. [LEFT-HANDED MARRIAGE उच्च दर्जाच्या मनुष्याचा कमी दर्जाच्या स्त्रीशीं झालेला विवाह *m*. अशा विवाहानें स्त्रीला नवऱ्याची पदवी किंवा त्यांच्या मुलांस बापाची संपत्ति मिळत नाहीं.] Left'-hand'edness *n.* Left'-hand'iness *n.* डावखुरेपणा *m*, डावरेपणा.

Leg (leg) [Icel. *leggr*, a stalk.] *n. a limb by which animals walk* पाय *m*, टांग, तंगडी *f*, तंगडें *n*, तंगड *f*. [BORN WITH ONE OF THE LEGS FOREMOST, पायाळ. SWELLING OF THE LEG श्लीपदरोग. THAT HAS ONE LEG SHORTER THAN THE OTHER, दीडपायाचा. THAT IS UPON HIS LAST LEGS, उठवणकर, उठवणीस आलेला. TO BE UPON ONE'S LAST LEGS, उठवणीस येणें, उठवण *f*, घेणें. TO CHANGE THE LEG OF A HORSE, *to change the gait* चाल बदलणें. TO FEEL ONE'S LEGS (of an infant) *to begin to support oneself on the legs* उभा राहणें, पायावर मूल उभें राहूं लागणें. TO GIVE LEG BAIL, *to run off* पोबारा करणें -म्हणणें, झां करणें. TO SET FIRM UPON ONE'S LEGS उठवण मोडणें. TO STAND UPON ONE'S LEGS AGAIN, पाय उचलणें, भुईशीं पाय लागणें, जमिनीस पाय लागणें. TO STAND UPON ONE'S OWN LEGS, स्वावलंबी होणें. TO GIVE A LEG TO, *to assist by supporting the leg* पायाला हात देऊन मदत करणें. २ *to be independent* आपल्या पायावर उभें राहाणें, स्वबलावर-आपल्या जोरावर -आपल्या आधारानें उभा राहाणें. TO STRETCH ONE'S LEGS, पाय मोकळा करणें. ON ONE'S LEGS, *standing especially to speak* (बोलावयास) उभा असलेला.] २ *a long slender support of anything* पाय *m*, खूर *m*. ३ *the part of any article of clothing which covers the leg* कपड्याचा पायावर येणारा भाग *m*, कपड्याचा पाय. ४ (*cricket*) *that part of the field or that fielder to the left of and behind the batsman as he faces the bowler* (चेंडूफळींतील बॅटवाल्याच्या) डाव्या बाजूस थोडा मागें उभा राहाणारा गडी *m*. पायपाळती *m*. [LONG LEG दूरचा पायपाळती. SHORT LEG जवळचा पायपाळती. SQUARE LEG समपायपाळती. LEG -GUARDS

क्रिकेटच्या पायमोजे *m. pl.* पादत्राण.] Legged *a. having legs* पादयुक्त, पाय असलेला, पाद (in comp. as द्विपाद, चतुष्पाद.) Legging *pr. p.* Leg'ging *n. a cover for the leg like a long gaiter* (बुटावर घालण्याचा) मोठा गेटर *m*, जंघात्राण *n.* Leg'gy *a. having very long legs* लांबटांग्या, लांब पाय असलेला.

*N. B.*—The following terms in the game of Cricket are very important: Leg-ball पायरोखा चेंडू. Leg-bye लागफेरी. Leg hit टांगटोला. Forward Leg hit अघाडीचा टांगटोला. Backward Leg-hit पिछाडीचा टांगटोला. Leg-stump पायखुट, ऐलखुंट. Leg before wicket अंगिट्यो.

Legacy (leg'a-si) [L. as if *legatia* -L. *legatum*, a bequest -L. *legare*, to leave by will, to bequeath.] *n. a gift of property by will, a bequest of personal property* मृत्युपत्रांत लिहून दिलेली देणगी *f*, मृतलेखार्पित दान *n.* २ *a commission* (obs. except in the phrases Last L., Dying L. & the like) मरतेवेळचा निरोप. [L. -hunter *n. one who hunts after legacies by courting those likely to leave them* मृत्युलेखांतील देणग्यांसाठीं खटपट करणारा.] Leg'atee' *n. one to whom a legacy is bequeathed* मृत्युलेखदानाधिकारी *m*, मृत्युलेखदानग्राही *m.* Legator' *n. one who leaves a legacy* मृत्युलेखदानकारी *m.*

Legal (lē'gal) [Fr. -L. *legalis* -L. *lex-legis*, law.] *a. in conformity with law* कायदेशीर, कायद्याचा, कायद्यासंबंधीं, कायद्यानें सांगितलेला, कायद्यास धरून, कायद्याबरहुकूम, कायदेशास्त्रसंमत, न्यायशास्त्रसंमत, राजनियमानुसारी, राजनियमसंमत, राजव्यवस्थासंमत, स्मृतिशास्त्रसंमत (*Sk.*), धर्मशास्त्रसंमत (*Sk.*), व्यवहारविधिसंमत, अनुव्यवहार. २ *of or belonging to law* कायद्याचा, व्यवहारमार्गाचा. ३ *created by -permitted by law* कायद्यानें सांगितलेला, राजनियमविहित, स्मृतिशास्त्रविहित (*Sk.*), व्यवहारविहित, विधिविहित (*Sk.*). ४ *that looks to works for salvation* कर्ममार्गी, कर्ममार्गाचा, कर्ममार्गानुसारी. ५ *according to the Mosaic law* मोशाच्या नेमशास्त्राप्रमाणें. ६ *governed by the rules of law* (as distinguished from rules of equity) कायद्याच्या नियमानुसार. [L. TENDER, *coin that can be lawfully used in paying a debt* (कर्ज फेडण्यासाठीं कायद्याला मान्य) चलनी नाणें *n*, चलनी शिक्का *m*, चालू शिक्का *m*, कायदेशीर चलन *n.*] Le'galise *v. t. to make lawful* कायदेशीर करणें, विहित -विधिप्राविष्ट -अप्रत्यवाय -निर्दोष करणें, कायद्यांत घेणें -आणणें, कायद्यानें स्थापणें. २ *to authorize* कायदेशीर मोकळीक -मुभा -परवानगी देणें. Le'galiz'ation *n.* कायदेशीर करणें, कायद्यानें स्थापणें. Le'galism *n. strict adherance to law* कायदे कडक पाळणें *n.* Le'galist *n.* कायद्यांचा सक्त पुरस्कर्ता *m.* Legal'ity *n.* कायदेशीरपणा *m*, न्याय्यता *f*, धर्म्यता *f*, व्यवहारशुद्धता, न्यायानुयायिता *f*, धर्मशास्त्रानुयायिता *f*, राजनियमानुयायिता *f.* २ (Hindu theol.)

कर्ममार्गानुयायित्ता *f.* Le'gally *adv.* कायद्देशीरपणें, कायद्याप्रमाणें, राजनियमानुरूप. २ (Hindu theol.) कर्ममार्ग अनुसरून.

Legate (leg'āt) [Fr. *legat*, It. *legato* –L. *legatus* –L. *legare*, to appoint or send with a commission.] *n. a deputy, a representative, an ambassador,* (esp. from the Pope) (राष्ट्रीय) वकील *m*, दूत *m*, पोपचा वकील *m*, प्रतिनिधि *m*. Lega'teship *n.* दूतपणा *m*, वकीली *f*, प्रतिनिधिपणा *m*. Leg'ation *n. the act of sending forth a deputy or representative* (esp. a Papal legate) वकीलात पाठविणें *n*, विशेषतः पोपचा वकील पाठविणें *n*. २ *person or persons sent as legates and his suite* वकीलात *f*, वकीलमंडळ *n*, वकील व त्याचा लवाजमा. ३ *the official residence of a legate at a foreign court* परराष्ट्रीय वकीलाचें ठाणें *n*. ४ *a district under the jurisdiction of a legate* (पोपच्या किंवा राष्ट्रीय) वकिलाच्या अधिकारांतील प्रांत *m*.

Legatee, See Legacy.

Legend (lej'end or lē'-) [Fr. *legende*; Low L. *legenda*, a book of chronicles of the saints, read at Matins –L. *legendus*, to be read –L. *legere*, to read.] *n. the story of the life of a saint, a marvellous story of saints* संतचरित्र *n*, संतचरित्रग्रंथ *m*, संतचरित *n*, संतांविषयीं अद्भुत -चमत्कारिक -अलौकिक गोष्ट *f*, संतमाहात्म्य *n*, संतकथा *f*, संतलीला *f* (*colloq.*), संतासंबधीं आख्यायिका *f*. २ *a collection of saints' lives or stories of a similar character* संतचारित्रमाला *f*, संतचरित्रगाथा *f*. ३ *an unauthentic or non-historical story esp. one handed down by tradition from early times and popularly regarded as historical, a myth, a fable* दंतकथा *f*, आख्यायिका *f*, कर्णोपकर्णीं आलेली गोष्ट *f*, काल्पनिक कथा *f*. ४ *an inscription, motto or title* कोरलेली खूण किंवा म्हण *f*. Leg'endary *a. pertaining to or of the nature of legends* दंतकथात्मक, आख्यायिकात्मक, लोककथेसंबंधीं, दंतकथेसारखा, आख्यायिकेसारखा. २ *celebrated or related in legends* दंतकथेंत वर्णिलेला. L. *n. a book of legends* दंतकथासंग्रह *m*, दंतकथांचें पुस्तक *n*. २ *reciter of legends* लोककथा -दंतकथा सांगणारा. Legend'ist *n. a writer of legends* दंतकथा लिहिणारा, दंतकथालेखक.

Legerdemain (lej-ėr-de-mān') [O. Fr. *legier* (Fr. *leger*) *de main*, 'light or nimble of hand' –L. *levis*, light, and Fr. *de*, of, *main*, L. *manus*, hand.] *n. lightness or nimbleness of hand, sleight-of-hand, jugglery, conjuring tricks* हातचलाखीचा खेळ *m*, हातचलाखी *f*, हस्तलाघव *n*, गारुड *n*, गौडबंगाल *n*. Legerdemain'ist *n. one who practises sleight-of-hand* हातचलाखीचा खेळ करणारा, गारुडी or गारोडी *m*, गौडबंगालया *m*.

**Legible** ( lej'i-bl ) [ L. *legibilis–legare*, to read. ] *a. readable, that may be read, plain* सुवाच्य, वाचायाजोगा -जोगता -सारखा, वाचावयास सोपा, स्पष्ट, स्वच्छ, साफ लिहिलेला, सुपाठ्य. २ *capable of being discovered or understood by apparent marks* (गुणांवरून -चिन्हांवरून) समजायाजोगा, कळण्याजोगा; as, "Thoughts are often L. from countenances." Leg'ibleness, Leg'ibil'ity *n.* वाचायाजोगेपणा *m*, सुवाच्यता *f*, स्पष्टता *f*, स्वच्छता *f*, वाचावयास सोपेपणा *m.* Leg'ibly *adv.* सुवाच्य, साफ, स्पष्ट.

**Legion** ( lē'jun ) [ O. Fr. *legion*, –L. *legio*, a Roman legion from four thousand two hundred to six thousand men –*legare* to choose, to levy (an army).] *n.* (*in ancient Rome*) *a body of soldiers of from four to six thousand* (प्राचीन रोमन सैन्यांतील) ४००० पासून ६००० पर्यंत शिपायांची तुकडी *f* सहाहजारी पलटण *f.* २ *a military force* सेनादल *n*, सेनाभार *m* -भाग *m*, सैन्यदल *n*, सैन्य *n.* ३ (a) *a great number* झुंड *f*, घोळका *m*, समुदाय *m*, चक्र *n.* (b) सैन्य *n* ( in the sense of a great number ); as, "A L. of spirits or angels" cf. Math. XXVI 53. (*c*) सैन्य *n*, असंख्यसंख्या; as, "My name is L." cf. Mark V. 9. L. *v. t. to form into legions* (सैन्याच्या) तुकड्या -टोळ्या पाडणें -करणें. Le'gionary *a. relating to or consisting of a legion or multitude* सैन्यांतील तुकडीचा -टोळीचा, समुदायाचा. L. *n. a soldier of a legion* (रोमन लीजनएवढ्या सैन्यांतील) शिपाई *m.* Le'gioned *a. arrayed in legion* सैन्याच्या मोठमोठ्या तुकड्यांचा -तुकड्या केलेला. Le'gionet *n. a small legion* सैन्यपथक *n*, सैन्याची लहानशी तुकडी *f*, पाटी *f*, लहान लीजन *f.*

**Legislate** ( lej'is-lāt ) [ L. *lex, legis*, law, *fero, latum* to bear, to propose. Legislate is the back–formation from Legislator. ] *v. i. to make laws, to propose, bring forward or enact laws* (with *for* or *upon*) कायदे *m. pl.* -कानू *f. pl.* -नियम *m, pl.* &c. करणें -स्थापणें -बांधणें -रचणें, कायदेबंदी *f.* -कानूबंदी *f.* कायदेकानू *m.* करणें. L. *v. t. to bring or drive by legislation* ( *into or out of* ) कायद्यानें -कायदे करून (अमुक स्थितींत) नेणें -पोंचविणें -ढकलणें; as, "To L. a nation into poverty." Legisl'ated *pa. t.* and *pa. p.* Le'gisla'ting *pr. p.* Le'gisla'tion *n.* कायदे करणें *n*, कायदे -कानू -जाबतेबंदी करणें, कायद्याची रचणूक *f*, नियमस्थापना *f*, विधिस्थापना *f.* Le'gisla'tional *a.* कायदेकानू करण्यासंबंधीं, कायद्याच्या रचणुकीसंबंधीं. Leg'islative *a. having the function of legislating or proposing laws* कायदेकानू करणारा, कायदे रचणारा -करणारा, नियमस्थापक, विधिस्थापक. [ L. COUNCIL कायदेकौन्सिल, कायदेकानू करणारी मंडळी, कायदेसभा, विधिकारी सभा *f.* ] २ *pertaining to legislation or a legislature* कायदे करण्याचा -स्थापण्याचा; as, "a L.

style." २ कायद्यानें केलेला, कायदा ह्मणून स्थापित झालेला; as, "a L. act; a L. emancipation." L. *n.* (as opposed to Executive) कायदेकौन्सिल *n*, कायदेकानू करणारें मंडळ *n*. Leg'islatively *adv.* Leg'islator *n.* *a maker of laws, a proposer of laws* कायदेकानू -&c करणारा -रचणारा *m*, नियमकार, विधिस्थापक -रचक &c. Leg'islatress *n. fem. a female legislator* कायदेकानू करणारीण *f.* Leg'islato'rial *a. of or pertaining to the legislator or legislature* कायदेकानू रचणाऱ्या -स्थापणाऱ्या संबंधीचा, कायदेकानू स्थापण्यासंबंधीं, कायदेकानू -रचण्यासंबंधीं. Leg'isla'torship *n.* Leg'isla'trix *n.* Same as Legislatress. Leg'isla'ture *n. the power that makes laws* कायदेकानू करणारी सत्ता *f.* २ *a body of men in a state who make laws* कायदेकानू -कायदे &c. करणाऱ्या अधिकाऱ्यांची सभा *f*, कायदे करणारी मंडळी *f* -शाखा *f*, विधिस्थापनाधिकारी सभा *f*, राज्यव्यवस्थानियमकारी *m. pl.*, राज्यनियमकारिसभा *f.*

Legist (lē'jist) Fr. *legiste* –Low L. *legista* –L. *lex*, law.] *n. one skilled in the laws* कायदेपंडित *m.*

Legitimate (le-jit'i-māt) [Low L. *legitimo-atum* –L. *lex*, *legis*, law.] *a. lawful* कायदेशीर, कायद्याबरहुकुम, यथाशास्त्र, यथान्याय. २ *lawfully begotten* (*as a child*) औरस (संतान *n*), धर्मपत्नीज, दंपतीजात, अस्सल, असील, विधिजात. [A L. WIFE, धर्मपत्नी *f.*] ३ *authorized, not false* खरा, अस्सल, असील, विधिजात, वास्तविक, वाजवी, यथान्याय. ४ *conforming to known principles* (as of reasoning &c.) शास्त्रशुद्ध, शास्त्रानुसार, प्रसिद्धतत्वानुसार, शास्त्रनियमानुसार, ५ *following by logical sequence* तर्कशास्त्रानुसार, तर्कशास्त्रशुद्ध, तर्कशास्त्रप्रमाण, तर्कानुसार, सयुक्तिक, यथान्याय. L. *v. t.* See Legitimatise. Legit'imacy *n. the state of being legitimate* कायदेशीरपणा *m.* अस्सलपणा *m*, खरेपणा *m*, खराई *f*, यथान्यायता *f.* २ *lawfulness of birth* औरसता *f*, औरसत्व *n*, उरस्यता *f*, धर्मपत्नीजत्व *n*, दंपत्युद्भव *m.* ३ *regular deduction* शास्त्रशुद्धता *f*, शास्त्रानुसारता *f*, शास्त्रप्रमाणता *f*, सयुक्तिकता *f.* ४ *directness of descent as affecting the royal succession* गादीचा सरळ वारसा *m*, वारसदारपणा *m*, वारसदारी *f.* Legit'imately *adv.* यथान्याय, कायदेशीरपणें. Legit'imateness *n.* कायदेशीरपणा *m.* Legit'im'ation *n. act of investing with legitimacy* कायदेशीरपणा आणणें, कायदेशीर स्वरूप देणें, कायदेशीर करणें. २ औरसपणाचे हक्क देणें. Legit'imatise *v. t. to make lawful or valid* कायदेशीर ठरविणें -करणें -बनविणें. २ *to give the rights of a legitimate child* (*to an illegitimate one*) औरसपणा *m.* -औरसत्व *n*- &c., देणें, औरसपणाचे हक्क देणें, औरसांत -औरसवर्गांत घेणें -आणणें, अस्सलसा करणें, औरससम -औरसायित -करणें. Also Legit'imise. Legit'imist *n. one who supports legitimate authority* कायदेशीर सत्तेचा पुरस्कर्ता *m.*

as, "Not is a N." २ *a proposition by which something is denied or forbidden* निषेधक सिद्धांत *m*, नेतिसिद्धांत *m*, नकारार्थी सिद्धांत *m*. [TWO NEGATIVES MAKE ONE AFFIRMATIVE द्वौ नञौ प्रकृतार्थं गमयतः (Sk.); दोन नकार एक सकार करतात.] ३ *veto* नामंजुरी *f*. ४ नकारपक्ष *m*, नकाराची बाजू *f*; as, "The question was decided in the *negative*." ५ (*photo.*) उलट प्रतिमा *f*, विपर्यस्त -ऋणप्रतिमा *f*. ६ (*elect.*) ऋणपत्रा *m*.
Neg'ative *v. t. to disprove* खोटा ठरविणें -करणें, खंडन करणें, निषेध करणें, खोटेपणा आणणें, रद्द करणें. २ *to reject by vote* (बहुमतानें) नामंजूर करणें, नापास करणें, नापसंत करणें, असंमति दर्शविणें, विरुद्ध मत देणें; as, "The senate *negatived* the bill." ३ *to counteract* जोर नाहींसा करणें, हाणून पाडणें, (-चें) खंडन करणें. Neg'atived *pa. t.* and *pa. p.* Neg'atively *adv.* नकारानें, नाहीं म्हणून. २ निषेधरूपानें, निषेधपक्षानें, निषेधदृष्ट्या. [N. CHARGED ऋणविद्युत्संचारित -असलेला.] Neg'ativeness, Neg'ativity *n.* नकारपणा *m*. २ निषेधगर्भता *f*. ३ ऋणता *f*. ४ उलटपणा *m*. Neg'atory *a.* निषेधाचा, निषेधदर्शक, निषेधवाचक, निषेधार्थी.

Negatory, See under Negative.

Neglect (neg-lekt') [L. *negligere, neglectum*, -*nec*, not, and *legere*, to gather.] *v. t. to omit through carelessness* (-ची) हयगय करणें, (निष्काळजीपणानें) वगळणें, (गफलतीनें -आळसानें -विसरणानें) सोडणें -टाकणें -ठेवणें -न करणें. २ *to treat carelessly, to pass by without notice* (-ची) हयगय करणें, (-कडे) दुर्लक्ष -कानाडोळा करणें, (-ची) टंगळमंगळ करणें, आबाळ *f* -अवजतन *f* -गैरजतन *f* -गैरनिगा *f*- हेळसांड *f*. करणें *g. of o.*, अनास्था *f* -उदासीनपणा *m*. धरणें -बाळगणें with विषयीं *of o.* ३ *to disregard, to slight* (a person) उपेक्षा *f* -अव्हेर *m* -हयगय *f* -अवमान *m*. करणें *g. of o.*, (-कडे) कानाडोळा करणें, उपेक्षणें, अव्हेरणें, अवमानणें. ४ (*law*) *to fail to perform a duty* (कर्तव्यासंबंधीं) हयगय करणें, कर्तव्यास चुकणें, (कर्तव्य करण्यांत किंवा जबाबदारी बजावण्यांत) कसूर करणें. N. *n. omission* हयगय *f*, कसूर *f*, घालघसर *f*, कमतर *f*, चालढकल *f*, गफलत करणें *n*, आळस करणें *n*. २ *treating carelessly* हयगय *f*, आबाळ *f*, गैरनिगा *f*, गैरजतन *f*, टंगळमंगळ *f*, उपेक्षा *f*, अशुश्रूषा *f*. ३ *disregard, slight* उपेक्षा *f*, अव्हेर *m*, अवमान *m*, हेळसांड *f*, कानाडोळा *m*, दुर्लक्ष *n*. ४ *culpable disregard* कसूर *f*, (दंडार्ह) प्रमाद *m*, अक्षम्य चूक *f*, हयगय *f*, कर्तव्यास चुकणें *n*. Neglect'ed *pa. p.* हयगय केलेला, (निष्काळजीपणानें) वगळलेला, (गफलतीनें -आळसानें -विसरणानें) सोडलेला -टाकलेला -ठेवलेला -न केलेला, विसरलेला, आळसानें राहिलेला. २ हयगय केलेला, दुर्लक्षित, उपेक्षित, आबाळ -अवजतन -गैरनिगा केलेला, (-च्या विषयीं) अनास्था धरलेला -बाळगलेला. ३ उपेक्षा -अव्हेर -अवमान केलेला, उपेक्षिलेला. Neglect'edness *n.* हयगय केलेलेपणा *m*, उपेक्षा *f*, दुर्लक्षितता *f*. २ आबाळ *f*, अवजतन *f*, अरक्षितता *f*. ३

(कर्तव्यासंबंधीं) हयगय *f*, कसूर *f*, चूक *f*, प्रमाद *m*. Neglect'er *n*. हयगय करणारा *m*, (निष्काळजीपणानें) वगळणारा *m*, (आळसानें -गफलतीनें -विस्मरणानें) टाकणारा *m* -सोडणारा *m* -न करणारा *m*, गफलत करणारा *m*, गबाळ्या *m*. २ (-ची) हयगय करणारा *m*, आबाळ *f* -गैरनिगा *f*. करणारा *m*, (-च्या विषयीं) अनास्था धरणारा *m* -बाळगणारा *m*, उपेक्षा करणारा *m*. ३ अव्हेर करणारा *m*, अवमान करणारा *m*, उपेक्षक *m*. ४ (कर्तव्यासंबंधीं) हयगय करणारा *m*, कर्तव्यास चुकणारा *m*, कसूर करणारा *m*. Neglect'ful *a*. *careless, accustomed to omit things* हयगयीचा, हयगयी, हयगय करणारा, दुर्लक्ष करणारा, (निष्काळजीपणानें) वगळणारा, गफलती, गफलत्या, गाफील, गाफल, बेसावध, गैरसावध, विस्मरणानें सोडणारा -न करणारा. २ *indifferent* (-ची) हयगय करणारा, (-ची) आबाळ *f* -अवजतन *f*. करणारा, बेपर्वा, अनास्था *f*. करणारा -बाळगणारा, अनास्थेचा, आबाळीचा, निष्काळजीपणाचा. ३ *slighting* उपेक्षा करणारा, अव्हेर करणारा, अवमान करणारा, उपेक्षक. ४ कर्तव्यास चुकणारा, (कर्तव्यासंबंधीं) हयगय *f* -कसूर करणारा. Neglect'fully *adv*. हयगयीनें, हयगय करून, हयगयपूर्वक, (आळसानें -गफलतीनें -विस्मरणानें) सोडून, गफलतीनें, गाफीलपणानें. २ दुर्लक्ष करून, उपेक्षा करून, हेळसांड करून, उपेक्षापूर्वक. ३ अव्हेर करून, अवमानपूर्वक. ४ (कर्तव्यासंबंधीं) हयगय करून, कसूर करून. Neglect'fulness हयगयीपणा *m*, गाफीलपणा *m*, निष्काळजीपणा *m*, गैरसावधपणा *m*. २ गबाळेपणा *m*, टंगळमंगळपणा *m*. ३ उपेक्षाबुद्धि *f*, उपेक्षा *f*, अवमानितता *f*, अवमान *m*. ४ (कर्तव्यासंबंधीं) हयगयीपणा *m*, कसूर *m*. Neglect'ing *pr. p. a.* Same as Neglecter. Neglect'ingly *adv*. हयगय करून, हयगयीनें, दुर्लक्ष करून, गफलतीनें, गाफीलपणानें, निष्काळजीपणानें, दुर्लक्षानें. २ आबाळ करून, हेळसांड करून, अनास्था बाळगून. ३ उपेक्षा करून, उपेक्षापूर्वक, अव्हेर करून. ४ (कर्तव्यासंबंधीं) हयगय करून, कसूर करून, कर्तव्यास चुकून.

*N. B.*—As now generally used, *negligence* is the habit, and *neglect* the act, of leaving things undone or unattended to. We are *negligent* as a general trait of character; we are guilty of *neglect* in particular cases or in reference to individuals who had a right to our attentions. (*Webster*).

Neglectable,<br>Neglectedness,<br>Neglectful, } See under Neglect.

Negligee (neg-li-zhā') [Fr. *neglige* –*negliger*, to neglect.] *n*. मडमांचा घरांत वापरण्याचा सईल (सैल) झगा *m*, निग्लिजे *m*.

Negligence (neg'li-jens) [Fr. *negligence* –L. *negligentia*, carelessness.] *n*. *want of proper care, habitual neglect* निष्काळजीपणा *m*, निष्काळजी स्वभाव *m*, गाफीलपणा *m*, आळस *m*, गैदीपणा *m*, बेसावधपणा

*m.* २ *omission of duty* (कर्तव्य करण्यांत) कसूर *f*, हयगय *f*, गफलत *f*, कर्तव्यच्युति *f*. ३ *carelessness about dress, manner &c.* (पोषाख, वागणूक, वगैरेविषयीं) निष्काळजीपणा *m*, गबाळेपणा *m*, अव्यवस्थितपणा *m*, गैदीपणा *m*, बेपर्वाई *f*. ४ *slight, disregard* उपेक्षा *f*, हेळसांड *f*, अव्हेर *m*, अनादर *m*, अवमान *m*, आबाळ *f*. ५ (*law*) *omission of duty, especially such care for the interests of others as the law may require* कसूर *f*, चूक *f*, प्रमाद *m*. Neg'ligent *a. neglecting, careless, inattentive* हयगयी, निष्काळजी, गाफील, हयगय *f* -उपेक्षा *f*. करणारा, दुर्लक्ष करणारा, (कर्तव्यांत) कसूर करणारा, कर्तव्यशिथिल, कर्तव्यपराङ्मुख, हयगयीचा. २ *disregarding ceremony or fashion* शिष्टाचार वगळणारा, निष्काळजी, बेपर्वा. ३ *showing lack of attention* उपेक्षा करणारा, गबाळया, निष्काळजी, अव्यवस्थित, अस्ताव्यस्त. Neg'ligently *adv.* हयगयीनें, निष्काळजीपणानें, हयगय करून, गाफीलपणानें, बेसावधपणानें, गफलतीनें, अलक्ष्यानें, बेसुर्वतीनें. २ उपेक्षा करून, हेळसांड करून, उपेक्षापूर्वक, अवमान करून. ३ चुकीनें, कसूरीनें, प्रमादपूर्वक. Neg'ligible *a.* क्षुद्र, क्षुल्लक, किरकोळ, दुर्लक्ष करण्यासारखा, कानाडोळा करण्यासारखा, जमेस न धरण्यासारखा, अव्हेर करण्यास योग्य, उपेक्षणीय, अवमाननीय. Neg'ligibly *adv.* See N. B. under Neglect.

Negligible, See under Negligence.

Negotiable, See under Negotiate.

Negotiate (ne-gō'shi-āt) [L. *negotiari* –*negotiatus* –*negotium*, business–*nec*, not, and *otium*, leisure.] *v. i. to speak with another about business with a view to some settlement or compromise* (एखाद्या प्रकरणाचा निकाल किंवा तडजोड करण्याकरितां दुसऱ्याशीं) बोलणें *n.* चालविणें, बोलणेंचालणें -बोलीभाषा करणें, or with *in. con.* होणें -चालणें *g. of s. recip.*, बोलणेंचालणें करून घडविणें, बोलीभाषा करून घडवून आणणें, बोलीभाषा करून जमविणें, (बोलीभाषा करून) घटना -घटवटना -घडवाघडव -जमवाजमव करणें, (-च्या विषयीं) मध्यस्थी करणें. (b) (तहासंबंधानें किंवा व्यापारासंबंधानें) बोलणें चालविणें. N. *v. t. to manage or conduct a business with skill or thought* खुबीनें, हुषारीनें, किंवा विचारानें (एखादा व्यवहार) जमविणें. २ *to bring about by agreement* (आपसांत ठरवून) घडवून आणणें -व्यवस्था करणें, व्यवस्थित करून घेणें -सुयंत्रित चालेसा करणें. ३ *to transfer a bill, a cheque &c. to another* (for a valuable consideration) *with all the rights of the original holder* बेचन देणें -करणें, (दुसऱ्याच्या) नांवावर करणें -करून देणें, (दुसऱ्याच्या) नांवावर चढविणें -चढवून देणें, विकणें, विकत देणें. ४ *to pass* (as a bill, cheque, &c.) (-चा) रोकड पैसा करणें, (बिल, हुंडी वगैरे) चालवणें. ५ *to deal with, to carry out* (as a

business or monetary transaction ) (-शीं) व्यवहार करणें -ठेवणें, (-शीं पैशाची) देवघेव करणें. ६ (in horse-riding) *to get across* (a fence or other obstacle) (कुंपण वगैरे) उडून -चढून जाणें. Nego'tiable *a.* बेचन करून देण्यासारखा, बेचनीय, नांवावर फिरवून -करून -चढवून देण्यासारखा. [Not N. बेचन करून देतां न येण्यासारखा (बिल, चेक वगैरे), अबेचनीय. N. Instrument बेचनीय दस्तैवज *m*, सही करून दुसऱ्याचे नांवावर करून देतां येणारा दस्तैवज *m*. N. Instruments Act बेचनीय दस्तैवजांचा आक्त. N. Paper बेचनीय दस्तैवज (चेक). Negotiabil'ity *n.* बेचनीयता *f*, &c. Nego'tiated *pa. t.* N. *pa. p.* बोलीभाषा करून घडवून आणलेला, बोलीभाषा केलेला, बोलीभाषा करून जमवाजमव केलेला. २ मध्यस्थी केलेला, बोलणें चालविलेला. ३ आपसांत ठरवून घडवून आणलेला. ४ बेचन केलेला, विकलेला, विकत दिलेला. ५ रोकड पैसा केलेला, चालवलेला. ६ उडून -चढून गेलेला. Nego'tiating *pr. p.* & *v. n.* [Negotiating a sharp corner पुष्कळ वेळां अपघाताची पर्वा न करितां मोटार किंवा बायसिकल सफाईनें कोंपऱ्यावरून वळवणें.] Negotia'tion, Negocia'tion *n.* –the act. बोलीभाषा *f*, (सलोख्याचें किंवा तडजोडीचें) बोलणेंचालणें *n*, घटवटना *f*, घडवाघडव *f*, मध्यस्थी *f*. (b) राष्ट्रांराष्ट्रांमधील (परस्परांच्या वकिलांमार्फत) बोलणेंचालणें *n*, वकीलात *f*. २ सौदा *m*, व्यवहार *m*. Nego'tiator *n.* (दुसऱ्याच्या वतीनें) बोलणेंचालणें करणारा *m*, बोलणेंचालणें करून घडविणारा *m*, घटवटना करणारा *m*, मध्यस्थी करणारा *m*, मध्यस्थ *m*. Nego'tiatory *a.* मध्यस्थीचा, देवघेवीसंबंधीं, कामकाजासंबंधीं. Negotia'trix *n. fem.*

Negotiator, See under Negotiate.

Negro (nē'grō) [Sp. *negro* –L. *niger*, black.] *n.* शिद्दी *m*, निग्रो *m*. (Ne'groes *n. pl.*) N. *a.* शिद्दी मनुष्याचा, निग्रोचा. Ne'gress *n. fem.* शिद्दीण *f*. Ne'gro-head *n.* (काकवींत भिजवून) तंबाकूच्या (दावून केलेल्या) काळ्या वड्या *f. pl.* २ काळा रबर *m*. Ne'groid *a.* शिद्दी लोकांसारखा, शिद्दी लोकांच्या वळणाचा. Ne'grophil, Negro'philist *n.* निग्रो लोकांच्या हक्कांसाठीं भांडणारा *m*, निग्रो लोकांच्या हक्कांचा कैवारी *m*, निग्रो लोकांचा पक्षपाती *m*. Ne'grophobe *n.* निग्रो लोकांचा द्वेष करणारा *m*, निग्रोद्वेष्टा *m*. Negropho'bia *n.* निग्रो लोकांचा पूर्ण द्वेष *m*, निग्रोद्वेष *m*.

Negro-head, Negroid, Negrophil, Negrophobe, Negrophobia, } See under Negro.

Negus (nē'gus) [Said to be so called from Colonel Negus, its first maker, in the reign of Queen Anne.] *n.* लिंबाचा रस, जायफळ, साखर, पाणी व द्राक्षासव हीं मिसळून केलेलें पेय *n*, नीगस पेय *n*.

Negus (nē'gus) *n.* अबिसीनियाच्या राजांची 'नीगस' ही पदवी *f*.

Neigh (nā) [A. S. *hnægan*, to neigh.] *v. i.* *to*

*utter the cry of a horse* खिंकाळणें, खेंकाळणें, खंखाळणें (?), हिंसणें, हेंसणें, हिणहिणणें (?) N. *n.* खिंकाळी *f*, खेंकाळी *f*, खेंकाळणें *n*, हेषा *f*. Neighed' *pa. t.* & *pa. p.* Neigh'ing *pr. p.* N. *v. n.* खेंकाळणें *n*, खिंकाळणें *n*, खिंकाळी *f*, खेंकाळी *f*, हेषा *f*.

Neighbour (nā'bur) [A. S. *neahbur*, *neahgebur* –A. S. *neah*, near, and *gebur* or *bur*, a farmer.] *n. a person who dwells, sits or stands near another* शेजारी *m*, पडोसी *m*, सींवशेजारी *m*, निकटवासी *m*. [FEMALE N. शेजारीण *f*, शेजी *f*.] २ *one who is on friendly terms with another* मित्र *m*, स्नेही *m*. ३ (Bible) *a fellow-being* मनुष्यमात्र *n*, मनुष्य *m*, माणूस *n*, ज्ञातिबंधु *m*, जातिबांधव *m*, जातभाई *m*, शेजारी *m*. [LOVE THY N. AS THYSELF आपल्याप्रमाणेंच आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर, आत्मौपम्यानें जग पहावें.] N. *a.* शेजारचा, पडोसचा, जवळचा, लगतचा, आसपासचा. N. *v. t. to be near to* (-च्या) जवळ रहाणें -असणें, (कांठाला) लागून -लगत असणें. Neigh'bourhood *n.* शेजारीपणा *m*, शेजारपणा *m*. [THE LAW OF N. शेजारधर्म.] २ *adjoining district* जवळचा -शेजारचा प्रांत *m* -प्रदेश *m* -मुलूख *m*, आसपासचा प्रांत *m*, भोंवरदेश *m*. ३ *people living in an adjoining district* जवळच्या किंवा शेजारच्या प्रांतांत -प्रदेशांत -मुलखांत रहाणारे लोक *m. pl.*, आसपासचे लोक *m. pl.*, शेजारीपाजारी *m. pl.* ४ *vicinity* शेजार *m*, पडोसा *m*. [FROM THE N. शेजारून. IN THE N. शेजारीं, पडोशास, आसपास, जवळपास, जवळसर, आजूबाजूला. VILLAGE IN THE N. भोंवरगांव (*R.*), शेजारचा गांव *m*.] Neigh'bouring *pr. p. adjoining* आजूबाजूचा, शेजारचा, पडोशाचा, पडोसचा, आसपासचा, जवळचा, जवळपासचा, शेजारपाजारचा, निकटवर्ती. [FROM THE N. PARTS आसपासच्या भागांतून-प्रांतांतून, इकडून तिकडून.] Neigh'bourliness *n.* शेजारधर्म *m*, शेजारीपणा *m*. २ स्नेह *m*, सख्य *n*, मैत्री *f*, गोडी *f*, घरोबा *m*. Neigh'bourly *a. becoming a neighbour* शेजारधर्माचा, शेजारधर्मास योग्य -उचित -लायक, शेजाऱ्याच्या रीतीचा. २ *friendly*, *social* मित्रत्वाचा, मित्रभावाचा, स्नेहाचा, स्नेहभावाचा, मैत्रीचा, सख्यत्वाचा. N. *adv.* शेजारधर्माप्रमाणें. २ सख्यत्वानें. Neigh'bour-stained *a.* (*shakes.*) *stained with neighbour's blood* (आपल्या) शेजाऱ्याला मारून अपकीर्ति मिळविलेला, शेजारघातकी.

Neither (nē'ther or nī'ther) [M. E. *neither*, A. S. *ne*, not, and *either*.] *pron. not either* (दोहोंपैकीं) कोणताही नाहीं, एकही नाहीं, हाही नाहीं व तोही नाहीं. N. *conj. not either, and not, nor yet* आणिही -किंवाही नाहीं. [NOT SO N. (*Shakes.*) *by no means* मुळींच नाहीं.] N. *adv. not at all, in no case* मुळींच नाहीं, केव्हांही नाहीं, कदापि नाहीं.

Nemalite (nem'a-līt) [Gr. *nyma*, thread, and *-lite*.] *n. a very rare ore of magnesium, also a variety*

*of brucite* नेमलाइट *f.* ही म्याग्नेसियम धातूची अशोधित धातु असून ब्रूसाइटचा एक प्रकार आहे. ही फार विरळ असते व अफगाणिस्थानांत सांपडते. हिचा नमुना जिआलाजिकल सर्व्हेच्या प्रयोगशाळेंत ठेवलेला आहे.

Nematoid, See under Nematoidea.

Nematoidea ( nema-toi'dē-a ) [Gr. *nymatos*, thread, and *idos*, similar. ] *n.* सूत्राकृति कृमिवर्ग *m*, सुतासारख्या बारीक कृमींचा वर्ग *m*. उ० नारू, पोटांतील जंत वगैरे. Nem'atoid *a.* सूत्राकृति कृमिवर्गाचा. N. *n.* सूत्राकृति कृमि *m.*

Nem. Con. [ L. Abbreviation of Nem'-i-ne Contra-di-cen'-te.] *no one speaking against* ( a motion or proposal ), *unanimously* एकही विरुद्ध नसतां, सर्वानुमतानें, सर्वानुमतें, सर्वांच्या संमतीनें, सर्वसंमतीनें.

Nemesis ( nem'e-sis ) [ L. *nemesis*, –Gr. *nemesis*, allotment, retribution, vengeance, –Gr. *nemein*, to distribute.] *n.* ( *myth.* ) *the ancient Greek goddess of justice and divine retribution* ( ग्रीक लोकांतील प्राचीन ) दुष्कर्माबद्दल पारिपत्य करणारी 'नेमेसिस' देवता *f*, ( ग्रीक लोकांची ) दंडदेवता *f.* ही देवता दुष्कर्माबद्दल शिक्षा करते व वैभवानें मदांध झालेल्या मनुष्याचा मद उतरते. २ *retributive justice* (दुष्कर्माबद्दल फल देणारा) न्याय *m*, (पापाच्या पारिपत्याचा) न्याय. ( b ) *punishment that follows wrong-doing* दुष्कर्मफल *n*, दुष्कर्माचें फळ *n*, पापाचें पारिपत्य *n.*

Nemo ( nē'mo ) [ L. *nemo*, nobody. ] *n. nobody* क्षुद्र मनुष्य *m*, यःकश्चित् मनुष्य *m.*

Nemophilist, Nemophilous, See under Nemoral.

Nemoral (nem'ō-ral) [ L. *nemoralis* –*nemus*, *nemoris*, a grove.] *a. pertaining to a wood or grove* जंगलांत राहाणारा, रानाचा, वनाचा, रानांतला, वनांतला, अरण्याचा, वन्य; as, "The N. beasts of India." Nemoph'ilist *n.* (R.) अरण्याच्या देखाव्यांचा भोक्ता *m*, वनश्रीचा भोक्ता *m.* Nemoph'ilous *a. fond of woods* वनश्रीचा भोक्ता, सृष्टिसौंदर्याचा भोक्ता -शोकी. Nem'orose *a. growing in woodland* रानांत -वनांत -अरण्यांत वाढणारा -होणारा, वनेरुह. Nemo'rous *a. woody* रानाचा, अरण्याचा, वनाचा, जंगलाचा, जंगल असलेला.

Nenuphar ( nen'ū-fär ) [ Fr. *nenufar*, –Ar. *nenuphar*, a white water-lily. ] *n.* (*bot.*) मोठें पांढरें कमळ *n*, श्वेतकमळ *n.* श्वेतकमळांची ही जात हिंदुस्थानांत सांपडत नाहीं. हिंदुस्थानांत सांपडणारीं श्वेतकमळें Nenuphar हून निराळ्या जातीचीं आहेत.

Neo– ( nē'ō– ) [ Gr. *neos*, new. ] *a prefix meaning new* 'नूतन, नवीन, नवा' ह्या अर्थीं लागणारा उपसर्ग *m.* Neo हा उपसर्ग कधीं कधीं निंदा किंवा उपहास दाखविण्याकरितां योजितात.

Neocosmic (nē-ō-koz'mik) [Gr. *neos*, new, & *kosmos*, the universe. ] *a. pertaining to the present condition of the universe, especially its races of men known to history* जगाच्या चालू स्थितीसंबंधीं, आज-

मितीच्या जगाविषयींचा, (इतिहासाला उपलब्ध असलेल्या) विद्यमान मानवजातीचा.

Neocracy (nē-ok'ra-si) [Gr. *neos*, new, & *kratein*, to rule –*kratos*, power.] *n. government by upstarts* उपटसूळ लोकांचा अंमल *m* -राज्यकारभार *m*. २ *raw and untried officials* उपटसूळ अधिकारी *m. pl.*

Neodymium (nēō-dim'i-um) [L. *neos*, new, and *dymium*, a metallic substance.] *n.* रसायनशास्त्रांतील एक धातुरूप मूलद्रव्य *n*, न्योदिम *n*.

Neogamist (nē-og'a-mist) [Gr. *neos*, new, and *gamos*, marriage.] *n. a person recently married* (a) नुकतेंच लग्न झालेली स्त्री *f*. (b) नुकतेंच लग्न झालेला पुरुष *m*.

Neologise, Neologist, } See under Neology.

Neology (nē-ol'o-ji) [Gr. *neos*, new, & *logos*, word.] *n. the introduction of a new word or of new words into a language* (भाषेंत) नवशब्दयोजना *f*, नव्या शब्दाची योजना *f*. २ *the introduction of new significations into a language* नवार्थयोजना *f*, (जुन्या शब्दांना) नवीन अर्थ देणें *n*. ३ *the use of new terms or phrases* नवपरिभाषायोजना *f*, नवीन पारिभाषिक शब्दांची योजना *f*. ४ *a new word or term* नवा शब्द, नवशब्द *m*. ५ *a new doctrine especially in theology* (विशेषतः धर्मशास्त्रांतील) नवें मत *n*, नवा सिद्धांत *m*. ६ *a new method of theological interpretation* नवशास्त्रार्थयोजना *f*, जुनीं वचनें नवीन अर्थानें सांगण्याची पद्धति *f*, नवीन शास्त्रार्थ लावणें *n*. Neolog'ical *a.* नवशब्दयोजनेचा, नवार्थयोजनेचा, नवपरिभाषायोजनेचा &c. &c. Neolog'ise *v. t. to use new words or phrases* नवे शब्द किंवा नवे शब्दप्रयोग योजणें. २ *to make linguistic innovations* भाषेचे नवे नवे प्रकार प्रचारांत आणणें. ३ *to introduce or accept new theological doctrines* नवीन धर्ममतें किंवा धर्मसिद्धांत *m. pl.* स्वीकारणें किंवा प्रचारांत आणणें. Neol'ogist *n.* नवशब्दयोजक *m*, नवीन शब्द योजणारा *m*. २ (धर्मशास्त्रासंबंधीं) नवे सिद्धांत किंवा नवे शास्त्रार्थ योजणारा *m*.

Neon (nē-'on) [Gr. *neos*, Sk. नव, new.] *n.* रसायनशास्त्रांतील एक मूलद्रव्य *n*, न्युन *n*.

Neontology (nē-on-tol'o-gi) [Gr. *neos*, Sk. नव, new, *on*, *ontos*, being, and *legein*, to speak.] *n. the science and description of extant, as apart from extinct, animals* विद्यमान प्राण्यांचें शास्त्र *n*, विद्यमानप्राणिशास्त्र *n*. Neontol'ogist *n.* विद्यमानप्राणिशास्त्रवेत्ता *m*. N. B. Zoology=प्राणिशास्त्र. Paleontology=अश्मीभूतप्राणिशास्त्र, नष्टप्राणिशास्त्र.

Neophobia (nē-ō-fō'bi-a) [Gr. *neos*, Sk. नव, new, & *phobos*, fear.] *n. fear or dislike of what is new* नवीन (प्रचारांत येणाऱ्या) गोष्टींचें भय *n*, नव्याचें भय *n*,

नव्याचा द्वेष *m*, नूतनवस्तुद्वेष *m*, नवसंत्रास ( on the analogy of जलसंत्रास = Hydrophobia ) *m*; as, "In the student, curiosity takes the place of N."

Neophyte ( nē'ō-fīt ) [ L. *neophyte* –Gr. *neophytus* –Gr. *neos*, new, and *phytos*, grown. ] *n.* ( a ) *a new convert, one newly baptized or admitted to the priesthood or to a monastery* ( नुकताच ) नवीन धर्मांत आलेला *m*, नुकताच धर्मांतर केलेला *m*, ( विशेषतः परधर्मांतून ) नुकताच ( ख्रिस्ती ) धर्मांत आलेला *m*, नवधर्मी *m*, ( जोग देऊन ) नुकताच मठांत दाखल केलेला *m*, नवा जोगी *m*. ( b ) *a newly ordained priest* नुकताच केलेला 'प्रीस्ट' *m*. ( c ) *a novice of a religious order* ( एखाद्या धर्मपंथाचा ) नवा शिष्य *m*, नवशिष्य *m*, नवच्छात्र *m*. २ *a novice, a beginner* नवशिका *m*, नवा शिष्य *m*, नवशिष्य *m*. N. *a. newly admitted or entered on office* नुकताच केलेला ('प्रीस्ट').

Neoplasm ( nē'ō-plazm ) [ Gr. *neos*, Sk. नव, new and *plassein*, to form. ] *n. a morbid new growth or formation of tissue* ( दाह झाल्याशिवाय आपोआप येणारी शरिरावरील ) नवी गांठ *f*.

Neoteric, -al ( nē-ō-ter'ik, -al ) [ L. *neotericus*, Sk. नवतर, Gr. *neoteros*, comparative of *neos*, Sk. नव, new. ] *a. of recent origin, modern* नवतर, नवा, नवीन, नूतन, अलीकडचा, अलीकडील, अर्वाचीन, आधुनिक. N. *n. a modern* आधुनिक मनुष्य *m*. २ (*esp.*) *a modern writer or author* आधुनिक ग्रंथकार *m*. ३ (*pl.*) *the study of modern things* नववस्तुविद्या *f*, अर्वाचीन वस्तूंचा इतिहासदृष्ट्या अभ्यास *m*; as, "She was no antiquary being given to *neoterics*." Neot'erise *v. i. to introduce new things* नवीन प्रघात पाडणें, नवीन गोष्टी प्रचारांत आणणें. २ *to coin or introduce new words* नवीन शब्द बनविणें, नवे शब्द बनविणें, नव्या शब्दांची योजना करणें, नवशब्दयोजना करणें, नवीन शब्द प्रचारांत आणणें. Neot'erism *n. the introduction of new things* नवतरता *f*, नवेपणा *m*, नवीनपणा *m*, नव्याचा प्रघात ( पाडणें ) *n*, नव्याचा प्रचार *m*. २ *use of new words or phrases* नवीन बनविलेला किंवा प्रचारांत आणलेला शब्द *m* -म्हण *f* -वाक्प्रचार *m*, नवशब्द *m*, नवीनशब्दप्रयोग *m*, नवशब्दप्रयोग *m*; as, "If purism is ridiculous, N. may easily become nauseating."

Nepenthe, Nepenthes ( ne-pen'thē, ne-pen'thēz ) [ Gr. *nē*, not, & *penthos*, grief. ] *n.* (*med.*) *a drug that relieves pain* दुःखनिवारक औषध *n*, दुःखोपशामक औषध *n*, दुःखहारक औषध *n*.

Nephalism ( nef'a-lizm ) [ Gr. *nephalios*, sober. ] *n. total abstinence from alcoholic drinks* मादक पेयें न पिणें *n*, दारूला न शिवणें *n*, मद्यपानत्याग *m*, मद्यत्याग *m*.

Nepheloid ( nef'e-loid ) [ Gr. *nephele*, cloud. ] *a.*

*cloudy, turbid* मेघाच्छादित, अभ्रमय, अभ्राच्छादित. Nephelom'eter *n. a supposititious instrument for measuring or registering the amount of cloudiness* मेघमापक *m.* Neph'oscope *n. an apparatus for illustrating the formation of clouds and their velocity* मेघ कसे बनतात व ते किती वेगानें चालतात हें पाहण्याचें यंत्र *n*, मेघदर्शक.

Nephelometer, See under Nepheloid.

Nephew (nev'ū *or* nef'ū) [Nephew is, by origin, a grandson. Fr. *neveu*, –L. *nepos*, *nepotis*, a grandson, a nephew.] *n. the son of a brother* पुतण्या *m*, भ्रातृपुत्र *m*, भ्रातृव्य *m.* २ *the son of a sister* बहिणीचा मुलगा *m*, भगिनीपुत्र *m*, भागिनेय *m*, भाचा *m.*

Nephoscope, See under Nepheloid.

Nephralgia (ne-fral'ji-a) [Gr. *nephros*, the kidneys, and *algos*, pain.] *n. pain or disease of the kidneys* मूत्रपिंडाची वेदना *f*, मूत्रपिंडवेदना *f*, वृक्कशूल *m*. [मूत्रपिंड or वृक्क = Kidney.] Nephral'gy *n.* मूत्रपिंडवेदना *f*. Neph'rite *n. a mineral usually called jade, an old charm against the kidney disease* मूत्रपिंडवेदनाशामक दगड *m*. हा हिरवट रंगाचा असतो. Nephrit'ic *n. a medicine for the cure of disease of the kidneys* मूत्रपिंडरोगाचें औषध *n*, वृक्कशूलारि *m* (coined). Nephrit'ic,-al *a. pertaining to the kidneys* मूत्रपिंडाचा, वृक्काचा -संबंधीं. २ *affected with a disease of the kidneys* मूत्रपिंडरोगग्रस्त, वृक्कशूलग्रस्त, मूत्र-पिंडरोग झालेला. ३ *relieving diseases of the kidneys* मूत्रपिंडरोगशामक, वृक्कशूलशामक, मूत्ररोगघ्न -हारी. Nephri'tis *n. inflammation of the kidneys* मूत्रपिंडदाह *m*, वृक्कदाह *m*. Neph'rocele *n. hernia of the kidney* मूत्रपिंडप्रातिसरण *n*, वृक्कप्रातिसरण *n*. Nephrog'raphy *n. a description of the kidneys* मूत्रपिंडवर्णन *n*, वृक्कवर्णन *n*. Neph'roid *a. kidney-shaped* मूत्रपिंडाकार, वृक्काकार. Neph'rology *n. scientific knowledge of the kidneys* मूत्रपिंडविज्ञान *n*, वृक्कविज्ञान *n*. Nephrot'omy *n. the operation of incising the kidneys* मूत्रपिंडच्छेदन *n*, वृक्कच्छेदन *n*.

Nephralgy,<br>Nephrite,<br>Nephritic,<br>Nephritis,<br>Nephrocele,<br>Nephrography,<br>Nephroid,<br>Nephrology,<br>Nephrotomy, } See under Nephralgia.

Nepotism (nep'o-tizm) [L. *nepos*, *nepotis*, a grandson. Nepotism originally meant the practice, on the part of the Popes or other ecclesiastics, of showing special favours to nephews or other relations in conferring offices.] *n.* (hence) *undue*

*favouritism to one's nephews or other relations* पुतण्यांचा -भाच्यांचा -आप्तांचा पक्षपाती ओढा *m*, नातलगांविषयीं पक्षपातबुद्धि *f.* Nep'otist *n.* नातलगांचा फार ओढा असलेला *m*, नातलगांचा पक्षपाती *m.*

Nephros (ne'fros) [Gr. *nefros*, kidney.] *n. kidney* वृक्क *m*, मूत्रोत्पादकपिंड *m*, मूत्रपिंड *m*, गुर्द *m*, गुडदा *m.*

Neptune (nep'tūn) [L. *Neptunus*, Neptune.] *n. the god of the sea* रोमन लोकांचा नेपच्युन (नांवाचा जलाधिष्ठाता) देव *m*, नेपच्युन *m.* २ (सूर्यग्रहमालिकेंतील) 'नेपच्युन' ग्रह *m*, इंद्र (according to some) *m*, प्रजापति *m* (according to others). याचा शोध १८४६ सालीं लागला. Neptu'nian *a.* नेपच्युनाचा. २ समुद्राचा, सागरविषयक. ३ (*geol.*) *formed by water or aqueous solution* पाण्यानें किंवा पाण्यांत विरघळलेल्या पदार्थानें झालेला (खडक). [N. THEORY पाण्यामध्यें विरघळलेल्या पदार्थांपासून खडक बनले आहेत असें मत *n.*] Neptuni-cen'tric *a.* नेपच्युनला केंद्र कल्पून पाहिलेला, नेपच्युनकेंद्रीय, नेपच्युनमध्यगत.

Neptuni-centric, See under Neptune.

Nereid (nē'rē-id) [L. *Nēreis* –Gr. *Nereis*, *–idos*, *–Nereus*, a sea-god.] *n.* (*Gr. Myth.*) ग्रीकलोकांची नीरीइड नांवाची जलाप्सरा *f.* २ (*zool.*) (फास्फरससारखी चकाकणारी) समुद्रांतील घोण *f*, नीरीइड *f.* समुद्रांत रात्रीं ठिकठिकाणीं फास्फरससारखा जो पाण्यांत उजेड दिसतो तो नीरीइड जातीच्याच प्राण्यांचा असतो. Ne'reis *n.* जलाप्सरा *f.*

Nereis, See under Nereid.

Nernst lamp नर्न्स्टनें शोधून काढलेला विजेचा दिवा.

Nero (nē'rō) *n. the last emperor of the family of the Cæsars, at Rome* सीझरच्या कुळांतील रोमच्या गादीवरील शेवटला 'नीरो' बादशाहा *m.* २ (*fig.*) *any cruel and wicked tyrant* दुष्ट व जुलमी राजा *m*, नीरो (*fig.*) *m.*

Nervation, See under Nerve.

Nerve (nerv) [Fr. *nerf*, –L. *nervus*, a sinew; perhaps allied to Gr. *neuron*, a sinew. Nerve शब्दाचा धात्वर्थ sinew म्हणजे स्नायु असा आहे.] *n. a fibre, or bundle of fibres connected with the brain, spinal cord &c., and conveying impulses of motion or sensations* मज्जातंतु *m.* [To STRAIN EVERY N. *to use one's utmost powers of body or mind for the attainment of some object* (एखादी फलप्राप्ति करून घेण्यासाठीं) आपल्या शक्तीची कमाल करणें, कमालीचा प्रयत्न करणें, सर्व शक्ति खर्च करणें, जिवापाड मेहेनत करणें, छातीवर काम करणें, भगीरथ -आटोकाट प्रयत्न करणें. CENTRAL END OF A N. ज्ञानतंतूचा केंद्राभिमुख किंवा अंतर्मुख च्छेद *m.* PERIPHERAL END OF A N. ज्ञानतंतूचा बहिर्मुख च्छेद *m.* EXCITEMENT OF A N. मज्जातंतूचें क्षोभन *n.* IMPULSE OF A N. मज्जातंतूची प्रेरणा *f.* STIMULATION OF A N. मज्जातंतूचें उत्तेजन *n*, मज्जातंतूला उत्तेजित करणें *n.* ACCELERATOR N.s गतिवर्धक मज्जातंतु-

शाखा *f.* EXCITATORY N.s क्षोभक मज्जातंतुशाखा *f.* INHIBITORY N.s नियामक मज्जातंतुशाखा *f.* MOTOR N. गतिवाहक मज्जातंतु *m.* SECRETORY N.s रसविमोचक मज्जातंतु *m. pl.* (**रस** here means fluid in general.) SENSORY N. ज्ञानवाहक मज्जातंतु. N. CELL (*anat.*) मज्जागोलक *m*, मज्जाकण *m*. N. CENTRE मज्जागोलकपीठ *n.* DISTRIBUTING N. CELLS प्रेरणांशदायक मज्जातंतुगोलक *m. pl.* INTERMEDIARY N. CELLS मध्यस्थित मज्जागोलक *m. pl.* N. DISEASE मज्जाविकार, मज्जातंतुविकार *m.* N. FIBRE (मज्जागोलकांनीं बनलेली) मज्जारेषा *f.* AFFERENT N. FIBRES अभिगामी मज्जारेषा *f. pl.* EFFERENT N. FIBRES उद्गामी मज्जारेषा *f. pl.* INTERCENTRAL N. FIBRES पीठांतरीय मज्जारेषा *f. pl.* (पीठ = CENTRE. SEE N. CENTRE.) NON-MEDULLATED N. FIBRES मज्जाकवचहीन मज्जारेषा *f. pl.* N. FORCE मज्जातंतूची शक्ति *f*, मज्जातंतुशक्ति *f.* N. GANGLION मज्जमंडल *n*, मज्जाकंद *m.* N. ROOT मज्जातंतूचें मूळ *n*, मज्जातंतुमूल *n.* N. SYSTEM मज्जातंतुसंघात *m*, मज्जारचना *f*, यावद्मज्जातंतुप्रदेश *m*, मज्जातंतूंची व्यवस्था *f.* N. TONIC मज्जातंतुपुष्टिकारक औषध *n*, मज्जातंतुपौष्टिक *n*, उत्तेजक औषध *n*, उद्दीपक औषध *n.*] २ *bodily strength, vigour* **(शरीराची) बळकटी *f*, बळकटपणा *m*, बळ *n*, ताकद *f*, शक्ति *f*, जोम *m*, जोर *m*, रग *f*, वीर्य *n*.** ३ *firmness of mind, fortitude, courage* (in exciting or dangerous circumstances) **हिय्या *f*, हिंमत *f*, छाती *f*, धारिष्ट *n*, धैर्य *n*, कुवत *f*, निधडेपणा *m*.** ४ (*bot.*) *one of the fibres or ribs in the leaves of plants* **(पानाची) शीर *f*, रेषा *f*, शिरा *f*.** ५ *a trade term for a non-porous quality of cork, slightly charred* **बिनछेदांचें बूच *n*.** ६ (in transferred use) *texture of wool* **लोंकरीची वीण *f*.** N. *v. t. to give strength or vigour to* **(-ला) बळ *n* -जोम *m* -जोर *m*. देणें-आणणें, (-ला) बळकट -जोरदार करणें, (-च्या ठिकाणीं) उत्साहशक्ति उत्पन्न करणें, शक्ति *f* -सामर्थ्य *n* -ताकद *f* -बळकटी *f*. आणणें** with *loc. of o.* २ *to embolden* **धीट करणें.** Nerva'tion *n. the arrangement or distribution of nerves, especially those of leaves* **(पानांच्या) शिरांची रचना *f* -व्यवस्था *f*, पर्णशिरारचना *f*.** Nerv'ed *pa. t.* & *pa. p.* Nerv'ed *a. furnished with nerves or with nerves of a special character* **मज्जातंतुयुक्त, (विशिष्ट) मज्जातंतु असलेला.** २ (*bot.*) *having parallel fibres or veins* **समान्तर शिरा -रेषा असलेला, समान्तररेषांकित.** Nerve'less *a. without strength, weak* **कमजोर, दुबळा, निर्बल, अशक्त, नबळा, नेभळा, नेभळट, कमकुवत, लेचापेचा, लटपटीत, पुळपुळीत.** २ (*bot.*) **बिनशिरांचा, शिराहीन.** Nerve'lessness *n. weakness* **(मानसिक) अशक्तता *f*, क्षीणपणा *m*, दुबळेपणा *m*, नेभळेपणा *m*, कमकुवतपणा *m*, कमजोर *m*, कमकुवत *f*, नबळेपणा *m*, पुळपुळीतपणा *m*.** Nerves *n. pl.* (*fig.*) *the source of main strength or vigour of something* **मज्जातंतु** (used figuratively),

बळकटीचें किंवा मजबुतीचें कारण *n*; as, "Good laws well administered are the N.s of the commonwealth." २ *hysterical nervousness* आंग कांपण्याचा झटका *m*, (उन्मादजन्य) कंपवात *m* -कंपरोग *m* -कांपरें *n*. Nerve'-shaken *a*. (मज्जातंतूंस) धक्का बसलेला, धास्ती घेतलेला. Nerv'ing *pr. p.* Nerv'ure *n. one of the nerves or veins in leaves* पानाची लहान शीर *f.*

*N. B.* मनुष्याच्या शरिरांत पुष्कळ मज्जातंतु आहेत. त्यांपैकीं ठळक ठळक असे आम्हीं पुढें दिले आहेत. आजपर्यंत शारीर शास्त्रावर झालेल्या मराठी ग्रंथांत ह्यांपैकीं फारच थोड्यांचीं मराठी नांवें सांपडतात. सांपडणारीं नांवें बहुतेक जशींच्या तशींच कायम ठेवून बाकीच्यांना मात्र नवे मराठी शब्द तयार केलेले आहेत. पुढील शब्द लिहितांना छापण्याच्या सोईसाठीं पुढें दिलेले संक्षेप आम्हीं योजिले आहेत :—म० = मज्जातंतु. शा० = मज्जातंतुशाखा. नित्यव्यवहारांत येणारे मज्जातंतु :— Articular संधिस्थ. (संधि=Joint or articulus.) Auditory N. कर्णेंद्रियाचा म०, श्रावक म०. Auriculo-temporal कर्णशंखीयशा०. (कर्ण = Auricle. शंख = Temple.) Cardiac N.s हृद्गामी म० हे हृद्गामी मज्जातंतु तीन आहेत. Cervical N.s (मानेंतील पृष्ठमण्यांपासून निघणारे) मानेचे म०, ग्रैवेयक म०. (ग्रीवा = Cervix or back of neck.) Cervico-facial (मानेंतील ग्रंथीमधून खालीं जाऊन खालच्या जाभाडाजवळ असणारी) ग्रीवातुंडीय (शा०). (तुंड = Face.) Cranial N.s (मस्तकांत उगम पावणारे) मस्तकाचे म०, शीर्षीय म०. Dentals दन्त्य. Facial N. मुखाचा म०, मुखगामी म०. Frontal (अक्षिकोशाच्या सर्व स्नायूंच्यावरती कपाळांत असणारी) कापालिक (शा०). (कपाल = Frons, frontis.) Lumbar N.s (कटिमण्यांतून निघणारे) कमरेचे म०, कटिस्थ म०. (कटि = Lumbus.) Motor oculi (नेत्रपिंडाच्या स्नायूंस गति देणारा) नेत्रचालक (म०). Olfactory N.s (गंध वाहणारे) घ्राणेंद्रियाचे म०, गंधवह म०. Ophthalmic N. (कपाळाच्या व नाकाच्या बाजूनें अक्षिकोशांत शिरणारा) चाक्षुष म०, नेत्र म०. Optic N. (दृगिंद्रियशक्तिदायक) चक्षुरिंद्रियाचा म०, दृग् म०, आलोचक म०. Sciatic great महा आसनास्थिग (शा०). (आसनास्थि = Ischium.) Sciatic small लघु आसनास्थिग (शा०). Tympanic मध्यकर्णिक. (मध्यकर्ण = Middle ear.) नित्यव्यवहारांत कमी येणारे मज्जातंतु :—Auricularis Magnus बृहत् कर्णगामी (म०). (बाह्य कर्ण, बाहेरचा कान = Auricle. बृहत्, मोठा = Magnus.) Chorda-tympani (मुखगामीमज्जातंतूची जिभेस पोंचणारी) लालोत्पादक (शा०). Circumflex (भुजाच्या मज्जातंतूंच्या जाळ्यामधील) भुजवेष्टनी (शा०). Coccygeal गुदास्थिग (म०), गुदास्थीचा. Communicans Noni (मानेच्या दुसऱ्या व तिसऱ्या मज्जातंतूंमधून निघणारा) ग्रैवेयकसंमेलक. (ग्रैवेयक adj. of ग्रीवा = Cervix or back of neck.) Compound N.s मिश्र म०, संयुक्त म०. Crural anterior (मांडीच्या पुढल्या व आंतल्या बाजूंच्या त्वचेंत व स्नायूंत पसरणारी) प्रागूरुत्वक्स्थ (शा०). (ऊरु = Cruris or leg.

प्राक् or ह्मागचा = Anterior.) Cutaneous N.s त्वकूस्थ म०. त्वक्स्थमज्जातंतु दंडांत व मांडींत असतात. त्यांना 'आंतली दंडत्वक्स्थशाखा', 'बाहेरील दंडत्वक्स्थशाखा,' 'आंतली ऊरुत्वक्स्थशाखा', अशीं निरनिराळीं नांवें आहेत. Digastric (पोटांतील मध्यकंडरास्नायूस पोंचणारी) मध्यकंडरास्नायुगामी (शा०). (मध्यकंडरास्नायु = Digastric muscle.) Dorsal N.s (पाठींतील पृष्ठमण्यापासून निघणारें) पाठीचे म०, पृष्ठीय म०. Gastric जाठर. (जठर = Gastron.) Genito-crural (वृषणांत व मांडींत उतरणारा) उपस्थोरुग. (उपस्थ = Genitals. ऊरु=Cruris.) Glosso-pharyngeal (जिव्हा आणि गळा (pharynx) ह्यांस पोंचणारा) जिव्हागलगामी (म०), सप्तपथरसज्ञ (म०). (गल or सप्तपथ = Pharynx.) Gluteal नितंबीय. (नितंब = Gloutos.) Gustatory N. (हन्वस्थींतून निघून तोंड, जिव्हा किंवा रसना यांस पोंचणारा) रसज्ञ म०. Hypoglossal N. (जिव्हेस गति देणारा) बृहज्जिव्हाचालक म०, अधिजिव्हाचालक म०. Infra orbital (अक्षिकोशाचा खालचा कांठ व तोंड यांच्यामध्यें वळून तेथील दोनतीन स्नायूंस पोंचणारी) अधोक्षिकोशीय (शा०). (अक्षिकोश = Orbit of the eye.) Inter-costal N.s (फांसळ्यांच्या मधील) पार्श्वकाभ्यंतर म०. (पार्श्वक = Rib or costa.) Laryngeal recurrent आवर्तक कंठनाडीस्थ (गतितंतु). (आवर्तक = Recurrent. कंठनाडी = Larynx.) Laryngeal superior ऊर्ध्व कंठनाडीस्थ (ज्ञानतंतु). Masseteric अधोदंतास्थिग. Maxillary superior (वरच्या दांतांच्या मुळांत शिरणारी) ऊर्ध्वदंतास्थिग (शा०). (ऊर्ध्वदंतास्थि = Superior maxillary bone.) Maxillary inferior (कानाचा बाहेरील भाग, मुखाचा खालचा भाग, खालचा ओंठ, व चर्वणसंबंधीं स्नायू ह्यांस पोंचणारी) कपोलगामी (शा०), हन्वस्थिग. Median दंडाच्या व प्रकोष्ठाच्या मध्यरेषेनें जाणारा) मध्यगत (म०), माध्यमिक (म०). Motor N. गतिवाहक म०. Musculo-spiral N. (भुजांच्या स्नायूंतून जाणारा) भुजग म०; (भुज= Brachium.) Nasal (अक्षिकोशाच्या आंतल्या भिंतीपासून निघून मस्तकांत शिरून नाकांत उतरणारी) नासागामी (शा०). Obturator ऊरुवंक्षणसंधिस्थ. (ऊरु = Thigh. वंक्षण = Hip. संधि = Joint.) Occipitalis शिरःपृष्ठकपालगामी. (शिरःपृष्ठ = Occiput. कपाल = Forehead.) Palmar करतलस्थ (म०). करतल = Palm.) Patheticus (डोळ्यांतील वरच्या स्नायूंस पोंचणारा) नेत्रोर्ध्वस्नायुगामी (म०). Petrosals (चाक्षुष) मेकलकंद-मेकलमंडल (शा०). (मेकलकंद or मेकलमंडल= Meckel's ganglion.) Pharyngeal साप्तपथी (म०). (सप्तपथ=Pharynx.) Phrenic (मध्यपटलांत जाणारे) मध्यपटलीय (म०). (मध्यपटल = Diaphragm.) Pneumogastric (क्लोमांतून किंवा फुप्फुसांतून पोटाच्या वरच्या भागापर्यंत जाणारा) क्लोमजठरगामी. (क्लोम = Lung or pneumon. जठर = Gastron.) Popliteal internal अन्तर्जानुग (शा०). Popliteal external बहिर्जानुग (शा०). Pudic औपस्थ. (उपस्थ = Genital organ.) Radial (प्रकोष्ठाच्या बाहेरील कांठावरून जाणारी) प्राकोष्ठीय (शा० किंवा म०). (प्रकोष्ठ = Radius.) Sacrals

(त्रिकास्थीच्या छिद्रांतून निघून नितम्बप्रदेशांतील स्नायूंस पोंचणारे) त्रैक म०. (त्रैक adj. of त्रिक = Sacral bone.) Saphenous long (मांडीच्या आंतील आंगानें गुडघ्यापर्यंत जाऊन पोटरींतून उतरून आंतील घोंव्यावरून आंगठ्याच्या टोंकापर्यंत जाणारी) अंगुष्ठदीर्घ (शा०). Sensory N. ज्ञानवाहक म०. Spinal accessory (कण्याच्या रज्जूपासून आलेला) साहायक पृष्ठवंशीय म०. Spinal N.s (पृष्ठवंशरज्जूपासून निघणारे) कण्याचे म०, पृष्ठवंशीय म०. (पृष्ठवंश = Spinal cord.) Splanchnic वृक्कोर्ध्वपेशीगामी (शा०). (वृक्क = Kidney. वृक्कोर्ध्व = Supra-renal.) Supra orbital ऊर्ध्वौष्ठग (शा०). Supra trochlear लालाटिक. Sympathetic N.s (सुमारें एकुणतीस मज्जातंतुमंडलांनीं झालेले व मज्जातंतुमय असलेले) आनुकंपिक म०, सहानुभूतिक म० (?) (अनुकंपा = Sympathy.) Thoracic N. करपत्रस्नायुग (शा०). (करपत्रस्नायु = Serratus magnus muscle.) Tibials posterior (पोटरीच्या मागील बाजूकडून खालीं उतरून आंतील घोंव्याच्या खालच्या कांठापर्यंत जाणारी) प्रत्यग्जंघास्थिग (शा०). (अंतर्जंघास्थि = Tibia. जंघा म्हणजे गुडघा व घोंटा यांमधील भाग.) Tibials anterior प्राग्जंघास्थिग (शा०). Trigeminus *or* Trifacial त्रिमुखगामी (म०). हा डोकें आणि मुख ह्या भागांचा सामान्य ज्ञानवाहक, रसज्ञानासंबंधीं विशेष ज्ञानवाहक, व चर्वणस्नायूंचा चालक मज्जातंतु होय. (मुखगामी = Facial.) Ulnar (प्रकोष्ठाच्या आंतील कांठाकडून जाणारी) अन्तःप्रकोष्ठीय (शा०), आरत्निक. (अरत्नि = Ulna. Sk. अरत्नि and L. Ulna may be philologically the same.) Vaso-motor N.s धमनीचालक म०. (धमनी = Artery.)

Nervine (nerv'in) [See Nerve.] *a. acting on the nerves* मज्जातंतूंची शक्ति वाढविणारा, मज्जातंतूचा दुबळेपणा घालविणारा, उत्तेजक, उद्दीपक (औषध). २ *quieting nervous excitement* मज्जातंतूंचा क्षोभ शमविणारा, मज्जातंतुक्षोभशामक. [N. TONIC मज्जातंतुपुष्टिकारक औषध *n*, मज्जातंतुपौष्टिक *n*. The expression Nervine tonic is usually found in the advertisements of proprietary medicines. The medical profession does not use it. Nerve tonic is the expression used by the profession in this sense.] N. *n. medicine that soothes nervous excitement* मज्जातंतूंचा क्षोभ शमविणारें औषध *n*, मज्जातंतुक्षोभशामक *n*.

Nervose (ner-vōs') [See Nerve.] *a.* (*bot.*) समांतर शिरा *f. pl.* -रेषा *f. pl.* असलेला, समांतररेषांकित.

Nerv'ous (nerv'us) *a. pertaining to or seated in the nerves* मज्जातंतूंचा, मज्जातंतूंसंबंधीं, मज्जातंतुगत. [N. DEBILITY मज्जातंतूंचा नबळेपणा *m* -दुबळेपणा *m*, मज्जातंतूंची शिथिलता *f* -क्षीणता *f*. N. DEPRESSION मज्जातंतूंच्या क्षीणतेमुळें आलेला उदासीनपणा *m*, मज्जाविकारामुळें आलेली ग्लानि *f*. N. DISORDER मज्जातंतुविकार *m*, मज्जातंतुगत विकृति *f*. N. EXHAUSTION मज्जातंतूंचा थकवा *m*. NERVOUS FORCE, *physical or muscular strength*

(शरीराची) स्नायुजन्य शक्ति *f*. २ *strength of mind* मानसिक शक्ति *f*, मनाचा जोम *m*, मनोबल *n*. N. HEADACHE मज्जातंतुक्षोभामुळें होणारा मस्तकशूल *m*. N. SYSTEM मज्जातंतूंची मांडणी *f* -व्यवस्था *f*, यावद्मज्जातंतुप्रदेश *m*, मज्जातंतुरचना *f*. N. TEMPERAMENT भित्रा स्वभाव *m*. (b) (*med.*) वातप्रकृति *f*.] २ *having nerve, sinewy, vigorous* **जोमदार, जोरदार, बळकट, सशक्त, ताकतवान्, मजबूत.** ३ *characterised by strength in sentiment or style, forcible, spirited* **जोरदार, जोमदार, जोराचा, उत्साही, उत्साहपूर्ण;** as, "A N. writer." ४ *having the nerves easily excited or weak* **कोंवळया मनाचा -हृदयाचा, लौकर घाबरगुंडी उडणारा, भित्रा.** [ To BE N. घाबरगुंडी उडणें *in. con. g. of s.*] ५ *characterised by a disordered state of the nerves* **मज्जातंतूंचा विकार झालेला, मज्जातंतूंची बिघाड झालेला.** Note the double sense of 'strength' and 'weakness' in which the words Nervous, Nervously, and Nervousness are used. Nerv'ously *adv.* **जोरदार भाषेंत, जोमानें, जोरानें, उत्साहानें, उत्साहपूर्वक. २ भित्रेपणानें, बावळटपणानें, घाबरून.** Nerv'ousness *n.* **शरिराची बळकटी** *f*, **जोम** *m*, **जोर** *m*, **जोष** *m*. २ *fortitude, courage* **धैर्य** *n*, **धारिष्ट** *n*, **छाती** *f*. ३ **शीघ्रक्षोभनशीलता** *f*. ४ **मज्जातंतुविकार** *m*, **मज्जातंतुरोग** *m*. Nerv'y *a. strong, sinewy* **जोरदार, बळकट, जोमदार, सशक्त;** as, "His *nervy* knees."

Nervure, See under Nerve.

Nescience (nesh'ens) [L. *nescientia*, -*nescire*, to be ignorant -*ne*, not, and *scire*, to know.] *n. want of knowledge* **अज्ञान** *n*, **ज्ञानाभाव** *m*, **नेणतेपणा** *m*, **अजाणपणा** *m*, **अविद्या** *f*; as, "God fetched it about for me, in that absence and *nescience* of mine." Nesc'ient *a.* **नेणता, अजाण, अज्ञान, मूढ.** N. *n. an agnostic* **अज्ञेयवादी** *m*.

Ness (nes) [A. S. *næs*, promontory.] *n. promontory or headland* **भूशिर** *n*.

Nest (nest) [A. S. *nest*, Ger. *nest*, akin to L. *nidus*, Sk. **नीड**, a nest.] *n. a structure* (of grass, moss, mud, &c.) *made by a bird for the laying and hatching of its eggs* **घरटें** *n*, **घरटा** *m*, **खोपा** *m*, **माळा** *m*, **घरकुंडा** *m*, **कोटें** *n*, **नीड** (Sk.) *n*. [CROW'S NEST *n. a sailor's look-out station at, or near, the mast-head* (समुद्रांत पुढचा रस्ता पाहण्याकरितां बसण्याचें डोलकाठीच्या शेंड्याजवळचें) खलाशाचें घरटें *n*.] २ *the place in which the eggs of animals or insects are laid and hatched* **(किड्यांचें किंवा दुसऱ्या प्राण्यांचें अंडीं घालण्याचें व तीं उबविण्याचें) घरटें** *n*, **माळा** *m*, **खुराडें** *n*, **ढोल** *f*. [N. EGG *n. an egg left in the nest to keep the hen from forsaking it* आमिषादाखल घरट्यांत ठेवलेलें अंडें *n*, घरराखण *f*. २ *something laid up as the beginning of an accumulation* (रक्कम जास्त जमण्याकरितां प्रथम काढलेली) सुरवातीची रक्कम *f*,

पहिली रक्कम *f.* ] ३ *a comfortable residence, a good situation* रमणीय स्थान *n*, सुखनिवास *m*. [TO FEATHER ONE'S N. *to provide for one's self, especially from other people's property of which one has had charge* आपलें घर *n* -तुंबडी *f.* भरणें, तळिराम गार करणें, उखळ पांढरें करणें. ] ४ (*fig.*) *a number of persons haunting one place for a bad purpose* (वाईट कामाकरितां एके ठिकाणीं जमणारे) पाजी लोक *m. pl.*, पाजीमंडळ *n*, चांडाळचौकडी *f.* (b) *the place itself* (चोर, चहाड, वगैरे पाजी लोकांचा एकठिकाणीं जमण्याचा) अड्डा *m*. ५ *a number of baskets, boxes &c., each fitting inside the next larger* (एकांत एक राहाणाऱ्या टोपल्या, पेट्या वगैरेंचा) संच *m*, गंज *m*. N. *v. t. to form a nest for* (-च्या करतां) घरटें बांधणें, घरटें -माळा करणें -बनविणें. N. *v. i. to build and occupy a nest* घरटें करून राहाणें, माळा करून राहाणें; as, "The king of birds *nested* within his leaves."

Nestle (nes'l) [ A. S. *nestlian*, to make a nest. ] *v. i. to lie close or snug. as in a nest* (घरट्यांत एकमेकांना) चिकटून बसणें -राहाणें. २ *to draw close* (to a person) *snugly and affectionately* (-ला) प्रेमानें चिकटणें, मिठी मारणें; as, "A child *nestles.*" ३ *to settle comfortably* सुखानें राहणें, सुखेंकरून नांदणें, सुखानें वास करणें. ४ (of houses) *to lie snugly in a sheltered nook* निवाऱ्याच्या जागेंत असणें. N. *v. t. to cherish, as a bird does her young* पाळणें, पोसणें, वाढविणें, (-चें) पालन *n* -पोषण *n* -पालनपोषण करणें. Nes'tled *pa. t.* and *pa. p.* Nes'tling *pr. p* N. *n. a young bird in the nest* (अंड्यांतून नुकतेंच बाहेर पडलेलें) कोंवळें पिलूं *n*.

Nestor (nes'tor) [ A proper name. ] *n*. (होमरनें आपल्या 'इलियड' नांवाच्या महाकाव्यांत वर्णिलेला पोक्त व अनुभवशीर असा) 'नेस्टर' नांवाचा योद्धा *m*, नेस्टर *m*. २ (*fig.*) पोक्त व अनुभवशीर मनुष्य *m*, कपि (humorously) *m*, म्हातारा *m*. Cf. जांबुवंत described in the Ramayana. Nesto'rian *a.* 'नेस्टर' सारखा, म्हातारा, पोक्त, अनुभविक, अनुभववृद्ध. २ नेस्टोरियसच्या (खिस्ति नास्तिक) पंथाचा. N. *n*. (खिस्त हा ईश्वरपुत्र नाहीं असें मानणाऱ्या नास्तिक) नेस्टोरियसचा अनुयायी *m*.

Net (net) [ A. S. *nett*, a net. ] *n. an open fabric of twine knotted into meshes for catching birds, fishes, &c.* जाळें *n*, जाल *n*, पाश *m*. [ CASTING N. पाग *m*. LARGE FISHING N. डोळ *f*. LONG SEA-NET वावरीचें जाळें *n*. ] (b) (to carry or hold fruit) आंखी *f*, आंखा *m*, गांजवा *m*, झेला *m*, घळ *m*. २ *a meshed bag for holding a woman's hair* (केंस उडूं नये म्हणून बायकांचे डोक्यावर घालण्याचें) जाळें *n*. ३ *a machine-made lace of various kinds* जाळी *f*, दाल *f*. ४ *a snare* फांस *m*, पाश *m*, फांसा *m*, वागुरा *f*. ५ *a difficulty* अडचण *f*, पेंच *m*, पंचाईत *f*, गैरसोय *f*, पाश *m* (*fig.*),

फांस m, जाळें n (*fig.*). N. *v.t. to form into net-work* जाळें तयार करणें, जाळें विणणें. २ *to take with a net* जाळयांत -फांसांत पकडणें. (b) (*fig.*) युक्तीनें पकडणें. ३ *to protect with a net, to veil* (केंस बिघडूं -विखरूं नये म्हणून डोक्यावर) जाळें घालणें. N. *v. i. to form net-work* जाळें n -जाळी f. विणणें, जाळीदार काम करणें. Nett'ed *pa. t.* N. *pa. p. a.* जाळीचा, जाळीदार. २ *caught into a net* जाळयांत पकडलेला. ३ *protected with a net* जाळें घालून झांकलेले (बायकांचे केंस वगैरे). Net'-fishing *n.* मासे पागणें *n.* २ मासे पागण्याची जागा *f.* Nett'ing *pr. p. & v. n.* Nett'ing-needle *n.* जाळें विणण्याची सुई *f.* Net'-work *n.* जाळीदार काम *n*, जाळीचें काम *n.* २ (रेल्वे, कालवे वगैरेचें) जाळें *n*, जाल *n.*

Net, Nett (net) [A. S. *nett*, another form of Neat.] *a. clear of all charges or deductions* (opposed to *gross*) निवळ, निका, राहता, पक्का, ठाम, ठास. २ *lowest, subject to no further deduction* नक्की, शक्य तितका कमी, किमान पक्ष. N. *v. t. to produce as clear profit* निवळ नफा मिळवणें.

Nether (neth'ėr) [A. S. *neothera*, a comp. adjective due to adverb *nither*, downward.] *a. beneath another, lower* खालचा, खालला, तळचा, तळाचा, अधःस्थ. [THE N. EXTREMITIES अधःशाखा *f*, (कमरेपासून) पाय *pl.* N. GARMENTS आंतून घालण्याची विजार *f.* N. MILL-STONE तळी *f*, जात्याचें खालचें पेड *n.*] २ *infernal* अधःस्थ, पाताळांतला, नरकांतला, नरकाचा. [N. REGIONS पाताळ *n.*] Neth'er-land *n. Holland, so called because situated below the level of the sea* हालंड देश *m*, नेदरलंड देश, नेदरलंड *m.* Neth'er-lander *n.* हालंड देशाचा रहिवाशी *m*, नेदरलंडर *m*, डच *m.* Neth'erlandish *a.* नेदरलंडचा, नेदरलंडांतील, हालंडांतील. Neth'erlings *n. pl. stockings* पायमोजे *m. pl.* Neth'ermost *a.* (superlative) अगदीं खालचा, अगदीं तळाचा; as, "The N. hell." Neth'er stocks *n. pl.* (*Shakes.*) अर्धे पायमोजे *m. pl.* हे पोटऱ्यांपर्यंतच होतात. Neth'erward, Neth'erwards *adv. downward* खालीं.

Netherland,<br>Netherlings,<br>Nether stocks, } See under Nether.

Nettle (net'l) [A. S. *netele.*] *n.* (*bot.*) *a common plant covered with hairs which sting sharply* कुयली *f*, कुयलीचें झाड *n*, आग्या *m*, खाजकोलती *f*, पीतपर्णी *f*, खाजकुयली *f.* N. *v. t. to fret, as a nettle does the skin* खाजणें *in. con. with* नें *of s.*, खाज *f* -कंड *f.* सुटणें, वितवित सुटणें *all with in. con. with* ला *of o.* and नें *of s.* २ *to irritate* खिजवणें or खिजावणें, चिथवणें, चिरडीस -चिडीस आणणें -घालणें, इरेस पेटवणें, चेतवणें. Nett'led *pa. t. & pa. p.* Nett'le-rash *n.* (*med.*) *a kind of fever character-*

*ized by a rash or eruption on the skin* उदर्द (known to आयुर्वेद) *m*, शीतपित्त *n*, आंगावर पित्त उठणें *n*, पित्ताच्या गांधी *f. pl.*

Nettle-rash, See under Nettle.

Nettling (net'ling) [See Nettle.] *n. the joining of two ropes end to end, without seam* (सांधा न दिसेल अशा रीतीनें दोन दोऱ्या एकांत एक) बेमालूम गांठवणें *n* -जोडणें *n* -वळणें *n.* २ *the process of tying together the ends of yarns in pairs, to prevent tangling* (एकमेकांत गुंतूं नये म्हणून) सुतें एक टाकून एक गांठविण्याची रीत *f.*

Neural (nū'ral) [Gr. *neuron*, nerve.] *a. pertaining to, relating to, connected with, or occurring in, the nerves* मज्जातंतूचा, मज्जातंतुविषयक, मज्जातंतुगत. २ (especially) *pertaining to the cerebro-spinal or central nervous system of vertebrates* (मस्तिष्क आणि पृष्ठरज्जु यांमधील) मज्जारज्जुसंबंधीं. [N. ARCH मज्जाधार कमान *f.* N. CANAL मज्जाधारनलिका *f.* N. CAVITY मज्जाधारपुट *n.* N. SPINE मज्जाधारवंश OR मज्जावंश *m.* N. TUBE मज्जाधार नाडी *f.* IN THESE FIVE EXPRESSIONS मज्जाधार = मज्जा + आधार.] ३ *situated on or inclining to that side of the body in which the central nervous axis lies* मज्जारज्जूवर असलेला, मज्जारज्जुवर्ती, मज्जारज्जूकडे वळलेला, मज्जारज्जून्मुख. ४ *involving or affecting the nerve tissues or the nervous system* मज्जातंतूला होणारा, मज्जातंतुगत. Neu'ric *a.* मज्जातंतूचा, मज्जातंतुगत, मज्जातंतुविषयक. Neuric'ity *n. nerve-force* मज्जातंतूंची शक्ति *f.* Neuril'ity *n. the function of the nervous system—that of conducting stimuli* (मज्जातंतूचें) ज्ञानवाहक कार्य *n*, ज्ञानवाहकता *f*, ज्ञानवाहित्व *n.*

Neuralgia (nū-ral'ji-a) [Gr. *neuron*, nerve, & *algos*, pain.] *n.* मज्जातंतुव्यथा *f*, मज्जातंतूंतील वेदना *f*, मज्जातंतुवेदना *f.* ही वेदना आंखांच्या मज्जातंतूंना होते. Neural'gic *a.* मज्जातंतुवेदनेचा, मज्जातंतुवेदनाविशिष्ट.

Neurasthenia (nū-ras-the-ni'a) [Gr. *neuron*, nerve, & *astheneia*, weakness.] *n. functional nervous weakness* मज्जातंतुकार्यक्षीणता *f*, मज्जातंतूंची क्रिया क्षीण होणें *n*, मज्जातंतुक्रियादौर्बल्य *n*, मज्जातंतुक्षीणता *f.* Neurasthen'ic *a.* मज्जातंतुक्षीणतेचा -संबंधीं, मज्जातंतुक्षीणतामूलक. N. *n.* मज्जातंतूची कार्यक्षीणता झालेला मनुष्य *m.* Neurasthen'ics *n. pl. that branch of medical science which investigates nervous diseases, their cause and cure* मज्जातंतूंचे निरनिराळे विकार, त्यांचीं कारणें व त्यांचे उपचार ह्यांविषयींची विद्या *f*, मज्जातंतुरोगविद्या *f.*

Neuration (nū-rā'shun) [Gr. *neuron*, nerve.] *n.* (पानांच्या किंवा किड्यांच्या पंखांच्या) शिरांची रचना-मांडणी *f* -व्यवस्था *f.*

Neurilemma (nū-ri-lem'mä) [Gr. *neuron*, nerve, and *lemma*, peel, skin.] *n.* (*anat.*) *the external*

*sheath of a nerve-fibre* मज्जातंतुशाखेवरील कवच *n*, मज्जाकवच *n* ( newly coined ).

Neurin ( nū'-rin ) [ Gr. *neuron*, nerve. ] *n. albuminous matter composing nerves* मज्जातंतु ज्यापासून होतात ती 'आल्ब्युमेन' मय धातु *f*, मज्जाजनक (धातु).

Neuritis ( nū-rī'tis ) [ Gr. *neuron*, nerve, and *-itis*, inflammation. ] *n. inflammation of a nerve* मज्जातंतुदाह *m*.

Neurography ( nū-rog'ra-fi ) [ Gr. *neuron*, nerve, and *graphein*, to write. ] *n. a scientific description of the nerves* मज्जातंतुवर्णन *n*.

Neurokeratin ( nūrō-ker'a-tin ) [ Gr. *neuron*, nerve, & E. Keratin. ] *n.* मज्जाजनक धातूंत असणारें शार्ङ्ग धातूसारखें द्रव्य *n*, मज्जाशार्ङ्ग *n* ( newly coined ). ( शार्ङ्ग is *adj*. of शृंग. ) See Keratin.

Neurology ( nū-rol'o-ji ) [ Gr. *neuron*, nerve, and *logos*, science. ] *n. the science of the nerves* मज्जातंतुविज्ञान *n*. ह्या विज्ञानांत मज्जातंतूंची रचना, त्यांच्या क्रिया, व विकार ह्यांचा विचार केलेला असतो. ( b ) मज्जातंतुवर्णन *n*. Neurolog'ical *a*. मज्जातंतुविज्ञानाचा -संबंधीं -विषयक. ( b ) मज्जातंतुवर्णनाचा. Neurolo'gist *n*. मज्जातंतुविज्ञानपटु *m*.

Neuroma ( nū-rō'-ma ) [ Gr. *neuron*, nerve, and suffix *-oma*, tumor. ] *n. a nerve-tumor* मज्जातंतूंच्या आच्छादनांत होणारा तंतुमय ( fibrous ) ग्रंथि *m*, मज्जातंतुग्रंथि *m*, मज्जाग्रंथि *m*.

Neuron ( nū'ron ) [ Gr. *neuron*, nerve. ] *n. the cerebro-spinal axis in its entirety* मज्जाव्यूह *m*, मस्तिष्क आणि पृष्ठरज्जु ह्यांचा समूह *m*, शिरःपृष्ठमज्जाव्यूह *m*. २ *a process of a nerve-cell* मज्जागोलकाची नवी फूट *f*, मज्जागोलकप्ररोह *m*, मज्जाप्ररोह *m*. ३ *a nerve-cell with its appendages* सानुबन्धमज्जागोलक *m*.

Neuropath ( nū'rō-path ) [ Gr. *neuron*, nerve, and *pathos*, suffering. ] *n. one who takes nervous conditions solely or mostly into account in his pathology* मज्जातंतुनिदानवादी *m*, मज्जातंतूंच्या विकारावरून सर्व रोगाचें निदान करणारा. Neuropath'ical *a*. मज्जातंतुरोगाचा, मज्जातंतुरोगमूलक. २ मज्जातंतुरोगासारखा. ३ मज्जातंतुरोग झालेला. Neurop'athy *n. nervous disease generally* मज्जातंतुरोग *m*. Neuropathol'ogy *n. the pathology of the nervous system* मज्जातंतुरोगनिदानशास्त्र *n*, मज्जारोगनिदानशास्त्र *n*. २ *the view that diseases originate from the disturbances of the nervous system* शरीरांतील सर्व रोग मज्जातंतूंच्याच विकारांमुळें होतात असें मत *n*, मज्जाविकारमूलकनिदान *n*, मज्जानिदानवाद. ३ *the study of nervous diseases and their treatment* मज्जातंतूंच्या रोगांच्या निदानाचा व चिकित्सेचा अभ्यास *m*, मज्जातंतुरोगविद्या *f*.

Neuroptera ( nū-rop'-te-ra ) [ Gr. *neuron*, a nerve,

and *pteron*, a wing. ] *n. zool.* किड्यांचा शिरालपक्ष नांवाचा वर्ग *m*, शिरालपक्ष *m*. ह्या वर्गांतील किड्यांस पूर्णावस्थेंत चार पंख असतात. ते अंमळसे रुंद असून त्यांवर शिरा असतात. ह्यावरूनच ह्या वर्गांतील किड्यांस शिरालपक्ष हें नांव दिलेलें आहे. ह्या वर्गांत वाळवी (White-ant ), सापमाशी ( Dragon-fly ), चोरकिडा ( Ant-lion ), शेंबडी ( May-fly ) वगैरे किडे येतात.

Neurose (nū'rōs) [Gr. *neuron*, nerve.] *a. nerved* मज्जातंतुयुक्त.

Neurosis (nū-rō'sis) [Gr. *neuron*, nerve. ] *n.* (*med.*) *a functional nervous affection or disease* मज्जातंतूची क्रिया बिघडणें *n*, मज्जातंतुक्रियालोप *m*. २ (less correctly ) *a nervous spasm resulting from exhaustion* मज्जातंतूंच्या क्षीणतेमुळें येणारे पेटके *m. pl.* Neuro'ses *n. pl.*

Neurotic (nū-rot'ik) [Gr. *neuron*, nerve.] *a. relating to or seated in the nerves* मज्जातंतूसंबंधीं, मज्जातंतुगत, मज्जातंतुस्थ. २ *useful in disorders of, or affecting, the nerves* मज्जातंतुविकारावर उपयोगी, •जातंतुविकारावरचा, मज्जारोगहारक. ३ *of the nature of nervous disorder* मज्जातंतुविकारासारखा. ४ *characterized by nervous disorder* मज्जातंतुविकार झालेला. ५ (of persons) *having disordered nerves* विकृत किंवा बिघडलेले मज्जातंतु असलेला. ६ लौकर चिडणारा, लौकर चिरडीस जाणारा, चिडखोर, शीघ्रकोपी. N. *n. a disease of the nerves* मज्जातंतुविकार *m*. २ *a medicine useful for diseases of the nerves* मज्जातंतु-रोगांवरील औषध *n*, मज्जातंतुरोगघ्न (औषध) *n*, उद्दीपक *n*. Neurot'ics *n. pl.* ( मज्जातंतूंच्या विकारामुळें बोलण्याचालण्यांत किंवा लिहिण्यांत दिसणारा ) मज्जा-तंतुरोगजन्य विक्षिप्तपणा *m*.

Neurotomy (nū-rot'om-i ) [ Gr. *neuron*, nerve, & *tome*, cutting –*temnein*, to cut. ] *n. the cutting or dissection of a nerve* मज्जातंतुच्छेदन *n*, मज्जातंतु-च्छेद *m*. Neurotomi'cal *a*.

Neurotonic (nū-ro-ton'ik) [Gr. *neuron*, nerve, & E. Tonic. ] *n. a medicine intended to strengthen the nervous system* मज्जातंतूंना पुष्टि देणारें औषध *n*, मज्जातंतुपौष्टिक *n*.

Neuter (nū'tėr ) [ L. *ne*, not, and *uter*, either. ] *a.* नपुंसक. २ (*gram.*) *neither masculine nor feminine* नपुंसकलिंगी. (b) *neither active nor passive* अकर्मक (क्रियापद). ३ (*bot.*) *without stamens or pistils* स्त्रीपुंकेसरविहीन, लिंगहीन, नपुंसक. ४ (*zool.*) *without sex* लिंगहीन, नपुंसक. N. *n. a person of neither sex, an impotent person* नपुंसक *n*, हिजडें *n*, षंढ *m*, फूलमेंगा. [ A N. DRESSING AS A FEMALE सौरी *f*. ] २ (*bot.*) नपुंसक वनस्पति *f*.

Neutral ( nū'tral ) [ L. *neutralis* –*neuter*, neither.] *a. being neuter, indifferent, taking no part on either side* उदासीन, तिऱ्हाईत, दोहों पक्षांबाहेरचा

-निराळा -वेगळा, उभयसाधारण, उभयपक्षीं समान, तटस्थवृत्तीचा, तटस्थ, अलग. [ N. STATE तटस्थ राष्ट्र *n.*] २ *neither very good, nor very bad, of no decided character* 'नरो वा कुंजरो वा' अशा मताचा, धड चांगलाही नाहीं व धड वाईटही नाहीं असा, द्वैधीभावाचा, डळमळीत, साधारण, सामान्य, मध्यमप्रतीचा, अर्धवट. ३ (*chem.*) *neither acid nor alkali* उदासीन, निर्वीर्य, आम्ल किंवा आल्कली ह्यांचे गुण नसलेला, आंबटपणा किंवा दाहकपणा नसलेला. [ N. LINE उदासीन रेषा *f.* N. SALT उदासीन लवण *n.* ] ४ (*biol.*) नपुंसक. N. *n. a person or nation that takes no part in a contest* तटस्थ मनुष्य *m*, तटस्थ राष्ट्र *n*, उदासीन मनुष्य *m*, उदासीन राष्ट्र *n.* Neutralisa'tion *n.* ( a ) वीर्यभंग *m*, वीर्यनाश *m.* (b) (*chem.*) उदासीनीकरण *n*, (आम्ल किंवा आल्कली ह्यांचा आंबटपणा किंवा दाहकपणा नाहींसा करून त्यांना ) उदासीन करणें *n*, उदासीनीभवन *n.* (c) विशेषधर्मलोप करणें *n*, (-चा ) परिणाम नाहींसा करणें *n*, (-चा ) जोर नाहींसा करणें *n.* (d) ( पाण्याचें वगैरे ) मारण *n.* Neu'tralise *v. t. to declare by convention any nation permanently neutral* तटस्थवृत्ति जाहीर करणें. २ *to render of no effect* मारणें, निर्बल करणें, उदासीन करणें, (-चा) परिणाम नाहींसा करणें, (-चा) जोर नाहींसा करणें, वीर्यशून्य करणें, (-चा) विशेषधर्म नाहींसा करणें, निरुपयोगी करणें. ३ *to counteract, to oppose* ( तोडीस तोड देऊन -तोलास तोल देऊन ) फिका पाडणें -करणें, हीणकस करणें, लोपवून टाकणें; as, "To N. parties in government." Neu'tralised *pa. t.* and *pa. p.* Neu'tralising *pr. p.* मारणारा, उदासीनकारी, निर्बल करणारा, (-चा ) जोर नाहींसा करणारा, (-ला ) वीर्यशून्य करणारा. २ फिका पाडणारा, लोपवून टाकणारा, निस्तेज करणारा. Neutral'ity *n.* तटस्थवृत्ति *f*, उदासीनता *f*, ताटस्थ्य *n.* [ ARMED N. *the condition of a neutral power ready to repel aggression from either belligerent* (एकमेकांशीं लढत असलेल्या दोन राष्ट्रांपैकीं एखाद्यानें आपणांवर हल्ला केला असतां त्याचा प्रतिकार करण्याची तयारी करून ठेऊन नंतर स्वीकारलेली) सशस्त्र तटस्थवृत्ति *f.* ]

Neutralisation, Neutrality, See under Neutral.

Never ( nev'ėr ) [ A. *S. næfre –ne*, not, and *æfre*, ever. ] *adv. not ever, at no time* कधीं नाहीं, केव्हां नाहीं, कदापि नाहीं, कधीं न, कदापि न. २ *in no degree* थोडें सुद्धां नाहीं. ३ ( *emphatically* ) कालत्रयीं नाहीं, कल्पांतरीं नाहीं, कल्पांतींही नाहीं, काळांतरीं नाहीं, तिन्हीं काळीं नाहीं. [N. BEFORE पूर्वीं कधीं नाहीं, कधीं नव्हत. N. so कसाही, कितीही.] Nev'er-more *adv. at no future time* पुढें केव्हांही- कधींही नाहीं. Never-the-less' *conj. notwithstanding, in spite of* तरी, तथापि, तत्रापि, परंतु, पर.

New ( nū ) [ A. S. *niwe, neowe*, –Ger. *neu* ; L. *novus* ; Gr. *neos* ; Sk. नव, new.] *a. lately made or come into being, fresh, recent* नवा, नवीन, नूतन, ताजा.

नव, नव्य, नवसर, नवथरचा, अभिनव, नवोत्पन्न, साजूक. [ Some idiomatic Marathi phrases to express the idea of *new*, very intensively, are करकरीत, कोरा करकरीत, नवा करकरीत, कोरा, ताजा करकरीत, घणकोरा, घणाखालचा, ताजानवा, नव्या ताण्याचा, नवघड, लोणकढा, &c. N. AGE *n.* नवें युग *n*, नवें मन्वंतर *n*, नवा मनु *m*, नवयुग *n*. N. BIRTH *n.* नवा जन्म *m*. N. born *a.* नवीन जन्मास आलेला, नुक्ताच जन्मलेला, सद्योजात, नवजात. N. COME *a.* नुकताच -नवीन आलेला. N. COMER *n.* नवा आलेला *m*, नवागत *m*, नवीन *m*. N. FASHIONED *a.* नवीन पद्धतीचा, नव्या तऱ्हेचा. N. LAND *n.* नवीन लागवडीस आणलेली जमीन *f*, नवकीर्द (जमीन). N. LEARNING *n.* (इंग्लंडांतील सोळाव्या शतकांतील) विद्येचें पुनरुज्जीवन *n*. N. WOMAN आधुनिक स्त्री *f*. पुरुषांचे उद्योगधंदे आपणही करावे, पुरुषांना जे राजकीय व इतर हक्क आहेत तेही आपणांला असावे हीं विलायतेंतील आधुनिक स्त्रियांचीं मतें आहेत. N. WORLD नवें जग *n*, उत्तर आणि दक्षिण अमेरिका *f*, अमेरिका खंड *n*. N. YEAR'S DAY नूतनवर्षारंभाचा दिवस *m*, वर्षप्रतिपदा *f*, संवत्सरप्रतिपदा *f*, पाडवा *m*. POLE ERECTED BEFORE THE DOOR ON THE (HINDU) N. YEAR'S DAY गुडी *f*, गुढी *f*, ध्वज *m*. THE ERECTION OF IT गुडी उभारणें *n*, ध्वजारोपण *n*. ] २ *novel, not being before* नवा, नवखा, अपूर्व, अभूतपूर्व, नवीन शोधून काढलेला. ३ *not ancient* नवा, नूतन, अलीकडचा, अर्वाचीन, आधुनिक. ४ *different from the former* नवा, दुसरा, अन्य, परका, पारखा. ५ *not habituated, not practised* नवा, नौखा *or* नवखा, नौशिका, कोरा, अजाण, अनभ्यस्त, अपरिचित, गैरमाहीत. ६ *unused, unapplied* कोरा, नवा, अनसूट, अनुपभुक्त, अप्रयुक्त, न वापरलेला, बिनवापरलेला -वहिवाटलेला, हातकोरा. ७ *not familiar to* नवा, अनोळखी, अनोळखीचा, गैरराबत्याचा, अपरिचयाचा, अनभ्यस्त, अपरिचित. New'ish *a.* नवट, कांहींसा नवा, थोडासा नवा, नवसर. New'ly *adv.* नवा *decl.*, नुक्ता *decl.*, निक्ता *decl.*, नवसर, नव्यानें. New'ness *n.* नवीनपणा *m*, नवेपणा *m*, नावीन्य *n*, ताजेपणा *m*, साजुकपणा *m*, नवीनता *f*. २ नवखेपणा *m*, अपूर्वता *f*, अपरिचय *m*.

Newel (nū'el) [O. F. *nual* –Low L. *nucalis* –*nux*, a nut.] *n. the upright, central, self-supporting post of a circular, winding staircase* (वाटोळया जिन्याचा उभा) आधारखांब *m*.

Newfangled (nū-fang'gld) [Corr. from M. E. *newefangel* –*new*, and the root of Fang, thus meaning 'ready to seize.'] *a. fond of new things* सदा नव्या गोष्टींचा हौशी, नव्या नव्या गोष्टींचा षोकी; as, "N. teachers." २ (in a depreciatory sense) *newly devised* नवीनच ठरविलेला, नवा योजलेला, ताजा योजलेला, ताजा, कालचा; as, "N. nomenclature." Newfang'ledness नव्या नव्या गोष्टींचा षोक *m* -हौस *f*, फाजील नवीनासक्ति *f*. २ नवीनपणा *m*.

Newfoundland (nū'-found-land) [Island of this name on the coast of North America.] *n.* उत्तर

अमेरिकेच्या किनाऱ्यावरील 'न्यूफाउंडलंड' नांवाचें बेट *n.* २ 'न्यूफाउंडलंड' बेटांतील कुत्रा *m*, न्यूफाउंडलंड *m.*

Newgate (nū'gāt) *n.* लंडन शहरांतील 'न्यूगेट' नांवाचा प्रसिद्ध तुरुंग *m*, न्यूगेट *m.* [ N. CALENDAR 'न्यूगेट' तुरुंगांतील कैद्यांची प्रत्येकाच्या गुन्ह्यासह दिलेली यादी *f.* ]

News (nūz) [ Late M. E. *news*, new things, a translation of Fr. *nouvelles*, news. ] *n. information of something before unknown* (नवीन) बातमी *f*, खबर *f*, समाचार *m*, वर्तमान *n*, वार्ता *f*, वृत्तांत *m*, वृत्त *n*, पेठ *f.* [ N. AND TIDINGS खबरवार्ता *f*, खबरबात *f.* ANY N.? कांहीं नवलविशेष? कांहीं नवी बातमी? BAD N. दुष्टवार्ता *f*, अशुभवार्ता *f*, कुवार्ता *f*, अनिष्टवार्ता *f.* GOOD N. शुभवार्ता *f*, शुभवृत्तांत *m*, सुवार्ता *f.* २ *The New Testament* नवा करार *m*, शुभवर्तमान *n.* SPORTING N. खेळांसंबंधीं बातमी *f.* ] २ *recent account* नवीन -नवी -ताजी बातमी *f* -हकीकत *f.* N. *v. t. to report* बातमी देणें, खबर देणें. News'-agent *n.* वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें विकणारा *m.* News'-boy, News'-man *n.* वर्तमानपत्रें विकणारा *m* -वांटणारा *m.* News'house *n.* फक्त वर्तमानपत्रें छापण्याचा कारखाना *m*, वर्तमानघर *n*, अखबारघर *n.* News'-letter *n.* ( रीतसर वर्तमानपत्रें सुरू होण्यापूर्वीचें ) मधून मधून बातमी देणारें वर्तमानपत्र *n.* २ ( वर्तमानपत्रांतील ) बातमीपत्र *n.* News'-monger *n. a dealer in news* वर्तमानपत्रें -वृत्तपत्रें विकणारा *m.* २ *one who spends much time in hearing and telling news* गप्पा मारणारा, गप्पी, गप्पीदास *m.* News'paper वर्तमानपत्र *n*, वृत्तपत्र *n.* News'-room *n.* वर्तमानपत्रें वाचण्याची जागा *f*, वृत्तवाचनालय *n.* News'-vender *n. a seller of news-papers* वर्तमानपत्रें विकणारा *m.* News'-writer *n. a reporter or writer of news* वर्तमानपत्रांचा बातमीदार *m.*

Newtonian (nū-tō'ni-an) *a. of or pertaining to Sir Isac Newton, or his discoveries* न्यूटननामक शोधकाचा, न्यूटनचा, न्यूटननें केलेल्या शोधांचा -संबंधीं. २ न्यूटननें शोधून काढलेला; as, "N. telescope."

New zealand (nū-zē'land) *n. a group of islands in the South Pacific Ocean* दक्षिण पासिफिक महासागरांतील 'न्यूझीलंड' नांवाचा द्वीपसमूह *m*, न्यूझीलंड *m.*

Next (nekst) [ AS. *neaht*, superl. of *neh*, near. ] *a.* (स्थळानें किंवा वेळानें) अगदीं जवळचा, शेजारचा, लगतचा, पासचा, पासला ( as in घरापासला ), बाजूचा, मागचा, मागला, पाठीमागचा, पाठचा, पाठीवरचा, पुढचा, पुढला, येता. [ N. TIME दुसऱ्या वेळेस, दुसऱ्या खेपेस, पुढील खेपेस. N. OF KIN जवळचा आप्त, जवळचा नातलग. N. TO NOTHING *almost nothing at all* बहुतेक नाहीं, बहुतेक मुळींच कांहीं नाहीं. N. FRIEND (*law*) अज्ञानाच्या, किंवा विवाहित स्त्रीच्या, किंवा ज्याला कोर्टांत हजर राहातां येत नाहीं अशांच्या वतीनें काम करणारा मुखत्यार *m*, अगदीं जवळचा स्नेही *m.* ] N. *adv.* मग, नंतर, मागून, पाठीवर, पुढें.

Nexus (nek'sus) [ L. *nexus*, from *nectare*, to bind. ]

*n. a bond or link* दुवा *m*, संबंध *m*, जोड *m*, बंध *m*, गांठ *f*; as, "The N. of cause and effect." [CAUSAL N. *the necessary connection between cause and effect* कार्यकारणसंबंध *m.* ] २ *a means of connection between things or parts* सांधा *m*, दुवा *m.*

Nib (nib) [ A. S. *nebb*, the face. ] *n. something small and pointed* अणी *f*, टोंक *n*, टोंच *f*. २ *the bill of a bird* चोंच *f*, चंचू *f*, टोंक *f*. ३ *point of a pen* लेखणीचें टोंक *n*, टांकाचें टोंक *n*, टांक *m*, अणकुची *f*, अणी *f*, अग्र *n*. ४ *the handle of a scythe-snath* मूठ *f*. N. *v. t. to furnish with a nib, to point* टोंक आणणें, अणी *f*. काढणें, टोंकदार -अणीदार करणें, (-चा) टांक तोडणें; as, "To N. a pen=लेखणीला टोंक काढणें." Nibb'ed *pa. t.* and *pa. p.* N. *a.* अणीदार, टोंकदार, टोंकाचा, अणकुचीदार.

Nibble (nib'l) [ Nibble literally means to nip often. Frequentative of Nip. ] *v. t. to bite by small nips, to eat by little at a time* कुरतुडणें, कुरतुडून खाणें, कुरकुडून -कुरकुटून खाणें, खुरपणें, खुरपून खाणें, तोंड *n*. लावणें. N. *v. i. to bite upon something gently or cautiously* कुरतुडणें, संभाळून तोंड *n*. लावणें -घालणें, सावधगिरीनें -फुंकरून चावणें -खाणें. २ *to find fault* दोष काढणें, तक्रार *f*. घेणें -करणें, दिक्कत *f*. करणें -धरणें, आडफांटे *m. pl.* -फांटे *m. pl.* फोडणें. N. *n. a small or cautious bite* ( जपून घेतलेला ) डांस *m*, कुरतुडणें *n*. Nibb'led *pa. t.* and *pa. p.* Nibb'ler *n.* Nibb'ling *pr. p.* Nibb'lingly *adv.* ( जपून ) डांस घेऊन, कुरतुडून.

Niblick ( nib'-lik ) [ Origin unknown. ] *n.* ( 'गोल्फ' किंवा 'कुबडी चेंडु' खेळण्याची) 'निब्लिक' नांवाची काठी *f*.

Nice ( nīs ) [M. E. *nice*, foolish, simple; later, fastidious, and lastly, delicious -L. *nescius*, ignorant -*ne*, not, and *scire*, to know.] *a. fine, pretty, pleasing* चांगला, सुरेख, सुंदर, सुबक, खुबीदार. २ ( persons ) *taking notice of very small differences* सूक्ष्म फरक पाहणारा, बारीक भेद पाहणारा, फारच बारीक पाहणारा, खोलांत शिरणारा, फारच बारीक दृष्टीचा, सूक्ष्मदृष्टीचा, सूक्ष्मदर्शी, सूक्ष्मदृष्टि, बारकावा शोधणारा, कावळा (*fig.*), काकदृष्टि; as, "N. critic." ३ (persons) *fastidious* खोडकर, खंतखोर, चोखंदळ; as, "N. eater." ४ (persons) *minutely cautious* अतिसंशयी, दिक्कतखोर, खंतखोर, संशयखोर. ५ ( things ) *sweet or pleasant to the taste* गोड, रुचिक, रुचकर, मिष्ट, स्वादिष्ट, स्वादु, चवदार, खुमासदार, मासलेदार. ६ *easily injured* नाजूक, बारीक, कोमल, सुकुमार, निमित्तावर टेंकलेला. ७ ( things ) *minutely exact* नाजूक, बारकाव्याचा, सुताचा, बराबर, रेंखलेला, तवताक; as, "N. distinction." ८ (things) *requiring minute care* बारीक, नाजूक. ९ *difficult to settle* नाजूक, (सोडविण्यास किंवा मुक्रर करण्यास) कठीण; as, "A N. point or question." Nice'ly *adv. finely* उत्तम रीतीनें,

चांगल्या प्रकारें, बेताबातानें, टापटिपीनें. Nice'ness *n.* सुरेखपणा *m,* चांगलेपणा *m.* २ नाजूकपणा *m.* Ni'cety *n. the quality of being nice* (in any sense of that word) नाजूकपणा *m,* सुंदरपणा *m,* चांगलेपणा *m,* खुबी *f,* खुमास *f,* खुमाशी *f.* २ सूक्ष्मदृष्टि *f,* बारीक शोध *m,* बारीक चौकशी *f.* ३ चोखंदळेपणा *m,* खोडकरपणा *m.* ४ गोडी *f,* रुचि *f,* चव *f,* खुमारी *f,* लज्जत *f.* ५ *minuteness, precision* बेतबात *m,* फाजील टापटीप *f,* फाजील ठाकठिकपणा *m,* चापचोपी *f,* ठाकठिकी *f.* ६ *a delicate expression, act, mode of treatment, distinction, or the like* नाजूक शब्दप्रयोग *m,* नाजूक भेद *m,* सूक्ष्म भेद *m,* बारीक भेद *m,* लाघव *n,* जुगूत *f,* नाजूक काम *n,* नाजूक व्यवहार *m,* शिष्टाचार, सोपस्कार *m. pl.* Ni'ceties *n. pl.*

Niche (nich) [ Fr. *niche,* –It. *nicchia,* a niche, a shell-like recess in a wall –L. *mytilus,* a sea-muscle. ] *n. a recess generally in a wall for a statue* कोनाडा *m,* कोनडा *m,* कोनडें *n,* देवळी *f.* [ A SECRET N. चोरकोनाडा *m.* ] Nich'ed *a. placed in a niche* कोनाड्यांत ठेवलेला.

Nick (nik) [ Another spelling of Nock = खांच, old form of Notch. ] *n. a notch cut into something* खांच *f,* खोबण *f,* चीर *f.* २ *the precise moment of time* (considered as marked by a nick) नेमकी वेळा *f,* ऐन वेळा *f,* आणीबाणीची वेळ *f,* ताण *n,* टिपण *n,* संधान *n,* गव *f,* मळणी *f.* [ JUST AT THE N. OF TIME नेमका, वेळेवर, वेळीं, मोजका. TO COME IN THE N. OF TIME ऐन वेळीं -ऐन प्रसंगीं -ऐनसमयास येणें, टिपण साधणें, वेळ साधणें. ] N. *v. t. to cut into notches* खांचा *f. pl.* पाडणें with *loc. of o.* २ *to keep count of or upon by nicks* खांचा पाडून-(खांचेसारख्या) खुणा करून गणणें -हिशेब ठेवणें. ३ *to mar, to deface* खांचा पाडून बिघडविणें, खराब करणें, नासणें. ४ *to tally with* (-शीं) जुळणें, जमणें, जुगणें, मिळणें. ५ *to hit in the precise time* ऐन वेळीं तडाखा मारणें -देणें. ६ (घोड्याच्या शेपटीस) कात्रे पाडणें. Nick'ed *pa. t.* and *pa. p.* Nick'ing *pr. p.*

Nickel (nik'el) [ Ger. *kupfernickel,* copper of Nick or Nicholas, because it was thought to be a base ore of copper. ] *n.* एक धातुरूप मूल तत्व *n,* निकल *n.* ह्याचा परमाणु भारांक ५८·७ आहे. N. *v. t. to coat* (the surface of a metal) *with nickel* (एखाद्या धातूवर) निकलचा मुलामा देणें, निकलनें मढविणें -कल्हई करणें. Nickel'ic *a. containing nickel* निकल असलेला, निकलचा, निकलयुक्त. २ (*specifically*) *designating compounds in which, as contrasted with the nickelous compounds, the metal has a higher valence* निकलिक; as, "*Nickelic* oxide= निकलिक प्राणिल." Nickelif'erous *a. containing nickel* निकलभरीत, निकल असलेला as, "*Nickeliferous* iron." Nick'elled *pa. t. & pa. p.* Nick'elling *pr.*

*p.* and *v. n.* Nick'elous *a. designating those compounds in which, as contrasted with nickelic compounds, the metal has a lower valence* निकल; as, "N. oxide = निकल प्राणिल." Nickel-plating *n.* निकलचा मुलामा देणें *n*, निकलचा मुलामा *m.* Nickel-silver *n.* निकल, ताम्र, व यशद (जस्त) यांची मिश्र धातु *f*, जर्मन चांदी, जर्मनसिल्व्हर. Nickel-steel निकल व लोह यांची मिश्र धातु *f*, निकलपोलाद *n.*

Nickname (nik'nām) [M. E. *neke-name*, from *eke-name*, surname.] *n. a familiar form of a Christian name* टोपणनांव *n*; as, "Bill for William, Clem for Clement." २ *a name given in contempt or sportive familiarity* निंदाव्यंजक नांव *n*, टोपणनांव *n.* N. *v. t. to give a nickname to* टोपणनांव *n.* ठेवणें, थट्टेचें किंवा निंदेचें नांव देणें. २ *to call by a nickname* टोपणनांवानें -निंदेच्या नांवानें हाक मारणें. Nick'named *pa. t.* & *pa. p.* Nick'naming *pr. p.*

Nicotine (nik'o-teen) [From Jean *Nicot* (1530-1600) the French ambassador who introduced it into France from Lisbon in 1560.] *n. a poisonous liquid forming the active principle of the tobacco plant* तंबाकूंतील विषारी वीर्य *n*, तमाखूवीर्य *n.* Nico'-tian *a.* तंबाकूचा, तंबाकूसंबंधीं, तंबाकूपासून काढलेला. Nicotia'na *n. pl. the literature of tobacco* तंबाकूवरील वाङ्मय *n*, तंबाकूवरील ग्रंथ *m. pl.* Nicot'ic, Nicotin'ic *a.* (*chem.*) तंबाकूंतील वीर्याचा, तंबाकूंतील वीर्यापासून काढलेला. Nic'otinism *n. a morbid state induced by excessive use of tobacco* तंबाकू फार ओढल्यामुळें आलेली भोंवळ *f* -सुस्ती *f* -ग्लानि *f* -डोकें फिरणें *n.*

Nictate (nik'tāt) [L. *nictare*, *nictatum* –*nicere*, to beckon.] *v. i. to wink* डोळे मारणें -मिचकावणें, नेत्रसंकेत *m* -डोळ्यांचा इषारा *m.* करणें -देणें. Nicta'-tion *n.* नेत्रसंकेत *m*, डोळ्यांचा इषारा *m*, डोळे *m. pl.* मिचकावणें *n*, भ्रूसंकेत *m.*

Nictitate, Same as Nictate.

Nictitation, Same as Nictation.

Nidificate (nid'i-fi-kāt) [L. *nidus*, Sk. नीड, a nest, & *facere*, to make.] *v. i. to make a nest* घरटें *n.* बांधणें. Nidifica'tion *n. the act of building a nest and the hatching and rearing of the young* घरटें बांधणें व अंडीं उबवून पिलें वाढविणें. Nid'ulant *a. nestling* घरट्यांत बसलेला. २ (*bot.*) नीडस्थ, फळांच्या गिरांत मोकळीं असलेलीं (बीजें, बिया, इ.); as, पेरूच्या बिया. Nid'ulate *v. i.* (*R.*) घरटें बांधणें -करणें.

Nidulant, See under Nidificate.

Nidulate, See under Nidificate.

Nidus (nī'dus) [L. *nidus*, nest. Perhaps allied to Sk. नीड, a nest.] *n. a nest* घरटें *n*, खोपा *m*, माळा *m.* २ *a place, especially in an animal body, in which a germ lodges and begins to develop* जंतुनीड *n*, जंतुनिवास *m*, जंतुवृद्धिस्थान *n.*

Niece (nēs) [Fr. *niece*, –L. *neptis*, a grand-daughter, a niece, fem. of *nepos*, a nephew.] *n. a man's brother's daughter* पुतणी *f*, भ्रातृकन्या *f*. २ *a sister's daughter* (whether of a man or woman) भाची *f*, भगिनीकन्या *f*, भागिनेयी *f*. [HUSBAND OF THIS N. भाचेजांवई *m*.] ३ *a woman's brother's daughter, or a husband's sister's daughter* भाची *f*. [HUSBAND OF THIS N. भाचेजांवई *m*.] ४ *husband's brother's daughter* पुतणी *f*.

Niello (ni-el'-lō) [It. *niello*, –L. *negellus*, dim. of *niger*, black.] *n. a metallic alloy of a deep black colour* काळीकुट्ट 'निएलो' नांवाची मिश्र धातु *f*, निएलो *f*. २ धातूंवर खोदींव काम करून तें 'निएलो'नें भरण्याची कला *f*. ३ 'निएलो' नें रंगविलेला पत्रा *m*.

Niggard (nig'ard) [M. E. *nigard* –*nig*, stingy, and –*ard*, an intensive suffix.] *n. a miser* चिक्कू मनुष्य *m*, कद्रू *m*, कृपण *m*, कवडीचुंबक *m*. Nigg'ard, Nigg'ardly *a. miserly, stingy* चिक्कू, कद्रू, कृपण, हिमटा, चिकटा, हाताचा जड, बारीक पाहाणारा, बारीक, कंजूष, व्ययशत्रु. Nigg'ardish *a. somewhat niggard, rather niggardly* थोडासा -जरासा -जवळ जवळ चिक्कू -कृपण -कद्रू. Nigg'ardliness, Nigg'ardness *n.* चिक्कूपणा *m*, कद्रूपणा *m*, हिमटेपणा *m*, कंजूषपणा *m*, कृपणपणा *m*, चिकटेपणा *m*, कार्पण्य *n*, बारीक दृष्टि *f*. Nigg'ardly *adv.* चिक्कूपणानें, कृपणपणानें, कंजूषपणानें, बारीक दृष्टीनें, कार्पण्यपूर्वक.

Nigged (nig'd) [See Niggle.] *a.* (*masonry*) *hammer-dressed* (building stone) सुतकीनें ठोकून सारखा केलेला, घडींव (दगड).

Nigger (nig'ėr) [L. *niger*, black.] *n. a negro* (in vulgar derision or depreciation) निग्रो *m*. Nig'ger-killer *n. a scorpion* विंचू *m*. Nig'ger-seed *n.* कारळा तीळ, कारळे, काळे रामतीळ. Nig'gerling *n. little nigger* छोटा निग्रो *m*.

Nigger-killer, Niggor-seed, } See under Nigger.

Niggle (nig'l) [Dim. of Provincial E. *nig*, to clip money.] *v. i. to trifle or play* थट्टा करणें, (-चा) खेळ करणें; as, "Take heed daughter, you *niggle* not with your conscience and religion." २ (बारीकसारीक बाबतींत) वेळ दवडणें -खर्च करणें. ३ (क्षुल्लक बाबतींत) दोष काढीत बसणें. Nig'gled *pa. t.* & *pa. p.* Nig'gler *n.* गंभीरपणें विचार न करणारा *m*, थट्टा करणारा *m*. Nig'gling *n. fussiness* अवडंबर माजवणें *n*. N. *a. mean* क्षुल्लक, किरकोळ. २ *fussy* अवडंबराचा.

Nigh (nī) [A. S. *neah*, *neh*, nigh.] *a. near, not distant in place or time* जवळचा, समीप, नजीकचा, संनिध, अदूर, ठेपलेला. २ *closely allied* जवळचा, अगदीं जवळचा. [A NIGH KINSMAN अगदीं जवळचा नातेवाईक.] N. *adv. near* जवळ जवळ; as, "He was sick, *nigh* unto death." २ *almost, nearly*

बहुतेक; as, "He was *nigh* dead." N. *prep. near to, not distant from* (-च्या) जवळ -नजीक -संनिध.

Night (nīt) [A. S. *niht*; Ger. *nacht*; L. *nocs*; Gr. *nux*; Sk. नक्त, night.] *n. the time from sunset to sun-rise* रात्र *f,* रात्रि *f,* रात *f,* निशा *f,* रजनी *f.* [A DARK N. काळोखी रात्र *f,* अंधारी -अंधेरी रात्र *f.* AT N., BY N. रात्रींचा, रातचा *decl.*, रात्रीं, रात्रींचे वेळीं, रात्रींवितीं, रात्रींवेरात्रीं, नक्तं. BY N. AND BY DAY नक्तंदिवा (S.), रात्रंदिवस, रात्रंदीस, अहोरात्र, निशिदिनीं, निशिदिन. CONCLUDING PART *or* DIVISION OF THE N. पहांटची रात्र *f,* पहांटेचा प्रहर *m,* मोठी पहांट *f.* EARLY PART OF THE N. पूर्वरात्र *f,* अवस or औस or आवोस *f,* औंशीची रात्र *f.* FIRST PART OF THE N. (evening) प्रदोपकाल *m,* संध्याकाळ *f.* GOOD N. सुखेनैव शयितव्यं, साहेब लोकांतील एकमेकांची रजा घेतांना करण्याचा रात्रींचा सलाम *m.* IN THE EARLY PART OF THE N. आवशीं. LATTER HALF OF THE N. उत्तररात्र *f.* N. BY N., N. AFTER N. कित्येक रात्रीं सारखें. TO-NIGHT आज रात्रीं, रात्रीं, रात्रौ, रातचा *decl.* ONE WHO WATCHES AT N. रात्रीं जागणारा *m,* रात्रींचा पहारेकरी *m.* WATCH AT N. रात्रींचें जागरण *n,* रात्रीं जागणें *n* -पहारा करणें *n* -भरणें *n,* (loosely) रातपहारा *m,* रात्रींचा पहारा *m.* TO SET OUT WHILST YET N. रातवा घेऊन-रात्र ठेवून -मोठ्या पहांटेस निघणें, भल्या पहांटेस निघणें. TO PASS THE N. WATCHING BY A LIGHT दिव्यानें रात्र उजाडणें -काढणें -लोटणें. TO PASS THE N. SLEEPLESS जागून रात्र काढणें, डोळ्यास डोळा न लावणें, पापणीस पापणी *f.* न लावणें. TO BE N., TO COME ON (the night) रात्र पडणें -होणें, रातावणें, सांज होणें. THE N. RINGS (as with the sound of the cricket, &c.) रात्रींचें किर्र होत आहे. N. BELL रात्रींची घंटा *f.* N. BIRD रात्रींचा उडणारा पक्षी *m,* रातपक्षी; (घुबड, वगैरे). २ रात्रींचा गाणारा पक्षी *m.* N. BLIND रातांधळा. N. BLINDNESS रातांधळें *n,* रातांधळेपणा *m.* AFFLICTED WITH N. BLINDNESS रातांधळा, रातांध. N. BLOOMING *a.* रात्रीं फुलणारा. N. BRAWLER रात्रीं दंगा *m* -गडबड *f* -भांडण *n.* वगैरे करणारा *m.* N. CAP निजतांना घालण्याची टोपी *f,* रात्रींची टोपी *f,* रातची टोपी *f,* कानटोपी *f.* २ निजतांना झोंकलेला दारूचा 'ग्लास' *m.* N. CART (उजाडण्यापूर्वीं) मलमूत्रादि वाहून नेण्याची गाडी, मैलागाडी *f.* N. CLOTHES रात्रींचे कपडे, रात्रींचीं -रातचीं प्रावरणें *n. pl.* N. CROW रात्रीं ओरडणारा पक्षी *m,* घुबड (?) *n.* N. DOG (चोरट्या शिकाऱ्यांचा) रातशिकारीचा कुत्रा *m.* N. DRESS निजतांना घालण्याचा झगा *m* -पोषाख *m.* N. DUTY रातपाळी *f,* रातपहारा *m.* N. EYED *a.* रात्रींचें -रात्रीस दिसणारा. N. FALL संध्याकाळ *f.* N. FARING रात्रींचा प्रवास करणारा. N. FIRE रात्रींचा पेटत ठेवलेला विस्तव *m.* २ *will-o'-the-wisp* रात्रीं रानांत दिसणारा उजेड *m.* N. FISHERY रात्रीं मासे पागण्याची पद्धत *f.* २ रात्रींचे मासे पागण्याची जागा *f.* N. FLYER *n.* रात्रीं उडणारा किडा किंवा पक्षी. N. GLASS *n.* रात्रीं दूरचे पदार्थ पाहण्याचें भिंग *n.* N. GOWN *n.* रात्रीं निजतांना घालण्याचा लांब व सैल झगा *m.* N. HAG *n.* रात्रीं फिरणारी डाकीण *f,* हडळ *f.*

N. HOUSE *n. a tavern allowed to be open during the night* सर्व रात्रभर उघडें असणारें इंग्रजी दारूचें दुकान *n.* N. HUNTER *n.* रात्रींच्या वेळीं भटकणारी भ्रष्ट स्त्री *f.* N. LIGHT (आजारी मनुष्याच्या खोलींत रात्रभर जळत ठेवण्याच्या उपयोगाची) बारीक वातीची मिणमिण करणारी मेणवत्ती *f.* N. LONG *a.* सर्व रात्रभर चालणारा -होणारा. N. MAN *n.* रात्रींचा -रात्रपाळीचा पहारेकरी *m*, रातपाळीवाला *m.* २ भंगी *m.* N. OWL *n.* रात्रींचें बाहेर पडणारें घुबड *n.* २ *one who sits up very late* रात्रीं फार जागणारा. N. PIECE *n. a painting representing some night scene, as a moon-light effect or the like* रात्रींच्या देखाव्याचें -रात्रीं दिसणाऱ्या देखाव्याचें चित्र *n.* २ *a painting to be seen best by artificial light* कृत्रिम उजेडांत -रात्रींच चांगलें दिसणारें चित्र *n* -तसवीर *f.* N. PORTER *n.* रातपाळीवाला पोर्टर, रातपोर्टर *m.* N. RAVEN *n. a bird that cries at night* हुमणें *n*, घुबड *n.* N. SCHOOL *n.* (दिवसा काम करणारांकरितां रात्रीं भरणारी) रात्रींची शाळा *f.* N. SEASON *n.* रात्रींची वेळ *f.* N. SHADE *n.* (*bot.*) कांटेरिंगणी. N. SHIRT *n.* निजतांना घालण्याचा सैल झगा *m.* N. SOIL *n.* मलमूत्र *n.* N. SPELL *n. a charm against accident at night* रात्रीं कांहीं अपघातादि प्रकार होऊं नये म्हणून भारलेला दोरा *m* -ताईत *m.* N. STEED *n.* रात्रिदेवतेच्या रथाचा घोडा *m.* N. STOOL *n.* (निजावयाच्या खोलींत ठेवण्याची) रात्रींची मलमूत्राची पेटी *f.* N. TERRORS *n. pl. the sudden starting from sleep of children in a state of fright* मुलांचें झोंपेंत ओरडणें *n* -घाबरणें *n* -भिणें *n.* N. TIME रात्रीची वेळ *f.* N. WALK *n.* संध्याकाळच्या वेळचें फिरणें *n.* N. WALKER *n. a somnambulist* झोंपेंत चालणारा *m.* २ (a) वाईट हेतूनें रात्रीं भटकणारा *m.* (b) वेश्या *f.* N. WALKING *n.* झोंपेंत चालणें *n.* २ (वाईट हेतूनें) रात्रींचें भटकणें *n.* N. WANDERER *n.* रात्रीं भटकणारा *m.* N. WATCH *n. time of watch in the night* रात्रींच्या पहाऱ्याचा काल *m*, रात्रींचा पहारा *m.* २ रात्रींचा पाहारेकरी *m.* N. WATCHER *n.* (चोरी वगैरे करण्याकरितां) रात्रीं जागणारा -पहारा करणारा *m.* N. WATCHMAN *n.* रात्रींचा पहारेकरी *m*, रातपाळीवाला *m.* N. WITCH *n.* हडळ *f.* N. WORK *n.* रात्रीं केलेलें काम *n.*] २ *darkness, obscurity* अंधकार *m*, काळोख *m*, अज्ञानतम *n*, गूढपणा *m*; as, "Nature and nature's laws lay hid in *night.*" ३ *intellectual and moral darkness, ignorance* अज्ञान *n*, अंधकार *m*, अज्ञानांधकार *m.* ४ *affliction, adversity* विपत्ति *f*, संकट *n*, कष्टमय स्थिति *f*, भोग *m*, आपदा *f*, आफत *f.* ५ *the period after the close of life, death* काळनिद्रा *f*, काळझोंप *f*, मृत्यु *m*; as, "She closed her eyes in everlasting *night.*" ६ *a lifeless period* सामसूम *f*, शांतता *f*; as, "Sad winter's *night.*" Night'ly *a. of or pertaining to the night or to every night* रात्रींचा, रातचा, रात्रीचे वेळचा, रात्रीसंबंधीं, नैश, रोजरात्रींचा. २ *happening or done every night* दररात्रीचा, प्रतिरात्रिक, प्रतिरात्रीचा; as, "He kept *nightly* vigils." N. *adv. by*

*night* रात्रीं, रातीं, रात्रीस, रातचा *decl.*, रात्रौ, नक्तं. २ *every night* दर रात्रीं, दर रात्रीस, प्रतिरात्रीस, प्रतिरात्र.

Nightingale ( nīt'in-gāl ) [ A. S. *nihtegale* –*niht*, night, and *galan*, to sing. Nightingale literally means 'singer by night.'] *n.* (*Indian*) बुलबुल पक्षी *m.* २ *a person who sings with remarkable sweetness* ( बुलबुल पक्ष्यासारखा ) मधुर गाणारा *m.*

Nightingale ( nīt'in-gāl ) [ Named after the famous Crimean hospital nurse, Florence Nightingale. ] *n. a kind of flannel scarf with sleeves, worn by invalids when sitting up in bed* नाइटिंगेल झगा *m.*

Nightmare ( nīt'maer ) [A. S. *niht*, night, and *mara*, a nightmare. ] *n. a fiend formerly supposed to cause trouble in sleep* रात्रींचें छाती दडपून टाकणारें भूत *n.* २ *incubus, a dreadful dream accompanied with pressure on the breast, and a feeling of powerlessness to move or speak* कुस्वप्न *n*, झोंपेंत छातीवर दडपल्यासारखें वाटणें *n.* ३ *any overwhelming, oppressive or stupefying influence* भूतासारखा ( मनावर होणारा ) भास *m*, पिशाच्चभ्रम *m*, भीति *f.*

Nightpiece, See under Night.

Night-shade, See under Night.

Nigrescent ( nī-gres'ent ) [ L. *nigrescens*, pr. p. of *nigrescere*, to grow black –*niger*, black. ] *a. growing black* काळसर, काळवटणारा, काळा पडणारा.

Nigrosine ( nī'grō-sin ) [ L. *niger*, black.] *n.* (*chem.*) नायग्रोसिन रंग *m.* हा अनिलिनच्या उज्जहरिला (hydrochloride ) पासून तयार करतात.

Nihil (ni'hil) [L. *nihil*, nothing.] *n. nothing* शून्य *n.*

Nihilism ( ni'hi-lizm ) [ L. *nihil*, nothing. ] *n. nothingness* शून्यता *f*, शून्य *n*, नास्तित्व *n*, नाहींपणा *m.* २ *belief in nothing* ( कांहीं वास्तविक नाहीं असा ) शून्यवाद *m.* ३ (*politics*) *the theories and practices of the Nihilists in Russia* रशियामधील निहिलिस्ट पक्षाचीं मतें *n. pl.*, सुधारणेच्छुविध्वंसकमत *n.* Ni'hilist *n. one who advocates the doctrine of nihilism* शून्यवाद सांगणारा *m*, शून्यवादाभिमानी *m*, शून्यवादी. २ *one* ( *esp.* in Russia) *who aims at the overturn of all the existing institutions of society in order to build it up anew on different principles* सुधारणेच्छुविध्वंसक *m*, निहिलिस्ट *m.* Nihilis'tic *a.* शून्याचा, शून्यत्वाचा. २ शून्यवादाचा. ३ सुधारणेच्छुविध्वंसकमताचा. Nihil'ity *n. nothingness* शून्यता *f.*

Nihilist, See under Nihilism.

Nike ( nī'kē ) [ Gr. ] *n. the goddess of victory* ( ग्रीक लोकांची ) नायकी (नांवाची) विजयदेवता *f*, विजयश्री *f.*

Nil ( nil ) [L. contr. of *nihil*, nothing.] *n. nothing* ( often used for cancelling in accounts and book-keeping ) पूज्य *n*, शून्य *n*, पूज्य -शून्य बाकी *f*, कांहीं नाहीं *n.* N. *a. worthless* कवडीकिंमतीचा, निरुपयोगी, क्षुद्र, तुच्छ

Nill (nil) [A. S. *nillan*, *nyllan* –*ne*, not, and *willan*, to will.] *v. i. to be unwilling, to refuse to act* कबूल नसणें, खुशी नसणें. [WILL HE, N. HE *whether he wills it or not* त्याला कबूल असो किंवा नसो.]

Nimbiferous, See under Nimbus.

Nimble (nim'bl) [A. S. *numol*, quick at catching –*niman* (Ger. *nehmen*), to take.] *a. active, agile, light and quick in motion* चपळ, चलाख, आंगाचा चपळ, चपलांग, आंगसूट. N. fing'ered *a. thievish* चोरटा, हाताळ. N. foot'ed *a. swift of foot* जलद चालणारा, पायसूट, पायाचा जलद, चपळ, हलक्या पायाचा. N. wit'ted *a. sharp, quick-witted* हुशार, कुशाग्रबुद्धि, शीघ्रबुद्धि, चपळबुद्धीचा. Nim'bleness *n.* चपळाई *f*, पायसूटपणा *m*, आंगचपळाई *f*, चापल्य *n*, अंगचापल्य *n*. २ हुशारी *f*, चलाखी *f*, चलाख बुद्धि *f*. Nim'bly *adv.* आंगचपळाईनें, जलदीनें, चपळाईनें, अंगचापल्यपूर्वक. २ हुशारीनें, चलाखी करून.

Nimbose (nim-bōs') [L. *nimbus*, rain-storm.] *a. cloudy* (पावसाळयाच्या) ढगांनीं आच्छादलेला, पर्जन्य-मेघाच्छादित.

Nimbus (nim'bus) [L., a rain-storm, a rain-cloud.] *n. a rain-cloud* निंबस नांवाचा पावसाचा ढग *m*. हे ढग पावसाळयांतच आकाशांत दिसतात. २ (*painting*) *the disc or halo, generally circular or semicircular, which encircles the head of the sacred person represented* प्रभावळ *f*. Nimbif'erous *a. bringing clouds* पावसाचे ढग आणणारा, पर्जन्यमेघोत्पादक. Nim'buses *n. pl.*

Nincompoop (nin'kum-pōōp) [Corruption of L. *non compos* (*mentis*), not of sound mind.] *n. a simpleton, a fool* मूर्ख *m*, बेवकूफ *m*, अडाणी *m*, मूर्खांचा सरदार *m* (*fig.*), गावदी *m*, गयाळ *m*, गचाळ *m*.

Nine (nīn) [A. S. *nigon*, L. *novem*, Gr. *ennea*, Sk. नवन्, Zend. *nava*, nine.] *a.* नहूं, नऊ, नव; as, "N. miles." [NINE WORTHIES—*Hector, Alexander the Great, Julius Cæsar, Joshua, David, Judas Maccabæus, Arthur, Charlemagne, Godfrey of Bouillon*. काव्य, इतिहास वगैरेंतील नऊ प्रसिद्ध पुरुष *m. pl.*, नवरत्नें *n. pl.* THE NINE, *the nine Muses* नऊ काव्य-देवता *f. pl.* To THE NINES *elaborately, fully* पूर्णपणें, पूर्णत्वानें, सर्वांशीं.] N. *n.* नऊ. २ *a symbol representing nine units* नवांचा आंकडा किंवा चिन्ह *n*; as, "IX, 9,९." Nine'fold *a. nine times folded or repeated* नऊपट, नहूपट. Nine'-holes *n. a game in which a ball is to be bowled into nine holes in the ground or a board* नऊ खळग्यांत चेंडू मारण्याचा खेळ *m*. Nine'points circle *n.* (*geom.*) नवबिंदुवृत्त *n*. Nine points conic *n.* नवबिंदुशंकु *m*. Nine'-score *a.* नऊविसा, एकशें ऐंशीं. N. *n.* नऊविसा *f. pl.*, एकशें ऐंशीं. Ninth *a.* नवम, नववा. N. *n.* नवमांश *m*, नववा भाग *m*, नववा हिस्सा *m*. Ninth'ly *adv. in the ninth place* नवव्यानें, नवव्यानदां.

**Nineteen** (nīn'tēn) [A. S. *nigon*, Sk. नवन्, nine, and *tyn*, ten.] *a.* एकूणीस, एकूणवीस, एकोणीस. N. *n.* एकूणीस, एकोणीस. २ *a symbol for nineteen units* एकुणीसांचा आंकडा *m*, एकूणीस संख्या दाखविणारें चिन्ह *n*; as, "XIX, 19, १९." Nine'teenth *a.* एकुणीसावा, एकोणीसावा. N. *n.* एकुणीसावा भाग *m* -अंश *m* -हिस्सा *m*.

**Ninety** (nīn'ti) [A. S. *nigon*, nine, and *tyn*, ten.] *a.* नव्वद; –one, एक्याण्णव; –two, ब्याण्णव; –three, त्र्याण्णव; –four, चौऱ्याण्णव; –five, पंचाण्णव; –six, शाण्णौ, शाण्णव; –seven, सत्याण्णव, –eight, अठ्याण्णव; –nine, नव्याण्णव. N. *n.* नव्वद एकं, नव्वद. २ नव्वद -नव्वदाचा आंकडा दर्शविणारें चिन्ह *n*; as, "XC, 90, ९०." Nine'tieth *a.* नव्वदावा. N. *n.* नव्वदावा भाग *m* -हिस्सा *m* -अंश *m*.

**Ninny** (nin'i) [It. *ninno*, a child.] *n. a simpleton, a fool* मूर्ख *m*, गचाळ *m*, गैदी *m*, गबाळ्या *m*, गयाळ *m*, गावदी *m*. Ninn'ies *n. pl.*

**Ninth**, See under Nine.

**Niobium** (nī-ō'bi-um) [From L. and E. Niobe.] *n.* (*chem.*) *a later name for columbium* 'नायोबियम' नांवाची मूळ धातु *f*, नायोब *f*. 'नायोब' हें कोलंबियम नांवाच्या मूळ धातूचें दुसरें नांव आहे.

**Nip** (nip) [M. E *nippen*, to clip.] *v. t. to press between two surfaces, to close in upon, to pinch* आंवळणें, जखडून टाकणें, दाबणें, चिमटणें, चिमट्यांत -काऱ्यांत धरून आंवळणें -जखडणें. २ *to bite or pinch off with the nails or teeth, to clip* खुटणें, खुडणें, कुचरणें, कुरतुडणें, खुडतुडणें or खुरतुडणें, खुडसणें, बोंखडणें or बोंखाडणें, बोंचरणें, कृंतणें, निकृंतणें; as, "The small shoots must be *nipped* off." ३ *to check the growth or vigour of* मोडणें, तोडणें, नाहींसा करणें, नष्ट -हत करणें. (b) *to blast* करपवणें, जाळणें. [To BE NIPPED करपणें, करपा *m.* पडणें. To NIP IN THE BUD *to cut off in the earliest stage* मूळांत खुटणें, मूळांत खोडून टाकणें, मूळांतच -सुरवातीला -मूळापासून नाहींसें करणें.] ४ *to taunt, to sting, to satirise* टोंचून -वर्मी -छद्मीं -लागून बोलणें, टोमणे मारणें, टोंचणें; as, "And sharp remorse his heart did prick and *nip*." N. *n. a pinching, a seizing or closing in upon* चिमटा *m*, पकड *f*, जखडणी *f*. २ *a pinch with the nails or teeth* बचका *m*, लचका *m*, डांस *m*, चिमटा *m*, चिमखुरा *m*, चावा *m*. ३ *a cutting off the end* खुटणें *n*, खुडणें *n*, कुरतुडणें *n*, शेंडा तोडणें *n*, कुचरणें *n*. ४ *a blast* करपणें *n*, करपून जाणें *n*, जळणें *n*. ५ *sarcasm, taunt* टोमणा *m*, मर्मभेदक वचन *n*. Nip'-cheese *n. a stingy fellow* चिक्कू *m*, दरिद्री *m*, कृपण *m*. Nipp'ed *pa. t.* & *pa. p.* Nip'pers *n. pl. pincers* चिमटा *m*, गावी *f*.[To PULL OUT WITH N. चिमट्यानें बाहेर ओढणें -काढणें.] २ (of a gold-smith) सवाणा *m*. ३ घोड्याचे पुढील चार दांत *m. pl.* Nip'ping *a. biting, painful* झोंबणारा, टोंच-

णारा, त्रासदायक, दुःखदायक, नुकसान करणारा; as, "A *nipping* frost." Nip'pingly *adv.*

Nip (nip) [D. *nippen*, to sip.] *n. a sip, especially of spirits* (दारूचा) घोट *m*, घुटका *m*.

Nipple (nip'l) [A dim. of Neb *or* Nib. Neb = beak or nose. Nib = point of a pen.] *n. a teat* (स्तनाची) बोंडी *f*, बोंड *n*, बोंडूक (dim.) *n*, बोंडशी *f*, स्तनाग्र *n*, कुचाग्र *n*, स्तनमुख *n*, चूचुक *m*, *n*. २ *a small projection with an orifice* (दूध पाजण्याच्या बाटलीचें) चुंफणें *n*, बोंड *n*, तोंड *n*; as, "The N. of a nursing bottle." [THE N. OF A GUN बंदुकीचा काना *m*, बंदुकीची लवंग *f*. N. SHIELD स्तनकवच *n*, स्तनावर घालण्याचें (चामड्याचें) बोंड *n*. फुटलेल्या किंवा सुजलेल्या स्तनाला मुलांचे दांत लागूं नयेत म्हणून हें घालतात.]

Nipple-wort (nip'l-wurt) *n.* (*bot.*) काश्मिरी सालीट *n*. हीं पूर्वीं बायकांच्या स्तनाग्रांना लावीत असत.

Nisi (nī'sī) [L. *nisi*, unless.] *conj. unless, if not* शिवाय, नाहींतर, तरमग, जरकरितां. [A DECREE NISI *a judgment not absolute until a certain time has elapsed, and only valid if no impediment can be shown against it* कच्चा हुकूमनामा *m*, अटीचा हुकूमनामा *m*. A RULE NISI कारण दाखविण्याचा हुकूम *m*, अटीचा हुकूम *m*.]

Nit (nit) [A. S. *hnitu*, a louse's egg.] *n. the egg of a louse or other small insect* उवेचें किंवा उवेसारख्या लहान किड्याचें अंडें *n*, लीख *f*. Nit'ty *a. full of nits* लिखामय, लिखांचा बुजबुजाट असलेला, लिखांनीं बुजबुजलेला -भरलेला.

Niter, Same as Nitre q. v.

Nitid (nit'id) [L. *nitidus* -*nitere*, to shine.] *a.* (*R.*) *shining, bright* चकाकित, झकाकित, झगझगीत, चकाकणारा. २ (of persons) *gay* आनंदी, खुषमिजाज, रंगेल. Nit'ency *n.* चकचकितपणा *m*, झकाकी *f*. २ रंगेलपणा *m*.

Nitrate, See under Nitre.

Nitre, Niter (nī'tėr) [Fr. *nitre* -L. *nitrum*, -Gr. *nitron*, natron, potash, soda -Ar. *nitrun*, *natrun*, natron.] *n. nitrate of potash, also called saltpetre* सोरा *m*, सोराखार *m*, सोरमीठ *n*, सूर्यखार *m*, यवक्षार *m*, (आमच्या रासायनिक परिभाषेंत) पालाशनत्रित *n*. See the word Chemistry. [CUBIC N. चिली सोरा *m*. हा अमेरिकेंतील चिली देशांत सांपडतो.] Ni'trate *n. a salt of nitric acid* नत्रकाम्लाचें लवण *n*, नत्रित *n*. [N. OF POTASH यवक्षार *m*, *pop.* यवखार *m*. NITRATE OF SILVER *n.* काडीखार *m*, (आमच्या रासायनिक परिभाषेंत) रजतनत्रित *n*.] Ni'trated *a. combined or impregnated with nitric acid or some of its compounds* नत्रकाम्लसंयुक्त, नत्रितसंयुक्त, नायट्रिक ॲसिडशीं मिसळलेला. २ (*photo.*) *prepared with nitrate of silver* काडीखार घालून तयार केलेला. Ni'tric *a. designating any one of those compounds*

*in which, as contrasted with nitrous compounds, the element has a higher valence* नत्रक; as, "*Nitric* oxide = नत्रक प्राणिल." [N. ACID नत्राम्ल. N. ANHYDRIDE *nitric pentoxide* नत्रक पंचप्राणिल *m*, नत्रक निरुद *m*. N. PEROXIDE नत्रक परिप्राणिल *m.*] Ni'tride *n. a binary compound of nitrogen with a metal or non-metal* नत्र व दुसरें धातुतत्व किंवा दुसरें अधातुतत्व यांचा संयुक्त पदार्थ *m*, नत्रिल *n.* Nitrif'erous *a. containing nitre* सोरायुक्त, सोरा असलेला. Nitrifica'tion *n. the process of converting into nitre* यवक्षारीकरणक्रिया *f*, (दुसऱ्या एखाद्या पदार्थाचा) यवक्षार करण्याची क्रिया *f*, नत्रितीकरण *n.* २ *the process whereby organic nitrogen in the soil is converted into a form (nitrate) suitable for plants to utilize as crude food-material* जमिनीमधील सेंद्रिय नत्राची नात्रित बनण्याची क्रिया *f.* (वनस्पति पोषकद्रव्य अन्न म्हणून जो नत्र घेतात तो नत्रित या रूपांत घेतात). Ni'trified *pa. t.* and *pa. p.* Ni'trifier *n. an agent employed in nitrification* नत्रितकारक द्रव्य *n*, नत्रितकारक *n.* Ni'trify *v. t. to convert into nitre* सोराखाराचें रूप देणें, (-चा) सोराखार तयार करणें, नत्रितांत रूपांतर करणें. N. *v. i. to become nitre* नत्रित बनणें. Ni'trifying *pr. p.* Ni'trite *n. a salt of nitrous acid* नत्राम्लाचें लवण *n*, नत्रायित *n.* Ni'tro-bacteria *n. pl. organisms which bring about nitrification* नत्रितीकरण घडवून आणणारे सूक्ष्म जंतु *n. pl.*, *m. pl.* Ni'tro-benzol or Ni'tro-benzene *n. a compound of benzene and nitric acid, something like oil of bitter almonds, and used in the preparation of aniline and in perfumery* बेंझिन व नायट्रिक ॲसिड (नत्रकाम्ल) यांचा संयुक्त पदार्थ *m*, नत्रित बेंझिन *m.* (हा कडू बदामाच्या तेलासारखा असतो व आनिलिन व सुवासिक तेलें तयार करण्याकडे याचा उपयोग होतो). Ni'tro-gelatin *n.* नायट्रोजिलेटिन नांवाचें स्फोटक द्रव्य *n*, नायट्रोजिलेटिन *n.* हें नायट्रोग्लिसरिन, गनकॉटन व कापूर ह्यांपासून तयार करतात. Ni'tro-glycerine *n.* नायट्रोग्लिसरिन नांवाचें स्फोटक द्रव्य *n*, नायट्रोग्लिसरिन *n.* हें नायट्रिक ॲसिड व सल्फ्यूरिक ॲसिड ह्यांचें ग्लिसरिनवर कार्य होऊन तयार होतें. Ni'tro-sulphuric acid *n.* नायट्रोसल्फ्यूरिक ॲसिड *n.* हें नायट्रिक ॲसिड (एक भाग) व सल्फ्यूरिक ॲसिड (आठ अगर दहा भाग) ह्यांच्या मिश्रणापासून तयार होतें. Ni'trous *a. containing or resembling nitre* सोराखार असलेला, सोराखारासारखा. २ (spec.) *designating any one of those compounds in which, as contrasted with nitric compounds, the element has a lower valence* नत्र; as, "N. oxide = नत्रप्राणिल." [N. ACID नत्राम्ल. See the word Chemistry.]

Nitride,
Nitrify,
Nitro-bacteria,
Nitro-benzene,
Nitro-gelatin,
} See under Nitre.

Nitrogen, ( nī'tro-jen ) [Gr. *nitron*, nitre, and *-gen*, a suffix indicating production. ] *n. a gas forming nearly four-fifths of common air* (so called from its being an essential constituent of nitre ) ( न त्रायते इति ) नत्र *m*, नत्रवायु *m*, नायट्रोजन वायु *m*. ह्याचा अणुभारांक १४ आहे. Nitrog'enic, Nitrog'enous *a. containing or resembling nitrogen* नत्राचा, नत्रविषयक, नत्रसदृश, नत्र असलेला, नत्रयुक्त, सनत्र. [ NITROGENOUS FOODS नत्रयुक्त -सनत्र अन्नें *n. pl.* (उ० डाळी वगैरे.) NON-NITROGENOUS FOODS नत्रहीन किंवा नत्ररहित अन्नें *n. pl.* ] Ni'trogenise *v. t. to impregnate with nitrogen* नत्रयुक्त करणें, नत्रवायुविशिष्ट करणें. Nitrom'eter *n.* (एखाद्या पदार्थांतील) नत्राचें प्रमाण मोजण्याचें यंत्र *n*, नत्रमापक *m*.

Nitro-glycerine,
Nitro-sulphuric acid,
Nitrous,
} See under Nitre.

Nittings ( nit'ingz ) [ Prob. from *nit*, an egg of a louse. ] *n. pl. small particles of coal or refuse of any ore* कोळशाचा किंवा अशुद्ध धातूचा भुगा *m*, कीस *m*, गाळ *m*.

Nival ( nī'val ) [ L. *nivalis*, *-nix*, *nivis*, snow. ] *a. growing among snow* बर्फांत उगवणारा, बर्फांत वाढणारा, हिमज; as, "The richest N. flora." Niv'eous *a. snowy, white* बर्फाचा, बर्फमय, बर्फासारखा, शुभ्र.

Nizam ( nī-zam' ) [ Ar. *nazamu*, to govern. ] *n.* निजाम *m*. दक्षिणेंतील हैद्राबाद संस्थानच्या अधिपतींना निजामसाहेब किंवा निजामसरकार असें म्हणतात. सध्यांच्या निजाम साहेबांचें नांव ओस्मान अलिखान बहादुर निजामउल्मुल्क हें आहे.

No ( nō ) [Short for *none*.] *a. not any, not one, none* कोणी नाहीं, कांहीं नाहीं. The sense of *no* is often involved in the use of the negative particle; as, "तो मुलगा सामान्य नाहीं = He is no common boy." [No ONE कोणी नाहीं. No JOKE *not a trifling matter* थट्टा नव्हे. OF NO ACCOUNT *worthless* कुचकिंमतीचा, बिनमोल, गचाळ. NO DOUBT *surely* खात्रीनें, निःसंशय.]

No ( nō ) [ A. S. *na*, compounded of *ne*, Sk. न, not, and *a*, ever. ] *adv. not so, not at all, never* नाहीं, न, ना, ऊंहूं, छे, मुळींच नाहीं, कधींच नाहीं. [To SAY NO TO EVERY THING, TO BE EVER NOING नचा -नन्नाचा फाडा वाचणें, नचा पाठ असणें *in. con. g of s*. THOUGH YOU SAY NO, YET SAY NO SWEETLY cf. गूळ नाहीं पण गुळाची वाचा तरी असावी. ] *N. B.*—Before or after another negative, *No* is emphatic; as, "There is none righteous, *no*, not one." No *n. a denial* नाहीं

म्हणणें *n*, नकार *m*, नचा -नन्नाचा फाडा *m*. २ *a vote against or in the negative* प्रतिकूल मत *n*, नकारार्थी किंवा विरुद्ध मत *n*; as, "To call for the ayes and noes." ३ *one who votes in the negative* नकारार्थी मत देणारा *m*; as, "The *noes* have it." Noes (nōz) *n. pl.* No'way, No'ways, No'wise *adv. in no way, manner, or degree* कोणत्याही प्रकारें नाहीं, कोणत्याही रीतीनें नाहीं, बिलकूल नाहीं.

Noah (nō'a) [Heb. *nōakh*, rest.] *n.* नोहा *m* पृथ्वीवर अतिशय पाप झाल्यामुळें प्राचीन काळीं जो जलप्रलय झाला होता त्यांत नोहा व त्याचें कुटुंब हीं परमेश्वरानें तारवांत जिवंत राखलीं अशी यहुदी लोकांची समजूत आहे. ह्या तारवाची लांबी ३०० हात, रुंदी ५० हात व उंची ३० हात होती. See Genesis VI, VII VIII. [NOAH'S ARK नोहाचें तारूं *n* (ह्या नांवाची लहान मुलांची खेळण्याची पेटी). ह्यांत घोडा, गाढव, बैल वगैरे लांकडाचीं खेळणीं असतात. २ (*zool.*) तारवाच्या आकाराची -तारवासारखी शिंपली *f*. अशा शिंपलीला मराठींत 'नोहाचें तारूं' हेंच पारिभाषिक नांव द्यावें असें आम्ही ठरविलें आहे.] Noa'chian *a.* नोहाचा, नोहासंबंधीं. २ नोहाच्या वेळचा.

Nobility, See under Noble.

Noble (nō'bl) [Fr. *noble*, –L. *nobilis*, well-known.] *a. of high birth* कुलीन, उच्च कुलांतला, मोठ्या कुलांतला, अभिजात, बडेलोकांतला, अमीरलोकांतला, सरदारघराण्यांतला, आर्य, कुलवंत, सद्वंश. २ *exalted in rank, illustrious* मोठा, मोठ्या दर्जाचा, योग्यतेचा, घरच्या प्रतीचा, मोठ्या योग्यतेचा, प्रसिद्ध, नांवाजलेला, नांवारूपास चढलेला, नामांकित, श्रेष्ठ. [N. METAL, SEE METAL.] ३ *magnanimous, generous* उदार, उदार अंतःकरणाचा, मनाचा मोठा, थोर, प्रशस्त मनाचा, उदारमनस्क, प्रगल्भ. [N. IN REASON उदारधी, उदात्त विचारांचा.] ४ *magnificent, splendid* नामी, भव्य, उत्कृष्ट, अत्युत्कृष्ट, उमदा, मोठा, छानदार. [NOBLE-LOOKING उमदा, धीरदर्शन, महानुभावाकृति.] N. *n. a person of exalted rank* मानकरी *m*, पालखीपदस्थ *m*, अमीर *m*, उमराव *m*, सरदार *m*. २ *a European fish* 'नोबल' मासा *m*. Nobil'ity *n.* कुलीनपणा *m*, कुलीनता *f*, आर्यता *f*, खानदानी *f*, आभिजात्य *n*. २ मोठेपणा *m*, मोठा दर्जा *m*, योग्यता *f*, श्रेष्ठता *f*, प्रसिद्धि *f*, नांवलौकिक *m*. ३ उदारपणा *m*, मनाचा मोठेपणा *m*, थोरवी *f*, प्रगल्भता *f*, औदार्य *n*. ४ भव्यपणा *m*, उच्चता *f*, उत्कृष्टता *f*, छानदारपणा *m*, मोठेपणा *m*. ५ *dignity* वैभव *n*, सरदारी *f*, खानदानी *f*, अमीरी *f*. ६ *the persons holding the rank of nobles* अमीरउमराव *m. pl.*, मानकरी *m. pl.*, सरदारांचा वर्ग *m*. Nobil'iary *a. pertaining to the nobility* सरदारांसंबंधीं, सरदारांच्या वर्गासंबंधीं. N. *n. a history of noble families* सरदारी घराण्यांचा इतिहास *m*, सत्कुलेतिहास *m*. No'bleman *n.* मानकरी *m*, कुलीन *m*, सरदार *m*, अमीर *m*, उमराव *m*. No'blemen *n. pl.* No'ble-

minded *a.* उदारमनाचा, मनाचा मोठा, उदारधी. No'ble-mindedness *n.* मनाचा मोठेपणा *m*, औदार्य *n.* No'bleness *n.* उदारपणा *m*, औदार्य *n.* २ *excellence in quality* उत्कृष्टपणा *m*, श्रेष्ठता *f*, उत्तमपणा *m.* ३ *dignity* मोठेपणा *m*, वैभव *n.* ४ *greatness by birth or character* कुलीनता *f*, खानदानी *f.* ५ *worth* योग्यता *f*, लायकी *f*, श्रेष्ठता *f.* Nobless', Noblesse' *n. the nobility collectively* सरदारी घराणीं *n. pl.*, सरदारांचा वर्ग *m.* No'ble-woman *n. fem.* सरदारीण *f*, उमरावीण *f.* No'ble-women *n. pl.* No'bly *adv.* सरदारघराण्यांत (जन्मलेला); as, "N. born." २ मोठेपणानें, योग्यतेनें, श्रेष्ठतेनें. ३ उदारतेनें, उदारपणानें, उदारमनानें. ४ उत्कृष्ट रीतीनें -पणें -पणानें, छानदारपणानें, ऐटींत, ऐटीनें.

Noblesse, See under Noble.

Nobody ( nō'bod-i ) [ Formed of No and Body. ] *n. no body or person* कोणीही नाहीं, न कोऽपि (Sk.). २ *a person of no influence or importance* किरकोळ मनुष्य *m*, यःकश्चित् मनुष्य *m*, क्षुद्र मनुष्य *m.* No'bodies *n. pl.*

Nock ( nok ) [ See Notch. ] *v. t. to fit to the string* (तिरकमठ्याला दोरी बांधतां यावी म्हणून किंवा दोरींत बाण बसवितां यावा म्हणून) खांच *f.* पाडणें. २ *to string* धनुष्याला दोरी चढवणें.

Noctambulation ( nok-tambū-lā'shun ), Noctambulism ( nok-tam'bū-lism ) [ L. *nox*, Sk. नक्त, night, and *ambulare*, to walk. ] *n. sleep-walking* झोंपेंत चालणें *n*, निद्राचार *m*, निद्राभ्रमण *n.* Noctam'bulist *n.* झोंपेंत चालणारा *m*, निद्राचार (Sk.) *m.*

Noctambulism, See under Noctambulation.

Noctidial ( nok-tid'i-al ) [ L. *nox*, *noctis*, Sk. नक्त, night, & *dies*, Sk. दिव्, day. ] *a. comprising a night and a day* अहोरात्राचा, चोवीस तासांचा.

Noctivagant ( nok-tiv'a-gant ) [ L. *nox*, Sk. नक्त, night, & *vagari*, to wander. ] *a. wandering at night* रात्रीं भटकणारा, (रात्रींचा) भटक्या, निशाचर (humorous.); as, "N. adulterer." Noctivaga'tion *n.* रात्रीं भटकणें *n.* Noctiv'agous *a.* रात्रीं भटकणारा.

Noctograph ( nok'tō-graf ) [ L. *nox*, Sk. नक्त, night, & Gr. *graphein*, to write. ] *n. a writing frame for the blind* आंधळ्यांना लिहिण्यास शिकविण्याची पाटी *f.* ही पितळेची असते. ठसे जुळविण्याच्या पट्टीएवढी ही लहान असून तिला भोंकें भोंकें असतात. हिच्या खालीं कागद घालून दाभणासारखे टोंचे त्या भोंकांतून घालीत गेलें म्हणजे खालील कागदावर उठावाचीं टिंबें दिसतात. आंधळ्यांचीं मूळाक्षरें ह्या टिंबाटिंबाच्या परिभाषेंत ठरविलेलीं असतात. २ *an instrument for recording the presence of a night watchman on his beat* रातपाळीवाल्याची (गस्तीवरील) हजेरी दाखविणारें यंत्र *n.* हें यंत्र रातपाळीवाल्याच्या गळ्यांत अडकविलेलें असतें.

Noctuid ( nok'tū-id ) [L. *nox*, *noctis*, Sk. नक्त, night.] *n.* (*zool.*) रात्रीं उडणारे पतंग. यांच्या पुष्कळ जाती आहेत; परंतु त्यांना निरनिराळीं नांवें नाहींत.

Nocturn ( nok'turn ) [ Fr. *nocturne*, L. *nox*, *noctis*, Sk. नक्त, a night. ] *n. a religious service at midnight* रात्रीं बारा वाजतां करण्याची ठराविक उपासना *f.* २ *one of several services between midnight and dawn* सकाळ आणि मध्यरात्र ह्यांच्या दरम्यान करण्याच्या ठराविक उपासनांपैकीं एक, मध्यरात्रींची उपासना *f.*

Nocturnal ( nok-tur'nal ) [ Fr. *nocturne*, –L. *nox*, Sk. नक्त, night. ] *a.* रात्रींचा, रात्रीसंबंधीं. [ N. ARC (*astron.*) रात्रिचाप *m.* ( AS OPPO. TO DIURNAL ARC दिनचाप *m.*) N. EMISSION स्वप्नावस्था *f.* ] २ *done, held, or occurring by night* रात्रीं होणारा -घडणारा, रात्रिकालिक, नैश. ३ *having a habit of seeking food or moving about at night* रात्रिंचर, रात्रीं भक्ष्य शोधण्यासाठीं फिरणारा; as, "N. birds." ४ *capable of vision by night* रात्रींचें दिसणारा; as, " N. eyes." N. *n. an instrument for taking the altitude of stars &c. at sea* (ताऱ्यांचे) उन्नतांश मोजण्याचें यंत्र *n*, (तारवावरचा) उन्नतांशमापक *m.* Noctur'nally *adv.* रात्रीं, रात्रीस.

Nocturne ( nok-turn' ) [ Fr. *nocturne* –L. *nox*, Sk. नक्त, night.] *n. a painting showing scene by night* रात्रींचा देखावा दाखविणारें चित्र *n*, रात्रींचा देखावा *m.*

Nocturnograph ( nok'-tur-nō-graf ) [ L. *nox*, *noctis*, Sk. नक्त, night, and Gr. *graphein*, to write. ] *n.* (रात्रींचें काम मोजणारें) रातकामाचें घड्याळ *n.* कांहीं देशांत पाण्याचा पुरवठा सर्व गिरण्यांना दिवसाचा होऊं शकत नाहीं, म्हणून कांहीं गिरण्या दिवसास चालतात व कांहीं रात्रीस चालतात. अशा रात्रीं चालणाऱ्या गिरण्यांत हीं काम मोजणारीं घड्याळें असतात. हीं घड्याळें हिंदुस्थानांतील गिरण्यांत नाहींत.

Nod ( nod ) [ M. E. *nodden*, to wag. ] *v. i.* मान हालणें -हालवणें. २ *to bend the head in assent* होकारार्थीं मान हालवणें, होकारार्थीं मान डोलवणें. ३ *to salute by the quick motion of the head* मान लववून नमस्कार *m* -रामराम *m* -मुजरा *m* -सलाम करणें, मानेनें नमस्कार *m* -रामराम *m* -मुजरा *m.* करणें. [NODDING ACQUAINTANCE *a slight acquaintance extending no further than recognition by a nod* (माणसांची) तात्पुरती ओळख *f*, नमस्कारापुरती ओळख *f.* २ (with a subject) तात्पुरतें ज्ञान *n*, तुटपुंजें ज्ञान *n.*] ४ *to let the head drop in weariness* (थकल्यामुळें) पेंगणें, डुलकी घेणें -खाणें, डोकें टेंकणें, झेंबणें, डुलकणें, पेंगणी खाणें. [ HOMER SOMETIMES NODS *even the greatest mind is liable to mistake* मोठ्यांच्या हातूनही कधीं कधीं चुका होतात. ] N. *v. t. to incline* (मान) वांकवणें -डोलवणें -हालवणें. २ *to signify by a nod* मान हालवून -मानेनें (संमति वगैरे) दर्शविणें. Nodd'ed *pa.t.* &

m, मूर्ख m, टोणपा m; as, "Marriages between the most accomplished women and the veriest *oafs*."
Oaf'ish *a. idiotic, doltish* मूर्ख, मठ्ठ, गावंदी, मठ्या.

Oak (ōk) [ A. S. *ac*, oak. ] *n.* ओक वृक्ष *m.* ह्याच्या तीनशें जाती आहेत. ह्याच्या लांकडाचा जहाजें बांधण्याकडे उपयोग करतात. [ HEART OF O. शूर, दांडगा मनुष्य *m.* (b) (*esp.*) इंग्रज खलाशी *m.* ] Oak-apple Day, Royal Oak Day *n.* ओक ॲपलचा दिवस *m*, मे महिन्याची एकुणतीसावी तारीख *f.* ह्या तारखेला दुसऱ्या चार्लस् राजाचें लंडन शहरांत पुनरागमन झालें. ह्या पुनरागमनाच्या स्मरणार्थ त्या तारखेस इंग्लंडांतील मुलें आपल्या टोप्यांना ओक (ॲपल) फळें लावीत असत. Oak'-bark *n.* ओक वृक्षाची साल *f.* Oak'en *a.* (a) ओक वृक्षांनीं युक्त, ओकवृक्षमय. (b) ओकच्या पानांचा; as, "In O. bower." २ *made of oak* ओकवृक्षाच्या लांकडाचा केलेला. Oak'ling *n.* ओक वृक्षाचा रोपडा *m.* Oak'-paper *n. a paper for wall-hangings veined like oak* ओक वृक्षाच्या सालीप्रमाणें शिरा असलेला (भिंतीला डकविण्याच्या उपयोगाचा) कागद *m*, ओक -कागद *m.* Oak'y *a. like oak, firm* ओक वृक्षासारखा, बळकट. The Oaks (इंग्लंडांतील डर्बी, सेंट लेजर आणि धी ओक्स् ह्या तीन घोड्यांच्या प्रसिद्ध वार्षिक शर्यतींपैकीं १७७९ सालीं अर्ल आफ् डर्बीनें सुरू केलेली 'सरे' परगण्यांतील एप्समसधील लॅम्बटर्स् ओक्स् येथें होणारी) 'धी ओक्स्' नांवाची (बटांची) शर्यत *f.*

*N. B.* मराठी बायबलांत Oak ह्या शब्दाचें 'एला', 'अह्लोन', 'अह्ला', व 'एलोन' ह्या निरनिराळ्या शब्दांनीं भाषांतर केलेलें आढळतें.

Oakum (ōk'um) [ A. S. *acumba*, tow. Cf. *cemban*, to comb. ] *n. old ropes untwisted into hemp fibres* जुनीं दोरखंडें उसवून काढलेला काथ्या *m*, सण *m.* जहाजांत पाणी येऊं नये म्हणून सांध्यांत भरण्यासाठीं ह्या काथ्याचा उपयोग करितात. Oak'um-picking *n.* (a

task given to prisoners as punishment) सण खोलणें *n*, ताग पिंजणें *n*.

Oar (ōr) [A. S. *ar*; cog. with Gr. *eressein*, to row.] *n.* *a pole with a flat blade at one end for rowing* वल्हें *n*, वलें *n*, पतिंगा *m*, अवला *m*, अवलें *n*, क्षेपणी *f*, नौकादंड *m*, चाटू *m*. [BLADE OF AN O. चपणी *f*. SHAFT OF AN O. दांडी *f*, पतिंगा *m*. TO LIE ON THE OARS, TO LIE ON ONE'S OARS (वल्ह्यांवर हात टेंकून बसून) वल्हवणें बंद करणें-थांबविणें. २ *to take one's ease* विश्रांति घेणें. TO PUT IN ONE'S OAR, TO PUT ONE'S OAR IN (दुसऱ्यानें विचारल्याशिवाय आपणच होऊन -आगांतुकी करून) सल्लामसलत लादणें, मदत देणें- लादणें. २ (दुसऱ्याच्या कामांत) ढवळाढवळ करणें, दुसऱ्याच्या कारभारांत लुडबुडणें, लांडा कारभार करणें. TO SHIP OARS वल्हीं चढवणें. TO TOSS OARS (सलामीकरितां) वल्हीं उभीं धरणें. TO UNSHIP OARS वल्हीं काढून ठेवणें.] २ *wing, fin* पंख *m*, पक्ष *m*. ३ पंखा *m*, हात (*fig.*) *m*. ४ *an oarsman* वल्हेकरी *m*, अवलेकरी *m*, अवल्या *m*. O. *v. t.* *to impel by rowing* वल्हवणें, वलवणें, वल्हवून नेणें, वल्हवीत नेणें, वल्ह्यानें चालवणें -ढकलणें. O. *v. i.* वल्हवणें, वल्हें मारणें. Oar'ed *pa. t.* & *pa. p.* O. *a.* *furnished with oars* (chiefly used in compounds) वल्हीं असलेला, वल्ह्यांचा, वल्ह्यांनीं युक्त; as, "A four-oared boat." २ (*zool.*) *having feet adapted for swimming* वल्ह्यासारखे पाय असलेला (पक्षी). Oar'-footed *a.* वल्ह्यासारखे पाय असलेला. Oar'lap *n.* डोक्याशीं काटकोनांत ज्याचे कान उभे आहेत असा ससा *m*, वल्हेकानी ससा *m*. Oars'man *n.* वल्हेकरी *m*, अवल्या *m*, वल्हें मारणारा *m*. Oars'manship *n.* वल्हे-कऱ्याचें कसब *n*, वल्हें मारण्याचें -वल्हविण्याचें कसब *n*, वल्हवेगिरी *f*. Oar'y *a.* *having the form or use of oars* वल्ह्याच्या आकाराचा, पतिंग्याच्या आकाराचा, वल्ह्यासारखा, क्षेपण्याकार, वल्ह्याचें काम देणारा; as, "The swan's O. feet".

Oasis (ō'a-sis *or* ō-ā'sis) [Of Egyptian origin. L. & Gr. *oasis*, a resting place or dwelling.] *n.* *a fertile spot in a desert* (वाळवंटांतील) ओलाव्याची जागा *f*, ओलवण *f*. २ (*fig.*) *a place or occasion of relief from dreariness* (a) विश्रांतीची जागा *f*, विश्रांतिस्थान *n*, आरामस्थान *n*. (b) (दुःखामध्यें सांपडणारा) सुखाचा अवकाश *m*, सुखाचा प्रसंग *m*.

Oast (ōst) [A. S. *āst*, a kiln.] *n.* *a kiln to dry hops or malt* 'हाप्स' वाळविण्याची भट्टी *f*. २ तंबाकू सुकविण्याची भट्टी *f*. Oast'house *n.* भट्टीचा कारखाना *m*, भट्टीघर *n*.

Oat (ōt) [A. S. *āta*, oat.] *n.* (*bot.*) *a well-known cereal grass* (commonly used in the pl. and in a collective sense) ओटगवत *n*. (b) *its edible grain* ओटधान्य *n*, 'वट' *m*. हें घोड्यांना देतात किंवा त्याचें दळून पीठ करतात. ह्या पिठालाच Oat'meal असें ह्मणतात. [TO SOW ONE'S WILD OATS, *to act foolishly*

*and extravagantly in one's youth* ज्वानीच्या चैनी करणें, गध्धेपंचविशी गाजविणें.] Oat'en *a. consisting of an oat straw or stem* ओटगवताचा, ओटगवताचा केलेला; as, "An O. pipe". २ *made of oat-meal* ओटच्या पिठाचा केलेला. Oat'grass *n.* ओटगवत *n.* हें गुरांना घालतात.

Oaten, See under Oat.

Oath (ōth) [A. S. *ath*, an oath.] *n. a solemn affirmation appealing to God or divine things for its truth* शपथ *f*, आण *f*, सोगंद *f*, सोगण *f*. [OATH IN THE NAME OF (SOME) GOD देवाची शपथ *f*- आण *f*, (*pop.*) देवाचेण. O. OF ALLEGIANCE (राजाचे) हुकूम पाळण्याची शपथ *f*, स्वामिभक्तीची शपथ *f*. O. OF OFFICE जागा किंवा हुद्दा पतकरतांना घेण्याची शपथ *f*, हुद्याची शपथ *f*. O. OF SUPREMACY सर्वश्रेष्ठाधिकाराची शपथ *f*, सर्वश्रेष्ठत्वाची शपथ *f*. WITH AN O. शपथ वाहून, शपथ घेऊन-शपथपुरस्सर, शपथपूर्वक. TO ADMINISTER AN O. शपथ *f*-आण *f*. घालणें -देणें. TO SUBSTANTIATE BY O. शपथ घेऊन -शपथेनें दुजोरा देणें. TO TAKE AN O. शपथ *f*. घेणें, करणें-वाहणें-खाणें. TO TAKE THE O. AND ONE'S SEAT (निवडणुकीनंतर) शपथ घेऊन (औपचारिक रीत्या) पार्लमेंट सभेंत बसणें. THERE ARE VARIOUS FORMS OF TAKING AN O. AMONG THE HINDUS. SOME OF THEM ARE देवावरचें फूल उचलणें, बेलभंडार उचलणें, तुळस उचलणें, देवावर हात ठेवणें, घांटेखालीं उभें राहाणें, गंगाजळी घेणें-उचलणें, जोंधळे उचलणें, गाईचें शेंपूट धरणें OR वरपणें, पायावर हात ठेवणें.] २ *a careless or profane use of the divine name* (देवाच्या नांवाचा) निरर्थक उल्लेख *m*, निरर्थक उच्चार *m*, उगाच (घेतलेली) शपथ *f*. Oath'breaking *n.* शपथ मोडणें *n*, शपथभंग *m*. Oaths (ōthz) *n. pl.*

Obconic, Obconical (ob-kon'ik,-al) [L. *ob*, against, & Conical.] *a. inversely conical* व्यस्तशंक्वाकृति, शंकूच्या उलट आकाराचा.

Obcordate (ob-kor'dāt) [L. *ob*, & Cordate.] *a.* (*bot.*) हृदयाच्या उलट आकाराचें (पान), व्यस्तहृदयाकृति, व्यस्तहृदाकृति; उ. आंबोशीचें दळ.

Obduracy, See under Obdurate.

Obdurate (ob'dū-rāt) [L. *ob*, against & *durus*, hard.] *n. hardened in heart or feelings* कठोर मनाचा, कठोर हृदयाचा; पाषाणहृदयी, कठोर. २ *difficult to influence* (*esp.* in a moral sense), *stubborn* अनुतापविमुख, अनुतापपराङ्मुख बनलेला, खप्पी, निगरगट्ट, पापाग्रही, दुराग्रही, हट्टी, हेकेखोर. ४ *harsh, rough* कर्णकटु, कर्कश, कठोर. ५ *intractable* आडदांड, दांडगा, न वळवण्यासारखा. Ob'duracy, Ob'durateness *n. invincible hardness of heart* पाषाणहृदयता *f*, कठोरहृदयता *f*, कठोरपणा *m*, निर्दयपणा *m*. २ अनुतापविमुखता *f*. ३ आग्रहीपणा *m*, हेकेखोरपणा *m*, आग्रह *m*, हेका *m*, हटवादीपणा *m*, हटवाद *m*, हट्ट *m*. ४ कठोरता *f*, कर्णकटुता *f*, कर्कशपणा *m*. (५) दांडपणा *m*, आडदांडपणा *m*. Ob'durately *adv.* कठोरपणानें,

निर्दयपणानें. २ अनुतापविमुखतेनें. ३ हेकेखोरपणानें, आग्रहानें, हटवादानें, हट्टानें. ४ कर्कशपणानें, कठोरतेनें.

Obedience (ō-bē'di-ens) [L. *obedire*, to obey -*ob*, near, and *audire*, to hear.] *n. the act of obeying* हुकूम *m*-आज्ञा *f.* पाळणें -मानणें -ऐकणें, आज्ञापालन *n*, आज्ञानुवर्तन *n*, आज्ञाधारण *n*. [PASSIVE O. *unresisting and unquestioning obedience to authority* (देशांतील प्रस्थापित राजसत्तेचे) हुकूम मुकाट्यानें पाळणें *n* -मानणें *n* -ऐकणें *n*, विनतकार आज्ञापालन *n*.] २ *the state of being obedient* आज्ञाधीनता *f*, ताबेदारी *f*, हुकुमबरदारी *f*. ३ *willingness to obey commands* आज्ञातत्परता *f*. ४ *dutifulness* आज्ञाकारिता *f*, आज्ञाधारकता *f*. ५ *those who submit to some authority* (दुसऱ्याचा) हुकूम पाळणारे लोक *m.pl.*, ताबेदारलोक *m. pl.* Obe'dient *a. willing to obey* आज्ञाधारक, आज्ञापालक, ताबेदार, आज्ञेंत राहाणारा, आज्ञेंत वागणारा, आज्ञातत्पर. [OBEDIENT IN INTENSIVE SENSE IS TRANSLATED INTO MARATHI BY अर्ध्या वचनांतला, कह्यांतला, छापेखालचा, बगल्या, बुद्धीस लागलेला, विकलेला. TO BE O. TO कह्यांत -वचनांत -तिळीं असणें with *g.of o.*, गांठीस असणें, बुद्धीस लागणें.] Obe'diently *adv.* आज्ञाधारकतेनें, आज्ञाधारकपणें, आज्ञेंत राहून, आज्ञापालनपूर्वक, ताबेदार होऊन -म्हणून.

Obedient, See under Obedience.

Obeisance (ō-bā'sans) [Fr. *obeissance* -*obeissant*, pr. p. of *obeir*, to obey.] *n. a bow or act of reverence* नमन *n*, नमस्कार *m*, नमस्या *f*, प्रणाम *m*, प्रणति *f*, प्रणिपात *m*;-specifically नमस्कार *m*, रामराम *m*, दंडवत *m*, आशीर्वाद *m*, &c.-as made to a master or employer मुजरा *m*;-as made by or to Muhammadans or Europeans सलाम *m*;-as made to an idol, superior, &c. वंदन *n*;-as made to a teacher, &c. अभिवंदन *n*. [PROFOUND O. शिरसाष्टांग नमस्कार *m*, साष्टांग नमस्कार *m*, साष्टांग प्रणाम *m*. TO MAKE AN O. नमस्कार *m*-प्रणाम *m*-प्रणिपात *m*. करणें, नमणें.] Obei'sant *a. ready to obey* हुकूम पाळण्यास तत्पर, आज्ञापालनतत्पर. २ *reverent* (दुसऱ्याचा) मान ठेवणारा-राखणारा, विनयशील. ३ *servilely submissive* जोहुकूम करणारा, हातजोड्या, खुशामत्या.

Obelisk (ob'e-lisk) [Fr. *obelisk* -L. *obelisk*, Gr. *obeliskos*, *obelos*, a pointed pillar.] *n. a tall, four-sided tapering pillar* शंक्वाकार -निमुळता स्तंभ *m*, मनोरा *m*. २ (*print.*) *a dagger* (छापण्याची) † अशी खूण *f*. O. *v. t. to mark with an obelisk* † अशी खूण करणें. २ *to condemn as spurious or indelicate* असभ्य म्हणून रद्द करणें. Obelis'cal *a.* निमुळत्या स्तंभासारखा.

Obelus (ōb'-e-lus) [Gr. *obelos*, a spit.] *n. a mark thus †, like a dagger, used in a book to refer to a foot-note* (पृष्ठाच्या तळाशीं दिलेली टीप दाखविण्याकरितां केलेली) † अशी खूण *f*. [Also, sometimes called an obelisk.] Ob'eli *n. pl.*

Obese (ō-bēs') [L. *obesus*, eaten away, lean –*obedere*, –L. *ob*, & *edere*, Sk. अद्, to eat.] *a. fat* लठ्ठ. २ *fleshy* मांसाळ, मेद वाढलेला. Obese'ness *n.* पुष्टता *f*, लठ्ठपणा *m*. Obes'ity *n.* मेदोरोग *m*, मेदोवृद्धि *f*, मेदोवात *m*, मेदाधिक्य *n*.

Obesity, See under Obese.

Obey (ō-bā') [M. E. *obeyen* –O. F. *obeir* –L. *obedire*, to obey.] *v. t. to do as ordered or commanded* आज्ञा पाळणें, हुकूम मानणें -पाळणें, हुकमाप्रमाणें करणें- वागणें, आज्ञापालन *n* -आज्ञानुवर्तन *n.* करणें *g. of o.* २ *to submit to* मानणें, ऐकणें, आज्ञेंत- कह्यांत- वचनांत -हुकुमांत -सत्तेंत असणें *g. of o.*, अंकित असणें. [To O. IMPLICITLY *or* OBSEQUIOUSLY डोळा पाहून -कल पाहून -झोंक पाहून वागणें-चालणें.] ३ *to be governed by some power* (-च्या) कह्यांत -वचनांत असणें, (-ला) वश -अंकित असणें, (-च्या) आज्ञेंत -हुकमांत राहणें; as, "A ship O.s the helm." O. *v. i.* (*Bible*) *to yield obedience* (followed by *to*) (चें) ऐकणें -मानणें. Obey'ed *pa. t.* & *pa. p.* Obey'er *n.* आज्ञा पाळणारा *m*, आज्ञा मानणारा *m*, आज्ञापालक *m.* Obey'ing *pr. p.* & *v. n.* आज्ञा पाळणारा, हुकमाप्रमाणें करणारा -वागणारा, हुकूम बजावणारा.

Obfuscate (ob-fus'-kāt) [L. *ob*, near, & *fuscus*, brown.] *v. t. to darken* प्रकाश *m*-तेज *n*-कांति *f.* कमी करणें, पुसकटणें, पुसटणें. २ *to make less intelligible* दुर्बोध करणें, अस्पष्ट करणें. Obfusca'tion *n.* *the state of being darkened* तेजोनाश *m*, अंधुकपणा *m*; as, "The O. of the cornea."

Obit (ō'bit *or* ob'it) [Fr. *obit*–L. *obitus* -*obere*, to go, to meet–*ob*, against, and *ere*, to go.] *n.* (*obs.*) *death* मृत्यु *m*, मरण *n*. २ *the date of death* मृत्यूची तारीख *f*, मरणाचा दिवस *m*. ३ *funeral ceremonies* उत्तरक्रिया *f*, उत्तरकार्य *n*. ४ *an anniversary mass for the repose of a departed soul* (मृताच्या आत्म्याला शांति मिळण्याकरितां) निधनतिथीच्या दिवशीं म्हटलेला 'मास' *m*, निधनतिथिप्रार्थना *f*. ५ *a memorial service on the death-day of the founder of a college* (विद्यालयाच्या संस्थापकाच्या) निधनतिथीच्या दिवशीं (त्याच्या स्मरणार्थ) केलेली उपासना *f*. Obit'uarist *n.* मृत्युलेख लिहिणारा *m*, मृत्युलेखलेखक *m*. Obit'uary *n. a list or register of deaths* (originally in a monastery) मृत्यूंची यादी *f*, मयतयाद *f*, मृत्युसंख्यापत्र *n*. २ *an account of a deceased person* मृत्युलेख *m*. O. *a.* मृत्युसंबंधीं; as, "O. notice."

Obiter (ob'i-ter) [L. on the way.] *adv. by the way* कारण नसतांना, सहजासहजीं. [O. DICTUM, *passing remarks* निष्प्रयोजन विधानें. २ (*law*) *a judge's expression of opinion but not a binding decision* (निकाल देतांना) निकालाला अवश्य नाहीं असें (न्यायाधीशानें केलेलें) विधान *n*, निष्प्रयोजन विधान *n*.]

Obituarist, Obituary, See under Obit.

Object (ob′-jekt) [L. *ob*, in the way & *jacere*, to throw.] *n. a thing visible and tangible* **पदार्थ** *m*, **इंद्रियार्थ** *m*, **विषय** *m*, बाह्यार्थ *m*, वस्तु *f*, द्रव्य *n*. [AN EXTERNAL O. बाह्यार्थ *m*, बाह्यविषय *m*, इदंकारास्पद *n*. O. OF STUDY अभ्यासाचा विषय *m*, अभ्यासविषय *m*. O. OF WONDER चमत्कृतिविषय *m*. APPREHENSION OF O.S पदार्थपरिज्ञान *n*, विषयपरिज्ञान *n*.] २ (*fig.*) **विषयभाजन** *n*, **पद** *n*, **स्थान** *n*, **भूमि** *f*, **पात्र** *n*. [O. OF FAVOUR कृपापात्र *n*. O. OF HONOR मानभाजन *n*. O. OF LOVE प्रीतिपात्र *n*. DESERVING O. (OF CHARITY OR FAVOUR) दानपात्र *n*, कृपापात्र *n*, सत्पात्र *n*.] ३ *anything set or thrown before the mind* **(काल्पनिक) पदार्थ** *m*, **मनोविषय** *m*. ४ *that by which mind or any of its activities is directed, motive* **(प्रवर्तक) हेतु** *m*, **निमित्त** *n*, **कारण** *n*, **प्रेरणा** *f*, **चोदना** *f*, **प्रयोजन** *n*, **कार्य** *n*. ५ *end, purpose* **हेतु** *m*, **साध्य** *n*, **अन्तिम** *n*, **ध्येय** *n*, **पुरुषार्थ** *m*, **अर्थ** *m*, **आशय** *m*, **अभिप्राय** *m*, **उद्देश** *m*, **उद्दिष्ट** *n*, **तात्पर्य** *n*. [THE FOUR O. S (OF MAN) चतुर्विध पुरुषार्थ *m. pl.*, चतुर्वर्ग *m*. THEY ARE धर्म, अर्थ, काम AND मोक्ष. THE THREE O.S (OF HUMAN DESIRE &c.) त्रिवर्ग *m*, त्रिगण *m*. THEY ARE धर्म, अर्थ AND काम. ACCOMPLISHMENT OF AN O. फलप्राप्ति *f*, इष्टार्थप्राप्ति *f*, इष्टार्थसिद्धि *f*, इष्टसिद्धि *f*, कार्यसिद्धि *f*. ACCOMPLISHMENT OF ONE'S O. स्वार्थसिद्धि *f*. HAVING ONE O. *or* AIM एकरोखी, एकनिष्ठ. PRIVATE O. *or* END स्वार्थ *m*, स्वहित *n*. ONE WHO HAS ACCOMPLISHED HIS O. कृतकृत्य, कृतार्थ. TO ACCOMPLISH ONE'S O. इष्टार्थ साधणें, लाग साधणें *g. of s.*, काठी शिखरास लागणें *g. of s.* TO MISS ONE'S O. लाग फसणें -चुकणें *g. of s.* KEEP ONE O. IN VIEW एकच विषय पुढें मांडा, एक तत्वीं जीव धरा-ठेवा.] ६ (*gram.*) **कर्म** *n*. O. *v. t. to present in opposition* **आडवा करणें -आणणें**. २ (*fig.*) *to offer in opposition as a criminal charge or by way of accusation or reproach* **(दोष म्हणून-दोषरूपानें) पुढें करणें -आणणें, विरुद्ध आणणें.** (b) **अपवाद आणणें.** (c) **हरकत घेणें, अनुमोदन न देणें.** २ *to adduce as an objection or adverse reason* **आक्षेप घेणें, (-ला) आक्षेप काढणें, अपवाद** *m*. **घेणें.** O. *v. i. to oppose in words or arguments* (usually followed by *to*) **आक्षेप** *m*. **घेणें, तक्रार** *f*. **करणें-घेणें, हरकत** *f*- **अपवाद** *m*. **घेणें-सांगणें -करणें, अस्वीकार करणें, अनुमोदन न देणें -करणें, अडचण सांगणें, नाकबूल असणें -जाणें, न मानणें, शंका घेणें.** Object-glass *n*. **पदार्थाकडची कांच** *f*, **पदार्थाभिमुख काच** *m*. Object-lesson *n*. **वस्तुपाठ** *m*. २ **प्रत्यक्ष (अनुभव शिकविणारा) धडा** *m*. ३ **प्रत्यक्ष (शहाणपण शिकविणारा) अनुभव** *m*. ४ *the teaching of life* (esp. as to the penalty of misdeeds) **प्रत्यक्ष (व्यवहाराचा) धडा** *m*. Objec′tion *n. the act of objecting* **हरकत घेणें** *n*, **आक्षेप घेणें** *n*, **हरकत सांगणें** *n*, **हरकत** *f*, **तक्रार** *f*, **आक्षेप** *m*; as, "To pre-

vent agreement or action by O." २ *adverse reason or argument proposed* **शंका** *f*, **आशंका** *f*, **आक्षेप** *m*, **तकरार** *f*, **कोटि** *f*, **फांट** *m*, **आडवें** *n*. [POSSIBLE O. शक्य आक्षेप *m*, उत्थाप्याक्षेप *m*. A CAPTIOUS, FRIVOLOUS, PERVERSE O. क्षुद्र आक्षेप *m*, कुत्सित आक्षेप *m*, आडफांटा *m*, हुजत *f*. REMOVAL OF AN O. शंकेचें समाधान *n*, आक्षेपाचें निरसन *n*. ONE WHO STARTS OBJECTIONS हरकती घेणारा *m*, आक्षेपक *m*, सतरा फणगडे फोडणारा *m*. TO RAISE OBJECTIONS आक्षेप घेणें, शंका -कुतर्क काढणें, हरकती घेणें, हुजत घालणें, हुजतखोरी करणें, फणगडे *m. pl.* -फांटे *m. pl.* फोडणें, अडचणी *f. pl.* सांगणें, बयाद सांगणें -लावणें.] ३ *opposing ground, ground of hesitation or difficulty* **बाध** *m*, **बाधक** *n*, **हरकत** *f*, **दिक्कत** *f*, **अड** *f*, **गुंता** *m*, **प्रत्यवाय** *m*, **प्रतिबंध** *m*. ४ **दोष** *m*. Objec'tionable *a. liable to objection* **हरकत घेण्यासारखा, आक्षेप घेण्यासारखा, आक्षेपार्ह, सदोष, दूष्य, अपवाद्य, प्रतिषेधार्ह.** Objec'tionableness *n*. **सदोषता** *f*, **आक्षेपार्हता** *f*, **दूष्यता** *f*, **प्रतिषेधार्हता** *f*, **प्रत्यवाय** *m*, **दोष** *m*. Objec'tionably *adv*. **हरकत घेतां येईल अशा रीतीनें, आक्षेपार्हतेनें.** Object'ive *a. of or pertaining to an object* **पदार्थाचा, विषयाचा, इंद्रियार्थाचा -संबंधीं, बाह्यार्थाचा, पदार्थाश्रित.** २ (*metaph.*) *external, extrinsic* (opposed to *subjective*) **आधिभौतिक, वस्तुविषयक, बाह्यार्थसंबंधीं, बाह्यसृष्टिविषयक, (बाह्य) वस्तुजन्य, इंद्रियविषयक, इंद्रियग्राह्य, इंद्रियगम्य.** [Objective philosophy **इंद्रियग्राह्यविषयविज्ञान** *n*, **बाह्यसृष्टिविज्ञान** *n*.] ३ (*gram.*) **द्वितीयेचा, कर्माचा, कर्मपदविषयक.** O. *n*. (*gram.*) **द्वितीया विभक्ति** *f*. **द्वितीया** *f*, **कर्मपद** *n*. २ *an object glass* **पदार्थाभिमुख काच** *m*. ३ *objective point* **मान्याची जागा** *f*. (b) (by extension) **उद्दिष्ट स्थान** *n*, **उद्दिष्ट हेतु** *m*. Objec'tively *adv*. **इंद्रियग्राह्यतेनें.** Objec'tiveness, Objectiv'ity *n*. **इंद्रियग्राह्यता** *f*, **इंद्रियगम्यत्व** *n*, **मूर्तता** *f*, **मूर्तत्व** *n*, **विषयात्मकता** *f*, **बाह्यसृष्टिविषयता** *f*. Ob'jectless *a. purposeless* **हेतुरहित, हेतु नसलेला.** Objec'tor *n*. **हरकत घेणारा** *m*, **आक्षेपक** *m*, **तकरार करणारा** *m*, **अडथळे आणणारा** *m*.

Objection, Objective, Objector, } See under Object.

Objure (ob-jōōr') [L. *ob*, against, & *jurare*, to swear.] *v. i. to swear* **शपथ** *f*. **घेणें -खाणें.** Objura'tion *n*. (*R.*) *act of binding by oath* **शपथेनें बांधून घेणें** *n*.

Objurgation (ob-jur-gā'shun) [Fr. -L. *ob*, against, and *jurgare*, to sue at law, to quarrel with -*jus*, law, & *agere*, to drive.] *n. act of chiding* **दोष देणें** *n*, **बोल ठेवणें** *n*. २ *reprehension* **बोल लावणें** *n*, **दबकावणें** *n*. ३ *reproof* **निंदा** *f*, **ठपका** *m*, **आक्षेप** *m*. Objur'gate *v. t. to chide* **दोष देणें, बोल ठेवणें, बोल लावणें, दबकावणें.** २ **निर्भर्त्सना करणें, निंदा करणें, ठपका देणें.** Objur'gatory *a. containing censure*

निंदाप्रचुर, निंदायुक्त, दोषावह, कुत्सित; as, "The O. question of the Pharisees."

Objurgatory, See under Objurgation.

Oblanceolate (ob-lan'se-o-lāt) [L. *ob*, and Lanceolate.] *a.* (*bot.*) भाल्याच्या उलट आकाराचें (पान), व्यस्तप्रासाकृति [प्रास = Lance.].

Oblate (ob-lāt') [L. *oblatus*, spread out–*ob*, away, & *latus*, borne, carried.] *a.* (*geom.*) *flattened at the pole* (ध्रुवांकडे) दोहों बाजूंस चपटा, चापट. [O ELLIPSOID, O. SPHEROID (*geom.*) चापटगोल *m*, प्रथमाण्डगोल *m* (अण्डगोल=Spheroid.).]

Oblate (ob'-lāt) [L. *oblatus*, offered.] *v. t. to offer to god* देवाला अर्पण करणें. Ob'late *pa. p.* दिलेला, वाहिलेला, अर्पण केलेला, अर्पित, समर्पित. O. *n.* (in the R. C. Church) *a lay brother in a monastery* (दीक्षा न घेतलेला) मठबन्धु *m.* २ *a child dedicated to monastic life* (मठवासाला) वाहिलेलें मूल *n.* ३ *a man, or woman, belonging to a religious community, for works of charity* (परोपकार करण्याकरितां एखाद्या धार्मिक संस्थेस) वाहिलेला पुरुष किंवा स्त्री, धर्मदास *m.*

Oblation (ob-lā'shun) [Fr. *oblation* –L. *oblatio*, offering.] *n. anything offered in worship or sacred service, an offering* बलि *m*, *pop.* बळी *m*, देवोपायन *n*, देवोपहार *m.* [O. TO THE DEAD पिंड *m.*]

Obligate (ob'-li-gāt) [L. *ob*, & *ligare*, to bind.] *v. t.* (generally in *pass.*) *to bind* (by duty, contract, &c.) (वचनानें, कर्तव्यानें किंवा करारानें) बांधणें, बांधून -गुंतवून घेणें, गुंतवून टाकणें, गुंतवणें. Obliga'tion *n. the constraining power* (*of a promise or duty or law*) बंधन *n*, विधेयता *f*, कर्तव्यता *f*, अवश्यकर्तव्यता *f*, अवश्यकार्यता *f*, आवश्यकता *f*, बोजा *m.* २ *a duty* कर्तव्य *n*, कर्तव्याचा बोजा *m.* ३ *any binding act or agreement* (especially in a religious sense) वचन *n*, करार *m*, वायदा *m*, नियम *m*, प्रतिज्ञा *f*, अनुशासन *n.* [RELIGIOUS O. व्रत *n.* ONE WHO IS UNDER RELIGIOUS O. व्रती *m*, व्रतस्थ *m.* VIOLATING A RELIGIOUS O. व्रतभंग *m*, व्रतलोपन *n*, व्रतलोप *m.*] ४ *act of obliging* उपकार करणें *n.* ५ *state of being indebted for a favour* उपकारबद्धता *f*, उपकाराचा बोजा *m*, बांधलेपणा *m.* ६ *favour, benefit* आभार *m*, उपकार *m*, कृतोपकार *m*, एहसान *n*, मेहेरबानी *f*, दया *f.* [TO LAY UNDER O. (-ला) ऋणी करणें, उपकृत करणें.] ७ (*law*) *a bond containing a penalty in case of failure* (अटीचा) दस्तैवज *m.* Ob'ligated *pa. t.* O. *pa. p.* बांधलेला, गुंतलेला, बांधून घेतलेला. Ob'ligatorily *adv.* Ob'ligatoriness *n.* अवश्यकर्तव्यता *f*, अवश्यमंतव्यता *f*, आवश्यकता *f.* Ob'ligatory *a. binding* अवश्यकर्तव्य, अवश्यपालनीय, आवश्यक, (अमुक करावयास) भाग पाडणारा, (करणें) प्राप्त.

Obligation } See under Obligate.
Obligatory }

Oblige (ō-blī'j) [L. *ob*, and *ligare*, to bind.] *v. t. to bind or constrain* भाग पाडणें, भागास आणणें, (-ला) प्राप्त करणें. [To BE OBLIGED TO भागास येणें, भाग असणें, प्राप्त असणें, भार *m*. पडणें ALL WITH *in.con.*] २ *to bind by favours* उपकारानें बांधणें-बांधून घेणें, उपकारबद्ध-मिंधा-ऋणी करणें. ३ *to do a favour to* कृपा *f*-मेहेरबानी *f*-मेहरबानगी *f*-उपकार *m*. करणें with वर *of o*. Ob'ligable *a*. (R) (*to a promise*) वचनास जागणारा, शब्द खरा करणारा. Ob'liged *pa. t.* O. *pa. p. bound* भाग पाडलेला, बांधलेला, उपकारबद्ध, ऋणी, आभारी, उपकारी, उपकृत, लागला. Obligee' *n*. (*law.*) धनको *m*, सावकार *m*. Obli'ging *a. disposed to oblige or confer favours* उपकार करणारा, उपकारी, परोपकारी, उपकारशील. Obli'gingly *adv.* मेहरबानीनें, मेहरबानगीनें, उपकारबुद्धीनें. Obli'gingness *n*. मेहरबानगी *f*, मेहरबानी *f*, परोपकारबुद्धि *f*, परोपकारिता *f*, उपकारशीलता *f*. Obligor' *n*. (law) रिणको *m*.

Obligee }
Obliging } See under Oblige.
Obligor }

Oblique (ob-lēk') [Fr. -L. *obliqus -ob*, and *liquis*, bent, slanting.] *a. slanting* आडवा, तिरकस, तिरका, तिरपा, तिर्यक्. २ *not straightforward* वांकडा, वक्र. ३ *inclined at other than right angle* तिर्यक्, तिरका, विषम. [O. SPHERE तिर्यक् गोल.] ४ (*gram.*) *denoting any case except the nominative* कारकविभक्तीचा, कारकविभक्तिक, (प्रथमेशिवाय बाकीच्या) विभक्ति दर्शविणारा. [OBLIQUE CASE कारक *n*, कारकविभक्ति *f*.] ५ (*fig.*) *by insinuation* उपरोधाचा, उपरोधी, उपरोधिक, वक्र. [O. NARRATION *indirect narration* दुसऱ्याच्या भाषेंत सांगितलेला मजकूर *m*.] Oblique'ly *adv.* आडवा, तिरका, तिरकस, ओझरता, काकरता, कातरता, कसरता, कापता, कहाता, कातरा, तिर्यक्. २ उपरोधानें, अन्योक्तीनें, वक्रोक्तीनें, अडून. Obliquā'tion (*R.*), Oblique'ness, Obliq'uity *n*. तिरकेपणा *m*, वांकडेपणा *m*, आडवेपणा *m*. २ *a slanting direction* तिरवाई *f*, वांक or बांक *m*, वक्रता, तिर्यक्त्व *n*. [OBLIQUITY OF THE ECLIPTIC क्रांतिवृत्ताचें तिर्यक्त्व *n*.] ३ *deviation from moral rectitude* (सन्मार्गापासून) ढळणें *n*-च्युति *f*, विपथगमन *n*.

Obliquity, See under Oblique.

Obliterate (ob-lit'ėr-āt) [L. *obliteratum -ob*, over, & *litera*, a letter.] *v. t. to blot out* (memorics) पुसणें, पुसून टाकणें, (-वर) बोळा फिरविणें. [To BE OBLITERATED घसवटणें, उडणें, झडणें, बुजणें, पुसून जाणें.] २ *to destroy* (markings &c.) घसवटणें, उडवणें, बुझवणें, दिसेनासा करणें, नाहींसा करणें. O. *a*. (*zool.*) *scarcely distinct* (applied to the markings of insects) पुसट, अंधुक, लुप्त, घसटलेला, दिसेनासा झालेला.

Oblitera'tion *n.* पुसणें *n*, पुसून टाकणें *n*, बुझवणें *n*, उडवणें *n*, व्यामर्श *m.* २ *extinction* बुझालेलेपणा *m*, पुसलेलेपणा *m*, लोप *m.*

Oblivion (ob-liv'i-un) [ Fr. *oblivion* –L. *obliviscere*, to forget, from the root of *livere*, to become dark; hence to have the mind darkened, to forget. ] *n. the state of being utterly forgotten* विस्मरण *n*, विसर *m*, विस्मृति *f*, व्यामोह *m.* [ NOT FALLEN INTO O. उपस्थित, विस्मृति पंथास न लागलेलें (शास्त्र वगैरे). TO BURY IN O. विसरून जाणें.] २ *forgetfulness* विसराळूपणा *m*, विसर *m*, विस्मृति *f*, विस्मरण *n*, व्यामोह *m.* ३ *amnesty* (शिक्षेची) माफी *f*, (अपराधांची) माफी *f*, अपराधमोचन *n.* [ ACT OF O. (राजकीय गुन्हेगारांच्या) माफीचा ठराव *m.* ] Obliv'ious *a. causing forgetfulness* विसर पाडणारा, विस्मृतिकारक, विस्मारक; as, "O. antidote," २ ( with *of*) *forgetful* विसराळू, विसऱ्या, विसरणारा, विस्मरणशील. Obli'viously विसर पाडून. २ विसराळूपणानें. Obli'viousness *n.* विसराळूपणा *m*, विस्मरण *n*, विस्मृति *f.*

Oblivious, See under Oblivion.

Oblong (ob'long) [Fr. *oblong* –L. *ob*, over, & *longus*, long.] *a. longer than broad* लांबट, लांबोडा, लांबुडा, लांबोळा, लांबचौडा. २ आयत, दीर्घचतुरस्र. O. *n.* (*geom.*) आयत *m.* Ob'longish *a.* लांबोडसर. Ob'longly *adv.* Ob'longness *n.* लांबोडेपणा *m*, लांबोळेपणा *m*, चिंचोळेपणा *m.* २ आयतता *f.*

Obloquy ( ob'lo-kwi ) [L. *obloquium* –*ob*, against, & *loqui*, to speak.] *n. reproachful language* निंदोक्ति *f*, निंदा *f*, कुत्सा *f*, गर्हा *f*, अपवाद (S.) *m.*

Obmutescence ( ob-mū-tes'ens ) [L. *ob*, & *mutescere*, to become dumb –*mutus*, dumb.] *n. loss of speech* मुकेपणा *m*, वाक्स्तंभ *m*, वाग्रोध *m*, गतवाक्त्व *n.* २ *a becoming wilfully mute, speechless, or dumb* (आपण होऊन स्वीकारलेलें ) मौन *n*, अभाषण *n.*

Obnoxious ( ob-nok'shus ) [ L. *obnoxious*–*ob*, before, & *noxa*, hurt.] *a.* (*R.*) *liable, exposed* जोगा, योग्य, आधीन, पात्र. २ *hurtful, offensive* इजा करणारा, अपाय करणारा, दुःखदायक, पीडाकारक, त्रास देणारा, अनिष्ट, नावडता, नावडीचा, अप्रीतीचा, अप्रीतींतला, असंतोषकारक. ३ *liable to punishment* दंडास योग्य, दंडार्ह, दंड्य, दोषी. Obnox'iously *adv.* इजा करून, अपाय करून. २ त्रास देऊन-करून. Obnox'iousness *n.* अपकारिता *f*, अपायकारकता *f.* २ दण्डयोग्यता *f.*

Obovate ( ob-ō'vāt ) [ L. *ob*, & *ovatus*, from *ovum*, an egg. ] *a.* ( टोंकाशीं रुंदट आणि बुडाशीं चिंचोळें ) अंड्याच्या उलट आकाराचें (पान), व्यस्तांडाकृति; उ० 'रुद्राक्षाचें पान.'

Obscene ( ob-sēn' ) [ L. *obscenus*, ill-omened, disgusting. ल्याटिन भाषेंत हा शब्द 'अशुभ किंवा अमंगलकारक' ह्या अर्थी वापरीत असत. ] *a. indecent* (as conduct, speech, pictures, &c. ) बीभत्स,

बीभत्स रसाचा, विचकट, अचकटविचकट, चवनट, अभद्र, अमंगल, अवाच्य. २ *filthy, dirty* (as, attire) घाणेरडा, मळीण, हिडीस, हेंदरा. ३ *unholy* (rites &c.) बीभत्स, अभद्र (प्रकार, विधि वगैरे). ४ (of persons) विचकट, तोंडशिनळ, अचकटविचकट, तोंडाचा फटकळ. Obscen'eness, Obscen'ity *n.* बीभत्सपणा *m*, बीभत्सभाव *m*, बीभत्स रस *m*, विचकटपणा *m*, अचकटविचकटपणा *m*. २ *obscene speech* बीभत्स भाषण *n*, विचकट भाषण *n*. Obscen'itics *n. pl. obscene words* बीभत्स भाषण *n*. २ *obscene matters* बीभत्स प्रकार *m. pl.*

Obscurant, Obscurantism, See under Obscure.

Obscuration, See under Obscure.

Obscure (ob skūr') [Fr. *obscure* –L. *obscurus*, dark.] *a. dark, dusky, dim* झांकलेला, उजेड नसलेला, ओंघट, अंधुक, अंधक. २ *not distinct* अस्पष्ट, पुसट; as, "An O. view of remote objects." ३ *not clear or legible* अस्पष्ट, दुर्वाच्य, असुवाच्य, पुसकट, मळकट, दुर्दर्श; as, "An O. inscription." ४ *difficult to understand* दुर्बोध, अस्पष्ट, संदिग्ध, गूढार्थक, अस्फुट, खोल; as, "An O. passage." ५ *retired from observation* एकीकडचा, आडवळणाचा, आडवाटेचा, आडकुशीचा; as, "The O. corners of the earth." ६ *unknown to fame* अप्रसिद्ध, अविख्यात, सांधीकोंदींतला, कोपऱ्यांतला, गल्लीकुचींतला; as, "An O. person." (b) *humble, mean* गरीब, दरिद्री, कंगाल, केंविलवाणा, बापडा; as, "O base and O. vulgar." O. *v. t. to hide from view* झांकणें, झांकून ठेवणें, दिसेनासा करणें. २ *to darken* अंधुक करणें, प्रकाश -तेज कमी करणें. ३ *to make less plain* अवघड -दुर्बोध -कठीण -अस्पष्ट करणें, अस्पष्टता *f*-दुर्बोधता *f*. आणणें. (b) *to render doubtful* संदिग्ध करणें. Obscur'ant, Obscur'antist *n. one who labours to prevent enlightenment or reform* अज्ञानप्रिय *m* or *f*, ज्ञानप्रसाराच्या आड येणारा *m*, सुधारणाशत्रु *m*, ज्ञानप्रसारशत्रु *m*. Obscur'antism *n. opposition to reform* ज्ञानांधकारप्रियता *f*, ज्ञानप्रसारशत्रुता *f*, धार्मिकचर्चाविरोध *m*. Obscura'tion *n. the act of obscuring* दिसेनासा करणें *n*, झांकून टाकणें *n*. २ *the state of being obscured* दिसेनासा होणें *n*, तेज कमी होणें *n*, तेजोहानि *f*, तेजोऱ्हास *m*, प्रकाशक्षय *m*, कांतिक्षय *m*. (*b*) (*astron.*) (विशेषेंकरून सूर्य व चंद्र ह्यांच्या ग्रहणप्रसंगीं बिंबावर दिसणारा) कालिमा *m* or कालिमा *m*; as, "The O. of the moon in an eclipse." Obscured' *pa. t.* O. *pa. p.* झांकलेला, दिसेनासा केलेला, अंधुक केलेला. २ हतप्रकाश, क्षीणप्रकाश, निस्तेज. ३ अवघड केलेला, दुर्बोध केलेला, संदिग्ध. Obscure'ly *adv.* अंधुकपणानें, अस्पष्टतेनें, अस्पष्ट, अव्यक्त, झुंजुकमुंजुक. २ अप्रसिद्ध, अप्रसिद्धीनें. ३ आडकुशीस, एकोशास, एकोशीं, आडवळणीं. Obscur'ing *pr. p.* Obscur'ity, Obscur'eness *n. darkness, gloom* ओंघटपणा *m*, अंधुकपणा *m*, पुरुकेपणा *m*, अंधकत्व

*n*, मळभ *n*, अप्रकाश *m*, अल्पप्रकाश *m*. २ *want of clearness of meaning or expression* (अर्थाची किंवा शब्दांच्या रचनेची) दुर्बोधता *f*, अस्पष्टता *f*, अवघडपणा *m*, खोलपणा *m*, गूढता *f*, गहनता *f*. ३ *illegibleness* अदुर्वाच्यता *f*, अव्यक्तता *f*, पुसटपणा *m*. ४ *lonely condition, retirement* सांधीकोंदींत पडून राहणें *n*, अप्रसिद्धि *f*, अविख्याति *f*, एकान्तवास *m*.

Obscurity, See under Obscure.

Obsecrate (ob'sē-krāt) [L. *obsecratus–obsecrare*, to ask on religious ground; *–ob*, and *sacrare*, to declare as sacred *–sacer*, sacred.] (*R.*) *v. t. to beseech, to implore* विनंति करणें, विनवणें, हातापायां पडणें. Obsecra'tion *n. supplication* विनंति *f*, प्रार्थना *f*, विनवणी *f*.

Obsequies (ob'se-kwiz) [Lit. 'a following.' Fr. *obseques*–L. *obsequiae*, funeral rites,–*ob*, after, & *sequare*, to follow.] *n. pl.* (The singular is now seldom used) *funeral ceremonies* क्रिया *f*, उत्तरक्रिया *f*, और्ध्वदेहिक संस्कार *m. pl.*, (Specifically among the Hindus) उत्तरकार्य *n*, प्रेतसंस्कार *m*, क्रियाकर्मांतर *n*, कर्मांतर *n*, अंत्यकर्म *n*, अंत्यक्रिया *f*, अंत्येष्टि *f*, और्ध्वदेहिक *n*, अशुभकार्य *n*;—revilingly कारट *n*. [CONDUCTOR OR PERFORMER OF O. क्रिया सांगणारा *m*, कर्मांतऱ्या *m*;—revilingly कारटा or कारट्या *m*, प्रेत्या *m*.] Obse'quial *a.* और्ध्वदेहिक, उत्तरक्रियेचा-संबंधीं, क्रियाकर्मांतराचा. [O. FEES कारट *n*. ONE WHO TAKES O. FEES कारटा *m*, कारटखाऊ *m*. O. OFFERINGS &c. (AMONG THE HINDUS) श्राद्ध *n*.]

Obsequious (ob-sē'kwi-us) [Fr. –L. *obsequare*, to follow.] *a. cringing meanly servile* खुशामती, खुशामत्या, तोंडपुजा, आर्जवी, दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणें किंवा कलानें चालणारा, दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणारा, डोळे पाहून वागणारा, जी जी म्हणणारा करणारा, थुंकी झेलणारा, तोंडदेखलें बोलणारा, छंदानुरोधी; as, "An O. flatterer." [To BE O. डोळे पाहून वागणें. SOME PHRASES EXPRESSING THE SENSE TO BE SLAVISHLY SUBMISSIVE, TO BE OBSEQUIOUS, TO FOLLOW IMPLICITLY, TO BE LED BY THE NOSE, &c. ARE (-च्या) ओंजळीनें पाणी पिणें, (-च्या) मुठींत असणें, (-च्या) अर्ध्या वचनांत असणें.] २ (*R.*) *funeral* और्ध्वदेहिक, उत्तरकार्यांचा, &c.; as, "O. sorrow." Obse'quiously *adv.* खुशामतीनें, तोंडपुजेपणानें, आर्जवानें, तोंडासारखा *decl.*, डोळे पाहून, तोंडाकडे पाहून, आर्जव करून. Obse'quiousness *n.* खुशामतीपणा *m*, खुशामत *f*, आर्जवीपणा *m*, आर्जव *n*, तोंडपुजेपणा *m*, तोंडपुजेगिरी *f*, छंदानुरोध *m*.

Observance, Observant, Observation, Observatory, — See under Observe.

Observe (ob-zerv') [Fr. *observe* –L. *ob*, against, and *servare*, to save, to preserve, to keep, to heed, to

observe. ] *v. t.* (a) *to take notice of by appropriate conduct, to keep* पाळणें, आचरणें, करणें, मानणें, अनुष्ठान *n.* करणें *g. of o.*, अनुष्ठणें, उपासना *f.* करणें *g. of o.*, मानणें, राखणें, बाळगणें, साधणें, धरणें, (*specif.*) वसणें (said only of Hindu women); as, "To O. rules or commands." (b) *to comply with* पाळणें, राखणें, अनुसरणें, मानणें, करणें, ऐकणें; as, "To O. civility." २ *to watch, to subject to scientific observations* अवलोकन करणें, (अनुभवासाठीं) पहाणें, निरीक्षण करणें, निरखून पाहणें, दृष्टि लावणें *with* कडे *or* वर *of o.*, लक्ष-चित्त-ध्यान देणें-लावणें, लक्ष-चित्त-ध्यान देऊन-लावून पाहणें, नजरेस-दृष्टीस पडणें-येणें *in. con.* with *g. of s.*, दृष्टीखालीं येणें *in. con. g. of s.*, अवलोकनांत-पाहण्यांत-निरीक्षणांत-लक्षांत-ध्यानांत येणें *in. con.* ३ वेध घेणें; as, "To O. the stars". ४ *to utter as a remark* (शोधपूर्वक व टीकात्मक) अभिप्राय देणें, (अवलोकनपूर्वक-निरीक्षणपूर्वक) मत देणें. O. *v. i. to take notice* अवलोकन करणें, अवलोकणें, (-कडे) लक्ष देणें, (-कडे) लक्ष असणें-पहाणें. २ *to make a remark upon* (with *on* or *upon*) (अवलोकनपूर्वक-निरीक्षणपूर्वक) मत *n.*-अभिप्राय *m.* देणें. Observ'able *a. worthy or capable of being observed* निरीक्षणयोग्य, अवलोकनयोग्य, लक्षांत घेण्याजोगा, लक्षांत आणायाजोगता, अनुभव पाहाण्याजोगा. २ दृश्य, दृष्टिगोचर. ३ पाळण्यासारखा, अनुष्ठेय. Observ'ableness *n.* Observ'ably *adv.* Obser'vance *n. the act of observing with attention* पाहणें *n*, निरेखणें *n*, निरीक्षण *n*, अवलोकन *n*. २ *performance* पाळणें *n*, मानणें *n*, आचरणें *n*, पालन *n*, पाळणूक *f*, आचरण *n*, *speci.* अनुष्ठान *n*, वसा or ओंवसा ( with *v.* घेणें confined to Hindu women only ); as. "The O. of the Sabbath is general." ३ *rule of practice* आचारनियम *m*, आचार *m*, नियम *m*, निर्बन्ध *m*. ४ *a custom* प्रचार *m*, प्रघात *m*, संप्रदाय *m*, सांप्रदायिक विधि *m*. ५ *a religious rite* व्रत *n*, नियम *m*, नेम *m*. [FEMALE OBSERVANCES OR VOWS GENERALLY वाणवसा *m*. ONE WHO IS HOLDING SOME O. व्रती, व्रतस्थ, धृतव्रत. Obser'vant *a. taking notice, attentive* पाहणारा, लक्ष देणारा, निरेखणारा, निरखून पाहाणारा, लक्ष लावून पाहाणारा, लक्षपूर्वक पाहणारा; as, "An O. spectator." २ *submissively attentive* (-ला) मानणारा, (चें) ऐकणारा; as, "We are told how O. Alexander was of his master Aristotle." ३ *adhering to* (rules, ceremonies, &c.) पाळणारा, राखणारा, मानणारा, करणारा, अनुसरणारा, आचरणारा; as, "O. of rules." Obser'vantly *adv.* Observa'tion *n. the act of observing* पाहणें *n*, निरेखणें *n*, निरीक्षण *n*, अवलोकन *n*. २ *the faculty of observing* अवलोकन करण्याची शक्ति *f*, अवलोकनशक्ति *f*, निरीक्षणशक्ति *f*. ३ *the result of an act or acts of observing* (निरीक्षणापासून-अवलोकनावरून काढलेला) अभिप्राय *m*, दर्शनानुभव *m*, निरीक्षणपूर्वक अभिप्राय *m*. ४ (a) (सृष्टचमत्कारांचें) निरीक्षण *n*. (b) (ताऱ्यांचे वगैरे)

वेध. (c) प्रत्यक्ष अनुभव *m.* [TO TAKE AN O. (*naut.*) (ताऱ्यांचे) वेध घेणें.] Observa'tions *n. pl.* (शोधपूर्वक व टीकात्मक) अभिप्राय. Observa'tional *a. pertaining to observation* निरीक्षणविषयक, निरीक्षणाचा, अवलोकनाचा, अवलोकनशक्तीचा, वेध घेण्याचा. २ *consisting of or containing observations* अवलोकनात्मक, निरीक्षणात्मक, दृगनुभवाचा, दृगनुभवात्मक; as, "O. science." Obser'vatory *n.* वेधशाळा *f*, अवलोकनस्थल *n*, निरीक्षणस्थल *n*. Observ'ed *pa. t. & pa. p.* Observ'er *n.* पाहणारा, अवलोकननिरीक्षण करणारा. २ पाळणारा (नियम वगैरे.). ३ वेध घेणारा. Observ'ing *pr. p.*

Obsess (ob-ses') [L. *ob*, in the way, & *sedere*, to sit.] *v. t. to beset, assail, or harass* (*like a besieging force or an evil spirit*) (वेढा देणाऱ्या सैन्याप्रमाणें किंवा पिशाच्चाप्रमाणें) घेरणें, पछाडणें, पकडणें, सतावणें, सतावून टाकणें, त्रस्त करणें. २ (in modern use *esp.*) *to haunt and trouble as a fixed idea* (एकाच कल्पनेनें) पछाडणें, घेरणें, वेडें करणें, वेधणें. Obsessed' *pa. t.* O. *pa. p.* वेधलेला, घेरलेला, पछाडलेला, सतावलेला, वेडा केलेला. Obsess'ion *n. the complete possession of the mind* (*by some influence, notion or idea*) घेरणें *n*, पछाडणें *n*, वेधणें *n*.

Obsolescent, See under Obsolete.

Obsolete (ob'so-lēt) [L. *ob*, against, & *solere*, to be wont.] *a. gone out of use* लुप्त, लुप्तप्रयोग, व्यवहारांतून गेलेला, प्रचारांतून गेलेला, प्रचारांत नसलेला, रूढ नसलेला, चालू नसलेला, रद्द, अव्यवहारित, वाळ. २ (*biol.*) *not clearly marked or developed* लुप्तप्राय. Obsoles'cent *a. going out of use* लुप्त होणारा, प्रचारांतून (हळूहळू) नाहींसा होणारा. २ (of organ) *gradually disappearing* हळूहळू नाहींसा होणारा, लोपणारा. Ob'soleteness *n.* लोप *m*, लुप्तता *f*, लुप्तप्रयोगता *f*, अव्यवहारित्व *n*, प्रचारलोप *m*, रद्दपणा *m*, वाळ *f*. Ob'soletism *n. a disused word or phrase* प्रचारांतून गेलेला शब्द *m*, रूढ नसलेला वाक्प्रचार *m*, लुप्त शब्द *m*, लुप्तवाक्प्रचार *m*.

Obsoletism, See under Obsolete.

Obstacle (ob'sta-kl) [Fr.–L *obstaculum–ob*, in the way of, & *stare*, Sk. स्था, to stand.] *n. a hindrance* अडथळा *m*, अटकाव *m*, आडकाठी *f*, अड *m*, *f*, अडती *f*, अडकें *n*, नड *f*, नडाव *m*, अडखूळ *f*, आडफांटा *m*, खेंव *m*, वेध *m*, बाध *m*, बंदी *f*, हरकत *f*, मोडा *m*, मोडती *f*, विघ्न *n*, *m*, प्रतिबंध *m*, प्रतिबंधक *n*, अंतराय *m*, व्याघात *m*, व्याक्षेप *m*, व्यवधान *n*, विघात *m*. [O. RACE *one in which obstacles are placed in the way of competitors* अडचणीची शर्यत *f*.]

Obstetric,-al (ob-stet'rik,-al) [L. *obstetricius-obstetrixicis*, a midwife, a female that stands before or near,–*ob*, before, & *stare*, Sk. स्था, to stand.] *a. pertaining to midwifery* गर्भविद्येचा-संबंधीं, सुईण-

पणाचा सुविणपणाचा, गर्भमोचनसंबंधीं, गर्भमोचनविषयक, प्रसूतिकरणाचा-संबंधीं. [ O. HOSPITAL बाळंतपणाचें इस्पितळ *n.* O. WARD इस्पितळांतील बाळंतिणींचा खण *m.* ] Obstet'rics *n. sing. science of midwifery* गर्भविद्या *f*, सूतिकाशास्त्र *n*(?) (b). प्रसूतिकरण(?). Obstetric'ian *n. one skilled in obstetrics* प्रसूतिवैद्य *m*, सूतिकावैद्य *m*, सूतिकाशास्त्रवेत्ता *m*, गर्भविद्यानिपुण *m*, प्रसूतिकरणकुशल *m.* Obstet'rix *n. fem. a midwife* सुईण.

*N. B.* Strictly speaking, Obstetrics=गर्भविद्या; and Midwifery=प्रसूतिकरण; but in popular language Obstetrics is promiscuously rendered by गर्भविद्या and प्रसूतिकरण both. Obstetrics is wider in scope than midwifery.

Obstinacy, See under Obstinate.

Obstinate ( ob'sti-nāt ) [ L. *obstino-atum–ob*, in the way *of*, & *stare*, Sk. स्था, to stand.] *a. unyielding, stubborn* हट्टी, हट्टखोर, हट्ट घेणारा, हेंकट, हेंकेखोर, खळ घेणारा, अटीचा, अडखोर, अडील, अडेल, हटेला, खणपट्या, दुराग्रही, आग्रही, खळवादी, हटवादी. २ (of diseases) *not easily subdued or remedied* कृच्छ्रसाध्य, कष्टसाध्य, आंगीं खिळलेला, रेंवलेला, जडावलेला. Ob'stinately *adv.* हट्टानें, हट्ट घेऊन, हेका घेऊन, आग्रह धरून, आग्रहानें, हेक्यानें, दाटवळें, बळें. Ob'stinacy, Ob'stinateness *n. stubbornness* हट्टीपणा *m*, हेंकटपणा *m*, हठ *m*, हट *m*, हेका *m*, आग्रह *m*, दुराग्रह *m*, खणपट *f*, हटवाद *m.*

Obstipation ( obsti-pā'shun ) [ L. *ob*, against, & *stipare*, to crowd. ] *n. the action of blocking or stopping* ( मार्ग किंवा द्वार ) अडवून धरणें *n*, रोखणें *n*, प्रतिबंध करणें *n*, प्रतिबंध *m*, अवरोध *m.* २ ( *med.* ) *obstinate costiveness* तीव्र बद्धकोष्ठता *f*, तीव्र मलावरोध *m.* ह्यांत एखादे वेळीं बस्तीचा सुद्धां उपाय चालत नाहीं.

Obstreperous ( ob-strep'ėr-us ) [ L. *obstreperus,–ob*, and *strepere*, to make a noise.] *a. clamorous, noisy* ओरड्या, कलकल्या, गलबल्या, गलगल्या, बोलभांड, गोंगाटाचा; as, "The O. orator" Obstrep'erate *v. i.* गलबला करणें, गोंगाट करणें, एकच दंगल करून देणें. Obstrep'erously *adv.* गलगा-गलबला करून, गलबल्यानें, गोंगाट करून. Obstrep'erousness *n. clamour* गलबला *m*, गलबल *f*, गोंगाट *m*, दंगल *f.*

Obstriction ( ob-strik'shun ) [L. *obstringere, obstrictum*, to bind to or about. ] *n. the state of being mentally or morally bound, an obligation* (मनानें किंवा नीतीनें) बांधलेलें असणें *n*, (तात्त्विक) बंधन *n*, नैतिक बंधन *n*; as, "Religious *obstrictions.*"

Obstruct (ob-strukt') [ L. *ob*, in the way of, & *struere*, to pile up. ] *v. t. to block up* अडविणें, बंद करणें, रोधणें, अवरोधणें, कोंडणें, कोंडून टाकणें, बुझवणें, बुझणें, रोध *m*-अवरोध *m*-विरोध *m.* करणें.

२ (a) *to hinder from passing, to impede* अडथळा *m.* करणें, अडवणें, अटकावणें, (-ला) नडणें, बाधणें, रोधणें, अवरोधणें. (b) गतिरोध *m*-प्रतिरोध *m*-प्रतिबंध *m*-अटकाव करणें. Obstruct'ed *pa. t.* O. *pa. p.* अडथळा केलेला, रोधलेला, अवरोधलेला, कोंडलेला, रुद्ध. २ *impeded* अडवलेला, अटकावलेला, रुद्ध, प्रतिबद्ध, कुंठित. Obstruc'tion *n. act of blocking up* रोधणें *n*, कोंडणें *n*, मुंदणें *n*, रोधणूक *f*, कोंडणी *f*, अडवण *f*. २ *state of being blocked up* रोध *m*, अवरोध *m*, निरोध *m*, विष्टंभ *m*. ३ *act of retarding* अडथळा *m*. करणें, अडवणें *n*, अटकावणें *n*, रोधणें *n*. ४ *state of being retarded* अडथळा *m*, अटक *f*, अटकाव *m*, अटकावा *m*, गुता or गुंता *m*, खोटी *f*, रुद्धता *f*, प्रतिबद्धता *f*, प्रतिरोध *m*, रोध *m*, प्रतिबंध *m*, हरकत *f*, अवरोध *m*. ५ (*med.*) अवरोध, कोंडून जाणें, विबंध *m*. ६ *obstructing or impeding cause* अड *f*, अटक *f*, नड *f*, नडाव *m*, आडफांटा *m*, आडकाठी *f*, प्रतिबंध *m*, व्यवधान *n*. ७ *persistent opposition to the progress of business in Parliament, Committees, &c.* (पार्लमेंट सभेच्या किंवा पार्लमेंटरी कमेट्यांच्या) कामाला एकसारखा अडथळा करणें. Obstruct'ionist *n.* व्यत्यय आणणारा, अडथळे आणणारा *m*. Obstruct'ive *a. tending to obstruct* रोधणारा, कोंडणारा, बुझवणारा, रोधक, अवरोधक. Obstruct'ive *n. one who opposes progress* अडथळा करणारा, रोधणारा, कोंडणारा *m*, बुझवणारा, रोधक, अवरोधक *m*, अवरोधकर्ता *m*. Obstruct'ively *adv.* Ob'struent *n.* ( *med.* ) *anything that obstructs*, (*esp. in the passage of the body*) अवष्टंभक (औषध)*n*. Obstruc'tor ( less correctly obstruc'ter) *n.* अडथळे आणणारा *m*, व्यत्यय आणणारा.

Obstruction, Obstructionist, See under Obstruct.

Obstruent, See under Obstruct.

Obtain (ob-tān') [Fr.–L. *ob*, & *tenere*, to hold.] *v. t. to procure by effort, to gain* मिळविणें, संपादणें, पावणें, जोडणें, (-ला) प्राप्त होणें. O. *v. i. to be established, to continue in use* चालणें, चालू असणें, प्रवृत्ति *f*- &c. होणें-असणें-राहणें-पडणें. Obtain'able *a. that may be procured* मिळवायाजोगा-जोगता-सारखा &c., प्राप्तव्य, प्राप्य, लभ्य, उपलभ्य, समासाद्य. [Easily or readily O. सुलभ, सुसाध्य, सुप्राप्य.] Obtained' *pa.t.* O. *pa. p.* मिळवलेला, संपादिलेला, प्राप्त, संपादित, आपन्न, संपन्न. Obtain'er *n.* मिळविणारा, संपादक, संपादनकर्ता *m*. Obtain'ment *n. act of obtaining* मिळविणें *n*. संपादणें *n*, पावणें *n*, संपादणी *f*, संपादणूक *f*, संपादन *n*. २ *state of having obtained* प्राप्ति *f*, संप्राप्ति *f*.

Obtest ( ob-test' ) [ L. *obtestari*, to call as a witness, –*ob*, before, & *testis*, a witness. ] *v. t.* (R) *to call upon ( as a witness )* साक्षीकरितां बोलावणें. (२) *to beg for* विनंती करणें.

Obtrude (ob-trōōd') [L. *obtrudere* –*ob*, before, & *trudere, trusum*, to thrust. ] *v. t. to thrust in upon*

(*when not wanted*) (जरूर नसतां) पुढें पुढें ढकलणें, बळेंच देणें-घालणें-शिरवणें-पुढें करणें, धसकणें, घुसविणें, (बळेंच) पदरीं बांधणें, पदरीं घालणें. [To O. ONE'S SELF पुढच्या पुढें करणें, आपलें घोडें *n.* पुढें ढकलणें.] O. *v. i. to thrust one's self or be thrust upon* घुसणें, घुसडणें, शिरणें, न बोलवितां येणें-जाणें, दत्त म्हणून येणें-जाणें, अनाहूतागमन *n.* करणें. Obtru'ded *pa. t.* O. *pa. p.* बळेंच घातलेला -घुसवलेला -शिरवलेला -पुढें केलेला. Obtrud'er *n.* पुढेंपुढें करणारा, घुसणारा, अनाहूत येणारा, न बोलावितां येणारा, घुशा, लुबरा, लुडबुड्या. Obtrud'ing *pr. p.* Obtru'sion *n. a thrusting in or upon against the will of* बळेंच घुसणें *n.* शिरणें *n*, बळेंच पुढें करणें *n*, बळेंच घालणें *n.* २ *officious meddling* लुडबुड *f*, लुबलुब *f*, बुचा कारभार *m*, लांडा कारभार *m.* Obtrus'ive *a. disposed to thrust one's self among others* घुसणारा, न बोलावतां येणारा, घुशा, लुबरा, लुडबुड्या. Obtrus'ively *adv.* Obtrus'iveness *n.* लुबरेपणा, लुडबुडेपणा *m*, लांडा कारभार *m.*

Obtund (ob-tund') [L. *obtundere*, to blunt.] *v. t.* (*med*). *to blunt, to deaden* (क्षोभ-वितवीत-खाज-कंड) कमी करणें, बोंथट करणें, धार मोडणें, बधिर करणें, नरम करणें, बोंथवणें, मुंढवणें, बसाविणें. as, "The sense of smell is *obtunded.*" Obtund'ent *n.* (वितवीत किंवा कंड) शमविणारें औषध *n*, कंडूशामक *n.* (b) क्षोभशामक. Obtund'er *n.* (*med.*) क्षोभ कमी करणारें औषध *n*, क्षोभशामक.

Obtunder, See under Obtund.

Obtuse (ob-tūs') [Fr. *obtuse*, –L. *obtusus–obtundere*, to blunt, –*ob*, against, & *tundere*, to beat.] *a. blunt, not pointed* बोंथट, बोंथा, बिनअणीचा, बिनकोंचीचा, मुंढा, अनग्र, निरग्र, अतीक्ष्ण. २ (*bot.*) *blunt or rounded at the point*, (*as a leaf*) अग्रहीन, अनग्र (उ. पोपटवेलीचें पान.). ३ *stupid* जड, मंद, ठोसर बुद्धीचा, स्थूलबुद्धि, मंदमति, मतिमंद, ढ, सुस्त. ४ (*geom.*) (काटकोनापेक्षां) मोठा, विशाल, अधिक. Obtuse'ly *adv.* obtuse'-ang'led, Obtuse'–ang'ular *a.* विशालकोन असलेला. Obtuse'ness *n.* बोंथेपणा *m*, मुंढेपणा *m*, निरग्रता *f.* २ जडपणा *m*, मंदपणा *m*, ठोसरबुद्धि *f*, स्थूलबुद्धि *f*, मंदमति *f*, जाड्य *n.*

Obverse (ob-vers') [L. *obversus*,-*ob*, towards, and *vertere*, to turn.] *a.* (*bot.*) *having the base narrower than the top* शेंड्यापेक्षां बुडखा लहान असणारें (पान), न्यूनतल. Ob'verse (note accent) *n. the side of a coin containing the head or principal symbol* (opposed to Reverse) नाण्याचा मुखवट्याकडची बाजू *f.* २ *another aspect of a fact already considered* दुसरी बाजू *f*, आवश्यक बाजू-बाब *f.* Obver'sion *n.* (*log.*) प्रतियोग *m.*

Obversion, See under Obverse.

Obviate (ob'vi-āt) [L. *obvio* -*ob*, in the way of, and *viare*, *viatum*, to go,–L. *via*, a way. Ob'viate

ह्याचा धात्वर्थ 'रस्त्यांत किंवा मार्गांत भेटणें-मिळणें' असा आहे.] *v. t. to prevent, to remove* (as difficulties) दूर करणें, बाजूस सारणें, निवारणें, वारणें, टाळणें, चुकविणें, घालवणें, निवारण *n* -वारण *n* -निवृत्ति *f.* &c. करणें. Ob'viated *pa. t.* O. *pa. p.* निवारलेला, टाळलेला, निवारित, वारित. Ob'viating *pr. p.* निवारणारा, टाळणारा, निवारक, निवारणकर्ता, निवारणकारी. Obvia'tion *n.* निवारण करणें, निवारण *n.*

Obvious (ob'vi-us) [L. *obvius.* Obvious ह्याचा धात्वर्थ 'मार्गांत पडलेला किंवा स्पष्ट' असा आहे.] *a. easily understood, evident* उघड, उघडा, स्पष्ट, व्यक्त, चटकन् ध्यानांत येण्यासारखा, प्रत्यक्ष, सुव्यक्त. Ob'viously *adv.* उघड, साफ, स्पष्ट, धडधडित, निवळ, साक्षात्, प्रत्यक्ष, प्रत्यक्षतः. Ob'viousness *n.* उघडपणा *m*, उघडेपणा *m*, स्पष्टता *f*, प्रत्यक्षता *f.*

Obvolute (ob'vō-lūt), Obvoluted (ob'vō-lūt-ed) [L. *obvolutus-ob,* and *volvere,* to roll.] *a.* (*bot.*) *rolled or turned in* बाहेर गुंडाळलेला, बाहेर वळवलेला, बहिर्वलित.

Occasion (ok-kā'zhun) [Fr. *occasion* –L. *occasio, occido* –*ob,* in the way of, & *cadere, casum,* to fall.] *n.* (*R.*) *occurrence, happening* घटना *f*, घडणें *n*, वेळ *f.* २ *an event* गोष्ट *f*, वृत्त *n.* ३ *special time, season, or circumstance* प्रसंग *m*, समय *m*, अनुकूळ वेळ *f*, अवसर *m*, जागा *f, m*, स्थान *n*, काम *n*, द्वार *n*, जरूरी *f.* [A. SINGLE O. *or* TIME प्रसंग *m*, खेप *f*, समय *m*, वेळ *f*, वक्त *m.* UPON O. प्रसंगविशेषीं. प्रसंगोपात. UPON THE SPUR OF THE O. ऐनप्रसंगीं. TO TAKE OCCASION BY THE FORELOCK संधीचा-प्रसंगाचा फायदा घेणें, संधी वायां न दवडणें. २ (पुढें येणाऱ्या अडचणींची) अगाऊच तरतूद करणें.] ४ *accidental cause* कारण *n*, प्रयोजन *n*, हेतु *m*, निमित्त *n*, उपाधि *f.* [ONE WHO SEEKS OCCASION निमित्तखोर. TO SEEK OCCASION प्रसंग *m* -योग्य वेळ *f.* पाहणें. (b) निमित्तास टेंकणें.] ५ *incidental need* कारण *n*, काम *n*, प्रयोजन *n*, जरुरी *f*, गरज *f*, दरकार *f*, उपयोग *m.* [NO O. *no need to* (-ला) गरज-कारण नाहीं. TO HAVE O. *to have cause to* (-ला) कारण असणें.] Occa'sion *v. t. to cause indirectly* (अप्रत्यक्ष) प्रयोजन *n* -कारण *n* -निमित्त *n.* होणें *in. con.*, कारणभूत-निमित्तभूत-होणें *in. con.* २ *to produce, to effect* उत्पन्न करणें, आणणें, उभारणें, उपस्थापन *n* -उपस्थिति *f.* करणें, उपस्थित-प्रयुक्त करणें. Occa'sional *a. occurring only at times* कधींमधींचा, केव्हांकेव्हांचा, केव्हांकेव्हांचा, कधींकधींचा. २ *resulting from accident* अनियतकारणक, आगंतुक, अनित्य, कदाचित्क, विरलागत. ३ *produced on some special event* नैमित्तिक, प्रासंगिक, सामयिक, प्रसंगप्राप्त, प्रसंगोत्पन्न, प्रसंगागत, प्रसंगोपस्थित. [OCCASIONAL CHAIR नकशीकाम केलेली खुर्ची. O. TABLE नकशीकाम केलेलें सुरेख लहानसें मेज. O. CAUSE प्रासंगिक कारण.] Occa'sionalism *n.* प्रासंगिक कारणवाद *m.* Occa'-

sionally *adv.* कधींकधीं, कधींमधीं, केव्हां केव्हां, केव्हां केव्हां, कधींकाळीं. २ प्रसंगानें, निमित्तानें &c., प्रसंगानुसार, यथाप्रसंग, निमित्तवशात्, प्रसंगवशात्, प्रसंगानुरूप, प्रसंगोपात्त *pop.* प्रसंगोपात. Occa'sioned *pa. t.* O. *pa p.* उत्पन्न केलेला &c., निमित्तक (in compo. as, पापनिमित्तक दंड, &c.), प्रयुक्त (in compo. as, पापप्रयुक्त दुःख, उपवासप्रयुक्त ज्वर, &c.), प्रयोजित, उत्पादित, उत्पन्न, समुदित. Occa'sioner *n.* प्रयोजक *m*, घडवून आणणारा, उत्पन्न करणारा *m.* Occa'sioning *pr. p.* उत्पन्न करणारा, प्रयोजक. O. *n.* घडवून आणणें, उत्पन्न करणें, उत्पादणें *n.* &c., उपस्थापन *n.*

Occasionalism, See under Occasion.

Occident (ok'si-dent) [Fr. –L. *occidens,–entis, pr. p.* of *occidere*, to fall down.] *n. the western quarter of the sky, the west* आकाशाचा पश्चिमभाग, पश्चिमदिशा. २ (opposed to *orient*) (formerly) *Europe, opposed to Asia* युरोप *m*, युरोपखंडांतील देश *m*. ३ (now) *the western hemisphere* पश्चिम गोलार्ध. Occiden'tal *a. western* पश्चिमेचा, पाश्चात्य, पश्चिमेकडील देशाचा, पश्चिमेकडील देशांतला. २ *relatively less precious as a gem* कमी किंमतीचा, हलक्या दराचा-प्रतीचा, कमी पाण्याचा; as, "These O. stones." O. *n.* (oppo. to *oriental*) पश्चिमेकडील देशांत राहणारा, पाश्चात्य (रहिवाशी), पाश्चिमात्य. Occiden'talise *v. t. to cause to conform to western ideas or characteristics* पाश्चात्यमतांचा अनुयायी करणें, पाश्चात्य सुधारणा सुरू करणें, पाश्चात्य संवयी लावणें, पाश्चात्य करणें. Occiden'talism *n. habits, etc. of occidental people* पाश्चात्य लोकांच्या संवयी, चालीरीती वगैरे, पाश्चात्य रीतरिवाज *m. pl.* Occiden'talist *n. a student of occidental languages* पाश्चात्य भाषांचा अभ्यास करणारा, पाश्चात्यभाषाकोविद. २ *an individual belonging to an oriental country, who favours western ideas, customs &c.* (पौर्वात्य देशाचा रहिवाशी परंतु) पाश्चात्य कल्पनांचा अनुयायी, (रीतरिवाजांत, मतांत वगैरे) पाश्चात्य बनलेला पौर्वात्य, briefly पाश्चात्य-पौर्वात्य. Occident'ally *adv.*

Occiput (ok'si-put) [L. *ob*, over, against, and *caput*, the head.] *n. the back part of the head or skull* डोक्याचा मागला भाग *m*, मस्तकाचा पृष्ठभाग *m*, शिरःपृष्ठ *n*, शिरःपृष्ठभाग *m*, शीर्षपृष्ठ *n.* [LEFT OC'CIPITO-ANTERIOR वामपुरतःशिरःपृष्ठस्थिति *f.* RIGHT OC'CIPITO-POSTERIOR दक्षिणपश्चाच्छिरःपृष्ठस्थिति. *f.*] Occip'ital *a. pertaining to the occiput* शिरपृष्ठासंबंधीं, डोक्याच्या मागल्या भागांतील. [O. ARTERY शिरःपृष्ठधमनी *f.* O. BONE शीर्षपृष्ठास्थि *n.*]

Occlude (ok-klōōd') [L. *occludere*, –*ob*, before, and *claudere*, to shut.] *v. t. to shut or stop up so as to prevent anything from passing in, out, or through, to obstruct a passage* बंद करणें, कोंडणें; as, "To O. the larynx." २ *to prevent the passage*

दिवस झाले. ] Oth'erwhere *adv. elsewhere* दुसऱ्या ठिकाणीं-जागीं-स्थळीं, अन्यत्र, इतरत्र. Oth'erwhile, Oth'erwhiles *adv. at other times* दुसऱ्या वेळीं. २ *sometimes* कधीं, कधींकधीं. Oth'erwise *adv. in another way or manner* दुसऱ्या रीतीनें, अन्य प्रकारानें, निराळा *decl.*, वेगळा *decl.*, अन्यथा, अन्यत्, इतरथा. २ *by other causes* दुसऱ्या अन्य-कारणानें, कारणांतरें करून. ३ *else* नाहींतर, अन्यथा, एरवीं. ४ *in other respects* एरवीं, नाहींतर, त्यावांचून, वरकडाविषयीं.

Otherwise, See under Other.

Otirrhœa, Otorrhœa (ōtor-rē'a) [ Gr. *otos*, ear, & *rein*, to flow. ] *n.* कानांतून पू वाहणें *n*, कान फुटणें *n*, कर्णस्राव *m*.

Otitis, (ō-tī'tis) [ Gr. *otos*, ear, & *-itis*, inflammation ] *n.* कर्णदाह *m*.

Otology (ō-tol'ō-ji) [ Gr. *oths*, *otos*, the ear, & *logos*, discourse. ] *n.* कर्णरचनाविद्या *f*, कर्णविद्या *f.* ह्या विद्येंत कानाची रचना व कानाचे विकार ह्यांचा विचार केलेला असतो.

Otoscope (ō'tō-skōp *or* ot'ō-skōp) [ Gr. *otos*, ear, & *skopein*, to see. ] *n.* कान तपासण्याचें यंत्र *n*, कर्णदर्शक *n*.

Otter (ot'ėr) [ Lit. the 'water-animal,' A. S. *otor*, *oter.* ] *n. a large kind of weasel living entirely on fish* पाणमांजर *n*, जलमार्जार *m*, उद्र *m*, पानीयनकुल *m*.

Otto (ot'o), Ottar (ot'ar) [ Ar. *itr–atira*, to smell sweetly. ] *n. a fragrant oil obtained from certain flowers esp. the rose* अत्तर *n*. [ PHIAL OR VESSEL FOR O. अत्तरदाणी *f*-नी *f*. VENDER OF O. अत्तार *m*, अत्तारी, अतार. IN OLD TIMES IN INDIA THESE अत्तार S WERE OUR MANUFACTURING CHEMISTS. ]

Ottoman (ot'o-man) [ From *Othman* or *Osman*, the founder of the Turkish Empire. ] *a. pertaining to the Turkish Empire, founded by Othman in 1299* आटोमनचा, आटोमन राज्यासंबंधीं. O. *n. a Turk* तुर्क *m*, आटोमान. २ (पुष्कळ माणसें बसविण्याची ) आटोमन नांवाची बिनपाठीची खुर्ची *f.* ३ ( करगोट्याची वगैरे ) आटोमन नांवाची रेशमी दोरी.

Ought (awt) [ A. S. *ahte*, pay. Ought हा शब्द मूळचा owe ह्या क्रियापदाचा भूतकाळ आहे; व म्हणून ought ह्या शब्दाचा मूळ अर्थ 'परत करण्याची अगर परत देण्याची जबाबदारी असलेला' असा आहे. Ought हें साहाय्यकारी क्रियापद नसून मुख्य क्रियापद आहे, व ह्याच्या पुढें सामान्यार्थी क्रियावाचक लिहिण्याचा प्रघात आहे. जसें, I ought to go ह्या वाक्यांत to go हें सामान्यार्थी क्रियावाचक आहे. Ought हें वर्तमानकालीन व ( b ) भूतकालीन कर्तव्य दाखवितें; जसें, I ought to go मला गेलें पाहिजे; ( b ) I ought to have gone मला जावयास पाहिजे होतें. ] *v. i. to be bound in duty or by moral obligation* ( कर्तव्यानें

किंवा नीतीनें ) बांधलेलें असणें, (-वर) बोजा असणें, बंधन असणें; as, "We then that are strong O. to bear the infirmities of the weak." Rom XV. i. २ *to be necessary* आवश्यक असणें, जरूर असणें, प्राप्त असणें, भाग असणें, पाहिजे; as, "O. not Christ to have suffered these things?" Luke XXIV. 26.

*N. B.*:—बहुतकरून पुष्कळ वाक्यांत Ought ह्याच्या बद्दल Should आणि Should ह्याच्याबद्दल Ought हा शब्द घातला तरी चालतो. परंतु त्यांच्या अर्थांत अगदींच फरक नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ you should do so, त्वां असें करावें म्हणजे असें करणें तुझ्या हिताचें आहे, असें करशील तर तुला बरें पडेल; you ought to do so त्वां असें करावें, म्हणजे असें करावें हा तुझा धर्म आहे.

Ounce ( owns ) [ L. *uncia*, twelfth of a pound. Abbreviation Oz. ] *n.* ( Troy weight ) पौंडाचा बारावा हिस्सा *m*, औंस *m.* २ ( in avoirdupois ) पौंडाचा सोळावा हिस्सा *m*, अडीच तोळे *m. pl.*, औंस *m.* ३ *fig. a small quantity* औंस, थोडासा भाग; as, "An O. of practice is worth a pound of theory."

Our ( owr ) [ A. S. *ure* for *usere*, genitive *pl.* of 1st personal pron. ] *a.* and *pron.* आमचा, आपला, अस्मादिकांचा, अस्मदीय. Our ( possessive of we ) आमचा. Our-self, *myself* ( as, a King or Queen would say ) आमचा. Ourselves' *pl. we, not others* आम्हीं, आपण.

Ourang -outang, Same as Orang-outang.

Oust ( owst ) [ O. F. *oster*, to remove —L. *haurio, haustus*, to draw. ] *v. t. to eject or expel* हुसकावून देणें, (जागेवरून-अधिकारावरून) हांकलून देणें -घालवून देणें, काढणें, काढून देणें -टाकणें, निखळणें, उखडणें, उखळणें, तळी *f* &c. उचलणें *g. of o.*, मेखा *f. pl.* -खुंटी *f.* &c. उपटणें *g. of o.* Ousted *pa. t.* O. *pa. p.* हांकलून दिलेला, हुसकावून लावलेला, काढलेला. Oust'er *n.* हुसकावून देणारा, काढणारा. २ ( *law* ) (एखाद्या स्थावर इस्टेटीच्या मालकास हुसकावून लावून त्याच्या मिळकतीचा) बेकायदेशीर रीतीनें व अन्यायानें कबजा घेणें *n.*

Out ( owt ) [ A. S. *ute, ut*; Ger. *aus*; Sk. उत्, out. ] *adv. without, not within* बाहेर, बाहेरच्या बाजूला; as, "Please, go *out*". २ *in a state of extinction* गेलेला, विझालेला, मालवलेला; as, "The lamp is *out.*" [To FLAP OUT पालवणें, पदर देणें. To GO OUT जाणें, विझणें, राम म्हणणें. To PUT OUT विझवणें, मालवणें, निरोप *m.* देणें.] ३ *in a state of exhaustion* संपलेला, सरलेला, खपलेला. [ To BE OUT खपणें, संपणें, अटपणें, सरणें, दिवाळें *n.* निघणें -वाजणें, भदें *n*-टाळ *m*-घंटा *f.* &c. वाजणें *g. of s.*, ठणठणाठ *m*-खडखडाट *m.* &c. होणें *g. of s.*, बियाण्यास नसणें.] ४ *completely, to the end* पुरा, पुरता, पूर्णपणें, शेवट, शेवटपर्यंत, साद्यंत, संपेतोंपर्यंत; as, "Hear me *out.*" ५ *freely* मोकळेपणीं; as, "To speak *out* one's mind." ६ *at a loss* गोंधळलेला, बावरलेला; as. "I have forgot my part and I am

*out.*" ७ *not in office or employment* (अधिकारावरून -कामावरून) निघालेला, निराळा (कामा-&c. निराळा) वेगळा, (कामा-&c., वेगळा)? as, "Democrats went *out* and the Whigs came in." [ONE WHO IS OUT OF EMPLOYMENT रिकामा, बेकार, बेरोजगार.] ८ *audibly, loudly* मोठ्यानें; as, "To cry O." ९ *publicly* प्रसिद्धपणें, उघड, उघडपणीं; as, "He gave *out* 500 rupees in charity." १० *in error, at fault* चूक, चुकीचा. [TO BE OUT चुकणें, चकणें, फसणें, ठकणें. OUT AND OUT (*adv.*) *completely* पूर्णपणें, सर्वतोपरीं, सर्वस्वीं. OUT AND OUT *a. without any disguise, absolute* पूर्ण, बनलेला, अट्टल, पुरा पुरा; as, "*Out and out* villain." DAY IN, DAY OUT, *day by day, every day* दिवसेंदिवस, हळूहळू, काळ लोटत गेला तसा.] Out *n.* (a) बाहेरचा, बाहेरच्या बाजूला असलेला. (b) *one who is out of office* अधिकारावर नसलेला. (In this sense the word is used generally in the *pl.*) २ *an open space* उघडी जागा *f*; as, "The *ins and outs* of a question साद्यंत हकीगत." ३ (*print.*) *a word or words omitted* (by a compositor) मजकूर जुळतांना (जुळाऱ्यानें) सोडलेला शब्द *m.* [TO MAKE AN O. मजकूर सोडणें—वगळणें.] Out *v. t. to expel, to eject* (देशांतून) बाहेर घालविणें-काढणें, हांकलून देणें; as, "A king *outed* from his country." Out *v. i. to come out, to become public* बाहेर पडणें-फुटणें, प्रसिद्ध होणें, उघडकीस येणें; as, "The truth will *out.*" The combination of *of* with *out* is considered as a preposition and it denotes with verbs of movement or action, *from the interior of, beyond the limit, from,* &c. [O. AND AWAY, *by far* कितीतरी पटीनें, फार. O. OF CHARACTER, *improper* अयोग्य, न साजेसा, न शोभणारा. O. OF CONCEIT WITH See under conceit. OUT OF COURSE, *out of order* नित्याला सोडून, परिपाठाला सोडून. O. OF DATE *antiquated* जुना, जुनापुराणा, गतकालिक. O. OF DOOR, O. OF DOORS घराबाहेरील, मोकळ्या हवेंतला. O. AT ELBOWS गरिबींत, कंगाल स्थितींत. O. OF TOUCH WITH -शीं संबंध-दळणवळण नसलेला. O. OF FAVOUR मर्जीतून उतरलेला, नावडता, इतराजी झालेला. O. OF FRAME नादुरुस्त, मोडलेला, बिघडलेला. O. OF HAND हाताबाहेरचा, हातांत नसलेला. O. OF HARM'S WAY संकटापासून दूर, लांब, सुरक्षित ठिकाणीं. O. OF JOINT घडी बिघडलेला, मोडलेला, उलगडलेला, नादुरुस्त, विस्कळित. O. OF MIND विसरलेला, लक्षांतून गेलेला. २ *beyond the limit of memory* आठवणीच्या पलीकडचा, फार प्राचीन, स्मरणकालातीत; as, "Time *out of mind.*" O. OF ONE'S HEAD डोकें फिरलेला-ठिकाणावर नसलेला, वेडा, भ्रमिष्ट. O. OF ONE'S TIME सज्ञान, जाणता, वयांत आलेला, व्यवहारदशेला पोंचलेला. O. OF ORDER मोडलेला, बिघडलेला, विस्कळित, नादुरुस्त. O. OF PLACE अस्थानीं, अयोग्य, न शोभणारा. O. OF POCKET चणचण असलेला, ओढ असलेला. O. OF PRINT छापील कोरी प्रत बाजारांत न

मिळणारा, अनुपलब्ध, न मिळणारा (ग्रंथ). O. OF THE QUESTION अविचार्य, विचारांत न घेण्यासारखा. O. OF REACH आटोक्याबाहेरचा, न मिळण्या-लाभण्यासारखा. O. OF SEASON, *untimely, inopportune* अकालीं, अवेळीं. O. OF SORTS, *unwell* तब्येत विघडलेला, आजारी. O. OF TEMPER चिडलेला, रागावलेला. O. OF TIME फार लौकर, फार उशिरां. O. OF TUNE, *not in harmony* बेताल, तालाला सोडून, न जमणारा, न जुळणारा, साधर्म्य नसणारा. (cf. IN TUNE WITH THE INFINITE अनंताशीं साधर्म्य असलेला.) O. OF USE माजी, जुना, पुरातन, गतकालिक. OUT OF THE WAY (a) *on one side* एका बाजूला, कोनांत. (b) *improper, wrong* अयोग्य, चुकीचा. O. TO O. एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत. O. OF THE WOOD सुरक्षित, संकटांतून मुक्त. TO PUT OUT OF THE WAY ठार मारणें, जीव घेणें. Out *interj.* छत्त! चल! जाव! हित्त! [O. ON *or* UPON, *shame upon, away with* धिक्कार असो! जा, चालता हो! as, "*Out on* you".]

**Out-bal'ance** *v. t. to exceed in weight, effect, advantage, &c.* (वजनांत, परिणामांत, व इतर बाबतींत) जास्त-अधिक-भारी भरणें-असणें *with* हून or पेक्षां *of o.*

**Out-bid'** *v. t. to offer a higher price than another* (किंमतींत) चढ *m.* करणें-टाकणें-बोलणें, (किंमत *f.* वगैरे) अधिक &c. बोलणें. Outbid', Outbade' *pa. t.* Outbid', Outbid'den *pa. p.* Outbid'ding *pr. p.* Out-bid'der *n.* (किंमत) चढविणारा.

**Out-brave'** *v. t. to bear down by more daring or insolent conduct* अधिक धीट -सवाई धीट-&c. होणें-होऊन दाबणें- दडपणें, शेरास सव्वाशेर होणें-होऊन दाबणें -दडपणें, धिटाईवर धिटाई *f.* करणें *g. of o.*, अधिक धिटाईनें किंवा उर्मटपणानें दडपून टाकणें, दडपणें, अधिक धिटाईनें कःपदार्थ समजणें.

**Out-braz'en** *v. t. to bear down by impudence* धिटाईनें चढ *m.* करणें, धिटाईचा चढ करणें, धिटास सव्वाधीट होणें.

**Out'break** *n. eruption* प्रादुर्भाव *m*, स्फोट *m*, (आग) लागणें *n*, सुरवात होणें, सुरू होणें *n*, सुरवात *f*; as, "The O. of cholera." २ *insurrection* बंड *n*, दंगा *m*; as, "Mobs and *outbreaks*."

**Out'building** *n. an outhouse* (मुख्य घराच्या जवळचें) बाहेरघर *n*, पाकेरघर *n*.

**Outcast** *a.* (persons) घरांतून घालवून दिलेला, गांवा-मुलखानें सोडलेला, घरदार नसलेला, उडाणटप्पू. २ (things) फेंकून दिलेला, टाकून दिलेला. O. *n. a homeless vagabond* घरांतून घालवून दिलेला मनुष्य *m*, उडाणटप्पू *m*. २ *a person banished* हद्दपार केलेला मनुष्य *m*. ३ बाहेर फेकून दिलेला गाळ, कचरा, पातेरा वगैरे; as, "A nobleman made a large pond in the solid clay and burnt all the O."

**Outcaste** *a.* जातींतून गेलेला, जातींतून उठलेला, जातींतून घालवलेला, ज्ञातींतून घालवलेला, जातबाहेर केलेला,

वाळीत टाकलेला, जातींतून काढून टाकलेला, जातिबहिष्कृत, जातिभ्रष्ट, जातिबाह्य, अपंक्त, पंक्तिबाह्य, वाळ, वाळीत. O. *n.* जातिबहिष्कृत मनुष्य, जातिभ्रष्ट मनुष्य *m.* O. *v. t.* जात बाहेर करणें, वाळींत टाकणें, पंक्तिबाह्य करणें.

Outclassed' *a.* पुरापुरा चीत केलेला, पुरा पाडाव केलेला.

Out'come *n. the issue, consequence, result* निष्पन्न *n*, निष्पत्ति *f*, फळ *n*, परिणाम *m*, निष्कर्ष *m*.

Out'cry *n. loud cry of distress* रड *f*, ओरड *f*, बोंब *f*, बोभाटा *m*, रडारोई *f*, धाय (फोडणें-मोकलणें), आकांत *m*, आक्रोश *m*. [VEHEMENT AND CAUSELESS O. अकांडतांडव *n*.] २ *clamour against* -च्या नांवाची बोंब *f*, -च्या नांवानें बोंब *f*, हाकाटा *m*, हाकारा *m*, बोभाट *m*, बोभाटा *m*. [GENERAL O. AGAINST बोंबाबोंब *f*, जनापवाद *m*. TO RAISE AN O. AGAINST -च्या नांवें बोंब *f*. मारणें-करणें.] ३ *a confused noise* गलबल *f*, गलबला *m*, गोंगाट *m*, कल्लोळ *m*, कोलाहल *m*. ४ (R) *a public auction* लिलांव *m*, *n*.

Outdo' *v. t. to surpass* मागें-पाठीमागें टाकणें - पाडणें-सांडणें, चढ *m*-ताण *f*-सरशी करणें with वर *of o.*, उणें *n*. आणणें. Outdid' *pa. t.* Outdone *pa. p.*

Outdoor (owt'dōr) *a. outside the door or the house* घराबाहेरचा, घराबाहेरला. २ *in the open air* मोकळ्या हवेंतला, उघड्या -खुल्या हवेंतला. [O. EXERCISE उघड्या हवेंतला व्यायाम. O. GAMES घराबाहेरचे खेळ, उघड्या हवेंतले खेळ *m. pl.*] ३ (संस्थेच्या किंवा कारखान्याच्या) बाहेरचा. Out'doors *adv.* बाहेर, बाहेरच्या बाजूस, उघड्या हवेंत.

Outer (owt'ėr) [Comparative of *Out.*] *a. external* (opposed to *inner*) बाहेरचा, बाहेरला, बाहेरील, बाहेरल्या बाजूचा or ला, बाहेरल्या कडला, बाहेरल्या आंगचा, बहिर्भागींचा, बाह्य, बहिर्भागस्थ, बहिर्भूत. २ इंद्रियगोचर, दृश्य, बाह्य. [O. BODY दृश्य शरीर, बाह्य शरीर *n*. O. WORLD दृश्य विश्व *n*. २ *people outside one's own circle* आपल्या कक्षेबाहेरचे लोक.] Out'ermost *a.* सर्वांच्या बाहेरचा, सर्वांच्या शेवटचा, अगदीं शेवटचा.

Outface', Same as Out-brave.

Outfield' *n.* (*cricket*) *that part of the field farthest from the batsman* (क्रिकेटमैदानावरील) ब्याटवाल्यापासूनची अगदीं लांबची जागा *f*.

Out'fit *v. t. to equip* प्रवासी सामानाची तयारी करणें, प्रवासी सामान पुरविणें. O. *n. the act of making ready every thing required for a journey or a voyage* प्रवासी अगर सफरीच्या सामानाची तयारी करणें *n*. २ *the articles and equipment required for an expedition* प्रवासी सामान *n*. ३ *the expenses for fitting out* प्रवासी सामानाचा खर्च *m*. ४ *the means for an outfit* प्रवासी सामानाचें साहित्य *n*. ५ (*fig.*) *mental outfit* साहित्य *n*, तयारी *f*. Out'fitter *n.* प्रवासी (कपडे-पेट्या-टोप्या वगैरे) सामान

तयार करणारा *m*, प्रवासी सामानाची तयारी करणारा *m*, प्रवासी सामानाचा व्यापारी; as, "Theirs is a firm of tailors and O.s".

Out'go *v. t. to exceed in swiftness* मागें -पाठीमागें टाकणें-पाडणें-सांडणें. २ चढ *f*· सर *f*· करणें with वर *of o*. Outgo *n. expenditure* (oppo. to *income*) खर्च *m*, व्यय *m*. २ (*R.*) *outward product* निपज *f*. ३ *outlet, means of egress* बहिर्मार्ग *m*, बाहेर जाणें *n*. Out'going *a. departing* (oppo. to *incoming*) निघून जाणारा, बाहेर जाणारा, बाहेरदेशीं जाणारा; as, "An O. steamer".

Outgrow' *v. t. to surpass in growth* वाढीनें मागें पाडणें-टाकणें, वाढीस चढणें with हून *of o*., वाढीचा चढ करणें with वर *of o*. २ *to grow out of, to grow too large for* वाढून-वाढीनें दाटता-दाट करणें *with* ला *of s.*; as, "To O. clothing." Out'growth *n. that which grows out of a thing* (दुसऱ्या वस्तूपासून झालेली) वाढ *f*, फांदी *f*, शाखा *f*, वृद्धि *f*· २ परिणाम *m*, निकाल *m*. ३ *growth to excess* अतिशय वाढ *f*. ४ बाहेर पडणें *n*.

Out-Herod (out-Her'od) [In allusion to the acting of the part of King Herod as a cruel tyrant, in old mystery plays.] *v. t. to exceed in wickedness* क्रूरपणांत किंवा दुष्टपणांत एखाद्यावर ताण करणें, क्रूरपणाची -दुष्टपणाची कमाल करणें; as, "To *out-Herod* Herod."

Out'house *n. a small building outside a dwelling house* पडघर *n*, पडशाळा *f*, (मोठ्या घराजवळचें) चाकरलोक वगैरे राहण्याचें घर *n*, नोकरघर *n*.

Outing *n*. चैनीचा प्रवास *m*, मजेचा प्रवास *m*.

Outknave' *v. t. to exceed in knavery* ठकास ठक भेटणें, ठकास सवाई ठक भेटणें, ठकबाजीवर ठकबाजी करणें, ठकबाजीचा चढ करणें, (-च्यावर) लुचेगिरीची ताण करणें.

Outlander (owt'-land-er) *n. a foreigner* परदेशांतील मनुष्य *m*, परदेशीय *m*, परदेशी *m*. २ *a stranger* परका मनुष्य *m*, परस्थ *m*. Out-land'ish *a. foreign* परदेशांतला, परदेशाचा, परदेशीय, परदेशी· २ *very strange* विचित्र, विलक्षण, तऱ्हेवाइक· ३ *rude, vulgar* ग्राम्य, कानडा, हेंगडा or हेंगाडा, जंगली, रांगडा; as, "O. dress, behaviour, speech, &c." ४ (of places) *out-of-the-way* दूरचा, जावेंसें न वाटणारा, अनाकर्षक.

Outlast' *v.t. to last longer than* अधिक टिकणें-तगणें-वांचणें with हून or पेक्षां *of o*.

Out'law *n. one deprived of the protection of the law* हद्दपार केलेला मनुष्य *m*, राजरक्षणबाह्य, कायद्याच्या रक्षणाबाहेर टाकलेला मनुष्य *m*. २ *a robber, a bandit* लुटारू *m*, पुंड *m*, डाकू *m*. O. *v. t. to deprive of the benefit of the law* हद्दपार करणें, राजरक्षणाच्या-न्यायरक्षणाच्या बाहेर करणें-ठेवणें. Out'lawed *pa. t.* O. *pa. p.* हद्दपार केलेला. Out'lawry *n. the act.* हद्दपार करणें *n*, राजरक्षणबहिष्करण *n*. २ *state o*'

*being an outlaw* हद्दपारी *f*, राजरक्षणबाह्यता *f*.

Out'lay *n.* (*the act.*) खर्च करणें *n.* २ *expenditure* खर्च *m*, व्यय *m*.

Out'let *n. passage outward* (निघण्याची-बाहेर जाण्याची) वाट *f*, दार *n*, द्वार *n*, बाहेरवाट *f*, बारें *n*, मूस *f*, निर्गमद्वार *n*, निर्गममार्ग *m*.

Outlier (owt'lī-ĕr) *n.* (*geol.*) *a portion of a stratum* (एखाद्या जमिनींतील थराचा) दूरचा भाग *m*.

Out'line *n. the lines by which any figure is bounded* मर्यादा (रेषा) *f*, मर्यादेची-बाहेरची रेघ *f*-रेषा *f*. [CONTOUR *or* GENERAL O. रूपरेखा *f*, (आकाराचें) वळण *n*.] २ *a sketch showing only the main lines, a draft* कच्चा नकाशा *m*, रूपरेखा *f*, बाह्यमर्यादाचित्र *n*, अराखडा *m*, आडमोडा *m*, बेत *m*, बेतबात *m*, कच्चा आकार *m*. ३ (*bot.*) आकार *m*. O. *v. t.* बाह्यमर्यादा-रूपरेखा-मर्यादा-रेषा काढणें-आंखणें. Outlines *n. pl.* स्थूल वर्णन *n*, ठळक मुद्दे *m. pl.*, ठळक माहिति *f*.

Outlive' *v. t. to survive* मागें वांचणें, मागें-मागून-पश्चात् जिवंत राहणें-जगणें, (-च्या) मागून-मागें-पाठीमागें मरणें.

Outlook' [ह्या शब्दाचे मूळ अर्थ 'पहारा करणें,' 'पहारा करणारा', 'पहारा करण्याचें ठिकाण' असे आहेत; परंतु हे अर्थ सध्यां प्रचारांत नाहींत.] *n. what one sees on looking out, view, prospect* पुढें दिसणारा देखावा *m*, पुढचा देखावा. २ (*fig.*) *that which seems likely to happen* पुढचीं चिन्हें *n. pl.*, पुढें घडून येणारी स्थिति *f*, पुढली-पुढची स्थिति *f*, पुढचें मान *n*. [AGRICULTURAL O. शेतकीचीं पुढचीं चिन्हें. FINANCIAL O. पुढची सांपत्तिक स्थिति *f*. POLITICAL O. पुढचा राजकीय बाबतींतील रंग *m*. THE O. पुढची स्थिति *f*, पुढल्या पिढीची स्थिति *f*, पुढें येणारी स्थिति *f*.]

Outlus'tre *v. t. to excel in brightness* प्रकाशानें मागें हटवणें, प्रकाशानें (-वर) ताण करणें.

Out'lying *a. lying away from the main body, distant* (मुख्य ठिकाणापासून) दूरचा, अंतरावरचा.

Outman' *v. t. to out-do in manliness* मर्दपणांत (वर) ताण करणें. २ *to out-number in men* मनुष्यांच्या संख्येंत (-वर) ताण करणें.

Outmanœuvre (owt-ma-nū'vĕr) *v. t. to surpass in manœuvre or stratagem* (शत्रूवर) युक्तींत-डावपेंचांत ताण करणें-मागें हटवणें.

Outmarch' *v. t. to march faster than* (-च्याहून-पेक्षां) अधिक (वेगानें) चालणें, (-ला) चालण्यानें-चालण्यांत मागें टाकणें-घालणें-पाडणें, (ज्यास्त) वेगानें कूच करणें.

Out'most *a.* Same as Outermost *q. v.*

Out-num'ber *v. t. to exceed in number* संख्येनें मागें टाकणें-पाडणें, (-च्या हून-पेक्षां) संख्येनें अधिक असणें.

Out-of-the-way' *a.* (of places) *distant from frequented roads* (रहदारीच्या) रस्त्यापासून दूर असलेला, आडवळणाचा, आडवळणीं असलेला, (अगदीं) एकीकडे-बाजूला असलेला.

Out'-patient *n.* (इस्पितळांत दाखल न केलेला पण इस्पितळांतून औषध मिळणारा) बाहेरचा रोगी *m*.

Out'-post *n. a military station away from the main body of an army* (फौजेच्या संरक्षणाकरितां लाविलेले) दूरचे मोर्चे; फौजेनें तळ दिला असतां शत्रूच्या आकस्मिक हल्ल्यापासून रक्षण होण्याकरितां फौजेपैकीं कांहीं भाग पाठवून सभोंवतीं मोर्चे लावितात त्यांस *Out-post* असें म्हणतात. २ *soldiers occupying it* दूरच्या मोर्च्यांवर असणारे शिपाई *m. pl.*

Outpour' *v. t.* ओतून टाकणें, धार लागून राहणें. O. *n.* प्रवाह *m.* [OUTPOURINGS OF THE HEART मनोविकारांचा बाहेर येणारा प्रवाह *m.*]

Out'-put *n. product* (of minerals, manufactured articles, &c.) (बाहेर निघालेलें) काम *n*, निकास *f*, निपज *f.* २ *electric power of a dynamo* विद्युच्छक्तिजनकाचें काम *n.*

Outrage (owt'rāj) [Fr. *outrage*, earlier form *oltrage*, excessive violence,—L. *ultra* beyond, and suffix-*age* as in courage, voyage. Outrage हा शब्द मूळ ल्याटीन 'ultra' ह्या शब्दापासून आल्यामुळें त्याचा धात्वर्थ 'अतिशय' असा आहे.] *n. violence beyond measure* बलात्कार *m*, जुलूम *m.* २ *wanton indignity* उपमर्द *m.* ३ *deed of violence* अनर्थ *m*, कहर *m*, साहस *n*, उत्पात *m.* ४ अतिशय *m*, गहजब *m.* O. *v. t. to injure by violence, to violate* जुलूम *m*-बलात्कार *m.* करणें with वर *of o.* २ उपमर्द करणें *g. of o.* Outrag'eous *a. violent* बलात्काराचा, जुलमाचा. २ उपमर्दाचा. ३ *furious, atrocious* विकोपास गेलेला, अनर्थाचा, कहराचा, आकांताचा, उत्पाताचा, कल्पांताचा, राक्षसी, साहसी, अनर्थकारी. ४ *excessive* अतिशय, फार. Outra'geously *adv.* बलात्कार-जुलूम-अनर्थ करून, कहर करून, कहरानें, जुलमानें, अनर्थानें, अनर्थाचा *decl.* Outrag'eousness *n.* साहसिकता *f*, साहस *n*, अनर्थ *m*, गजब *m*, एकगजब *m.*

Outre (ōōt-rā') [Fr. *outre*, *pa. p.* of *outrer*, to exaggerate.] *a. outside the bounds of propriety, eccentric* विक्षिप्त, बेमर्याद, मर्यादेचें अतिक्रमण करणारा, शिष्टाचाराला धाब्यावर बसवणारा.

Outreach' *v. t. to reach or extend beyond* मागें टाकणें-घालणें-पाडणें, मागसांडणें, (-च्या) पलीकडे जाणें. २ *to deceive* फसवणें, ठकवणें, भोंदणें, धुतारणें.

Outride (owt-rīd') *v. t. to ride faster than* (-च्या पेक्षां) अधिक झपाट्यानें घोडा फेंकणें-हांकणें. Out'rider *n. a servant on horse-back who attends a carriage* जिलबीचा स्वार *m*, गाडीचा स्वार *m.*

Outrigger (owt'rig-ėr) [Formed of *out* and *Rigger.*] *n.* (of a canoe) उलंडी *f*, उंडली *f.*

Outright (owt'-rīt) *adv. immediately, at once* तेव्हांचे तेव्हांच, तात्काल, तसाच, उभाउभी, रोकडा, *decl.*, रोखारोखीं, रोखठोक, हातच्या हातीं, खडोखडी, खडाखड. २ *plainly, flatly* साफ, निक्षून, धड, धडधडीत. ३ *completely* पुरा *decl.*, पूर्णपणें.

Outroot' *v. t. to root out* (मुळासुद्धां) उपटून टाकणें, उपटून काढणें, निर्मूलन *n.* करणें *g. of o.*

Outrun' *v. t. to go beyond in running* धांवण्यांत मागें टाकणें-पाडणें-घालणें, मागसांडणें, माघारणें. २ *to exceed* (-ला) मागें टाकणें, (-च्यावर) ताण करणें, (-च्या पेक्षां-हून) अधिक असणें.

Out'set *n. a beginning* प्रारंभ *m*, प्रथमारंभ *m*, मुळारंभ *m*, उपक्रम *m*. [AT THE VERY O. सुरवातीलाच, मुळारंभीं, प्रथमदर्शनीं, सकृद्दर्शनीं.]

Outshine' *v. t. to excel in shining* शोभेंत-तेजांत-लखलखाटांत-शोभा देण्यांत मागें पाडणें, अधिक शोभा देणें with हून or पेक्षां *of o*. २ (*fig.*) (-वर) ताण-कडी करणें, फिका पाडणें, निस्तेज करणें. O. *v. i.* प्रकाशणें, चकाकणें; as, "Bright *outshining* beams".

Out'side *n.* (a) *the exterior* बाहेरली-बाहेरची बाजू *f*, बाहेरचें-बाहेरील-बाहेरलें-वरचें आंग *n*, बाहेरची धड *f*, वरघाट *m*, बहिर्भाग *m*. [ON THE OUTSIDE बाहेर, बाहेरल्या बाजूस-कडेस.] (b) *the outer side* बाहेरचा प्रदेश *m*, बाहेरची जागा *f*, बहिःप्रदेश *m*. २ *the farthest limit* (क्षेत्र वगैरेंची) मर्यादा *f*, कड *f*, शेवट *m*. [AT THE O., *at the utmost* निदानीं, निदान, जास्तींत जास्ती.] Out'side *a.* बाहेरचा, बाहेरल्या अंगचा-बाजूचा-&c., बहिःप्रदेशाचा. २ *not belonging to some circle or institution* (एखाद्या संस्थे) बाहेरचा; as, "O. opinion." ३ *greatest existent or possible or probable* जास्तींत जास्ती असलेला, शिकस्तीचा, कमालीचा; as, "Quote the O. prices." Out'side *adv.* बाहेर, बाहेरच्या बाजूला-बाजूस; as, "He stayed *outside.*" Outside *prep.* बाहेरच्या बाजूला; as, "To ride *outside* the coach." Out'sider *n. one not admitted to a particular company, profession &c., a stranger, a layman* (संस्थे) बाहेरचा *m*, त्रयस्थ *m*, परका *m*. २ *a horse not expected to win a race* शर्यतींत जिंकेलच अशी ज्याची खात्री नाहीं असा घोडा *m*, शर्यतीबाहेरचा घोडा *m*.

Outskirt (owt'skert) *n. border, suburb* (usually used in *pl.*) शींव *f*, सीमा *f*, सीमाप्रदेश *m*; as, "The *outskirts* of a town."

Outspoken (owt-spō'ken) *a. frank or bold of speech* स्पष्टवक्ता, निर्भिड. २ (of things) *free from reserve, distinct* स्पष्टवक्तेपणाचा, स्पष्ट, निर्भिड. Out-spo'kenness *n.* स्पष्टवक्तेपणा *m*, निर्भिडपणा *m*.

Outspread (owt-spred') *v. t.* (usually as a *pa. p.*) (वर) पसरणें, विस्तारणें. O. *a.* (वर) पसरलेला, विस्तारित.

Outstand'ing *a. prominent* (a) पुढें आलेला. (b) महत्वाचा. २ *remaining unpaid* वसूल करावयाचा, उधार, बाकी राहिलेला, यावयाचा, न उगवलेला, उकळावयाचा, थकलेला. [O. DEBTS थकलेली बाकी *f*, येणें असलेली बाकी *f*.]

Outstep (owt-step') *v. t. to step beyond* (मर्यादेच्या) बाहेर पाऊल टाकणें, उल्लंघन करणें, मर्यादा सोडणें, उल्लंघ *m*-उल्लंघन करणें, अतिक्रम *m*-अतिक्रमण *n*. करणें.

Outstrip (owt-strip') *v.t.* (*literally and fig.*) *to leave behind* मागें टाकणें-पाडणें-घालणें, मागसांडणें. Outstripped' *pa. t.* & *pa. p.* Outstrip'ping *pr. p.*

Outvie (owt-vī') *v. t. to surpass* (चढाओढींत) हटवणें, मागें टाकणें-पाडणें-सांडणें, मागसांडणें, माघारणें, फिका पाडणें.

Outvote (owt-vōt') *v. t. to defeat by a greater number of votes* मताधिक्यानें हाणून पाडणें, बहुमतानें पाडाव करणें.

Outward (owt'ward) *a. toward the outside* बाहेरचा, बाहेरल्या बाजूचा. २ *external, exterior* बाहेरचा, बाहेरला, बाहेरील, बाहेरल्या अंगचा -कडचा -बाजूचा, बहिर्भागाचा, बाह्य. ३ (letters, papers, &c). जावक, बाहेरगांवीं जाणारा. [O. FILE जावक फाइल *f.* O. MAIL परदेशचें टपाल *n.*] ४ (*theol.*) *worldly, carnal* (oppo. to *inward* or *spiritual*) प्रापंचिक, सांसारिक, बाह्य, दिसणारा; as, "O. interests; O. concerns." Out'ward, Out'wards *adv.* बाहेर, बाहेरल्याकडे, बाहेरल्या भागाकडे. २ *to a foreign port* बाहेरल्या देशांकडे; as, "A ship bound *outwards*". Out'ward-bound *a.* परबंदरास जाणारें -जाण्यासाठीं निघालेलें, परदेशीं जाणारें (जहाज). Out'wardly *adv.* (*literally & fig.*) *externally* बाह्यतः, बाहेर, बाहेरचा *decl.*, दिसण्यांत, दिसण्याला, बाहेरून, बाह्यात्कारीं, बहिः, बहिरंगीं. [O. AND INWARDLY सबाह्याभ्यंतर.] Out'wardness *n* बाह्यात्कारिता *f.*

Outweigh (owt-wā') *v. t. to exceed in weight* (वजनांत) अधिक-भारी-जड असणें with हून-पेक्षां &c. *of o.* २ (*fig.*) *to exceed in importance* हलका-कमतोल &c. करणें, (किंमतीनें-वजनानें) मागें पाडणें-सारणें-करणें.

Outwit (owt-wit') *v. t. to surpass in wit or ingenuity*, उलटा-उलट फसविणें, (*fig.*) पागोटें घेणें *g. of o.*, (*fig.*) टोपी घालणें, उलट तोंडाला पानें पुसणें *g. of o.*, उलट दांत *m. pl.* घशांत घालणें *g. of o.*, उलट कान कापणें *g. of o.*, उलट डोकीवर हात फिरवणें *g. of o.*, उलट पाणी *n.* पाजणें.

Outwork (owt'werk) *n. a work outside the principal wall or line of fortification* बाहेरचा कोट, बाह्य कोट, बाहेर कोट *m.* २ (as distinguished from indoor work) (घराबाहेर) शेतांत केलेलें काम *n*, बाहेरचें काम *n.* Out'worker *n. one who works out of doors, one who takes away work to do at home* (कारखान्या) बाहेर काम करणारा *m*, बाहेरचा कामगार *m* (on the analogy of बाहेरचा रोगी=out-patient. ).

Oval (ō'val) [Fr. *ovale*–L. *ovum*, an egg.] *a. having the shape of an egg* अंड्याच्या आकाराचा, अंडाकार. (*bot.*) दीर्घवर्तुलाकार. O. *n. any thing oval* अंडाकार वस्तु *f.* २ (*math.*) (ईषत्‌वलतीति) आवल *n.* ३ दीर्घवर्तुल पटांगण *n.*

Ovary (ō'var-i) [Low L. *ovaria* –*ovum*, an egg.] *n. the part of the female animal in which the egg of the offspring is formed, the female genital gland* अंडाशय *m*, अन्तःफल *n.* २ (*bot.*) *the part of the pistil which contains the seed* अंडाशय *m*, बी-

जकोश *m.* [COMPOUND O. संयुक्त अंडाशय *m.* INFERIOR O. अधःस्थित अंडाशय *m.* SIMPLE O. एकाकी अंडाशय *m.* SUPERIOR O. ऊर्ध्वस्थित अंडाशय *m.*] Ova'rian, Ova'rial *a.* अंडाशयासंबंधीं. [O. TUMOUR अन्तःफलग्रंथी, रक्तगुल्म *m.*] Ovariot'omy *n.* अन्तःफल ग्रंथी कापून काढण्याचा प्रयोग *m*, रक्तगुल्मच्छेदन *n.* Ov'arious *a.* अंड्यांचा. Ovari'tis *n.* अंतःफलदाह *m.*

Ovariotomy, Ovaritis, See under Ovary.

Ovate, Ovated (ō'vāt, ō'vāt-ed) *a. egg-shaped* अंडाकार, अंडाकृति, अंड्याच्या आकाराचा.

Ovation (ō-vā'shun) [Fr. *ovation*–L. *ovatio-ovo, ovatum*, to shout, to exult.] *n. an outburst of popular applause, an enthusiastic reception* जयजयकारपूर्वक-जयघोषपूर्वक सत्कार *m*, जयघोषाचा कडकडाट *m*, प्रचंड जयघोष *m.*

Oven (uv'n) [A. S. *ofen*, cognate with Ger. *ofen*, and perhaps connected with Gr. *ipnos*, an oven.] *n. an arched place of brickwork or stone used for baking, heating, &c.* भट्टी *f.* [AIR OVEN हवेची भट्टी. STEAM OVEN वाफेची भट्टी.]

Over (ō'ver) [A. S. *ofer*; Ger. *über*; L. *super*; Gr. *huper*; Sk. उपरि, above.] *prep. higher than in place &c.* (oppo. to *under*) वर, वरता, वरतीं, वरतें, उपरि; as, "O. our heads." २ *across, from side to side of* वरून, इकडून तिकडे; as, "A dog leaps *over* a stream." ३ *upon the whole surface of* वरून; as, "To walk *over* a field". ४ *above* (implying superiority in excellence, dignity, &c.) वर, वरती; as, "The advantages which the Christian world has O. the heathen." ५ *above in authority or station* (implying government, direction, care, &c.) वर; as, "I will make thee ruler O. many things." ६ (in measurement) वर; as, "The depth of water was *over* his head". ७ *on account of* वर, स्तव, साठीं, करितां; as, "To spend time *over* an example". ८ *longer than* वर, पेक्षां, जास्ती; as, "O. five miles". ९ *in spite of* वर, न जुमानतां, पर्वा न करितां; as, "He triumphed *over* the difficulties". [O. HEAD AND EARS, *completely, wholly* सर्वस्वीं, पूर्णपणें, अगदीं; as, "O. head and ears in debt."] O'ver *adv. above, on the top* वर, वरून. २ *on the opposite side* पार, पलीकडे; as, "To sail *over* to England." ३ *additionally, above in measure* वर, शिवाय, अधिक, आगळा *decl.*, उवारीस, उवान्वास. ४ *throughout, from beginning to end* पार, आरपार, आद्यंत, साद्यंत, अथपासून इतिपर्यंत, सर्व, सगळा *decl.*; as, "A dress covered *over* with jewels." ५ *beyond a limit, in excess* फार, अधिक, अति, अमर्याद; as, "So *over* violent." ६ *at an end, finished* खलास, खरखास; as, "The feast was *over*." [O. AND ABOVE अधिक, आगळा. TO BE O. AND ABOVE राहणें, उरणें,

शिलकेस राहणें, उवारीस-उवाऱ्यास येणें, मागें पडणें. ALL O. जिकडे तिकडे, पूर्णपणें; as, "He is spattered with mud *all over*". २ *wholly over, at an end* सर्वस्वीं गेलेला- बुडालेला -पावलेला-गमावलेला; as "It is *all over* with him." O. AGAIN, *once more, anew* पुन्हां पुन्हां, पुनः पुनः, आणखी एकवार. O. AGAINST विरुद्ध बाजूला, समोरच्या बाजूला. O. AND ABOVE शिवाय. O. AND O. पुन्हां पुन्हां, आणखी एकवार. To BOIL O., See under Boil. To COME IT O., See under COME. To DO O., See under Do. To THROW O. *to abandon, to betray* टाकणें, त्याग करणें, (*fig.*) गळा कापणें.] O'ver *a. upper, superior* ( often used as a prefix, as in *overcoat, overlord, &c.* ) वरचा. २ *beyond* पलीकडचा. O'ver *n.* ( *cricket* ) *a certain number of balls* ( usually *six*) *delivered by a bowler from one end of the wicket* चेंडू फेंकणाऱ्यानें एकाच वेळीं फेंकलेले चेंडू *m. pl.*, ओव्हर *n.*

Overact' *v. t. to exaggerate in action* फाजील अभिनय करणें. O. *v. i. to go to excess in action* अतिरेक करणें-होणें. Overacting *n.* फाजील अभिनय *m.* Overac'tion *n.* अतिरेक *m.*

Overage *n.* ठराविक वयाच्या पलीकडचें वय *n*, जास्त वय *n.*

Overalls ( ō'vėr-awlz) *n. pl. a kind of loose trousers worn over others to protect them from soiling* सैल-पोकळ पायजमा *m*, इजार *f*, वरची विजार *f.*

O'veranxious *a.* बेदील, हवालदील, अतिचिंतातुर, अत्युत्सुक. O'veranxiety *n.* अतिचिन्ता *f*, अत्युत्सुकता *f.*

Overawe' *v. t. to restrain by fear or superior influence* दाब *m*- दरारा-धाक घालणें, फार घाबरवून सोडणें, घाबरगुंडी करणें. Overawed' *pa. t. & pa. p.*

Overbear' *v. t. to bear down or overpower, to overwhelm* दपटणें, दाबणें, दबेसा करणें, दाबून टाकणें. Overbear'ing *pr. p.* O. *a.* ( of persons ) *imperious, inclined to domineer* शिरजोर, दंडेल, दडप्या, दांड, दांडगा, दडपून टाकणारा, दपटशा देणारा, जबरदस्त, दाबणारा. २ ( conduct ) उर्मट, दंडेलीचा, उद्दाम, उद्धट, उद्धत, दांडगाईचा, दांडगेपणाचा. Overbear'ingly *adv.* शिरजोरपणानें, जबरदस्तीनें. Overbear'ingness *n.* शिरजोरपणा *m*, जबरदस्ती *f*, दडपेगिरी *f.*

Overbid' *v. t. to offer a price greater than* ( पेक्षां ) ज्यास्त किंमत देणें-बोलणें, जास्त 'बिट' करणें.

Overboard (ō'vėr-bōrd) *adv. from on board, out of a ship* गलबतावरून (पाण्यांत); as, "He was thrown *overboard.*" [ To THROW O. (अर्ध्यावरच ) सोडून देणें, फसविणें; as, "To throw a project *overboard.*" ]

O'verbridge, See under Bridge.

Overbur'den *v. t. to burden over much* अधिक -फार-&c. ओझें लादणें- घालणें &c., भार लादणें, (ओझ्याखालीं) दबेसा करणें, भाराक्रान्त-&c. करणें. O. *n. alluvial soil overlying a bed of ore* दगडावर असणारा गाळ *m*, (दगडाच्या खाणींत चांगल्या दगडाच्या थरांवर असणारी ) फुटतूट *f*, डबर *n.*

Overcarr'y *v. t.* & *i.* *to carry beyond the proper point* योग्य मर्यादेच्या पलीकडे नेणें-वाहाणें-वाहून नेणें-जाणें, चुकून योग्य स्टेशनाच्या पुढें जाणें.

Overcast' *v. t.* *to cast over, to cloud* (ढगांनीं) झांकणें, आच्छादणें, धुंद- &c. करणें. २ *to cover with gloom* उदासीनता आणणें. ३ *to sew over or stitch the edges* (*of a piece of cloth*) *slightly* धांवता दोरा घालणें. Overcast' *pa. p.* आच्छादलेला, मेघाच्छादित, मेघाच्छन्न.

Overcharge' *v. t.* *to load with too great a charge* फाजील-अधिक ओझें घालणें, भाराक्रांत करणें. २ *to charge too great a price* फाजील किंमत सांगणें, अधिक मोल *n*-अधिक किंमत *f*- अधिक दर *m*-&c. सांगणें-लिहिणें-मांडणें. ३ (a gun) अधिक-फार-जास्त-&c. भरणें, अधिक बार *m.* भरणें. ४ *to exaggerate* अतिशयोक्ति करून सांगणें. O. *n.* *an excessive load or burden* अधिक ओझें *n*, अधिक वजन *n*- भार *m.* २ *an excessive charge in an account* (वाजवीपेक्षां) अधिक किंमत *f*- दर *m.*

Overcoat (ō'vėr-kōt) *n.* वरकोट *m*, सर्व कपडे घातल्यानंतर त्यांवर घालण्याचा कोट-डगला *m.*

Overcome' *v. t.* *to conquer or subdue* जिंकणें, पराजय *m*-पराभव *m.* करणें *g. of o.*, वश-जित करणें, डोकीवर -उरावर -नाकावर पाय देणें *g. of o.*; पासला पाडणें, (-चा) पाडाव करणें, जेरीस-रकमेस-डबघाईस आणणें, जेर-बेजार-आक्रांत-व्याकुळ करणें, दमवणें, श्रमवणें; as, "To O. enemies in battle." २ *to get the better of* सपशेल पाडणें, मोडणें, खालीं घालणें.

Overcon'fident *a.* (with *of*) *too confident* फाजील खात्रीचा, फाजील खात्री असलेला. Overcon'fidence *n.* फाजील खात्री *f*, फाजील विश्वास *m.* Over-con'fidently *adv.* फाजील विश्वासानें.

Overcred'ulous *a.* (with *of*) फार भोळा, अतिभोळा, अतिभोळसर.

Overcrowd' *v.t.* फार गर्दी करणें, फार गिचाडी करणें.

Overcun'ning *a.* अतिशाहणा, आतिलबाड, अतिधूर्त.

Overda'ring *a.* *foolhardy* अतिसाहसी, अतिधृष्ट, उरफाट्या काळजाचा, निधड्या छातीचा.

Overdo' *v. t.* *to do too much, to carry too far* अधिक-&c. करणें, अतिशय करणें, अतिरेक करणें. २ *to harass* दमविणें, थकवणें, जेरीस आणणें. ३ *to cook too much* अधिक भाजणें-शिजविणें, फार होणें *in. con.*, as, "To O. the meat."

Overdraft' *n.* (शिलकेपेक्षां) अधिक रकम काढणें *n.* २ (शिलकेपेक्षां) अधिक काढलेली रक्कम *f.*

Overdraw' *v. t.* (शिलकेपेक्षां) जास्त रकमेचा चेक देणें.

Overdue' *a.* (of a ship, train) *due beyond the time, due some time ago* उशीर झालेली (गाडी &c.), वेळ होऊन गेलेला, अतिकाळ झालेला. २ *remaining unpaid at the right time* (योग्य वेळीं) न भरलेला-न भरणा केलेला, न चुकवलेला, न चुकता केलेला.

**Overeat'** *v. t.* (generally reflexive) अधिक खाणें, अधाशीपणानें खाणें.

**Overes'timate** *v.t. to estimate too highly* फाजील अंदाज करणें-किंमत करणें. O. *n.* फाजील अंदाज.

**Overexcite'** *v. t. to excite unduly* फाजील-अधिक-अतिशय चिथविणें-चिथवून देणें. **Overexcite'ment** *n.* फाजील चिथवणूक, अतिक्षोभ, क्षोभातिशय.

**Overex'posure** *n. too long exposure of the sensitive plate* (प्रकाशलेखाची ऋणकांच) जास्त वेळ उजेडांत ठेवणें, अतिचिरप्रकाशन.

**Overgrown'** *pa. p.* फार व्यापलेला, फार व्यापून टाकलेला, फार भरून टाकलेला. २ *grown beyond the natural size* (स्वाभाविक आकारापेक्षां) फार वाढलेला, अधिक वाढीचा, अतिवर्धित; as, "An *overgrown* ox."

**Overgrowth** *n. excessive growth* अधिक वाढ *f*, फार वाढ *f*, अतिवृद्धि *f*, फाजील वाढ *f*.

**Overhand'** *n. the upperhand, superiority* वर्चस्व *n.* श्रेष्ठत्व *n.* O. *a.* (cricket) (खांद्याच्या वर) हात उचलून (चेंडू) फेंकण्याचा; as, "*Overhand* bowling."

**Overhang'** *v. t. to project over* वर येणें-असणें *g. of o.*, वर लटकणें-लोंबणें, पुढें येणें; as, "Ascend the hill which *overhangs* the city." २ *to overlade with ornamentation* सुशोभित करणें, चित्रें लटकावणें-लावणें; as, "To O. a wall with pictures." **Overhung'** *pa. p. adorned with hangings* लोंबत्या चित्रांनीं सजविलेला.

**Overhead'** *adv.* डोक्यावर, डोकीवर, मस्तकावर, &c. वर, वरतीं. २ *in the upper story or upon the floor above* वरच्या मजल्यावर. ३ *in the zenith* डोक्यावर, फार उंच. O. *a. situated above* (डोक्यापेक्षां जास्त) उंचीवरचा. [O. CONDUCTOR (डोक्यावरच्या) उंच विद्युद्वाहक तारा *f. pl.*]

**Overiss'ue** *v. t. to issue in excess* (*as bank-notes or bills of exchange*) फाजील-अधिक काढणें. O. *n. any excessive issue* (*of Government paper*) *exceeding the limit of capital, credit, or authority* अधिक काढणें, (भांडवल, पत किंवा अधिकार यांच्यापेक्षां) जास्त (सरकारी कागद) काढणें. २ जास्त काढलेल्या नोटा, हुंड्या वगैरे.

**O'verland** *a. passing entirely or principally by land as a route* खुषकीचा, जमिनीवरचा, स्थलमार्गाचा. O. route (इंग्लंडांतून हिंदुस्थानांत जाण्यास सुएझ आणि ब्रिंडिसीवरून कांहीं अंतरापुरता) खुषकीचा मार्ग.

**Over-lap'** *v. t.* एकमेकांना-परस्परांना व्यापणें. [OVER-LAPPING EACH OTHER परस्परव्यापी.]

**Overlay'** *n.* (मोठ्या मेजकापडावर घातलेलें) वरचें मेजकापड. २ (*printing*) जास्त लावलेला कागद *m.* ३ (*fig.*) जास्त थर *m.*

**Overleap'** *v. t.* उडून पार जाणें, उडी *f.* मारून जाणें, उडून जाणें. २ *to pass over without notice, to ignore* (-कडे) दुर्लक्ष करणें. ३ *to omit* न पाळणें, वगळणें, सोडणें, गाळणें; as, "Let me O. that custom".

Overload' *v. t.* Same as Overburden.

Overlook' *v. t. to look over or view from a higher position* पाहणें, उंचावरून खालीं पहाणें. २ *to connive* कानाडोळा करणें, (-कडे) दुर्लक्ष करणें.३ *to superintend* तपासणें,तपासणी-देखरेख करणें.Overlook'er *n.*तपासणी करणारा *m*, देखरेख करणारा.

Overlord' *n. a lord over other lords* अधिराज *m*, राजाधिराज *m*, महाराज *m*.Overlord'ship *n.* अधिराज्य *n*, अधिराजाधिकार *m*.

Overman' *v. t. to provide with more men than are wanted* अधिक माणसें ठेवणें-नेमणें. O. *n. a foreman* (*espec. in a coal-pit*) मुकादम *m*.

Overmatch' *v. t. to be more than a match for* (वर) ताण करणें.

Overpay' *v. t. to pay too much* अधिक देणें, (वाजवी-पेक्षां) जास्ती देणें, अधिक पगार देणें. २ *to reward too highly* अतिशय मोठें बक्षिस देणें.

Overpay'ment *n.* अधिक पगार *m*, अधिक भरणा करणें *n*.

O'verproduction *n. the act of producing a supply of commodities* (*espec. of manufactured goods*) *in excess of the demand* फाजील निपज *f*, अत्युत्पादन *n*, फाजील उत्पत्ति *f*, अत्युत्पत्ति *f*, बेसुमार निपज-उत्पत्ति *f*.

Overproud' *a. exceedingly or unduly proud* अतिशय गर्विष्ठ, फाजील गर्व करणारा, अतिगर्वी.

Overproof' *a.* (of spirits) *containing more alcohol than the standard* प्रमाणापेक्षां अधिक मद्यार्क असलेला.

Over-ride' *v. t. to ride too much* दमेपर्यंत चालवणें, दामटणें; as, "To O. a horse". २ पायांखालीं तुडवणें, वरून जाणें. ३ *to trample down or set aside* पायाखालीं तुडवणें *fig.*, पायमल्ली करणें. ४ *to supersede* रद्द करणें; as, "One law *overrides* another". ५ (*surg.*) (हाड वगैरे) वर चढवणें. [To O. ONE'S COMMISSION, *to act with a high hand* दिलेल्या अधिकाराचा अतिक्रम करणें.]

Overri'ding *n.* हाड मोडलें असतां त्याचे समोरासमोरचे तुकड्यांची कडा एकमेकांवर चढवणें *n*, अध्यारोह *m*, अधिश्रयण *n*. २ पुढच्या पायाच्या नालावर मागच्या पायाचा पुढचा भाग आपटणें.

Overright'eous *a. superstitiously strict* (usually implying hypocrisy) दांभिक, धार्मिक बाबतींत कडकडीतपणाचा आव घालणारा, नीतीचें दंभ माजविणारा. Overright'eousness *n.* फाजील नीतिमत्ता, नीतीचा दांभिकपणा.

Overripe' *a. too ripe* फार पिकविलेला-पिकलेला, अतिपक्व, अविकलेला. Overrip'en *v. t. to make too ripe* उपिकविणें, फार पिकविणें, अविकविणें.

Overrule' *v. t. to rule over* वरचा अधिकार *m*-अंमल *m*-&c. चालवणें with वर *of o.*, वरच्या अधिकाराच्या बळानें-अधिकारानें चालवणें. २ (*law*) *to influence or set aside by greater power* रद्द करणें, अधिकारानें-&c. उडवणें, मागें घालणें -सारणें or -पाडणें, (अधिकाराच्या नात्यानें) रद्द करणें, लटपटविणें. O. *v. i. to be supreme*

*in controlling* सत्ता-अधिकार चालवणें, अतिश्रेष्ठपणाची सत्ता किंवा अधिकार चालविणें. Overrul'er *n.* (वर) अधिकार करणारा, (वर) अंमल चालविणारा &c. Overru'ling *pr. p.* (-वर) सत्ता चालविणारा, (सर्वांचें) नियमन करणारा; as, "O. Providence". Overru'lingly *adv.*

Overrun' *v. t. to spread or run over* (वरून) व्यापणें, भरणें, वेढणें, ग्रासणें, आच्छादणें, व्यापून -भरून -वेढून &c. टाकणें -घेणें, आच्छन्न -आकीर्ण &c. करणें. २ *to spread over and take possession of* आक्रमणें, स्वाऱ्या *f. pl.* घालणें -करणें, आक्रांत-आक्रमित करणें. ३ *to crush down* चेपून टाकणें, चिरडून टाकणें, दडपून टाकणें. ४ (a) *to go beyond* (मर्यादेच्या) पलीकडे जाणें; as, "One line *overruns* another in length." (b) *to run faster than* (च्यापेक्षां) फार जास्त गतीनें जाणें, (पेक्षां) जलद धावणें -पळणें. ५ *to carry over, as type, from one line or page into the next after* एका ओळींतील मजकूर दुसऱ्या (पुढील अगर मागील) ओळींत नेणें, एका ओळींतील, रकान्यांतील, किंवा पृष्ठांतील मजकूर दुसऱ्या ओळींत, रकान्यांत, किंवा पृष्ठांत सरकवणें -चढवणें. Overran *pa. t.* Overrun *pa. p.* व्यापलेला, व्यापून टाकलेला, &c, व्याप्त, आच्छन्न, आकीर्ण, आस्तीर्ण. २ आक्रमलेला, आक्रांत, आक्रमित. [To BE OVERRUN व्यापणें, भरणें. २ आक्रमित होणें.] Overrun'ning *n. act.* व्यापणें *n*, व्यापून टाकणें &c., व्यापन *n.* २ आक्रमणें *n*, आक्रम *m*, आक्रमण *n*, अधिक्रमण *n.*

Overscru'pulous *a. scrupulous to excess* फाजील -अधिक शंकेखोर, अतिशंकी. Overscrupu'lousness *n.* फाजील शंकेखोरपणा *m*, अतिशंकीपणा *m.*

Overseas' *a.* समुद्रापलीकडचा. [O. DOMINIONS समुद्रापलीकडचे मुलुख -देश *m. pl.* O. EDITION *the edition of a newspaper for sending to the colonies* (वसाहतीकरितां काढलेली वर्तमानपत्राची) बाहेरची प्रत *f.* O. PREMIERS समुद्रापलीकडच्या वसाहतींचे प्रधान *m. pl.*]

Oversee' *v. t. to superintend* देखरेख *f*-चौकशी *f* &c. करणें -ठेवणें, पाहणें. Overse'er *n.* देखरेख करणारा, पाहणारा, देखरेख्या, चौकसनीस, 'ओव्हरसीअर.'

Overshade' *v. t. to throw a shade over* सावली *f*-छाया *f.* करणें-घालणें with वर *of o.*, छायावृत-छायाच्छादित-&c. करणें. २ *to render dark or gloomy* काळोखाचा करणें.

Overshad'ow *v. t. to cast a shadow over* (वर) छाया घालणें-पाडणें, सावली *f* -छाया *f.* करणें -पाडणें -घालणें with वर *of o.* २ *to darken* काळोखाचा करणें, दिसेनासा करणें, लोपून टाकणें. ३ *to shelter* छायेखालीं -आश्रयाखालीं-पंखाखालीं घेणें-ठेवणें. ४ *to cause to seem less important* फिका पाडणें, निस्तेज -तेजोहीन -महत्त्वहीन -कमी मोलाचा -कमी महत्त्वाचा करणें.

Overshoot' *v. t. to shoot over or beyond as a mark* निशाणाच्या-&c. पलीकडे बाण *m.* मारणें,

लक्ष्यातिक्रम *m*. लक्ष्योल्लंघन *n*-लक्ष्यातिक्षेप *m*-&c. करणें. [ To OVERSHOOT ONE'S SELF (a) *to venture too far* आपल्या शक्तीबाहेरचें काम उचलणें. (b) *to assert too much* अतिशयोक्तीचें विधान करणें.] २ *to pass swiftly over* (वरून) उडून जाणें. (३) *to exceed* (वर) ताण -चढ करणें; as, "To O. the truth".

O'versight [ Oversight शब्दाचा धात्वर्थ 'देखरेख,' 'चौकशी' असा आहे.] *n. a failing to notice, mistake, omission* नजरचूक *f*, दृष्टीची चूक *f*, दृष्टिदोष *m*. २ *an instance of oversight* नजरचुकीचें उदाहरण *n*.

Oversleep' *v. t. to sleep beyond* (नेहेमींपेक्षां) जास्ती-जास्त वेळ झोंपणें; as, "To O. one's self." O. *v. i. to sleep too long* (नेहेमींपेक्षां) फार वेळ झोंप घेणें.

Overspent' *a. excessively fatigued* अतिशय थकलेला-भागलेला, अतिश्रान्त, अतिक्रान्त.

Overspread' *v.t. to spread over, to scatter over* व्यापणें, आक्रमणें, भरणें, आच्छादणें, वेढणें, व्यापून-भरून &c. घेणें-टाकणें, व्यापन *n* -आक्रमण *n* -आच्छादन *n*. करणें *g. of o.*; as, "The deluge *overspread* the earth." O. *v.i. to be spread over* पसरणें, पसरलें जाणें. Over-spread *pa.t.* O. *pa.p.* व्यापलेला, आच्छादलेला, व्याप्त, in compo. आकीर्ण, in compo. आस्तीर्ण.

Overstate' *v.t. to exaggerate* फुगवून सांगणें. Overstate'-ment *n*. फुगवून-तिखट मीठ लावून सांगितलेली गोष्ट *f*.

Overstep' *v. t. to step beyond* उल्लंघणें, उल्लंघन *n*-उल्लंघ *m*. करणें.

Overstock' *v. t. to stock overmuch, to fill too full* अधिक बगमी *f*-ज्यास्त बेगमी *f* -अतिपूर्त्ति *f*. करणें, भरपूर करणें, फाजील सांठा *m*-अधिक सांठा करणें *with* आंत *of o.*; as, "To O. the stomach with food." O. *n. superabundance* पुष्कळ सांठा *m*, फाजील सांठा *m*, पुष्कळ भरणा *m*, अतिसंग्रह *m*.

Overstrain' *v. t.* फार ताणणें, अतिशय ताणणें; as, "To O. one's nerves." O. *v. i. to strain one's self to excess* अतिप्रयास करणें. O. *n. too great a strain* अतिप्रयास *m*, अतिश्रम *m*, ताण *m*.

Overt (ō'vert) [ Fr. *ouvert—ouvrir*, to open. Opposed to Covert. ] *a. open to view, public, apparent* राजरोस, राजरोसीचा, उघड, व्यक्त, उघड-पणाचा, प्रसिद्धपणाचा. O'vertly *adv*. राजरोसपणें, उघड, उघडपणें, प्रसिद्धपणीं. O'vertness *n*. उघडपणा *m*, राजरोसपणा *m*, प्रसिद्धपणा *m*. [ O. ACT, *something actually done in execution of a criminal intent* उघड-राजरोस गुन्हा *m*.]

Overtake' *v. t. to come up with, to catch* गांठणें, (दोहोंमधील अंतर) आटपणें, अटपून घेणें, मिळवणें, मिळवून घेणें, पाठ *f*. धरणें *g. of o.*; as, "To O. one in the race." २ *to come upon, to take by surprise* गांठणें, सांपडणें, अचानक पकडणें; as, "If a man be *overtaken* in a fault."

Overtask' *v. t. to task overmuch* अधिक काम-फार काम &c. सांगणें, जिवाआगळें काम *n* -जिवापाड-जिवापरतें काम-&c. सांगणें, (-ला) खूप काम देणें.

Overtax' *v. t. to tax overmuch* फार कर लादणें. २ फार काम देणें, फार काम लादणें; as, "To O.one's energies."

Overthrow' *v. t. to throw down, to upset* पाडणें, पाडून टाकणें-देणें, उलंडणें, उलटणें, उलथा-पालथा करणें; as, "His wife *overthrew* the table." २ *to destroy, to defeat utterly* पुरा चीत करणें,मारणें, पाडाव *m*-पराभव &c. करणें *g. of o.*; as, " To O. an enemy." ३ *to demolish* मोडणें, पाडणें, नासणें, जमीनदोस्त करणें, लयास नेणें, भंग *m* -विघात *m* -विध्वंस &c. करणें *g. of o.*, उध्वस्त करणें; as; "To O. the walls of a city." O'verthrow *n act.* पाडणें *n*, पाडाव करणें *n*, चीत करणें. २ *the state.* पाडाव *m*, पराभव *m*, पराजय *m*. ३ *the act.* मोडणें, नासणें. ४ *the state.* मोड *m*, नाश *m*, भंग *m*, विघात *m*, विध्वंस *m*. Overthrew' *pa. t.* Overthrow'er *n*. पाडाव करणारा, विध्वंसक. Overthrow'-ing *pr. p.* Overthrown' *pa. p.* पाडलेला, उलटलेला, उलंडलेला. २ मारलेला, पाडाव केलेला, पराभूत, जित, जमीनदोस्त, चीत. ३ मोडलेला, नासलेला, भग्न, नष्ट.

Overtone' *v. t. to drown a tone with stronger tone* आवाजी बुडविणें. २ (*photo.*) *to give too deep a tone to* अधिक छटा देणें, रंग जास्त चढविणें. O. *n*. चढासूर *m*, अतिस्वर *m*. २ अधिक छटा *f*.

Overtop' *v. t. to rise over the top of* वर जाणें with *g. of o.*, उंच असणें with पेक्षां-हून-&c. *of o.* २ *to surpass* (वर) सरशी करणें, (ला) मागें टाकणें. ३ *to make of less importance, to obscure* कमी महत्वाचा करणें-मानणें, मागें अंधारांत टाकणें.

Overture (ō'-vėr-tūr) [Fr. *overture.*] *n. a proposal* (तहासंबंधीं-विवाहासंबंधीं) पूर्वभाषण *n*, बोलणें *n*, बोली *f*, भाषा *f*; as, "To make *overtures* to an enemy." २ (*mus.*) *introductory piece of instrumental music, prelude* पूर्वरंगालाप *m*, पूर्ववादन *n*, (वाद्यांचा) उपोद्घात *m*. O. *v. t. to make an overture to* बोलणेंचालणें करणें, बोली-भाषा होणें.

Overturn' *v. t. to throw down or over* उलटा करणें, उलटणें, पालथा पाडणें, उलथा करणें, पाडणें, उपरांडणें. २ *to subvert, to ruin* मोडणें, नासणें, नष्ट करणें, भंग *m*-विघात *m*- &c. करणें *g. of o.* O. *n. the state of being overturned* उलट करणें *n*, उपरांडी स्थिति *f*; as, " An O. of parties." २ मोड *m*, नाश *m*, भंग *m*, विघात *m*.

Overval'ue *v. t. to set too high a value on* फाजील किंमत- अधिक किंमत करणें, अधिक मोठा मानणें, अधिक मोलाचा मानणें, मोलापेक्षां-किंमतीपेक्षां &c. अधिक मानणें, अतियोग्यता *f*. मानणें; as, "To O. human power." Overvalu'ation *n. overestimate* फाजील मोल *n*, फाजील योग्यता *f*.

Overween (ō-vėr-wēn') [E. *over* and A. S. *wenan* —*wen*, expectation.] *v. i.* (*Shakes.*) *to think too*

*highly or favourably esp. of oneself* स्वतः संबंधानें अहंता *f*- अभिमान असणें, घमेंड असणें; as, "We all of us naturally *overween* in our own favour." Overween'ing *a. conceited, vain* अहंपणाचा, फुशारकीचा, गर्विष्ठ, फुशारक्या, अभिमानी, अहंकारयुक्त, अहंकाराचा, अहंपणाचा. Overween'ing *n. conceit* अहंकार *m*, अहंता *f*, फाजील आढ्यता *f*, अहंपणा *m*, अभिमान *m*, फुशारकी *f*, वृथाडौल *m*, घमेंड *f*. Overween'ingly *adv.* अहंपणानें, अहंपणें, अहंतापूर्वक, अहंकारपूर्वक, अभिमानपूर्वक, फुशारकीनें, घमेंड करून.

Overweigh' *v. t.* वजनांत जास्त भरणें. Overweight' *n.* अधिक वजन *n*, अधिक भार *m*, भाराधिक्य *n*, अतिभार *m*, भारातिशय. Overweigh'ted *a. unduly loaded with* (वजनाखालीं) दडपलेला, भारातिक्रांत.

Overwhelm' *v.t. to spread over and crush by something heavy or strong* दडपणें, दाबणें, दडपून-दाबून टाकणें, पाडणें, पालथा-पासला पाडणें, लोळविणें, भुईस-जमिनीस मिळवणें, जमीनदोस्त करणें, खालीं बुडवून टाकणें. २ *to flow over and bear down* बुडविणें, बुडवून टाकणें, गर्क -गडप-निमग्न करणें, घेरणें, आक्रांत करणें. ३ *to swallow up* (as with a flood) *fig.* गिळणें, गट्ट करणें, खाऊन टाकणें. ४ *to overpower* (*with grief*) (दुःखानें) व्याकुल करणें. [To BE OVERWHELMED (दुःखानें) व्याकुल &c. होणें.] Overwhelmed' *pa. t.* O. *pa. p.* दडपलेला, दडपून टाकलेला. २ बुडवलेला, गर्क केलेला-झालेला, घेरलेला, ग्रासलेला, निमग्न, ग्रस्त, आक्रांत. Overwhelm'er *n.* दडपणारा, दडपून टाकणारा, पासला पाडणारा. २ बुडवणारा, ग्रासणारा, घेरणारा, गर्क करणारा. Overwhelm'ing *pr. p.* O. *a.* प्रचंड, मोठा, दांडगा, &c. [ O. MAJORITY (पूर्ण पाडाव करून टाकणारें) प्रचंड-दांडगें बहुमत *n*.]

Overwise' *a. wise overmuch* फाजील शहाणा, अति-शहाणा.

Overwork' *v. t. to work overmuch* शक्तीपलीकडचें-जिवापलीकडचें काम *n*. घेणें, शक्तीपेक्षां जास्त-अधिक खपविणें-राबविणें, (-चें) भूंस पाडणें, (-चीं) हाडें नरम करणें, घुमा घालणें; as, "To O. a horse." २ *to crowd with labour* कामानें भरून टाकणें, अतिशय कामामुळें फुरसत-अवकाश न ठेवणें; as, "My days with toil are *overwrought*." ३ *to decorate all over* (सर्व बाजूंनीं) अधिक शृंगारणें-सजवणें-नटवणें. O. *v. i.* शक्तीपलीकडे श्रम -मेहेनत करणें-घेणें. O. *n. excessive labour* (वाजवीपेक्षां) जास्त काम *n*, अधिक काम *n*, अतिशय काम *n*, जिवापलीकडचें काम *n*. २ *extra work* (ठरावापेक्षां) जास्ती काम *n*, सवाई.

Overwrought ( ō-vėr-rawt' ) [ Pa. p. of overwork. ] *a. worked too hard* अति परिश्रम केलेला -घेतलेला, थकून गेलेला, अति मेहेनत पडलेला. २ अतिसंस्कृत, अतिसंस्काराचा, फार सजवलेला-नटवलेला, अतिपरिष्कृत. ३ *elaborated to excess* फार श्रम करून लिहिलेला; as, "O. passage." ४ *overexcited* फार क्षुब्ध झालेला.

a piece off the legs of his captives, so as to fit them to an iron bed, on which he laid them.] *a. of or pertaining to:* (a) *Procrustes* प्रोक्रस्टीझचा, प्रोक्रस्टीझसंबंधीं. (b) *the mode of torture practised by him* प्रोक्रस्टीझच्या छळाच्या पद्धतीचा -संबंधीं. २ क्रूरपणाचा, राक्षसी.

Proctitis (prok-tī'tis) [Gr. *proktos*, anus, & *itis*, inflammation.] *n.* (*med.*) गुदकांडदाह *m*, गुदपाक *m*.

Proctor (prok'tor) [L. *procurator*,–*pro*, for, and *cura*, care.] *n.* (*law*) वकील. २ *a university official who maintains order* (इंग्लंडांतील) विश्वविद्यालयांतील 'प्राक्टर' अधिकारी. विद्यार्थ्यांच्या नीतीवर व शिस्तीवर देखरेख ठेवण्याचें काम 'प्राक्टर'कडे असतें. हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयांत 'प्राक्टर' नाहींत. ३ *an elected representative* (in Convocation) *of the clergy of a diocese* (ख्रिस्ती आचार्यांचा) प्रतिनिधि.

Procumbent (pro-kum'bent) [L. *pro*, forward, and *cumbere*, to lie down.] *a. lying on the face* पालथा पडलेला. २ (*bot.*) *growing along the ground* भुईसरपट वाढणारा, भूमिशायी.

Procu'rable *a. able to be procured* मिळवायाजोगा, मिळवायाजोगता -सारखा, प्राप्य, लभ्य.

Procura'tion *n.* Same as Procurement.

Procurator (prok'ūr-ā-tor) [L.] *n. one who conducts a legal case for another* मुखत्यार *m*, गुमास्ता *m*, प्रतिनिधि *m*. (b) वकील. २ *proxy* प्रतिनिधि *m*.

Procure (pro-kūr') [Fr.–L. *pro*, & *cura*, care.] *v. t. to obtain* मिळवणें, संपादणें, पैदा करणें, साध्य करणें, संपादन करणें. [To BE PROCURED मिळणें, लाभणें, लाधणें.] २ (R) *to bring about* घडवणें, करून घेणें, घडवून आणणें, साधणें, संपादणें, करणें. [To P. ONE'S FALL (आपला आपण) नाश करून घेणें.]. *to pander to pimp* कुंटणकी *f* -कुंटणपणा *m* -भडवेपणा *m*. करणें.

Procured' *pa. t.* P. *pa. p.* मिळवलेला, संपादलेला, संपादित, प्राप्त.

Procure'ment *n.* मिळवणें *n*, संपादणें *n*, संपादन *n*.

Procur'er *n.* मिळवणारा, संपादणारा, पैदा करणारा, संपादनकर्त्ता, संपादनकारी. २ कुंटण, भडवा, कुंटणकी करणारा, कुंटण्या.

Proc'uress *n. f.* कुंटीण *f*, कुंटण *f*, कुंटणी *f*.

Procuring *pr. p.* P. *v. n.* मिळवणें *n*, संपादणें *n*, संपादन *n*. २ साधणें, घडवून आणणें.

Procyon (prō'si-on) [Gr. *prokyon*, –*pro*, before, *kyon*, a dog.] *n.* (लघुलुब्धक राशींत) पुनर्वसु नक्षत्राची चवथी तारा.

Prod (prod) [Cf. E. *brad*, & Gael. *brod*, a goad.] *n. a pointed instrument for pricking* पराणी *f*, अणी *f*. २ *a pointed instrument* बोंचणी *f*, टोंचणी *f*. P. *v. t. to prick with something sharp* टोंचणें, बोंचणें. २ (hence) *to goad, to incite* खपवणें, (-च्या मागें) टुमणें लावणें; as, "To P. a student."

Prodigal ( prod'i-gal ) [Lit. 'driving forth or away,' F. -L. *prodigus -prodigere*, to drive away, to squander *-pro*, forth, or away, and *agere*, to drive.] *a. recklessly profuse, wasteful* उधळ्या, उधळपट्टी *f* -नासधूस *f*. करणारा, नासाड्या, उडाऊ, अपव्ययी, उडव्या, व्ययशील, बहुव्ययी. २ उधळेपणाचा, बेताल (expenses). P. *n. a spendthrift* उधळ्या *m*, उधळपट्टी करणारा *m*. २ (with *the*) *the younger son in the parable* (St. Luke XV. 11-32.) (ल्यूकच्या शुभवर्तमानांत सांगितलेला) उधळ्या मुलगा.

Prod'igalise *v. t. & v. i.* उधळपट्टी *f*.-उधळेपणा *m* -नासधूस *f*. करणें, अपव्यय *m*. करणें.

Prodigal'ity *n. excessive liberality* उधळपट्टी *f*, उधळेपणा *m*, नासधूस *f*, नासाडी *f*, अतिव्यय *m*, उधळाउधळ *f*, उधळ *f*, उधळमाधळ *f*, बहुव्यय *m*.

Prod'igally *adv.* उधळेपणानें, उधळपट्टीनें, उधळाउधळ करून.

Prodigious ( pro-dij'us ) [Fr. *prodigieux*-L. *prodigiosus.*] *a. huge, vast* अफाट, अचाट, बेसुमार, विलक्षण.

Prodigy ( prod'i-ji ) [Fr. *prodige* -L. *prodigium*, a prophetic sign -L. *præ*, before, and *dicere*, to say.] *n. an omen or portent* दुश्चिन्ह *n*, अपशकुन *m*, अरिष्टसूचकचिन्ह *n*, उत्पात *m*, अद्भुत *n*. २ *a wonder* आश्चर्य *n*, आश्चर्याची गोष्ट *f*, अद्भुत *n*, सृष्टिक्रमाबाहेरची गोष्ट *f*, आश्चर्यकारक गोष्ट *f*. ३ (a) *an extraordinary person or thing* विलक्षण पुरुष *m*, धेंड *n*, प्रस्थ *n*, प्रकरण *n*. [A P. OF LEARNING धेंड *n*, प्रस्थान *n*.] (b) अद्भुत वस्तु *f*, अद्भुत गोष्ट *f*, विचित्र गोष्ट *f*, असाधारण वस्तु *f*. ४ *an abnormal development* चिन्ह *n*, विलक्षण वस्तु *f*, राक्षसी वस्तु *f*, राक्षस *m*.

Produce ( pro-dūs' ) [L. *producere*, *-pro*, forward, and *ducere*, to lead.] *v. t. to bring forward* हजर करणें, दाखल करणें, पुढें आणणें, बाहेर काढणें, दृष्टीस पाडणें, काढून दाखवणें, दाखवणें, हजिर करणें, दृष्टीपुढें -डोळ्यापुढें आणणें, प्रत्यक्ष -प्रसिद्ध -उघड करणें, मैदानांत -पटांगणांत येऊं देणें -आणणें. २ ( of animal or plant) *to bring forth* प्रसवणें, उपजवणें, उत्पन्न होणें *in. con.* with पासून *of s.* ३ *to bring* (a play, performer, ) *before the public* लोकांपुढें आणणें, समाजापुढें -रंगभूमीवर आणणें. ४ *to manufacture goods from raw material* (कच्च्या मालापासून पक्का माल ) तयार करणें, उत्पन्न करणें. ५ *to cause to come into existence* उत्पन्न करणें. [ To BE PRODUCED उत्पन्न होणें.] ६ *to raise* पैदा करणें, काढणें, उपजवणें, निपजवणें. ७ ( *geom.*) *to lengthen* वाढविणें.

Prod'uce *n. that which is produced* उत्पन्न *n*, निष्पन्न *n*.

Produ'cer *n.* उत्पन्न करणारा, उत्पादणारा. २ ( पीक वगैरे) काढणारा, उपजवणारा. ३ (as opposed to a *consumer*) बनवणारा, उत्पादक.

Produc'ible *a. able to be produced* हजर करण्याजोगा,

पुढें काढण्याजोगा, काढून दाखवायाजोगता. २ उत्पन्न करण्यासारखा.

Prod'uct *n. that which is produced* उत्पन्न *n*, उपज *f*, पैदास *f*. २ *a result* परिणाम *m*, फल or फळ *n* ३ गुणाकार *m*, घात *m*.

Produc'tion *n*. बाहेर काढणें *n*, काढणें *n*, काढून दाखविणें *n*. २ देणें *n*, उपजवणें *n*. ३ (a) करणें *n*, उत्पादणें *n*, उत्पन्न करणें, पैदा करणें, उत्पादन *n*. (b) पैदास्त *f*, पैदास *f*, पैदा *f*, जन्म *m*, उत्पत्ति *f*, उद्भव *m*, निर्माण *n*. [LAW OF RECIPROCAL P. AND REPRODUCTION बीजांकुरन्याय *m*.] ४ *product* उत्पन्न *n*, उपज *f*, निपज *f*, फळ *n*. ५ (of art, intellect) कृत्य *n*, कृति *f*, निर्मित वस्तु *f*.

Produc'tive *a*. उत्पन्न करणारा, उत्पादक, उत्पादनक्षम. [DIRECTLY P. प्रत्यक्षोत्पादक. INDIRECTLY P. अप्रत्यक्षोत्पादक.] २ (of soils) *fertile* सुपीक, पिकाऊ, पिकाळ, भातबर, बहुप्रसव, बहुफल. ३ (of a business) *lucrative* धनोत्पादक, पैदाशीचा, फायद्याचा, किफायतीचा, ओला, ओलाव्याचा, जीवदार, फलप्रद. ४ (as used of the working class) उत्पादक. Produc'tiveness, Productiv'ity *n*. सुपीकपणा *m*, पिकाऊपणा *m*, पिकाळपणा *m*, बहुप्रसवत्व *n*, बहुफलत्व *n*. २ किफायतशीरपणा *m*, किफायत *f*, ओलेपणा *m*, ओलावा *m*. ३ फलदायकत्व *n*. ४ उत्पादकता *f*.

Proem (prō'em) [Fr. *proeme*, L. *proemium*, –Gr. *prooimion* –*pro*, before, *oimos*, a way.] *n. an introduction* उपोद्घात *m*. २ *preface* प्रस्तावना *f*. Proem'ial *a. introductory* उपोद्घाताचा -विषयीं -संबंधीं, उपोद्घातादाखल.

Profanation, Profanatory, See under Profane.

Profane (pro-fān') [Fr.–L. *profanus* –*pro*, before, *fanum*, a temple.] *a. impious* भ्रष्ट, देवनिंदक, धर्मनिंदक, देवद्वेषी, धर्मद्वेषी, धर्मलंड, धर्मविरुद्ध, अपवित्र, अधार्मिक, बाटगा. २ *secular* व्यावहारिक, धर्मेतरविषयांसंबंधीं. P. *v. t. to pollute* बाटवणें, विटाळणें, विटाळवणें, विटाळ *m*. करणें -लावणें -आणणें, भ्रष्टविणें, भ्रष्ट -दूषित करणें, पवित्रपणा *m*. दवडणें *g. of o*. २ *to act impiously towards* हेळसांडणें, हेळणें, हेलना *pop*. हेळणा *f* -हेळसांड *f* -हेला *pop*. हेळा *f* -अपमान *m* -अनादर *m* -निंदा *f*. करणें *g. of o*. ३ *to use unworthily* अनादरबुद्धीनें -अपमानबुद्धीनें घेणें -वहिवाटणें -वापरणें. Profan'ation *n*. बाटवणें *n*, भ्रष्ट करणें *n*, भ्रष्टीकरण *n*. Profana'tory *a. profaning* बाटवणारा, भ्रष्ट करणारा. Profaned' *pa. t.* P. *pa. p.* बाटवलेला, विटाळवलेला, भ्रष्ट, दूषित. २ हेळसांडलेला, अपमानित, अनादृत, असत्कृत. Profane'ly *adv*. देवनिंदाबुद्धीनें, धर्मनिंदाबुद्धीनें, देवलंडाईनें, धर्मलंडाईनें. Profane'ness *n*. देवनिंदा *f*, धर्मनिंदा *f*, देवनिंदाबुद्धि *f*, देवलंडाई *f*, धर्मनिंदाबुद्धि *f*, धर्मलंडाई *f*.

Profan'er *n*. बाटवणारा, भ्रष्ट करणारा, विटाळवणारा. २ हेळसांड करणारा, हेळसांडणारा, अनादरकर्ता, -अपमानकर्ता.

Profan'ity *n.* Same as Profaneness.

Profess ( pro-fes' ) [L. *pro*, publicly, and *fateri*, to confess.] *v. t.* & *v. i.* *to set up a claim to* ( quality, &c.) (-चा) बाणा बाळगणें. २ *to pretend* ( to be or to do ) दाखवणें, दर्शविणें, ( ची ) ऐट मिरवणें, ( -चा ) बाहणा करणें, (-चें) ढोंग करणें; as, "They P. extreme regret; Do not P. to be a scholar." ३ *to openly declare* उघड सांगणें, स्पष्ट -धडधडीत बोलून दाखविणें, उघडपणें सांगणें -कबूल करणें; as, "I P. that this is news to me." ४ *to affirm one's faith in or allegiance to* ( धर्मावरील किंवा देवावरील विश्वास ) उघड सांगणें, जोरानें प्रतिपादणें, जाहीर करणें. ५ *to make one's profession* धंदा करणें. ६ *to teach* ( a subject ) *as a professor* प्रोफेसर म्हणून शिकविणें. ७ *to perform the duties of a professor* प्रोफेसराचें काम करणें.

Professed' *pa. p. a.* *openly declared* उघड सांगितलेला, जाहीर केलेला, सांगूनसवरून कबूल केलेला -असलेला, जाहीर; as, "He is a P. Christian." २ *alleged, ostensible* बाह्यात्काराचा, दिसण्यापुरता, दिखाऊ. ३ *claiming to be duly qualified* (लायकीचा) बाणा बाळगणारा, प्रसिद्ध, जाहीर, पेशेवाला; as, "A. P. anatomist; A P. monk."

Profess'edly *adv.* धडधडीत, सांगूनसवरून, बोलून चालून, प्रसिद्धपणें.

Profession ( pro-fesh'-un ) [See Profess.] *n.* *a declaration* जाहीर करणें *n*, उघड बोलून दाखविणें *n*, कबूल करणें *n*. (b) स्पष्ट कबुली, उघड अंगीकार *m*, उद्गार *m. pl.* (c) भाषण *n*, शब्द *m. pl.*, वाणी *f*, भाषा *f*; as, "In practice if not in P.; Accept my sincere professions of regard." २ *declaration of belief in a religion* ( धर्मावरील विश्वासाची) कबुली *f*, स्वीकार *m*. ३ *a vow made on entering a religious order* (दीक्षा घेतांना केलेली ) प्रतिज्ञा *f*. ४ *a superior kind of occupation* ( वकिली, वैद्यक, धर्मोपदेश, वगैरे ) उच्च धंदा *m*, पेशा *m*, वृत्ति *f*. (b) उद्योग *m*, व्यवसाय *m*. [ THE LEARNED PROFESSIONS ( वकिली, वैद्यक, धर्मोपदेश वगैरे ) सुशिक्षित -सुशिक्षितांचे धंदे. THE MEDICAL P. वैद्यकी *f*, डाक्तरगिरी *f*. THE MILITARY P. शिपाई बाणा *m*, शस्त्रवृत्ति *f*.] ५ *the body of persons engaged in this* सुशिक्षित धंद्यांतील लोक *m. pl.* (b) (*esp.*) *actors* नट *m. pl.*; as, "Lets apartments to the P."

Profess'ional *a.* *belonging to a profession* धंद्याचा, धंद्यासंबंधीं, धंद्याविषयीं, धंदेवाईक, धंदेवाला, धंद्यांतला; as, "Professional jealousy." [P. AGITATOR धंदेवाला चळवळ्या *m*. P. CRICKETER पैशाकरितां क्रिकेट खेळणारा *m*, धंदेवाला क्रिकेटपटु *m*. P. ADVISER धंदेवाईक सल्लागार.] P. *n.* *an actor* नट *m*. २ *a public performer* (लोकांपुढें ) खेळ करणारा *m*, ( धंदेवाला ) तमासगीर *m*. ३ *one who engages in a sport for his livelihood* धंदा म्हणून खेळ खेळणारा *m*, धंदेवाला खेळाडू *m*.

Profes'sionalism *n. qualities or stamp of a profession* धंद्याचा विशेष *m.* २ *engagement in a sport for payment* पोटाकरितां -पैशाकरितां खेळ खेळणें *n.*

Profes'sionally *adv.* धंद्याच्या दृष्टीनें, धंदा म्हणून.

Professor (prō-fe-s'ėr) *n.* (धर्म वगैरेचा) बाणा बाळगणारा *m.* २ अध्यापक *m*, गुरु *m*, प्रोफेसर *m*, वस्ताद *m.* ३ एखादा धंदा पूर्णपणें जाणणारा *m*, पुरा कसबी *m.*

Professo'rial *a.* प्रोफेसरचा, प्रोफेसरसंबंधीं.

Professo'riate, Profes'sorate *n. the office of a professor* अध्यापकाचें काम *n.* २ (collectively) *professors* अध्यापकमंडळ *n*, अध्यापकमंडळी *f*, अध्यापकवर्ग *m.*

Profess'orship *n.* अध्यापकाची जागा *f.*

Proffer (prof'ėr) [Fr. *proférer*, L. *proferre,–pro*, forward, and *ferre*, to bring.] *v. t. to offer for acceptance, to make a tender of* पुढें करणें, द्यावयास काढणें, अर्पणें, अर्पण करणें, वाहणें, देण्यास कबूल होणें. P. *n. an offer made, a proposal* सांगणें *n*, म्हणणें *n*, काढलेली गोष्ट *f*, बोलणें *n*, सूचना *f.*

Profic'ience,-cy *n. adeptness* प्रावीण्य *n*, निपुणता *f*, नैपुण्य *n*, प्रवीणता *f*, वाकबगारी *f*, चातुर्य *n*, हुषारी *f*, व्युत्पत्ति *f.* २ *progress or improvement in anything* गति *f*, प्रगति *f*, सुधारणा *f.*

Proficient (pro-fish'ent) [L. *proficiens, –entis*, pr. p. of *proficere*, to make progress –*pro*, forward, and *facere*, to make.] *a. well-skilled, thoroughly qualified* निष्णात, निपुण, प्रवीण, वाकबगार, व्युत्पन्न, चतुर. P. *n. an expert, an adept* वाकबगार मनुष्य *m*, निष्णात -निपुण &c. मनुष्य *m.*

Profic'iently *adv.* निपुणतेनें, प्रवीणतेनें, चतुरतेनें, &c.

Profile (prō'fīl) [It. *profilo* (Fr. *profil*) –L. *pro*, and *filum*, a thread, outline.] *n. an outline* बाह्याकार *m.* २ *a side-face picture* एका बाजूचें (काढलेलें) चित्र, एकडोळी चित्र *n.* P. *v. t.* (*rare*) *to draw the outline of* बाह्यरूप -बाह्यमर्यादा काढणें. २ *to draw a side-view* एकडोळी -एकांगी चित्र काढणें.

Pro'filist *n.* एकडोळी -एकांगी चित्रें काढणारा.

Profit (prof'it) [Fr. –L. *profectus*, progress, advance –*proficio, profectum*, to make progress.] *n. gain* नफा *m*, फायदा *m*, मिळकत *f*, उत्पन्न *n*, लाभ *m.* [P. AND LOSS (*arith.*) नफातोटा.] २ *benefit, advantage* फायदा *m*, हित *n*, कल्याण *n*, श्रेय *n*, बरें *n.* P. *v. t. to be good to, to help on* हित *n* -बरें *n* करणें *g. of o.*, उपयोगीं पडणें. P. *v. i. to benefit* मिळवणें, फायदा होणें *in. con.*, *g. of s.* २ (*Shakes.*) *to do or bring good, to be of use* उपयोगास येणें, उपयोगीं पडणें, उपयोग *m.* होणें *g. of s.*, हितकर -हितावह होणें. Prof'ited *pa. t.* & *pa. p.* Prof'iting *pr. p.* & *v. n.*

Prof'itable *a. lucrative* फायदेशीर, किफायतीचा, मिळकतीचा. २ *beneficial* हितावह, हितकर, उपयुक्त, उपयोगी, हितकारक, कामाचा.

Prof'itableness *n.* फायदेशीरपणा *m.* २ हितावहता *f.*

Prof'itably *adv.* किफायतीनें, नफेवार, नफा मिळवून. २ हितावहतेनें, उपयुक्ततेनें, हितकारकपणानें.

Prof'itless *a.* बिनफायद्याचा, बेफायदेशीर, बिनफायदेशीर.

Prof'ligacy *n. a very vicious course of life, dissoluteness* बदफैली *f*, नादी -छंदी -फंदी स्वभाव *m*, व्यसनबाजी *f*, दुराचरण *n*.

Profligate (prof'li-gāt) [Lit. 'dashed down,' L. *profligatus*, pa. p. *profligare* –*pro*, before, and *fligare*, to dash.] *a. broken down in respect of rectitude, principle, virtue, or decency, openly and shamelessly immoral, dissolute* बदफैली, दुराचरणी, व्यसनी, फंदी, छंदी, छंदीफंदी, नादी. P. *n. a dissolute person* बदफैली, मनुष्य *m*, नादी -छंदी व्यसनी मनुष्य *m*.

Prof'ligately *adv.* बदफैलीपणानें, व्यसनानें.

Prof'ligateness *n.* Same as Profligacy.

Profound (pro-fownd') [Lit. 'deep,' Fr. *profond* –L. *profundus*–*pro*, forward, downwards, and *fundus*, E. Bottom.] *a. far below the surface, deep* खोल, गाढ, ओंड. २ *intellectually deep, entering far into subjects, thorough* गहन, खोल, पारंगत, व्युत्पन्न, प्रवीण. [PROFOUND MEDITATION (*phil.*) गहन चिंतन. ]. ३ *characterised by intensity, deeply felt* अतिशय, फार, कमालीचा, शिकस्तीचा, गाढ, घोर. ४ *submissive* विनयशील; as, "A P. bow." P. *n.* समुद्र *m*, सागर *m*. Profound'ly *adv. deeply*, फार, अतिशय. २ *with deep knowledge* पारंगतपणानें, खोल बुद्धीनें, खोल शिरून. ३ *with deep concern* फार काळजीपूर्वक. Profound'ness *n. profundity, depth* खोलपणा *m*. २ गूढपणा *m*, गहनता *f* -पणा *m*. ३ प्रवीणता *f*, प्रावीण्य *n*. ४ कमाल *f*, शिकस्त *f*, गाढपणा *m*.

Profun'dity *n.* Same as Profoundness.

Profuse (pro-fūs') [L. *profusus*, *pa. p.* of *profundere* –*pro*, forth, and *fundere*, to pour.] *a. bountiful, exceedingly liberal* सढळ, सढळ हाताचा, उदार, उदारमनाचा. २ *superabundant, prodigal, lavish* रेलचेल, समृद्ध, विपुल, बहुल, हवा तितका, मनसोक्त, उधळपट्टीचा, उधळेपणाचा, फाजील. Profuse'ly *adv.* सढळपणानें, सढळ हातानें, उदारपणानें. २ रगडून, रेलचेल, मनसोक्त. Profuse'ness, Profu'sion *n.* सढळपणा *m*, सढळ हात *m*, मोकळा हात *m*, औदार्य *n*. २ *abundance, exuberance, plenty* रेलचेल *f*, चंगळ *f*, चंगाळी *f*, लूट *f*, समृद्धि *f*, बाहुल्य *n*, विपुलता *f*, वैपुल्य *n*.

Profusion, See under Profuse.

Progenitor (pro-jen'it-or) [L. *pro*, before, and *genitor*, a parent.] *n. a forefather, an ancestor* पूर्वज *m*, वाडवडील. Progen'itorship *n.* पूर्वजत्व *n*.

Progen'itress *n. fem.* स्त्रीपूर्वज *f*.

Prog'eny *n. children, offspring, race* संतति *f*, संतान *n*, मुलेंबाळें *n. pl.*, वंशज *m. pl.*

Prognosis ( prog-nō'sis ) [ Gr. *pro*, before, *gignōskō*, Sk. ज्ञा, to know. याचा मूळ अर्थ 'पूर्वज्ञान, भविष्यज्ञान' असा होता. ] *n. (med.) the act or art of foretelling the course of a disease from the symptoms* (रोगाचा) साध्यासाध्यविचार करणें. २ *the opinion thus formed* (रोगाचें) निदान *n*, परीक्षा *f*, (रोगाचा) साध्यासाध्यविचार.

Prognostic ( prog-nos'tik ) [Through O. Fr. ( Fr. *pronostic* ) from Gr. *prognostikon.*] *a. indicating a future event by signs or symptoms* भविष्यसूचक, आधीं सुचविणारा, अग्रसूचक. P. *n. an indication, a sign or omen* पूर्वचिन्ह *n*, लक्षण *n*, चिन्ह *n*, भाकित *n*. २ ( hence ) *a prediction* भविष्य *n*, भविष्यकथन *n*, भाकित *n*. ३ (*med.*) रोगलक्षण *n* -चिन्ह.

Prognos'ticable *a. capable of being foretold* भविष्यकरण्यासारखा, भविष्य करतां येण्याजोगा.

Prognos'ticate *v. t. to foretell* (पुढें होणारी गोष्ट) पूर्वीं सुचविणें -दाखविणें, भविष्य *n*. करणें -सांगणें *g. of o.*

Prognostica'tion *n*. पूर्वीं सुचविणें *n*, भविष्य करणें *n* -सांगणें *n*, &c. २ *prediction* भविष्य *n*, भाकित *n*. ३ *a foretoken* पूर्वचिन्ह *n*, पूर्वलक्षण *n*.

Prognos'ticator *n*. भविष्य करणारा *m* -सांगणारा *m*.

Programme, ( less correctly ) Program ( prō'gram ) [Fr.-Gr. *programma -pro*, before, and *graphein*, to write.] *n. a plan of the order to be followed* कार्यक्रम *m*, कामांची याद *f*, ठरलेलीं कामें *n. pl.* [WHAT IS THE P. FOR TO-DAY? आजचा कार्यक्रम काय आहे? आजचीं काय कामें ( ठरलीं ) आहेत ?] २ *the proposals of a political party* ( राजकीय पक्षानें करूं म्हटलेल्या ) कामांची यादी *f*, कार्यक्रम *m*.

Progress (prog'res) [ Fr. -L. *progressus-progredior*, to go forward-*pro*, forward, and *gradior*, to go.] *n. a going or proceeding onward, an advance* पुढें सरणें *n* -जाणें *n*, गमन *n*, गति *f*, चलती *f*, क्रम *m*; *Specif.* (a) (in actual space) *course, passage* मजल *f*, पल्ला *m*. (b) ( in the growth of an animal or plant ) वाढ *f*, वृद्धि *f*. (c) ( in business of any kind ) प्रगति *f*, वाढ *f*, बढती *f*. ( d ) ( in knowledge or learning ) प्रगति *f*, वाढ *f*, सुधारणा *f*, सुधारणूक *f*. (e) ( शाळेंतील ) अभ्यास *m*, विद्याभ्यास *m*. २ *a journey of state* स्वारी *f*. P. *v. i. to proceed, to go on* पुढें जाणें, पुढें चालणें, आक्रमणें, आक्रमण *n*. करणें, प्रसार होणें *g. of s.* २ *to make improvement* प्रगति *f*. करणें, सुधारणें, सुधारणा करणें. Progressed' *pa. t. & pa. p.* Progress'ing *pr. p.*

Progres'sion *n. motion onward* पुढें ( जाण्याची ) गति *f*. २ *lapse or process of time* कालांतर *n*, कालगति *f*. ३ ( *math.*) श्रेढी *f*, श्रेणी *f*. [ARITHMETI-

CAL P. गणितश्रेढी *f.* GEOMETRICAL P. भूमितिश्रेढी. HARMONIC P. गायनात्मकश्रेढी, हरात्मकश्रेढी.] ४ (*mus.*) आवाजाचा चढउतार *m*, स्वरश्रेढी *f*, आरोहावरोह *m*.

Progres'sional *a.* प्रगतिविषयक. २ *tending to, or capable of, progress* प्रागतिक, प्रगतिक्षम. ३ श्रेढीचा.

Progress'ionist *n.* जीवांची सदोदित उन्नति होत असते असें मानणारा *m*, उन्नतिवादी.

Progres'sive *a. moving forward, proceeding onward* पुढें जाणारा, पुढें चालणारा, पुढें पाऊल टाकणारा, प्रागतिक. २ *increasing* वर्धमान, अधिकाधिक होत जाणारा, क्रमिक, आनुक्रमिक. [P. EXERCISES क्रमिक पाठ *m. pl.*] ३ *improving* सुधारणारा, प्रागतिक, वाढता, वाढते दशेचा, चढत्या कळेचा. Progres'sively *adv.* प्रगतीच्या धोरणानें.

Prohibit (pro-hib'it) [L. *prohibere, prohibitum* -*pro*, before, and *habere*, to interdict.] *v. t. to forbid by authority, to interdict* (कायद्यानें) मनाई *f.* करणें, बंदी *f.* -निषेध *m.* करणें *g.of o.*, हरकत *f.* करणें -घेणें. २ *to hinder, to debar, to prevent* (-ला) अडथळा *m* -अटकाव *m* -प्रतिबंध *m.* करणें, बंद करणें.

Prohibit'ed *pa. t.* P. *pa. p.* निषिद्ध, मनाई केलेला.

Prohib'iter *n.* बंदी *f* -मनाई करणारा *m.* २ अडथळा -अटकाव &c. करणारा *m.*

Prohibi'tion *n. the act.* बंदी *f* -अडथळा *m* -&c. करणें *n.* २ *an interdict* (कायद्यानें केलेली) बंदी *f*, (कायदेशीर) मनाई *f.* ३ बंदीचा कायदा *m* -हुकूम *m.*

Prohibi'tionist *n. one who favours prohibitory duties on foreign goods in commerce* परदेशी मालावर जबर जकात बसवावी अशा मताचा मनुष्य *m*, प्रतिबंधवादी. २ *one who favours the prohibition of the sale of alcoholic liquors as beverages* मद्यविक्रयप्रतिबंधवादी *m*, मद्यप्रतिबंधवादी *m.*

Prohib'itive, Prohib'itory *a. tending to forbid or prohibit, implying prohibition* मनाईचा, मनाई करणारा, निषेधाचा, निषेध करणारा, निषेधक. [PROHIBITIVE PRICES मनाईच्या -भारी किंमती.] २ (*pol. eco.*) जबर, भारी, प्रतिबंधक. [P. TARIFF प्रतिबंधक जकात *f*, प्रतिबंधक तारीफ.]

Project (proj'ekt) [L. *pro*, Sk. प्र, before, and *jacere*, to throw. धात्वर्थ पुढें टाकणें किंवा फेंकणें असा आहे.] *n. a scheme, a design* योजना *f*, कल्पना *f*, बेत *m*, युक्ति *f*, तजवीज *f.* २ *a plan* (काल्पनिक) नकाशा *m*, प्लान *m.* ३ *an idle scheme* अशक्य -अव्यवहार्य कल्पना किंवा योजना *f*, लचांड *n*, झेंगट *n.* P. *v. t. to plan, to contrive* (-ची) योजना ठरवणें, योजना करणें -काढणें, युक्ति योजणें -काढणें -पुढें मांडणें. २ (-चा) प्लान -नकाशा काढणें. ३ (वस्तू) फेंकणें, प्रक्षेप करणें. ४ (*chem.*) *to cast* (*into* or *on*) टाकणें, घालणें. ५ *to cause to fall on a surface* (छाया किंवा प्रकाश) पाडणें, प्रक्षेपणें. ६ (*phil.*) *to cause* (an idea) *to take shape* विक्षेप करणें, प्रक्षेप करणें, मूर्त स्वरूप देणें.

७ (*math.*) (एखाद्या आकृतीचा रेघा काढून) प्रत्यालेख काढणें, विक्षेप काढणें, प्रतिभा (?) काढणें. P. *v. i. to shoot forward* पुढें येणें, डोकावणें. Project'ed *pa. t. & pa. p.* पुढें आलेला, &c. Project'ing *pr. p.*

Project'ile *a. throwing or impelling forward* पुढें ढकलणारा, पुढें सारणारा -लोटणारा. २ *capable of being projected by force* प्रक्षेपणीय. ३ (*math.*) प्रक्षेपक. [P. FORCE प्रक्षेपक बल *n.*] P. *n. a body projected by force through the air, esp. a missile* अस्त्र *n*, प्रक्षेपणीय. २ फेंकलेली वस्तु *f*, प्रक्षिप्त वस्तु *f*. ३ (*math.*) पतनक्षेत्र *n.*

Projec'tion *n. -the act.* पुढें टाकणें -ढकलणें, पुढें फेंकणें *n*, प्रक्षेपण *n.* २ *a jutting out* पुढें येणें. ३ *a part jutting out* पुढें आलेला भाग *m*, पुढें आलेलें टोंक *n.* ४ *the act of scheming or planning* युक्ति *f* -उपाय *m.* योजणें *n*, युक्ति *f.* काढणें, बेत *m* -योजना *f.* करणें *n.* ५ *a contrivance, a plan* योजना *f*, कल्पना *f*, युक्ति *f*, बेत *m*, उपाय *m.* ६ (*persp. & math.*) प्रत्यालेख *m*, विक्षेप *m*, प्रतिभा *f*, प्रलंबता *f.* [CONIC P. शंकूचा प्रत्यालेख. CYLINDRICAL P. सिलिंडरचा प्रत्यालेख *m.* GLOBULAR P. गोलाकार प्रत्यालेख *m.* ORTHOGRAPHIC P. लंबजन्य प्रत्यालेख. STEREOGRAPHIC P. (भरींव किंवा घन) गोलाचा प्रत्यालेख.] ७ किमया करतांना वापरण्याची पूड *f.* ८ *a mental image viewed as objective reality* मूर्त कल्पना *f*, स्थूल कल्पना *f.* ९ विक्षेप (in Vedantic Philosophy).

Project'or *n. one who projects a scheme or design* योजक *m*, योजना *f* -कल्पना *f* -युक्ति काढणारा. २ *one who forms fanciful schemes* अशक्य कल्पना काढणारा *m*, झेंगट्या. ३ *an apparatus for projecting rays of light* प्रकाशप्रक्षेपक.

Prolapse (prō-laps'), Prolapsus (prō-lap'sus) [L. *prolabi*, *prolapsus*, to fall forward,-*pro*, forward,+*labi*, to fall.] *n. falling down or out of some part of the body from the usual position* भ्रंश *m*, च्युति *f*, बाहेर पडणें *n*, बाहेर येणें *n.* [P. ANI गुदभ्रंश *m*, अंगपात *m.* THE PROLAPSED GUT आंग *n*, आगरूं *n*, आगेरूं *n*, कुला *m.* P. UTERI गर्भाशयभ्रंश *m*, योन्यर्श *n*, अंगपात *m.* THE PROLAPSED MEMBER भांडें *n.*] P. *v. i. to fall down* खालीं पडणें, बाहेर पडणें, भ्रंश *m.* होणें *g. of s.*

Prolegs (prō-legs) *n. pl.* (डहाळी घट्ट धरण्याचे सुरवंटाचे) उपपाद *m. pl.*

Proliferous (pro-lif'er-us) [L. *proles*, offspring + ferous.] *a.* (*bot.*) *producing leaf or flower-buds from leaf or flower* कलिकाधारी (पर्ण or पुष्प), तोकधारी (पर्ण or पुष्प), गैरजागीं येणारी (कळी); उ० पायभरी.

Proletarian (pro-le-tā'ri-an) [L. *proletarius*, one who served the state (in ancient Rome) not with property but with offspring.] *n.* खालच्या

-कनिष्ठ वर्गांतील मनुष्य *m.* २ *a workman* मजूर *m*, कामकरी *m.* P. *a.* खालच्या लोकांचा, सामान्य लोकांचा. २ *vulgar* ग्राम्य, हलकट.

Proletariat, (incorrectly) Proletariate *n.* (in Rom. History) *lowest class of community* खालच्या वर्गांतील लोक *m. pl.* २ (*pol. eco.*) *labouring classes* मजूर लोक *m. pl.*, मजूर *m. pl.*

Prolific,-al (pro-lif'ik,-al) [Fr. *prolifique*, –L. *proles*, offspring, & *facere*, to make.] *a. producing offspring* प्रसवशील, बहुप्रसव, बहुफल, गर्भधारणशील, अवंध्य. २ *productive* फलोत्पादक, फलदायक, संतानोत्पादक. ३ (of a subject) *occasioning much talk* वादविवाद उत्पन्न करणारा. ४ (of a literary man) *industrious, writing much* पुष्कळ लिहिणारा, बहुलेखक, परिश्रम करणारा. Prolif'ical *a. fruitful* फलदायक, फलप्रद. Prolif'ically *adv.* फलदायकत्वानें. Prolif'icate *v. t. to fertilize, to impregnate* फलदायी -सुपीक करणें. Prolifica'tion *n. the generation of young* प्रजोत्पादन *n*, प्रजोत्पत्ति *f*, संतति *f.* २ (*bot.*) *reproduction by the growth of a plant* पुन्हां होणारी वाढ *f*, पुनर्वृद्धि *f.* Prolif'icness *n. fruitfulness* फलदायकत्व *n*, फलप्रदत्व *n* -पणा *m*, सुपीकता *f*, सुपीकपणा *m*.

Prolificate, Prolification, See under Prolific.

Prolix (pro'liks) [Fr. *prolixe*, –L. *prolixus*, *pro*, forward, *liqui*, to flow.] *a. tedious* बयादी, बयादखोर, दीर्घसूत्री. २ *long and wordy* विस्तृत, शब्दजालानें भरलेला, पुनरुक्ति असलेला. [P. STORY चऱ्हाट *n*, चर्पटपंजरी *f.*] Prolix'ly *adv.*

Prolix'ity, Prolix'ness *n.* बयादीपणा *m*, बयादखोरपणा *m*, दीर्घसूत्रीपणा *m*, दीर्घसूत्र *n.* २ विस्तार *m*, विस्तर *m*, शब्दजाल *n*, चऱ्हाट *n.*

Prolocutor (pro-lok'ū-tor) [L. *pro*, before, *loqui*, *locutus*, to speak.] *n. one who speaks for another* दुसऱ्याबद्दल बोलणारा, वकिली करणारा *m.* २ प्रोलाक्यूटर *m*, सभापति *m*, अध्यक्ष *m.* Prolocu'trix *n. fem.*

Prolocu'torship *n.* प्रोलाक्यूटरचा हुद्दा *m* -अधिकार *m.*

Prologue (prō'-log) [Gr. *pro*, before, and *logos*, word.] *n. a preface* प्रस्ताव *m*, प्रस्तावना *f*, प्रवेशक *m*, प्रवेशिका *f.* २ *a speech* (*usu.* in verse) *which introduces a play* (नाटकाचा पद्यात्मक) प्रस्ताव *m*, प्रास्ताविक भाषण *n*, प्रास्ताविक कविता *f.* [BENEDICTORY P. नांदी *f.*] ३ (*fig.*) *act or event, serving as introduction* प्रास्ताविक कृत्य *n* -गोष्ट *f.* P. *v. t. to introduce with a prologue* प्रस्तावानें सुरू करणें.

Prolong (prō-long') [Fr. *prolonger*,–L. *prolongāre*, *pro*, forward, *longus*, long.] *v. t. to extend* (*in time or length*) लांबविणें, लांब -दीर्घ करणें, वाढविणें. २ *to postpone* लांबणीवर -टाकणें -लांबीवर घालणें -धरणें, लांबण *f.* लावणें, लांबता धरणें. [TO BE PROLONGED लांबणें, -लांबणीवर पडणें.] Prolong'ate *v. t.*

*to lengthen* लांबवणें, वाढविणें, लांब करणें. Prolongated *pa. t.* and *pa. p.* Prolonga'ting *pr. p.* Prolonga'tion *n.* लांबविणें *n*, वाढविणें *n.* २ लांबणीवर टाकणें -घरणें. Prolonged' *pa. t.* P. *pa. p.* लांबविलेला, फार वेळ चाललेला.

Prolongate, Prolongation, See under Prolong.

Promenade ( prom-e-nād' ) [ Fr. –L. *prominere*, to drive forward, *pro*, forward, *minere*, to drive. ] *n. a walk for pleasure, exercise or show* सहल *f*, तलावा *m*, रपेट *f*, फेरी *f*, विहार *m.* २ *a public walk* सहल करण्याची जागा *f*, हवा खाण्याची जागा *f*. वाट *f*. P. *v. i. to take a walk* सहल करणें, तलावा *m.* देणें -मारणें, रपेट *f* -फेरी *f.* मारणें.

Promena'der *n.* सहल करणारा, रपेट मारणारा.

Promethean ( pro-mē'thē-an ) [ L. *Prometheus.*] *a. pertaining to Prometheus* (ग्रीक पुराणांतील ) प्रॉमिथिअसनामक पुरुषाचा. २ *life-giving, like the fire which Prometheus stole from heaven* चैतन्य देणारा, चेतना उत्पन्न करणारा, जीवंतपणा आणणारा.

Prominence,-nency ( prom'i-nens,-nensi ) [ Fr.–L. *prominere* to jut forth, *pro*, forth, *minere*, to jut.] *n. that which stands out, an elevated part* उंचवटा *m*, उंचपणा *m*, उभरेपणा *m.* २ (*astro.*) तेजःशृंग *n*, उन्नतज्वाला *f*; as, "Solar *prominences.*" ३ *noticeableness* ढळढळीतपणा *m*, ठळकपणा *m.* ४ *a distinguished position* महत्त्व *n*, मोठेपणा *m*, मुख्य स्थान *n*, प्रधानता *f*, प्राधान्य *n*, श्रेष्ठपणा *m.*

Prom'inent *a. jutting out* बाहेर आलेला, उंच, उभरा. २ *noticeable* ठळक, टळटळीत, ठळठळीत, ढळढळीत. ३ *distinguished* मुख्यस्थानाचा, प्रधान, मुख्य, मुखरण. [P. PERSON नाक *n*, मोहरा *m*, ठळक मनुष्य *m.*]

Promiscuous ( pro-mis'kū-us ) [ L. *promiscuus*, -*pro* inten., *miscere*, to mix.] *a. mixed* मिसळलेला, एकत्र केलेला. २ *of all sorts* सरमिसळीचा, भेसळीचा, सर्वप्रकारचा, भेसळ असलेला, मिसळ असलेला. ३ *indiscriminate* भेसळीचा, हवा तसा, क्रमविचारहीन, भेदविचारहीन, एकबाटाचा, एकमंगलाचा, बेवडीचा. [ P. INTERMINGLING OR INTERCOURSE एकमंगल *n*, एकबाट *m*, एकभेल *f*, एकवर्ण *m*, गोकुळ or गोकुल *n*, गोतांबील *n*, जंगमढवळें *n*, सांवळें गोधळें *n.*] ४ ( of an assemblage ) *confused* घोंटाळा झालेला, गडबड उडालेला, गोंधळलेला.

Promis'cuously *adv.* सरसकट, भेदाभेद न पाहतां, एकबाट.

Promis'cuousness, Promiscu'ity *n.* भेदविचाराराहित्य *n*, भेदाभेदशून्यता *f*, खिचडी *f*, चिवडा *m*, सरसकटपणा *m*, भेसळ *f*, मिसळ *f.*

Promise ( prom'is ) [ Fr. *promesse* –L. *promissa*, *promittere*, to send forward, *pro*, forward, *mittere*, to send.] *n. a pledge binding to a certain course of conduct* वचन *n*, बोली *f*, भाष *f*, भाक *f*,

प्रतिज्ञा *f*, शब्द *m*, अभिवचन *n*, वाचा *f*. [AMUSING OR BEGUILING WITH EMPTY PROMISES झोंकपट्टी *f*, झुगारपट्टी *f*, थापा मारणें. HOLLOW PROMISES झोंकपट्टीचें बोलणें *n*, पोकळ वचन *n*, थापा. PLEDGE FOR PERFORMANCE OF A P. भाक *f*. P. UPON OATH आणभाक, आणभाप *f*. P. -OBSERVING वचन पाळणारा. RECIPROCAL P.s परस्पर वचनें. JOINT P.s संयुक्त वचनें. SURE OR UNFAILING P. भीष्मप्रतिज्ञा *f*, कडकडीत प्रतिज्ञा *f*. TO BE BOUND BY ONE'S WORD OR P. शब्दास -वचनास -भाकेस गुंतणें. TO BREAK ONE'S P. वचन मोडणें, वचनभंग करणें. TO KEEP ONE'S P. वचन -शब्द पाळणें. TO REDEEM OR MAKE GOOD ONE'S P. वचन सत्य करणें, भाक *f*. सत्य करणें -खरी करणें, वचन पार पाडणें.] २ *likelihood of future ability* होतकरूपणा *m*, (पुढें चांगला निपजण्याचा) संभव *m*. P. *v. t. to pledge oneself to certain conduct* (अमुक करूं म्हणून) वचन *n* -भाक *f* -भाष *f*. देणें *g. of o.*, बोली *f* -प्रतिज्ञा *f* -पण *m*. करणें *g. of o.*, तोंडानें देणें, वाग्दान *n* -वाचादान *n*. करणें *g. of o.*, देऊं करणें. P. *v. i.* भाक *f* -वचन *n*. देणें, प्रतिज्ञा *f* -बोली *f*. करणें, टाळी *f*. मारणें -देणें, हातावर हात मारणें, वाच्यांश करणें, वचनीं -वचनास -वचनानें गुंतणें, जीभ *f* -जिभली *f*. हालणें *g. of s.* २ *to give ground for hope* (पुढें होईल अशी) आशा *f*. असणें, होईल असें दिसणें. Promis'ed *pa. t.* P. *pa. p.* वचन दिलेला -केलेला, वचनाचा, भाकेचा, वाचादत्त.

Promisee' *n.* वचन घेणारा *m*.

Prom'iser *n.* वचन देणारा *m*, बोली *f* -प्रतिज्ञा *f*. करणारा.

Prom'ising *pr. p.* P. *a. hopeful* होतकरू, होतकर, व्हायाजोगा -सारखा, रूपास यायाजोगा. [A. P. MATTER OR THING होती वस्त *f*.]

Prom'issory *a. containing a binding or promise* वचनाचा, वचनविशिष्ट. [A P. NOTE वचनचिट्ठी *f*, रोखा *m*, चिट्ठी *f*.]

Promontory (prom'on-tor-i) [L. *promontorium*, *pro*, forward, *mons*, *montis*, a mountain.] *n.* भूशिर *n*, समुद्रकिनाऱ्याचा उंच व आंत गेलेला भाग *m*. २ (*anat.*) टेंगूळ *n*, अघाडूं *n*.

Promote (pro-mōt') [L. *promotus*, pa. p. of *promovēre*, *-pro*, forward, *movēre*, to move.] *v. t. to make greater* (*in power, etc.*) वाढवणें, सत्ता वाढवणें -अधिक करणें. २ *to advance* (*to a higher appointment*) बढती देणें, वाढवणें, पदवी वाढवणें, चढवणें, सर्फराजी करणें *g. of o.*, मोठें काम *n* -मोठी पदवी *f*. देणें -सांगणें, पदवर्धन *n* -पदवृद्धि *f*. करणें, बांगडी *f* -फीत *f*. वाढवणें, दर्जा *m* -पगार *m* -मुशाहिरा *m* -वेतन वाढवणें, बढती *f*. करणें. ३ *to stimulate* वाढवणें, (अधिक) उत्पन्न करणें, हिमाईत *f* -पुस्ती *f* -बळ *n*. देणें. ४ *to found* (*a company for trade or finance*) (व्यापाराकरितां वगैरे) कंपनी स्थापणें, स्थापना करणें. Promo'ted *pa. t.* & *pa. p.*

Promo'ter *n. one who helps or encourages* पुरस्कर्त्ता, पुरस्कार करणारा, हिमाईत देणारा, पुरस्कारी, वाढवणारा, चढवणारा, etc. २ *the founder of a mercantile or speculative company* (व्यापारी संस्थेचा किंवा कंपनीचा) संस्थापक *m*, प्रवर्तक *m*.

Promo'tion *n. -the act.* चालवणें *n*, पुरस्कार *m*, प्रवर्त्तन *n*, संवर्धन *n*, वर्धन *n*, वृद्धि *f*, पुष्टि *f*. २ संस्थापन *n*. ३ *advancement to a higher appointment* बढती *f*, वाढवणें *n*, चढवणें *n*, पदवर्धन *n*, पदवृद्धि *f*, सर्फराजी *f*, *specif.* बांगडी *f*, फीत, पट्टा *m*, &c.

Promo'tive *a. serving to promote* वाढवणारा, वर्धक, संवर्धक, साधक, संवर्धनकारक.

Prompt (promt) [Fr. -L. *promptus*,- *promere*, to bring forward, *pro*, forth, *emere*, to bring.] *a. ready* तत्पर, तयार. २ *quick* तडकफडक, धडकफडक, धडकभडक. ३ *exact to time* वक्तशीर. ४ *done at once* ताबडतोबीचा, जलदीचा, तात्कालिक.

Prompt *v. t. to urge* (to some speech or action) उठवणें, चढीं देणें, वीर भरणें -देणें, उठावणी *f* -उठाव *m*. करणें, उत्तेजन *n*. देणें, उद्युक्त करणें, प्रवृत्त करणें. २ *to remind* आठवण *f*. देणें, कानांत जपणें. ३ (drama) (पडद्याच्या आंतून) सुचविणें, सूचन करणें. Prompt'ed *pa. t.* & *pa. p.* Prompt'er *n.* उठवणारा, चढवणारा, वीर भरणारा, उत्तेजक, उत्तेजन देणारा. २ आठवण देणारा. ३ प्राम्प्टर *m*, सूचक *m*. Prompt'ing *v. n.* उठवणें, उठावणी *f*, उचल *f*, उत्तेजन *n*, प्रेरणा *f*. २ आठवण देणें *n*. ३ (drama) प्राम्प्टिंग *n*, सूचन *n*.

Prompter, Prompting, See under Prompt.

Promp'titude, Prompt'ness *n. readiness* तत्परता *f*, चपळाई *f*, तयारी *f*, जलदी *f*, तडफ *f*.

Prompt side *n.* प्राम्प्टिंग करण्याची बाजू *f* -जागा *f*, सूचक बसण्याची जागा, सूचकस्थान *n*.

Promulgate (prō-mul'gāt) [L. *promulgare*, to publish.] *v. t. to make known* प्रसिद्ध करणें, उघड करणें, (माहिती) फैलावणें. Promul'gated *pa. t.* & *pa. p.* Promulg'ating *pr. p.*

Promulga'tion *n.* प्रसिद्धीकरण *n*, प्रसिद्धि करणें *n*.

Prom'ulgator *n.* प्रसिद्धि करणारा.

Prona'tion *n.* (*med.*) हात उपडा करणें, हात उपडा होणें *n*.

Prone (prōn) [L. *pronus*, stooping forward.] *a. with face downward* उपडा, पालथा. २ *bending forward* प्रणत, प्रणतशिरस्क, अधोमुख, अधोवदन. ३ *inclined* प्रवृत्त, प्रवण, तयार, सिद्ध, स्वभावाचा, कलाचा, झोकाचा (with the object as रडण्याच्या-स्वभावाचा, कलाचा, झोंकाचा, &c.), शील (in comp.), स्वभाव and स्वभावी (in comp.).

Prone'ness *n.* उपडेपणा *m*, पालथेपणा *m*. २ अधोमुखता *f*, प्रणतत्व *n*. ३ प्रवृत्ति *f*, कल *m*, प्रावण्य *n*, झोंक *m*, ओढ *f*, स्वभाव *m*, तयारी *f*.

Prong (prong) [Of doubtful origin.] *n. the spike*

*of a fork* ( or of a similar instrument ) कांटा *m*, दांता *m*, सुळा *m*, शूल *m*. (b) नांगराच्या दांताळयाचा दांता*m*, खिळा. २ *the point of a deer's horn* हरणाच्या शिंगाचें टोंक *n*, अग्र *n*, अणी *f*. P. *v. t. to pierce with a prong* कांट्यानें भोंक पाडणें, भोसकणें. Prong'-ed *pa. t.* & *pa. p.* Prong'ing *pr. p.*

Pronoun ( prō'nown ) [Fr.-L. *pro*, and *nomen*, Sk. नामन्, a name.] *n*. सर्वनाम *n*. [DEMONSTRATIVE P. दर्शक स°; AS, "THIS." DISTRIBUTIVE P. भिन्नतावाचक स°; AS, "NEITHER." INDEFINITE P. सामान्य सं°; AS, "ANY." INTERROGATIVE P. प्रश्नार्थक स°; AS, "WHAT." PERSONAL P. पुरुषवाचक स°; AS, "I." POSSESSIVE P. षष्ठ्यन्त स°; AS, "HIS." RECIPROCAL P. परस्परवाचक स°; अन्योन्यदर्शक स°; AS, "EACH OTHER." REFLEXIVE P. कर्तृवाचक स°; AS, "MYSELF." RELATIVE P. संबंधी स°; AS, "WHO."] Pronom'inal *a*. सर्वनामाचा, सर्वनामासंबंधीं, सर्वनामविषयक.

Pronounce ( prō-nowns' ) [Fr.-L. *pronunciare-pro*, forth, *nunciare*, to announce.] *v. t. to speak out, to utter* उच्चारणें, बोलणें, उच्चार करणें. २ *to deliver ( a judgment or opinion )* ( निर्णय ) सांगणें, निश्चित सांगणें, निकाल सांगणें, निकाल देणें, निश्चयानें -निश्चयपूर्वक सांगणें, ठाम मत देणें. P. *v. i. to affirm* खचीत सांगणें, निश्चयपूर्वक सांगणें. Pronounce'able *a*. उच्चारायाजोगा -जोगता, उच्चार्य. Pronounced' *pa. t.* P. *pa. p.* उच्चारलेला, उच्चारित. २ *decided* निश्चयपूर्वक सांगितलेला, निश्चित, ठाम, नक्की, जाहीर. ३ *very noticeable* लक्ष्यांत येण्याजोगा, ठळक, ढळढळीत, ठळठळीत. Pronounce'ment *n. an official declaration* जाहीर करणें *n*, स्पष्ट उल्लेख *m*, जाहीर उल्लेख *m*, जाहीर कथन *n* -निवेदन *n*, स्पष्ट मत *n*, स्पष्ट अभिप्राय. Pronoun'cer *n*. उच्चारणारा, उच्चार करणारा. २ निर्णयपूर्वक सांगणारा. ३ ( शब्दांचे ) उच्चार देणारा कोश *m*. Pronounc'ing *pr. p.* P. *v. n.* उच्चार करणें, उच्चारणें *n*. २ निर्णयपूर्वक सांगणें. P. *a*. ( of a dictionary ) *showing how to pronounce words* (शब्दांचे) उच्चार देणारा ( कोश ), उच्चाराचा ( कोश ), उच्चारदर्शक.

Pronouncement, See under Pronounce.

Pronuncia'tion *n. the act or manner of pronouncing* उच्चारणें *n*, उच्चार *m*, उच्चारण *n*, वर्णोच्चार *m*.

Pronun'ciative, Pronun'ciatory *a*. शब्दोच्चारासंबंधीं, वर्णोच्चारासंबंधीं.

Proof ( prōōf ) [O. Fr. *prove*-L. *probare*, to prove.] *n. the demonstration of truth* सिद्धता *f*. २ *convincing evidence* प्रमाण *n*, दाखला *m*, गमक *n*, मुद्दा *m*, मुद्दापत्ता *m*, दाखलामुकाबला *m*. ३ (law) शाबिती. ४ *test* परीक्षा *f*, प्रतीति *f*, कस *m*. [TO PUT TO THE P. परीक्षा *f* -प्रतीति *f*. पाहणें -घेणें *g. of o.*] ५ (of alcoholic spirits ) *strength* तेजी *f*, तीव्रता *f*. ६ (in printing) मुद्रित *n*, खरडा *m*, प्रुफ *n*. [FIRST P. प्रथमा *f*, पहिलें प्रुफ. SECOND P. द्वितीया *f*, दुसरें प्रुफ. THIRD P. तृतीया

*f*, तिसरें प्रुफ.] ७ (in arithmetic) ताळा *m*, पडताळा *m*, उपपत्ति *f*. ८ (*photo.*) पहिला नमुना *m*. P. *a.* (with *against*) *not to be pierced by* (shot) भेदण्यास अशक्य, दुर्भेद्य. २ *able to withstand temptation* अविकार्य, अभेद्य, खंबीर (मनाचा), अबाध्य, खबरदार, सुदृढ. ३ *firm in resisting* प्रतिकारक्षम, रोधक, निरोधक, प्रतिकारक, अभेद्य; as, "Water-*proof.*"

*N. B.*—In law, Proof = शाबिती; and Evidence = पुरावा. पुरावा is the cause, while शाबिती is the effect.

Proof-mark *n. a mark stamped on a gun, pistol, etc. to show that it has been tested satisfactorily* तपासून पाहिल्याची खूण *f*, तपासल्याची खूण *f*.

Proof-sheet *n.* See Proof 6.

Proof-spirit *n. alcoholic spirit of standard strength* (the alcohol being 57% of the whole) (प्रमाणाइतकी) पुरी तेजदारू *f*, पुरी कडक दारू *f*.

Proof'less *a.* प्रमाणरहित, प्रमाणशून्य.

Prop (prop) [Allied to Sw. *propp.* Ir. *propa*, a prop.] *n. that which sustains or supports* नेटावा *m*, टेंकू, आधार, टेंकण or टेंकणें *n*, तीर *m*, जामीन *m*, टेकावा *m*, टेका *m*, धिरा *m*, धिरासा *m*, लगा *m*, मेढ *f*. P. *v.t. to support or sustain* टेकावा *m* -धिरा *m*. देणें, टेका देणें, टेंकू देणें, नेटावा देणें.

Propaganda (prōp-agan'-dä) [From the society *de propaganda fide* (for propagating the faith), founded at Rome in 1622.] *n. an organisation for spreading particular doctrines* (*in religion, politics, etc.*) विशिष्ट मतांचा प्रसार करणारी मंडळी *f*. २ (*in R. C. Church*) *a missionary society at Rome* रोम येथील धर्मप्रसारक मंडळ *n*. ३ *the doctrines, teachings, etc. advocated* (प्रसार केलेलीं) मतें *n. pl.*, (प्रतिपादित) मतें किंवा तत्त्वें *n. pl.* Propagand'ism *n. the practice of converting to certain principles, beliefs, etc.* स्वमतप्रवर्तन *n*. Propagand'ist *n. any one engaged in propagandism* स्वमतप्रवर्तक, shortened into प्रवर्तक.

Propagate (prop'a-gāt) [L. *propāgare,-atum*, conn. with *pro-pāg-o*, a layer.] *v. t. to reproduce* (animals or plants) परंपरा ठेवणें, वंश चालवणें, उत्पत्ति (परंपरेनें-अनुक्रमोत्पत्तीनें-क्रमिकोत्पत्तीनें) वाढवणें-चालवणें. २ *to cause to increase* वाढवणें, चालवणें, फैलाव करणें, प्रसार *m*. करणें *g. of o.* ३ *to spread* (*esp. a faith, creed, or political doctrine*) प्रसार करणें, फैलावणें, पसरणें, पसरवणें. P. *v. i. to have offspring* मुलें होणें, संतति होणें, (मुलांची) वाढ होणें; as, "Rabbits P. rapidly." Prop'agated *pa. t.* and *pa. p.*

Propagating *v. n.* वंश चालवणें, वंशवृद्धि करणें. २ वाढवणें *n*, चालवणें *n*, फैलाव करणें *n*. ३ फैलावणें *n*, प्रसार करणें. ४ प्रचार *m*, फैलाव *m*, प्रसार *m*.

Propaga'tion *n.* वंश चालवणें, वाढ *f*, वंशवृद्धि *f*,

वंशवर्धन. [P. OF SPECIES उपजातींचें प्रजनन *n*, उपजातींची वाढ *f*.] २ प्रचार, फैलाव, फैलावणें. [P. OF THE GOSPEL शुभवर्तमानाचा प्रसार *m*.] ३ (शरीरांत रोग एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं) पसरणें, चरत जाणें, प्रसरण *n*.

Prop'agator *n.* प्रजनक *m*, वाढ *f* -विस्तार करणारा *m*.

Propel (prō-pel) [L. *pro*, forward, *pellere*, to drive.] *v. t. to drive forward, to urge on by force* लोटणें, पुढें चालवणें, धांवविणें, पुढें ढकलणें.

Propel'lent *a. driving on* लोटणारा, पुढें चालविणारा, ढकलणारा.

Propel'ler *n. that which propels* लोटणारा, पुढें चालविणारा *m*, पुढें ढकलणारा *m*. २ *an apparatus for propelling* (बोट वगैरे चालविणारा) पंखा *m*. ३ *a vessel thus propelled* पंख्यानें चालणारें जहाज.

Propense (prō-pens') [L. *propensus*, hanging forward.] *a. inclined, disposed* प्रवण, कल असलेला, कलाचा.

Propens'ity, Propense'ness (rarely) *n. inclination* कल *m*, प्रवृत्ति *f*, ओढा *m*, ओढ *f*, प्रवाह *m*, प्रावण्य *n*. २ *tendency* (*esp. to evil*) छंद *m*, व्यसन *n*, नाद *m*. [EVIL P. दुष्ट प्रवृत्ति *f*, दुष्ट इच्छा *f*, दुर्व्यसन *n*, व्यसन *n*. OF EVIL PROPENSITIES दुर्व्यसनी.]

Proper (prop'ėr) [Fr. *propre*,–L. *proprius*, one's own. धात्वर्थ स्वतःचा, खास, खासगत.] *a. right* योग्य, यथायोग्य, उचित, लायक, विहित, युक्त, समुचित. २ *fit* बेताचा, बेतसूद, ठीक, उपयोगी, उपयुक्त, शुद्ध (esp. in comp. as, आकारशुद्ध, आचारशुद्ध), हिशोबी or हिशेबी, नीट, नेटका, साजरा. ३ *real* (वस्तुतः) खरा; as, "Greece P." ४ (*gram.*) विशेष; as, "Proper noun = विशेषनाम".

Prop'erly *adv.* योग्य रीतीनें, यथायोग्यपणें, यथोचितपणें, न्यायतः, धर्मतः. २ ठीक, बरोबर, यथास्थित, उजू.

Prop'ertied *a. having property* मालमत्ता असलेला.

Prop'erty *n. quality* धर्म *m*, गुण *m*, लक्षण *n*, स्वभाव *m*. [ESSENTIAL P. आवश्यक गुण *m* -धर्म *m*. GENERAL OR COMMON P. साधारण धर्म *m*. THE THREE PROPERTIES OF CREATED THINGS गुणत्रय *n*. THEY ARE सत्व, रज AND तम.] २ *right of possession* स्वामित्व *n*, धनीपणा *m*, मालकी *f*, सत्ता *f*, स्वत्व *n*. [SPECIAL P. (कांहीं काळपर्यंत चालणारा) मालकीचा विशिष्ट हक्क.] ३ *what is one's own* मालमत्ता *f*, माल *m*, जिनगी *f*, मिळकत *f*, इष्टेट *f*. ४ *wealth* धन *n*, ऐवज *m*, संपत्ति *f*. [IMMOVABLE OR REAL P. स्थावर मिळकत, स्थावर इस्टेट *f*. MAN OF P. इस्टेटवाला, ऐपतदार *m*. MOVABLE P. जंगम माल *m*. ONE'S WHOLE P. सर्वस्व *n*. PUBLIC P. सार्वजनिक मिळकत.] ५ *an article used in the performance of a play* (*as costume, furniture, scenery, etc.*) नाटकवाल्यांचें सामानसुमान (टोप, पैठण्या, शालू, पडदे, वगैरे), नाटकी सामान.

Prop'erty-man *n. one who has charge of theatrical properties* (costumes, etc.) नाटकाचें सामान ज्याच्या ताब्यांत असतें तो, नाटकीसामानवाला.

Prop'erty qualification *n.* (स्थावर) इस्टेटीची लायकी *f.*

Prop'erty tax *n.* ( स्थावर ) इस्टेटीवरील कर *m.*

Prophecy (prof'e-si) [O. Fr. *prophecie*, L. *prophetia* –Gr. *prophetes*, a prophet. See Prophet.] *n.* (ईश्वरी कृपेनें) भविष्य सांगणें *n*, भविष्यार्थ वर्तवणें *n*, भविष्य *n* -भाकित *n.* सांगणें *n*, भविष्यकथन *n.* २ (*Script.*) भविष्यवाद *m.* ३ *public interpretation of Scripture* (धर्मग्रंथांत नमूद केलेल्या) भावी ईश्वरेच्छा वर्तवणें *n*, ( पुढें अमुक होणार असें ) भविष्य वर्तवणें.

Proph'esier *n. a prophet* ईश्वरी स्फूर्ति झालेला मनुष्य *m*, प्रासादिक पुरुष *m*, भविष्यवादी *m.*

Proph'esy *v. t. to foretell, to predict* भविष्य वर्तवणें, ( ईश्वरी इच्छा काय आहेत हें ) भविष्य सांगणें, भाकित -पूर्वकथन -पूर्वानुमान करणें, पूर्वींच सांगून ठेवणें. २ *to foreshow* पूर्वींच सुचविणें -जाहीर करणें -दर्शित करणें; as, "Thy very gait did P. a royal nobleness." P. *v. i.* भविष्य सांगणें, भविष्य वर्तवणें.

Prophet ( prof'et ) [Fr. –L. *propheta* –Gr. *prophetes*, one who speaks for another, *esp.* for a divine power –*pro*, before, in behalf of, and *phemi*, to speak. पुढें होणाऱ्या गोष्टी किंवा पुढील ईश्वरेच्छा आधीं सांगणारा असा ह्या शब्दाचा धात्वर्थ आहे. ख्रिस्तापूर्वी (ख्रिस्ताचा अवतार लौकरच होणार आहे असें भविष्य सांगणारे) जे प्रासादिक पुरुष किंवा भविष्यवादी होऊन गेले त्यांच्या संबंधानें हा शब्द मुख्यतः वापरतात.] *n. one inspired or instructed by God to speak in his name* भविष्यवादी, प्रासादिक पुरुष, ज्ञानी पुरुष; as, Moses, Elijah, &c. [MAJOR P.s (इसाया, जेरेमिया, इझिकेल आणि ड्यानियल हे चार) श्रेष्ठ भविष्यवादी. MINOR P.s सामान्य भविष्यवादी.] २ *a predictor, a foreteller* भविष्य सांगणारा *m*, भविष्यवादी.

Proph'etess *n. fem.* भविष्यवादिनी *f*, प्रासादिक स्त्री *f*, भविष्य सांगणारी *f*, भविष्य वर्तविणारी *f.*

Prophet'ic, Prophet'ical *a. containing, or pertaining to, prophecy* भविष्यार्थसूचक, भविष्यार्थगर्भित, भविष्यसूचक, भाविसूचक, भविष्यासंबंधीं; as, "And fears are oft P. of the event." २ भविष्यवाद्याला शोभणारा, भविष्यसूचक; as, "P. vision." Prophet'ically *adv.* भविष्यवाद्याप्रमाणें. २ भविष्य म्हणून, भविष्य वर्तवून.

Prophylactic ( prof-i-lak'tik ) [ Gr. *pro*, before, *phulassein*, to guard. ] *a. defending from disease* रोगप्रतिबंधक, रोगनिवारक; as, "P. serum." P. *n. a medicine for warding off, or guarding against, disease* रोगप्रतिबंधक औषध *n*, रोगनिवारक औषध *n.*

Prophylax'is *n. a medical treatment for preventing or warding off disease* रोगप्रतिबंधक औषधोपचार *m*, रोगप्रतिबंधक औषधियोजना *f.*

**Propinquity** ( pro-pin'kwi-ti ) [ L. *propinquitas- propinquus*, near –*prope*, near. ] *n. nearness* ( *of place, time or relationship* ) जवळपणा *m*, जवळीक *f*, नैकट्य *n*, समीपता *f*, सामीप्य *n*, जवळचा संबंध *m*.

**Propitiable**, See under Propitiate.

**Propitiate** ( prō-pish'i-āt ) [ L. *propitiare, pro*, forward, *petere*, to seek. ] *v. t. to make favourable* प्रसन्न करणें, आळवणें, वळवणें, आराधना करणें, अनुकूल करणें -करून घेणें, प्रसन्नता *f* -प्रसाद *m* -अनुकूलता *f*. करून घेणें *g. of o.* २ *to conciliate* वळवणें, आपलासा करून घेणें, मनधरणी *f* -मनवळवणी *f*. करणें *g. of o.*, शांत करणें -करून घेणें, शांति *f* -सांत्वन *n*. करणें *g. of o.*, खुलवणें, खुलविणें. Propi'tiable *a*. आराध्य, आराधनीय, आराधनशक्य. २ सांत्वन *n* -समाधान *n*. करण्याजोगा. Prop'itiated *pa. t.* P. *pa. p.* प्रसन्न केलेला, आळवलेला, आराधित, प्रसादित, प्रसन्न. २ सांत्वन केलेला, शांत, खुलवलेला. Prop'itiating *pr. p.* P. *pr. p. a.* प्रसन्न करणारा, आळवणारा, आराधणारा, आराधक. २ शांत करणारा, शांतिकर, शांतिप्रद. Propitia'tion *n*. प्रसन्न करणें *n*, आळवणें *n*; आराधना *f*, आराधन *n*. २ खुलवणें *n*, मनधरणी *f*, मनोवणी *f*, मनवळवणी *f*, मनवळणी *f*, शांति *f*, सांत्वन *n*. ३ *atonement* प्रायश्चित्त *n*. Propi'tiator *n*. आळवणारा *m*, आराधणारा *m*, आराधक *m*. २ मन वळविणारा *m*, शांति -सांत्वन *n*. करणारा *m*, खुलवणारा *m*. Prop'itiatory *a*. आळवणारा, आराधणारा. २ मनधरणीचा, मनवळवणीचा, सांत्वन करणारा. Propi'tious *a. gracious* प्रसन्न, वरद, अनुग्रहकारी, अनुग्रहशील, मेहेरबान, दयाळू. २ *favourable* अनुकूल, अभीष्ट, अभिमुख. [ To BECOME P. ( FORTUNE, DESTINY ) उघडणें, उफलणें, खुलणें, उदेणें, फळणें, फळफळणें. ] ३ *forgiving* क्षमाशील, क्षमावान्. Propi'tiously *adv.* Propi'tiousness *n*. प्रसन्नता *f*, अनुग्रहकारिता *f*, दयालुत्व *n*, मेहेरबानी *f*. २ अभीष्टता *f*, अनुकूलता *f*, आनुकूल्य *n*. ३ क्षमाशीलता *f*.

**Propitiation, Propitiator, Propitiatory, Propitious,** } See under Propitiate.

**Proportion** ( pro-pōr'shun ) [ L. *proportio –pro*, in comparison with, *portio, portionis*, part, share.] *n. relation as to number, size or quantity* प्रमाण *n*, परिमाण *n*. [ IN P. TO प्रमाणें, जसा *with* तसा *decl.*, बेतानें, प्रमाणांत, प्रमाणानें, अनुरूप, अनुसार. ] २ *the just relation of parts* प्रमाण *n*, मेळ *m*, बेत *m*, जम *m*, जुळणी *f*. ३ *share* प्रमाण *n*, हिस्सा *m*, वांटा *m*, वांटणी *f*, भाग *m*. ४ ( *arith.* ) प्रमाण *n*, अनुपात *m*. [ COMPOUND P. पंचराशिक. CONTINUED P. अखंड प्रमाण *n*. DIRECT P. समराशिप्रमाण *n*. INVERSE P. व्यस्तराशिप्रमाण *n*. MEAN P. मध्यप्रमाण *n*.] P. *v. t. to arrange in right relation* प्रमाणांत मांडणें, प्रमाण ठेवणें *with g. of o. recip.*, जम *m* -मेळ *m*. बसवणें *with g. of o. recip.*

Propor'tionable *a.* प्रमाण बसविण्याजोगा. २ *having the parts in right relation* प्रमाणांत असलेला, प्रमाणाचा, प्रमाणांकित, प्रमाणशुद्ध.

Propor'tional *a.* प्रमाणांत असलेला, प्रमाणाचा, प्रमाणशुद्ध. २ (*math.*) प्रमाणाचा, प्रमाणात्मक. P. *n.* (*math.*) प्रमाणपद *n*, अनुपातपद *n.* [ FOURTH P. प्रमाणचतुर्थपद *n.* MEAN P. प्रमाणमध्यमपद *n.* THIRD P. प्रमाणतृतीयपद *n.* ]

Propor'tionally *adv.* प्रमाणानें, प्रमाणांत.

Propor'tionate *a.* प्रमाणांत असणारा, प्रमाणाचा, प्रमाणशुद्ध, प्रमाणांकित. P. *v. t.* (-चें) प्रमाण ठेवणें, प्रमाणांत ठेवणें, मेळ बसविणें. Propor'tionated *pa. t.* & *pa. p.* Propor'tionating *pr. p.*

Propor'tioned *pa. t.* & *pa. p.* (of Proportion) प्रमाणांत मांडलेला, प्रमाणांत ठेवलेला.

Proposal ( pro-pō'-zal ) [L. *pro*, forth, and *ponere*, to place.] *n. the act of proposing something* सुचवणें *n*, सूचना करणें *n*, पुढें मांडणें *n*, ( विषय ) काढणें *n.* २ *something proposed* सूचना *f*, पुढें मांडलेली गोष्ट *f* -विषय *m*, योजना *f.* ३ *offer of marriage* लग्नाचें बोलणें *n.* ४ *conditions offered* सुचविलेल्या अटी *f. pl.*, शर्ती *f. pl.* ५ (Insurance) (विमा उतरण्याचा) सूचनाअर्ज *m*, अर्ज.

Propose ( pro-pōz' ) [L. *pro*, before, and *poser*, to place.] *v. t. to put forward for consideration* (विचाराकरितां) पुढें मांडणें, पुढें काढणें -ठेवणें, सुचविणें, उपस्थित करणें. २ *to set up as an aim* (उद्दिष्ट म्हणून) योजणें, पुढें मांडणें, मनांत धरणें -ठेवणें; as, "The object I P. to myself." ३ *to nominate* (a person) *as a member of a society* सुचविणें, पुढें करणें. ४ *to offer* (a person's health) *for toast* (आरोग्यचिंतनाकरितां एखाद्याच्या नांवाचा) उल्लेख करणें. ५ *to make offer of marriage* लग्नाचें बोलणें करणें -लावणें, (लग्नाचा हेतु) कळविणें, (हेतु) सुचविणें. ६ *to put forward as a plan* (बेत) सुचविणें, (आपला) विचार कळविणें -सांगणें; as, "We *propose* a change." ७ *to intend* योजणें, बेत करणें, ठरवणें; as, "Man *proposes* and God disposes."

Proposition ( prop-ō-zi'-shun ) [See Propose.] *n. a statement, an assertion* विधान *n*, सिद्धान्त *m.* २ (logic) प्रतिज्ञा *f*, वाक्य *n.* [CATEGORICAL or SIMPLE P. केवलवाक्य *n.* CONJUNCTIVE P. संकेतवाक्य *n.* DISJUNCTIVE P. पक्षांतरवाक्य. INDEFINITE P. अनिश्चित वाक्य *n.* HYPOTHETICAL P. सापेक्ष वाक्य *n.* AN AFFIRMATIVE P. विधायक वाक्य *n.* A NEGATIVE P. निषेधक वाक्य *n.* A REAL P. बोधक वाक्य *n.* A VERBAL P. शाब्दिक वाक्य *n.* IMPORT OF A P. वाक्याचा आशय.] ३ (*math.*) सिद्धान्त *m.* ४ *a proposal* ठराव *m*, सूचना *f*, योजना *f.*

Proposi'tional *a. pertaining to, or of the nature of,*

*a proposition* प्रतिज्ञेच्या स्वरूपाचा, प्रतिज्ञारूपी. २ *considered as a proposition* सिद्धान्तासारखा मानलेला, सिद्धान्तरूप.

Propound (prō-pownd') [Orig. *propone*, -L. *pro*, forth, *ponere*, to place.] *v. t. to bring forward* (विचाराकरितां) पुढें ठेवणें, पुढें मांडणें; as, "To P. a question or an argument." (b) (Milton) *to propose* सुचवणें, सूचना *f.* करणें.

Propound'ed *pa. t.* P. *pa. p.* (विचाराकरितां) पुढें मांडलेला.

Propound'er *n.* पुढें ठेवणारा, पुढें मांडणारा.

Propri'etary *n.* मालक *m*, धनी *m*, स्वामी *m.* २ (*collect.*) *a body of proprietors* मालक *m. pl.* [LANDED P. जमीनजुमला असलेले लोक *m. pl.*] ३ *the rights of a proprietor* मालकी हक्क *m. pl.*, स्वामित्व *n.* P. *a. belonging to a proprietor* मालकाचा, मालकी. [P. RIGHTS मालकी हक्क *m. pl.*, स्वामित्वाचे हक्क *m. pl.*] २ *holding property* मालकीच्या जमिनी असणारे; as, "P. classes = मालकीच्या जमिनी असणारे लोक *m. pl.*" ३ *held in private ownership* खासगी मालकीचा. [P. MEDICINES खासगी मालकीचीं औषधें *n. pl.* ]

Proprietor (prō-prī'e-tor) [Fr.-L. *proprietas*, *proprius*, one's own.] *n. owner* मालक *m*, मालिक *m*, धनी *m*, स्वामी *m.*

Proprieto'rial *a. relating to ownership* मालकीचा, मालकीसंबंधीं, स्वामित्वाविषयीं -संबंधीं.

Propri'etorship *n.* मालकी *f*, धनीपणा *m*, स्वामित्व *n.*

Propri'etress, Propri'etrix *n. fem.* मालकीण *f*, धनीण *f*, स्वामिनी *f.*

Propri'ety *n. accordance with the rules of society, properness* औचित्य *n*, युक्तता *f*, समर्पकता *f*, संगति *f*, संबंध *m*, मेळ *m.* [THE PROPRIETIES, *the customs of polite society* शिष्टाचार *m. pl.*]

Proptosis (prop-tō'sis) [Gr. *proptosis*, following.] *n.* डोळा वगैरे बाहेर येणें.

Propulsion (prō-pul'shun) [See Propel.] *n. the act of propelling or driving forward* पुढें चालवणें *n*, पुढें ढकलणें *n.*

Propul'sive, Propul'sory *a.* पुढें ढकलणारा, पुढें चालविणारा.

Pro rata [L.] हिस्सेरश्शीनें.

Proroga'tion *n.* राजाचे आज्ञेनें पार्लमेंटची बैठक बंद करणें.

*N. B.* After an adjournment all things continue as they were at the time of the adjournment; whereas, after a *prorogation*, bills introduced and not passed are as if they had never been begun at all.—Webster.

Prorogue (prō-rōg') [Fr.-L. *prorogare*, -*atum*,-*pro*,

forward, *rogare*, to ask.] *v. t. to adjourn* (esp. Parliament) राजाचे आज्ञेनें पार्लमेंटची बैठक मोडणें.
Prorogued' *pa. t. & pa. p.* Prorog'uing *pr. p.*
Prosa'ic,-al *a. pertaining to prose* गद्यरूप, गद्यात्मक, गद्यमय. २ *dull, uninteresting* नीरस, शुष्क, रसहीन.
Proscenium (pro-sē'ni-um) [L.-Gr. *proskenion* -*pro*, before, and *skēnē*, the stage.] *n. the front part of the stage* पडद्याच्या पुढील रंगभूमीचा भाग *m.*
Proscribe (prō-skrīb') [L. *proscribere* -*pro*, before, publicly, *scribere*, *scriptum*, to write.] *v. t. to condemn as an outlaw* माणसांतून उठवणें -काढणें, or उठवून -काढून लावणें, मृत्युपात्र करणें. (b) मरणाचे स्वाधीन करणें -हातीं देणें. २ *to condemn and interdict* वाईट -अयोग्य -अपात्र -दुष्ट -ठरवून निषेध करणें. ३ *to forbid* मना करणें, सरकारजमा करणें. [To PROSCRIBE BOOKS पुस्तकें सरकारजमा करणें.]
Proscribed' *pa. t.* & *pa. p.* मृत्यूची शिक्षा झालेला. २ कायद्यानें बहिष्कृत. ३ मना केलेला, सरकारजमा केलेला.
Proscrip'tion *n. a dooming to death or exile* (a.) मरणाची शिक्षा करणें *n* -सांगणें *n.* (b) हद्दपार-बहिष्कृत करणें *n.* २ *the state of being proscribed, interdiction, utter rejection, prohibition* बहिष्कृतपणा *m*, निषेध *m.* ३ बंदी *f*, मनाई *f*, सरकारजमा करणें.
Prose (prōz) [Fr. -L. *prosa* -*prorsus*, straightforward.] *n. the language of ordinary speech or writing* गद्य *n.* [P. AND VERSE गद्यपद्य *n.* WRITER OF P. गद्यलेखक *m*, लेखक *m.*] P. *a. consisting of prose* गद्यात्मक, गद्यरूप, गद्य (*a.*). P. *v. i. to write in prose* गद्यांत लिहिणें, गद्यलेख लिहिणें. २ *to write or talk in a dull commonplace manner* चऱ्हाट लावणें, चर्वितचर्वण *n.* करणें, चर्पटपंजरी *f.* लावणें, चघळ बोलणें. P. *v. t. to turn into prose* गद्यरूप देणें, गद्य करणें. २ चऱ्हाट *n.* लावणें, नीरस लेख *m.* लिहिणें.
Prosector (prō-sek'tėr) [L. *prosector*, an anatomist -*pro*, before, and *secare*, to cut.] *n.* (शारीरशास्त्र शिकविण्यासाठीं अध्यापकाकरितां) प्रेतच्छेदन तयार करणारा कुशल शिष्य *m*, प्रेतच्छेदक शिष्य *m.*
Prosecute (pros'ē-kūt) [L. *prosequi* -*pro*, onwards, *sequi*, *secutus*, to follow.] *v. t. to follow up* पाठीस लागणें *g. of o.*, पाठ *f* -पिच्छा *m.* घेणें -धरणें -पुरवणें *g. of o.*, पिच्छास बसणें -लागणें -असणें *g. of o.*; as, "To P. a scheme." २ *to proceed with* (*a business*) पुढें चालवणें, वाहणें, हांकणें. [To P. TO A SUCCESSFUL CLOSE शेवटास नेणें, पार पाडणें, निभावणें, निभाव *m* -निभावणी *f* -निभावणूक *f.* करणें *g. of o.*] ३ *to sue at law* (फौजदारी) फिर्याद *f.* करणें *with* वर *of o.*, खटला *m.* करणें, फौजदारी *f.* करणें, फौजदारी खटला करणें, फौजदारींत फिर्याद करणें. ४ (सहल) कोर्टांत दावा लावणें; as, "To P. a claim."

Pros'ecuted *pa. t.* P. *pa. p.* पाठीस लागलेला, पिच्छा पुरवलेला. २ पुढें चालवलेला. ३ फिर्याद केलेला, खटला केलेला.

Pros'ecuting *pr. p.* [P. POLICE INSPECTOR (सरकारतर्फे) खटले चालविणारा पोलिस इन्स्पेक्टर.]

Prosecu'tion *n.* पाठीस लागणें *n*, पिच्छा पुरवणें *n.* २ पुढें चालवणें *n.* ३ (सरकारनें केलेला) अभियोग, खटला *m.* (b) फौजदारी खटला *m*, फिर्याद *f.* ४ *a person (or persons) prosecuting at law* फिर्यादीपक्ष *m*, फिर्यादी *m.* [P. WITNESSES फिर्यादीपक्षाचे साक्षीदार; *specif.* सरकारतर्फेचे साक्षीदार.]

Pros'ecutor *n.* पाठीस लागणारा, पिच्छास बसणारा, etc. २ पुढें चालवणारा. ३ फिर्यादी, फिर्याद करणारा, खटला करणारा, अभियोगी. [PUBLIC P. फौजदारी (काम चालविणारा) सरकारी वकील *m.*] Pros'ecutrix *n. fem.*

Proselyte (pros'e-līt) [Fr. –Gr. *proselutos,–pros*, to, *erchomai*, to come.] *n. a convert* (to a religion, political party, &c.) धर्मांतर करणारा *m*, मतांतर करणारा *m*, पक्षांतर करणारा.

Pros'elytism *n. the practice of making converts* धर्मांतर करवण्याची चाल *f.*

Pros'elytise *v. t. to convert* धर्मांतर करवणें.

Prosenchyma (pros-en'ki-mä) [Gr. *pros*, toward + *egkhuma -egkheo*, to pour in, *–en*, in, and *kheo*, to pour.] *n.* (*bot.*) तंतूइतक्या बारीक वाहिन्या उत्पन्न करणाऱ्या दीर्घ पेशींचें जाळ (धातु), तंतुपेशीमयधातु, तंतुजनकधातु *f*, तंतुमयधातु *f*, तंतुधातु *f.*

*N. B.*—Parenchyma = मृदुपेशीमयधातु, मृदुधातु. Prosenchyma = तंतुजनकपेशीमय धातु, दीर्घधातु. Sclerenchyma = (कवचजनक) कठिनपेशीमय धातु, कठिन धातु. Collenchyma = श्लेष्मलपेशीमयधातु, श्लेष्मल धातु.

Proso'dial, Prosod'ical *a.* छंदःशास्त्रविषयक, छंदःशास्त्रासंबंधीं, छंदःशास्त्राचा.

Proso'dian, Pros'odist *n. an expert in prosody* छंदःशास्त्रज्ञ, छंदःशास्त्रवेत्ता.

Prosody (pros'ō-di) [Fr.–L. *prosodia*, Gr. *prosodia -pros*, to, *ōdē*, a song.] *n. the principles of verse-making* छंदःशास्त्र *n*, छंदोविद्या *f.*

Prospect (pros'pekt) [L. *pro*, forward, *specere*, to look. धात्वर्थ=पुढें पाहणें.] *n. a view* दृष्टीखालचा प्रदेश *m*, दृष्टिविषय *m*, दृग्विषय *m*, दृष्टीचा अंमल *m.* २ *expectation of future event* (पुढें अधिक चांगलें होण्याची) पुढची आशा *f.* ३ रंग *m*, सुमार *m*, संभव *m*, धोरण *n.*

Prospect *v. t.* (*mining*) *to search for metals* धातूंच्या खाणी शोधणें.

Pros'pecting *pr. p.* P. *n.* (मौल्यवान्) धातूंच्या खाणी शोधून काढणें.

Prospec'tive *a.* (*opposed to retrospective*) *looking forwards* पुढें पाहणारा. २ पुढें परिणाम करणारा, पुढें अंमल करणारा, पुढील काळाला लागू पडणारा. ३ *anticipated* संभवनीय, आनुमानिक, अटकळीचा, अदमासाचा;

as, "P. benefit." ४ *future* पुढल्या कालाचे धोरणाचा, भाविकालापेक्षक, भावी, भविष्यकाळाचा; as, "Points on which the promise had no P. bearing."

Prospec'tively *adv.* पुढील काळाला अनुलक्षून.

Prospec'tor *n.* (मौल्यवान्) धातूंच्या खाणी शोधून काढणारा.

Prospectus (pros-pek'-tus) [L. *pro*, and *specere*, to look.] *n. a circular describing chief features of a school, commercial enterprise, &c.* उद्देशपत्रक *n*, उद्देशपत्रिका *f*, योजनापत्रक *n*, प्रसिद्धिपत्र *n*, माहितीपत्रक *n*. २ *a summary of lectures, &c.* संक्षिप्त पत्रक *n*, संक्षेप *m*, गोषवारा *m*.

Prosper (pros'-per) [Fr. –L. *prospero –pro*, and *spes*, hope.] *v. i.* (of persons) *to be successful* भरभराट *f.* होणें *g. of s.*, चलती *f* -चालता काळ *m* -चढता काळ असणें *g. of s.*, उत्कर्ष होणें *g. of s.*, यश येणें *in. con.*, लाग साधणें *g. of s.*, फत्ते होणें *g. of s.*, सिद्धि *f* -जय *m.* पावणें, जयी होणें -असणें. २ (of measures) सिद्धीस जाणें, शेवटास -तडीस जाणें, सफल -लागू होणें, पार पडणें, गुणास -फळास येणें, रंगास चढणें, साधणें, फळणें, यश *n* -बरकत येणें *in. con.*; as, "Nothing will ever P. in his hands." ३ (in business, trade, &c.) भरभराट होणें *g. of s.*, चढती कळा *f* -चढती कमान *f* -चढता पाया *m* -चढती पायरी असणें *g. of s.*, चढती *f* -बरकत *f.* होणें *g. of s.*

Pros'per *v. t. to render successful* सिद्धीस नेणें, तडीस -शेवटास नेणें -जाईसा करणें, यश देणें, बरकत देणें, पार पाडणें, गुणास येईसा -जयास जाईसा करणें, सफल -सुफल -फलद्रूप करणें, सार्थक्य (*pop.*) सार्थक -सिद्धि -सिद्धता -बोलबाला *m*- समृद्धि -संवर्धन करणें *g. of o.*; as, "Heaven P. our attempt."

Prosper'ity *n.* भरभराट *f*, उत्कर्ष *m*, बोलबाला *m*, बरकत *f*, चलती *f*, तालेवारी *f*, ऊर्जितावस्था *f*, ऊर्जितदशा *f*, भाग्य *n*, होतीदशा *f*, चढती दशा *f*, येता पाया *m*, चढता पाया *m*, चढती कमान *f*, चढती पायरी *f*, वाढता पाया *m*, सद्दी *f*, समृद्धि *f.* २ *flourishing state* भरभराट *f*, आबादानी *f*, आबादी *f*, सुबत्ता *f.*

Pros'perous *a.* (of persons) *flourishing, successful* भरभराटीचा, भरभराट असलेला, भरभराटलेला, तालेवार, तालेवंत, श्रीमंत, यशस्वी. २ (of measures) यशस्वी, सुरळीत चाललेला, सफल होण्याजोगा, सिद्धीस जायाजोगा, सफल. ३ (a trade, a trader, &c.) भरभराटीचा, भरभराटलेला, भरभराटीस आलेला -चढलेला, उदयास आलेला, चढता, वाढता, चढतेकळेचा, चढतेपायरीचा, चढतेकमानीचा. ४ (a town, country) भरभराटलेला, भरभराटीचा, आबादीचा, आबाद, आबादानीचा, सुबत्तेचा.

Pros'perously *adv.* भरभराटीनें, चढत्या पायरीनें, आबादीनें, &c.

Prostate (pros'-tāt) [Gr. *pro*, before, and *states*, Sk. स्था, to stand.] *n.* (*anat.*) (पुरुषांचे) मूत्रा-

शयाचे तोंडाजवळ असणारा ग्रंथि *m*, शुक्राशयपिंड *m*. Prostat'ic *a*. शुक्राशयपिंडाचा. [P. CALCULI शुक्राशयपिंडगत अश्मरी. P. GLAND शुक्राशयपिंड *m*. ]

Prostitute ( pros'ti-tūt ) [ L. *pro*, and *statuere*, to set up.] *v. t. to make a prostitute of oneself* तनुविक्रय *m*. करणें, शरीरविक्रय करणें, वाईट -नीच कामास लावणें -विकणें, भाडीस देणें -लावणें, भ्रष्ट करणें. २ (*fig.*) *to sell for base gain* ( one's honour, &c. ) क्षुद्र स्वार्थाकरितां (अब्रू, इज्जत) विकणें, पैशाकरितां विकणें. ३ *to put* (abilities, &c.) *to infamous use* (लोभानें बुद्धि वगैरे) भ्रष्ट करणें, वाईट कामास -नीच कामास लावणें.

Pros'titute *n. a base hireling* शरीरविक्रय *m* -तनुविक्रय करणारी *f*, वेश्या *f*, कसबीण *f*, बसवी *f*, गणिका *f*.

Prostitu'tion *n. degradation* तनुविक्रय *m*, शरीरविक्रय *m*, वेश्यावृत्ति *f*, वेश्याजीविका *f*, गणसेवा *f*, कसब *n*. २ *devotion to an unworthy use or purpose* (लोभानें बुद्धीचा वगैरे) दुरुपयोग *m*, नीचकामास लावणें *n*, भ्रष्ट करणें *n*.

Prostrate ( pros'-trāt ) [ L. *pro*, forward, and *sternere*, to throw on the ground. ] *a. lying flat down* भुईवर पडलेला, जमीनदोस्त झालेला, लंबा -लंबे झालेला. २ ( as in supplication, adoration, &c. ) साष्टांग नमस्कार घातलेला, साष्टांग पतित, शरण आलेला, शरणागत. ३ ( in strength ) अशक्त झालेला, थकलेला, शक्तिक्षीण झालेला, शक्तिक्षीण. ४ *overcome, overthrown* पाडाव केलेला, चीत केलेला, हटवलेला, जिंकलेला; as, "Had laid the Whig party P." ५ ( *bot.* ) जमिनीवर सपशेल पडलेला, भूमिशायी (झाडाचें खोड). P. *v. t. to lay* (a person &c.) *flat on the ground* लोळवणें, जमीनदोस्त करणें, पालथा पाडणें, भुईशीं -भुईस निजवणें, लंबा करणें, चीत करणें, पाडणें. २ (one's self in reverence, &c. ) पायां पडणें, दंडवत -साष्टांग नमस्कार घालणें -करणें. ३ (*fig.*) *to overcome* पाडाव करणें, चीत करणें, हटवणें, जिंकणें, नम्र करणें. ४ ( of fatigue &c. ) *to reduce to extreme weakness* शक्ति क्षीण करणें, थकवा आणणें, क्षीणशक्ति करणें. Pros'trated *pa. t.* P. *pa. p.* पालथा पाडलेला, लोळवलेला, निजवलेला. २ पायां पडलेला, साष्टांग नमस्कार घातलेला. ३ पाडाव केलेला, चीत केलेला. ४ शक्तिक्षीण केलेला, क्षीणशक्ति झालेला.

Prostra'tion *n.* -*act.* पालथा पाडणें, लंबा करणें *n*, &c. २ पायां पडणें *n*, दंडवत *m*, साष्टांग प्रणाम. ३ पाडाव करणें *n*, पाडाव *m*, नम्रता *f*. ४ ( of strength ) उठवण *f*, शीण *m*, रोगानें गळून जाणें *n*, शक्तिपात *m*. [ To SUFFER P. OF STRENGTH उठवणीस येणें, उठवण घेणें. ] ५ ( of spirits ) विषाद *m*, ग्लानि *f*, मलूली *f*.

Prosy ( prōz'i ) [ From Prose. ] *a. commonplace, tedious, dull* सामान्य, कंटाळा आणणारा, लड्डु, चरपटपंजरीचा; as, "A P. talker." Pros'ily *adv.*

Pros'iness *n.* कंटाळवाणेपणा *m*, लड्डुपणा *m*.

Protagonist ( prō-tag'-o-nist ) [Gr. *protos*, Sk. प्रथम, first, *agonistes*, an actor. ] *n.* ( *orig.* ) *the chief actor in an ancient Greek play* (प्राचीन) ग्रीक नाटकांतील मुख्य नट *m*, मुख्य पात्र *n*. २ *the principal person in an enterprise, contention, &c.* अध्वर्यु *m*, प्रमुख, प्रधानपुरुष *m*, सूत्रधार *m*.

Protean ( prō-tē-an ) [ From *Proteus*, ( in ancient Greek myth. ) a sea-god who could assume many forms. ] *a. very variable* ( in appearance ) (प्रोटीयसप्रमाणें) नाना रूपें धारण करणारा, अनेकरूपधारी, बदलणारा. २ *very various* ( in character, talents, &c. ) बहुप्रकारक, अष्टपैलु, अनेकदेशी ( as *oppo. to* एकदेशी ). ३ प्रोटीयसचा, प्रोटीयससारखा.

Protect ( pro-tekt' ) [ L. *pro*, in front, and *tegere*, to cover.] *v. t. to defend, to guard, to keep, to preserve* ( दुर्बळाचें ) संरक्षण करणें, रक्षण करणें, राखणें, बचावणें, पाळणें, संभाळणें, संरक्षण -रक्षण -राखण -बचाव -पालन -संगोपन करणें *g. of o.* २ ( *pol. eco.* ) ( परकी मालावर जकात बसवून देशांतील उद्योगधंद्यांचें ) संरक्षण करणें. ३ *to provide funds to meet* ( bill, draft, &c.) ( आधीं ) तरतूद करून ठेवणें. ४ *to provide* ( machinery, &c. ) *with appliances to prevent injury from it* (इजा पोंचूं नये म्हणून यंत्रांवर) झांकण -टोपण -टोपी -संरक्षण &c. घालणें; as, "Protected rifles."

Protected *pa. t.* P. *pa. p.* संरक्षण केलेला, रक्षण केलेला, राखलेला, बचावलेला, रक्षित, सुरक्षित, पाळलेला, परिपालित. २ आश्रय दिलेला, आश्रित, त्रात. [ P. STATES आश्रित -छत्राखालील -संरक्षित संस्थानें *n. pl.*] ३ आधीं तरतूद करून ठेवलेला. ४ झांकण -टोपण -टोपी घातलेला.

Protect'ing *pr. p.* [P. COVER ( पत्र पोस्टांत फाटलें असल्यास पोस्टानें घातलेला ) संरक्षक लिफाफा. ]

Protec'tion *n.* संरक्षण करणें *n*, राखणें *n*, राखण *f*, रक्षण *n*, संरक्षण *n*, बचाव *m*, पालन *n*, परिपालन *n*, संगोपन *n*. [ TO COMMIT TO THE P. OF पदरीं -ओटींत घालणें *g. of o.* TO SEEK P. OF आश्रय *m* -दुमाला धरणें *g. of o.*, आश्रय मागणें *g. of o.*, शरण जाणें -येणें, पोटांत डोकी घालणें, मांडीवर शिर ठेवणें. ] २ *shelter* संरक्षण *n*, आश्रय *m*, आसा *m*, पांघरूण *n*, छत्र *n*. ३ *patronage* संरक्षण *n*, आश्रय *m*, मदत *f*, पुरस्कार *m*, साहाय्य *n*; as, "The book was indebted to your kind P." ४ *protecting person or thing* संरक्षण *n*, संरक्षण करणारा *m*, संरक्षक *m*; as, "A dog is a great P. against burglars." ५ (*pol. eco.*) संरक्षण *n*, संरक्षक जकात *f*.

Protec'tionist *n.* संरक्षणवादी *m*, संरक्षक जकातींचा पुरस्कर्ता *m*.

Protec'tive *a.* संरक्षण -बचाव करणारा, आश्रय देणारा. २ ( *pol. eco.* ) संरक्षक. [P. DUTIES संरक्षक जकाती *f. pl.*]

Protect'or *n. a person who protects* संरक्षक *m*, रक्षणकर्ता *m*. २ *a regent* ( राजाच्या अज्ञानदशेंत, गैरहजे-

रींत, वगैरे राज्याचें ) संरक्षण करणारा *m*, संरक्षक *m*. [THE LORD PROTECTOR आलिव्हर क्रामवेल.] ३ *a thing, device, &c. that protects* झांकण *n*, टोपण *n*, टोपी *f*, संरक्षण *n*. [CHEST P. छातीवंडी *f*, गरम वंडी *f*.]

Protect'oral *a*. राज्यसंरक्षकाचा, ( विशेषतः ) आलिव्हर क्रामवेलचा.

Protect'orate *n*. ( राज्य ) संरक्षकाची जागा -हुद्दा *m*. २ संरक्षकाची ( विशेषतः आलिव्हर क्रामवेलची ) अमदानी -मुदत *f*. ३ *protectorship of a weak state by a stronger one* संरक्षक संबंध *m*. ४ संरक्षणाखालील मुलूख *m*, संरक्षित संस्थान *n*.

Protect'orship *n*. संरक्षकाची जागा -हुद्दा *m*. २ संरक्षकाची अमदानी *f*, संरक्षणकर्त्याची अमदानी *f* -मुदत *f*.

Protect'ress *n*. *fem*. संरक्षणकर्त्री स्त्री, स्त्रीसंरक्षक.

Protege ( pro-tā-zhā' ) [Fr. *pa. p.* of *proteger*, to protect.] *n*. *one under the care, guidance, or patronage of another* आश्रित *m*, बगलबच्चा *m*.

Protegee' *n*. *fem*. आश्रित स्त्री *f*.

Pro'teid *n*. Same as, but now substituted by, Protein.

Protein ( prō'-tē-in ) [Gr. *protos*, first, and suffix-*in*.] *n*. ( *now preferred in scientific use to Proteid*. ) नत्रप्रचुर द्रव्य *n*, आल्ब्युमिनयुक्त -औजस द्रव्य *n*.

Pro'test ( pro-test' ) [L. *pro*, before, and *testor*, *testis*, a witness. Protest शब्दाचा धात्वर्थ ( विरुद्ध ) साक्ष देणें, ( विरुद्ध ) प्रतिज्ञा करणें, निषेध करणें, असा आहे.] *v. t.* (R) *to affirm solemnly* प्रतिज्ञेवर सांगणें, प्रतिज्ञा करून -प्रतिज्ञापूर्वक बोलणें -सांगणें. २ *to make* ( often written ) *a protest against* ( action, proposal, &c.) निषेध करणें, (प्रतिज्ञापूर्वक -निश्चयपूर्वक) नाहीं म्हणणें, (प्रतिज्ञापूर्वक) विरुद्ध मत जाहीर करणें. ३ (a bill, &c.) ( हुंडी वगैरेचा ) पटास करणें, हुंडी भरण्याचें नाकारल्याबद्दल नोटरी पब्लिकनें दाखला देणें, हुंडी न सचकारल्याबद्दल दाखला देणें. P. *n*. *remonstrance* (प्रतिज्ञापूर्वक) निषेध *m*, (प्रतिज्ञापूर्वक) अस्वीकार *m*, असंमति *f*, बिनकबूली *f*, असंमति जाहीर करणें *n*. २ ( हुंडी वगैरेचा ) पटास करणें *n*. [ UNDER PROTEST (प्रतिपक्षाच्या म्हणण्याचा) निषेध करून, निषेधपूर्वक, बिनकबूलीनें. P. MEETING निषेधाची सभा *f*. EMPHATIC P. तीव्र -जोराचा निषेध *m*. INDIGNANT P. आवेशयुक्त निषेध *m*.]

Protestant (prot'-es-tant) [See the verb to protest.] *n*. *one who protests* विरुद्ध प्रतिज्ञा करणारा, निषेध करणारा, निषेध दर्शविणारा, निषेधक. २ पोपच्या सत्तेचा निषेध करणारा, रोमन क्याथोलिक खिस्ती धर्मपंथाचा निषेध करणारा, प्राटेस्टंट (खिस्ती पंथाचा मनुष्य.) P. *a*. प्राटेस्टंटाचा, प्राटेस्टंट खिस्तीपंथाचा. Prot'estantism *n*. (खिस्ती) प्राटेस्टंटपंथ *m*. २ प्राटेस्टंट (पंथाचीं) मतें *n. pl.*

Protesta'tion *n*. *a strong protest* जोराचा -तीव्र निषेध *m*. २ *a strong dissent* जोराची नापसंती *f*, जोराची असंमति *f*; as, "The P. of our faith."

Prothonotary, Proton'otary ( prō-thon'ō-tä-ri ) [Gr. *protos*, first, and L. *notarius*, a short-hand writer, a scribe.] *n.* प्रोथोनोटरी *m*, हायकोर्टाच्या ( विशेषतः मुंबई हायकोर्टाच्या) दिवाणी अव्वल शाखेचा (कामांची) अंमल बजावणी करणारा मुख्य अधिकारी *m*. हायकोर्टा संबंधीं सर्व पत्रव्यवहार करणें, हुकुमांवर व निवाड्यांवर सह्या करणें, जप्तीचीं वारंटें सोडणें, अव्वल शाखेकडील फिर्यादींतल्या व अपिलांतल्या अनामत रकमा ताब्यांत घेणें, ही कामें या अधिकाऱ्याचीं असतात. तसेंच त्याचे स्वतःचें, मास्तर व रजिस्ट्रार इन् इक्वीटीचें, हिशोब व खर्चाच्या याद्या तपासण्याऱ्या कमिशनराचें, हायकोर्टाच्या शिरस्तेदाराचें, ऑफीशलअसायनीचें, नादारीचें, डेप्युटी शेरीफचें, आणि अव्वल शाखेकडच्या भाषांतरकारांचें व दुभाषांचें, हीं सर्व हपीसें प्रोथोनोटरीच्या अधिकारांत असतात.

Protococcus ( pro-to-kok'-us ) [Gr. *protos*, first, and *kokkos*, a grain or seed.] *n.* मूलरूप आलजी (सूक्ष्मवनस्पति) *f*, ही शेवाळीसारखी असते व कौलांवर व झाडांवर उगवते. Protococ'ci *n. pl.*

Protocol ( prō'-tō-kol ) [Gr. *protos*, first, and *kolla*, glue.] *n.* (सरकारी खलित्याचा, तहनाम्याचा किंवा इतर एखाद्या महत्वाच्या दस्तैवजाचा) अव्वल मसुदा *m*, मूळचा मसुदा *m*. २ *an official record* दप्तरीं ठेवलेला दाखला, स्थळप्रत *f*.

Protophyte ( prō'-to-fīt ) [Gr. *protos*, first, *phyton*, a plant.] *n. the first or lowest order of plants* मूलरूप वनस्पतिवर्ग *m*.

Protoplasm ( prō'tō-plazm ) [ Gr. *protos*, first + *plassein*, to mould.] *n. a semifluid, semitransparent colourless substance, consisting of oxygen, hydrogen, carbon and nitrogen, and forming physical basis of life in plants and animals* जीवनरस *m* ( shortened form of मूलजीवनाधार रस; In our opinion, जीवनरस is a better term for *Protoplasm* than जीवनद्रव ).

Pro'toplast *n. the first created man* मूलरूप मनुष्य *m*, प्रथम निर्माण केलेला मनुष्य *m*, आद्यमानव *m*. २ *original, model* मूळ नमुना *m*, मूळ प्रत *f*, मूळ *n*. ३ *unit or mass of protoplasm* जीवनकण. Shortened from जीवनरसकण.

*N. B.*—In our word Nucleus, we have given जीवनकण for Protoplasm, but on a second thought, the following Terminology seems better.

Protoplasm = जीवनरस. Protoplast = जीवनकण. In these words जीव may be substituted for जीवन.

Prototype ( prō'-to-tīp ) [ Gr. *protos*, first, and Type.] *n. a first or original model* मूल प्रतिमा *f*, मूलरूप *n*, मूळ *n*. २ ( of a person ) *the first example* प्रतिमा *f*, आदर्श *m*. ३ (in general) *a pattern, model, or standard* नमुना *m*, प्रमाण *n*.

Protozoan (prō-to-zō'an) [Gr. *protos*, first, and *zoon*, an animal.] *n. one of the first or lowest animals* मूलरूपप्राणी *m.* हे एकपेशीमय असतात.

Protoz'oon *n.* Same as Protozoan. Protoz'oa. *pl.*

Protract (pro-trakt') [L. *pro*, forth, and *trahere*, to draw.] *v. t. to prolong* लांबवणें, वाढवणें, लांबणीवर टाकणें, लांबता धरणें; as, "Protracted their stay for some weeks." [To BE PROTRACTED लांबणीवर पडणें.] २ *to draw* (plan of ground, &c.) *to scale* डिग्रीकंपासनें (जमिनीचा) नकाशा काढणें. Protract'ed *pa. t.* P. *pa. p.* लांबवलेला, लांबणीवर घातलेला -टाकलेला. Protract'edly *adv.* लांबवीत, लांबणीवर टाकीत. Protrac'tion *n.* लांबवणें *n*, लांबणीवर टाकणें *n*, विलंबन *n.* २ *action of protractor muscle* प्रसारक स्नायूची क्रिया *f.* ३ *drawing to scale* (डिग्रीकंपासनें दिलेल्या) प्रमाणाबरहुकूम नकाशा काढणें.

Protractile (prō-trakt'īl) [L. *pro*, forth, and *trahere*, to draw.] *a.* (*zool.*) *that can be extended* प्रसरणशील, प्रसारक्षम (अवयव).

Protraction, See under Protract.

Protract'or *n.* लांबवणारा *m*, लांबणीवर टाकणारा. २ डिग्रीकंपास *m*, प्रोट्राक्टर. ३ प्रसारक स्नायु *m.*

Protrude (pro-trōōd') [L. *pro*, forwards, and *trudere*, to thrust.] *v. t. to thrust forward or out* पुढें ढकलणें, बाहेर ढकलणें -लोटणें -करणें -काढणें. P. *v. i. to shoot forward* पुढें -बाहेर येणें -पडणें, फुटून बाहेर पडणें. Protrud'ed *pa. t.* P. *pa. p.* पुढें आलेला, बाहेर आलेला. Protru'sion *n.* पुढें ढकलणें *n*, पुढें लोटणें *n*, &c. २ पुढें येणें *n*, बाहेर येणें *n.*

Protrusi've *a.* पुढें ढकलणारा -लोटणारा; as, "P. motion."

Protuberance (pro-tūb'ėr-ans) [L. *pro*, forward, and *tuber*, a swelling.] *n. a swelling forward or forth* उंचपणा *m*, फुगलेलेपणा *m.* २ *a tumour* उंचवटा *m*, टेंगूळ *n.* ३ (*astron.*) तेजःशृंग *n*, सूर्योन्नतज्वाला *f.*

Protub'erant *a.* बाहेर आलेला, उंच, फुगलेला, फुगीर.

Protub'erate *v. i. to swell or bulge out* फुगणें, फुगा *m* -फुगारा येणें, बाहेर येणें.

Proud (prowd) [A. S. *prūt*, Cf. pride.] *a.* गर्विष्ठ, गर्वी, अहंकारी, मगरूर, मगरूरीचा, दिमाखी, दिमाखदार, दिमाखाचा, तोरेदार, चढेल, वरडोळ्या, मस्त, बदमस्त, उन्मत्त, उदमस्त, माजोरा, माजोरी, माजुरी. [P. THOUGH IN RAGS हालमस्त.] २ (in good sense) स्वाभिमानी, अभिमानी, अभिमान धरणारा -बाळगणारा, बाणेदार, बाणीदार, बाण्याचा, बाणाईत. [P. OF BIRTH कुलाभिमानी.] ३ (of actions) *showing pride* बाणेदार. ४ *of which one is or may be justly proud* अभिमान वाटण्याजोगा, अभिमानाचा; as, "A P. day for us." ५ (of things) *imposing, splendid* भव्य, विशाल, विस्तीर्ण. ६ (of waters) *swollen, in flood*

(पुरामुळें) वाढलेला, तुडुंबलेला, फुगलेला. [P. FLESH मुरदाड चामडी *f*, मृतमांसांकुर *m*, भरणाऱ्या जखमेभोंवतालचें मेलेलें मांस *n*.]

Proud'ly *adv.* गर्वानें, मगरूरीनें. २ अभिमानानें, अभिमानपूर्वक, स्वाभिमानपूर्वक. ३ ऐटीनें, बाणेदारपणानें.

Prov'able *a.* सिद्ध करण्याजोगा, खरा -स्थापित करतां येण्याजोगा -सारखा.

Prove (prōōv) [O. F. *prover*–L. *probare*, to test.] *v. t.* *to demonstrate, to establish* सिद्ध करणें, खरा करणें, सत्य करणें -करून देणें, सत्य करून दाखवणें, शाबित -स्थापित करणें, सप्रमाण करणें. २ (*archaic*) *to test* कसास लावणें, पारखणें. ३ *to take proof or impression of* प्रुफ काढणें -घेणें. P. *v. i.* (R) *to try* पाहणें, तपासणें, पडताळणें. २ *to turn out* निघणें, होणें, निपजणें, उतरणें, ठरणें, दृष्टीस -नजरेस येणें, दिसून येणें, आढळणें. Prov'ed *pa. t.* P. *pa. p.* सिद्ध केलेला, खरा केलेला, स्थापित, खरा करून दिलेला, शाबित केलेला. २ कसास लावलेला, कसास उतरलेला.

Provedore, Proveditor, (prov'ē-dōr, prō-ved'i-tor) [It. *proveditore*, Port. *provedor* –L. *providere*, to provide.] *n.* (आगबोटींतील व लष्करांतील) मोदी *m*, प्रोव्हीडोर *m*.

Provender (prov'en-dėr) [M. E. *provende* –L. *præbenda*, a daily allowance of food.] *n.* चारा *m*, वैरण *f*, दाणाचारा *m*, चारादाणा *m*, घासपात *m*, चंदी *f*. [GREEN P. हिरवा चारा *m*, चार *f*.] २ *food for human beings* (थट्टेनें) खुराक *m*, शिधा *m*, जेवण *n*.

Prover (prōōv'ėr) *n.* सिद्ध करणारा *m*, खरें करून दाखविणारा *m*, शाबित -स्थापित करणारा *m*.

Proverb (prov'ėrb) [Fr. *proverbe* –L. *proverbium*–*pro*, publicly, and *verbum*, a word.] *n.* *an adage* म्हण *f*, नीति (as used in the Bible) *f*. [BOOK OF P.s नीति. बायबलमधील जुन्या करारांतील एका पुस्तकाचें नांव 'नीति' हें आहे.]

Proverb'ial *a.* म्हणीचा, म्हणींतला, म्हणींत आलेला. २ *that has become a proverb, notorious* म्हण झालेला, म्हण बनलेला, प्रसिद्ध.

Proverb'ially *adv.* म्हणींत सांगितल्याप्रमाणें, सामान्यतः.

Provide (pro-vīd') [L. *pro*, before, and *videre*, to see. Provide ह्याचा धात्वर्थ 'पुढच्या अडचणी आधीं पाहणें,' 'दूरदर्शिपणानें वागणें' असा आहे.] *v. t.* *to procure or prepare beforehand* (आगाऊ) तरतूद करणें, तयारी करणें -करून ठेवणें, सिद्ध करून ठेवणें, तजवीज *f* -योजना *f* -उपाय *m* -बंदोबस्त करणें -करून ठेवणें, बेगमी *f* -साहित्य करणें -करून ठेवणें. २ *to supply, to furnish* पुरवणें, साहित्य *n* -सामग्री करणें *g. of o.*, (साहित्य *n.*) देणें -घेणें -ठेवणें. ३ *to make provision* तरतूद करणें, सोय *f*. करणें -करून ठेवणें. [To P. AGAINST (आगाऊ) तरतूद -व्यवस्था करणें. To P. FOR

अन्नास लावणें. To BE PROVIDED FOR अन्नास लागणें. To P. FOR ONE COMFORTABLY स्वास्थ्य *n.* करणें *g. of o.*] ४ *to stipulate* अट *f* -कलम *n.* घालणें; as, "The contract *provides* that the work be well done." Provid'ed *pa. t.* P. *pa. p. a.* तजवीज करून ठेवलेला. २ दिलेला, पुरवलेला.

Provid'ed *conj. on the condition or understanding* (ह्या) अटीवर, समजुतीवर, समजुतीनें.

Providence (prov'i-dens) *n.* (etymologically) *preparation* तरतूद *f.* २ (a) *prudence* दूरदर्शिपणा *m*, दूरदृष्टि *f*, दूरवर विचार *m.* (b) *thrift* काटकसर *f*, मितव्यय *m.* ३ *beneficent care of God* (a) ईश्वरी योजना *f*, ईश्वरनिर्मित योजना *f.* (b) ईश्वरी कृपा *f.* ४ *a circumstance due directly to God* ईश्वरी करणी *f*, ईश्वरी योजना *f.* ५ (with capital P.) *God* ईश्वर *m*, विधि *m*, विधाता *m*, कर्ताकरविता.

Prov'ident *a. having or showing foresight* दूरदर्शी, दूरदृष्टि, दूरदृष्टीचा, दूरवर पाहणारा. २ *careful for the future* (वेळींच) सावध असणारा, (वेळींच -आगाऊ) तरतूद करून ठेवणारा, पूर्वव्यवस्था करणारा. (b) *thrifty* काटकसरी, मितव्ययी. [P. FUND वारसाकरितां (ठेवलेला) फंड *m*, वारसनिधि *m*, पूर्वव्यवस्थानिधि *m.*]

Providen'tial *a. of or by divine foresight* ईश्वरी, ईश्वरनिर्मित, ईश्वरी योजनेचा, ईश्वरी करणीचा, ईश्वरी सूत्राचा, ईश्वरी सूत्रानें होणारा -घडणारा. २ *opportune, lucky* नशिबानें झालेला, दैवाचा, नशिबाचा.

Providen'tially *adv.* ईश्वरी योजनेनें, ईश्वरी करणीनें, ईश्वरी सूत्रानें.

Prov'idently *adv.* दूरदर्शिपणानें, दूरदृष्टीनें, दूरवर विचारानें.

Provid'er *n.* (आगाऊ) तरतूद *f* -बगमी *f* -व्यवस्था करणारा -लावणारा -ठेवणारा *m*, (आगाऊ) योजना करून ठेवणारा. २ पुरवणारा *m*, पुरवठा करणारा *m.* [UNIVERSAL P. सर्व तऱ्हेचा माल ठेवणारा व्यापारी *m.*]

Province (prov'ins) [Fr.–L. *provincia*, a province, –*pro*, before, for, and *vincere*, to conquer.] *n.* (*Rom. Hist.*) इटालीच्या बाहेरील रोमन गव्हर्नराच्या अंमलाखालील मुलूख *m*, प्रांत *m*, इलाखा *m.* २ *principal division of a kingdom* (a) प्रांत *m.* (b) इलाखा *m*, सुभा *m.* ३ (*Eccl.*) *a district under an archbishop or a metropolitan* आर्चबिशप किंवा मेट्रापालिटन ह्यांच्या अधिकाराचा मुलूख *m* -प्रांत. ४ *sphere of action* (कर्तव्याचा) प्रांत *m*, अधिकार *m*, विषय *m*; as, "This is not within my P." ५ *a branch of learning* शाखा *f*, प्रांत *m*, विषय *m*, प्रकरण *n*; as, "In the P. of polite letters."

Prov'inces *n. pl.* राजधानी खेरीज बाकीचा मुलूख *n.*

Provin'cial *a.* प्रांतिक, प्रांताचा, प्रांतांतला, प्रांतस्थ. (b) इलाख्याचा, इलाख्यांतील. [P. CONFERENCE प्रांतिक सभा *f.* P. CONTRACTS प्रांतिक (सरकारांशीं केलेले) ठराव

*m. pl.* P. GOVERNMENT प्रांतिक सरकार.] २ *of the provinces* राजधानीच्या बाहेरचा, प्रांतांतला, देशांतला. ३ (in manners, speech, ideas, tastes, &c.) राजधानीच्या बाहेरचा, खेड्यांतला, खेडवळ, ग्राम्य. P. *n.* (राजधानीच्या बाहेर) खेड्यांत राहणारा *m*, गांवढळ *m*. Provin'cialism *n. provincial manner, fashion, mode of thought, &c.* प्रांतांतील रीतरिवाज, प्रांतिक आचारविचार. २ *a word or phrase peculiar to a province* (शब्दांचा) प्रांतिक प्रयोग *m*, प्रांतिक वाक्प्रचार *m*. ३ *attachment to one's province rather than one's country* प्रांताभिमान (as opposed to देशाभिमान.) ४ *narrowness, illiberality* अनुदारता *f*, संकुचितपणा *m*.

Provincialism, See under Provincial.

Provin'ciality *n.* (आचारविचारांची किंवा रीतरिवाजांची) प्रांतिकता *f*, प्रांतभेद *m*.

Provin'cially *adv.* प्रांतवारीनें, प्रांतवार.

Provision (pro-vizh'un) *n. providing* तरतूद करणें *n*, तयारी करणें *n*, तयारी करून ठेवणें *n*. २ *preparations, measures taken* तरतूद *f*, तजवीज *f*, बंदोबस्त *m*, तयारी *f*, उपाय *m*, योजना *f*. ३ (*pl.*) *supply of food* अन्न *n*, अन्नसामग्री *f*, आटापाणी *n*. [UNDRESSED P.s शिधा *m*, आमान्न *n*.] ४ *a condition* अट *f*, कलम *n*, शर्त *f*. P. *v. t. to supply with necessaries* अन्नाची बेगमी *f*. करणें, तरतूद *f*. करणें -करून ठेवणें, अन्नसामग्री पुरविणें.

Provi'sional *a. temporary* तात्पुरता, कामचलाऊ, गरजेपुरता. [P. COMMITTEE कामचलाऊ कमिटी *f*. P. JUDGMENT (कोर्टापुढें आलेल्या पुराव्यावरून दिलेला दिवाणी दाव्यांतील) तात्पुरता निकाल *m*. अधिक पुरावा पुढें आला तर हा निकाल कोर्ट फिरवूं शकतें. P. ORDER तात्पुरता हुकूम *m*.]

Provi'sionally *adv.* (तात्पुरतें) काम चालविण्याकरितां, चालल्या कामाला धरून, चालल्या प्रसंगाला धरून.

Provi'sionary *a.* तात्पुरता, गरजेपुरता, कामचलाऊ.

Proviso (pro-vī'-zō) [See Provide.] *n. a condition* (of an agreement) (करारांतील) अट *f*, शर्त *f*, (दस्तैवजांतील) शर्त *f*, कलम *n*. Provi'soes *n. pl.*

Provi'sory *a. containing a proviso* शर्त *f* -अट असलेला, शर्तीचा, शर्तीच्या स्वरूपाचा; as, "A P. clause." २ *temporary* तात्पुरता, कामचलाऊ, चालचलाऊ, चालचलाऊ व्यवस्थेचा.

Provocation (prov-o-kā'shun) *n. act.* चिथवणें *n*, चेतवणें *n*, चिथवणी *f*, खिजावणें *n*, खिजावणी *f*, चिडवणें *n*, चिडवणूक *f*. २ (*law*) चिथवणूक *f*; as, "Did it under P." ३ चिथवणुकीचें कारण *n*.

Provo'cative *a. tending to provocation* उत्पन्न करणारा, जागृत करणारा. २ *intentionally irritating* चिथवणारा, मुद्दाम चिडवणारा, खिजावणारा, चिडवणीचा. P. *n.* (चीड) उत्पन्न करणारी गोष्ट *f*

**Provoke** ( pro-vōk' ) [ L. *pro*, forth, and *vocare*, to call ] *v. t. to rouse, to incite* चिथवणें, चेतवणें, चिथावणी देणें. २ *to irritate* चिडवणें, चाळवणें, त्रास आणणें -नेणें, खिजवणें, संतापवणें, क्षोभविणें. ३ (a fight, quarrel, &c.) (चिडवून -खिजवून भांडण -तंटा ) उपस्थित करणें. ४ *to cause* उत्पन्न करणें; as, "Will P. fermentation." (b) उत्तेजित करणें, उद्दीपित करणें. Provoked' *pa. t.* P. *pa. p.* चिथवलेला, चेतवलेला. २ चिडवलेला, खिजवलेला, संतापित, संतप्त. ३ ( चिडवून ) उपस्थित केलेला. ४ उत्तेजित, उद्दीपित. ५ उत्पन्न केलेला.

**Provo'king** *pr. p.* चिथवणारा, चेतवणारा, चिडवणारा, खिजवणारा, संताप आणणारा, &c. Provo'kingly *adv.* चिथवून, चिडवून.

**Provost** ( prov'ust ) [O. F. *provost*, Fr. *prevot*, –L. *præpositus*, placed before.] *n.* (इंग्लंडांतील मेयरसारखा) स्काटलंडांतील बरोचा मुख्य म्याजिस्ट्रेट *m*; ( ह्याचे अधिकार व हिंदुस्थानांतील म्याजिस्ट्रेटाचे अधिकार भिन्न आहेत ) प्रोव्हस्ट. २ ( इंग्लंडांतील कांहीं कालेजांचा ) मुख्य अधिकारी *m*, प्रोव्हस्ट *m*. ३ ( कांहीं क्याथिड्रलांचा ) मुख्य अधिकारी *m*, प्रोव्हस्ट *m*.

**Prow** (prow) [Fr. *proue*–L. *prora*–Gr. *pro*, before.] *n.* ( गलबताची ) नाळ *f*. २ *the vessel itself* पडाव *f*.

**Prowess** ( prow'es *or* prōes ) [ Fr. *prouesse*-O. Fr. *prou*, brave.] *n. valour, gallantry* पराक्रम *m*, बहादुरी *f*, जवानमर्दी *f*, वीर्य *n*, विक्रम *m*, प्रताप *m*. [ PHYSICAL PROWESS बाहुबल *n*, बाहुवीर्य *n*. ]

**Prowl** ( prowl ) [M. E. *prolen*, to search.] *v. i. to wander about for prey* शिकारीसाठीं फिरणें, शिकारीचे -पारधीचे लागावर फिरणें, घिरट्या घालणें, तलपणें or तळपणें, पाळतीवर फिरणें ( also *fig.*). P. *n.* शिकारीच्या लागावर फिरणें *n*, पाळतीवर फिरणें. [ON THE P. पाळतीवर. ] Prowl'ing *v. n.* शिकारीसाठीं फिरणें *n*.

**Proximal** ( proks'i-mal ) [L. *proximus*, nearest.] (a) (*anat.*) *situated towards the centre of a body or of a point of attachment* शरीराच्या मध्यरेषेच्या जवळ असणारा, मध्यरेपासमीपवर्ती, संनिकृष्ट.

**Proximate** ( proks'i-māt ) [L. *proximus* -*proximare*, to draw near.] *next, nearest, immediate* अगदीं जवळचा, लगतचा, लागलेला, लगत्याचा, संनिकृष्ट, सन्निहित, समीप. [P. CAUSE संनिकृष्ट कारण. ]

**Prox'imately** *adv.* अगदीं जवळ, जवळ.

**Prox'imity** *n. nearness* जवळपणा *m*, लगत *f*, लगता *m*, सांनिध्य *n*.

**Proximo** ( proks'-i-mo ) [L.] *of next month* पुढच्या महिन्याचा; as, "The 3rd P." [ABBR. *prox.*]

**Proxy** ( proks'i) [Lit. 'the office of procurator,' from *obs.* E. procuracy, from Procurator.] *n. agency of a substitute* मुखत्यारी *f*, प्रतिनिधित्व *n*. [BY P. प्रतिनिधिद्वारा, प्रतिनिधीकडून, मुखत्यारामार्फत -कडून. ] २ *a person authorized to act for another*

मुखत्यार *m*, बदल्या *m*, प्रतिनिधि *m*, तर्फेचा *m*, कडचा *m*. ३ (आपल्या तर्फे मत देण्याबद्दल दिलेलें) मुखत्यारपत्र *n*. ४ मुखत्यारामार्फत दिलेलें मत *n*.

Prude (prōōd) [ Fr. from O. F. *prode*, excellent. ] *n. a woman who affects modesty* लज्जेचा आव घालणारी स्त्री *f*, मुरके मारणारी स्त्री *f*, मुरकेखोर स्त्री *f*, उगाच लाजाळू बायको *f*, लाजेची सोंगाडीण *f*.

Prud'ery *n. affected modesty* लाजेचें सोंग *n* -ढोंग *n*, नखरे *m. pl.*

Prud'ish *a. affectedly modest* मुरकेखोर (स्त्री), तोंडमुरडी *f*, नखरेखोर.

Prud'ishness *n.* लाजेचें सोंग *n* -ढोंग *n*, ओढून आणलेली लाज *f*.

Prudence (prōō'-dens) [ Fr.-L. *pro-videns* -*pro*, before, and *videre*, to see.] *n. practical wisdom* दूरदर्शिपणा *m*, दूरदर्शित्व *n*, दूरदृष्टि *f*, समजदारी *f*, विवेक *m*, विचारीपणा *m*, शहाणपणा *m*, समजूतदारपणा *m*, समजूतदारी *f*, मागलापुढला विचार *m*. २ *carefulness* विचार *m*, काळजी *f*, हुषारी *f*, सावधगिरी *f*. ३ *frugality* काटकसर *f*, मितव्यय *m*.

Pru'dent *a. cautious and wise in conduct* दूरदर्शी, दूरदृष्टि, समजदार, समजूतदार, समंजस, धोरणी, शहाणा, मागेंपुढें पहाणारा, मागचापुढचा विचार करणारा. २ *careful* विचारी, सावध. ३ *dictated by forethought* विचाराचा, सावधगिरीचा, दूरदर्शिपणाचा. ४ *frugal* काटकसरी, मितव्ययी, काटकसरीचा; as, "P. expenditure of money." Pruden'tial *a. using, practising or guided by, prudence* दूरदर्शिपणाचा, समजदारीचा, पूर्वापरविचाराचा; as, "P. considerations." २ *selfish, pecuniary* स्वार्थी, स्वार्थाचा, द्रव्यदृष्टीचा; as, "P. motives."

Pruden'tially, Pru'dently *adv.* दूरदर्शिपणानें, शहाणपणानें, विचारानें, विचारपूर्वक, दूरवर नजर देऊन, मागचापुढचा विचार करून, सावधगिरीनें.

Prune (prōōn) [O. Fr. *proignier*, to take a cutting from a vine -L. *propago*, a shoot of a plant.] *v. t. to trim or lop* (trees) खडसणें, छाटणें, खच्ची करणें. २ *to clear* (of what is not wanted) छाटणें, छाटाछाट करणें, छाटून -काढून टाकणें; as, "To P. an essay." ३ *to trim* (feathers; as a bird) पिसें साफसूफ करणें, नीटनेटका करणें, छाटणें. Prun'ed *pa. t.* Pru'ning *pr. p.* P. hook *n.* कोयता.

Prune (prōōn) [Fr. -L. *prunum* -Gr. *prounon*, plum.] *n. a dried plum* मनुका *f*, मनुका *f*.

Prurience (prōō'ri-ens), Pruriency (prōō'ri-en-si) [L. *prurire*, to itch.] *n.* (*lit.* and *fig.*) खाज *f*, कंडू *f*; as, "The P. of curious ears." Pru'rient *a. given to indulgence of lewd ideas* विषयलोलुप, खाज सुटलेला, खाजाळू. Pru'riently *adv.*

Prurigo *n.* त्वग्रोगविशेष. यांत अंगाला अतिशय कंड सुटते.

Pruritus *n.* तीव्रकंडू *m*, कंडुरोग *m*.

Prussian (prush'-un) *n.* प्रशिया देशाचा रहिवाशी *m*, प्रशियन *m.* P. *a.* प्रशिया देशाचा, प्रशियाचा. P. blue *n.* प्रशियन ब्ल्यू नांवाचा निळा रंग *m.*

Pry (prî) [M. E. *prien.* Doublet *peer*, to look narrowly.] *v. i. to look or peer inquisitively* (often *into, about*) चोरटेपणानें पहाणें, चोरून डोकावणें, हुंगाहुंगी करणें, चोरून पहाणें, टेहेळणें, हेरणें, टेहळणी *f* -टेहळ करणें. ३ *to inquire impertinently into* (a person's affairs, conduct, &c.) (जरूर नसतां) उगाच चौकशी -तपास करणें. Pri'er, Pry'er *n.* चोरून पहाणारा, हुंगाहुंगी करणारा *m.* (b) टेहेळणारा *m*, टेहळ्या *m*, हेरणारा *m*, हेऱ्या *m.* २ (गरज नसतां) चोरून चौकशी -तपास करणारा *m.*

Pry'ing *pr. p.* हुंगाहुंगी करणारा, हुंग्या, हुगाड्या, चोरून डोकावणारा. २ टेहेळणारा, टेहळ्या. ३ (संबंध नसतां) चोरून चौकशी *f* -तपास करणारा.

Pry'ingly *adv.* (संबंध नसतां) चौकशी करून, टेहेळ ठेवून, चोरून पाहून, हुंगाहुंगी करून.

Psalm (säm) [L. –Gr. *psalmos*, a song sung to the harp,– *psallein*, to twang, to sing to the harp.] *n. a sacred song* पवित्र गीत *n.* (b) *a hymn* प्रार्थनागीत *n.* २ (in *pl.* with capital P.) *modern version of the religious hymns of the Jews as found in the Old Testament* गीतें *n. pl.* हीं गीतें बायबलमधील जुन्या करारांतील यहुदी लोकांच्या धार्मिक गीतांचें भाषांतर आहेत.

Psalm'ist *n. author of a psalm* गीत करणारा *m*, गीतकार *m*, (विशेषतः) डेव्हिड.

Psalmod'ic,-al *a.* पवित्रगीतांसंबंधीं.

Psal'modist *n. one who sings sacred songs* पवित्र गीतें गाणारा *m.* २ पवित्र गीतें रचणारा -लिहिणारा.

Psal'modize *v. i.* पवित्र गीतें गाणें.

Psal'mody *n. practice or art of singing psalms, esp. in public worship* पवित्र गीतांच्या गायनाचा प्रचार *m*, पवित्रगीतगायन *n.* (b-) पवित्र गीतें गाण्याची कला *f*, पवित्रगीतगायन *n.* २ *arrangement of psalms for singing* गाण्याकरितां गीतांची रचना *f*, गीतांचा अनुक्रम *m.* ३ *psalms so arranged* (म्हणण्याकरितां अनुक्रम लावलेलीं) क्रमिक गीतें *n. pl.* ४ *a collection of sacred songs or hymns* पवित्रगीतसंग्रह *m.*

Psalter (sawlter) [O. F. *psaltier*–Gr. *psalterion*, a stringed instrument.] *n. a book containing psalms* गीतांचें पुस्तक *n.* २ (with capital P.) जुन्या करारांतील 'गीतें' नांवाचें पुस्तक *n*, गीतें *n. pl.*

Psalterium (sawl-te'ri-um) [L. *psalterium*, a psaltery.] *n.* (*pl.* Psalteria) गुरांच्या कोठ्याचा तिसरा भाग *m*, गुरांचा तिसरा पक्काशय *m.*

Psalterium Georgianum *n.* (*astron.*) *George's Lute* वल्लकी.

P's and Q's (no full stops) *details, small particulars, trivial matters* बारीकसारीक बाबी *f. pl.*, किरकोळ

बाबी *f. pl.* -गोष्टी *f. pl.* [To MIND ONE'S P'S AND Q's *to be very careful in behaviour* बारीकसारीक गोष्टींतही सावधगिरी -हुशारी ठेवणें, बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष देणें.]

Pseudo (sū'-dō) [Gr. *pseudos*, falsehood.] (ग्रीक उपसर्ग) खोटा, कृत्रिम.

Pseudo-bulb (sū'dō-bulb) [*Pseudo+bulb.*] *n.* (*bot.*) (आर्किडचा) कुकंद *m*, मिथ्या कंद *m*, खोटा कंद *m*; उ० सालंमिश्री.

Pseudo-cyesis *n.* मिथ्या सगर्भावस्था *f*, गर्भाभास *m.*

Pseudonym (sū'-dō-nim) [Gr. *pseudo*, false, and *onoma*, Sk. नाम, a name.] *n. a fictitious name* कवीनें वगैरे धारण केलेलें) टोपणनांव *n.*

Pseudon'ymous *a. writing or written under a false name* टोपणनांवानें लिहिणारा -लिहिलेला.

Pshaw (shaw or pshaw) [Imitative.] *interj.* (उतावळ, तिरस्कार वगैरे, दाखविणारें) उद्गारवाचक अव्यय. छे! छां! छत्! छिः! छिछि! उं:! थत्त!

Psyche (sī'ki) [Gr. *psukhē*, breath, life.] *n.* चित् *f*, संवित् *f*, मन *n*, चिच्छक्ति *f*, चेतनाशक्ति *f*, संवेदनाशक्ति *f*, इंद्रियांना गोचर नसणाऱ्या वस्तू जाणण्याची शक्ति *f*, आत्मा (not in the Hindu Vedantic sense).

Psyc'hical *a.* चिच्छक्तिविषयक, संविच्छक्तिविषयक, मनोविषयक, आत्मविषयक. २ भौतिकेतरचमत्कारांसंबंधीं, भौतिकेतरचमत्कारविषयक.

Psycholog'ical *a.* मानसशास्त्राचा, मानसशास्त्रविषयक. [P. MOMENT एखादी गोष्ट घडावी असें मनांत येण्याचा आणि ती घडण्याचा (एकच) काळ, ऐन वेळ *f*, ताण *n.*]

Psychology (sī-kol'ō-ji) [Gr. *psuchē*, the soul, and *logos*, a discourse.] *n.* मानसशास्त्र *n*, (here मानस = the whole world of inner consciousness, as opposed to the world of matter) मनोविज्ञान *n.*

*N. B.*—चिच्छक्तिशास्त्र will be a more accurate word. Here also चिच्छक्ति = the whole world of inner consciousness.

Psychrometer (sī-krom'ē-ter) [Gr. *psukhros*, cold, and E. Meter.] *n.* ओल्या फुग्याचा आर्द्रतामापक *m.*

Ptosis *n.* (to'-sis) [Gr. *ptosis*, a falling.] डोळ्याचे स्नायूवरून वारा गेल्यामुळें डोळ्याची पापणी बंद राहणें, पक्ष्मपात *m.*

Ptarmigan (tär'mi-gan) [Gael. *tarmachan.*] *n.* टार्मिगन *m.* हा पक्षी कोंबड्यासारखा असतो. या पक्ष्यांच्या वर्गाला कुकुटीयवर्ग असें म्हणतात.

Puberty (pū'ber-ti) [L. *pubertas* –*puber*, of the age of puberty.] *n. the age of full development* ज्वानी *f*, यौवनदशा *f*, यौवन *n*, प्रौढदशा *f*, उमेद *f*, वय *n*, तारुण्य *n*, तारुण्यावस्था *f*, जवानी *f*, भरजवानी *f.* [NOT ARRIVED AT P. अप्राप्तयौवन, वयांत न आलेला. TO ATTAIN P.—a male or a female वयांत -पणांत -उमरींत -भरांत येणें; a female ऋतुस्नात होणें, नहाणपदास येणें, ऋतुमती होणें.]

Pubes'cence *n. arrival at puberty* यौवनदशा *f*, यौवनावस्था *f*, पक्वदशा *f*, तारुण्य *n*. २ (*bot. and zool.*) (वनस्पतींच्या पानांवरील किंवा देठावरील) लोम *n*, (प्राण्यांच्या किंवा विशेषतः किड्यांच्या अंगावरील) लोम *f*, मृदुलोम *f*.

Pubes'cent *a*. वयांत -सरांत आलेला, प्राप्तयौवन. २ (*bot. and zool.*) *covered with short, soft hair* लोमश, लोमावृत (पर्ण); उ० मखमल.

Pubes (pyu'-beez) [L.] गुह्यरोमप्रदेश *m*, रोमांग (coined) *n*. Pubic *a*. गुह्यरोमप्रदेशाचा, रोमांगाचा. [P. BONE or PUBIS जघनास्थि. SYMPHYSIS P. जघनास्थिसंधि.]

Public (pub'lik) [L. *publicus -populus*, the people.] *a. of or concerning the people as a whole* (सर्व) लोकांचा, सार्वजनिक, सार्वजनीन, सर्वांचा, अवघ्यांचा, सर्वसाधारण; as, "P. utility." [P. HOLIDAY सार्वजनिक सण, सार्वजनिक सणाचा दिवस *m*.] २ सरकारी [DEPARTMENT OF P. INSTRUCTION सरकारीशाळाखातें *n*, सरकारीविद्याखातें *n*. P. WORKS DEPARTMENT सरकारीइंजिनियरखातें.]. ३ *done by or for the people* सार्वजनिक, लोकांकरितां केलेला, लोकांच्या वतीनें नेमलेला, लोकांच्या वतीनें केलेला. ४ *open to, shared by, the people* सार्वजनिक, सर्व लोकांना खुला, सर्वांना उपयोगी; as, "P. baths; P. library." [P. HOUSE (जेवण्याची, रहाण्याची व विशेषतः तेथल्या तेथें पिण्याकरितां दारूची सोय करणारी) सार्वजनिक खाणावळ *f*.] ५ *open to general observation, done in public* सार्वजनिक, जाहीर, सर्व लोकांदेखत केलेला, उघडपणें केलेला, उघड, उघडा, जाहीरपणानें केलेला; as, "A P. protest; Gave it a *public* utterance." [P. AUCTION जाहीर लिलांव. P. MEETING जाहीर सभा *f*.] ६ *existing in public* जाहीर, प्रसिद्ध, लोकप्रसिद्ध, जगजाहीर. [To BECOME P. फुटणें, बाहेर पडणें, जाहीर होणें, सर्वांच्या तोंडीं होणें, सर्वतोमुखीं होणें, सर्वलोकांत पसरणें.] ७ *of, engaged in, the affairs or service of the people* सार्वजनिक, सार्वजनिक हिताचा, लोकांचा, सार्वजनिक कामाचा, सार्वजनिक कामांत गुंतलेला, लोकसेवेचा, लोकसेवेंत गेलेला. [P. LIFE सार्वजनिक आयुष्यक्रम *m*. P. MAN सार्वजनिक मनुष्य *m*, लोककार्यकर्ता *m*. P. SPIRIT सार्वजनिक हितबुद्धि *f*, लोककल्याणेच्छा *f*. P. SPIRITED सार्वजनिकहितबुद्धीचा. P. SPIRITEDLY सार्वजनिकहितबुद्धीनें. P. SPIRITEDNESS सार्वजनिकहितबुद्धि *f*, लोककल्याणेच्छा *f*.] ८ *of the nations, international* सर्वराष्ट्रांचा, सर्वराष्ट्रीय; as, "Proscribed Napoleon as a *public* enemy." P. *n. the people* लोक *m. pl.*, सर्व लोक *m. pl.*, जनता *f*, चौघे *m. pl.* [IN P. उघड, चौघांत, जाहीर रीतीनें. To COME BEFORE THE P. जगापुढें चव्हाट्यावर येणें, फडास येणें, फडावर येणें, चारचौघांत येणें.] २ (*of an author*) *the persons who read his books* वाचक *m. pl.*, वाचकवर्ग *m*.

Publican (pub'lik-an) [L.] *n*. (*orig.*) *a tax-collector* (प्राचीन रोमन लोकांतील) कर वसूल करणारा, जकात-

दार m, नाकेदार. २ *the keeper of an inn* (इंग्लंडांतील) खाणावळवाला. (ह्या खाणावळींत तेथल्या तेथें पिण्याकरितां दारू मिळूं शकते.)

Publication (pub-li-kā'shun) *n. the act of making public* प्रसिद्ध करणें *n*, जाहीर करणें *n*, प्रकाशन करणें *n*, प्रकाशन *n*, आविष्करण *n*, प्रकटीकरण *n*. २ *the offering of a printed work for sale* (छापून) प्रसिद्ध करणें *n*, प्रकाशन *n*, प्रसिद्धि *f*. ३ *the work itself* (छापून) प्रसिद्ध केलेला ग्रंथ *m*, (प्रकाशित) ग्रंथ *m*.

Public house, See under Public.

Publicist (pub'li-sist) [See Public] *n. one who writes on international law* आंतरराष्ट्रीय कायद्यांवर लिहिणारा. २ *a writer on current public topics, esp. a journalist* सार्वजनिक प्रश्नांवर लिहिणारा *m*, सार्वजनिक लेखक *m*,(विशेषतः) वर्तमानपत्रकार *m*. ३ *one who takes an active part in politics* राजकारणांत पडणारा *m*, राजकारणी पुरुष *m*.

Publicity (pub-lis'i-ti) *n*. प्रसिद्धि *f*, जाहीरपणा *m*. २ *notoriety* गवगवा *m*, बोभाटा *m*.

Public'ly *adv. openly* उघडपणें, उघडउघड, जाहीर रीतीनें, चारचौघांत; as, "A declaration P. made." २ *in the name of the community* लोकांच्या वतीनें, सार्वजनिक रीत्या.

Publicness *n*. सार्वजनिकता *f*, सार्वजनिक स्वरूप *n*.

Public-spirited, See under Public.

Publish (pub'lish) [Fr. *publier*, L. *publicare*, to make public.] *v. t. to make generally known* जाहीर करणें, प्रसिद्ध करणें, विदित करणें, लोकांत -चौघांत सांगणें, चौघांत आणणें, प्रसिद्धींत आणणें, प्रसिद्धि -उघडीक *f*. करणें, प्रगट करणें. २ *to announce formally, to promulgate* (edict) जाहीर करणें, जारी करणें, चौघांत -पांचांत -दहांत -शंभरांत सांगणें. ३ *to noise* (abroad, far and wide, &c.) बोभाटा करणें, गाजावाजा *m*. करणें, गजर *m*. करणें. ४ *to ask or read* (banns of marriage) (वधूवरांचा विवाहनिश्चय) जाहीर करणें. ५ (of author, editor, or publisher) *to issue a printed production for sale* (छापून) प्रसिद्ध करणें, प्रकाशित करणें.

Pub'lished *pa. t.* P. *pa. p.* जाहीर केलेला, प्रसिद्ध केलेला, प्रगट केलेला, छापलेला, प्रकाशित.

Pub'lisher *n*. जाहीर करणारा *m*, प्रसिद्ध करणारा *m*. २ (पुस्तकांचा) प्रकाशक, पुस्तकें (छापून) प्रसिद्ध करणारा.

Publishing *pr. p*. जाहीर करणारा, प्रसिद्ध करणारा. २ (पुस्तकें छापून) प्रसिद्ध करणारा, प्रकाशक. [A P. COMPANY प्रकाशकमंडळी *f*.] P. *n*. जाहीर करणें *n*, प्रसिद्ध करणें.

Pucker (puk'ėr) [Lit. 'to gather into the form of a poke.'] *v. t. to gather into folds, to wrinkle* (शिवतांना मुद्दाम किंवा अजाणपणानें) सुरकुत्या आणणें, सुरकुत्या पाडणें, सुरकुतिवणें, सुरुडणें or सुरडणें. P. *v. i*. सुरकुतणें, सुरुडणें, सुरडणें, अटरणें, अवटरणें,

सुरकुत्या पडणें -येणें. Pucker, Puckering (*v. n.*) *n.* सुरकुती *f*, चिरमी *f*, चुणी *f*, वळी *f*, वळकटी *f*, सुरुड *f*. २ *a state of confusion or worry* गोंधळ *m*, धांदल *f*. Puckered seam (आंगरख्याची) चुणी *f*, चीण *f*.

**Pudding** (pood'ing) [Of doubtful origin.] *n.* (इंग्रजी तऱ्हेचा) सांजा *m*, शिरा *m*. [P. Jack भोजनभाऊ *m*, आयतोजी *m*, भोजनगप्रु *m*.]

**Puddle** (pud'l) [M. E. *podel*, a pool.] *n. a small pool of muddy water* डबकें *n*, डबकण *n*, डबका *m*, डबकी *f*, डबरा *m*, डोहरा *m*, सांचवणी *f*. २ *moistened clay used to make a water-tight stopping* लिंपण *n*, लिंपणाची माती *f*, गारा *m*, गिलावा *m*. P. *v. t. to make muddy* (पाणी) गढूळ करणें (also *fig.*). २ *to busy oneself in an untidy way* गुरफटवून घेणें. ३ *to make impervious to water with clay* लिंपण घालणें, बांध घालणें. ४ *to convert into bar or wrought iron* (a) लोखंडाच्या कांबी करणें, (b) लोखंड शुद्ध करणें. P. *v. i.* डबक्यांत लोळणें, चिखलांत लोळणें. Pud'dler *n.* लोखंडाच्या कांबी करणारा *m.* Pud-d'ling *v. n.* लोखंड शुद्ध करण्याची पद्धति *f*. P.] FURNACE लोखंड शुद्ध करण्याची भट्टी *f*.] Pud'dly *a.* डबक्यासारखा, चिखलानें भरलेला.

**Pudendum** (pū-den'dum) [L. *pudere*, to be ashamed.] *n.* (usually in *pl.* pudenda) *the external genitals, esp. of females* स्त्रियांचीं बाह्यजननेंद्रियें *n. pl.*

**Puerile** (pū'er-il) [Fr. –L. *puer*, a boy.] *a. childish* पोरकट, पोरवट, अप्रौढ. २ *silly* वेडगळ, अचरट.

**Pueril'ity** *n. childishness* पोरकटपणा *m*, पोरपणा *m*. २ *childish act* पोरकटपणाचें कृत्य *n*, मूर्खपणाचें कृत्य *n*, पोरकट कृत्य *n*. ३ *the age from seven to fourteen years* (सात वर्षांपासून चौदा वर्षांपर्यंतचें) पोरवय *n*, पोरपण *n*.

**Puerperal** (pū-er'-per-al) [L. *puer*, a child, and *parus*, bearing.] *a. of or due to child-birth* बाळंतपणाचा, बाळंत (in *comp.* as बाळंतरोग), प्रसूतीचा, प्रसूति (in *comp.*), प्रासूतिक, प्रसवासंबंधीं. [P. FEVER सूतिकाज्वर, बाळंतताप *m*. P. WOMAN बाळंत *f*, बाळंतीण *f*. P. INSANITY सूतिकोन्माद, बाळंतवेड.]

**Puerperium** (pūerpe'-rium) [Latin word.] *n.* बाळंतपण *n*, बाळंतपणाचा काळ *m*, सूतिकाकाल *m*.

**Puff** (puf) [Imitative.] *n. a sudden, forcible breath, or blast of wind* फुंकर *m*, फुंक *m*, *f*, फुंका *m*, फुंकार *m*, फुंकारा *m*, भबका *m*, भबकी *f*, झपाटा *m*, झटका *m*, झटकारा *m*, सोंसा *m*, सनाटा *m*, सुसाटा *m*. [Gentle P. झुळूक *f*. Strong P. भबका *m*, भबकारा *m*. In puffs सोंसों, घोघो.] २ *a whiff* (of smoke, &c.) (विडीच्या धुराचा, इंजनाच्या वाफेचा) भबका *m*. ३ (dress-making) *a part which is gathered and made full* फुगा. ४ *something for applying toilet-powder* गोंडा *m*. ५ *an unduly commendatory*

*notice of a book, performance, &c.* पोकळ स्तुतिलेख *m*, बढाईचा -फुशारकीचा लेख *m*, बडेजाव *m*.

Puff *v. t. to emit puff of air or breath* (हवेचा किंवा श्वासाचा) फुंकारा *m*. सोडणें, श्वास सोडणें. २ *to put out of breath* श्वास चालेनासा करणें, as, "Was rather *puffed*." ३ *to blow* (dust, smoke, light object, &c. *out, up, away, &c.*) *with puffs* फुंकरानें -फुंकर घालून -फुंकरून उडविणें, फुंकून -फुंकेसरसा *decl.* -फुंकाऱ्यानें &c. उडवणें. ४ *to smoke* (a pipe) *in puffs* धूर सोडीत सोडीत (चिलीम) ओढणें, झुरका मारणें. ५ *to inflate* फुगवणें, फुगीर करणें. ६ *to elate, to make proud* (usually in *pa. p.*) फुगवणें, चढवणें, माजवणें, शेफारवणें, शीड चढवणें *g. of o.*, शेंडीस फुलें बांधणें, चण्याच्या झाडावर चढविणें, हत्तीवर -घोड्यावर बसविणें, पोम *n.* वाढवणें, बडेजाव करणें *g. of o.*; as, "You P. me, and I will P. you." ७ *to advertise* (goods) *with exaggerated or false praise* (मालाची) बढाई करणें -सांगणें -लिहिणें, फुशारी *f* -फुशारकी *f.* सांगणें. P. *v. i.* (of air) *to come out, up, in puffs* फुंकराबरोबर बाहेर पडणें -निघणें -येणें. २ *to breathe hard* दम लागणें *in. con.*, धापा टाकणें, सुसकारे -हुसकारे टाकणें -देणें, हुसकारणें, सुसकारणें, हवावी लागणें. ३ (with *out*) *to utter pantingly* धांपा टाकीत -सांगणें -सुसकारे टाकीत बोलणें. ४ (of steam-engine, of person smoking, &c.) *to emit puffs, to move with puffs* धूर भप्‌भप् सोडणें, धूर टाकीत जाणें, धूर सोडीत पुढें होणें -चालणें; as, "*Puffed* out of the terminus." ५ *to blow with the mouth* फुंकर घालणें, फुंक *m* -फुंकर *m* -फुंका *m* -फुंकार *m* -फुंकारा *m.* मारणें. ६ *to swell with air* तट्ट फुगणें, तरतरणें, *intens.* तरारणें.

Puffed *pa. t.* P. *pa. p.* फुगवलेला, फुगरा, फुगीर, remissly फुगट, गुरगुरीत, शेफारवलेला &c., &c. [To BE PUFFED UP चढणें, माजणें, शेफारणें, शेरडावणें, उंडारणें, फुगणें, शीड चढणें *g. of s.*]

Puff'edness *n.* फूग *f*, फुगवटी *f*, फुगोटी *f*, फुगवशी *f*, फुगोशी *f*.

Puff'ery *n. undue praise* (*esp.* for the sake of advertisement). पोम माजविणें, फुगवून लिहिणें *n*, फुगवून सांगणें *n*, पोकळ स्तुति.

Puff'y *a. gusty* जोराचा (वारा). २ *corpulent* (वातानें) फुगलेला, वात शिरलेला, वाताचा. ३ *puffed out* फुगलेला, फुगीर, फुगट.

Pug (pug) [Of doubtful origin.] *n. clay prepared for making bricks or earthenware* (विटा किंवा भांडीं करण्याकरितां केलेला) मातीचा रांधा *m*, गारा *m*. P. *v. t. to grind moistened clay* गारा मळणें, गाऱ्याची घाणी काढणें. २ *to cover* (walls, &c.) *with mortar* (कमावलेल्या) चुन्याचा गिलावा करणें. P. mill *n.* चुन्याची घाणी *f*.

Pugh (pōō) [Imitative.] *interj.* फु, थत्त.

**Pugilism** (pū'-jil-izm) [L. *pugil*, a boxer.] *n. boxing* मुष्टियुद्ध *n*, मुष्टिप्रहारयुद्ध *n*, ठोंसाठोंशी *f*.

**Pu'gilist** *n. a boxer* धंदेवाला मुष्टियुद्ध खेळणारा *m*, मुष्टियोद्धा *m*, ठोंसाठोंशीवाला *m*. २ (*fig.*) *vigorous controversialist* निकराचें वाग्युद्ध चालविणारा, वादयोद्धा *m*.

**Pugnacious** (pug-nā'shus) [L. *pugnax*, *pugnacis*, fond of fighting.] *a. fond of fighting, quarrelsome* भांडरा, भांडगा, भांडखोर. Pugna'ciously *adv.* भांडखोरपणानें, भांडरेपणानें.

**Pugnac'ity** भांडखोरपणा *m*, भांडरेपणा *m*, भांडखोर स्वभाव *m*.

**Puisne** (pū'ni) [O. F. –L. *post*, after, and *natus*, born.] *a.* (of a judge) *of lower rank, junior* खालच्या प्रतीचा, दुय्यम. २ (*law.*) *later, subsequent* (to) मागाहूनचा, नंतरचा; as, "P. mortgagees."

**Pu'issance** *n. might, power* पराक्रम *m*, बल *n*, बलाढ्यता *f*, विक्रम *m*.

**Puissant** (pū'is-ant *or* pū-is'ant) [L. *posse*, to be able.] *a. having great power or influence, mighty* पराक्रमी, बलवान्, बलाढ्य, वजनदार, प्रतापी, प्रतापशाली.

**Puke** (pūk) [A form of spew.] *v. i. to spew, to vomit* वांति होणें.

**Pulcharima** *n.* (*astron.*) भूतपराशींतील तिसरी तारा.

**Pule** (pūl) [Imitative] *v i. to cry* (like a whining child) टेंटें करणें, गेंगें - रेंरें -केंकें करणें. २ *to chirp* (like a chicken) किलबिलणें. Puling *a. whining* टेंटें -केंकें करणारा. २ *childish* पोरकट. ३ *trivial* क्षुल्लक, किरकोळ. P. *n.* केंकें *n*, टेंटें *n*.

**Pull** (pool) [A. S. pullian; Low Ger. *pulen*, to pluck.] *v. t. to draw or drag with force* ओढणें, खेंचणें, ताणणें, ओढून -खेंचून घेणें -धरणें. [To P. AND HAUL घुसळणें, खुंदळणें, ओढाओढ *f* -ओढाओढी *f*-ओढाताण *f* -ताणाताण *f* -खेंचाखेंच *f*- &c. करणें *g. of o.* To P. SUDDENLY AND SMARTLY हिसकणें, हिसडणें, हिसका *m* -हिसडा *m* -झटका *m* -झटकारा *m*. देणें.] २ *to pluck, to gather* तोडणें, काढणें, खुडणें, तोडणी *f* -तोडा *m*. करणें *g. of o.* ३ (of a jockey) *to check a race horse, so that it cannot win* आवरणें, दाबणें. ४ *to move* (a boat) *by pulling an oar* वल्हवणें, वल्हवून नेणें. P. *v. i. to give a pull, to draw* ओढणें, खेंचणें, ताणणें, &c.; as, "To P. at a rope." To P. ABOUT, *to pull from side to side, to treat roughly* ओढाताण करणें. To P. DOWN (घर वगैरे) पाडणें. २ *to lower in health, spirits, &c.* अशक्त -निरुत्साह -नाउमेद करणें. ३ (किंमत) कमी करणें, घटवणें. To P. OFF (prize, contest, &c.) जिंकणें, मिळवणें. To P. OUT वल्हवून पुढें जाणें -नेणें. २ (of a train) स्टेशनमधून पुढें जाणें -निघणें. To P. THROUGH (संकटांतून -दुखण्यांतून) निभावणें, पार पाडणें, पार पडणें.

To P. ONESELF TOGETHER (स्वतःचें) चित्त ठिकाणावर आणणें, (सर्व) सामर्थ्य एकवटणें. To P. TOGETHER, *to work in harmony* एकदिलानें वागणें, एकजुटीनें काम करणें. To P. UP (गाडी, घोडा वगैरे) थांबवणें, थोपवणें. २ (शर्यतींत) पुढें होणें -सरकणें. ३ (स्वतःला) आवरणें. ४ कोर्टापुढें खेंचणें. To P. IN ONE'S HORNS शिंगें मोडणें, (*fig.*) अभिमान -ताठा *m.* कमी करणें. २ *to withdraw a statement* (केलेलें) विधान परत घेणें. To P. TO PIECES तुकडेतुकडे -चिंधड्या करणें. २ (*fig.*) चिंधड्या उडविणें. To P. THE LONG BOW, *to tell unlikely stories* (esp. of one's prowess) लांब लांब गप्पा ठोकणें -छाटणें, वढाया *f. pl.* मारणें.] P. *n. the act of pulling* ओढणें *n*, खेंचणें *n*, ताणणें *n*, ओढ *f*, ताण *m.* [AT A P. एका हिसक्यासरशीं, एका ओढीनें. A LONG P., A STRONG P., AND A P. ALTOGETHER भलेरी *f* (with *v.* लावणें or घालणें), (सर्वांनीं मिळून) एकदम नेट करणें.] २ *strain, stress* ओढ *f*, ताण *m*, ओढण *f*, जोर *m*, नेट *m.* ३ (racing) घोड्याला दाबणें *n.* ४ *that which is pulled* (as the knob of a door-bell) ओढण्याचें बटण *n.* ६ (at a bottle) *a drink* (दारूचा) जोराचा घोंट *m*, डोस *m.* Pull'-back *n. a drawback, a disadvantage* दोष *m*, अवगुण *m.* २ *a retarding influence* विरुद्ध गोष्ट *f* -बाब. Pull'ed *pa. t.* P. *pa. p.* ओढलेला, खेंचलेला, ताणलेला. २ *reduced in health or spirit* अशक्त (झालेला), निरुत्साह (झालेला), उतरलेला, खंगलेला, थकलला.

Pull'er *v. n.* ओढणारा *m*, खेंचणारा *m*, ताणणारा *m.* २ चाकी *f*, चक्कर *n*, फिरकी *f.* ३ लगामाला झटके देणारा घोडा.

Pullet (pool'et) [Fr. *poulette* –L. *pullus*, a chicken.] *n. a young hen* तरणी कोंबडी *f.*

Pulley (pool'i) [Fr. *poulie.*] *n.* (*mech.*) कप्पी *f*, खोबणीचें चाक *n*, खोबणीचें चक्कर *n.* [LOOSE P. ढिली कप्पी *f.* FAST P. कायम (बसविलेली गति देणारी) कप्पी *f*, कायम चक्कर *n.* SWING P. (in docks) तरती कप्पी. FIRST SYSTEM OF PULLEYS कप्पीचा पहिला प्रकार *m*, कप्पीची पहिली रचना *f.* (System = प्रकार, रचना.)]

Pulmonary (pul'mon-ar-i) [L. *pulmonarius*–*pulmo, pulmonis*, a lung.] *a. relating to or affecting the lungs* फुप्फुसाचा, फुप्फुसविषयक, फुप्फुससंबंधीं, फुप्फुसांतील, फुप्फुसाशीं संबंध असणारी, [P. ARTERY, *see under Artery.* P. CONSUMPTION कफक्षय *m*, फुप्फुसें बिघडल्यामुळें होणारा क्षयरोग *m.* P. DISEASE फुप्फुसें बिघडल्यामुळें होणारा रोग *m*, फुप्फुसरोग. P. VEIN फुप्फुसशीर *f*, फुप्फुसशिरा *f.*]

Pulmonary embolism फुप्फुसांतील अशुद्ध रक्तवाहिनींत रक्ताचा गोळा अडकणें.

Pul'monate *a. affected with or subject to lung disease* फुप्फुसाचा रोग झालेला, (b) फुप्फुसरोगग्रस्त, फुप्फुसाचा रोग होण्यासारखा, फुप्फुसरोगानुकूल.

Pulmon'ic *a.* फुप्फुसाचा -संबंधी. P. *n. a medicine for lung disease* फुप्फुसरोगावर औषध *n*, फुप्फुसरोगघ्न *n*. २ *a person suffering from lung-disease* फुप्फुसाचा विकार झालेला *m*, फुप्फुसरोगग्रस्त.

Pulp ( pulp ) [Fr. –L *pulpa*, fleshy matter, pulp. ] *n. fleshy part of a fruit* गर *m*, गीर *m*, सगज *m*, दळ *n*, गर्भ *m*. २ *any fleshy or soft part of an animal body* मृदुमांस *n*, (शरीरांतील) मांसल भाग *m*, (उदाहरणार्थ) दांताच्या खालील मांसल भाग *m*. ३ ( कागदांकरितां चिंध्या वगैरे उकळून केलेला ) रांधा *m*. ४ ( अशुद्ध धातु कुटून केलेला ) लगदा *m*, गादा *m*. ५ ( *bot.* ) काफीच्या बोंडावरील टरफल.

Pulp *v. t. to reduce to pulp* रांधा *m* -गादा *m*. करणें, ( -चा ) गोळा *m*. करणें. २ *to remove pulp from* ( काफीच्या बोंडाचें ) टरफल काढणें. P. *v. i. to become pulpy* (-चा) गोळा होणें, मऊ ·बिलबिलित होणें.

Pul'per, Pul'pifier *n*. गादा *m* -रांधा करण्याचें यंत्र *n*.

Pul'pify *v. t.* गादा *m* -रांधा करणें, बिलबिलीत करणें.

Pul'piness, Pul'pousness *n*. मांसलता *f*, मासाळपणा *m*, गुबगुबितपणा *m*. २ मऊपणा *m*, गिलगिलीतपणा· ३ रांध्यासारखी स्थिति *f*· ४ गीरदारपणा *m*.

Pulpit ( pool'-pit ) [ Fr. –L. *pulpitum*, a platform. ] *n. a raised platform for a preacher* उपदेशपीठ, व्याख्यानपीठ *n*, पीठ *n*, उपदेशकासन *n*, ( among the Hindus ) व्यासपीठ *n*. २ *the profession of preaching* उपदेशकाचें काम *n*, उपदेशकाचा धंदा *m*. ३ *preachers* उपदेशकमंडळ *n*. ४ ( in title of a book ) *collected sermons* धर्मपर व्याख्यानें *n. pl.*, धर्मपरव्याख्यानांचा संग्रह *m*, धार्मिक व्याख्यानें *n. pl.* P. *a.* ( of oratory ) *delivered from a pulpit* उपदेशपीठावरील, उपदेशपीठावरून केलेलें (वक्तृत्व); as, ' P. eloquence."

Pulpiteer' *n.* ( *usu.* in a slighting sense ) *a preacher* धर्मोपदेशक, उपदेशक.

Pulp'ous, Pul'py *a. in the state of pulp* रांध्यासारखा, गाद्यासारखा. २ *soft* गिलगिलीत, बिलबिलीत, गलगलीत. ३ दळदार, गरभरू, गाभूळ; as, "*Pulpous* fruit; The *pulpy* covering of a nut." [ To BECOME PULPY AND SWEETISH गाभुळणें. ] ४ मांसल, मांसाळ, गबगबीत, गुबगुबीत, मासभरू.

Pulsate ( pul'sāt ) [ L. *pulsare*, to push, to beat. ] *v. i. to beat, to throb* उडणें, धडधडणें, चालणें, ठोका पडणें, आघात होणें, धडधड होणें. P. *v. t.* (मातींतून हिरे) चाळणें.

Pulsa'tion *n. the throbbing* ( of the heart, or of an artery ) हृदयाचें उडणें *n*, नाडीचें उडणें *n*, स्फुरण *n*, ठोका *m*, आघात *m*. २ ( of an engine &c. ) (इंजनाचा वगैरे) धासधुस आवाज *m*, धसधस *n*.

Pul'sative, Pulsatory *a.* (नाडीसारखा) उडणारा, स्फुरण पावणारा.

Pulse (puls) [Fr. *pouls* –L. *pulsus* -*pellere*, to drive.]

*n. the throbbing of the heart, or of an artery* (नाडीचें) उडणें *n*, गति *f*, ठोका *m*, स्फुरण *n*, (नाडीचा) आघात *m*, नाडी *f*. [To FEEL THE P. नाडी पहाणें, नाडीपरीक्षा करणें. २ (*fig.*) मन पहाणें, खडा टाकून पाहणें. To FIND ONE'S P. नाडी सांपडणें (*lit. and fig.*) *in. con. g. of o.* To SHOW ONE'S P. नाडी दाखवणें.] २ (*fig.*) *throb, thrill of life or emotion* स्पंदन *n*, स्फुरण *n*, आवेग *m*. ३ *rhythmical recurrence of strokes* सारखे ठोके *m. pl.*, ठराविक ठोके *m. pl.* ४ *single beat or vibration of sound, light &c.* स्पंद *m*, कंप *m*. P. *v. i.* (नाडी) उडणें. Pulse'less *a.* नाडी चालत नसलेला, नाडी सुटलेला, मृत. Pulse'lessness *n.* नाडी लागत नाहींशी होणें, नाडी सुटणें.

Pulse (puls) [L. *puls*, a porridge of flour.] *n.* डाळ *f*, कडदण *n*, कढण *n*, द्विदल.

Pulsimeter (pul-sim'-ē-tėr) [From Pulse and Meter.] *n.* नाडीची गति मोजण्याचें यंत्र *n*, नाडीगतिमापक.

Pul'verable, Pul'verisable *a.* भुगा करतां येण्यासारखा, चूर्ण करतां येण्यासारखा.

Pulverisa'tion *n.* भुगा *m* -चूर्ण *n.* करणें *n*, चूर्णीकरण *n*.

Pulverise (pul'vėr-īz) [Fr.–L. *pulvis, pulveris*, dust, powder.] *v. t. to reduce to powder or dust* भुगा *m* करणें, भुगटी *f* -चूर्ण *n.* करणें *g. of o.*, चुरणें, बारीक पूड करणें. २ (humorously) *to defeat completely* (in an encounter, argument, &c.) चीत करणें, पाडाव करणें, भुगा करणें, चिंधड्या करणें. P. *v. i. to become dust* भुगा *m* -चूर्ण *n.* होणें, चुराडा -भुकणी *f.* होणें.

Pul'verised *pa. t.* P. *pa. p.* चुरलेला, भुगा केलेला.

Pul'verous *a. composed of or like dust* भुगा झालेला, भुगा असलेला, भुग्याचा, भुग्यासारखा, चूर्णसदृश.

Pulve'rulent *a. dusty* (-वर) मळ जमलेला -असलेला, मलावृत. २ *powdery* चूर्णासारखा, चूर्ण झालेला, चूर्णसदृश, भुगा झालेला. ३ (of rocks) *of slight cohesion, apt to crumble* ठिसूळ.

Pulvillus (pul-vil'-lus) [L. *pulvillus*, a little cushion.] *n.* (*pl.* pulvilli) माशा व इतर किड्यांच्या पायाखालील मऊ भाग *m*, मृदुपादतल *m*.

Pulvis *n. med.* (औषधी) चूर्ण *n*, (औषधी) पूड.

Pumelo (pu-me-lō) [Of doubtful origin.] *n.* पपनस, पोपनीस *n*.

Pumice (pu'mis) [A. S. *pumic* (*-stan*), pumice (*stone*) –L. *pumex, pumicis*, for *spumex, spuma*, foam.] *n.* प्युमिस नांवाचा दगड. हा ज्वालाग्राही पर्वताच्या आसपास होतो. लांकूड, कांच, स्लेट, हस्तिदंत, संगमरवरी दगड, आणि धातूंचे पदार्थ यांस जिल्हई देण्यास, व कांतडीं गुळगुळीत करण्यास याचा उपयोग करतात.

Pump (pump) [Fr. *pompe*, –Ger. *pumpe*, from the sound of splashing in water.] *n. a machine for raising water or other fluids* (पाणी चढविण्याचा) बंब *m*, पंप *m*. [P. ROOM *n*. आरोग्यकारक झऱ्यावरील पाणी काढण्याची खोली *f*, पंपखोली.] २ (for exhausting air from a vessel) हवा काढून घेण्याचें यंत्र *n*, वाताकर्षक यंत्र *n*, पंप *m*. ३ (for inflating tires) (बायसिकलच्या धांवांत) हवा भरण्याचें यंत्र *n*, पंप *m*. ४ *pumping* हवा आंत भरणें *n*, पंप करणें *n*. ५ *attempt at pumping others* (दुसऱ्यांचे) गुप्त बेत (युक्तीनें) काढण्याचा प्रयत्न. ६ *a person skilful at pumping others* दुसऱ्यांचीं रहस्यें (खुबीनें) काढण्यांत कुशल. P. *v. t. to raise* (water, &c.) *by means of a pump* बंबानें-पंपानें (पाणी वगैरे) चढवणें -काढणें -सोडणें, (पाणी काढण्याकरितां) बंब चालवणें. २ *to make* (a ship, well, &c.) *dry by pumping* बंबानें (पाणी) काढून टाकणें, बंबानें (पाणी काढून -उपसून -घमत काढून) कोरडें करणें. ३ (with *up*) *to inflate* (बायसिकलच्या रबरी धावा वगैरे) पंपानें (हवा भरून) ताठ करणें, (-आंत पंपानें) हवा भरणें. ४ *to get information from (a person) by crafty questioning* (युक्तीनें -खुबीदार प्रश्न विचारून) गुप्त माहिती काढणें -मिळविणें.

Pumpkin (pump'kin), Pumpion (pump'yun) [Fr. –L.–Gr. *pepon*, ripe, and dim. termination–*kin*.] *n*. फळांची एक जाति *f*. या जातींत भोपळा, कोहळा, दुध्या, वगैरे फळें येतात. [DARK GREEN P. काळी भोपळी *f*, देवडांगर *m*; (its fruit). काळा भोपळा *m*, देवडांगर *m*. YOUNG P. घटा *m*.]

Pun (pun) [A. S. *punian*, to pound, a pun is a word wrought (as it were, *pounded*) into a new sense.] *n. a play upon words of similar sound* (as when one calls a crying child the *Prince of Wales*) श्लेष *m*, श्लेषोक्ति *f*, श्लेषालंकार *m*, कोटि. P. *v. i*. (शब्दांवर) श्लेष करणें. Pun'ned *pa. t*. P. *pa. p*. Pun'ner, Pun'ster *n*. श्लेष *m* -कोट्या करणारा.

Punch (punch) [A curtailed form of *puncheon*, a tool.] *n. a tool for making holes, or impressing dies* (तिकिटाला) भोंकें पाडण्याचें हत्यार *n*, टोंच्या *m*, टोंचणी *f*, पोगर *m*; (कापडावर वगैरे) छाप मारण्याचा (छाप उठविण्याचा) सांचा *m*, सांचा *m*, पंच (टाइप पाडण्याचा) *m*. २ *a blow* (*esp*. with the clenched fist) ठोंसा *m*, गुद्दा *m*, बुक्की *f*, कोंपरखळी *f* or खिळी *f*, कोंपरबुक्की *f*, कोंपरठोंसा *m*. P. *v. t. to pierce with a punch* (टोंच्यानें -टोचणीनें -पोगरानें &c.) भोंकें पाडणें. २ *to give a knock to* ठोंसा -गुद्दा -बुक्की मारणें, ठोंसणें, ढोंगसणें, कोंपरठोंसा मारणें. ३ (clothes in washing them) चुबकणें, पोंचारणें.

Punch (punch) [Hindi *punch*, Sk. पंच, five; from the number of ingredients. Originally an Indian drink of five ingredients.] *n*. दारू, लिंबाचा रस, साखर, दूध, ऊन्हपाणी वगैरे पांच पदार्थांच्या मिश्रणानें

तयार केलेलें अंमल आणणारें पेय *n*, पंच *n*. २ पंचाचा पेला *m*, पंच भरलेला पेला. ३ जींत पंच प्याला जातो अशी मेजवानी *f*, पंचाची पार्टी *f*.

Punch ( punch ) [From the root of Paunch. ] *n*. (बाहुलीभोरपांतील) मुख्य बाहुली *f*, मुख्य पात्र *n*, पंच. २ लंडन येथील एका सचित्र विनोदी पत्राचें नांव *n*, पंच.

Punch ( punch ) [From the root of Paunch.] *n*. आंखूड पायांचा व मोठ्या पोटाचा घोडा *m*. २ *a short and stout person* लठ्ठ व ठेंगू मनुष्य *m*, ढेरपोट्या *m*.

Puncheon ( punch'un ) [Fr. *poincon*, a bodkin, a cask ( marked of a certain capacity ).] *n*. *a cask* पिंप *n*. २. ८४ ते १२० ग्यालनांचें माप *n*. ३ *a tool for punching* भोंकें पाडण्याचें हत्यार *n*. ४ *an upright timber* उभा खांब ( धारणासारखा ).

Punchinello ( punch-i-nel'lō ) [It. *pulcinello.*] *n*. *a clown* ( इटालियन ) बाहुलीभोरपांतील मुख्य पात्र *n*, विदूषक *m*. २ *a short stout person* ठेंगू लठ्ठ मनुष्य *m*. Punchinelloes *n. pl.*

Puncta Lachrymalia *n. pl.* ( डोळयाच्या आंतील कोंपऱ्यांत असणारीं ) डोळयांत आसवें आणणारीं नलिकांचीं बारीक तोंडें *n. pl.*, अश्रुच्छिद्रें *n*.

Punctate ( punk'tāt ), Punctated ( punk'tāt'-ed ) [L. *punctum*, a point –*pungere*, *punctus*, to prick.] *a*. (*bot.*) भोंकें असलेला, छिद्रयुक्त.

Punctilio ( punk-til'yō ) [Spanish *puntillo*, a small point –L. *punctum*, a point.] *n*. *a minute matter of behaviour* शिष्टाचाराची बारीक बाब *f*, आदरोपचाराची बारीक गोष्ट *f*. २ *ceremoniousness* शिष्टाचाराच्या किरकोळ बाबींकडे लक्ष पुरविणें *n*, शिष्टाचाराच्या किरकोळ बाबींनाहि महत्व देणें *n*. Punctilios *n. pl.*

Punctilious ( punk-til'yus ) [L. *punctum*, point.] *a*. *very nice or exact in points of ceremony or behaviour* शिष्टाचाराच्या बारीकसारीक बाबींकडेहि लक्ष पुरविणारा, आदरोपचारनिष्ठ.

Punctil'iously *adv*. शिष्टाचाराच्या बारीकसारीक बाबींकडे लक्ष पुरवून, बारीकसारीक गोष्टींविषयीं आग्रह धरून.

Punctil'iousness *n*. शिष्टाचाराच्या किरकोळ बाबींकडे लक्ष *n*, शिष्टाचाराच्या बारीक बाबींसंबंधानें आग्रह *m*, सूक्ष्मोपचारनिष्ठा *f*, सूक्ष्मोपचारदृष्टि *f*.

Punctual ( punk'tū-al ) [ Fr. *ponctuel* –L. *punctum*, a point.] *a*. *exact as to time* वक्तशीर, ( काम वगैरे ) वेळेवर करणारा, समयरक्षक, वायदाराख्या. २ *in good time, not late* ( ठरल्या ) वेळेचा, उशीर न झालेला, वेळेवर -वेळेला ( केलेला ), वक्तशीर.

Punc'tualist *n*. वक्तशीर वागणारा.

Punctual'ity, Punct'ualness *n*. वक्तशीरपणा *m*, समयपालन *n*.

Punc'tually *adv*. वक्तशीरपणानें, ( ठरल्या ) वेळेवर, वेळेस -वेळेला, मुदतींत, वायद्याबरहुकूम.

**Punctuate** (punk'tū-āt) [Fr. -L. *punctum*, a point.] *v. t. to mark with points or stops* विरामचिन्हें देणें, विराम देणें, विरामचिन्हांकित करणें, अवसानाख्या खुणा घालणें -देणें, विराम देऊन तोडणें. २ (*fig.*) *to interrupt* (speech) *with exclamations*, &c. मधून मधून थांबवणें, थांबावयास लावणें. (मध्यें संमतिदर्शक टाळ्या वगैरे वाजवून). ३ *to emphasize, to accentuate* जोर देणें, जोरानें व्यक्त करणें; as, "Flung it on the ground to P. his refusal."

**Punctua'tion** *n.* विरामचिन्हें देणें *n*, अवसानाच्या खुणा देणें *n*, विरामचिन्हांकन.

**Puncture** (punk'tūr) [L. *punctura* -*pungere*, to prick.] *n. a prick* टोंचणें *n*, बोंचणें *n*, टोंचा *m*, टोंचणी *f*. २ *a small hole* छिद्र *n*, छेद *n*; (बायसिकलच्या रबरी धांवेला पडलेलें) भोंक *n*. ३ (*med.*) चोंचा *m*, भोंक *n*. P. *v. t. to prick with something sharp or pointed* (टोंच्यानें वगैरे) टोंचणें, बोंचणें. (b) (vaccination) (चाकूची) बारीक टोंची मारणें. २ *to make a small hole in* (टोंचून लहान) भोंक -छिद्र पाडणें -करणें. ३ (*med.*) चोंचे मारणें. P. *v. i. to experience a puncture* (बायसिकलच्या धांवेला) भोंक पडणें, छेद पडणें, बुराख पडणें.

**Pun'gency** *n.* तिखटपणा *m*, जहालपणा *m*, झणझणीतपणा *m*, चुरचुरीतपणा *m*.

**Pungent** (pun'junt) [L. *pungere*, to prick.] *a. pricking or acrid to taste or smell* तिखट, *intens.* सिखटझोंब, चरचरीत, जलाल, जालीम, झणझणीत, जळजळीत, भगभगीत, ठसठसीत, जहाल, प्रखर, झोंबणारा, लागणारा. २ (of language) *bitter, sarcastic* कडक, खरमरीत, तीव्र, तीक्ष्ण, लागणारा, झोंबणारा, कडू, उग्र, झणझणीत, जहाल.

**Pun'gently** *adv.* तिखटपणान, चुरचुरीतपणानें, &c.

**Punish** (pun'ish) [Fr. *punir* -L. *punire*, to punish.] *v. t. to chastise, to inflict penalty* (गुन्हेगाराला -गुन्ह्याबद्दल) शिक्षा *f*. करणें, शिक्षा देणें, दंड *m* -सजा *f*. करणें, पारिपत्य करणें, ताडणें, दंडणें, शासन करणें. २ *to cause* (offender) *to suffer for offence* गुन्ह्याबद्दल -अपराधाबद्दल (शिक्षा) भोगावयास लावणें -भोगवणें. **Pun'ishable** *a.* शिक्षेला पात्र, शिक्षा *f* -दंड *m* -शासन करण्यासारखा, शिक्षार्ह, दंडार्ह, दंड्य. **Pun'isher** *n.* दंड*m*-शिक्षा*f*-करणारा. **Pun'ishment** *n. the act*, शिक्षा *f* -दंड *m* -शासन *n* -पारिपत्य *n*. करणें -देणें *n*, शासन करणें *n*, (शिक्षा) भोगावयास लावणें *n*, (शिक्षा) भोगवणें *n*. २ *penalty* शिक्षा *f*, सजा *f*, दंड *m*, शासन *n*, पारिपत्य *n*. [CAPITAL P. देहांतशिक्षा *f*, फांशीची शिक्षा *f*. CONCURRENT P.s एकाच वेळीं अमलांत येणाऱ्या सजा *f. pl.* CORPORAL P. देहदंड *m*, शरीरदंड *m*, शरीरदंडन *n*, (*now restricted to flogging*) फटके मारणें *n*. GENERAL AND INDISCRIMINATE P. सकटसंक्रांत (*with v.* बसवणें). UNDESERVED P. नसता दंड *m*, नसती शिक्षा *f*.] Some of the Jail. Punishments

common in the Jails in India, are:—BAR FETTERS, दंडाबेडी. CROSS BAR FETTERS, आडादंडाबेडी. CHAIN FETTERS, सांकळबेडी. SEPARATE CONFINEMENT सेपरेट.' SOLITARY CONFINEMENT, अंधारी. FLOGGING, फटके मारणें. HAND-CUFFS, हातकडी. STANDING HAND-CUFFS खोडा.

Punishable, Punishment, See under Punish.

Punitive ( pūn'i-tiv ) [ L. *punire -pœna*, penalty. ] *a. inflicting punishment, retributive* शिक्षेचा, शिक्षा म्हणून ठेवलेला, दंड -पारिपत्य म्हणून लादलेला -नेमलेला, शिक्षात्मक, दंडरूप; as, "P. expedition" [ P. POLICE (शिक्षा म्हणून नेमलेलें) जादा पोलिस. ]

Pu'nitory *a. punishing* शिक्षा करणारा, शिक्षात्मक, पारिपत्याचा.

Punner, Punster, See under Pun.

Punt ( punt ) [ L. *ponto*, a boat. ] *n. a flat-bottomed boat* पडाव *m*, छबिना *m*. P. *v. t.* ताज मारून पडाव चालवणें, वल्हवणें, ताज मारणें.

Puny ( pū'ni ) [ Fr. –L. *post natus*, born after. Doublet of Puisne. ] *a. small and feeble* लहान, क्षुद्र, इवलासा, ऱ्हस्व. Pu'niness *n.* लहानपणा *m*, क्षुद्रपणा *m*. Pun'ier *comp.*; Pun'iest *superl.*

Pup ( pup ) [ Short for Puppy. ] *n. young dog* कुतरीचें पिलूं *n*, कुत्र्याचें पोर *n*. [ IN P. गाभण (कुत्री).] P. *v. t. to bring forth pups* (पिलें) विणें, पिलें घालणें.

Puparium ( pu-pār'i-um ) *n.* कीटकाचा रूपांतरावस्थेंतील कोष *m*, रूपांतरकोष *m*.

Pupil ( pū'-pil ) [ Fr. –L. *pupilla*, *dim.* of *pupus*, a boy. ] *n. learner* शिष्य *m*, विद्यार्थी *m*, शाळेंत जाणारा मुलगा *m*. [ P. TEACHER शिष्यगुरु.] २ ( *law* ) अज्ञान *m*, वयांत न आलेला *m*, अप्राप्तव्यवहार *m*. ३ ( of the eye ) डोळ्याची तारा *f*, बाहुली *f*, अक्षितारा *f*, कनीनिका *f*. Pu'pilage *n.* विद्यार्थिपणा *m*, शिष्यावस्था *f*, शिष्यदशा *f*, शिष्यत्व *n*, विद्यार्थीदशा *f*. २ अज्ञानदशा *f*, पाल्यस्थिति *f*, ताबेदारी *f*.

Pupilage, See under Pupil.

Pu'pillary, Pu'pilary *a. pertaining to a pupil or ward* शिष्याचा, विद्यार्थ्याचा, विद्यार्थ्यासंबंधीं, पाल्यविषयक. २ ( डोळ्याच्या ) बाहुलीचा, अक्षिताराविषयक, कनीनिकेचा.

Puppet (pup'et) [ O. Fr. *poupette*, dim. from L. *pupa*, a doll. ] *n. a small doll or image* बाहुली *f*, मूर्ति *f*, पुतळी *f*, बाहुलें *n*, कळसूत्राची बाहुली *f*, पुत्रिका *f*. [ STRING OF A P. कळसूत्र *n*. ] २ *a person completely controlled by another* (दुसऱ्याच्या हातांतील) बाहुलें (fig.) *n*, कळसूत्री बाहुलें *n*. [ MERE P. टिक्याचा धनी. ]

Puppet-man, P. player *n.* बाहुलेभोरपी *m*, बाहुलेभोरीप करणारा *m*.

Puppet-show *n.* बाहुलेभोरीप *n*, कळसूत्राचा खेळ *m*, पडदेभोरीप *n*.

Puppis *n.* ( *astron.* ) पार्श्व (तारा ).

Puppy ( pup'i ) [Fr.–L. *pupa*, a girl, a doll.] *n.* a *young dog* कुत्र्याचें पिलूं *n.* २ *a conceited youth* आळ्यताखोर मूर्ख तरुण मनुष्य *m*, अभिमानी तरुण *m*.

Pup'pyhood *n.* अल्लडपणा *m*, मूर्खासारखी आळ्यता *f.*

Pup'pyism *n. foolish conceit* वृथाभिमान *m*, पोकळ ऐट *f.*

Purblind ( pur'-blīnd ) [For pure-blind, *i. e.* wholly blind; the meaning has been modified, prob. through some confusion with the verb to pore.] *a. nearly blind, dim-sighted* अर्धवट आंधळा, डोळ्याचा अधू-मंद, जवळ जवळ आंधळा, साफ न दिसणारा; as, " P. race of men." २ (*fig.*) *dull, unintelligent* मंद, मठ्ठ, मंदबुद्धीचा, मठ्ठ डोक्याचा.

Purchase ( pur'chās ) [ Fr. *pourchasser*, to seek eagerly–L. *pro*, for, *chasser*, to chase.] *v. t. to buy* विकत घेणें, विकत आणणें, खरेदी करणें -घेणें, (जमीन वगैरे ) फरोक्त घेणें, खरेदी करणें *g. of o.* २ *to obtain by any outlay* ( as of labour, danger, or sacrifice ) (परिश्रमानें) साध्य करणें, मिळवणें, संपादन करणें; as, "To P. favour with flattery." P. *n. the act of buying* खरेदी करणें *n*, विकत घेणें *n*, फरोक्त घेणें *n*, खरेदी *f*, क्रय *m*. २ *the thing purchased* खरेदी *f*, सौदा *m*, क्रीत वस्तु *f*. ३ ( *law* ) खरेदी *f*, फरोक्त. ४ *a mechanical advantage* नेटावा *m*, जोर *m*; as, "A politician, to do great things, looks for a power, what our workmen call a *purchase*." Pur'chased *pa. t.* P. *pa. p.* विकत घेतलेला, खरेदी केलेला, खरीद, क्रीत, &c. Pur'chasing *pr. p.*

Pur'chaser *n.* विकत घेणारा, *m*, खरेदी करणारा, खरीददार, गिऱ्हाईक, क्रयी, क्रेता.

Purdah (pur'-da) [Per. *parda*, a curtain.] *n.* पडदा *m*.

Pure ( pūr ) [Fr. *pur*, –L. *purus*, –L. *pū* to make clean.] *a. clean, unsoiled* शुद्ध, स्वच्छ, साफ, निवळ, न बिघडलेला. २ *unmixed, not adulterated* शुद्ध, निर्भेळ, चोख, साफ, कोरें (दूध ). ३ *free from guilt or defilement* शुद्ध, पवित्र, पावन, पूत, पाक, सोंवळा, शुचि, शुचिष्मंत, न बाटवलेला. ४ *free from moral guilt, innocent* शुद्ध, साफ, दिलपाक, प्रांजळ, चोख, निष्कलंक, निष्पाप, सात्विक, साधु, अलिप्त, शुचिर्भूत; as, "Keep thyself P." [P. IN HEART शुद्ध अंतःकरणाचा.] ५ (of speech ) शुद्ध, निर्दोष, अपशब्दरहित, अपप्रयोगरहित. ६ (*gram.*) शुद्ध ( व्यंजन किंवा स्वर ). ७ (of descent) शुद्धरक्ताचा, शुद्ध. ८ ( *math.*) शुद्ध.

Pure'ly *adv.* शुद्ध, निखालस, निवळ, एकजात.

Pure'ness, Pur'ity } *n. cleanliness* शुद्धता *f*, शुद्धि *f*, स्वच्छपणा, स्वच्छता. २ निर्मळपणा *m*, निर्भेळपणा *m*, शुद्धपणा *m*. ३ *freedom from guilt or defilement* पवित्रपणा *m*, शुचिता *f*, निर्मलता *f*, पावनता *f*, सोंवळेपणा *m*, शुचिर्भूतपणा *m*. ४ शुद्धता *f*, प्रांजळपणा *m*, चोखी *f*, सात्विकपणा *m*, साधुता *f*, साधुत्व *n*. ५ पातिव्रत्य *n*.

Purfle ( pėr'fl ) [O. F. *purfle* –L. *pro*, before, and *filum*, a thread.] *v. t. to ornament with a border* किनारी *f*, लावणें, कांठ लावणें. P. *n. an embroidered border* नकशी -कशिदा काढलेली किनार *f*, किनारी *f*, कांठ *m*.

Purgation, See under Purge.

Purgative *a.* ( कोठा ) स्वच्छ करणारा P. *n.* रेचक *m*, जुलाब *m*, जुलाबाचें औषध *n*.

Purgatory ( pėr'ga-tor-i ) [See Purge.] *n. a region in which the souls of the dead are cleansed from sin* भैरवयातनास्थान *n*, नरक (according to Hindus). See the word Hell.

Purge ( pėrj) [Fr.–L. *purus*, pure, & *agere*, to make.] *v. t. to make pure* शुद्ध करणें, स्वच्छ करणें, साफ करणें, घाण काढणें, धुवून टाकणें. २ *to evacuate, as the bowels* ( कोठा ) शुद्ध करणें, रेचक देणें, जुलाब देणें -घेणें, रेचन देणें, पोट *n* -कोठा *m*. साफ करणें, मलशुद्धि करणें. ३ *to clear from guilt* ( प्रायश्चित्तानें वगैरे ) शुद्ध करणें, ( अपराधापासून ) निर्दोष ठरवणें, दोषमुक्त करणें; as, "To P. one of guilt." ४ *to clarify* शुद्ध करणें, तावूनसुलाखून (बाहेर) काढणें, निर्मळ करणें. P. *v. i. to become pure* शुद्ध होणें -बनणें. P. *n.* जुलाब *m*, ढाळ *m*, रेच *m*. २ *a cathartic* रेचक *n*, जुलाबाचें औषध *n*, विरेचन *n*. Purga'tion *n.* धुणें *n*, साफ करणें *n*. २ (*law*) दोषमुक्त करणें *n*. Pur'ged *pa. t.* & *pa. p.* Pur'ger *n. a cathartic medicine* जुलाब *m*, जुलाबाचें औषध *n*. Pur'ging *pr. p.* साफ करणारा, घाण काढणारा, धुवून टाकणारा, मलशुद्धि करणारा, मलशुद्धिकारक. P. *n.* साफ करणें *n*. २ अतिरेच होणें *n*. ३ हगवण *f*.

Purger, Purging, See under Purge.

Purifica'tion *n. act of cleansing* शुद्ध करणें, निर्मळ करणें *n*, शोधन *n*, मलापकर्षण *n*. २ शुद्धि *f*, शुद्धता *f*. ३ (*fig.*) *freedom from guilt or defilement* शुद्ध करणें *n*, पवित्र करणें *n*, प्रायश्चित्त देणें *n*, शुद्धि *f*, पवित्रता *f*, सोंवळेंपणा *m*.

Purifica'tory *a.* शुद्ध करणारा, निर्मळ करणारा, शुद्धिकर्ता, मलापकर्षक. २ (*fig.*) शुद्ध करणारा, सोंवळा करणारा, पवित्र करणारा, पावन (a.), पावक, प्रायश्चित्ताचा, प्रायश्चित्तात्मक. [P. RITES प्रायश्चित्तें *n. pl.*]

Pur'ified *pa. t.* P. *pa. p.* शुद्ध केलेला, निर्मळ केलेला, शुद्ध, विशुद्ध. २ पवित्र केलेला, पवित्रीकृत, पावित, पूत, शुचिर्भूत, सोंवळा केलेला, प्रायश्चित्त दिलेला.

Purify ( pū'ri-fī ) [ Fr. *purifier*–L. *purifico*–*purus*, pure, and *facere*, to make.] *v. t. to make pure from noxious materials* शुद्ध करणें, निर्मळ -स्वच्छ -साफ करणें, मळ *m* -मळी *f*. काढणें, शुद्धि *f* -शोधन *n*. करणें; as, "To P. liquors." २ (*fig.*) *to free from guilt or defilement* शुद्ध करणें, पवित्र -शुद्ध -सोंवळा करणें, प्रायश्चित देणें, शुद्धता *f* -पवित्रता *f*. आणणें, शुद्धि *f* -विशुद्धि *f*. करणें; as, "To P. the heart." ३

*to free from improprieties, (as language)* (भाषा) शुद्ध करणें, (भाषेंतील) अशुद्धपणा काढणें. P. *v. i. to become pure* शुद्ध होणें, साफ होणें -बनणें.

**Pur'ism** *n.* शुद्धिवाद *m.* २ भाषाशुद्धिवाद *m.*

**Purist** (pūr'ist) *n.* शुद्धिवादी *m.* २ भाषाशुद्धिवादी *m*, व्याकरणाचे नियम कडकडीत रीतीनें पाळणारा *m.*

**Puritan** (pūr'i-tan) [From Pure.] *n.* (सतराव्या शतकांत इंग्लिश चर्चपासून अलग झालेला व) धर्माचारांत अत्यंत शुद्धता इच्छिणारा ख्रिस्तधर्मी, पवित्र-धर्माचारवादी, प्युरिटन. २ (थट्टेनें) कर्मठ *m.*

**Puritan'ic, Puritan'ical** *a.* प्युरिटन लोकांचा, प्युरिटन पंथाचा. २ *strict* (धर्माचाराचे बाबतींत) कडकडीत, कडक. ३ कर्मठ.

**Pur'itanism** *n.* प्युरिटनलोकांचा पंथ, प्युरिटनांचीं मतें *n.pl.*

**Purl** (purl) [Ger. *perlen*, to bubble.] *v. i. to ripple* झुळझुळ वाहाणें, खळखळणें, खळखळ *f* -झुळझुळ करणें. P. *n.* खळखळ *f*, खळाळी *f.*

**Purl** (pėrl) [Contraction of *purfle* -Fr. *pourfiler* -*pour* (L. *pro*), and *filer*, to twist threads, from *fil*, a thread.] *v. t. to fringe with lace* किनार *f.* लावणें, कांठ *m.* लावणें.

**Purl'er, Purl'ing** *n.* झुळझुळ वाहणारा झरा *m.*

**Purlieu** (pėr'lū) [O. F. *pouralee*, a perambulation.] *n.* (usually in the *pl.*) *a surrounding part of any place* सीमा *f*, शींव *f*, शेव *m*, पालव *m*, लगता *m.*

**Purloin** (pėr-loin') [Lit. 'to carry away to a long distance; M. E. *purlongen*–O. F. *purloignier*- L. *prolongo.* ] *v. t. to steal* चोरणें, चोरी करणें, चोरून घेणें. २ *to plagiarise* (दुसऱ्यांच्या पुस्तकांतील) मजकूर चोरून घेणें. Purloin'ed *pa. t.* and *pa. p.*

**Purloin'er** *n.* चोर, हाताळ, उचल्या. २ काव्यचोर *m.*

**Purple** (pur'pl) [L. *purpura* –Gr. *porphura*, a shell-fish from which a purple dye was obtained.] *n. a very dark red colour* जांबळा रंग, जांभळा, सांवळा, सांवळा बैंगणी, अंजिरी, नीललोहित. २ *a purple robe worn by the royalty* (राजघराण्यांतील मंडळीचा) जांभळा झगा *m.* ३ *a robe of honour* मानाचा जांबळा झगा. P. *a.* जांबळा, जांभळा, सांवळा, बैंगणी, नीललोहित. २ *imperial, regal* राजघराण्यांतील मंडळीचा. ३ *bloody* तांबडा, रक्तासारखा, लाल. P. *v. t. to dye purple* जांभळा -जांबळा रंग देणें. २ *to clothe with purple* जांभळा झगा घालणें, जांभळा पोषाख करणें. [THE P. *the rank of an emperor* बादशहाचा दर्जा *m.* THE P. EAST, *the Turkish Empire* तुर्की राष्ट्र *n.* P. PATCH (in literature), *a passage of special beauty, either of thought or wording* भाषासौंदर्याचा वेंचा *m*, शब्दालंकाराचा वेंचा *m*, विचारसौंदर्याचा वेंचा *m*, अर्थालंकाराचा वेंचा *m.* BORN IN THE P., *of imperial birth* राजकुलोत्पन्न.]

**Purport** (pur'port) [Lit. that which is carried or conveyed'; O. F. *pur*–L. *pro*, for, and *portare*, to

carry.] *n. design, meaning, import* तात्पर्य *n*, सारांश *m*, हांशील *n*, हेतु *m*, भाव *m*, खुलासा *m*, अभिप्राय *m*, गोषवारा *m*. P. *v. t. to mean, to import* मथितार्थ असणें, आशय असणें, (आशयावरून) दिसणें, उद्देश असणें, हेतु असणें. Pur'ported *pa. t.* and *pa. p.*

Purpose (pur'pus) [O. F. *purposer* –Fr. *propos* -L. *ponere*, to place.] *n. intention, design, aim* उद्देश *m*, आशय *m*, मतलब *m*, बुद्धि *f*, मानस *m*, संकल्प *m*, अर्थ *m*, निमित्त *n*, इंगित *n*. [FIRM *or* FIXED P. पक्का निश्चय, दृढसंकल्प. OF UNFAILING P. सत्यसंकल्प. ON P., *expressly* मुद्दाम, मुजरत *or* द. SECRET P. गुप्त हेतु *m*. TO NO P. वृथा, व्यर्थ. TO NO GOOD P. नदेवाय नधर्माय. TO WHAT P. कशासाठीं, कशास.] P. *v. t. to intend* उद्देशणें, उद्देश धरणें, संकल्पणें, उद्देश करणें -धरणें. P. *v. i. to have an intention* उद्देश असणें, हेतु धरणें, हेतु असणें.

Pur'posed *pa. t.* P. *pa. p.* उद्दिष्ट, संकल्पित, उद्देशलेला.

Pur'posedly *adv.* मुद्दाम, जाणूनबुजून, मुजरत.

Pur'posely *adv.* जाणून, जाणूनबुजून, मुद्दाम.

Pur'pura *n.* (*med.*) एक प्रकारचा रक्तदोष *m*.

Purr, Pur (pur) [From the sound.] *v. i. to utter a murmuring sound, as a cat* म्यांऊ म्यांऊ करणें, गुरगुरणें, घुरघुर करणें. Purred *pa. t.* & *pa. p.*

Purse (purs) [O. F. *borse* (Fr. *bourse*) –Low L. *bursa* -Gr. *byrsa*, a skin, a hide.] *n. a small bag of money* पिशवी *f*, थैली *f*, कसा *m*. २ *a sum of money* रकम *f*, ठोकळ रकम *f*, नगद रकम *f*. ३ *treasury, finances* खजिना *m*, तिजोरी *f*; as, "The public *purse*." [CLOSE P., *reserved sum* बांधली गांठ *f*. DRAW P. पुरवठा -टा. LIGHTNESS OF P. दामदुकळ, नाण्याची टंचाई *f*. LONG P. विपुल द्रव्य *n*, श्रीमंती, रगड पैसा *m*, पैसा *m*. TO PAY OUT OF ONE'S OWN P. स्वतःच्या खिशांतून देणें, पदरचा देणें.] P. *v. t. to put into a purse* पिशवींत टाकणें, थैलींत घालणें, गजव्यांत टाकणें. २ *to contract* (as the mouth of a purse) आवळणें, चिमटणें, चिमटून टाकणें.

Purse-bearer (of a King) *n.* पोतनीस, पोतदार.

Purse-proud *a.* धनमत्त, धनगर्वित, मालमस्त.

Purser (purs'ėr) [See Purse.] *n.* जहाजावरील दाणागोटा,कपडालत्ता, इत्यादिकांसंबंधीं हिशोब ठेवणारा, पोतनीस *m*, पर्सर. २ (*colloq.*) *any paymaster, cashier* पगार करणारा, पगार देणारा, पगारवाला, नगदी कारकून *m*. [P.'S NAME, *a false name* खोटें नांव *n*.]

Purslane, Purslain (purs'lān) [It. *porcellana*, from L. *portulaca*, purslane.] *n.* (*bot.*) घोळ *f*, राजघोळ *f*, रानघोळ *f*.

Pursuance, See under Pursue.

Pursu'ant *a. following, agreeable* अनुरूप, अनुसारी, बमूजीब.

Pursue (pur-sū') [O. F. *porsuir* (Fr. *poursuivre*) -L. *prosequor-pro*, onwards, and *sequor*, to follow.] *v. t. to follow with a view to overtake, to chase* पाठलाग *m.* करणें, पाठीमागें लागणें, पाठीमागून जाणें, पिच्छा *f.* धरणें; as, "To P. a hare." २ *to seek, to adopt measures to obtain* शोधणें, शोधांत असणें, शोध करणें, मिळण्याची -प्राप्त होण्याची खटपट करणें; as, "To P. a remedy at law." ३ *to prosecute, to continue* पुढें चालवणें, सुरू ठेवणें; as, "Insatiate to P. vain war." ४ *to imitate* अनुकरण करणें, कित्ता घेणें. ५ *to persecute* छळ करणें, द्वेष करणें -धरणें, वैर धरणें -करणें. P. *v. i. to go in pursuit, to follow* पाठलाग करणें, पाठ घेणें, पाठीमागें लागणें, पाठीमागून जाणें, प्रयत्न करणें, उद्योग *m* -यत्न करणें, अनुसंधानांत असणें. २ (*law*) *to follow a matter judicially* (as a complaining party) न्यायाची कांस धरणें, न्याय-कोर्टांत ओढणें -खेंचणें, फिर्याद करणें. Pursu'ance *n.* पाठलाग *m*, लाग *m*, संधान *n*, अनुसंधान *n*, पिच्छा *f*, अनुरोध, अनुसार. [In P. of, *in accordance with* (च्या) प्रमाणें, (च्या) अनुरोधानें, (च्या) म्हणण्याप्रमाणें.]

Pursu'er *n.* पाठलाग करणारा *m*, पाठीमागें लागणारा *m*, पिच्छा पुरवणारा.

Pursuit' *n.* पाठलाग करणें, पिच्छा पुरवणें. २ पाठलाग. [To desist from the P. of पाठ *f.* सोडणें *g. of o.*, पिच्छा सोडणें. To send in P. of दुमाल्यावर पाठवणें, पाठलागावर पाठविणें.] ३ उद्योग *m*, प्रयत्न *m*, यत्न *m*. ४ व्यासंग *m*.

Pursuivant (pur'swi-vant) [Fr. *poursuivant.*] *n.* *a state-messenger* चोबदार *m*, हुजऱ्या *m*.

Pursy (pėrs'i) [O. F. *poulsif* (*poulser*), to breathe with labour.] *a. short-winded, puffy* (लवकर) दम लागणारा. २ *corpulent* लठ्ठ, जाडा, स्थूल, स्थूलदेही.

Pur'tenance, Short for Appurtenance, *q. v.*

Pu'rulence, Pu'rulency *n.* बरबरीतपणा *m*, पूयमयता *f.*

Purulent (pū'roo-lent) [L. *purulentus- pus, puris*, bad matter.] *a.* (*med.*) *consisting of pus* पुवाचा, पूयरूप, पूयमय, पूयस्रावी, बरबरीत. Pu'rulently *adv.*

Purvey (pėr-vā') [O. F. *porvoir* (Fr. *pourvoir*) -L. *provideo.* See Provide.] *v. t. to provide with conveniences* (शिधासामुग्रीची) सोय *f.* लावणें, दाणागोटा पुरविणें, तरतूद करणें. २ *to procure, to get* मिळवणें, संपादन करणें, पैदा करणें, साध्य करणें; as, "I mean to P. me a wife after the fashion of the children of Benjamin." P. *v. i. to buy provisions, to provide* शिधासामुग्री (विकत) घेणें, अन्नवस्त्राची तरतूद करणें, साहित्य *n* -सामुग्री घेणें -भरणें, बेगमी करणें.

Purvey'ance *n. the act of purveying, providing* दाणागोटा पुरवणें *n*, सोय लावणें *n*, बेगमी *f.* करणें *n.* २ *foresight, preparation* दूरदर्शिपणा *m*, तयारी *f*, तरतूद *f*, व्यवस्था *f.* ३ *the royal prerogative of pre-emption* (now abolished) (इंग्लंडांतील राजे

लोकांचा) (मालकाच्या संमतीशिवाय त्याला त्याच्या मालाची) वाटेल ती किंमत देण्याचा हक्क *m.*

Purvey'or *n. a victualler* सामान पुरविणारा, बेगमी पुरविणारा, धान्य पुरविणारा *m.* २ (मोठ्या प्रमाणावर पक्वान्नें वगैरे) भोजनाचे पदार्थ पुरविणारा. ३ *a procurer* भडवा *m.*

Pus (pus) [L. *pus, puris*, matter.] *n. putrid matter* पू *m*, पूय *m.* [RUNNING WITH P. पूयस्रावी. TO FILL WITH P. पुवळणें, पुवळणास येणें, उमाळ्यास येणें.]

Push (poosh) [Fr. *pousser* -L. *pulso*, I beat.] *v. t. to thrust* ढकलणें, रेंटणें, सारणें, सरकवणें, सरवणें, घुसवणें, घुसडणें. २ घुश्शी *f.* देणें, हुंदाडा *m* -धक्का देणें, ३ (रेंटून) बाहेर टाकणें; as, Plants P. out new roots. ४ (one's way) (घुसून) पुढें ढकलणें, (रस्ता) घुसून काढणें, रिघाव *m* -रीघ *f*, करणें. ५ (काम -धंदा अडचणींतून पुढें) ढकलणें, सारणें. P. *v. i. to move or drive on by pressure* पुढें जाणें, रगडून -रेंटून -रेंटीत जाणें. [TO PUSH ABOUT रेंटारेंट *f* -रेंटाई *f* -धकाधकी *f*. सारासार *m.* करणें. TO P. AND POMMEL धकाबुकी *f* -धकीबुकी *f.* करणें. TO P. ASIDE खेंटणें, खेंचणें. TO P. WITH THE HORNS OR HEAD हुंदाडणें *or* हुंदडणें.] २ (with *against*) घुश्शी मारणें, हुंदाडा *m*, मारणें. ३ बाहेर येणें. P. *n. act of pushing* ढकलणें *n*, सारणें *n*, रेंटणें *n*, सरकवणें *n.* २ धक्का *m*, धक्की *f*, धका *m*, रेंटा *m*, तडाका *m*, टोला *m*, हुंदाडा *m.* ३ *vigorous effort* जोराचा प्रयत्न *m*, परिश्रम *m*, यत्न *m*, श्रम *m*, अटोकाट प्रयत्न *m.* ४ *advancement* (in life) पुढें पाऊल *n*, पुढची गति *f.* ५ *pressure of affairs, crisis* आणीबाणीची वेळ *f*, आणीबाणीचा प्रसंग *m.* ६ *enterprise* साहस *n*, उलाढाल *f*, खटपट *f*, उद्यम *m*, उद्योग *m.* ७ (*elec.*) *a switch for closing a current* (विजेचा प्रवाह बंद करण्याचा) दांडा *m.* To be pushed for, *to be embarrassed* (*for want of time, money, etc.*) गोंधळणें, गडबडणें, गोंधळ होणें -उडणें *g. of s.* To come to the *push, to arrive at the critical moment* (-वर) आणीबाणीचा प्रसंग *m* -वेळ *f.* येणें. To push on, *to hasten* (*a work*) पुढें नेणें -चेपणें, जोरानें हांकलणें. २ *to advance* (*esp. in spite of opposition, difficulties, &c.*) पुढें सरणें, संकटांतून पार जाणें, अडचणीला -संकटाला तोंड देणें, माघार न खाणें. To push one's way in the world, *to make progress* (*in one's business, career*) (कामधंद्यांत किंवा व्यवहारांत) पाऊल पुढें टाकणें, मार्ग काढणें -रेंटणें.

Push-button *n.* (*elec.*) (विजेचा प्रवाह सुरू करणारा किंवा थांबवणारा) पुशबटण *m.*

Push'ful, Push'ing *a. enterprising* खटपटी, साहसी, उलाढाली करणारा, उद्योगी, उत्साही, उद्यमी. २ *forward, intrusive* पुढें घुसणारा, रेंट्या, धीट.

Pusillanimous (pū-sil-an'i-mus) [L. *pusillanimis*- *pusillus*, very little, and *animus*, the mind.] *a.*

*cowardly, weak-spirited* भितरा, नामर्द, हीनशौर्य, हीनधैर्य, हीनपराक्रम; as, "A. P. prince." २ *mean-spirited* क्षुद्रदृष्टि, हलक्या मनाचा, कोत्या बुद्धीचा, हलकट.

Pusillan'imously *adv.* नामर्दपणानें. २ क्षुद्रपणानें.

Pusillan'imousness, Pusillanim'ity *n.* भितरेपणा *m,* नामर्दपणा *m.* २ क्षुद्रदृष्टि *f.*

Puss (poos) [Dut. *poes,* puss.] *n. familiar name for a cat* (मांजराचें प्रचारांतील नांव,) पुस. २ (in sporting) *hare* ससा *m,* शशक *m.*

Pussy (poos'i) *n.* मांजर *n.*

Pus'tular, Pus'tulous *a.* फोड झालेला, पुटकुळ्या असलेला, फोड उठलेला. [PUSTULAR ERUPTION स्फोटविकार *m,* फोड येणें.]

Pus'tulate *v. t.* पुटकुळया येणें, फोड येणें.

Pustule (pus'tūl) [Fr. *pustule-* L. *pustula-pus,* matter.] *n. a pimple* (पुवानें भरलेली) पुळी *f,* पुटकुळी *f,* फोड *m,* पूयपीटिका *f.*

Put (poot) [A. S. *potian,* to push or thrust.] *v. t. to place* ठेवणें, स्थापणें. २ *to lay* मांडणें; as, "To P. the matter clearly before some one." ३ *to add* घालणें; as, "Put milk to your tea." ४ (*specif.* articles of dress with *on*) (पागोटें, टोपी, &c.) घालणें, (खोळ, टापशी, &c.) बांधणें, (शेला, &c.) घेणें, (आंगरखा, बंडी, &c.) घालणें, चढवणें, (धोतर, लुगडें, &c.) नेसणें, (पायमोजे &c.) घालणें, चढवणें, (बांगड्या, &c.) भरणें, (उपणें, &c.) टाकणें. [FIT TO BE PUT ON नेसाऊ.] ५ *to thrust* (शस्त्र, वगैरे) घालणें, खुपसणें, भोंसकणें; as, "To P. a knife into." ६ *to send* (अस्त्र, वगैरे) फेंकणें, फेंकून देणें; as, "To P. a missile; To P. a stone." ७ (with *through*) (आरपार) मारणें; as, "To P. a bullet through." ८ *to apply* लावणें, जोडणें, बांधणें; as, "To P. a horse to the cart." ९ *to mark, to write* लिहिणें, करणें; as, "P. a tick against his name." १० (*naut.*) हाकारणें. ११ (a question, &c. *to*) विचारणें, पुसणें, करणें, घालणें. [To P. ABOUT (*naut.*) हेरें *n.* घेणें, उलट फिरवणें. २ *to trouble* त्रास देणें, सतावणें, सतावून सोडणें. To P. AN END TO, To P. A STOP TO, *to check, to hinder* थांबवणें, बंद करणें. To P. AN END TO ONE'S LIFE जीव देणें. To P. A SPOKE IN ONE'S WHEEL (चालत्या) गाड्याला खीळ घालणें. To P. BACK (*naut.*) (जहाज) मागें फिरविणें, परत फिरवणें, वळवणें. २ *to restore* (पहिल्या ठिकाणीं) परत ठेवणें. ३ *to reduce* (*to lower rank*) खालच्या जागेवर नेमणें, मागें टाकणें, खालीं ढकलणें. ४ माघार घेणें -खाणें. ५ (घड्याळाचे कांटे) मागें फिरवणें. To P. BY (पैसे) मागें टाकणें, जमवणें, संग्रह करणें. To P. DOWN, *to suppress* (बंड, वगैरे) मोडणें, दाबणें, दाबून टाकणें, (-चा) मोड करणें, दडपणें. २ (*a name*) लिहिणें, लिहून घेणें, टिपणें, टिपून घेणें. To P. FORTH (foliage, &c.) फुटणें. २ *to propose* पुढें मांडणें, सुचवणें. ३ *to*

*publish* (छापून) प्रसिद्ध करणें. ४ *to exert* कामीं लावणें; कामास आणणें. To P. IN, *to insert* घालणें, जोडणें. २ *to harness* (*a horse*) (गाडीला) जोडणें, जुंपणें. ३ *to enter* (a port) (बंदरांत) घालणें. ४ *to intervene with* (*a remark*) (मध्यें) बोलणें, तोंड घालणें, दखल देणें. ५ *to perform* (*a certain amount of work*) करणें. To P. IN FEAR भिवविणें, भय दाखवणें, भय घालणें. To P. IN FOR, *to apply for* (*a vacancy &c.*) अर्ज करणें. To. P. ONE IN MIND OF (-ची) आठवण *f* -स्मरण देणें -करणें. To P. IN PRACTICE प्रचारांत -व्यवहारांत- अंमलांत आणणें. To. P. IN PRISON तुरुंगांत घालणें, तुरुंगांत टाकणें. To P. IN WRITING (-चा) लेख करणें, लिहून ठेवणें, पांढऱ्यावर काळें करणें. To P. it on फाजील किंमत आकारणें -लावणें. २ *to pretend* (चें) सोंग *n* -बहाणा *m.* करणें. To P. INTO लिहिणें, भाषांतर करणें. २ व्यक्त करणें. To P. OFF, *to postpone* लांबणीवर टाकणें. २ *to evade* झुलविणें, टाळणें, टोलवणें. ३ *to start* (on a voyage) हाकारणें, हकारणें. To P. OFF DECEITFULLY AND REPEATEDLY झुलावाझुलव *f* -झुलवाझुलवी करणें -लावणें -मांडणें. To P. ON (AIRS) (ऐट -आढ्यता) मिरवणें -दाखवणें. २ *to pretend* (-चा) बहाणा करणें. ३ *to attribute* (*blame*) (-वर) लादणें, टाकणें, (माथीं) मारणें. ४ *to develop* (flesh) (अंग) धरणें, धरूं लागणें. ५ *to increase* (a price) वाढवणें, चढवणें. To P. ONE ON ONE'S GUARD सावध करणें, हुषार करणें. To P. ON THE STAGE रंगभूमीवर आणणें. To P. ONE'S HAND TO THE PLOUGH (अवघड काम) सुरू करणें, शिरावर घेणें. To P. ONE'S SHOULDER TO THE WHEEL स्वतःचा खांद लावणें, स्वतः आंग मोडणें. To P. OUT, *to annoy* सतावणें, त्रासवणें, चिडवणें, खिजवणें, भंडावणें. २ (in cricket) बाद करणें, आउट करणें. ३ *to upset or confuse* गोंधळवणें, गोंधळवून टाकणें. ४ *to go out to sea* सफरीवर निघणें. ५ *to invest money* (पैसे व्याजीं) लावणें, गुंतवणें. ६ *to dislocate* (*a bone*) (हाड) उतरवणें. ७ *to extinguish* (दिवे) मालवणें, घालवणें, विझवणें. To P. OUT OF TEMPER चिडवणें. To P. THE HAND TO घेणें, धरणें, पकडणें. २ *to engage in* (*any affair*) (-ला) हात घालणें, (कामांत) पडणें -शिरणें. To P. TO DEATH जिवें मारणें, ठार मारणें. To P. TO BED झोंपवणें, निजवणें, झोंपीं घालणें. To P. TO SALE, To P. ON THE MARKET विक्रीकरितां मांडणें, बाजारांत मांडणें. To P. TO SHAME लाज वाटावयास लावणें, लाजवणें. To P. TO SCHOOL शाळेंत घालणें, शिकावयास घालणें. To P. TO THE SWORD जिवें मारणें, ठार मारणें, कत्तल करणें. To P. TO THE VOTE मतें घेण्याकरितां पुढें मांडणें, मतें घेणें. To P. TO USE (-चा) उपयोग करणें. To P. THIS AND THAT (*or* TWO AND TWO) TOGETHER (दोन्ही गोष्टींचा) एकत्र विचार करणें. To P. THROUGH (A BUSINESS) (-चा) निकाल लावणें. २ (in a telephone office) (-शीं) जोडून देणें. To P. UP (a monument, &c.) उभारणें, उभा करणें. २ *to raise* (*a price*) चढवणें, वाढवणें. ३ *to offer* (one-

self ) *for election* उभें रहाणें, पुढें येणें. ४ *to provide lodging for (a man or a horse)* (-ची) रहाण्याची किंवा उतरण्याची सोय करणें. (*b*) ( -ला ) बांधण्याची सोय करणें. ५ *to take lodging ( at an inn )* उतरणें. ६ *to pack up (in a bag, parcels, &c.)* भरणें, ठेवणें, घालणें. ७ (in cricket ) *to score ( runs )* करणें. To P. TO IT, *to press hard* भाग पाडणें. To P. TO RIGHTS सुधारणें, बरोबर -दुरुस्त करणें. To P. TO SEA ( जहाज ) हाकारणें. २ जलप्रवासास निघणें. To P. TO TRIAL, To P. ON TRIAL कसोटीला लावणें, कसाला लावणें, परीक्षा पहाणें. To P. UP TO, *to make aware of* ( -ला ) कळविणें, माहिती देणें, जागा करणें. २ *to urge ( to some action )* प्रवृत्त करणें, भर देणें, उत्तेजन देणें. To P. UP WITH, *to endure* सहन करणें, सोसणें. To P. UPON ( -ला ) फसवणें, ( -च्या ) चांगुलपणाचा फायदा घेणें.] Put. *pa. t.* and *pa. p.* Putting *pr. p.*

Putative ( pū'ta-tiv ) [ Fr. *putative*-L. *putativus*-*puto*, *putatus*, to suppose. ] *a. supposed, reputed* मानींव, मानलेला, लोकसमजुतीचा, लौकिक समजुतीचा; as; "The P. father of a child."

Putrefac'tion *n.* कुजणें *n*, सडणें *n*, नासणें, *n*, बिघडणें *n*, कोथ *m*, कुजण्याची स्थिति *f*, कोथीभवन *n*.

Putrefac'tive *a.* कुजवणारा, पूतिकारक. २ नासणारा, सडका.

Putrefac'tiveness *n.* कुजकेपणा *m.* २ सडवण्याचा धर्म *m*, पूतिकारकता *f*.

Putrefy (pū'tre-fī) [L. *putridus*, rotten, and *facere*, to make.] *v. t. to cause to decay, or to be decomposed* कुजवणें, सडवणें, नासवणें, कुजेसा -सडेसा करणें. २ *to corrupt, to make foul* बिघडाविणें, नासून टाकणें, खराब करणें. P. *v. i. to rot, to decay* कुजणें, सडणें, नासणें. Pu'trefied *pa. t.* and *pa. p.* Pu'trefying *pr. p.*

Putrescent (pū-tres'ent) [L. *putrescens*, rotting.] *a.* नासणारा, नासका, सडका, कुजका, कुजत असलेला.

Putrid ( pū'trid ) [Fr. *putride* –L. *putridus*, *putris*, rotten, Sk. पूय्, to stink. ] *a. stinking, rotten* सडलेला, कुजलेला, दुर्गंध, अकया पडलेला, दुर्गंधियुक्त, नासका, सडका, कुजका. Putrid'ity, Pu'tridness *n.* कुजकेपणा *m*, सडकेपणा *m*, नासकेपणा *m*.

Pu'trilage *n.* प्रेत सडण्याची स्थिति *f*. २ प्राण्याचा सडणारा भाग *m*. ३ (सडणाऱ्या भागांतून निघणारी) घाण *f*.

Putty ( put'i ) [ Fr. *potee*, powdered tin, putty. ] *n.* (*chem.* ) *an oxide of tin, or of lead and tin, used in polishing glass* कथील जाळून केलेली पूड *f*, पटी, हिचा कांच स्वच्छ करण्याकडे उपयोग करितात. २ *a cement of whiting and linseed oil used in glazing windows* लांबी *f*, पटी *f*, लुकण *n*. P. *v. t.* लांबी लावणें, लांबी भरणें, लुकण लावणें. Put'tied *pa. t.* and *pa. p.*

Puzzle ( puz'l ) [ M. E. *opposaile*, an objection or question put by an examiner -Fr. *opposer*, See Oppose. ] *n. perplexity, enigma* कोडें *n*, कूट *n*, गूढ

*n.* २ *bewilderment, problem* घोंटाळा *m*, गोंधळ *m*, पंचाईत *f*, विवंचना *f*, विचार *m*, घोळ *m*, भ्रम *m*. [ P. HEADED *or* P. PATED (person) डोक्यांत गोंधळ उडालेला, मेंदू बिघडलेला, भ्रमिष्ठ, भ्रांतिष्ठ, वेडा.] P. *v. t. to perplex, to confuse* घोंटाळवणें, गोंधळवणें, घोंटाळ्यांत घालणें, घोंटाळ्यांत पाडणें, विवंचनेंत पाडणें, कांहीं सुचेनासें करणें, पेंचांत पाडणें, निरुत्तर करणें, कुंठित करणें, तोंड बंद करणें, गुरफटवणें, गडबडावणें. २ *to entangle, to make intricate* घोंटाळा *m.* करणें, गुरफटागुरफट करणें; as, "They disentangle from the *puzzled* skein." ३ ( with *out* ) *to solve a riddle* कोडें उकलणें, कोडें सोडवणें, कूट प्रश्न सोडवणें; as, "To *puzzle* out a mystery." P. *v. i. to be perplexed* गोंधळणें, बावरणें, गोंधळून जाणें, गोंधळ उडणें, घोंटाळा होणें.

Puz'zler *n.* गोंधळ -घोंटाळा -घोळ घालणारा, घोंटाळ्या *m*.

Pyæmia ( pī-ē'-mi-a ) [ Gr. *puon*, pus, and *aima*, blood. ] *n.* ( *med.* ) *blood-poisoning marked by formation of pus-foci* सपूयरक्तविकार *m*, पूतिज्वर *m*.

Pyebald (pī'bawld) [ Lit. 'streaked like the magpie', from Pie ( a magpie ) and Welsh *bal*, a streak on a horse's forehead.] *a. of various colours* अबलख, नानारंगी, विचित्ररंगी.

Pyelitis ( pī ē-lī'tis ) *n.* ( *med.* ) मूत्रपिंडाचे पोकळ भागास सूज येणें, वृक्कविवरदाह *m*.

Pygme'an *a.* ठेंगणा, बुटका.

Pygmy (pig'-mi ) [ Fr. –L. –Gr. *pugme*, a measure of length ( the distance from the elbow to the knuckles, or about 13½ inches. ] *n. a very small person, a dwarf* ठेंगू *m*, खुजा मनुष्य *m*, बुटबैंगण *m*, वामनमूर्ति *f*, ऱ्हस्वमूर्ति *m*.

Pylephlebī'tis *n.* ( *med.* ) यकृतांत शिरणाऱ्या मोठ्या अशुद्ध रक्तवाहिनीचा दाह *m*, यकृत्‌शिरादाह *m*.

Pylo'rus ( pī-lō'rus ) [ Lit. 'gate-keeper', L. –Gr. *puloros -pule*, an entrance, and *ouros*, a guardian.] *n.* ( *anat.* ) *the lower opening of the stomach leading to the intestines* जठराचें खालचें द्वार *n*, आंत्राकडील जठराचें द्वार *n*, जठराधोद्वार *n*. Pyloric *a.* जठराधोद्वारासंबंधीं, आंत्राकडील जठराच्या द्वारासंबंधीं.

Pyōnephrosis *n.* ( *med.* ) मूत्रपिंडाचा पूयजनक दाह *m*, पूयजनकवृक्कदाह *m*, वृक्कपूयदाह *m*.

Pyō-pneumōthō'rax *n.* (*med.*) छातींत फुप्फुसाचे बाहेर पू व हवा सांचणें, उरःपूतिवात *m*.

Pyōsalpinx *n.* ( *med.* ) *n.* गर्भाशयांत गर्भ नेणाऱ्या नळयांची पू भरल्यापासून होणारी वृद्धि *f*.

Pyramid (pir'a mid) [ L. –Gr. *pyramis, pyramidos*, a pyramid.] *n.* ( खालीं रुंद असून वर अरुंद होत गेलेला ) सूच्यग्रस्तंभ *m*, सूची *f*. (सूची = Pyramid ; शंकु = Cone ). २ ( *pl.* ) ( मिसर देशांतील ) मनोरे *m. pl.* Pyram'idal, Pyramid'ic,-al *a.* सूचीचा, सूच्याकार. २ मनोऱ्यांचा, मनोऱ्यासारखा.

Pyre ( pīr ) [L. –Gr. *pura*, fire.] *n.* *a funeral pile* सरण *n*, चिता *f*.

Pyretic ( pī-re-'tik ) [Gr. *pura -pūr*, fire.] *a. pertaining to fever* तापासंबंधीं, ज्वरविषयक. P. *n.* तापावर औषध *n*, ज्वरघ्न *n*.

Pyrexia } (pī-reks'-i-a ) ( pīr'-eks-i ) [ Gr. *pura*
Pyrexy } *-pūr*, fire. ] *n.* ज्वर वाढण्याची स्थिति *f*. २ सुजेमुळें किंवा अन्य रोगामुळें येणारा ताप *m*.

Pyrheliometer ( pir-hē li-om'ē-tėr ) [ Gr. *pur*, fire, *helios*, the sun, and meter. ] *n.* ( *Phys.* ) *an instrument for measuring the direct heating effect of the sun* सूर्यकिरणतापमापक *n*, सूर्यतापमापक *n*.

Pyrites ( pī-rī'-tēz ) [ L. –Gr. *pura -pūr*, fire. ] *n.* ( *min.* ) *a sulphide of iron* लोखंड व गंधक यांचा संयोग होऊन बनलेला खनिज पदार्थ *m*, सुवर्णमुखी *f*, सुवर्णमाक्षिक *n*, विटमाक्षिक *n*. [ COPPER P. तांबें, लोखंड व गंधक यांच्या संयोगानें बनलेला खनिजपदार्थ *m*. IRON P., SAME AS PYRITES. ]

Pyro-elec'tric *a.* उष्णतेनें विद्युज्जागृत होणारा.

Pyro-elec'tricity (pīrō-ēlektris'i-ti) [ Pyro + electricity.] *n.* ( *phys.* ) *the property of becoming electrically polar when heated* उष्णतेनें विद्युज्जागृत होण्याचा धर्म *m*, उष्णताविद्युत् *f*.

Pyrometer (pī-rom'ē-tėr) [Gr. *pur*, fire, and meter.] *n.* ( *Phys.* ) *an instrument for measuring high*

*temperatures* अग्निमापक *n.* (साध्या उष्णमापकानें न मोजतां येणारें असें अतिशय उष्णमान मोजण्याचें यंत्र *n.*) [ ELECTRIC P. विद्युदग्निमापक *n.* ]

Pyrosis ( pī-rō'-sis ) *n.* ( *med.* ) उराशीं जळजळ होऊन व मळमळून तोंडाला पाणी सुटणें *n*, अम्लक *n*, अम्लोद्गार ( Ayurved ) *m.*

Pyrotech'nic,-al *a.* दारूकामासंबंधीं.

Pyrotechnics ( pī-rō-tek'-niks ) [ Gr. *pura*, fire, and *technikos*, artistic -*techne*, art. ] *n. the art of making fireworks* दारूकाम -दारूसामान बनविण्याची कला *f*, अग्निक्रीडाविद्या *f*, आतषबाजी *f*.

Pyrotech'nist *n.* दारूकाम तयार करणारा.

Pyr'otechny *n.* Same as Pyrotechnics.

Pyū'ria *n.* ( *med.* ) पूतिमिश्रित लघ्वी होणें, पूमूत्र *n*, मूत्रपूति, पूयमेह ( coined ).

Pyx ( piks ) [ L. *pyxis*, a box -Gr. *puxis*, the box -tree, box-wood -*pak*, to bind.] *n.* (*R. C. Church*) *the box or case in which the host is kept* पवित्र भाकरी ठेवण्याचें सोन्याचें किंवा रुप्याचें पात्र *n*, पिक्स *n*. २ ( *minting* ) *the box containing sample coins* ( टांकसाळेंतील ) नमुन्याच्या नाण्यांची पेटी *f*. [ TRIAL OF THE P. ( टांकसाळेंतील ) नाणीं ( बाजारांत आणण्यापूर्वीं तीं उत्तम प्रकारें ) तपासून पाहणें.] P. *v. t.* (मूळनमुन्यांशीं लावून ) नाण्यांचा कस व वजन तपासून पाहाणें.

Quoin (koin) [See *coin.*] *n.* (*arch.*) *a wedge used to support and steady a stone* खिटी *f*, पाचर *f*, *n*, कोंपऱ्याचा (वडींव) दगड *m.* Q. *v. t. to secure with a quoin* (पाचर मारून) घट्ट बसविणें.

Quoit (koit) [Ety. dub.] *n. a heavy, flat, metal ring for throwing at a fixed point on the ground* बांगडी *f.* २ (*pl.*) *the game played with such rings* बांगडीचा खेळ *m.*

Quondam (kwon'-dam) [L. *quondam*, formerly.] *a. former* पहिला, पूर्वीचा.

Quorum (kwō'rum) [L. *quorum*, of whom.] *n.* (काम चालविण्यापुरती) कमींतकमी संख्या *f*, कामचलाऊ संख्या *f*, अवरसंख्या *f*, कोरम. Quo'rums *n. pl.*

Quota (kwō'ta) [L. *quotus*, of what number? – *quot*, how many?] *n. the part or share assigned to each* वांटा *m*, वांटणी *f*, वर्गणी *f*, हिस्सा *m.* Quo'tas *n. pl.*

Quota'tion *n. the act of quoting* अवतरण घेणें *n*, उतारा घेणें *n.* २ *the passage quoted* अवतरण *n*, अवतरणवाक्य *n*, उतारा *m.* [Q. MARK अवतरणचिन्ह *n.*] ३ (*pl.*) *the current price* बाजारभाव *m*, सुचविलेली किंमत *f*, चालू भाव *m*, चालू दर *m.* ४ (*printing*) बृहत्पूरक.

Quote (kwōt) [Fr.–L. *quot*, how many?] *v. t. to repeat the words of another* (दुसऱ्याच्या वाक्याचा किंवा लेखाचा) शब्दशः उतारा *m.* घेणें, अवतरण *n.* घेणें, (दुसऱ्याचें)वाक्य *n* -लेख *m.* घेणें. २ *to mention as an authority* (प्रमाण म्हणून) उतारा देणें, (आधार म्हणून) उतारा देणें. ३ *to enclose within quotation marks* अवतरणचिन्हांत देणें, अवतरणचिन्ह *n.* घालणें. ४ *to name the current price of* बाजारभाव सांगणें -देणें.

*N. B.*—We use the term *Cite* when the mind dwells primarily upon the matter imported; *Quote*, when we think of the precise words. To cite Shakespeare as an authority does not imply so exact a reproduction of his words as the term *Quote*, for we may cite roughly, but we are bound to quote exactly.

Quoth (kwōth) [A. S. *cwethan*, *pa. t. cwæth*, to say.] *v. t. say, says, said* म्हणतो, म्हणाला, बोलला. Quoth याचा उपयोग प्रथम व तृतीय पुरुषीं वर्तमान व भूतकाळींच करितात. याचा कर्ता नेहमीं क्रियापदानंतर येतो.

Quoth'a *interj. indeed* खरोखर, निःसंशय, खरें कीं काय!

Quotidian (kwō-tid'i-an) [Fr-L. *quotidianus*, daily.] *a.* रोजच्या पाळीचा, रोजचा, दररोजचा, प्रतिदिवशीं येणारा (ताप), दैनिक. २ *commonplace, trivial* दररोज घडणारा, दररोज होणारा, नेहेमीं घडणारा, सामान्य. Q. *n. a kind of ague that returns daily* दररोज येणारा हिंवताप *m*, दैनिक हिंवताप *m.*

Quotient (kwō'-shent) [Fr. –L. *quoties*, how often, how many times.] *n.* (*math.*) भागाकार *m*, भाग *m*, लब्धि *f*, फल *n.*

R (är) हें इंग्रजी लिपीचें अठरावें अक्षर आहे, व तें व्यंजन आहे. त्याचीं अनेक वचनें Rs, R's अशीं लिहितात. उत्पत्तीचा इतिहासः इजिप्शन चित्रलिपींतील मूळच्या ○ या अक्षरापासून फिनिशन लिपींतील 𐤓 हें अक्षर निघालें; व या फिनिशन अक्षरापासून वेस्टर्न ग्रीक मधील P ᑫ ᑭ हीं अक्षरें बनलीं; व या ग्रीक अक्षरांपासून ल्याटिन भाषेंतील R व या ल्याटिन अक्षरापासून इंग्रजींतील R असा या R अक्षराच्या उत्पत्तीचा इतिहास इंग्रजी वर्णविदांनीं दिला आहे.

उच्चारः ग्रीक भाषेंतून इंग्रजी भाषेंत आलेल्या शब्दांत ग्रीक R च्या ठिकाणीं इंग्रजींत rh असा आदेश होतो; परंतु, या h अक्षरामुळें इंग्रजी शब्दांच्या उच्चारांत कांहींच फरक होत नाहीं; जसें, Rhetoric. इंग्रजींतील R चा उच्चार मराठींतील र् या व्यंजनानें होतो. R च्या पुढें व्यंजन आल्यास R बहुतेक अनुच्चारित असतो.

संक्षेपः R = railway. R. S. O. = railway sub-office. R. = Reaumur. R. = regina. R. T. S. = religious tract society. R. S. V. P. (Fr. repondez s'il vous plait) = answer if you please; please reply. R. V. = revised version. R. = rex. R. C. = Roman Catholic. R. A. = royal artillery; royal academy. R. E. = royal engineer. R. S. P. C. A. = royal society for prevention of cruelty to animals. Rev. = revelation. Rev. = reverend. Rom. = Romans. Rs. = rupees. Rx. = tens of rupees.

Rabbet (rab'et) [Fr. *raboter*, to plane.] *n. a groove cut in the edge of a plank* खोबण *f*, खांच *f*. R. *v. t.* खोबण *f*. पाडणें, खांच *f*. पाडणें. २ *to join or fix with a rabbet* खोबण *f*- खांच *f*. पाडून सांधणें -बसवणें. Rab'beted *pa. t.* and *pa. p.* Rab'betting *pr. p.*

Rabbi (rab'i *or* rab'ī), Rabbin (rab'in) [Heb. *rabbi*, my master, *-rabh* master, and *i*, my.] *n.* यहुदी धर्मशास्त्र शिकविणारा गुरु *m*, राबी *m*. Rabbin'ical *a.* राबीचा. २ राबींच्या भाषेचा. ३ राबींच्या मताचा. Rab'bis (rab'iz) *n. pl.*

Rabbit (rab'it) [O. E. *rabet*, a rabbit.] *n.* ससा *m*, शशक *m*. R. *v. i.* सशांची शिकार करणें.

*N. B.*—Speaking with scientific accuracy, Hare is our Indian ससा, while Rabbit seems to be a European variety of the same species as Hare.

Rabble (rab'l) [Fr. *rable*–L. *rutabulum*, a fire-shovel.] *n.* (धातूचा रस ढवळण्याकरितां गजासारखी) ढाणी *f*, राबल *f*. R. *v. i.* ढाणीनें ढवळणें.

Rabble (rab'l) [Dutch *rabbelen*, to chatter.] *n. a disorderly noisy crowd, a mob* बाजारबुणगे लोक *m. pl.*, बाजारबुणगें *n*, कतवार *n*, अडाणी

लोक *m. pl.*, कनिष्ठ दर्जाचे लोक *m. pl.* २ *noisy, confused talking* गलबला *m*, गलबल *f*, गलबा *m*, आरडाओरड *f.* The Rabble, *the disorderly part of the people* बाजारबुणगे लोक *m. pl.*, अडाणी लोक *m. pl.*

Rabid (rab'id) [L. *rabidus,-rabere*, to rave.] *a. furious, violent* खवळलेला, भयंकर, विकोपास गेलेला, प्रक्षुब्ध, संतप्त, अतितीव्र. २ *unreasoning, headstrong* माथेफिरू, हिरवट; as, "A R. democrat." ३ (*esp. of dogs*) *mad* पिसाळलेला, पिसा, वेडा. ४ *of rabies* (कुत्र्याच्या) पिसाळ्याचा, पिसाळलेल्या कुत्र्याचा, जलसंत्रासाचा; as, "R. virus." ५ कडक, जहाल, माथेफिरूपणाचा, विषारी; as, "R. writing."

Rab'idity, Rab'idness *n.* खवळलेलेपणा *m*, माथेफिरूपणा *m.* २ पिसाटपणा *m*, पिसें *n.*

Rab'idly *adv.* पिसाळून, पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें. २ माथेफिरूपणानें. ३ कडकपणानें, जहालपणानें.

Rabies (rā'-bi-ēz *or* rab'-i-ēz) *n. hydrophobia* पिसाळें *n*, (पिसाळलेला) कुत्रा (मनुष्यास) चावणें *n*, श्वानदंश *m*, जलसंत्रासरोग *m.*

Race (rās) [A. S. *ræs*, rush, running.] *n. onward sweep or movement* (पुढची) धांव *f*, दौड *f*, पुढें पाऊल *n*, पुढें जाणें *n*, (पुढची) ओढ *f.* २ *a strong current in a sea or river* जोराची ओढ *f*, जोरगत *f*, प्रवाहाचा जोर *m*; as, "Tide set with a strong R." (b) *the channel or passage for such a current* (प्रवाहाच्या) झोताचा मार्ग *m.* ३ *the course of the sun or the moon* मार्ग *m*, कक्षा *f.* ४ *course of life* संसारयात्रा *f*, जीवितयात्रा *f*, संसाराची शर्यत *f*, आयुष्यक्रम *m.* ५ *the canal in which a stream of water flows* (पाणचक्कीचें चाक फिरविणारा) पाट *m.* ६ (*mach.*) *the channel along which a shuttle moves* धोटा धांवण्याची पट्टी *f.* ७ *a contest of speed* (in riding, driving, skating, rowing) शर्यत *f*, सरत *f*, दौड *f*, दवड *f.* ८ (*fig.*) शर्यत (*fig.*); as, "There are many *races* to be run, many palms to be won." ९ (*pl.*) घोड्यांच्या शर्यती *f. pl.* Race-ball *n.* शर्यतीचा नाच *m.* R. card *n.* शर्यतींच्या तारखांचें कार्ड *n*, शर्यतींचें कार्ड *n*, रेसकड *n* (Corrup. of Race-card). R. course, R. ground, R. track *n.* (घोड्यांच्या) शर्यतींचें मैदान *n*, घोडदौड *f.* R. horse *n.* शर्यतीचा घोडा *m.* R. meeting *n. horse-racing fixture* शर्यतीचा (ठराविक) दिवस *m.*

Race *v. t. to cause to contend in a race* शर्यतींत पाठविणें, शर्यतींत घालणें, सरत लावणें. २ *to drive at high speed* जोरानें हांकणें, जोरानें दवडवणें; as, "To R. horses." ३ *to run a race* (-शीं) शर्यत लावणें, शर्यत खेळणें. ४ *to make one move at full*

*speed* जोरानें धांववणें, दौडवणें, पळवणें; as, "*Raced* me along at five miles an hour." ५ *to fling* (fortune) *away on horse-racing* घोड्यांच्या शर्यतींत (पैसा) उधळणें, शर्यतींचा जुगार खेळणें. R. *v. i. to compete in speed with* (-च्या बरोबर) शर्यत लावणें, (-शीं) शर्यत खेळणें. २ *to indulge in horse-racing* (घोड्यांच्या) शर्यतींचा नाद *m*- शोक *m*. असणें with ला *of s.*; as, "A *racing* man." [THE RACING WORLD टर्फ-क्लब.] ३ *to go at full speed* (अतिशय) जोरानें धांवणें, जोरानें पळणें, दौडणें, दौड *f*. मारणें, धांव मारणें. ४ (of paddle-wheel) *to work violently from diminished resistance when out of the water* (पंख्याचें पाण्याच्या बाहेर) धाडधाड फिरणें. ५ *to try to surpass in speed* (धांवण्यांत) चढाओढ करणें, शर्यत लावणें, (-शीं) सरत *f*. लावणें.

Race (rās) [Fr.–It. *razza*; ety. dub.] *n. lineage* वंश *m*, वंशपरंपरा *f*. २ *family* कुळ *n*. ३ *a tribe or nation regarded as of common stock* जाति *f*, जात *f*. ४ *a distinct ethnical stock* गोत्र *n*, मानववंश *m*, वर्ग *m*; as, "The Caucasian or Mongolian R." ५ *a breed* (*of plants or animals*) जाति *f*, जात *f*, बीज *n*, विल्हा *m*, अवलाद *f*. ६ *any great division of living creatures* (प्राण्यांचा) वंश *m*, वर्ग *m*; as, "The human, feathered, four-footed, finny, etc. R." ७ *a class of persons with some common feature* वर्ग *m*, जाति *f*, परंपरा *f*; as, "The R. of poets."

Race (rās) [O. F. *rais*–L. *radix*, a root.] *n. root* (*of ginger*) कांडी *f*, कुडें *n*, फडा *m*, *f*, फणा *m*.

Raceme (ra-sēm') [L. *racemus*, a bunch of grapes.] *n.* (*bot.*) न्यासीम *f*, बंधनवती मंजरी *f*, (अनियमित मंजरीभेद). मुख्य देंठ (डहाळी) लांबट असून त्याच्यावर देंठासहित फुलें मांडलेलीं असावीं व तीं खालून वर उमलत जावीं असें या पुष्पविन्यासाचें किंवा पुष्पप्रसवाचें लक्षण आहे; उ० संकासूर, मोहरी, मुळा.

Racemose *a.* (*bot.*) संकासुरी मंजऱ्या असलेला, न्यासीमसारखा. २ (*anat.*) संकासुरी मंजरीसारखा.

Racer (rāsėr) *n. one who races* शर्यत लावणारा -मारणारा *m*. २ *a race-horse* शर्यतीचा घोडा *m*. ३ शर्यतीची बायसिकल, शर्यतीची नाव, &c.

Rachis (rā'kis) [Gr. *rhakhis*, spine.] *n.* (*bot.*) *stem of grasses, etc. bearing flower-stalks at short intervals* (फुलांचा) मुख्य वंश *m*, पुष्पवंश *m*, प्रणाल *m*, उ० वेलबोंडी, मोहरी, आंबा वगैरे. २ (*bot.*) *an axis of pinnately compound leaf* (पिच्छवत्-संयुक्त) पर्णाचा वंश *m*, (मुख्य)पर्णवंश *m*, प्रणाल; उ० शेवगा, कवड्यानिंब, गुलमोहर.

*N. B.*—वृन्त लांब असून त्यावर आसन्न फुलें किंवा पुष्पित फांद्या असल्यास त्याला प्रणाल म्हणतात, परंतु वृन्त आंखूड आणि पसरट असून त्यावर पुष्कळ फुलें असल्यास त्याला आशय (receptacle) म्हणतात.

Rachitis ( rā'kītis ) [ Gr. *rhakhis*, spine and *itis*, inflammation.] *n.* ( *med.* ) अस्थींचा वांकडेपणा *m*, अस्थिकौटिल्य *n.*

Racial *a. belonging to or characteristic of a race* कुलाचा, वंशाचा, कुलासंबंधीं, वंशासंबंधीं, जातीचा, जातिविषयक, कुलागत, वंशदर्शक. [ R. FEELING जात्यभिमान *m.* R. HATRED जातिद्वेष *m.* R. WAR जातिजातींतील कलह *m.* ]

Ra'cialism *n. the influence that race and birth have upon the life and character of a people* जातिगत संस्कार *m. pl.*, जातीय संस्कार *m. pl.*, वंशाचे संस्कार *m. pl.*, जन्मसंस्कार *m. pl.*

Ra'cy ( rā'si ) *a. having a strong flavour* चवदार, चवीचा, झणझणीत, कडक, तेज; as, "R. wine." २ *piquant* पिळदार, चणचणीत, मुळच्या पिळाचा, जोरदार, खुमासदार; as, "Burns's English, though not so R. as his Scotch, is generally correct." ३ *lively, spirited* जोरदार, सणसणीत, तेजस्वी, जीवंत; as, "A R. remark; R. verses."

Rack ( rak ) [See wreck.] *n. destruction* नाश *m*, विध्वंस *m*; as, "Go to R. and ruin."

Rack ( rak ) [ Ice. *reka*, to drive.] *n. light fleecy clouds* कापशे ढग *m. pl.*, पोकळ ढग *m. pl.* R. *v. i.* (*of clouds*) *to drive before the wind* वाऱ्याच्या जोरानें निघून जाणें.

Rack ( rak ) [ Probably from Dutch *recken*, to stretch.] *n. an instrument of torture* ( छळ करण्याचें ) ऱ्याक, पीडनयंत्र. [To BE ON THE R. (*fig.*) संकटांत कैंचींत असणें.] R. *v. t.* ( ऱ्याकवर बांधून मनुष्याचे ) हालहाल करणें. २ ( of disease or bodily or mental agony ) *to inflict torture on* त्रस्त करणें, सतावून सोडणें, पीडा *f.* देणें, दुःख *n.* देणें; as, "A *racking* headache." ३ *to task severely* (फार) शीण देणें -पाडणें, फार ताण देणें -पाडणें; as, "To R. one's brains." ४ *to exact utmost possible amount of* ( rent ) ( -ची) शक्य तितकी रकम वसूल करणें. (b) *to oppress* ( tenants ) *with excessive rent* जबर खंड घेऊन ( कुळांना ) छळणें -गांजणें. ५ *to exhaust the land with excessive use* ( पिकें काढून काढून ) जमीन निकस करणें. Rack-rent *n.* जबर खंड *m*, कमालीचें (जास्त) भाडें *n.* R. *v. t.* (कुळाकडून) जबर खंड घेणें, कमालीचें ( जास्त ) भाडें -खंड घेणें. R. renter *n.* जबर खंड घेणारा, कमाली भाडें घेणारा ( मालक ) *m.* २ जबर खंड देणारें -कमालीचें ( जास्त ) भाडें भरणारें कुळ *n.*

Rack ( rak ) [ Probably from Dutch *rec*, rail.] *n. a frame for holding fodder for cattle, &c.* माच *m.* २ *a frame for holding bottles, &c.* मांडणी. [PLATE RACK = मांडणी *f.* HAT RACK = खुंटाळें. ]

Rack ( rak ) [ Port. *arracar*, ( *raca* ) husks of grapes, dregs.] *v. t. to strain or draw off from*

*the lees* (as wine) गाळणें, (दारू) गाळापासून वेगळी करणें, गाळ काढून टाकणें.

Racket, Racquet (rak'et) [Ety. dub.] *n. a bat for playing tennis* टेनिस खेळण्याची बॅट *f*. २ (*pl.*) (रॅकेटनें दोघांनीं किंवा चौघांनीं खेळण्याचा) रॅकेट खेळ *m*. ३ *a snow-shoe* बर्फावरून जातांना घालण्याचा जोडा *m*. R.-court, -ground *n. a tennis-court* टेनिस खेळण्याचें कोर्ट *n*, टेनिसचें पटांगण *n*.

Racket (rak'et) [An imitative word.] *n. a clattering noise, hurly-burly* गलबला *m*, कलकलाट *m*, गलबल *f*, कल्होळ *m*. २ *noisy, disorderly conduct* (दारूच्या वगैरे निशेंत केलेला) धिंगाणा *m*, धांगडधिंगा *m*, दंगा *m*.

Rack'ety *a*. गलबल्या, गलबल करणारा.

Radial (rā'-di-al) [L. *radius*, a ray.] *a*. (*math.*) *shooting out like a ray or radius* कैंद्रिक, (किरणासारखा) केंद्रापासून निघणारा, मध्यापासून पसरणारा. २ (*bot.*) अरसदृश, किरणासारखा, मध्यापासून पसरणारा, आरासारखा. ३ (*anat.*) अंगुष्ठमूलाश्रित (नाडी), आंगठ्याच्या मुळाजवळची (नाडी).

Radian (rā'di-an) [L. *radius*, a ray.] *n*. (*math.*) समत्रिज्याकोन *m*, त्रिज्येएवढ्या चापानें वर्तुळाच्या मध्यबिंदूशीं केलेला कोण *m*, वर्तुलमापनाचा एकं. (वर्तुलमापन = Circular measure).

Rā'diance, Rā'diancy *n. brilliancy, splendour* तेज *n*, चकाकी *f*, चमक *f*, तेजस्विता *f*, प्रकाशमानता *f*.

Radiant (rā'di-ant) [L. *radius*, a ray.] *a. emitting or proceeding as from a centre* (किरणांप्रमाणें) मध्यापासून पसरणारा, अरीभविष्णु. २ (*esp.*) *emitting rays of heat or light* उष्णताकिरणविसर्जक, प्रकाशकिरणविसर्जक. [RADIANT ENERGY (चाकाच्या आरांप्रमाणें) किरणविसर्जक शक्ति *f*, अरीभाव्य शक्ति *f*. R. HEAT अरीभविष्णु उष्णता *f*, अरीभूत उष्णता *f*, विसर्जक उष्णता *f*.]. ३ (of eyes or looks) तेजस्वी, पाणीदार, तजेल, प्रफुल्लित, हंसतमुख. ४ (of light) *issuing in rays* अरीभूत, किरणांनीं पसरणारा. ५ (of beauty) *splendid* डोळे दिपून जाण्यासारखा, दैदीप्यमान. R. *n*. (*opt.*) *the luminous point from which light emanates* किरणविसर्जनबिंदु *m*, अरीभवनबिंदु. २ (*astron.*) *the centre-point from which meteoric showers proceed* उल्कापाताचा आकाशांतील बिंदु *m*, उल्कासंपातबिंदु *m*. ३ (*geom.*) कैंद्रिक रेषा *f*.

Radiate (rā'di-āt) [L. *radiare* –L. *radius*, a ray.] *v. i. to emit rays of light* (प्रकाशाचे) किरण बाहेर फेंकणें, किरणद्वारा -किरणरूपानें निघणें -येणें, किरणांचें विसर्जन होणें. २ *to proceed in direct line from any point* केंद्रापासून नीट -सरळ -समोर निघणें -निघून चालणें. R. *v. t. to send out in direct lines from a point* (चाकाच्या आरांप्रमाणें) अररूपानें बाहेर टाकणें, (-चें) अरीभवन करणें, किरणविसर्जन करणें.

*N. B.*—किरणविसर्जन and अरीभवन are in Modern Marathi generally used for Radiation.

Ra'diated *a.* (चाकांच्या आराप्रमाणें) किरणाकृति, किरण-रूपी, पसरलेल्या किरणांसारखा, अरीभूत (किरणांचा), विसर्जित किरणांचा, अरसदृश. २ (*bot.*) किरणरूपी, अररूपी, आरासारखा, अरसदृश.

Rādiā'tion *n. act of radiating* (प्रकाशाचें) किरणरूपानें निघणें *n.* २ *emission and diffusion of rays of heat or light* विसर्जन *n*, किरणविसर्जन *n.* ३ (*astron.*) केंद्रोत्सर्जन *n*, अरीभवन *n.* [SELECTIVE ABSORPTION AND R. विशिष्ट शोषण व विसर्जन.]

Rā'diator *n. a body which radiates or emits rays of light or heat* विसर्जक *m.* [GOOD R. शीघ्र विसर्जक. BAD R. मंद विसर्जक.] २ (खोलींत) उष्णता पसरण्याचें यंत्र *n*, विसर्जक (यंत्र).

Radical (rad'i-kal) [L. *radix*, *radicis*, root.] *a. pertaining to the root* मुळाचा, मुळाविषयींचा, मूळचा, मुळींचा, मुळांतला, मौलिक. २ *implanted by nature* आंगचा, जातीचा, जन्माचा, अस्सल, स्वाभाविक; as, "R. heat." ३ (a word) *not derived* सिद्ध. ४ *forming the basis, primary* मूळचा, मूलभूत, आधारभूत; as, "The R. principles of a system." ५ *affecting the foundation, complete* मुळारंभाचा, मुळांतला, मुळापासूनचा, मुळालाच हालविणारा -पोंचणारा, सर्वथैव, सर्वस्वी; as, "R. change; R. reform." ६ (*bot.*) *proceeding immediately from the root* मूलग, मूलीय, मुळालाच फुटणारा, मुळांतूनच निघणारा. [R. LEAF मुळापासून निघाल्यासारखें दिसणारें पान *n*, मूलीय पर्ण *n.*] ७ (*pol.*) *ultra-liberal* मूलसुधारणापक्षीय, जहालउदारमतवादी. ८ (*philos.*) अविकृत, मूल. [R. STAGE अविकृत अवस्था *f*, मूल अवस्था *f.*] ९ (*med.*) निर्मूलक, (समूळ) नाहींसा करणारा, रोगनिर्मूलक (उपाय). १० (*math.*) करण्यात्मक. [R. SURD करणी *f.* R. AXIS करण्यात्मक अक्ष *m.* R. SIGN मूलमापक चिन्ह *n.*]

Rad'ical *n. fundamental principle* मूलतत्त्व *n*, आदितत्त्व *n.* २ *a primitive word* सिद्ध शब्द *m.* ३ (*bot.*) आदिमूल *n*, मोड *m.* ४ (*chem.*) मूलक *n.* [COMPOUND R. संयुक्त मूलक *n.* SIMPLE R. एकाकी मूलक *n.*] ५ (*politics*) जहालउदारमतवादी *m*, मूलसुधारणापक्षी *m.*

Rad'icalise *v. t. to make radical* जहालउदारपक्षाचा करणें, समूलसुधारणापक्षी करणें, मूलसुधारणापक्षाचा करणें. R. *v. i.* मूलसुधारणापक्षी बनणें.

Rad'icalism *n. the principles of a radical or democrat* मूलसुधारणापक्षाचीं मतें *n. pl.* मुळांतच सुधारणा करूं इच्छिणारा पंथ *m*, जहालउदारपक्षाचीं तत्त्वें *n. pl.*

Rad'ically *adv.* मुळांत, मुळीं, मुळींचा or मूळचा *decl.*, आमूल. २ जातीनें, जातीचा, &c. *decl.*, स्वभावत:.

Radicle (rad'i-kl) [L. *radix* -*radicis*, a root.] *n.* (*bot.*) *the first root-shoot from a seed* आदिमूल

*n*, (मुळाचा) मोड *m*, (मुळाकडील) कोंब *m*, बीजमूल. २ (*anat.*) *root-like sub-division of a nerve or vein* मूलसदृश शाखा *f*.

Rad'icose *a. having a large root* मोठें मूळ असलेला, मोठ्या मुळाचा, बृहन्मूल (*a.*)

Rad'icule *n.* (*bot.*) *that end of the embryo which is opposite to the cotelydons* गर्भमूलक.

Radio-active (rādiō-aktiv) [Radio-L. *radius*, E. *radium*, & Active.] *a. capable of affecting electrometer by radiation* विसृष्ट (radiated) अंशूंच्या किंवा किरणांच्या योगानें (विद्युन्मापकावर) कार्य करणारा, किरणकार्यकारी, (विसृष्ट अंशुभिः कार्यकारी), विसृष्ट अंशूंमुळें कार्य करणारा. (b) (of radium) *having power of emitting invisible rays that penetrate opaque matter and produce electrical effects* (विद्युत्कार्यकारी व अपारदर्शक वस्तूंतून पार जाणारे असे) अदृश्य किरण बाहेर टाकणारा, रेडियमकिरणधर्मी, क्षकिरणविसर्जक.

Rādio'graph *n. an instrument by which solar radiation is measured* सूर्याची विसर्जनशक्ति मोजण्याचें यंत्र *n*, अंशुभारलेखक *n*,? किरणभारलेखक *n*, अंशुलेखक *n*?, किरणलेखक *n*. २ (विद्युजन्यप्रकाशकिरणांनीं शरीरांतील हाडांचा व इतर भागांचा) क्षकिरणांनीं घेतलेला लेख *m*, क्षकिरणलेख *m*.

Radio'-graphy *n.* विद्युजन्य प्रकाशकिरणांच्या साहाय्यानें शरीरांतील हाडें व इतर भाग पाहाण्याची विद्या *f*, (क्षकिरणेन लेखनम्) क्षकिरणलेखन *n*.

Radio'meter *n.* (वमित किंवा विसृष्ट) प्रकाशाच्या अंशूंचा भार मोजण्याचें यंत्र *n*, अंशुभारदर्शक *n*, किरणभारदर्शक *n*, अंशुमापक *n*, किरणमापक *n*.

Rā'diophone *n. an instrument for producing sound by means of heat rays* विसर्जक उष्णतेनें ध्वनि उत्पन्न करणारें यंत्र *n*, उष्णताध्वनियंत्र *n*.

Radio'-phonics, Radio'-phony *n.* विसर्जक प्रकाशानें किंवा उष्णतेनें उत्पन्न होणारा ध्वनि *m*, उष्णताजन्यध्वनिशास्त्र *n*, उष्णताध्वनिशास्त्र *n*.

Radio-te'legram *n.* बिनतारी (तारायंत्रानें पाठविलेली) तार *f*.

Radish (rad'ish) [Fr. *radis*–L. *radicis*, root.] *n.* मुळा *m*. [FOLLICLE OF A R. मुळ्याची शेंग *f*, डिंगरी *f*, मोगरी *f*.]

Radium (rā'-di-um) [L. *radius*, a ray.] *n.* 'रेडियम' नांवाची मूलधातु. हिचा शोध १८९८ त लागला. हिच्यापासून अदृश्यकिरण बाहेर पडतात व ते अपारदर्शक वस्तूंतून पलीकडे जातात.

Radius (rā'di-us) [L. *radius*, a staff, a ray.] *n.* (*anat.*) कोंपरापासून मणगटापर्यंतचें आंगठ्याच्या बाजूचें हाड *n*, बहिःप्रकोष्ठास्थि *n*, मणगटाची कांब *f*, मणिबंधास्थि *n*. (b) पशूच्या पुढच्या पायांतील किंवा पक्ष्याच्या पंखांतील हाडांतील कांब *f*, मणिबंधास्थि *n*. २ (*geom.*) त्रिज्या *f*, व्यासार्ध *n*. [R. VECTOR मंदकर्ण

*m*, चलज्या *f*, कर्ण *m*, श्रुति *f*.] ३ *anything like a radius* त्रिज्येसारखी वस्तु *f*, त्रिज्या (*fig.*). ४ *circular area as measured by its radius* (वाटोळें) क्षेत्र *n*; as, "Knows every one within a R. of twenty miles." ५ (*bot.*) पुष्पकिरण *m*. ६ *the movable arm of a sextant* दांडा *m*, दंड *m*, हस्त *m*.

Radix (rā'diks) [L. *radix*, root.] *n. a root, a primitive source* मूळ *n*, आरंभ *m*. २ *a primitive word* मूल शब्द *m*, सिद्ध शब्द *m*. ३ *the base of a system of logarithms* मूळ *n*, पाया *m*.

Raff (raf) *n*. (chiefly used in the compound riffraff) *the rabble* (समाजांतील) निकृष्ट दर्जाचे लोक *m. pl.*, हलकट लोक *m. pl.* २ *rubbish* कचरा *m*, घाण *f*. Raff'ish *a. disreputable* हलकट, पाजी.

Raffle (ra'fl) [Etymology dubious.] *n. sale by chance in which the price is subscribed equally by all who hope to win* राफल नांवाची सोडत *f*, राफल *f*. R. *v. i. to try a raffle* राफल सोडत *f*. घालणें.

Raft (raft) [Dan. *raft*, a beam.] *n. a float made of planks fastened together* तराफा *m*, तर *f*, तरण *n*, ताफा *m*. R. *v. t. to transport on a raft* तराफ्यावरून नेआण करणें -वाहून नेणें. २ *to form into a raft* (-चा) तराफा करणें. R. *v. i. to manage a raft* तराफा चालवणें, तराफा हांकणें. २ *to travel by a raft* तराफ्यांतून जाणें, तराफ्यानें जाणें.

Raft-bridge *n*. तराफ्यांचा पूल *m*.

Rafter (raf'tėr) [Dan. *raft*, a beam.] *n. an inclined beam supporting the roof of a house* वांसा *m*. [CORNER R. कोनवासा *m*, कोना *m*, कोन्या *m*. CROSS SLIP ALONG ENDS OF RAFTERS पाणसापूड *n*, पान *n*. CROSS PIECE RECEIVING THE ENDS OF RAFTERS माहुटीचें पान *n*, माहुटी *f*, मोहटीचें पान *n*, मोहटी *f*. ROUND R. काटगोल *m*. STOUT R. *or* POLE तरक *m*, *f*. PRINCIPAL R., *a main timber in supporting the weight of a roof* धारण *n*, आडें *n*.].

Raf'ter *v. t.* (usually in *pa. p.*) *to furnish with rafters* वांसे मारणें.

Raft'sman *n*. तराफा चालविणारा *m*, तराफेवाला *m*.

Rag (rag) [Of doubtful origin.] *v. t. to annoy, to torment* त्रास देणें, सतावणें, छळणें. २ *to assail roughly or noisily* आरडाओरडा करून मारणें, हमरीतुमरीवर येणें. ३.(थट्टा म्हणून एखाद्याची बसावयाची) खोली अस्ताव्यस्त करून ठेविणें. R. *n*. (*slang*) *noisy, disorderly conduct* गोंधळ *m*, हमरीतुमरी *f*, दांडगाई *f*, दांडगाईचें वर्तन *n*.

Rag (rag) [Etymology doubtful.] *n. a large coarse roofing slate* (छपराकरितां) खरबरीत (पातळ स्लेटीसारखा) छपरी दगड.

Rag (rag) [Sw. *ragg*, rough hair.] *n. a torn or worn fragment of cloth, a remnant, a scrap* चिंधी *f*, चिंधूक *n*, चिंधडी *f*, चिंधूट *n*, चिंधोटी *f*,

loosely चिथडा *m*, फडका *m*, फडकें *n*, वाभारा *m*, (नोटेचा) तुकडा, कपटा *m*. [R. WETTED TO TIE OVER A CUT OR SORE पाण्याची पट्टी *f*, पाणपट्टी *f*, ओली पट्टी *f*. TO TEAR TO RAGS चिंध्या *f. pl.* -वासले *m. pl.* करून टाकणें -उडवणें *g. of o.*] २ (as used in contempt of an article of clothing) चिंधी *f*, वातेरें *n*, सुडकें *n*, (पासोडीचें) पटकुर *n*, (घोंगडीचें) वाकळ *n*. [IN RAGS, *in old clothes* फाटके कपडे *m. pl.* -चिंध्या घालून-पांघरून, फाटक्या कपड्यांनीं.] ३ *smallest scrap of cloth or sail* फडका *m*, सुडका *m*, चिंधी *f*; as, "Not a R. to cover him; Spread every R. of sail." ४ *remnant, odd scrap* अंश *m*, शेष *m*; as, "Not a R. of evidence." ५ (*contempt.*) (a) *a flag* निशाण *n*. (b) *a hand-kerchief* हातरुमाल *m*. (c) *a curtain* पडदा *m*. (d) *a newspaper* वर्तमानपत्र *n*, वृत्तपत्र *n*. (e) *anything rent or worn out* जुनें *n*, जुनेर *n*, पोतेरें *n*.

Rag'abash *n. a low fellow* हलकट -नीच मनुष्य *m*.

Rag'amuffin *n. a low, disreputable person* नीच -हलकट -अधम -पाजी मनुष्य *m*.

Rag-baby *n. doll made of rags* चिंध्यांची बाहुली.

Rag-bag चिंध्या ठेवण्याची पिशवी.

Rag-dust *n.* (कागद करण्याकरितां केलेली) चिंध्यांची भुकी *f*.

Rage (rāj) [Fr.-L. *rabies*, madness.] *n. furious anger* क्रोध *m*, राग *m*, रागाचा आवेश *m*, रागाचा भर *m*, रागाचा झटका *m*, संताप *m*, कोप *m*, प्रकोप *m*, कोपावेश *m*, क्रोधावेश *m*, रोष *m*, घुस्सा *m*, त्वेष *m*, क्षोभ *m*. २ (भुकेची) आग *m*, जाळ *m*, वणवा *m*. ३ (of passions) आवेश *m*, आवेग *m*, भर *m*, जोप *m*, खळबळ *f*, जोर *m*. [FIT OR PAROXYSM OF R. रागाचा झटका *m*. TO BE LIVID FROM R. रागानें हिरवापिंवळा होणें.] ४ *violent excitement* वेग *m*, क्षोभ *m*, जोर *m*, तडाखा *m*, सोसाटा *m*, धडाखा *m*; as, "The R. of the wind." ५ *enthusiasm, any object much sought after, the fashion* वेड *n*, नाद *m*, शोक *m*, पिसें *n*, छंद *m*; as, "She has a R. for first editions."

Rage *v. i. to be furious with anger, to exercise fury* (रागानें) जळणें, संतापणें, क्षोभणें, तडफडणें, धडफडणें, चडफडणें, जळजळाट होणें. २ (intensely) जळफळ *f* -चडफड *f* -धडफड *f* -आदळआपट *f*. करणें -मांडणें, दांतओंठ खाणें, हातपाय आपटणें -आदळणें, वादळणें, चौताळणें, जळफळणें. [TO FLY *or* RISE INTO A R. भडकणें, तापणें, पेटणें, अंगास आग लागणें, वर्दळीस येणें, डोकें फिरणें *g. of s.*, अंगाची होळी होणें *g. of s.*, पायांची आग मस्तकांत जाणें -चढणें *g. of s.*, अंगाचे तिळपापड होणें *g. of s.*, अंगाची लाही होणें *g. of s.*, जहाल होणें with वर of *o.*, खवळणें. TO R. IMPOTENTLY दांत खाऊन अवलक्षण करून घेणें.] ३ *to prevail fatally as a disease* (-चा) कहर होणें, खूप फैलावणें, जोरानें चालू होणें (-चा) जोर असणें, अनर्थ *m* -कहर

*m* -गहजब -प्रळय *m.* करणें -मांडणें, तडाखा *m* -झपाटा *m* -चालवणें -मांडणें, तडाखा *m* -झपाटा *m.* चालणें *g. of s.*; as, "The plague is *raging.*" ४ (of sea, wind, passion, feeling, &c.) *to be violently agitated* खवळणें, क्षुब्ध होणें, (-ची) खळबळ होणें, (-चा) सोसाटा सुरू होणें. Raging *a. full of rage, acting with violence* खवळलेला, क्षुब्ध, जळणारा, तडफडणारा, संतापलेला, क्रोधांध. २ (R.) *furious* अनर्थाचा, कहराचा, तडाख्याचा, झपाट्याचा, जबर.

Ragged (rag'ed) [From *Rag n.*] *a. torn* फाटका, चिरफळया -चिरफाळ्या -वाभारे &c. गेलेला -उडालेला -निघालेला, चिरफळ्यांचा, शतच्छिद्र; as, "A R. coat." २ *wearing ragged clothes, shabby* सुडके नेसलेला, चिंध्या नेसलेला, फडकें नेसलेला, चिंधोट्या, लंगोट्या; as, "A R. fellow." [R. SCHOOL गरीब मुलांकरितां (फुकट) शाळा *f.*] ३ *ruggedly uneven, jagged* खरबरीत, खडबडीत, उखरवाखर, उखरावाखर, खावडखुबड; as, "R. rocks." ४ *faulty, wanting finish* ओबडधोबड; as, "R. rhymes." Ragg'edness *n.* फाटकेपणा *m*, &c. २ चिंधोटेपणा *m*, छिन्नवस्त्रता *f.* ३ खरबरीतपणा *m*, उखरवाखरपणा *m*, &c.

Rag'ing *v. n.* धडफड *f*, चडफड *f*, आदळआपट *f*, आदळउफळ *f*, आदळआफळ *f.* २ खळबळ *f.* ३ धडाका *m*, कडाका *m*, जोर *m*, गहजब *m.*

Rag'ingly *adv.* जोरानें, आवेशानें, त्वेषानें. २ *producing great excitement* खळबळ उडवून. ३ *producing great interest* (लोकांत -च्या संबंधीं) वेड पिकवून, वेड लावून.

Rag'man *n. a man who collects or deals in rags* चिंध्यांचा व्यापारी *m*, चिंधीवाला. २ चिंध्या गोळा करणारा.

Rag-shop *n.* चिंध्यांचें दुकान, जुन्या कपड्यांचें दुकान.

Raid (rād) [from Road.] *n. a hostile or predatory invasion* (द्वेषभावानें अगर लुटण्याकरितां केलेला लष्करी) छापा *m.* २ (पोलिसचा) छापा *m.* R. *v. t. to make a sudden attack* हल्ला करणें, छापा घालणें.

Raid'er *n.* छापा घालणारा, स्वारी *f.* करणारा *m*, हल्ला *m.* करणारा *m.*

Rail (rāl) [L. *regula*, a straight stick.] *n. a bar of timber or metal* गज *m*, गराज *f*, गराद *f*, गरादा *m.* (b) (*civ. engin.*) आडवी दांडकी *f.* [CROSS R. सर *m*, सरी *f.*] २ *a barrier* अडवण *n*, कुंपण *n*, कठडा *m*, कठडेबंदी *f.* [BACK R. पाठीमागचें अडवण. FRONT R. पुढचें अडवण.] ३ आगगाडीचा रूळ *m.* [OFF THE RAILS, *out of order* नादुरुस्त, बरोबर न चालणारा.] ४ *the railway as a means of travel* आगगाडी *f.* [BY R. आगगाडीनें, आगगाडीमार्गानें.] ५ (*pl.*) *railway shares* रेल्वे कंपनीचे भाग *m. pl.* R. *v. t. to enclose with rails* कठडा करणें -घालणें -बांधणें -लावणें, कुंपण घालणें -करणें, कुडणें, कठडेबंदी *f.* करणें. २ *to lay* (railway route) with rails (आगगाडीच्या रस्त्यावर)

रूळ घालणें. ३ *to convey goods by rail* आगगाडीनें माल नेणें. ४ *to travel by rail* आगगाडीनें प्रवास करणें.

**Rail** ( rāl ) [ Etymology doubtful.] *v. i.* ( usually with *at* or *against* ) *to use insolent language* तोंड *n.* सोडणें, तोंड टाकणें, तोंडाचा तोफखाना *m.* सोडणें, दांतकिसाळी *f.* करणें, शिव्यांची तान *f.* झाडणें, (फडफड *adv.*) शिव्या *f. pl.* देणें, फडफडणें, कडकडणें. (b) थट्टा करणें. R. *v. t. to scoff at, to affect by railing* निर्भर्त्सना करणें.

**Rail-bender** *n.* (रोळ (रूळ) सरळ करण्याचा किंवा वांकविण्याचा ) झिंक्रू *m.* ( झिंक्रू is the corruption of the English word *jim-crow.*)

**Rail-borer** *n.* रुळांना भोंकें पाडण्याचा डिरिल *m.* ( डिरिल is the corruption of the English word Drill ).

**Rail-chair** *n.* ( रूळ बसविण्याची ) रूळखुर्ची *f.*

**Rail-clamp** *n.* ( रूळ घट्ट बसविण्याची ) रूळकिलिप *f.*

**Rail-coupling** *n.* ( सांध्यावरचा ) जोडरूळ *m.*

**Rail'er** *n. one who insults or defies by opprobrious language* तोंड सोडणारा, तोंड टाकणारा, &c., दांतकिसाळ्या, निर्भर्त्सक.

**Rail-guard** *n.* ( रोळावरून गाडीचें चाक निसटून जाऊं नये म्हणून लावलेला ) चकरोळ ( चक is the corruption of the English word *check*).

**Rail'ing** *n. a fence of posts and rails* कठडा *m*, कुंपण *n*, कुडण *n*, कटंजन *n*, लकडकोट *m.* २ *material for rails* कठडा घालण्याचें सामान *n*, कठड्याचें सामान *n.*

**Rail'ing** *a. reproachful, insulting* निर्भर्त्सक.

**Rail'ing** *n. reproachful and insulting language* शिवीगाळ *f*, गालीगलोची *f*, दुर्भाषण *n*, अपभाषण *n.* २ निंदा *f*, थट्टा *f*.

**Rail'ingly** *adv. scoffingly, insultingly* फडफड, ( *intens.* फडाफड, फडाडां ) तोंड सोडून, तोंड टाकून, शिवी -शिवीगाळ &c. देऊन.

**Raillery** ( rāl'ér-i or ral'- ) *n. banter, good-humoured irony* चेष्टा *f*, थट्टा *f*, मस्करी *f*.

**Rail'-punch** *n. a machine for punching holes in the webs of rails* रोळाचा पंच *m.* [ *m*, लोहमार्ग *m.*

**Rail-road, rail-way** *n.* लोखंडी रस्ता *m*, रुळाचा रस्ता

**Rail-roader** *n.* रेल्वेवर काम करणारा *m.*

**Rail-saw** रूळ कापण्याची करवत.

**Railway** आगगाडी *f.* २ रेल्वेरस्ता *m*, लोखंडी रस्ता *m*, रेलमार्ग *m*, लोहमार्ग *m*, आगगाडीचा रस्ता, रेल. At R. speed, *very quickly* फार जलदीनें. Elevated or overhead Railway पुलावरचा आगगाडीचा रस्ता *m.* Light Railway *n. one intended for light traffic* हलकी रेल्वे. Military Railway लष्करी रेल्वे, लष्करी आगगाड्या. ह्यांतील इंजनांना व डब्यांना लोखंडाचें चिलखत असतें व डब्यांना गोळ्या सोडण्याकरितां भोंकें असतात.

Railway car *n.* ( मालाचा किंवा उतारूंचा ) डबा.
Railway carriage *n.* उतारूंचा डबा *m.*
Railway Company रेल्वे कंपनी.
Railway-cross'ing *n. an intersection of railway lines* रुळाचा (आडवा) क्रुससांधा *m.* २ *an intersection of an ordinary road with a rail-road* फाटक *n.*
Railway line रेल्वेलाईन, रेलमार्ग *m.*
Railway spine रेल्वेच्या अपघातापासून पाठीच्या कण्याला बसलेला धक्का.
Rail'way-train *n.* Same as Train.
Raiment ( rā'ment ) [ From the root of Array.] *n.* वस्त्रप्रावरण *n*, चिरगूट *n.*
Rain ( rān ) [ A. S. *regn*, rain.] *n.* पाऊस *m*, पर्जन्य *m*, वृष्टि *f*, बरसात *f*, पाणी *n.*-indef. or freely पाऊसपाणी *n.* [BRISK AND PASSING R. शिडशिडी *f.* DELUGE OF R. महापूर *m.* EXCESSIVE R. अतिवृष्टी *f.* HEAVY R. ( पावसाची ) मुसळधार *f.* LIGHT R. झिमझिम *f*, बुरबुर *f.* PELTING R. फटकाऱ्याचा पाऊस *m.* R. DURING SUNSHINE ऊनपाऊस *m*, नागवा पाऊस *m.* SIGNS OF R. पावसाचे डोहळे *m. pl.*, पावसाचा रंग *m.* SOAKING R. भिजपाऊस *m*, जिरवणी *n*, जिरवणीचा पाऊस *m.* SPITTING R. पावसाची थुईथुई *f*, पिरपीर *f*, मुळमूळ *f.* SPOILED BY MUCH R.—(crop.) पाणपिसा. UNCEASING POUR OF R. झिंबड *f*, झिंबडी *f*, झुंबड *f*, झड *f*, झडी *f*, झोड *m.* UNTIMELY R. अकालवृष्टी *f.* R. *or* SHINE पाऊस पडो किंवा न पडो. ] २ (*pl.*) *rainy season* पावसाळा *m*, पाऊसकाळ *m*, बरसात *f*, वर्षाकाल *m*, वर्षाऋतु *m.* [HEIGHT OR MIDDLE OF THE R. ऐन पावसाळा *m.* IN THE MIDDLE OF THE R. पडत्या पावसांत. THROUGHOUT THE R. पावसाळाभर.] ३ *anything falling in the manner of rain* पाऊस *m*, ( पावसासारखा ) वर्षाव *m*; as, "A R. of ashes, pearls, rice, fire, &c. (b) (*fig.*) पाऊस *m*, वर्षाव *m*; as, "R. of kisses, congratulations, &c." R. *v. i.* पाऊस *m* -पाणी *n.* पडणें, पाऊस लागणें, वर्षणें. [To R. BRISKLY AND PASSINGLY शिडशिडणें, शिडशीड &c. पडणें. To R. CATS AND DOGS मुसळधार पाऊस पडणें. To R. HEAVILY, IN TORRENTS पाऊस धोधो पडणें, आभाळ फुटणें, धोधोधो &c. पाऊस पडणें. To R. SPITTINGLY पिरपिरणें. IT RAINED, ( BLOOD, FROGS, INVITATIONS &c. *there was a shower of them* ) (-चा) पाऊस पडत होता. IT NEVER RAINS, BUT IT POURS, *events usually happen several together* पुष्कळ ( महत्वाच्या ) गोष्टी ( बहुधा ) एकाच वेळीं घडून येतात. ] २ (*fig.*) गळणें, पडणें, वर्षाव होणें; as, "Tears *rained* down her cheeks; Flowers *rained* from their hands." R. *v. t. to pour like rain* पाऊस पाडणें, वर्षाव करणें; as, "He rained benefits upon us." [IT HAS RAINED ITSELF OUT पाऊस खळला -थांबला आहे. ]
Rain-band *n. a dark band in the solar spectrum* (सूर्याच्या विच्छिन्न किरणांतील) पावसाचा डाग *m.*-पट्टा *m.*
Rain'bow *n.* इंद्रधनुष्य *n*, इंद्रचाप *n.*

Rain'bowed *a.* इंद्रधनुष्याकृति.

Rain'box *n.* ( नाटकगृहांतील पावसाचा देखावा दाखविण्याची ) पावसाची पेटी *f*, पर्जन्यपेटिका *f*.

Rain'chart *n.* पावसाचा नकाशा *m*.

Rain'cloud *n.* ( निंबस नांवाचा ) पर्जन्यमेघ *m*, पावसाचा मेघ *m*.

Rain'deer, Same as Reindeer.

Rain'doctor *n.* मंत्राच्या सामर्थ्यानें पाऊस पाडणारा *m*, पर्जन्यमंत्री *m*.

Rain'-drop *n.* पावसाचा थेंब *m*, पर्जन्यबिंदु *m*.

Rain'-fall *n.* पर्जन्यवर्षाव *m*, वर्षण *n*, पाऊस *m*.

Rain'-gauge *n.* पाऊस मोजण्याचें यंत्र *n*, पर्जन्यमापक यंत्र *n*, पर्जन्यकुंड *n*.

Rain'iness *n.* पावसाळें *n*, वांबट *f*, रांप or रांफ *f*, वृष्टिप्राचुर्य *n*, वृष्टिबाहुल्य *n*.

Rain'less *a.* पाऊस नसलेला, कोरडा, बिनपावसाचा. [ R. REGION बिनपावसाचा -अवर्षणप्रदेश *m*. ]

Rain'-pour *n.* *a heavy rainfall* पावसाची धार *f*, मुसळधार.

Rain'-proof, Rain-tight *a.* *impervious to rain* पर्जन्यनिरोधक, पावसाळी, पावसाळ्याचा, पावसाची (छत्री वगैरे).

Rain'-wa'ter *n.* पावसाचें पाणी *n*, पर्जन्योदक *n*. [ R. CAUGHT धरवणी *n*.]

Rain'y *a.* *abounding with rain, showery* पावसाचा, पर्जन्याचा, झडीचा, वृष्टिमय. [ A RAINY DAY (*fig.*) अडचणीची वेळ *f*, आजारीपणाची वेळ *f*, प्रसंग *m*. ]

Raise (rāz) [Icelandish *reisa*, to cause to rise.] *v. t. to cause to rise, to lift up, to hoist* उचलणें, उभारणें, उठवणें, उचलून घेणें, उंच करणें, उचल *f*- उठावणी *f*. करणें, हवेस करणें; as, "To *raise* the standard of revolt." [To R. FROM THE GROUND भुईसांड -जमीनसांड करणें.] २ *to set upright* उभा (राहीसा) करणें, as, "To *raise* pastry." ३ *to erect, to build up* उभा करणें, उभारणें, उभवणी *f*. करणें, बांधणें, उठविणें; as, "To *raise* a palace." ४ *to give rise to, to originate* (a report &c.) उठविणें, प्रवर्तविणें, उडवणें, रचणें, फेंकणें, उत्थापित करणें. ५ *to bring together, to muster, to collect* ( troops ) उभारणें, जमविणें, जमा करणें, गोळा करणें. ६ *to collect* ( moneys ) मिळवणें, जमविणें, उभारणें. ७ *to cause to grow or breed, to produce* ( crops, cattle, &c. ) पिकवणें, उत्पन्न करणें, निपजवणें, उपजवणें, काढवणें; as, "To *raise* one's own vegetables." ८ *to exalt, to elevate, to promote* (उच्च पदास) चढवणें, वाढवणें, मोठेपणास आणणें, न्यहाल करणें, उन्नति *f*. करणें *g. of o.*; as, "*Raised* him to the see of York." ९ *to increase the strength of* ( चें बळ *n*- जोर *m*- गति *f*- वेग *m*. ) वाढवणें, बलवान् करणें; as, "The danger *raised* their spirits." १० *to excite, to inflame* उठवणें, चिथवणें, उचल *f*. करणें, उठावणी *f*. -करणें *g. of o.*;

as, "To *raise* the country against an enemy." ११ *to recall from death* उठवणें, जीवंत करणें; as, "To R. one from the dead." १२ *to cause to swell, as dough* फुलविणें, फुगविणें. १३ *to extol* स्तुति करणें. १४ *to bring up* वाढविणें, पालनपोषण करणें. १५ *to take off, as a blockade* उठवणें, काढणें. [ To RAISE A SIEGE वेढ्यानें घेण्याचा प्रयत्न सोडणें.] १६ (*law*) (जप्ती वगैरे) उठवणें. १७ *to lift and hold menacingly* उगारणें. १८ (game) रान *n.* उठवणें. [ To RAISE ONE'S VOICE बोलणें. २ आवाज *m.* मोठा करणें. To R. ONE'S VOICE AGAINST हाकाटा *m.* करणें. To R. THE MISCHIEF, *to make a disturbance* उपद्रव उपस्थित करणें. To R. CLOTH कपड्यावर फूल पाडणें. To R. COLOUR (in dyeing) रंग (अधिक) चकाकित करणें. To R. MONEY ON (कांहीं कामाकरितां गहाणावर) रकम काढणें, रकम उभारणें. To R. THE MARKET UPON (वास्तविक किंमतीपेक्षां) अधिक किंमत सांगणें-आकारणें-ठेवणें -घेणें. To R. A QUESTION (विचाराकरितां) प्रश्न मांडणें. To R. THE WIND (कोणत्या तरी युक्तीनें) रोकड पैसा उभारणें. ]

Rais'er *n. one who, or that which, raises* उचलणारा, चढवणारा, उभारणारा. २ (*archit.*) *the upright board on the point of a step in a flight of steps* दोन पायऱ्यांमधील उभी फळी *f*, तातरा *m.*

Rais'ing *n. act of lifting* उचलणें *n*, &c. २ *the embossing of sheet-metal by hammering or stamping* उठावाची नकशी काढणें. ३ (पीठ फुलविण्याचें) आंबवण *n.*

Raisin (rā'zn) [Fr. –L. *racemus*, a bunch of grapes.] *n.* मनूक *f*, मनूका *f*, वाळलेलें द्राक्ष *n*; without pips बेदाणा *m*, खिसमीस or किसमीस. R. wine *n.* वाळलेल्या द्राक्षांपासून केलेलें आसव *n.*

Raison d'être (rā-zon' d'ā'tr) [Fr.] *n. rational ground for a thing's existence* सयुक्तिक कारण *n*, सयुक्तिक उपपत्ति *f*, हेतुकारण *n.*

Rake (rāk) [Scand. *rakkel*, a vagabond.] *n. a dissolute person* चंगी, व्यसनी, छंदी, फंदी, बाहेरख्याली, चंगीभंगी, इष्कबाज, रांडबाज, स्त्रीव्यसनी.

Rake (rāk) [A. S. *raca*, a rake.] *n.* दांताळें *n*, दंताळें *n*, दांताळ *m*, फण *m*, फणी *f.*

Rake *v. t. to draw together* (as with a rake) गोळा करणें, पुंजावणें, जथणें, जथवणें. २ *to clear, &c. with a rake* दांताळ्यानें साफ करणें. ३ *to level with a rake* दांताळ्यानें (सारखें) सपाट करणें. ४ *to search diligently* चाळूनचाळून शोधणें, वरखालीं करून शोधणें; as, "Have been *raking* among or in or into old records." ५ (naut.) *to fire into, as a ship, lengthwise* नाळेकडून सुकाणाकडे (किंवा सुकाणाकडून नाळेकडे गोळे जातील अशा प्रकारें) तोफा *f. pl.* सोडणें. ६ *to inter or hide, as by raking earth over a body* पुरणें, पुरून ठेवणें. [To R. UP उकरणें, उकरून काढणें.] R. *v. i. to work with a rake*

दांताळें फिरविणें, दांताळें चालविणें. २ *to search minutely* बारकाईनें शोध करणें.

Ráker *n.* दांताळें चालविणारा *m*, दांताळें हांकणारा *m*. २ ( धान्य किंवा गवत गोळा करण्याचें ) दांताळें *n*. ३ शत्रूच्या जहाजाचा नाश करणारी तोफ *f*.

Ra'king *n.* दांताळ्यानें गोळा करणें -सारखें करणें *n*. २ दांताळें फिरवणें *n*. ३ *the space raked at once* दांताळ्यानें एका खेपेंत सारखी केलेली जमीन *f*. ४ दांताळ्यानें एका खेपेला पुंजावलेली वस्तु *f*.

Rákery, Ra'kishness *n.* छंदीपणा *m*, फंदीपणा *m*, रांडबाजी *f*, इष्कबाजी *f*.

Rákish *a. dissolute* व्यसनी, फंदी, बटाऊ or बटाव.

Rale ( räl ) [ Fr.–Gr. *ronchos*, snoring. ] *n.* ( path. ) फुप्फुस बिघडलें असतां त्यांत होणारा एक प्रकारचा आवाज, फुप्फुसकूजन, बुद्बुदशब्द, छातींतील ओलसर आवाज *m*.

Rally (ral'i) [ Fr.–L. *re*, and *ligare*, to bind.] *v. t. to gather again* पुनः गोळा करणें, एकत्र करणें, एकत्र जमविणें, स्थिरस्थावर -थावराथावर-सावरासावर करणें, सावरणें. २ *to recover* ( one's health, strength, &c.) सुधारणें, ताळ्यावर आणणें, (पूर्वीची) शक्ति आणणें. R. *v. i. to reassemble esp. after confusion* पुन्हां एकत्र होणें; as, "His party *rallied* round him." २ *to recover wasted strength* सावरणें, सावर *m*. घेणें, थावरणें, सुधारणें, पहिल्या स्थितीवर-पूर्वस्थितीवर-ठिकाणावर -&c., येणें. R. *n. act of rallying* एकत्र जमणें, एकत्र होणें. २ *recovery of order* थावराथावर *f*, स्थिरस्थावर *n*.

Rally ( ral'i ) [ From the root of Rail ( to mock, &c.)] *v. t. to attack with raillery, to banter* मस्करी *f* -थट्टा *f* -विनोद *m* -उपहास *m* -&c. करणें *g. of o.* R. *v. i. to exercise raillery* थट्टा करणें. R. *n. satirical merriment* थट्टा *f*, विनोद *m*, थट्टामस्करी *f*.

Rall'ying-point *n.* ( एकत्र जमण्याचें ) केंद्र *n*. ( मनुष्य किंवा स्थळ ).

Ram (ram) [A. S. *ram*.] *n. a male sheep* मेंढा *m*, एडक्का *m*, मेष *m*. [ Full grown R. टपूर *m*. Young R. वाळिंगा *m*. ] २ (*astron.*) मेष *m*. ३ *a military engine for battering* ( किल्ल्याच्या भिंती फोडण्याकरितां ) झुलता घण *m*. ४ *a hydraulic water-raising or lifting machine* ( पाण्याच्या शक्तीनें चालणारा ) पाणी वर खेंचण्याचा बंब *m*. ५ *projecting beak at bow for charging side of other ships* ( लढाऊ जहाजाची ) नाळेकडची घणासारखी चोंच *f*, ( b ) घणासारख्या नाळेचें लढाऊ जहाज *n*. ६ बुदक *m*, धुमस *m*, ठोकणी *f*. R. *v. t. to thrust with violence* टक्कर *f*. मारणें. २ *to drive hard together* ठांसणें, ठोकणें, चेंदणें, मारणें, ठांसणी *f*. करणें. Ram'med *pa. t.* and *pa. p.* Ram'mer *n.* मोगरा *m*, ठोकणी *f*. २ ( ठांसण्याचा ) गज *m*. [ R. of a cannon सुंबा *m*. ]

Ram'ming *pr. p.*

Ram'-rod *n.* (बंदूक ठांसण्याचा) गज *m.* Ram'-roddy *a.* गजासारखा ताठ, गजासारखा टणक.

Ramble (ram'bl) [Of doubtful origin.] *v. i. to wander* सहल करणें, भटकणें, हिंडणें, फिरणें, हिंडत फिरणें. २ *to talk or write disconnectedly* (बोलण्यांत किंवा लिहिण्यांत) वाहाणें. R. *n. a wandering about* भटकणें *n*, हिंडणें *n*, फिरणें *n*. २ *a walking excursion* सहल *f*, फेरफटका *m*, रपेट *f*, चक्कर *f*. [TO TAKE A R. OR TURN चक्कर मारून येणें.] ३ (लेखांत किंवा भाषणांत) वाहाणें *n*, भरकटणें *n*.

Ram'bler *n.* सहल करणारा, भटकणारा *m*, हिंडणारा *m*. २ (बोलण्यांत, लिहिण्यांत) वाहणारा *m*, भरकटणारा *m*.

Ram'bling *pr. p. a.* सहल करणारा, भटकणारा, हिंडणारा, फिरणारा. २ *disconnected* मधून मधून केलेला, भरकटलेली (टीका), वाहावलेला. ३ (of plants) *straggling, climbing* हव्या तशा वर चढणाऱ्या (वेली). ४ (of house, street, &c.) *irregularly planned* कसा तरी बांधलेला, अव्यवस्थित, वेडावांकडा. Ram'blingly *adv.* तुटकतुटक, अव्यवस्थितपणें.

Ramifica'tion *n.* (*bot.*) झाडाला फांद्या *f. pl.* -फांटे *m. pl.* -फणगडे फुटणें *n*. २ *a small branch* शाखा *f*, फांदी *f*, फांटा *m*, धुमारा *m*. ३ *sub-division of a complex structure* शाखा *f*, फांटा *m*. (b) उपकथा *f*, (नाटकाचें) उपसंविधानक; as, "*Ramification* of a river, society, plot, &c."

Ram'ified *pa. t.* R. *pa. p.* फांद्या फुटलेला, फांटे-फणगडे फुटलेला; loosely पसरलेला, विस्तृत झालेला.

Ram'iform *a.* फांद्यासारखा, उपशाखासदृश.

Ramify (ram'-i-fi) [L. *ramus*, a branch, and *ficare*, to make.] *v. t. to form branches or sub-divisions, to branch out* फांटे *m. pl.* -फणगडे *m. pl.* फोडणें, शाखा *f. pl.* -पोटविभाग करणें, शाखा काढणें. २ (*usu. pass.*) *to arrange in a branching manner* फांटे काढणें -नेणें, शाखा काढणें; as, "Railways were *ramified* over the country." R. *v. i.* फांटे *m. pl.* -फणगडे फुटणें, शाखा फुटणें.

Ramp (ramp) [Fr. *ramper*, to creep, to climb.] *v. i. to creep and climb* (as a plant) वर जाणें, वर चढणें, वर चढत जाणें. २ *to leap or bound* (chiefly of lion) (मागल्या पायांवर उभें राहून) झडप घालणें -टाकणें. ३ *to assume or be in a threatening posture* झडप घालण्याच्या तयारीनें (उभें) रहाणें, झडप घालण्याकरितां उभें रहाणें. ४ (now usu. facet.) *to storm, to rage* अंगावर चालून जाणें, अंगावर गुरगुरणें. ५ (*archit.*) (of wall) उंचसखल असणें.

Ram'pancy *n.* माज *m*, मात *m*, ऊत *m*.

Ram'pant (ram'-pant) [Fr. *ramper*, to creep.] *a.* (of an animal) मागल्या पायांवर उभा. २ *unrestrained* निरंकुश, बेसुमार, जबरदस्त, धाडसी; as, "He is a R. theorist." ३ (of plants) *rank and*

*luxuriant* माजलेला, खूप, बेसुमार, माजाचा. ४ *prevailing* प्रचलित, दाट पसरलेला.

Ram'pantly *adv.* माजानें, उतानें, ऊत येऊन, बेसुमार.

Rampart (ram'-part) [Fr.–L. *re*, and *parere*, to prepare.] *n.* *a projecting wall* संरक्षणाकरितां घातलेली भिंत *f.* २ (in fortification) *a bulwark* तट *m*, किल्ल्याची भिंत *f.* ३ (*fig.*) *defence, protection* संरक्षणाचें साधन *n*, संरक्षण *n.* R. *to fortify or protect with a rampart* तटबंदी करणें, तट घालणें, तट उभारणें.

Rances'cent *a.* खंवट होणारा, खंवट होऊं लागलेला.

Ranch (ransh) [Sp. *rancho*, a number of persons who feed together.] *n. a cattle-breeding establishment* गुरांची वाढ करण्याची जागा *f*, गोस्थान *n.* R. *v. i. to rear cattle in a ranch* गोस्थानांत गुरांची वाढ करणें.

Rancid (ran'-sid) [L. *rancidus*, putrid.] *a.* खंवट, खंवचट, वासट, वाशेळा.

Ran'cidly *adv.* खंवटपणानें, खंवट वासानें.

Ran'cidness, Rancid'ity *n.* खंवटपणा *m*, वासटपणा *m.*

Rancour (rang'kur) [L. *rancidus*, stinking.] *n. deep-seated enmity, spite* चुरस *f*, हाडवैर *n*, दीर्घद्वेष *m*, द्रोह *m.*

Ran'corous *a. malicious, virulent* वैमनस्याचा, द्वेषी, चुरसी, खुनसी, दीर्घद्वेषी, द्रोही, द्रोहाचा, हाडवैराचा.

Ran'corously *adv.* हाडवैरानें, वैमनस्यानें.

Rand (rand) [Dutch *rand*, a border.] *n. a strip, margin, border* (of land, cloth, &c.) (जमिनीचा) तुकडा *m*, (कपड्याचा) तुकडा *m*, चिंधी *f*, (नदीचा) कांठ *m*, किनारा *m.* २ *a thin inner shoe-sole* बुटाचा आंतील पातळ तळ *m*- तळवा *m.* ३ (in S. Africa) *highlands on either side of a river valley* सडा *m*, टेंब *m.* [THE R. जोहान्सबर्ग.]

Random (ran'-dum) [Of doubtful origin.] *a. without calculation or method* बिनहिशोबी, योजनेवांचून केलेला, सहज सुचेल तसा, धोरणावांचूनचा, लहर लागेल तसा, यदृच्छेनें होईल तसा, नेमावांचूनचा, भरमसाट. [AT RANDOM, *by chance* सहज, सहजगत्या, यदृच्छेनें, नेमावांचून. २ *without purpose or consideration* विचार न करतां, पूर्वयोजनेवांचून, ठराविक धोरणाशिवाय, वाटेल तसें. TO TALK AT RANDOM हवें तें बोलणें, बरळणें, भरकटणें.]

Range (rānj) [O. Fr. *ranger*, row, rank.] *v. t. to place or arrange in a row, rank, or order* रांगेनें उभें करणें, रांगेनें मांडणें, रांगेंत मांडणें, ओळींत मांडणें -रचणें -ठेवणें, बेतानें ठेवणें, बेतानें उभें करणें, (रांगेंत-ओळींत) रचना *f* -व्यवस्था *f.* करणें *g. of o.* २ (reflexively and figuratively) *to espouse a cause, to join a party* (-च्या) बाजूला -पक्षाला मिळणें; as, "To R. oneself on the side of the poor." ३ *to dispose in a classified or systematic order* (विशिष्ट) वर्गांत घालणें, (विशिष्ट) जातींत -उपजातींत घालणें

-मांडणें; as, "To R. plants and animals in genera and species." ४ *to rove over or through* भटकणें, फिरणें; as, "To R. the fields." ५ *to sail or pass in a direction parallel to or near* कडेनें -बाजूनें चालणें -जाणें -हाकारणें. R. *v. i. to be placed in order* रांगेनें असणें, रांगेंत असणें; as, "Trees *ranged* in an ascending scale of height." २ *to lie or to be found over a particular district* विशिष्ट ठिकाणीं रहाणें-वस्ती करणें, विशिष्ट प्रदेशांत असणें-फिरणें, विशिष्ट प्रदेशांत फिरतांना -हिंडतांना दिसणें -आढळणें; as, "Nightingale *ranges* from the Channel to Warwickshire." (b) *to vary within limits* (विशिष्ट मर्यादेंत) मागेंपुढें होणें, खालींवर चढणें, सरकणें, कमीजास्त होणें; as, "Barometer *ranges* between o' and 100'". ३ *to lie in a given direction* विशिष्ट दिशेला असणें, (-च्या) बाजूला असणें; as, "The ship *ranges* along the sea." ४ *to be level with* (-शीं) जुळणें, जमणें; as, "A 12 *mo* does not R. with a folio." ५ *to rank or find place with or among* (-च्या) रांगेंत बसणें -असणें, (-च्या) वर्गांत असणें, (-च्या) बरोबर जागा *f*-स्थान *n.* असणें; as, "*Ranges* with the great writers." ६ *to rove, to wander* (with *along, through, over,* &c.) (-वरून) जाणें, (कडेनें) जाणें, बाजूनें जाणें; as, "To R. along the coast; His thoughts R. over past, present, and future; He *ranges* over a mile." ७ (of gun) विशिष्ट अंतरापर्यंत -पल्ल्यापर्यंत -टप्प्यापर्यंत जाणें -मारा करणें.

Range *n. row, line* रांग *f*, ओळ *f*, हार *f*, श्रेणि *f*; as, "The R.of mountains." २ *lie or direction* दिशा *f*, ओळ *f*, रेषा *f*, रांग *f*; as, "The R. of the strata is east and west." ३ *stretch of grazing or hunting ground* मोठें कुरण *n.* (b) शिकारीची जागा *f.* ४ *a piece of ground with targets for shooting* चांदमारीचें मैदान *n*, चांदमारीचा पल्ला *m.* ५ *area over which a plant, &c., is distributed* वसतिप्रदेश *m*, जंगलाचा प्रदेश *m.* ६ *sphere, scope, compass* क्षेत्र *n*, आवांका *m*, विषय *m*, मर्यादा *f*, मर्यादाक्षेत्र *n.* ७ *distance attainable by a gun or a projectile* टप्पा *m*, पल्ला *m*, छट्टा *m*, मारा *m*, पोहोंच *m.* [Of a long R. (*gun*) पल्लेदार.] ८ *cooking fireplace with ovens, boilers, &c.* (लोखंडी) चुलींची रांग *f.* ९ *step of a ladder* पावटा *m*, पायंडा *m*, पायरी *f.*

Ran'ger *n.* Form nouns from the Verb. २ *a wanderer* भटकणारा *m.* ३ *a dog that beats the ground in search of game* रान उठवणारा कुत्रा *m.* ४ (*pl.*) *body of mounted troops* घोडदळ *n*, घोडेस्वार *m. pl.* ५ जंगलखात्याचा अधिकारी *m*, रेंजर *m.*

Range-finder *n.* निशाणाचें अंतर मोजण्याचें यंत्र *n.*

Rank (rank) [Fr. *rang*, cognate with ring.] *n. a row, a line* (भाड्याच्या गाड्यांची) रांग *f*, ओळ *f.* २ *number of soldiers drawn up in a single line* शिपायांची रांग *f*, हार *f*, ओळ *f.* [Front R.

अघाडीची रांग *f*, समोरची रांग *f*. REAR R. पिछाडीची रांग *f*. THE RANKS WERE BROKEN रांग मोडली, हार फुटली. THE RANKS OR THE R. AND FILE सैन्यांतील खालच्या शिपायांच्या रांगा *f. pl.* २ *lower classes or ordinary undistinguished people* खालच्या वर्गाचे लोक *m. pl.* TO RISE FROM THE RANKS शिपायापासून अंमलदारापर्यंत चढणें. २ कर्तबगारीनें खालून वर चढणें. ] ३ *order*, रांग *f*, ओळ *f*, रांगेतील अनुक्रम *m*; as, "To keep R." [ TO BREAK R. रांग सोडणें, अनुक्रम मोडणें. ] ४ *distinct social-class, grade of dignity, station,* &c. दर्जा *m*, वर्ग *m*; as, "People of all *ranks*." [PERSONS OF RANK सरदारघराण्यांतील लोक *m. pl.* R. AND FASHION, *high society* उच्च समाज *m*; वडे लोक *m. pl.* TO TAKE R. OF (-हून) दर्जा श्रेष्ठ असणें.] ५ *place in a scale* स्थान *n*, जागा *f*, नंबर *m*; as, "The first R. must be given to the rose." R. *v. t. to set in line* (शिपाई) रांगेनें उभे करणें, ओळीनें बसविणें -उभे करणें. २ *to put in regular order or position* वर्गवारी लावणें, प्रतवारी करणें. R. *v. i. to have a rank or place* स्थान *n* -जागा *f*. असणें, गणना *f*. असणें -होणें *g. of s.*, बरोबरीचा -तोलाचा असणें; as, "*Ranks* among the Great Powers."

Rank (rank) [A. S. *ranc*, proud, strong.] *a. too luxuriant* माजाचा, उफाड्याचा, बोकडलेला, माजलेला; as, "Roses are growing R." [ TO RUN R. माजणें, बोकडणें. ] २ *foul-smelling* वासट, वाशेळा, वाशेरा, वासकट, खंवट, खंवचट. ३ *strong-scented* उग्रट, उग्र. ४ *utter* कमालीचा, पूर्ण, शुद्ध, निखालस, as, "R. nonsense; R. treason; R. pedantry."

Rank'ly *adv. to an inordinate degree* खूप, अतिशय, बेसुमार; as, "Weeds grow *rankly*."

Rank'ness *n. exuberant growth* माज *m*, मात *m*, उफाडा *m*. २ वासटपणा *m*, खंवटपणा *m*.

Rankle (rangk'l) [From *rank*, (*a.*)] *v. i.* (of envy, disappointment, &c. or their cause) *to give constant pain* सलणें, टोंचणें, लागणें, खुपणें, डंवचणें.

Ransack (ran'sack) [Ic. *rannsaka*, to search a house.] *v. t. to search thoroughly* धुंडाळून पहाणें, धुंडाळणें, धांडळणें, चाळणें, चाळून पाहाणें, शोधून पहाणें. २ *to plunder, to pillage* लुटणें, लुटालूट करणें.

Ransom (ran'sum) [Fr. from the root of *redemption q. v.* ] *n. redemption* सुटका *f*, बंधमुक्तता *f*, सोडवणूक *f*. २ *the price paid for redemption* खंडणी *f*, दंड *m*. R. *v. t. to set free from captivity* (खंडणी भरून) सुटका करणें, सोडवणें, मुक्त करणें. R. bill, R. bond *n.* खंडणी देण्याचा -दंड देण्याचा लेखी करार.

Ran'somable *a.* खंडणी भरून सोडवतां येण्यासारखा.

Rant (rant) [O. Dut. *ranten*, to rave.) *v. i. to use extravagant language, to be noisy in words* अवडंबराची भाषा वापरणें. (b) अवडंबरानें बोलणें.

(c) बडबडणें, बडबड लावणें, सतरापंधरा गोष्टी सांगणें, भकणें. R. *n. empty declamation, bombast* शब्दावडंबर, शब्दावडंबराची भाषा *f.* २ बडबड *f,* वटवट *f.* Rant'er *n.* बडबडणारा *m,* बडबड्या *m.* Rant'ing *n.* बडबडणें *n,* भकणें *n.* R. *pr. p. a.* शब्दावडंबराचा, बडबडीचा.

Ranula (ran'-yu-lah) [ Dim. of L. *rana,* frog, from some fancied resemblance. ] *n.* ( *med.* ) जिभेच्या खालीं होणारा जलग्रंथि *m,* जिव्हाधोजलग्रंथि *m.*

Rap ( rap ) [Probably of imitative origin.] *n. a smart slight blow* तडाका *m,* तडाखा *m,* रपका *m,* रपाटा *m,*; चपका *m,* थाप *f,* काठी *f,* छडी *f.* [A R. ON THE KNUCKLES ( मुलांच्या हाताच्या ) पेरावर ( शिक्षा म्हणून ) दिलेला तडाका *m* -रपाटा *m.* २ (*fig.*) रागें भरणें *n,* कान उपटणें *n.*] २ *sound made by the knocker on the door* दरवाजावरील ठोक्याचा आवाज *m,* ठोका *m.* [WITH A R. चणकर, चणकन, थाडकन, थाडकर, फटकन, फटकर; ( of a whip, cane, &c.) ताडकन, ताडकर.] R. *v. t. to strike* ( *esp.* a person's knuckles ) *smartly* तडाका ओढणें, रपका मारणें, छडी मारणें. २ *to utter abruptly* धसकावून बोलणें, ऐटींत ठोकून देणें, कडकावणें, धडकावणें; as, "To R. out a lie." ३ *to knock on* ठोकणें, ठोठावणें, तडकावणें; as, "With one great peal they R. the door." ४ ( फर्मा मातीच्या सांच्यांतून बाहेर काढण्याकरितां ) ठोकणें, ठोकून बाहेर काढणें. R. *v. i. to knock* ठोठावणें, थाप मारणें; as, "*Rapped* at the door, on the table, &c." R. *interj.* रप, रपकण, रपकर, फटकन, फटकर.

Rap ! Rap ! रपरप or पां, तडतड or डां, थडथड or डां, चणचण or णां, फटफट or टां, फडफड or डां; *intens.* रपारप, रपापां, तडातड, तडाडां, थडाथड, थडाडां, थाडथाड, फटाफट, फटाटां, फडाफड, फडाडां or छडाछड.

Rap ( rap ) [O. E. *rapen,* akin to Dutch *rapen,* to snatch.] *v. t. to snatch away* पळवणें, पळवून नेणें, रपाटणें, रगडणें, हात मारणें. २ *to affect with ecstasy or rapture* ( हर्षातिरेकानें ) मोहून टाकणें, वेडावून टाकणें; as, "*Rapt* into admiration." ३ तन्मय करणें, तल्लीन करणें.

Rap ( rap ) [Of doubtful origin.] *n. a lay or skein containing 120 yards of yarn* १२० वार लांब सुताची लडी *f.*

Rap ( rap ) [Of doubtful origin.] *n. any coin of trifling value* आयर्लंडांतील कनिष्ठ नाणें, रॅप. [NOT TO CARE A R., *to care nothing* मुळींच पर्वा न करणें. NOT WORTH A R. कवडी किंमतीचा.]

Rapacious (ra-pā'shus) [L. *rapax,* grasping-*rapere,* to seize.] *a. given to plunder* लुटारू, लुटारा, लुटालूट करणारा, जबरदस्तीनें घेऊन जाणारा. २ *subsisting on prey* हिंस्र, शिकारी, शिकार करून रहाणारा. ३ *greedy* लोभी, लोभट, अपहारबुद्धि, बुचाडणारा, लुबाडणारा; as, "R. usurers." ४ *ravenous, voraci-*

*ous* खादाड, अधाशी, आस्तुटा. (b) खादाडपणाचा, जबरदस्त, दांडगा; as, "R. appetite."

Rapa'ciously *adv.* लुटारूपणानें, लुटालूट करून. २ लोभानें, अपहारबुद्धीनें. ३ अधाशीपणानें, खादाडपणानें.

Rapa'ciousness, Rapac'ity *n.* लुटारूपणा *m*, लुटारूगिरी *f.* २ हिंस्रपणा *m*, हिंस्रता *f.* ३ लोभ *m*, अपहारबुद्धि *f.* ४ खादाडपणा *m*, अधाशीपणा *m*; as, "The R. of wolves."

Rape (rāp) [Probably from L. *rapere*, to seize.] *n.* (*poet.*) *carrying off by force* लूट *f*, जबरदस्ती *f*, अपहरण *n*, अपहार *m*; as, "And ruined orphans of thy *rapes* complain." २ *ravishing or violation of a woman* जबरीचा संभोग *m*, जुलमाचा संभोग *m*, बलात्काराचा संभोग *m*, जबरी *f*, जुलूम *m*, बलात्कार *m*, हठधर्षण *n*, हठसंभोग *m*. R. *v. t.* (*poet.*) *to take by force* लुटणें, जबरदस्तीनें नेणें, अपहार करणें. २ *to commit rape upon* (a woman) बलात्कार *m*. करणें, जबरी *f* -जुलूम *m*. करणें, गहजब करणें, (-ची) अब्रू घेणें.

Rape-oil *n.* शिरसाचें तेल *n*.

Rape-seed *n.* शिरस (बीं).

Raphe (rā'-fē) [Gr. *raphi*, suture.] *n.* शिवण *f*, सीवनी *f.* [R. OF THE PERINEUM गुदद्वाराच्या पुढील शिवण *f*, गुदद्वारपुरःसीवनी *f*.]

Raphides (raf'i-dēz) [Fr. *raphide.*] *n. pl.* (*bot.*) वनस्पतिपेशींतील स्फटिक. हा आक्झलेट ऑफ् लाईमचा बनतो. [ACICULAR R. सूच्याकार किंवा सुईसारखे वनस्पतिस्फटिक. GLOMERATE R. वाटोळे वनस्पतिस्फटिक.]

Raphigraph (raf'i-grāf) [Gr. *rhaphis*, a needle, and *graphein*, to write.] *n.* आंधळ्याकरितां टाइपरायटर. या यंत्रानें कागदावर सुईनें टोंचल्यासारखीं अक्षरें उमटतात.

Rapid (rap'id) [L. *rapidus -rapere*, to seize.] *a.* *moving with great speed* जलद वाहणारा, जोरानें जाणारा -चालणारा, शीघ्र, वेगाचा, वेगवान्; as, "A R. stream; A R. motion." २ *advancing with haste or speed* जलदीचा, भराभर होणारा, जोराचा, थोड्या वेळांत पुरा केलेला; as, "A R. growth, A R. sketch; A R. succession." ३ *quick in execution*, झपाझप उरकणारा, उरकाचा, चपळ, चलाख; as, "A R. penman." ४ (of photographic lenses or plates) *acting with or requiring only, a short exposure* थोडा वेळ सूर्यप्रकाशांत ठेवल्यानें कामास येणारा, शीघ्रग्राही. ५ (of slope) *descending steeply* मोठा, जोराचा, (*colloq.*) उंचीचा. R. *n.* (usually in *pl.*) *a very swift headlong current* जोराची धार *f*, जोराचा प्रवाह *m*.

Rapid'ity *n.* *swiftness* जलदी *f*, शीघ्रता *f*, त्वरा *f*. २ जोर *m*, वेग *m*.

Rap'idly *adv.* जलद, जलदीनें. २ जोरानें, वेगानें.

Rapier (rā'pi-ėr) [Of doubtful origin.] *n.* *a small, light sword, for thrusting* खांडा *m*.

Rapine ( rap'in ) [ L. *rapina -rapere*, to seize. ] *n. plundering, robbery* लूट *f*, लुटालूट *f*, धुंडाई *f*, मूठमर्दाई *f*, जबरदस्ती *f*, जुलूम *m*.

Rapport ( ra-port' ) [ Fr. *rapport*, relation –L. *re-* and *portare*, to carry. ] *n. relation, correspondence* संबंध *m*. [ Ex. R. ( मूर्च्छनेला ) अनुकूल. ] २ एकतानता *f*.

Rapprochement ( rap-prōsh-man' ) [ Fr. ] *n. re-establishment or recommencement of harmonious relations, esp. between States* ( दोन राज्यांत किंवा पक्षांत झालेला) सलोखा *m*, समेट *m*, पुनरैक्य *n*.

Rapscallion ( rap-skal'-yun ) [ Earlier *rascallion*, probably from Rascal. ] *n. a vagabond* उडाणटप्पू *m*. २ *a rogue* लुच्चा *m*, ठक *m*.

Rapt ( rapt ) [ L. *raptus, pa. p. of rapere*, to seize. ] *a. enraptured* तल्लीन झालेला, तल्लीन, तन्मय, हर्षभरित; as, "The R. musician." २ *wholly absorbed* गर्क, गढून गेलेला, निमग्न (झालेला); as, "R. in secret studies."

Rapture ( rap'tūr ) [ L. *rapere, raptum*, to carry off by force. ] *n. extreme joy or pleasure* अत्यानंद *m*, आल्हाद *m*, अत्यानंदस्थिति *f*. [ To be in *or* to go into Rs. रंगांत येणें, ( -ला ) रंग चढणें, खुशींत येणें, खुलणें. Rs. *vehement pleasure or the expression of it* हर्षोन्माद *m*, परमाल्हाद *m*.] Rap'turous *a. ecstatic* अत्यानंदाचा, अत्यानंददायी. [ R. joy परमानंद *m*.] २ *manifesting rapture* अत्यानंदाचा, आनंदसूचक, आनंददर्शक; as, "R. applause." Rap'turously *adv.* अत्यानंदानें.

Rare ( rār ) [ Fr.–L. *rarus*, thin. ] *a. thin, not dense* पातळ, विरळ, विरल, सूक्ष्म. २ *seldom met with* विरळ, थोडा, थोडका, दुर्लभ, दुर्मिळ, अलभ्य. ३ *excellent* सरस, नामी, उत्कृष्ट, अपूर्व.

Rarefac'tion *n. act of rarefying* पातळ करणें *n*, विरळ करणें *n*, विरळ होणें. २ *expansion of aëriform bodies* विरलीकरण *n*, विरलीभवन *n*.

Rar'efiable *a. capable of being rarefied* विरळ करण्याजोगा, विरलीकरणयोग्य, विरलीभवनयोग्य, पातळ करण्याजोगा, पातळ होण्याजोगा.

Rarefy ( rar'i-fī or rāre-fī ) *v. t. to expand a body* विरळ करणें, पातळ करणें, विरल करणें. २ *to purify, to refine* ( person's nature ) शुद्ध करणें, दोष कमी करणें. ३ *to make ( idea ) subtle* अधिक सूक्ष्म करणें, जास्त सूक्ष्म करणें. R. *v. i. to become less dense* विरल होणें. Rar'efied *pa. t.* R. *pa. p.* विरल केलेला, विरळ केलेला, पातळ केलेला. २ शुद्ध केलेला. ३ अधिक सूक्ष्म केलेला. [ R. waves ( *phys.* ) विरलीकृत लहरी. ]

Rārely *adv. seldom* विरळा, क्वचित, कधींमध्हत, कदाकाळीं.

Rāreness, Rarity ( rar'i-ti ) *n. state of being rare, scarcity* विरळपणा *m*, विरलता *f*, वैरल्य *n*, दौर्लभ्य

*n*, दुर्मिळता *f*. २ *tenuity, thinness* विरळपणा *m*, पातळपणा *m*. ३ *uncommonness, excellence* सरसपणा *m*, सरसता *f*, अपूर्वाई *f*. ४ *a thing valued for its scarcity* दुर्लभ वस्तु *f*, दुर्मिळ -अपूर्व &c. पदार्थ *m* -वस्तु *f*, &c. अपूर्व चीज *f*, उंबराचें फूल *n*.

Raree-show ( rār'ē-shō ) [ Perhaps=Rare show as pronounced by Savoyard showmen. ] *n. a peep-show* ( फिरवून दाखविण्याची ) चित्रांची पेटी *f*.

Ras algethi *n*. ( *astron.* ) L. *alpha Herculis*. शौरी राशींतील सहावी तारा.

Ras alhague *n*. ( *astron.* ) L. *alpha Ophinchi* भुजगधारी राशींतील नववी तारा.

Rascal (ras'kal) [Perhaps from O. Fr. *rascaille*, rabble. ] *n. a dishonest fellow, a wretch* लुच्चा *m*, पाजी, हुच्चा, सोदा, हरामी, काबू, काबूयार, गुलाम, गुलामजादा, खट. (b) ( often playfully to child, &c. ) गुलाम, लुच्चा, पाजी; as, "You lucky R.!"

Ras'calism, Rascal'ity *n. mean trickery, dishonesty, villainy* लुच्चेगिरी *f*, सोदेगिरी *f*, पाजीपणा *m*, लबाडी *f*, लबाडीलचाडी *f*, लबाडीलाताडी *f*, पाजीपणाचें कृत्य *n*.

Ras'cally, Ras'cal-like *a. mean, base* लुच्चा, पाजी, लुच्चेशाई, सोदेशाई, खटनट, लुच्चेगिरीचा, सोदेगिरीचा, पाजीपणाचा. २ (often humorously) लुच्चा, पाजी; as, "Our R. porter is fallen fast asleep."

Rase (rāz) [L. *radere*, to scrape. Older form of Raze, now little used.] *v. t.* (rare except figuratively) *to scratch or blot out* पुसणें, पुसून टाकणें; as, "To R. a person's name from remembrance." २ ( town, house, walls, &c., usually *to the ground.*) जमीनदोस्त करणें, पाडणें, पाडून टाकणें, मोडणें, मोडून टाकणें.

Rash ( rash ) [ L. *radere*, to scrape.] *n. a slight eruption on the skin* पुरळ *m*, पुरूळ *m*, कोंडा *m*, उगवण *n*. [ BILIOUS R. पितांवी *f*, पित्ताच्या गांधी *f. pl.* TO HAVE A R. पुरळ येणें. ]

Rash (rash) [ Scand. *rask*, quick.] *a*. (of persons) *hasty, headstrong* अविचारी, उतावळा, उतावीळ, हुड, हुरमट, माथेफिरू, दांड, धसक्या, धडफड्या, अदूरदर्शी. २ (of measures, &c.) अविचाराचा, अदूरदर्शी, उतावळीचा, उतावळेपणाचा, घाईचा, धडपडीचा, कच्चे मसलतीचा, साहसाचा.

Rash'ly *adv*. अविचारानें, उतावळेपणानें, हूडपणानें.

Rash'ness *n*. अविचार *m*, उतावळेपणा *m*, हूडपणा *m*, अविचारिता *f*, साहस (S.) *n*.

Rasp (rasp) [ O. Fr. *rasper*, Fr. *raper*, to grate. ] *v. t. to rub with a coarse file* कानशीनें घांसणें, कानसणें; as, "To R. wood to make it smooth." २ *to grate harshly upon* ( -ला ) कर्कश लागणें; as, "Some sounds R. the ear." (b) *to offend* संताप आणणें, लागणें, झोंबणें; as, "His insults *rasped* my

temper." R. *v. i. to have a grating effect* कर्कश लागणें, कर्कश वाटणें. R. *n. a coarse file* कानस *f*.

Raspatory (ras'pa-tō-ri) [O. Fr. *rasper* -Fr. *raper*. to scrape.] *n.* कुसलेलें हाड खरवडून काढण्याचें शस्त्र *n*, (शस्त्रवैद्याचें) घर्षणयंत्र *n*, कानस *f*, घर्षणी *f*.

Rasp'er *n. that which rasps* किसणी *f*, क़ानस *f*.

Rasp'ing *n. filing* कानसणें.

Ras'ping *a. exasperating* संताप आणणारा, संतापजनक, उद्वेगजनक.

Raspberry (raz'ber-i) [Of doubtful origin.] *n.* राझबेरी (लहान वृक्ष). २ राझबेरी (फळ).

Rat (rat) [Of doubtful origin.] *n.* उंदीर *m*, मूषक *m*, घूस *f*. [To SMELL A R, *to have suspicions* शंका *f*. संशय *m*. येणें-वाटणें, वहीम येणें, (-चा) वास येणें-लागणें. A FIELD-RAT शेतांतला उंदीर *m*, रानउंदीर *m*, घुरप्या उंदीर *m*.] २ *a turn-coat* (अडचणीच्या वेळीं) स्वतःचा पक्ष सोडणारा *m*, स्वतःची बाजू सोडणारा *m*, फुटणारा *m*, फुटून जाणारा *m*. ३ (a) (ट्रेडयुनियननें ठरविलेल्या मजुरीपेक्षां) कमी मजुरीवर येणारा *m*, ट्रेडयुनियनच्या बाहेरचा *m*. (b) संपांत सामील न होणारा, संपाच्या बाहेरचा. (c) संपवाल्याच्या जागीं काम करणारा *m*. R. *v. t.* (of person *or* dog) *to hunt or kill rats* उंदीर मारणें, उंदरांची शिकार करणें. R. *v. i.* (*colloq.*) *to desert one's party* (अडचणीच्या वेळीं) आपला पक्ष सोडणें, (आपल्या पक्षांतून) फुटणें. २ (a) कमी मजुरीवर कामास जाणें. (b) संपांत सामील न होणें. (c) संपवाल्याच्या जागीं काम करणें. Ratted *pa. t. & pa. p.* Rat'-catch'er *n.* उंदीर पकडणारा *m*, उंदीरमाऱ्या *m*. Rat'-pit *n.* उंदीर मारण्याचा खळगा *m*. Rat'-poi'son *n.* उंदीर मारण्याचें विष *n*. या विषांत सोमल असतो. Rat's-bane *n.* (सोमल वगैरे) उंदीर मारण्याचें औषध *n*. Rat'ter *n.* (उंदीर मारणारा) टेरियर कुत्रा *m*. २ स्वपक्ष सोडणारा *m*, (स्वपक्षांतून) फुटणारा *m*. Ratt'ing *n.* स्वपक्ष सोडणें *n*, (स्वपक्षांतून) फुटणें *n*. २ कमी मजुरीवर काम करणें *n*. ३ उंदीर मारण्याकरितां कुत्र्याला सोडणें. Rat'-trap *n.* (उंदराचा) सांपळा *m*, पिंजरा *m*, चाप *m*.

Ratabil'ity *n.* करपात्रता *f*, पट्टी बसविण्याची पात्रता *f*.

Ra'table *a. subject to be rated* कर बसविण्याजोगा, करास पात्र; as, "A R. estate."

Ratch (rach), Ratchet (rach'-et) [Perhaps from Fr. *rochet*, a kind of lance-head.] *n.* दांतवाली पट्टी *f*, ऱ्याक *f*. (b) (लंबकावरील) धरसोडीचें चक्र.

Ratchet-wheel *n.* कुत्रेंवालें (दांतवालें) चक्र *n*, राचेट.

Rate (rāt) [L. *ratus*, fixed -*reri*, to reckon.] *n.* *proportion, standard* प्रमाण *n*, मान *n*; as, "The death-*rate*." २ *relative speed* (चालीचा) वेग *m*, चाल *f*; as, "Going at the R. of six miles an hour." ३ *value* दर *m*, भाव *m*, धारण *f*, किंमत *f*, मोल *n*; as, "Can have them at the R. of one rupee a hundred." ४ *tariff charge* भाडें *n*, भाड्याचा दर

*m*, उताराचा दर *m*, उतार *m*; as, "The high *rates* charged by the railways." ५ *speed* वेग *m*, प्रमाण *n*; as, "Pauperism increases at a fearful R." ६ *assessment levied by local authorities for local purposes* पट्टी *f*; as, "Municipal *rates*." [R. PAYER पट्टी भरणारा.] ७ (*archaic* except in First R., Third R. &c.) वर्ग *m*, प्रत *f*.

Rate *v. t. to estimate the worth or value of* लेखणें, मानणें, गणणें, मोजणें; as, "I do not R. his merits high." २ *to assign fixed value to* (coin, metals) *in relation to monetary standard* लेखणें, किंमत ठरवणें, दर *m* -भाव बसवणें -ठरवणें; as, "Copper coinage is *rated* much above its real value." ३ *to consider, to regard* लेखणें, समजणें, मोजणें, मानणें; as, "I R. him among my benefactors." ४ (*usu.* in pass.) *to subject to payment of a local rate* (स्थानिक) कर बसविणें, (स्थानिक) कर द्यावयास लावणें; as, "We are highly *rated* for education." [To R. UP (विम्याचा नेहेमींपेक्षां) अधिक हप्ता घेणें -बसविणें.] R. *v. i. to rank or be rated as* (-च्या) वर्गांत मोडणें, (-च्या) वर्गांत गणला -समजला जाणें.

Rate (rāt) [Of doubtful origin.] *v. t. to scold, to reprove harshly* खरडपट्टी *f*. काढणें, उडवणें, कानउघाडणी *f*. करणें.

Rate'-book *n.* (भाड्याच्या) दरांचें पुस्तक *n*.

Rat'er *n.* दर करणारा, दर ठरवणारा, प्रत लावणारा *m*.

Rather (räth'er) [A. S. *hrathor.*] *adv. to a great extent* बऱ्याच अंशीं, पुष्कळ अंशीं; as, "Is R. good than bad." २ *more truly, to be more precise* वास्तविक पाहतां, यथार्थ पाहूं गेल्यास; as, "Orderliness is not the result of law; R. it is the cause of it." ३ *in a modified way, slightly* अमळ, अमळसा, कांहीं, कांहींसा, कांहींबाहीं, जरा, जरासा, जराक, जराकसा, इवला, इवलासा, थोडाबहुत, थोडासा, किंचित्; as, "The performance was R. a failure; was R. good." ४ *by preference* फार करून, बहुतांशीं; as, "Would much R. not go." ५ (*colloq.* in answers) *yes, without doubt* निःसंशय, खास, खात्रीनें, खात्रीपूर्वक; as, "Have you been here before?—Rather!" [RATHER BETTER THAN, *somewhat in excess of* पेक्षां अधिक चांगला -बरा. THE RATHER, *by so much the more* विशेषतः, खास करून.]

Ratifica'tion *n.* मंजूर करणें *n*, मुक्रर करणें *n*. २ कबूल करणें *n*, पसंत करणें *n*. ३ अनुमति *f*, संमति *f*, मंजुरी *f*, कबुली *f*, मान्यता *f*.

Rati'fier *n.* मंजूर करणारा *m*, पसंत करणारा *m*, कबूल करणारा *m*.

Ratify (rati'-fī) [L. *ratus*, fixed by calculation, & *facere*, to make.] *v. t. to sanction, to settle* (सही घालून किंवा संमति देऊन) मंजूर करणें, मुक्रर करणें, कायम करणें, मंजुरी देणें, संमति देणें. Rati'fied *pa. t.*

**Rating** ( rā'ting ) [ From to Rate. ] *n. the fixing of rates* दर *m.* लावणें -ठरवणें *n,* प्रतबंदी करणें *n.* २ *classification according to value* ( किंमतीप्रमाणें-किंमतीवरून ) वर्गावर्गी *f,* वर्गीकरण *n,* प्रतवारी *f.* ३ *the position, class, &c. which a man holds on a ship's books* उतारूचा ( गलबतावरील ) वर्ग *m.*

**Ratio** ( rā'shi-ō *or* rā'sho ) [L. *ratio*, reckoning.] *n.* (*math.*) गुणोत्तर *n,* निष्पत्ति *f,* प्रमाणपद *n,* ( दोन संख्यांचा ) संबंध, मानतारतम्य. [ R. OF EXCHANGE विनिमयनिष्पत्ति. R. OF EQUALITY साम्याचें गुणोत्तर, साम्यगुणोत्तर. RATIO OF GREATER INEQUALITY अधिक असाम्याचें गुणोत्तर, अधिकासाम्यगुणोत्तर. R. OF LESS INEQUALITY कमी असाम्याचें गुणोत्तर, न्यूनासाम्यगुणोत्तर. INVERSE R. व्युत्क्रमनिष्पत्ति. DUPLICATE R. वर्गगुणोत्तर. TRIPLICATE R. घनगुणोत्तर. SUB-DUPLICATE R. उपद्विगुणगुणोत्तर. SUB-TRIPLICATE R. उपत्रिगुणगुणोत्तर. UNHARMONIC R. नैकतान गुणोत्तर. COMMON R. सामान्य गुणोत्तर. SES-QUIPLICATE R. सार्धगुण गुणोत्तर. EXTREME AND MEAN R. अन्त्यमध्यगुणोत्तर. ANTECEDENT OF A R. गुणोत्तराचें अग्रेसरपद. CONSEQUENT OF A R. गुणोत्तराचें उपाग्रसर-पद. ] २ दर *m,* प्रमाण *n,* मान *n.*

**Ratiocinate** (rash-i-os'i-nāt) [L. *ratiocinatus, pa. p. of ratiocinari*, from *ratio*, reason.] *v. i. to reason* ( तर्कशास्त्राच्या पद्धतीनें ) तर्कपद्धतीनें विचार करणें.

**Ratiocin'ation** *n.* तर्कशास्त्राच्या पद्धतीनें विचार करणें *n.* (b) तर्कपद्धति *f.*

**Ration** (rā'shun) [See Ratio.] *n. a daily allowance to a soldier or sailor* रासन ( Corruption of English *Ration* ), रतीब *m,* शेर *m,* शिधा *m.*

**Rational** ( rash'on-al) [ See Ratio. ] *a. endowed with reason* बुद्धिविशिष्ट, बुद्धिसंपन्न, विचारशक्ति-संपन्न, बुद्धि असणारा. [ R. CREATURE बुद्धिविशिष्ट प्राणी *m.*] २ *pertaining to or agreeable to reason* बुद्धीचा, बुद्धीला पटणारा, बुद्धिसंमत, युक्त, विचारसिद्ध, युक्ति-सिद्ध, सयुक्तिक. [ R. FAITH सयुक्तिक श्रद्धा *f.* R. THEOLOGY बुद्धिसंमत ब्रह्मज्ञान.] ३ *judicious* विचारी, विचाराचा, पोक्त, समंजसपणाचा. ४ (*math.*) अकरणी-गत. [ R. FUNCTION अकरणीगत फल.] ५ भूमीच्या मध्यांतून जाणारा, भूमिमध्यग, वास्तव; as, R. horizon.

**Rationale** (rash-i-o-nālē) [See Ratio.] *n. a theoretical explanation or solution* उपपत्ति *f,* कार्यकारण-परंपरा *f,* प्रमाणें *n. pl.,* आधार *m.*

**Rationalism** ( rash'un-al- izm ) *n. a practice of explaining the supernatural in religion in a way consonant with reason* (धर्माच्या बाबतींत बुद्धीला पटतील अशा गोष्टींवरच विश्वास ठेवणें हा ) बुद्धिप्रामाण्याचा वाद *m,* बुद्धिप्रामाण्यवाद *m,* बुद्धिवाद *m.* २ *theory that reason is the foundation of certainty in knowledge* ( opposed to *empiricism, sensationalism* ) ( ज्ञान हें बुद्धिमूलक आहे असा ) बुद्धिमूलकज्ञानवाद *m,* बुद्धिवाद *m.*

**Ra'tionalist** *n.* बुद्धिप्रामाण्यवादी *m,* बुद्धिवादी *m.*

**Rationalist'ic** *a.* बुद्धिवादाचा, बुद्धिवादविषयक, बुद्धिवादात्मक. **Rationalist'ically** *adv.* बुद्धिवादानें, बुद्धिवादाच्या पद्धतीनें.

**Rational'ity, Rat'ionalness** *n.* बुद्धिविशिष्टता *f*, बुद्धिसंपन्नता *f*. २ ज्ञानशक्ति *f*, तर्कशक्ति *f*. ३ बुद्धिसंमतता *f*, युक्तता *f*, विवेक *m*, युक्ति *f*, समंजसपणा *m*.

**Rationaliz'ation** *n. subjection to rational principles* बुद्धिवाददृष्टीची उपपत्ति लाऊन सांगणें, औपपत्तिक विवेचन *n*, सोपपत्तिक विवेचन *n*, बुद्धिवाद्याला पटेल अशा भाषेंत सांगणें -मांडणें *n*.

**Rat'ionalize** *v. t. to make rational* बुद्धिवादाचा करणें. (b) बुद्धिवादी करणें. २ *to interpret like a rationalist* बुद्धिवादृष्टीची उपपत्ति लावणें -बसवणें, बुद्धिवाद्याच्या भाषेंत सांगणें, बुद्धिवादपूर्वक विवेचन करणें, बुद्धिसंमत कार्यकारणभाव लावणें. ३ *to think for oneself* (स्वतःच्या) बुद्धीला पटवून घेणें. ४ (*math.*) अकरणीरूप *n*. देणें. R. *v. i. to rely unduly or entirely on reason* (धर्मसंबंधीं गोष्टींत) बुद्धीलाच प्रमाण मानणें, बुद्धिवादाचा (फाजील) अवलंब करणें, बुद्धीच्या ताजव्यानें तोलणें.

**Ra'tionally** *adv. reasonably* बुद्धीला धरून, युक्तीला धरून, समंजसपणानें. २ बुद्धीला पटेल अशा रीतीनें, बुद्धिवादानें, तर्कशक्तीनें, समंजसपणानें, शहाण्यासारखा, शहाणपणानें, अकलेनें.

**Ratline, Ratlin** (rat-lin) [Of doubtful origin.] *n.* (डोलकाठीच्या दोरखंडांना बांधलेली) आडवी दोरी *f*.

**Ratoon** (ra-toon') [Of Anglo-Saxon origin.] *n.* *a new shoot from the root of a sugarcane* खोडवा *m*, खडवा *m*. (उंसाचा पहिल्या वर्षानंतरचा).

**Rattan, Ratan** (rat-t'an) [Malay *rotan.*] *n.* वेत *m*, वेत्र *n*, वेतस, वेतसी *f*. २ *a walking stick made of rattan* वेत *m*, वेताची काठी *f*, छडी *f*.

**Ratten** (rat'n) [Of doubtful origin.] *v. t.* (ट्रेड-युनियनमार्फत ठरलेल्या संपाच्या वेळीं हत्यारें काढून घेऊन किंवा यंत्रांची नासधूस करून) मजुराला किंवा कारखानदाराला त्रास देणें, -सतावणें, -छळणें.

**Rattle** (rat'l) [Of doubtful origin.] *v. i. to clatter* (गाडी वगैरे) खडखडणें, खरखरणें, (ढग) गडगडणें, घडघडणें, (वीज) कडकडणें. [To R. ALONG खडखडणें, खडखडत जाणें.] २ *to move along rapidly with a clattering noise* खळखळणें, खुळखुळणें, खळखळ &c. वाजणें. ३ (*the throat*) घरघरणें, खरखरणें, (-ला) घरघर लागणें -सुटणें. ४ *to speak eagerly and noisily* कडकडून -चराचर -लवलव &c. बोलणें, कडकडणें, भडभडणें, भडभड -भडभडां -&c. बोलणें. R. *v. t. to cause to make a clatter* खडखड वाजवणें, खळखळवणें, खणखणवणें, खडखडवणें. २ *to stun with noise* खडखड आवाजानें कानठाळया बसवणें. ३ *to speak rapidly* भरभर बोलणें, घाईनें बोलणें.

**Rat'tle** *n.* खडखडणें *n*, दणका *m*, -*intens.* खडखडाट *m*, फडफडाट *m*, फडाड *m*, खडाड *m*, गडाड *m*, घडाड

*m*, गडगडाट *m*, घडघडाट *m*, कडाड *m*, कडकडाट *m*, कडाकडी *f*, भडभडाट *m*, भडाड *m*. २ *rapid movement with a clattering noise* खळखळणें *n*, खळखळ *f*, *intens.* खळखळाट *m*, खुळखूळ *f*, *intens.* खुळखुळाट *m*. ३ (*of the throat*) घरघरणें *n*, घरघर *f*, घुरघूर *f*, घरघरी *f*, घरघरा *m*. ४ *loud empty talk* वटवट *f*, बडबड *f*, करकर *f*, वटवट *f*. ५ (of cannon, musketry, &c.) तडाखा *m*, तडाका *m*, धडाधडी *f*. ६ (of a child) खुळखुळा *m*, खुळखुळणें. ७ खुळखुळी काठी *f*, घोळकाठी *f*, घोळदार काठी *f*. ८ *a brisk jabberer* वटवट करणारा *m*, वटवट्या *m*.

Rattle-brained, R. -headed, R. -pated *a.* गडवड्या, वडवड्या, वटवट्या.

Rat'tler *n. a loud inconsiderate talker* वडवड्या *m*, वटवट्या *m*. २ (*colloq.*) *a stunning blow* जोराचा तडाखा *m*.

Ratt'le-snake *n.* खडखड्या नाग *m*.

Ratt'le-trap *n. a rickety vehicle* (मोडकी) खुळखुळी गाडी *f*.

Rat'tling *pr. p.* खडखडणारा, गडगडणारा, कडकडणारा.

Rat'tlingly *adv.* खडखड or डां, गडगड or डां, घडघड or डां, पटपट, –*intens.* खडाखड, खडाडां. २ खुळखूळ or ळां. ३ (of musketry, &c.) फडफड, फडफडां, –*intens.* फडाफड, फडाडां.

Ravage (rav'āj) [Fr. –L. *rapere*, to seize.] *v. t. to lay waste* उजाड करणें, उध्वस्त करणें, (-ची) नासधूस *f* -नासाडी *f* -सफेजंगी *f* -वाटोळें *n*. करणें, (-चा) सप्पा करणें, (-चा) धुवा *m* -चंदन *n* -गोपचंदन *n*. उडवणें. २ *to pillage* लुटणें, लुटालूट *f*. करणें. R. *n. devastation, ruin* नासधूस *f*, नासाडी *f*, धूळधाण *f*. २ (*esp. pl.*) *destructive effects* (*of ravages*) नुकसान *n*, नासाडी *f*. Rav'ager *n.* नासधूस करणारा *m*. Rav'aging *pr. p.* नासधूस करणारा, धूळधाण करणारा, सप्पा उडविणारा.

Rave (rāv) [Fr. *rever*, to dream, to be delirious. या शब्दाचा धात्वर्थ 'पिसाळणें,' किंवा 'वेडा होणें' हा आहे.] *v. i. to talk wildly or furiously as in delirium* (about, against, at, of, for) बरळणें (वेड्याप्रमाणें) वडवडणें, वावचळणें, यावचळणें, कांहींचें बांहीं बोलणें. २ (of sea, wind, &c.) *to howl, to roar* गरजणें, गर्जना करणें, सोसावणें, सोसाट्यानें वाहणें, सोसाट्यानें सुटणें. ३ *to speak with rapturous admiration* (about, of) हवें तें बोलणें, बरळणें; as, "He *raved* about her beauty." R. *n. raving sound of wind* (वाऱ्याचें) सोसो *n*. Raved *pa. t.*

Rav'ing *v. n.* बरळणें *n*, वावचळणें *n*.

Rav'ing *a. talking irrationally and wildly* बरळणारा, वावचळणारा, ओरडणारा.

Rav'ingly *adv.* बरळत, वावचळत, ओरडत, ओरडून.

Ravel (ra'vel) [Of Dutch origin. या शब्दाचा एक अर्थ 'गुंतागुंत करणें' असा होता; परंतु तो अर्थ सध्यां लुप्त झाला आहे.] *v. t. to unravel* (in this sense,

usually with *out*) उकलणें, उलगडणें, गुंतागुंत सोडवणें, गुंता काढणें. R. *v. i. to be unwoven* उकलणें. Rav'elled *pa. t.* and *pa. p.* Rav'elling *pr. p.* R. *n. a ravelled thread* सोडवलेला दोरा *m.* (b) (*pl.*) बाहेर आलेलीं सुतें *n. pl.*

Rav'elling-engine *n. a machine for tearing rags* चिंध्यांचा भुगा करण्याचें यंत्र *n.*

Raven (rā'vn) [M. E. *raven.*] *n.* डोंबकावळा *m*, दग्धकाक *m.* २ (*fig.*) *croaker* रड्या. R. *a. black like a raven* डोंबकावळयासारखा, काळा. Rav'enous, Ra'vined *a. voracious* खादाड, अधाशी, खाखा सुटलेला, खाखावलेला, वखवखलेला, वखवख्या, अतिक्षुधित. (b) वखवखीची, राक्षसी; as, "R. appetite."

Rav'en, Ra'vin (B.) (rav'n) [Fr.-L.; M. E. *ravine*, plunder.] *v. t. to obtain by violence* जोरजुलमानें घेणें -मिळविणें. २ *to devour with great eagerness* गपागप खाणें, गपापून खाणें, रपाटणें, बोकांदणें. R. *v. i. to prey rapaciously* आगधाडीनें खाणें.

Rav'en's -duck *n. fine hempen sail-cloth* शिडांकरितां डकचें कापड *n.*

Ravine (ra-vēn') [Fr. *ravine*, violent rush.] *n. a long deep hollow worn away by a torrent* ओहोळ *m*, ओघळ *m*, घळण *f*, घळ *f*, नाला *m.* २ *a deep narrow mountain pass* खोरें *n*, दरी *f*, घोल *m*, दरा *m*, खिंड *n*, खोंडा *m.*

Ravish (rav'ish) [Fr. *ravir* -L. *rapere*, to seize.] *v. t. to seize or carry away by violence* बळजोरीनें नेणें, बलात्कारानें नेणें, बळकावणें, हात मारणें, हिरावून नेणें, जबरदस्तीनें धरणें -पकडणें. २ *to have sexual intercourse with by force* (वर) बलात्कार करणें, जबरी करणें, जुलूम करणें, जबरीनें -जुलमानें- बलात्कारानें संभोग करणें, भ्रष्ट करणें. ३ R. (of death, circumstances, &c.) *to take from life, or from sight* हिरावून नेणें, नाहींसा करणें, दृष्टीआड करणें. ४ *to transport with joy* फारच संतोषविणें, भूल घालणें. Rav'ished *pa. p.* बलात्कारानें नेलेला, हिरावून नेलेला. २ बलात्कार केलेली (स्त्री), जबरी केलेली, भ्रष्ट केलेली. ३ नाहींसा केलेला, दृष्टीआड केलेला. ४ अत्यंत संतोषविलेला, खुलविलेला. Rav'isher *n.* बलात्कार करणारा *m.* Rav'ishing *pr. p.* बळकावणारा, हिरावून नेणारा. २ बलात्कार करणारा, जबरीनें संभोग करणारा, भ्रष्ट करणारा. ३ नाहींसा करणारा, दृष्टीआड करणारा. ४ भुलविणारा.

Rav'ishment *n.* बळकावणें *n*, हिरावून नेणें *n.* २ *rape* जबरी *f*, बलात्कार *m*, जुलूम *m.* ३ अत्यानंद *m.*

Raw (raw) [A. S. *hreaw*, uncooked, Cf. L. *crudus*, raw.] *a. uncooked* कच्चा, हिरवा, अपक्व, न भाजलेला, न शिजवलेला. [R. BRICK कच्ची (न भाजलेली) वीट *f.* R. CREAM (दूध तापवल्याशिवाय काढलेली) कच्ची मलई *f.*] २ *in unwrought state* कच्चा, पक्का न केलेला -झालेला, तयार न केलेला, जसाचा तसा. [R. CLOTH

(खळ घालून) न भरलेलें कापड, विनखळीचें कापड. R. HIDE न कमावलेलें -कच्चें चामडें *n.* R. MATERIAL कच्चा माल *m.* R. SILK कच्चें रेशीम *n.* R. SPIRIT विनपाण्याचा मद्यार्क *m.* R. SUGAR (शुद्ध न केलेली) मळीची साखर.] ३ *artistically crude* **ओबडधोबड.** ४ *inexperienced, unskilled* **अल्लड, अशिक्षित, अननुभवी, बिनकसवी;** as, "Is a R. lad." ५ *stripped of skin* **कातडी निघालेला, कातडी चोळलेला, घांसलेला, चोळवटलेला, चर्मरहित.** [R. FROM A BURN, &c. भाता -भोंत निघालेला.] ६ (of atmosphere, wind, day, &c.) *damp, chilly* **सरद, सरदीचा, गार.**

Raw *n. an inveterate sore* **चोळवटलेली जागा** *f,* **खरचटलेली जागा** *f,* **दुखापतीची जागा** *f.* २ (*fig.*) *a point on which one is particularly sensitive* **मर्म** *n,* **मर्माचें स्थान** *n.*

Raw'boned *a. with little flesh on the bones* **हाडांवर थोडें मांस असलेला, हाडकुळ्या.**

Raw'head *n. a spectre mentioned to frighten children* **बाऊ** *m.*

Raw'hide *n. a whip made of twisted, untanned leather* **( कच्च्या चामड्याचा ) गोफासारखा चाबूक** *m.*

Raw'ish *a. rather raw* **कच्चासा, कोंवळासा, अर्धवटसा.**

Raw'ness *n.* **कच्चेपणा** *m,* **हिरवेपणा** *m,* **अपक्वता** *f.* **२ निर्भेळता** *f,* **निरेपणा** *m.* **३ ओबडधोबडपणा** *m,* **संस्काराभाव** *m.* **४ अपुरेपणा** *m,* **अर्धवटपणा** *m.* **५ अल्लडपणा** *m.* **६ (हवेचा) सर्दपणा** *m.* **७ विचर्मता** *f,* **विगतचर्मता** *f,* **घांसटपणा** *m.*

Ray (rā) [O. Fr. *rai*; L. *radius*, a ray.] *n. a line* (*of light or heat*) **किरण** *m,* **कर** (S.) *m,* **रश्मि** *m.* [CONVERGING RAYS संपातिकिरण, क्षीयमाणान्तरकि., परिच्छिन्न कि. DIVERGENT R.S अपसृत कि., वर्धमानान्तर-कि. REFLECTED R.S परावृत्त कि. REFRACTED R.S वक्रीभूत कि. RONTGEN R.S (OTHERWISE CALLED X RAYS) रांटजनचे कि., क्ष-कि. DECOMPOSED R.S विच्छिन्न कि. PENCIL OF R.S See under Pencil. HERE कि.= किरण.] २ *a beam or gleam of intellectual light* **बुद्धीचा किरण** *m.* ३ (*fig.*) *remnant or beginning of enlightening or cheering influence* **किरण** *m,* **तंतु** *m,* **अवशेष** *m,* **बिंदु** *m;* as, "A R. of hope; A R. of truth." ४ *radiating part of any structure* **उष्णताविसर्जक भाग** *m.* R. *v. t. to send forth* **बाहेर टाकणें;** as, "To R. smiles." R. *v. i.* **चकाकणें.** Rayed *a. having rays* **किरण असलेला.**

Ray-flower *n.* (*bot.*) **सूर्यफूल, मयूखपुष्प, किरणपुष्प.**

*N. B.*—सूर्यफूल हें वस्तुतः फूल नव्हे. तो पुष्पविन्यास (inflorescence) किंवा फुलांचा झुपका, किंवा घोस, किंवा तुरा आहे. या झुपक्यांतील मधलीं बारीक फुलें सूर्यबिंबासारखीं दिसतात, व कडेचीं या बिंबाभोंवतीं किरणाप्रमाणें दिसतात, म्हणून यास सूर्यफूल हें नांव दिलें आहे.

Ray'less *a.* **किरणरहित, प्रकाशरहित.**

**Raze** (rāz) [Fr. *raser.*—L. *radere*, to scrape.] *v. t. to lay level with the ground, to destroy* जमीनदोस्त करणें, जमिनीस मिळवणें, सपाट करणें, नाबूद करणें, उच्छेद करणें. २ *to erase* पुसून टाकणें.

**Razed'** *pa. t.* R. *pa. p.* जमीनदोस्त केलेला, नाबूद केलेला.

**Razor** (rā'zor) [L. L. *rassorium* -L. *radere*, to scrape.] *n.* वस्तरा or वस्त्रा *m*, क्षुर *m*. २ *a tusk* (*as the razors of a boar*) सुळा *m*, दांत *m*.

**Razor-case** *n.* (of Indian barbers) धोकटी *f*.

**Razor-stone** *n. a stone for sharpening razors* वस्तरा लावण्याचा दगड *m*.

**Razor-paste** *n. a paste for spreading on a razor* वस्तऱ्यावर घालण्याची पूड *f*.

**Razor-strop, R.-strap** *n.* पलाटणें *n*, लटपटणें *n*.

**Re-absorb'** *v. t.* पुनः शोषून घेणें. **Re-absorp'tion** *n.* पुनःशोषण *n*.

**Re-accuse'** *v. t. to accuse again* पुनः आरोप ठेवणें.

**Reach** (rēch) [A. S. *raccan*, to reach.] *v. t. to stretch or extend* लांब करणें, लांबविणें, पुढें करणें; as, "*Reached* out his hand." २ *to hand over* हात लांब करून देणें; as, "*Reached* him the book." ३ *to extend to* विस्तारणें, विस्तार *m*. पोहोंचणें. ४ *to arrive at* पोहोंचणें, पावणें, दाखल -प्राप्त होणें; as, "*Reached* land." ५ *to gain, to get at* संपादन करणें, प्राप्त करून घेणें, मिळवणें.

**Reach** *v. i. to extend* पसरणें, विस्तृत असणें, लांब असणें-होणें, (-चा) विस्तार होणें; as, "A dominion *reaching* from the Ebro to the Carpathians". २ *to amount to* भरणें, होणें; as, "My income will not *reach* to it." ३ *to make reaching effort* (पर्यंत) पोंचण्याचा प्रयत्न करणें; as, "Mind *reaches* forward to an ideal." ४ *to arrive at* जाणें, पोहोंचणें, पावणें; as, "As far as the eye could *reach*." ५ *to come to hand, to be received* पोहोंचणें, पावणें, दाखल -प्राप्त -प्रविष्ट होणें, पावती *f* -पोहंच *f*. होणें.

**Reach** *n. act or power of reaching, extent of stretch or force* आटोका *m*, आवांका *m*, गति *f*, पोहोंच or पोहंच *f*, टप्पा *m*, लगता *m*, हात *m*, अवसान *n*, उडी *f*, सुमार *m*, बेत *m*. [Out of one's R. आटोक्याबाहेर, बेलाग.] २ *penetration, mental powers to be used* ग्रहणशक्ति *f*, बुद्धीचा आवांका *m*; as, "Be sure yourself and your own R. to know." ३ *artifice* युक्ति *f*, प्रयुक्ति *f*, बेत *m*; as, "The Duke of Parma had particular *reaches* and ends of his own."

**Reach'able** *a. within reach* प्राप्त होण्याजोगा, आटोक्यांतला, आवांक्यांतला, आहारांतला.

**Reached** *pa. t.* R. *pa. p.* पोहोंचलेला, प्राप्त, लागू, अधिगत, पावता, दाखल, सादर, प्रविष्ट.

**Re-act** (rē-a-kt') *v. t.* (Etymologically) *to act anew* पुनः करणें, फिरून करणें; as, "To R. a play; The same scenes were *re-acted* at Rome."

**Re-act'** *v. i. to produce reciprocal effect, to act upon*

*the agent* (-वर) परस्परक्रिया करणें, एकमेकांवर क्रिया करणें, (कर्त्यांवर) उलट कार्य होणें -घडणें; as, "Tyranny *reacts* upon the tyrant." २ *to produce responsive effect* (मूल उत्तेजनानुरूप) प्रतिक्रिया घडणें, होणें. ३ (*chem.*) *to call out activity* प्रतिक्रिया घडणें. ४ *to undergo change due to some influence* फेरफार -बदल -रूपांतर होणें. ५ *to be actuated by repulsion against* प्रतिसारण घडणें. ६ *to tend in reverse or backward direction* उलट बाजूस जाणें, मागच्या बाजूस जाणें, उलट खाणें, प्रतिगामी होणें. ७ *to return an impulse in the opposite direction* -वर प्रतिक्रिया होणें- घडणें, प्रतिकार *m* -प्रतिघात *m* -प्रत्याघात *m*. होणें.

Re-act'er *n.* प्रतिक्रिया करणारा *m.* For more meanings see the Verb.

Re-act'ing *pr. p.* प्रतिक्रिया करणारा, प्रतिक्रियाकारक.

Re-act'ion *n. action resisting other's action* प्रतिक्रिया *f*, उलट *f*, प्रतिघात *m*, प्रत्याघात *m*. २ (*math.*) प्रतिक्रिया *f*, प्रत्याघात *m*. [ ACTION AND REACTION क्रियाप्रतिक्रिया, आघातप्रत्याघात.] ३ *mutual action* परस्परक्रिया *f*. ४ *backward tendency from revolution, reform, or progress* पिछेहाट *f*, पिछेहाटीची प्रवृत्ति *f*, प्रतिक्रिया *f*. ४ (*philos.*) निवर्तन *n*. ५ (*phys.* and *chem.*) प्रतिकार्य *n*, प्रतिक्रिया *f*. [ BLOWPIPE R. फुंकणीचे द्वारा होणारी प्र०, वेणुधमनीप्र०. FLAME R. दीपशिखाप्र०.]

Reac'tionary *a. for or implying reaction* प्रतिक्रियेचा, प्रतिक्रिया घडविणारा, पिछेहाटीचा, पिछेहाट करणारा, प्रतिक्रियात्मक; as, "R. movements." R. *n. one who attempts to reverse political action* पिछेहाटीचा पुरस्कर्ता *m*.

Reac'tionist *n.* पिछेहाटीचा पुरस्कर्ता *m*.

Reac'tive *a. having power to react* प्रतिक्रिया करणारा.

Read ( rēd ) [ A. S. *rāedan*, to consult, to read. *cf.* Sans. *radh*, to accomplish. ] *v. t.* वाचणें, पढणें, पठन *n*. करणें. [ EASY TO BE READ सुवाच्य. To R. MENTALLY, TO ONE'S SELF मनांत वाचणें, पाहणें. To R. OFF एकसारखा वाचणें, पोथीवरून म्हणणें. To R. OUT, *to recite* वाचून दाखविणें, मोठ्यानें वाचणें, पठन करणें. To R. THROUGH संपूर्ण -समग्र वाचणें. ] २ *to make out from signs* ( चिन्हांचा ) अर्थ *m*. सांगणें; as, "R. an omen." ३ *to solve* अर्थ सांगणें, उपपत्ति लावणें; as, "To R. a dream." ४ *to interpret* लावणें, अर्थ लावणें; as, "My silence is not to be *read* as consent." ५ *to present to one* ( *reading it* ) दाखविणें; as, "Thermometer *reads* 33°." ६ *to bring into specified state by reading* वाचून ( विशिष्ट स्थितींत ) आणणें -नेणें, ( विशिष्ट स्थितींत येईपर्यंत ) वाचीत राहणें; as, "*Read* me to sleep."

Read *v. i.* वाचणें, पढणें. २ *to study by reading* पठन *n*. करणें, अध्ययन *n*. करणें, विद्याभ्यास *m*. करणें; as, "He *read* for the bar." ३ *to appear on reading*

वाचतांना लागणें, वाचल्यावर भासणें -दिसणें -वाटणें, वाचावयास लागणें; as, "Play *reads* better than it acts." ४ *to be suitable for perusal* वाचावयास योग्य असणें, वाचनीय असणें. [ TO READ BETWEEN THE LINES, *to detect a meaning not expressed* गुप्तार्थ *m* -गर्भितार्थ -ताडणें -समजणें -ओळखणें. ]

Read ( red ) *a. versed in books, learned* विद्वान्, पढिक, साक्षर, शिकलेला, कृताध्ययन, अध्ययन झालेला.

Readabil'ity, Read'ableness *n.* वाचनीयता *f.*

Readable ( rēd'a-bl ) *a.* ( R ) *that may be read* सुवाच्य, वाचावयाजोगा -जोगता. २ *worth reading* वाचनीय, पठनीय. ३ *interesting* मनोरंजक, चटकदार, चित्तवेधक.

Read'er *n.* वाचणारा *m*, वाचक *m*. २ *one whose office it is to read prayers in a church* खिस्ती चर्चमधील रीडर *m*, चर्चमध्यें प्रार्थना वाचून दाखविणारा. ३ *a lecturer in some universities* (युनिव्हर्सिटींतील एखाद्या विषयावरील) व्याख्यानें वाचून दाखविणारा *m*, व्याख्याता *m*; as, "R. in Roman law." ४ *one who reads or corrects proofs* प्रुफें तपासणारा *m*, प्रुफें वाचणारा *m*. ५ *one who reads much* पुष्कळ वाचणारा *m*, मोठा अध्ययनी. ६ *a reading book* क्रमिक पुस्तक *n*, वाचनपुस्तक *n*, रीडर *n*.

Reader'ship *n.* युनिव्हर्सिटींतील व्याख्यात्याची जागा *f.*

Read'ing *a. addicted to reading* वाचनाचा नाद असलेला, वाचनव्यासंगी, as, "A R. Community." R. *n. act of reading, perusal* वाचणें *n*, &c., वाचणी *f*, पठन *n*, वाचन *n*, पाठ *m*, पढणें *n*. [ FIRST R. (बिलाचें वगैरे) पहिलें वाचन *n*. PLAIN R. *reading without the due chant* लोलो *m. v.* घालणें. SUSPENSION OF R. (ESP. OF THE SACRED BOOKS) अनध्याय *m*.] २ *study of books* वाचन *n*, अभ्यास *m*, अध्ययन *n*; as, "A man of vast R." ३ *public or formal recital* जाहीर वाचन *n*, प्रपाठन. ४ *specified quality of matter to be read* वाचनीय मजकूर *m*, वाचण्यासारखें (used as a noun); as "There is plenty of *reading* in it." ५ *figure shown by graduated instrument* (भारमापक, उष्णमापक, वगैरेंनीं) दाखविलेला आंकडा *m* -अंक; as, "Difference of 40° between day and night *reading*." ६ *an interpretation of a passage or work* ( -चा ) अर्थ *m* -संगति *f.* लावणें, तर्क *m*, कल्पना *f*; as, "What is your R. of the facts?" ७ *version* पाठ *m*, पाठांतर *n*. [ FALSE R. चुकीचा पाठ *m*, अपपाठ *m*. ]

Read'ing-book *n.* वाचण्याचें पुस्तक *n*, क्रमिक पुस्तक *n*.

Read'ing-boy *n.* प्रुफें तपासणाराचा हस्तक *m*.

Read'ing-desk *n.* वाचण्याचें मेज *n*.

Read'ing-glass *n.* वाचण्याची काच *f.* (हिनें अक्षरें मोठीं दिसतात).

Read'ing-lamp *n.* वाचण्याचा दिवा *m*.

Read'ing-room *n.* अभ्यासाची -वाचनाची खोली *f.* २ सार्वजनिक वाचनालय *n.*

Re-address' *v. t.* नवा पत्ता लिहिणें.

Re-adjourn' *v. t. to adjourn again* पुनः तहकूब करणें.

Re-adjourn'ment *n.* फिरून तहकुबी *f.*

Re-adjust' *v. t. to adjust or put in order again, or in a new way* फिरून जुळवणें, नव्यानें जुळवणी करणें. Re-adjust'ment *n.* फिरून -नवी जुळवणी *f.*

Re-admit' *v. t. to admit again* फिरून दाखल करणें, फिरून ( शाळेंत वगैरे ) घेणें, फिरून आंत घेणें.

Re-admis'sion *n.* (*act*) फिरून दाखल करणें. २ (*state*) पुनःप्रवेशन *n.* Re-admit'tance *n. admittance or allowance to enter again* फिरून दाखल होण्याविषयीं परवानगी *f*, पुनः प्रवेश करण्याची परवानगी *f*, पुनः आंत घेण्याची परवानगी *f.*

Ready (red'i) [ A. S. *raede;* Scotch *red*, to set to rights, to put in order.] *a. prepared* तयार, सिद्ध, उभा (*colloq.*), सादर, कमर बांधलेला, उन्मुख, उद्यत. [To MAKE R. सज्ज करणें, सिद्ध करणें.] २ तावडतोबीचा, तात्कालिक. ३ *not slow or awkward* तयार, कसलेला, फरडा, चपळ, चलाख, हुषार or हुशार; as, "A R. writer." ४ *dexterous* तयार, प्रवीण, निपुण, दक्ष; as, "R. in devising expedients." ५ *prompt, quick, offhand* तयार, रोकडा, रोखठोक, रोख, रोखीचा; as, "A R. retort." ६ *not rusty* तयार, जागृत, जागता, जागरूक, हातखंडा, उपस्थित, लकलकीत, कडकडीत; as, "R. knowledge." ७ *sharp, apt, quick* तीव्र, शीघ्रग्राही, तैल ( बुद्धि); as, "R. understanding." ८ *at hand, near, opportune* तयार असलेला, अगदीं जवळचा, हातासरसा, अनायासाचा, सोईचा; as, "The *readiest* way." ९ *consisting in cash* रोकड, रोख, रोखठोक, नक्त. [R. MONEY PRINCIPLE ( *Pol. Eco.* ) नगदी व्यवहार, रोखीचा व्यवहार.] Ready *n. the position of a soldier's weapon after the order 'Make ready'* ('तयार व्हा' असा हुकुम सुटल्यावर) शिपायाच्या बंदुकीचा नेम *m*, तयार ! २ (*slang*) *ready money* रोकड *f*, नगद *f*, नगदी *f*, नगदपैसा *m*, नक्त *n.* Read'ily *adv. in a ready manner, quickly, promptly* तावडतोब, एकदम, तत्काळ, शीघ्र, त्वरित. २ *cheerfully, willingly* खुषीनें, संतोषानें, उत्साहानें, बिनदिक्कत, बेदिक्कत, उत्साहपूर्वक. ३ *easily* सहज, सहजासहजीं. Read'iness *n.* तयारी *f*, सिद्धता *f.* [R. OF KNOWLEDGE उपस्थिति *f.*] Read'y-made *a.* आयता, तयार, तयार करून ठेवलेला. Read'y-money *n. cash* रोकड *f*, नगद *f*, नगदी *f*, रोख पैसा *m*, नगद पैसा *m.* [IN THE WAY OF R. नगदानगदी or द, रोखारोखी. SALE FOR R. नगद विक्री *f*, रोख विक्री *f.* TRADE *or* BUSINESS CONDUCTED ON THE PRINCIPLE OF R. रोखी *f*, रोखारोखी *f*, रोखीचा व्यवहार *m*, रोकडीचा व्यवहार *m.*] Read'y-reck'oner *n.* ( व्याज, किंमती, वगैरे आकारतांना सोईचें ) तयार आकारणीचें पुस्तक *n.* Read'y-

witted *a.* हाजिरजबाबी, हाजीरजबाब, समयसूचक, तोंडच्या तोंडीं उत्तर करणारा or बोलणारा.

**Re-agent** ( rē-ā'jent ) [ L. *re* + Agent. ] *n.* ( *chem.* ) *a substance used to detect presence of another by reaction* प्रतिक्रियाद्रव्य *n*, परीक्षक द्रव्य *n*. २ *a reactive substance or force* प्रतिक्रिया उत्पन्न करणारी शक्ति *f* -द्रव्य *n*, प्रतिक्रियोत्पादक शक्ति *f*.

**Real** ( rē'al ) [ L. *realis*, adjective of *rēs*, a thing.] *a. actually existing* वास्तविक, खरा, खराखुरा, वास्तव, सत्य, तथ्य, विद्यमान, सत्. २ ( *philos.* ) *objective* वास्तविक, मूर्त, मूर्तिमंत, तात्त्विक, प्रत्यक्ष; as, "A R. object and its image." ३ *naturally so called* वास्तविक, यथार्थ, अन्वर्थ, अन्वर्थक. ४ *genuine, not artificial* वास्तविक, असल, खरा, अकृत्रिम, as, "The R. thing." ५ ( *alge.* ) वास्तविक. ६ ( *pol. eco.* ) खरा, वास्तविक, यथार्थ; as, "R. value = वास्तविक किंमत, खरी किंमत." ७ ( *law* ) *consisting of immovable property* स्थावर. [ R. PROPERTY स्थावर मालमत्ता, स्थावर इस्टेट *f*. R. MONEY, *coin, cash* रोकड पैसा, नगद. R. PRESENCE, *the actual presence of body and blood of Christ in the Eucharist.* ( प्रभुभोजनाच्या वेळीं खिस्ताच्या शरीराची व रक्ताची ) प्रत्यक्ष विद्यमानता *f*. ]

**Realgar** ( rē-al'gėr ) [L.-Ar. *rehj algar*, powder of the cave. ] *n.* ( *chem.* ) *disulphide of arsenic, red orpiment* मनःशील; याचा रंगाच्या कामांत व उडविण्याच्या दारूच्या कामांत उपयोग करितात.

**Real'ism** *n.* गुणातिरिक्त वस्तुवाद *m*, shortly वस्तुवाद *m*, जातिस्वातंत्र्यवाद *m*, गुणातिरिक्त द्रव्यवाद *m*. २ *a close resemblance to what is real* हुबेहुबपणा *m*. ३ *tendency to regard things as they really are* यथार्थतेची दृष्टि *f*, यथार्थतादृष्टि *f*, यथार्थता *f*.

*N. B.*—वस्तुवाद is considered to be the best word for Realism. वस्तु = Entity. Cf. Real = वास्तविक.

**Real'ist** *n.* वस्तुवादी *m*.

**Real'ity** *n. property of being real* वास्तविकता *f*, खरेपणा *m*, सत्यता *f*, विद्यमानता *f*, खराई *f*. २ *resemblance to original* हुबेहुबपणा *m*, ( मुळाची ) हुबेहूब नक्कल *f*; as, "Reproduced with startling R." ३ *real existence* वास्तविकता *f*, वास्तवता *f*, सत्यता *f*, तात्त्विक स्थिति *f*, वस्तुस्थिति *f*, प्रत्यक्ष ( used as a noun ). ४ *what underlies appearances* वस्तु *f*, वास्तविकपणा *m*, तत्त्वार्थ *m*. [ IN R. *in fact* वस्तुतः, खरोखरी. ] ५ *existent thing* प्रत्यक्ष वस्तु *f*, खरी वस्तु *f*; as, "My neck may be an idea to you, but it is a R. to me."

**Re'alizable** *a.* कृतींत आणण्याजोगा, व्यवहारांत आणण्याजोगा, क्रियेंत आणण्याजोगा, मूर्तस्वरूप देण्याजोगा. २ प्रत्ययास आणण्याजोगा, अनुभवास आणण्यासारखा, स्वसंवेद्य ( ईश्वर ). ३ खरा भासवण्यासारखा. ( b ) ( कल्पनेनें किंवा अनुभवानें ) आपलासा करण्यासारखा.

४ स्थावरस्वरूप देण्यासारखा, प्रत्यक्षस्वरूप देण्यासारखा. ५ (प्रत्यक्ष) मिळण्यासारखा. ६ रोकड करण्यासारखा.

Realiza'tion *n.* कृतींत आणणें *n,* क्रियेंत -व्यवहारांत आणणें *n,* मूर्त स्वरूप देणें, सिद्धता *f,* सिद्धि *f,* निष्पत्ति *f.* २ अनुभवास येणें *n,* अनुभव *m,* (-चें) वास्तविक स्वरूप ओळखणें -जाणणें *n,* स्वरूपज्ञान *n,* प्रत्यय येणें *n,* प्रत्यय *m,* साक्षात्कार *m.* [GOD-REALIZATION ईश्वरी साक्षात्कार *m.* SELF-REALIZATION आत्मानुभूति *f,* आत्मसाक्षात्कार *m,* आत्मप्रत्यय *m.*] ३ खरा भासवणें *n,* (कल्पनेनें किंवा अनुभवानें) आपलासा करणें *n.* ४ स्थावररूप देणें *n,* प्रत्यक्षरूप देणें *n.* ५ (विकून) रोकड करणें *n,* पैसा करणें *n.* ६ वसूल करणें *n,* उभा करणें *n.* ७ उग्राणी *f,* उगवणी *f;* as, "R. of debts."

*N. B.* According to English philosophy, Self-realization means जीवात्मानुभूति, while according to Hindu philosophy it will mean परमात्मानुभूति or simply आत्मानुभूति *f.*

Realize (rē'al-iz) *v. t. to convert into fact* कृतींत आणणें, क्रियेंत -व्यवहारांत आणणें, प्रयोगरूपानें सिद्ध करणें, वस्तुरूप देणें, मूर्तस्वरूप देणें; as, "We R. what Archimedes had only in hypothesis." २ *to present as real* खरा भासवणें, सत्य -यथार्थ भासवणें, (डोळ्यापुढें) हुबेहूब मांडणें, (-चें) चित्र उभें करणें; as, "These details help to R. the scene." ३ *to conceive as real, to apprehend clearly* (-चें) वास्तविक स्वरूप ओळखणें, खरा मानणें, आत्मप्रत्यय होणें, प्रत्ययास येणें *with g. of s.,* सत्य-वास्तविक मानणें; as, "We cannot R. it in thought, that the object had really no being at any past moment." ४ *to convert (property, etc.) into money* (विकून) रोकड करणें, पैसा करणें, वसूल करणें, (कर्जाची) उग्राणी करणें; as, "To R. assets." ५ *to amass (fortune)* संपत्ति मिळविणें, द्रव्यसंचय करणें; as, "To R. large profits from a speculation." ६ (*pol. eco.*) *to fetch as a price* किंमत येणें *with g. of s.* [TO BE REALIZED उभा राहणें, उभा होणें.]

Re'ally *adv.* वास्तविक, वास्तविकपणें, वस्तुतः, वस्तुदृष्ट्या, खरोखर, सत्यपणें, खरा *decl.,* तत्त्वतः.

Realm (relm) [Fr. *realm* -L. *regalis,* of a king.] *n. kingdom* राज्य *n.* २ *sphere, province* प्रदेश *m,* प्रांत *m;* as, "The R.s of poetry, fancy, etc."

Re'alty *n.* (*law*) *real estate* स्थावर इस्टेट *f.*

Ream (rēm) [Fr. *ream* -Sp. *ream* -Ar. *rismat,* a bundle.] *n. twenty quires or 480 sheets of paper* (कागदाचें) रीम *n.* यांत ४८० कागद असतात. [R. OF TEN QUIRES गड्डी *f.* PRINTERS' R. छापखानेवाल्यांचें रीम. यांत २१½ दस्ते असतात.] २ *pl. large quantity of paper* पुष्कळ कागद *m. pl.,* रीम *n;* as, "Wrote *reams* and *reams* of verse."

Ream (rēm) [Gr. *rauman,* to clear away -*raum,* room.] *v. t. to widen (hole in a metal) with a borer* रायमरनें भोंक मोठें करणें.

Ream'er *n.* भोंक मोठें करण्याचें हत्यार *n*, रायमर. [PARALLEL R. सिधा रायमर. TAPER R. निमुळता रायमर.]

Re-an'imate *v. t. to bring back to life* फिरून जींवंत करणें, फिरून जीव आणणें, पुनर्जीवित करणें. २ *to put new life, strength, vigour or courage into* पुनः उत्साहयुक्त करणें, नवीन चैतन्य आणणें, नवी हिंमत *f.* देणें, नवीन उत्साह उत्पन्न करणें, धीर देणें; as, "To R. disheartened troops; To R. languid spirits."

Re-anima'tion *n.* फिरून जीव आणणें *n*, पुनर्जीवन *n*, नवीन उत्साह -नवीन हिंमत उत्पन्न करणें *n*.

Reap (rēp) [A. S. *repan*, to reap.] *v. t. to cut down* (corn) कापणें, कापणी *f.* करणें *g. of o.*, काढणें. २ *to receive (as reward)* मिळविणें, पावणें, भोगणें. [To R. THE FRUITS OF, *to take the consequences of (one's actions)* (केल्या कर्मांचीं) फळें भोगणें. To R. WHERE ONE HAS NOT SOWN, *to profit by other's toil* दुसऱ्याचे मेहनतीचा फायदा घेणें, आयत्या पिठावर रेघोट्या ओढणें, आयत्या बिळावर नागोबा होणें.] R. *v. i.* (*fig.*) *to get (by labour)* (मेहनतीनें) मिळणें, मिळवणें, संपादन करणें, (fig.) कापणें; as, "They that sow in tears shall *reap* in joy." Reap'ed *pa. t. & pa. p.*

Reap'er *n.* कापणी करणारा *m*.

Reap'ing *v. n.* कापणें *n*, कापणी *f.* [COST OF R. कापणावळ *f.*]

Reaping-hook *n.* इळा *m*, कोयती *f.*

Reaping-machine *n.* कापणी करून पेंढ्या बांधणारें यंत्र *n*, कापणीचें यंत्र *n*.

Re-appear (rē-ap-pēr') [L. *re*, again, and Appear.] *v. i. to appear again* पुनः दिसणें, पुनर्दर्शन देणें. २ (परीक्षेला) पुनः बसणें.

Re-appear'ance *n.* पुनः दिसणें *n*, पुनर्दर्शन *n*. २ पुनः (परीक्षेला) बसणें *n*.

Rear (rēr) [O. F. *riere* -L. *retro*, behind.] *n. back part of anything* पिछाडी *f*, पिछोडा *m*, पाठीमागचा-पाठीकडचा भाग *m*. [AT THE R. OF पिछाडीकडे, पाठीकडे.] २ (*specif.*) (सैन्याची किंवा आरमाराची) पिछाडी *f.* [To BRING OR CLOSE UP THE R., *to come last* सर्वांच्या मागाहून येणें. To HANG ON THE R. OF, *to follow with a view to attacking* (हल्ला करण्याच्या इच्छेनें) पिछाडीवर राहाणें. To TAKE ENEMY IN THE Rear, *to attack from behind* शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करणें.] R. *a. hinder* पाठीकडचा, मागचा, पिछाडीचा. Rear-admiral *n. a flag officer below vice-admiral* जहाजांतील (तिसऱ्या दर्जाचा) अधिकारी *m*, रिअर ॲडमिरल *m*. Rear'guard *n. a body of troops detached to protect the rear, esp. in retreats* पिछाडीची टोळी *f*- तुकडी *f.* [REARGUARD ACTION, *engagement between rearguard and enemy* पिछाडीच्या टोळीची शत्रूबरोबर चकमक *f.*] Rearward *n.* Same as Rear. R. *a.* पाठीमागचा, पाठीकडचा, पिछाडीचा. Rearward, Rearwards *adv.* मागें, पाठीमागें, पाठीकडे, पिछाडीकडे.

Rear ( rēr ) [A. S. *ræran*, to raise, to build.] *v. t.* *to lift up* (वर) उचलणें; as, "Mine shall be the first hand to R. her banner." (b) *to set upright* उभा करणें; as, "*Reared* his mighty stature." २ *to erect* उभारणें, उभा करणें, बांधणें; as, "One *reared* a font of stone." ३ *to bring up, to educate* लहानाचा मोठा करणें, थोर करणें, (लहानाचा) वाढवणें, बाळगणें, पाळणें, पोसणें. ४ *to breed* (पासून) चांगली अवलाद तयार करणें, चांगली जात तयार करणें, ( चांगलीं ) गुरें तयार करणें, जातिवंत गुरें तयार करणें, काढवणें; as, "To R. cattle, crops, &c." R. *v. i.* ( of a horse ) *to raise itself on hind feet* दुपायीं येणें, मागल्या पायांवर उभा राहणें, उपायीं येणें, उपाववणें, टाळीं येणें.

Re-arm' *v. t. to provide* (troops) *with arms of new pattern* नवीन ( तऱ्हेचीं ) हत्यारें देणें, नवीन शस्त्रांनीं सज्ज करणें.

Re-arm'ament *n.* नवीन प्रकारची युद्धसामग्री ( हत्यारें, जहाजें, तोफा, वगैरे ) *f.*

Reason ( rēz'n ) [Lit. 'a calculation.' Fr. *raison* –L. *ratio*, reason.] *n. cause, motive* कारण *n*, निमित्त *n*, प्रयोजन *n*, हेतु *m*, सबब *f*; as, "Failed by R. of its bad organisation." [By R. of -च्या मुळें, (-च्या) कारणानें. ] २ *justification* कारण *n*, समर्थन *n*; as, "He complains with R." [ R.s of state, *political justification esp. for immoral proceeding* राजकीय कारणें *n. pl.*] ३ (*logic*) *one of the premises of syllogism esp. the minor premise* हेतु *m*, प्रमाण *n*. ४ *the intellectual faculty of human beings* बुद्धि *f*, विचारशक्ति *f*, तर्कशक्ति *f*, विचारणाशक्ति *f*, अनुमानशक्ति *f*, विवेक *m*; as, "Whether dogs have R. is really a question of definition." ५ *intellect personified* बुद्धि *f*, विचार *m*. ६ ( in Kant's Philosophy ) *faculty transcending the understanding and providing a priori principles* प्रतिभा *f*, सहजावबोधक बुद्धि *f*, स्फूर्ति *f*, सहजस्फूर्ति *f*. ७ *sanity* बुद्धि *f*, विचारशक्ति *f*; as, "He has lost his R." ८ *sensible conduct* समजूतदारपणा *m*. (b) *what is right* रास्तपणा *m*, युक्तता *f*, न्याय्यपणा *m*, यथायोग्यता *f*, योग्यता *f*, यथार्थता *f*. [With or without R. हक्नाहक, हक्नाक, वळें, कारण असो वा नसो. To bring to R., *to induce to cease from vain resistance* समजुतीवर आणणें. To hear or listen to R., *to suffer oneself to be persuaded* अक्कल *f*. ऐकणें, समजूत होणें *g. of s.*, समजणें. ] R. *v. i.* (*with*) *to argue by way of persuasion* युक्तिवाद *m* -बुद्धिवाद *m*. करणें, समजुतीचें बोलणें *n* -भाषण *n*. करणें. २ ( *logic* ) *to reach conclusions from premises* तर्क करणें, अनुमान काढणें, सिद्धासिद्ध विचार करणें. ३ *to discuss* ( *why, whether, what* ) वाद *m*. करणें, वादविवाद *m* -विवाद *m*. करणें, ऊहापोह करणें. R. *v. t. to express in logic or argumentative form* तर्कशास्त्राच्या पद्धतीनें सांगणें, तर्क-

शास्त्राच्या पद्धतीनें मांडणें -बोलणें; as, "A *reasoned article.*" २ *to persuade by argument* (*out of or into*) वाद करून वळविणें, वादाचा किंवा विचाराचा परिणाम होणें *with* वर *of o*; as, "Tried to R. him *out of* his fears; *Reasoned* himself *into* perplexity." ३ *to think out* (*consequences, etc.*) वर -संबंधीं विचार करणें.

Rea'sonable *a. ready to listen to reason* समजूतदार, समंजस, *pop.* चालीचा, समजुतीचा. २ *within limits of reason* वाजवी, योग्य, यथायोग्य, युक्त, लायक, न्यायाचा. ३ *not extortionate, fair* योग्य, वाजवी, बेताचा, सुमाराचा, नेमस्त, माफक.

Rea'sonableness *n.* समजूतदारपणा *m*, समंजसपणा *m*. २ वाजवीपणा *m*, योग्यता *f*, यथायोग्यता *f*. ३ नेमस्तपणा *m*, माफकपणा *m*.

Rea'sonably *adv.* अकलेनें, शहाणपणानें, समजूतदारपणानें, समंजसपणानें. २ वाजवी रीतीनें, योग्य रीतीनें. ३ सुमाराचा *decl.*, बेताचा *decl.*

Rea'soned *pa. t. and pa. p.* [REASONED OUT TRUTHS (बुद्धीनें) निर्णीत (केलेलीं) तत्त्वें *n. pl.* ]

Rea'soning *pr. p.* R. *a.* युक्तायुक्त पहाणारा, युक्तायुक्ताचा निर्णय करणारा, तार्किक. [ R. FACULTY तर्कशक्ति *f*, बुद्धि *f*. ] R. *n.* (*act*) तर्क करणें *n*, तर्क *m*. (b) विचारसरणी *f*, तर्कक्रम *m*, अनुमान *n*. [ A TRAIN OF R. *or* SORITES अनुमानशृंखला *f*. SKILL IN R. तर्ककौशल्य *n*, तार्किक्य *n*, *pop.* तार्किक *n*. DEDUCTIVE R. निगमनात्मक अनुमान (निगमन = DEDUCTION). INDUCTIVE R. आगमात्मक अनुमान. (आगम = INDUCTION.) REASONING BY ANALOGY सादृश्यमूलक अनुमान. ]

Rea'soner *n.* वादविवादांत कुशल *m*, वादविवाद करणारा *m*, वादविवादक *m*.

Re-assem'ble *v. t.* (अस्ताव्यस्त झालेले लोक) पुन्हां एकत्र करणें -गोळा करणें -जमवणें.

Re-assert' *v. t.* पुनः किंवा नव्यानें (तेंच) विधान करणें. २ फिरून अधिकार बजावणें, पुनः हक्क बजावणें.

Re-assess' *v. t.* नवी जमाबंदी करणें, साऱ्याची नवीन आकारणी करणें.

Re-assur'ance *n.* पुनराश्वासन *n*, दिलासा *m*, दिलदिलासा *m*, धीर *m*, भरवंसा *m*. २ (आपलें जोखीम कमी करण्याकरितां दुसऱ्या विमाकंपनींत) विमाकंपनीनें विमा पुनः उतरणें *n*.

Re-assure' *v. t.* विश्वास दृढ करणें, पुन्हां आश्वासन देणें, पुन्हां धीर देणें, पुन्हां खात्री करणें, दिलासा *m* -दिलदिलासा *m*. देणें. २ (आपलें जोखीम कमी करण्याकरितां दुसऱ्या विमाकंपनींत ) विमाकंपनीनें विमा उतरणें.

Re-assur'ed *pa. t.* R. *pa. p.* पुनः आश्वासन दिलेला, पुन्हां विश्वास उत्पन्न केलेला, पुनराश्वासित. २ (दुसऱ्या विमाकंपनींत ) विमा उतरलेला.

Re-assurer' *n.* धीर देणारा *m*, भरंवसा *m*. देणारा *m*, खात्री देणारा *m*, पुनराश्वासक *m*.

Re-assur'ing *v. n.* धीर -भरंवसा *m.* -खात्री *f.* देणें.*n.* पुनराश्वासन *n.* Reassur'ing *a.* धीर देणारा, &c.

Rebate (re-bat') [Fr. *rebattre*–L. *re*, back, and *battre*, to beat.] *n. deduction from sum to be paid* (कापून दिलेली) कसर *f*, सूट *f*, माफी *f*.

Rebel (re-bel') [Fr.–L. *rebellis*, making war afresh, insurgent,-*re*, again, and *bellum*, war.] *v. i.* (with *against*) *to take up arms against authority* बंड *n.* करणें, राजाच्या विरुद्ध किंवा सरकाराच्या विरुद्ध उठणें, बैदा *m* -दंगा *m.* करणें, राजावर -सरकारावर फिरणें. २ (*fig.*) विरुद्ध उठणें, न जुमानणें. Reb'el *n.* बंडवाला *m*, बंडखोर, सरकाराविरुद्ध किंवा राजाविरुद्ध उठणारा *m*, बंड करणारा *m*, सरकाराविरुद्ध बैदा करणारा *m.* Rebel'ler *n.* Same as Reb'el. Rebel'lion *n.* बंड करणें *n*, बंड *n*, बैदा *m*, दंगा *m*, पुंडावा *m.* Rebel'ling *v. n.* बंड करणें *n.* R. *pr. p.* बंड करणारा. Rebell'ious *a.* बंडखोर, दंगेखोर, सरकारावर किंवा राजावर उठणारा. २ *refractory, perverse* शिरजोर, खलेल, बंडखोर, न ऐकणारा.

Re-bind' *v.* (पूर्वींच्यांत फरक करून) पुन्हां बांधणें, पुन्हां बांधणी करणें.

Re-birth *n.* पुनर्जन्म *m.*

Re-bound (re-bownd') [L. *re*, back, and Bound.] *v. i.* *to bound or start back* उलटणें, उलट खाणें, मागें उसळणें, उशी खाणें, उसळी खाणें. २ *to have effect upon the doer* कर्त्यावर (-चा) उलट परिणाम घडणें -होणें. R. *n.* उलटणें *n*, उलट *f*, उशी *f*, उसळी *f*.

Re-bound'ing *v. n.* उलट खाणें *n*, उशी खाणें.

Rebuff (re-buf') [Of imitative origin.] *v. t. to beat back, to check* मागें दाबणें, मागें दडपणें, मागें ढकलणें. २ *to refuse* (मदत) नाकारणें, झिडकारणें. R. *n.* मागें ढकलणें *n*, मागें लोटणें *n.* २ नाकारणें *n*, झिडकारणें *n*, थप्पड *f*. [To GIVE A R. (*fig.*) थप्पड देणें, तोंडावर मारणें. To MEET WITH A R. तोंडांत खाणें.]

Re-build' *v. t.* (मोडलेली गाडी, घर वगैरे) पुनः बांधणें.

Rebuke (rē-būk') [Fr. *re*, back, and *bouque*, the mouth -L. *bucca*, the cheek. Rebuke शब्दाचा धात्वर्थ 'तोंड बंद करणें' असा आहे.] *v. t. to check with reproof* तोंडची शिक्षा करणें, तोंडी शिक्षा करणें, वाग्दंड करणें, दाबणें, दडपणें. २ *to check or silence by reproof* धमकावणें, दबकावणें, दटावणें, धमकी देणें. ३ (Bible) दोष देणें, निषेध करणें. R. *n.* वाग्दंड *m*, शब्ददंड *m.* २ धमकी *f*, दटावणी *f*. ३ दोष *m*, निषेध *m.* Rebuk'ing *pr. p.* and *v. n.*

Rebut (rē-but') [Fr. *re*, back, and *buter*, to push or to thrust. Rebut चा धात्वर्थ 'पाठीमागें हटवणें,' 'पाठीमागें ढकलणें' असा आहे.] *v. t.* (law) *to oppose by argument or proof* खोडून काढणें, खंडन करणें. R. *v. i.* खोडणें, खोडून टाकणें.

Rebutt'ing *pr. p* खोडून काढणारा, खंडन करणारा; as, "R. evidence = पडपुरावा."

Recal'citrant *a.* न जुमानणारा, हट्टी, झुगारून देणारा.

Recalcitrate ( re-kal'si-trāt ) [ L. *re*, and *calx*, *calcis*, the heel. Recalcitrate शब्दाचा धात्वर्थ 'लाथेनें परत झुगारून देणें' असा आहे.] *v. t. to refuse compliance, to be refractory* न जुमानणें, झुगारून देणें ( नियम वगैरे ); as, "To R. one's tricks." R. *v. i. to kick back, to kick aganist* ( any thing ) लाथाडणें, ( पायानें ) झुगारून देणें. २ ( *fig.* ) *to express repugnance or opposition* नापसंती दर्शविणें, ( पायानें ) लाथाडणें -झुगारणें -झुगारून देणें.

Recalesce ( rē-kal-es' ) [L. *re* + *calescere*, to grow hot.] *v. i. to grow hot again* पुनः उष्ण होणें, पुनः तापणें, पुनः ऊन होणें.

Recall ( rē-kawl' ) [L. *re*, back, and Call.] *v. t. to summon back* माघारा बोलावणें, परत बोलावणें. २ *to cancel the appointment of* (परत बोलावून) रद्द करणें. ३ *to bring back to memory* स्मरणें, आठवणें. ४ *to revive, to resuscitate* पुनः जीवंत करणें, पुनः जीव आणणें. ५ *to revoke, to take back* ( *action, decision, etc.* ) फिरवणें, बदलणें, ( शब्द ) परत घेणें. R. *n. summons to come back* परत बोलावणें *n.* २ *cancelling of appointment* (नेमणूक) रद्द करणें *n.* ३ *signal to a ship to return* परत येण्याबद्दलचा ( जहाजाला दाखवलेला ) बावटा *m*- निशाण *n*- खूण *f.* ४ (शिपायांना) परत बोलावण्याचा बिगुल *m*- नौबत *f.* ५ *possibility of recalling* परत बोलावण्याचा संभव *m*; as, "Beyond R." Recall'ed *pa. t.* and *pa. p.*

Recant ( rē-kant' ) [ L. *re*, again and *cantare*, to sing. ] *v. t.* and *i. to withdraw and renounce as erroneous* ( चुकीचा म्हणून ) परत घेणें, माघारा घेणें, फिरवणें, बदलणें. २ *to disavow former opinion* पूर्वीचें मत बदलणें, चुकी कबूल करणें.

Recanta'tion *n.* फिरवणें *n*, परत घेणें *n*, माघारें घेणें *n*, बोलणें फिरवणें *n*, ( पूर्वीच्या ) उलट बोलणें.

Re-capitulate ( rē-ka-pit'ū-lāt ) [ L *re*, and *caput*, the head.] *v. t. to repeat the chief points of a subject* ( कलमवार ) सारांश देणें, संक्षेपानें सांगणें, गोळाबेरीज *f* -गोषवारा *m.* सांगणें -देणें.

Re-capitula'tion *n.* संक्षेपानें ( फिरून ) सांगणें *n*, ( मागल्या बोलण्याची ) गोळाबेरीज *f*, सारांश *m*, गोषवारा *m*, सांक्षेपिक वर्णन *n.*

Re-capit'ulatory *a.* सारांशरूपाचा, गोषवाऱ्याचा.

Re-cast' *v. t. to mould anew, to put into new shape or improved arrangement* ( नवीन सांच्यांत किंवा सुधारलेल्या सांच्यांत ) पुनः ओतणें, नवा घाट पाडणें. २ (manuscripts) नवी मांडणी करणें, मांडणी सुधारणें.

Recede (rē-sēd') [L. *re*, back and *cedere* to go.] *v. i. to go or shrink back* हटणें, पाऊल *n.* माघारें काढणें -आंत घेणें, खिचणें, पाठीमागें सरणें, मोडतें घेणें, कचकणें. २ *to be left by observer's motion at increasing distance* मागें पडणें, दूर अंतरावर राहणें. ३ *to*

*withdraw from* (engagement) माघार *f.* खाणें, उलटी *f*-उलट *f.* घेणें, परतणें, सोडणें, सोडून देणें, फिरणें, बदलणें, पगडी *f.* फिरवणें, फेरपगडी करणें, पायमोडें *n.* घेणें. ४ *to decline in character or value* (किंमत, महत्व) कमी होणें. R. *v. t.* (पूर्वीच्या मालकाला) परत देणें; as, "To R. a conquered country."

Receipt (re-sēt′) [O. F. *recete*–L. *recipio* *-re* and *capere*, to take.] *n. recipe* यादी *f*, याद *f*, पाठ *m.* २ *amount of money received* जमेची रकम *f*, जमा *f*, आय *m*, आदा *m.* ३ *fact or action of receiving or being received* पोंच *f*, पोहोंच *f*, भरपाई *f*; as, "Beg to acknowledge R. of your book." ४ *written acknowledgement of such receipt* पावती *f*, रसीद *f*, पोंच *f.* R. *v. t. to write receipt* (*on*) पावती *f.* लिहिणें, पावती देणें, भरपाई करून देणें, पोंचेचा शेरा मारणें, पोंच देणें.

Receiv′able *a.* घ्यायाजोगा-जोगता, ग्राह्य, ग्रहणीय, प्रतिग्राह्य, स्वीकरणीय.

Receive (re-sēv′) [See the word Receipt.] *v. t. to accept, to take into one's possession* घेणें, (घेऊन) पावणें, स्वीकारणें, अंगीकारणें, अंगीकार *m* -स्वीकार *m* -ग्रहण *n.* करणें. [To R. IN FULL भरून पावणें.] २ *to bear up against, to stand the weight of* (वजन) सहन करणें, (भार) सोसणें, (वर) घेणें; as, "Arch *receives* the weight of roof." ३ *to admit, to provide accommodation for* आंत घेणें, जागा देणें *with* ला *of o.*, समावणें, समावेश करणें. ४ कवटाळणें. ५ *to entertain as guest, to welcome* आगतस्वागत करणें, आदरातिथ्य *n* -संभावना *f.* करणें. ६ *to give credit to, to accept as true* मान्य करणें, खरा मानणें, मान्य असणें; as, "An axiom universally *received.*" ७ *to get, to come by* मिळणें, प्राप्त होणें, येणें; as, "I have not yet *received* my dividend."

Receiv′ed *pa. p.* and *pa. t.*

Receiv′er *n.* घेणारा, स्वीकारणारा. २ (law) कोर्टानें नेमलेला वहिवाटदार, रिसीव्हर. ३ (*telegraph, telephone, phys., chem.*) ग्राहक. ४ *a person who receives stolen goods* (जाणूनबुजून) चोरीचा माल घेणारा.

Receiv′ing *pr. p. a.* घेणारा, स्वीकारणारा, स्वीकारण्याचा, प्रतिग्राहक. [R. OFFICE (पत्रें, पार्सलें, मनीआर्डरी वगैरे) घेणारें (पोष्ट) हपीस. R. ORDER स्वीकारण्याचा (सरकारी) हुकूम.]

Recension (re-sen′shun) [L. *recenseo*, I revise–*re* and *censeo*, I estimate.] *n. revision of a book* (अशुद्धें काढून केलेलें) ग्रंथशोधन *n.* २ *a revised text* शुद्ध (केलेला) ग्रंथ *m.*

Recent (rē′sent) [Fr. *recent* –L. *recens*, fresh, young.] *a. not long past* ताजा, नवा, फार दिवस न झालेला, नुकता, नूतन. २ *modern* अर्वाचीन, अप्राचीन, चालू काळचा, हल्लींच्या काळचा, अलीकडचा.

Re′cently *adv.* नुक्ताच, नवीन, हल्लींच्या काळीं, etc.

**Re'centness, Re'cency** *n.* नवेपणा *m*, ताजेपणा, नूतनता *f.* २ अर्वाचीनता *f.*

**Receptacle** ( re-sep'ta-kl ) [See Receive.] *n. containing vessel, place, or space* पात्र *n*, आशय *m*, ( esp. in comp. as, जलाशय, अन्नाशय, आमाशय, मलाशय ), भाजन *n.* (b) अधिकरण *n*, बारदान *n.* (c) घर *n*, आधार *m.* २ *common base of floral organs* (अनेक फुलांचा सर्वसाधारण) पुष्पाशय *m*, उ० क्षेंडूच्या फुलांतील खोबरें.

*N. B.*—पुष्पाधिष्ठान and पुष्पासन are two other words proposed for Receptacle in Botany.

**Receptaculum chyli** *n.* पचलेल्या अन्नाचा रस सांचण्याची जागा *f*, धातुपाशय *m.*

*N. B.*—Chyme = आमरस *m*, आम *m.* Chyle = अन्नरस *m*, रस *m*, धातुप *m.*

**Reception** (re-sep'shun) [See Receive. ] *n. receiving or being received of a person into a place or company* ( -आंत ) घेणें *n*, प्रवेशन *n*, शिरकाव *m*; as, "Was honoured by R. into the Academy." (b) अंगीकार *m*, स्वीकार *m*, स्वीकरण *n*, अंगीकरण *n.* २ *formal welcome* स्वागत *n*, आदरातिथ्य *n*, आदरसत्कार, (*colloq.*) संभावना *f.* [R. Committee स्वागतकमिटि *f.*] (b) *assembly for receiving guests* स्वागतसमारंभ *m.* ३ *receiving of ideas or impressions into the mind* ग्रहण करणें *n*, ग्रहण *n.* ४ (R.) *mental acceptance* (मनानें) ग्रहण *n*, अंगीकार *m*, स्वीकार *m*; "The general R. of the Newtonian hypothesis."

**Recep'tive** *a. able or quick to receive impressions or ideas* घेणारा, ग्राहक, ग्रहिष्णु, ग्रहणक्षम, ग्रहणशील; as, "A mind more R. than retentive."

**Receptivi'ty, Receptive'ness** *n.* ग्रहिष्णुता *f*, ग्रहणक्षमता *f*, ग्रहणशीलता *f*, ग्राहकता *f.*

**Receptive'ly** *adv.* ग्रहिष्णुतेनें, ग्रहणक्षमतेनें.

**Recess** ( re-ces' ) [ Same as Recede.] *n. temporary cessation from work* मधली सुटी *f*, विराम *m*, विसावा *m*, विश्रांति *f.* ( b ) *vacation, esp. of Parliament* पार्लमेंटची सुटी *f.* २ *receding of water etc. from previous limit* मागें हटणें *n*, खिचणें *n*, पाठीमागें सरणें *n*, परतणें *n.* ( b ) *amount by which it recedes* माघार *f*, उलटी *f*, उलट *f.* ३ *secret or retired place* एकांत *m*, एकांतस्थान *n*; as, "In the inmost *recesses* of the heart." ४ *a niche of the wall* कोनाडा *m*, कोनडा *m*, कोनाडें *n*, देवळी *f.* [ Recess with shelves and shutters फडताळ *n.* Secret R. चोरकोनाडा *m.* ] ५ ( *anat.* ) *a fold or indentation in an organ* नलिकाकार पोकळ जागा *f*, नलिकाविवर *n.*

**Recess'ion** *n. receding, withdrawal from a place or point* परतणें *n*, मागें हटणें *n.* २ *receding part of object* आंत जाणारा भाग *m*, मागें हटणारा भाग

*m.* Recessi'onal *a. of the Parliamentary recess* पार्लमेंटच्या सुटीचा, पार्लमेंटच्या सुटीसंबंधी.

Rechabite (rē'kab-īt) [From *Rechab*, Jewish History.] *n. total abstainer* (मुळींच) दारू न पिणारा *m*, मद्यत्यागी *m*.

Rechauffe (rū-shōf-fū') [Fr.] *n. warmed dish* ऊन केलेलें अन्न *n.* २ *a literary work composed from old materials* जुन्या साधनांपासून तयार केलेला ग्रंथ *m*.

Recipe (res'i-pē) [Lit. 'the first word of a medical prescription.' L. *recipe*, take thou.] *n. medical prescription* रुग्णपत्रिका *f*, औषधांची यादी *f.* २ *remedy prepared from a medical prescription* (यादीप्रमाणें तयार केलेलें) औषध *n.* ३ *a statement of ingredients and procedure for preparing a dish* (पक्वान्नांचा) पाठ *m*.

Recipient (re-sip-i-ent) [L. *recipere*, to receive.] *n. one who receives* ग्राहक *m*, घेणारा *m*, मिळणारा.

Reciprocal (re-sip'ro-kal) [L. *reciprocus*, going backward and forward -*re*, back and *pro*, forward.] *a. in return* बद्दल दिलेला, बद्दल, उलट; as, "If I helped him, I had R. help from him." २ *mutual* परस्पर, अन्योन्य, एकमेकांनीं एकमेकांस दिलेला, परस्परांचा, एकमेकांचा; as, "R. love." ३ *inversely correspondent* उलट तसाच, उलट तीच; as, "I took the chamois for a man, and it made the R. mistake." ४ (Gram.) *expressing mutual action or relation* अन्योन्य; as, in अन्योन्य सर्वनाम *n.* ५ व्युत्क्रम, व्युत्क्रान्त [R. TERM व्युत्क्रमपद]. R. *n.* (*math.*) व्युत्क्रम *m*; as, "$\frac{1}{5}$ is the R. of 5." [IN R. FIGURE, R. PROPORTION, R. QUANTITY, R. RATIO, R. IS TRANSLATED BY व्युत्क्रम.]

Recip'rocally *adv.* परस्पर, परस्परां, परस्परें. २ (*math.*) व्युत्क्रमेंकरून. [R. PROPORTIONAL व्युत्क्रमप्रमाणांतला.]

Reciprocalness परस्परता *f*.

Recipr'ocate *v. t.* and *i.* (*mech.*) *to go with backward and forward motion* पुढेंपाठीमागें जाणें, मागेंपुढें जाणें. २ *to give and receive mutually* विनिमय *m.* करणें, अरसपरस करणें, मोबदला *m.* करणें. ३ *to return, to requite* (*affection*,) (तेंच किंवा तसलेंच) परत करणें, उलट देणें, उलट करणें.

Recipro'cating *p. a.* पुढेंपाठीमागें जाणारा. [R. motion पुढेंपाठीमागें जाण्याची गति *f*, प्राक्पुरोगति *f*.]

Reciproca'tion *n. giving and receiving mutually* विनिमय *m*, एकमेकांस देणेंघेणें *n*, परस्पर देणेंघेणें *n.* २ (*math.*) व्युत्क्रमीभवन, व्युत्क्रमीकरण *n*.

Rec'iprocity *n.* परस्परत्व *n*, परस्परसंबंध *m*, अन्योन्यभाव *m*, अन्योन्यत्व *n*, अरसपरसपणा *m.* २ *giving and receiving, to mutual advantage* (परस्परांच्या फायद्याकरितां) विनिमय *m*, परस्पर देणें-घेणें *n*, अदलाबदल *f*, देवाणघेवाण *f*, देघे *f*. [RECIPROCITY OF EXCHANGE परस्परविनिमय, मालाची आपसांत अदलाबदल *f*.]

Recit'al *n. act of reciting* (पाठ) म्हणणें *n*, तोंडपाठ म्हणणें *n*, पठन *n*. २ वाचणें *n*, वाचून दाखविणें *n*, वाचन *n*. ३ *narration* वर्णन *n*, वर्णन करणें *n*, सांगणें *n*. ४ (law) सुनावणी *f*, सुनावणी *f*. करणें *n*. ५ *a musical or dramatic performance* (चिजा) वाद्यांत वाजवून दाखविणें. (b) नाटकांतील नकला पाठ म्हणून दाखविणें *n*.

Recita'tion *n. a clear or formal reading or repeating from memory* मोठ्यानें वाचून दाखविणें *n*, पाठ म्हणणें *n*, पाठ म्हणून दाखविणें *n*. (b) प्रपाठन *n*.

Recite (re-si't) [Fr. *recite* -L. *re*, back and *citare*, to quote.] *v. t. to read aloud* मोठ्यानें वाचणें, वाचून दाखविणें. २ *to repeat from memory* तोंडपाठ म्हणणें, पाठ म्हणून दाखविणें,(मंत्र) म्हणणें. ३ (law) *to rehearse facts in document* (कागदपत्रांतील गोष्टींची) सुनावणी करणें, सुनावणें. ४ *to mention in order* अनुक्रमानें सांगणें, क्रमपूर्वक -क्रमवार सांगणें. ५ *to relate* सांगणें, कथन *n*. करणें, निरूपण *n*. करणें. Recit'ed *pa. t.* and *pa. p.* Recit'er *n*. तोंडपाठ म्हणणारा *m*. २ तोंडपाठ करण्याच्या धड्यांचें पुस्तक *n*.

Reck (rek) [A. S. *recean*, to care, to care for.] *v. t. to care for, to regard* लक्ष देणें, लक्ष पुरविणें, काळजी बाळगणें, परवा करणें.

*N. B.—Reck* is used in negative or interrogative sentences only.

Reck'less *a. careless* बेफिकिर, बिनफिकिर, निर्धास्त. २ *regardless of consequences* बेपरवा, साहसी, साहसिक, अविचारी, धाडसी.

Reck'lessly *adv.* बेफिकिरपणें. २ बेपरवाईनें, बेलाशक, धाडशीपणानें, साहसानें, अविचारानें.

Reck'lessness *n*. बेपरवाई *f*, अविचारीपणा *m*, धाडशीपणा *m*, धाडस *n*, साहस *n*.

Reckon (rek'n) [A. S. *ge-recenian*, to explain.] *v. t. to count* मोजणें, गणणें, गणती *f*. करणें, गणना *f*. करणें, मोजदाद *f*. करणें, संख्यान *n*. करणें. २ *to esteem* मोजणें, मानणें, लेखणें, हिशेबांत धरणें, गणणें. ३ *to think or suppose* अदमास करणें, सुमार *m*. बांधणें, अंदाज करणें, कल्पना *f*. करणें -बांधणें; as, "I *reckon* he won't try that again." R. *v. i. to make up accounts* हिशोब देणें -घेणें, खातें तपासणें, खातें पाहणें, खात्याची रुजवात करणें-देणें-घेणें, जमाखर्चाचा ताळा -मेळ बसवणें. २ (with *for*) *to answer for* जाब देणें, झाडा देणें, हिशोब देणें, मोसबा देणें. ३ (with *on* or *upon*) *to count or depend on* भिस्त *f*. ठेवणें, भरंवसा टाकणें, ठेप *f*. ठेवणें. ४ (with *with*) *to settle accounts with* हिशोब नक्की करणें-देणें-घेणें. [To R. WITHOUT ONE'S HOST, *to ignore in a calculation the person whose assent is essential* सामनेवाल्याचा विचार न करणें, गांठ कोणाशीं आहे हें न पहाणें.]

Reck'oner *n. one who reckons* मोजणारा *m*, गणणारा *m*, गणती करणारा *m*. २ मानणारा *m*, लेखणारा *m*. ३ अदमास करणारा *m*, सुमार बांधणारा *m*. ४ जमाखर्च

पाहणारा -तपासणारा *m.* ५ *a book of calculations, tables, &c. to assist in reckoning* (व्याजाचा, पगाराचा, वगैरे कोष्टकांवरून) हिशेब आकारण्याचें पुस्तक *n*, आकारणीपुस्तक *n*.

Reck'oning *n.* मोजणें *n*, गणणें *n*, गणती *f*, मोजणी *f*, गणन *n*, गणना *f*. २ *settlement of accounts* (जमाखर्चाचा नक्की) हिशोब *m*, हिशेब *m*. [DAY OF R. झाडा देण्याचा दिवस. TO BE OUT IN ONE'S R., *to be mistaken in one's calculation or expectation* अदमास चुकणें.] ३ *a tavern bill* खाणावळीचें बिल *n*. ४ *estimation* किंमत *f*, खातर *f*, खातरजमा *f*.

Reclaim (re-klām') [L. *re* + *clāmare*, to call out.] *v. t. to win back from vice or error* मार्गावर आणणें, वाटेवर आणणें, सुतावर आणणें, ताळ्यावर आणणें. २ *to civilize* सुधारणें, विद्याचारसंपन्न करणें. ३ *to bring (waste land) under cultivation* लागवडीस आणणें, (लागवडीच्या) उपयोगास आणणें. ३ (समुद्र हटवून) जमीन काढणें, जमीन उत्पन्न करणें.

Reclaim'able *a.* मार्गावर आणण्यासारखा, वाटेवर-सुतावर आणण्यासारखा. २ विद्याचारसंपन्न करण्यासारखा. ३ लागवडीस आणण्यासारखा. ४ (समुद्र हटवून) जमीन काढण्यासारखा.

Reclam'ation *n.* मार्गावर आणणें *n*. २ सुधारणें *n*, सुधारणूक *f*. ३ (जमीन वगैरे) लागवडीस आणणें *n*. ४ समुद्र हटवून जमीन काढणें *n*.

Reclinate (rek'lin-āt) [L. *reclinatus*, pa. p. of *reclinare*, to bend.] *a.* (*bot.*) *bending downwards* अवनत, (खालीं) वांकलेला; as, "A R. leaf."

Recline (re-klīn') [L. *re*, back, *clinare*, to bend.] *v. i. to lean to, or on, one side* (एका अंगावर) टेंकणें -पडणें. २ *to lie down* निजणें, पासल घेणें, आडवा होणें, आंग टाकणें.

Recluse (re-klōōs') [Fr. *recluse* -L. *reclusus* -*re*, again and *claudere*, to shut up.] *a. solitary* एकांताचा, एकांतवासाचा, विविक्त. R. *n. one who leads a solitary life* एकांतवासी *m*, एकांतसेवी *m*, विविक्तसेवी *m*, विविक्तवासी *m*, (specif.) संन्याशी *m*.

Recognit'ion *n.* ओळखणें *n*, ओळख *f*. २ मान्यता *f*, कबुली *f*, पसंती *f*. ३ (*philos.*) प्रत्यभिज्ञा *f*.

Recogni'zable *a.* ओळखण्यासारखा, ओळखण्याजोगा.

Reco'gnizance *n.* (म्याजिस्ट्रेट यास लिहून दिलेला) जातमुचलका *m*. २ जातमुचलक्याची रक्कम *f*.

Recognize (rek'og-nīz) [L. *recognize* -L. *re*, again and *cognoscere*, to know.] *v. t. to know again* ओळखणें, जाणणें, पछानणें. २ *to acknowledge* कबूल करणें, मान्य करणें, पसंत करणें. [RECOGNIZED SCHOOLS सरकारनें मान्य केलेल्या शाळा *f. pl.*]

Recoil (re-koil') [Fr. *reculer*-L. *re*, again and *cūlus*, the hinder part.] *v. i. to start or spring back* मागें सरणें, मागें निसटणें, मागें येणें, सरकणें, हटणें, माघार खाणें-घेणें. २ (*of a gun, etc.*) *to be driven back after discharge* मागें हिसका बसणें, मागें येणें,

उशी खाणें. R. *n. act of recoiling* मागें येणें *n*, मागें सरकणें *n*, मागें हटणें *n*. २ हिसका *m*. ३ उशी *f*.

**Re-coin'age** *n*. पुनः (धातु गाळून) नाणें पाडणें *n*.

**Recollect** (rek-ol-ekt') [L. *re*, again and Collect.] *v. t. to recall to mind* आठवणें, स्मरणें, (थोड्या प्रयत्नानें) आठवण *f*-याद *f*-स्मरण *n*-सई *f*. करणें *g. of o*. [To R. ONE'S SELF शुद्धीवर येणें, ठिकाणावर येणें.]

**Recollec'tion** *n. act of recollecting* आठवणें *n*, स्मरणें *n*. २ *reminiscence* आठवण *f*, आठवणूक *f*. ३ *a person's memory* आठवण *f*, स्मरण *n*, स्मृति *f*; as, "It is in my R." ४ *time over which memory extends* स्मरणकाल *m*, आठवण *f*, संस्मृति *f*; as, "Happened within my R."

**Re-commence'** *v. t.* पुनः सुरू करणें, पुनः आरंभ करणें.

**Recommend** (rek-om-end') [L. *re*, again and Commend. याचा धात्वर्थ 'हवालीं करणें' असा आहे.] *v. t. to speak or write as fit* शिफारस करणें, तारीफ करणें, गुणप्रशंसा करणें *g. of o*. २ (of conduct) *to serve as recommendation of* शिफारस करणें, शिफारशीदाखल असणें.

**Recommend'able** *a*. शिफारस करण्याजोगा, प्रशंसनीय.

**Recommenda'tion** *n*. शिफारस *f*, तारीफ *f*, गुणप्रशंसा *f*. २ शिफारस *f*, शिफारसपत्र *n*. [LETTER OF R. शिफारशीचें पत्र *n*, शिफारसपत्र *n*.] ३ *that which recommends* शिफारस *f*.

**Re-commit** (rē-kom-mit') (बिल वगैरे पुन्हां विचाराकरितां) कमेटीकडे परत पाठविणें.

**Recompense** (re-k'om-pens) [Lit. 'to weigh out in return.' L. *re*, again, and *compensare*, to weigh out.] *v. t. to requite* मोबदला *m*. देणें, बदल देणें. २ *to make amends* (to a person for loss) मोबदला देणें, भरपाई करणें. R. *n. requital, reward* मोबदला *m*, बदला *m*, भरपाई *f*.

**Re-compose'** *v. t.* (पूर्वीं जुळलेल्या मजकुरांत पुष्कळ अशुद्धें असल्यामुळें, किंवा नवीन फेरफार केल्यामुळें) पुन्हां जुळवणें, पुन्हां जोडणें.

**Reconcil'able** *a*. समेट करण्यासारखा, समेट होण्यासारखा.

**Reconcile** (rek'-on-sīl) [Fr. *reconcile* –L. *re*, again and *conciliare*, to call together.] *v. t. to make friendly after estrangement* समेट करणें, मिलाफ *m* -सलोखा *m*. करणें *g. of o*., समजी *f*-समजूत *f*. पाडणें -करणें -काढणें *g. of o. recip*., पुनःसख्य *n* -पुनर्मैत्री *f*. करणें *g. of o*. २ *to purify (a place) by special service after desecration* (विशेष उपासनेनें) शुद्ध करणें. ३ *to make contentedly submissive* (*to*) संतोष *m*. वाटेसा करणें, प्रसन्न करून घेणें, राजी करणें. [TO BE RECONCILED TO गोड करून घेणें, गोड मानून घेणें. TO RECONCILE ONE'S SELF TO ONE'S LOT आलेल्या भोगास सादर होणें.] ४ *to compose or heal* (*quarrel, etc.*) (भांडण) मिटविणें. ५ *to harmonize* एकवाक्यता *f*.

करणें *g. of o.*, मेळ *m.* बसवणें, ताळा *m.* पाडणें *g. of o. recip.*, जम *m* -जुवा *m.* बसवणें *g. of o. recip.*, जुळवणें, मिळवणें, मिळवणी घालणें, संगति लावणें.

Rec'oncilement, Reconcilia'tion *n.* समेट *m*, सलोखा *m*, समजूत *f*, समजावीस *f*, समजी *f*, पुनःसख्य *n*, पुनर्मैत्री *f*, पुनःस्नेह *m.* २ एकवाक्यता *f*, मिळवणी *f*, ताळा पाडणें *n*, ताळा *m.* मिळवणें *n*, मेळ *m*, जम *m*, जुवा *m*, जुळणी *f*, संगति *f*.

Rec'onciler *n.* समेट *m.* करणारा, मिलाफ *m.* करणारा, समजूत पाडणारा, संधिकर्ता *m.*

Recondite ( rek'on-dīt ) [L. *re* + *condere*, to put together, to hide. Recondite etymologically means 'put away', 'hidden' or 'secret'.] *a. abstruse* गहन, अगम्य, खोल, गुरुगम्य. २ *obscure (author, etc.)* स्पष्ट न लिहिणारा, दुर्बोध.

Reconnaissance ( re-kon'ā-sans ) [Fr. Doublet Recognisance.] *n. military or naval examination of a tract to locate the enemy* (शत्रूची) टेहळणी *f*, नजरपाहणी *f*. [R. IN FORCE, *reconnaissance made by a strong party* सैन्याच्या तुकडीनें टेंहेळणीकरितां केलेला हल्ला *m.* ] २ *reconnoitring party* टेहळणी करणारी तुकडी *f*. ३ *a preliminary survey made by anyone for any purpose* पहिली पहाणी *f*.

Reconnoitre (rek-on-noi'tėr ) [Lit. 'to recognize,' O. F. *reconoistre* –L. *recognosco.* See Recognize.] *v. t. to make reconnaissance ( of an enemy, etc. )* टेहळणी *f*. करणें, नजरपाहणी *f*. करणें, हेरणें, टेहळणें.

Re-consider ( rē-kon-sid'ėr ) *v. t. to consider again* पुनः विचार करणें, फिरून विचार करणें.

Re-considera'tion *n.* फिरून विचार करणें *n*, पुनः विचार *m.*

Re-consti'tuent *n. a remedy that builds up strength or tissue anew* शरीरांतील धातु पुन्हां भरून काढणारें औषध *n*, धातुजनक औषध *n*, धातुवर्धक *n.*

Re-co'nstitute *v. t. to piece together (past events) into an intelligible whole* (जुन्या गोष्टींचा परस्पर संबंध जोडून) नवीन रचना करणें, नवीन मांडणी करणें, पुनर्घटना करणें.

Re-constitu'tion *n.* नवी रचना *f*, नवी मांडणी *f*, पुनर्रचना *f*, पुनर्घटना *f*.

Reconvey ( rē-kon-vā' ) [L. *re*, again and Convey.] *v. t. to convey back to the former place* पहिल्या जागेवर नेणें, परत नेणें. २ *to transfer back to a former owner* (स्थावर मिळकत) पुनः -परत (पूर्वींचे मालकाच्या नांवावर) फिरवून देणें, उलट फिरवून देणें. [To R. AN ESTATE उलट दस्तैवज करून देणें, उलट विक्री करणें, उलट वेचन करणें.]

Re-convey'ance *n.* (स्थावरासंबंधीं) उलट (करून दिलेला) दस्तैवज *m*, फेरदस्तैवज *m.*

Record ( re-kord' ) [Fr. *record*–L. *re*, back and *cor, cordis*, the heart.] *v. t. to set down for remembrance or reference* नोंदणें, नोंद करणें, नमूद

करणें, नोंद करून ठेवणें. २ *to put in writing or other legible shape* नोंद करणें, लिहून ठेवणें, मांडून ठेवणें, दफ्तरांत लिहिणें -मांडणें; as, "His thoughts have been *recorded* for us by himself, his features by Watts, and his voice by the phonograph." Rec'ord *n.* नोंदणी *f,* नोंद *f.* [ RECORD OF RIGHTS हक्काची नोंदणी *f,* हक्कनोंद *f.*] २ (स्मरणार्थ) नोंद *f.* ३ फोनोग्राफची बांगडी *f,* ग्रामोफोनची प्लेट किंवा तबकडी *f.* ४ (नमूद करण्यासारखा) सर्वोत्कृष्ट डाव *m,* कमालीचा खेळ किंवा कसरत *f.* ५ दप्तर *n.* [R. OFFICE सरकारी दप्तर ठेवण्याची कचेरी *f,* रिकार्डहपीस *n.*] ६ कमाल *f,* शिकस्त *f.* Record'er *n.* नोंद करणारा, नमूद करणारा, लिहून ठेवणारा etc. २ *recording apparatus in instruments* ( यंत्रांतील ) लेखक *m,* नोंदकार्ड *n.*

Record'ing *pr. p.* and *a.* [RECORDING ANGEL, *angel who registers men's good and bad actions* ( मनुष्यांच्या पापपुण्याचा ) हिशेब ठेवणारा देवदूत *m. cf.* चित्रगुप्त OF THE HINDU MYTHOLOGY.]

Re-count ( rē-kownt' ) *v. t. to count again* पुनः मोजणें, पुनः गणती करणें.

Recount ( re-kownt' ) [ Fr. *reconter* -*re* and *conter*, to tell, akin to *compter*, to count. ] *v. t. to tell in detail* (स्वतःची हकीकत) तपशीलवार सांगणें, सविस्तर सांगणें. Recount'ed *pa. t.* R. *pa. p.* सविस्तर सांगितलेला. Recount'er *n.* Recount'ing *pr. p.* तपशीलवार सांगणारा, सविस्तर सागणारा.

Recoup ( rē-kōōp' ) [L. *re* and Fr. *couper*, to cut. Recoup literally means 'to secure a piece' and thus it means 'to diminish a loss.'] *v. t.* and *i.* ( *law* ) *to deduct or keep back* ( *part of sum due* ) (नुकसानी कमी करण्याकरितां) काटणें, कमी करणें. २ *to compensate* ( *person, loss, etc.* ) ( नुकसान ) भरून काढणें, भरपाई करणें. [ To R. ONESELF, *to recover what one has expended* or *lost* पुनः परत मिळविणें, नुकसान भरून काढणें. To R. ONE'S HEALTH (गेलेली) शक्ति पुनः आणणें, प्रकृति पूर्ववत् सुधारणें.] Recoup'ment *n.* ( नुकसानाची ) भरपाई *f,* भरून देणें *n.* २ ( *law* ) *reduction of plaintiff's damages by keeping out a part* (प्रतिवादीची) काटलेली रक्कम.

Recourse (re-kōrs') [ Lit. 'a running back'. Fr. *recours* -L. *recursus* -*re*, back and *curro-cursum*, I run.] *n.* आश्रय *m,* आसरा *m,* आधार *m.* [To HAVE R. TO आश्रय *m- pop.* आसरा *m*-आधार *m.* करणें -धरणें *g. of o.*, पाठ रिघणें -निघणें *g. of o.*, अवलंब करणें *g. of o.*, शरण जाणें.]

Recover (re-kuv'ėr) [Fr. *recover* -L. *recuperare*, to recover.] *v. t. to regain* फिरून मिळविणें, पुनः मिळविणें, पुनः प्राप्त करणें, पुनर्लाभ *m*-पुनःप्राप्ति *f.* करणें *g. of o.* [To R. ONESELF, *to regain consciousness* शुद्धीवर येणें. To R. ONE'S LEGS, *to stand up after fall* (पडल्यावर) उठून उभें राहणें.] २ *to secure damages by legal process* (कोर्टांत किंवा कोर्टातर्फे) वसूल करणें,

नुकसानी भरून घेणें, नुकसानी *f.* मिळवणें; as, "To R. damages. ३ (a) *to bring back to life or consciousness* शुद्धीवर आणणें, सावध करणें. (b) *to bring back to health* बरा करणें, रोगमुक्त -निरोगी करणें. ४ *to make up for* भरपाई करणें, भरून काढणें; as, "Must try to *recover* lost time." R. *v. i. to come back to normal state or position* सुधारणें, नीट -दुरुस्त -पूर्ववत् -यथास्थित होणें, स्थितीवर -पूर्वस्थितीवर येणें. (b) *to come back to health* बरा होणें, सुधारणें, चांगला -तवाना -निरोगी -रोगमुक्त होणें, सांवरणें, थावरणें. [To BEGIN TO R. जगण्याच्या -वांचण्याच्या पंथास लागणें, पाठ *f.* उचलणें, जीव *m.* धरणें, धर *m.* धरणें, उठणें.]

Recov'erable *a.* फिरून मिळवायाजोगा-सारखा, पुनर्लभ्य, पुनःप्राप्य. २ फिरून पूर्वस्थितीवर येण्याजोगा -सारखा. ३ बरा होण्यासारखा. ४ वसूल होण्यासारखा.

Recov'ered *pa. t.* R. *pa. p.* फिरून मिळवलेला, पुनर्लब्ध. २ पूर्वस्थितीवर आलेला. ३ बरा झालेला, रोगमुक्त. ४ वसूल झालेला, भरून घेतलेला.

Recov'ery *n.* (a) फिरून मिळवणें *n.* (b) *act or process of being recovered* पुनर्लाभ *m*, पुनःप्राप्ति *f.* २ सांवरणें *n*, पूर्वस्थितीवर येणें *n.* ३ बरा होणें *n*, रोगमुक्तता *f.* ४ वसुली *f*, वसूल *m*, येणें *n.*

Recreant (rek'rē-ant) [O. F.–L. *re-+credo*, I believe.] *a. cowardly* भित्रा, भेकड. २ *apostate* भ्रष्ट, क्रियाभ्रष्ट, क्रियानष्ट. R. *n.* भित्रा मनुष्य *m*, भेकड मनुष्य *m.* २ भ्रष्ट *m*, क्रियाभ्रष्ट मनुष्य *m*, etc.

Re-create (rē-krē-āt') [L. *re*, again and Create.] *v. t. to refresh, to amuse (esp. after hard work)* ताजातवाना करणें, मनोरंजन करणें, श्रमापहार करणें.

Recrea'tion *n.* करमणूक *f*, मनोरंजन *n*, श्रमापहार *m.*

Recrea'tive *a.* ताजातवाना करणारा, श्रमापहारक, मनोरंजक.

Recrement (rek'rē-ment) [L. *recrementum*, dross.] *n.* (*physiol.*) *fluid separated from blood and again absorbed in it, e. g. saliva, bile, &c.* (आधीं अपशोषित करून पुनः शोषित किंवा पाचित केलेला रक्तांतील) पुनः-शोषित रस *m*, पुनःपाचित रस *m.*

Re-criminate (rē-krim'in-āt) [L. *re*, in return and Criminate.] *v. i. to charge an accuser with a similar crime* उलटून दोष लावणें -ठेवणें, उलट आळ *f* -फेर आळ *f.* घेणें -आणणें, उलट दोष *m.* लावणें-ठेवणें, प्रत्यारोप करणें, उलट फिर्याद करणें.

Recrimina'tion *n.* उलट आळ *m*, उलटा आळ *m*, फेर आळ *m*, उलटा दोषारोप *m*, प्रत्यारोप *m*, उलट फिर्याद *f.*

Recrim'inative, Recrim'inatory *a.* उलट आळ घेणारा, उलट दोष लावणारा, प्रत्यारोपकर्त्ता.

Recrim'inator *n.* उलट आळ घेणारा, प्रत्यारोप करणारा *m.*

Recrudesce (rē-krōō-des') [L. *re*, again, and *crudescere*, to become raw.] *v. i.* (of sore, disease, *etc.*) *to break out again* उलटणें, फिरून येणें, उपटणें.

Recrudes'cence *n.* (दुखणें वगैरे) फिरून येणें *n*, उलटणें *n*, उपटणें *n*, पुनर्भव *m.*

**Recrudes'cent** *a.* फिरून येणारा, उलटणारा, उपटणारा.

**Recruit** (rē-krōōt') [Lit. 'to grow again,' Fr. *recruter*, from *re*, and *croitre* -L. *recresco -re*, again and *crescere*, to grow.] *n. a newly enlisted and not yet trained soldier* नवा शिपाई *m*, नवशिक्या शिपाई *m*, रिक्रूट *m*. २ *a tiro* (कोणत्याही कामांतील) नवशिक्या *m*, उमेदवार *m*. R. *v. t. to enlist* (*soldiers for army*) (सैन्यांत) भरती *f* -भरणा *m*. करणें, नवे शिपाई जमविणें, रिक्रूट भरणें. २ *to replenish, to fill up deficiencies* भरती करणें, भरून काढणें. R. *v. i. to recover health* सुधारणें, सांवरणें, पूर्ववत् -यथास्थित होणें; as, "Has gone to the country to R."

**Recruit'al** *n.* (प्रकृति) सुधारणें *n*, नीट होणें *n*.

**Recruit'ment** *n.* (सैन्यांत) शिपायांची नवीन भरती *f*, नवा भरणा *m*.

**Re-crystalliza'tion** *n.* पुनःस्फटिकीकरण *n*, पुनःस्फटिकीभवन *n*.

**Re-crystallize** (rē-kri'stal-īz) [L. *re*, and crystallize.] *v. t. to crystallize again* (विशेष शुद्ध करण्याकरितां) पुनः स्फटिक पाडणें, पुनःस्फटिकीकरण करणें.

**Rec'tal** *a.* (*med.*) गुदकांडाविषयीं, मलमार्गविषयक.

**Rectangle** (rekt'ang-gl) [Fr. *rectangle* -L. *rectus*, right and *angulus*, an angle.] *n.* समकोन *m*, आयत *n*.

**Rect'angular** *a.* समकोण, समकोनासारखा, समकोनाचा. २ *placed at right angles* काटकोनांत ठेवलेला, समकोनीय.

**Rectifiable, Rectification**, See under Rectify.

**Rec'tificator** *n.* (*chem.*) शोधनयंत्र *n*.

**Rec'tifier** *n.* नीट करणारा *m*. २ सुधारणा करणारा *m*. ३ शोधक *n*, शोधनयंत्र *n*.

**Rectify** (rek'ti-fī) [Fr. *rectifier* -L. *rectus*, straight, right and *facio*, I make.] *v. t. to put right, to correct* (चुकी) काढून टाकणें, नीट करणें, नीटनेटका -दुरुस्त करणें, सुधारणें. २ *to abolish, to get rid of* (*abuse, etc.*) दुरुस्ती करणें, सुधारणा करणें. ३ (*chem.*) *to refine* (*by repeated distillation*) (ऊर्ध्वपातनानें) शोधन करणें, प्रतिशोधन करणें, शुद्ध करणें. ४ (*geom.*) *to find a straight line equal to a curve* वक्राच्या लांबीची सरळ रेषा निर्माण करणें, संशोधन करणें. **Rectifi'able** *a.* नीट करण्याजोगा -सारखा. २ दुरुस्त करण्यासारखा, सुधारणा करण्यासारखा. ३ प्रतिशोधन करण्यासारखा, शुद्ध करण्यासारखा. **Rectifica'tion** *n.* दुरुस्त करणें *n*, नीट करणें *n*, सुधारणें *n*. २ सुधारणा *f*. ३ (*chem.*) शोधन *n*. ४ (*geom.*) संशोधन *n*. [R. OF A GLOBE गोलसंशोधन *n*.] ५ (*law*) दुरुस्ती *f*.

**Rectilineal, Rectilinear** (rek-ti-lin'e-al,-ar) [L. *rectus*, straight, and *linea*, a line.] *a.* सरळ रेषेचा, सरलरेषात्मक, सरळ रेघेचा. [R. MOTION सरल गति *f*.]

**Rectitude** (rek'ti-tūd) [Fr. *rectitude* -L. *rectitudo -rectus*, right, straight.] *n. moral uprightness*

खरेपणा *m*, सचोटी *f*, सरळपणा *m*, सदाचरण *n*, सत्यशीलता *f*, सरलभाव *m*, ऋजुता *f*. [TO DEVIATE FROM THE PATH OF R. सन्मार्गापासून च्युत -भ्रष्ट होणें, पाऊल वांकडें पडणें -टाकणें.]

Recto (rek'tō) [L. *recto*, on the right.] *n. the right hand page of an open book* (पुस्तकाचें) उजवीकडचें पान *n*.

Rectocele (rek'-to-sēl) [L. *rectum*, and *cele*, tumor.] *n.* (*med.*) योनिभ्रंशापासून गुदकांडाचा पुढचा भाग बाहेर येणें *n*, योनिगुदभित्तिभ्रंश *m*.

Rector (rek'tor) [L. *rector*, a ruler -*rego*, *rectum*, I rule; Cf. Sk. राज्, to govern.] *n. parson of parish whose tithes are not impropriate* वृत्त्यंशी रेक्टर. २ *head of university, college, school, &c.* (विश्वविद्यालय, श्रेष्ठ विद्यालय, विद्यालय किंवा धार्मिक संस्था यांतील) मुख्य अधिकारी *m*, रेक्टर *m*. Rec'tress *n. f.* Rec'torate, Rec'torship *n.* रेक्टराची जागा *f*, रेक्टराचा अधिकार *m*. Rec'tory *n. rector's benefice* रेक्टराची वृत्ति. २ *rector's house* रेक्टराचा बंगला *m* -घर *n*-राहण्याचें ठिकाण *n*. ३ रेक्टराचा प्रांत *m*.

Recto-vaginal fistula, See under Fistula.

Rectum (rek'tum) [L. *rectus*, straight.] *n. final section of large intestine, terminating at anus* मलाशय *m*, गुदकांड *n*, मलमार्ग *m*, मळाचा कोठा *m*. [THE R. PROTRUDING AT STOOL गुळी *f* (v. उतर), आंग बाहेर येणें *n*. LOADED R. बद्धकोष्ठता *f*.]

Rectus (rek'tus) [L. *rectus*, straight.] *a.* सरल, सरळ.

Recum'bency, See under Recumbent.

Recumbent (re-kum'bent) [L. *re*, back, and *cumbere*, to lie down.] *a. lying down* आडवा, (खालीं) पडलेला, पासला, पासल घेतलेला, पार्श्वशय. Recum'bency *n.* आडवा होणें *n*, आडय *f* (v. घे), पासल *f*. Recum'bently *adv.* आडवा होऊन, आडय घेऊन, पासल घेऊन, कुशीस निजून.

Recuperate (rē-kū'pėr-āt) [L. *recuperare*, to recover.] *v. i.* and *t. to restore or be restored from illness, exhaustion, loss, etc.* (आजारांतून) उठणें, रोगमुक्त करणें, थकवा नाहींसा करणें-घालवणें. २ (पैशाचें नुकसान) भरून काढणें.

Recu'peration *n.* प्रकृति ताळ्यावर येणें-सुधारणें *n*.

Recu'perative *a.* (*med.*) शक्तिवर्धक, पौष्टिक.

Recur (re-kur') [L. *re*, back and *curro*, I run.] *v. i.* (of idea) *to return to mind* मनांत येणें, सुचणें, आठवणें, स्मरणें, आठवण *f* -स्मरण *n*. होणें *g. of s.* २ (*of problem*) *to come up again* पुनः पुढें येणें, पुनः उद्भवणें -उपस्थित होणें. ३ *to occur again* फिरून -पुनः घडणें-घडून येणें, पुनः होणें, पुनः येणें, पुनरावर्तन होणें.

Recurr'ence *n.* मनांत येणें *n*, सुचणें *n*, आठवणें *n*, आठवण *n*, स्मरण *n*. २ पुनः उद्भवणें *n*. ३ पुनरावर्तन *n*, फिरून घडणें *n*, उलटणें *n*, उलट खाणें *n*.

Recurr'ent *a.* (of nerve, vein, branch) *turning back so as to reverse the direction* परत वळणारा, माघारीं येणारा. २ *occurring again or often or periodically* पुन: घडणारा, वारंवार येणारा -घडणारा, पुनरागामी, पुनरावर्तक, आवर्तक. R. *n. one of the two recurrent laryngeal nerves* आवर्तक (कंठनाडीस्थ) मज्जातंतु. See N. B. under Nerve.

Recur'ring *pr. p. a.* आवर्त (used as *a.*) [R. DECIMALS आवर्त दशांश *m. pl.* R. CURVE, *curve that returns upon itself* आवर्त वक्र.]

Re-cur'vate *a.* पाठीमागें वळलेला-पाठीकडे -वांकलेला -मुरडलेला, पृष्ठेनमित.

Re-curve (rē-kurv') [L. *re*, back and *curvo*, I bend.] *v. t. and i. to bend backwards* पाठीमागें वळणें-वांकणें-मुरडणें, पाठीमागें वळविणें.

Recusant (re-kūz'ant) [L. *re*, against, and *causa*, a cause.] *n. one who refuses to conform or submit* (राजाची) सत्ता न जुमानणारा *m.* (b) चर्च आफ् इंग्लंडची प्रार्थनापद्धति न मानणारा *m.*

Red (red) [A. S. *rēad*, red.] *a.* तांबडा, लाल, रक्त, आरक्त, लोहित. [DARK R. अरुण. DUSKY R. (*esp. of cattle*) पोवळा. DEEP R. तांबडाजर्द, लालभडक, लालबुंद. PALE *or* LIGHT R. पाटल, गोराभुरका, श्वेतरक्त. YELLOWISH R. पिंवळसर तांबडा.] २ *having to do with bloodshed, violence, or revolution* रक्ताचा, रक्तपाताचा, रक्तानें भरलेला-माखलेला; as, "R. battle, vengeance." R. with anger रागानें लाल झालेला. With R. (*blood-stained*) hands रक्तानें (हात) माखलेला. R. eyes (रडून रडून किंवा रागानें) तांबडेलाल (झालेले) डोळे. R.-blind तांबडा रंग न दिसणारा. R. box (सरकारी कागदपत्र ठेवण्याची राजमंत्र्यांची) लाल पेटी. R.-coat, *soldier of British Army* ब्रिटिश सैन्यांतील लाल डगलेवाला सोजीर. R. cross, *St. George's cross or national emblem of England* (इंग्लंडचें) लाल निशाण. R. ensign ब्रिटिश व्यापारी जहाजांचें लाल निशाण *n.* R. flag राज्यक्रांतीचें निशाण, लढाईचें निशाण. २ रेल्वेवरील भयसूचक निशाण *n*, लाल बावटा *m.* R. gum, *teething-rash in children* दांत येतांना येणारा पुरूळ *m.* R. -handed प्रत्यक्ष अपराध करीत असतांना. [To TAKE R. HANDED प्रत्यक्ष अपराध करीत असतांना पकडणें.] R.-heat तांबडा लाल होणें *n* (*lit.* and *fig.*). २ रक्तोष्णमान, रक्तोष्णता. R. hot रक्तोष्ण, तापून लाल झालेला, अग्निवर्ण, जळजळीत. २ अतिशय प्रक्षुब्ध झालेला.

Redact (rē-dakt') [L. *re* (*d*) and *agere*, to do.] *v. t. to put into literary form* (matter for publication) प्रसिद्ध करण्याकरितां मजकूर तयार करणें.

Redd'en *v. t.* and *i.* तांबडा करणें, तांबडा होणें, तांबरणें.

Red'dish *a.* तांबूस, तांबडासा, तांबडसर, तांबा, ईषद्रक्त.

Redd'ishness *n.* तांबूसपणा *m.*

Reddle (red'l) [Variant of Ruddle.] *n. red*

*ochre* तांबडी माती *f*, काव *f*, गेरू *m*. R. *v. t. to colour with reddle* कावेनें रंगवणें, काव लावणें.

Redeem (re-dēm' [L. *re* (*d*) and *emo*, I buy.] *v. t. to buy back* परत विकत घेणें. (b) (mortgage) (गहाण) सोडवणें. २ *to perform* (*promise*) (वचन) पुरें करणें, खरें करणें, पूर्ण करणें. ३ *to purchase the freedom of by ransom* खंडणी *f* -खंड *m* -पैका *m*. देऊन सोडवणें -मोकळा करणें -मुक्त करणें. ४ *to rescue, to save* सोडवणें, मुक्त करणें. ५ (*of God or Christ*) *to deliver from sin and damnation* (आपल्या देहाची) खंडणी देऊन सोडवणें, मुक्त करणें, तारणें, उद्धार *m*. करणें, तारण करणें. ६ *to compensate* भरपाई करणें, भरून काढणें; as, "Has one redeeming feature." ७ *to save from a defect* (दोष, कमीपणा) कमी करणें, नाहींसा करणें; as, "The eyes *redeem* the face from ugliness." Redeem'ed *pa. t. and pa. p.*

Redeem'able *a.* परत विकत घेण्यासारखा. २ खंडणी देऊन सोडवण्यासारखा. ३ मुक्त करण्यासारखा. ४ उद्धार करण्यासारखा, तारण्यासारखा. ५ भरपाई करण्यासारखा, भरून काढण्यासारखा.

Redeem'er *n.* (खंडणी देऊन) सोडवणारा *m*. २ (*specif.*) तारक *m*, त्राता *m*., उद्धारक, मुक्तिदाता, उद्धार करणारा. ३ (*esp. with capital* R) *Christ* ख्रिस्त *m*.

Redeem'ing *pr. pr.* परत विकत घेणारा. २ (वचन) पुरें करणारा. ३ सोडवणारा, मोकळा करणारा. ४ तारणारा, मुक्त करणारा. ५ भरपाई करणारा, भरून काढणारा. ६ कमी करणारा, नाहींसा करणारा. ७ (a quality) (दोष) भरून काढणारा.

Redemp'tion *n. redeeming or being redeemed* खंडणी देऊन सोडवणें *n*, मुक्त करणें *n*. (b) भरपाई करणें *n*. (c) (law) गहाण सोडवणें *n*, परत विकत घेणें *n*. (d) मुक्तता *f*, भरपाई *f*. (e) तारण *n*, मोचन *n*, निष्कृति *f*. २ (*esp.*) *the deliverance from sin and damnation wrought by Christ's atonement* खंडणी देऊन सोडवणें *n*, तारण *n*, उद्धार *m*. [PAST, BEYOND, OR WITHOUT R.s उद्धाराची आशा नसलेला, उद्धार न करतां येण्याजोगा. IN THE YEAR OF OUR R. 1915 १९१५ सालीं.] ३ *thing that redeems* खंडणी *f*. (b) तारणारी गोष्ट *f*, तारण *n*. ४ खरेदी *f*.

Red-hand, Red-heat, See under Red.

Redintegrate (rē-din'tē-grāt) [L. *redintegrare*, *re*, and *integrare*, to make whole, -*integer*, whole.] *v. t. to restore to wholeness or unity* (तुकडे तुकडे जोडून) वस्तु पहिल्यासारखी करणें, (तुकड्यांचा) पूर्ववत् वस्तु करणें.

Redintegra'tion *n.* (तुकड्यांची) पहिल्यासारखी एक वस्तु *f*.

Red'irect *v. t.* पुनः (बरोबर पत्त्यावर) पाठविणें, सूचने-प्रमाणें पुनः पाठविणें.

Red-lead *n.* शेंदूर *m*, सिंदूर *m*. [R. LEAD IN LITTLE SPARS कांब्या शेंदूर *m*.] R.-lead *v. t. to coat with red-lead* शेंदूर फांसणें, शेंदूर माखणें.

**Red-letter** *a.* तांबड्या अक्षरांनीं लिहिलेला ( सणाचा किंवा महत्वाचा दिवस ). २ (*fig.*) संस्मरणीय. R.-letter *v. t.* ( संस्मरणीय म्हणून, सण म्हणून ) तांबड्या अक्षरांनीं लिहिणें.

**Red man** *n.* ( उत्तर अमेरिकेंतील ) तांबडा इंडियन *m.*

**Red mass** *n.* तांबडा (पोषाख घालून म्हणण्याचा) मास *m.*

**Red'ness** *n.* तांबडेपणा *m*, लालपणा *m*, लाली *f*, रक्तत्व *n*, रक्तिमा *m*. [R. OF THE SKY (*at sunset or sunrise*) तांन *f*.]

• **Red ochre** *n.* लोखंडी काव *f*, गेरू *m*.

**Redolent** ( red'o-lent ) [ L. *redolens-redolentis -red, re*, off, again, and *olere*, to emit odour. ] *a. having a strong smell* उग्र वास असलेला, उग्रट. २ (*fig.*) *strongly suggestive* (*of*) सूचक, दर्शक.

**Re-double** ( rē-dub'l ) [ Fr. *re-doubler*, See Double.] *v. t. to intensify, to increase* दुप्पट करणें, दुणा करणें. २ पुष्कळ वाढविणें. R. *v. i. to grow intense* दुप्पट-दुणा होणें-वाढणें, दुणावणें. ( b ) ( पुष्कळ पटीनें ) अधिक होणें.

**Redoubt** (re-dowt') [Fr. *redoute, reduit*, a redoubt, retreat- It. *ridotto* –L. *reductus*, retired ·*re*, and *dūco*, I lead. ] *n.* (*fort*) *an outwork in fortification* बाहेरकोट *m*.

**Redoubt'able** *a. formidable* दांडगा, भीम, मोठ्या पराक्रमाचा, प्रचंड.

**Redound** ( re-downd' ) [ Lit. 'to roll back as a wave.' Fr. *redound* -L. *re* (d), and *unda*, a wave. ] *v. i. to contribute in the end to one's advantage* (-मध्यें ) पर्यवसान होणें, with *g. of s.*, परिणामीं असणें-होणें, परिणाम-शेवट असणें; as, "This procedure will R. to our advantage."

**Red rag** *n.* तांबडी चिंधी *f*. २ (*fig.*) चिडविणारी किंवा राग आणणारी गोष्ट *f*.

**Redress** (re-dres') [Fr. *redresser -re*, again, and *dresser*. See dress.] *v. t.* ( R ) *to set straight again* सरळ करणें, नीट करणें. [To R. THE BALANCE, *to restore equality* समतोल करणें.] २ *to set right, to remedy* (*distress, wrong*) दाद घेणें, दुरुस्ती करणें, उपाय योजणें, बंदोबस्त करणें, काढून टाकणें, दूर करणें, इलाज करणें. R. *n. redressing of grievances* दाद *f*, उपाय *m*, बंदोबस्त *m*, तजवीज *f*, इलाज *m*, दुरुस्ती *f*.

**Redress'er** *n.* दाद घेणारा *m*, उपाय करणारा.

**Red-ribbon** *n.* ( आर्डर आफ् दि बाथच्या पदवीची ) तांबडी फीत *f*.

**Red skin** *n.* तांबडा इंडियन *m*.

**Red soldier** *n.* ( ज्यामध्यें त्वचा लाल होते असा ) डुकरांना येणारा ताप *m*. २ असा ताप आलेलें डुकर.

**Red tape** *n.* लाल फीत ( ही जरूरीच्या कागदपत्रांना लावतात ). २ आफिसची फाजील शिस्त पाळणें *n*.

**Red tapery.** आफिसची फाजील शिस्त *f*.

**Red-tapism** *n.* आफिसची फाजील शिस्त *f*.

**Red tapist** *n.* आफिसची फाजील शिस्त पाळणारा *m*.

Reduce (re-dūs') [Lit. 'to bring back,' L. *reduco, reductum -re*, back and *duco*, I lead.] *v. t. to bring down, to lower* कमी करणें, हलका -थोडा -न्यून करणें, उतरणें. २ *to weaken* रोड करणें, क्षीण -शुष्क करणें, क्षिजवणें, गळहाटणें, आंग *n.* जर्जर करणें. [To BE REDUCED रोडणें, खंगणें.] ३ *to impoverish* भिकेस लावणें, दरिद्री करणें, कंगाल करणें, कंगालीस -दरिद्र-दशेस आणणें -मिळवणें -लावणें. ४ *to bring by force or necessity to some state* (-प्रत) आणणें, लावणें, मिळवणें, आपन्न (in comp.) -संपन्न (in comp.) करणें. ५ *to subdue* जेरीस आणणें, वठणीस आणणें, हुकमतींत आणणें. ६ रूप देणें, स्वरूप देणें, स्वरूपांत आणणें. ७ (*arith.*) रूप देणें, रूपांतर करणें, सवर्ण करणें. [To R. TO A COMMON DENOMINATOR समच्छेदरूप देणें.] ८ (*chem.*) *to remove oxygen from* प्राणवायुहीन करणें, प्राणवायु काढून टाकणें, सोज करणें (उज्ज = Hydrogen). ९ (*surg.*) *to restore to original or proper position* (निखळलेलें हाड वगैरे) जागेवर बसविणें. Reduce'r *n.* (*chem.*) धात्ववस्थोत्पादक द्रव्य *n.* (b) प्राणवायुहीन करणारा. Reduc'ible *a.* in verbal senses. २ (*med.*) पुनः पहिल्या जागीं परत जाण्यासारखा, परत लोटतां येण्यासारखा, स्वस्थाननेय, निवर्तनीय. [R. HERNIA निवर्तनीय अंतर्गळ *m*, परत लोटतां येण्याजोगा अंतर्गळ *m.*] Reduc'ing *pr. p.* and *a.* [R. AGENT विदोहक *m.* R. SOLUTION विरलीकरण द्रव *m.*] Reduc'tion *n.* कमी करणें, थोडा करणें, रोड करणें, भिकेस लावणें, जेरीस आणणें, &c. २ (*photo.*) धात्ववस्थोत्पादन *n.* ३ (*phys.*) विदोहन *n*, विरलीकरण *n.* ४ (*chem.*) संस्कारक्रिया *f.* [R. TEST संस्कारपरीक्षा *f.*] ५ (*philos.*) रूपान्तर *n*, आकारान्तर *n.* [OSTENSIVE R. सम आकारान्तर *n.* R. PER IMPOSSIBLE व्यस्त आकारान्तर *n*, विरुद्धसिद्धि *f.*] ६ (*astron.*) लघूकरण *n.* ७ रूपान्तरक्रिया *f*, भांजणी *f.* [ASCENDING R. अधिरोही रूपान्तरक्रिया *f*, चढती भांजणी *f.* DESCENDING R. अवरोही रूपान्तरक्रिया *f*, उतरती भांजणी *f.*] ८ (*med.*) (a) ढळलेलें हाड पुनः जाग्यावर बसविणें, स्वस्थानानयन *n*, मोडलेल्या अस्थींचे तुकडे जुळवणें. (b) परत लोटणें, पहिल्या जागीं नेणें, अंतर्गळ पोटांत बसविणें. [R. IN MASS OF HERNIA अंतर्गळाचें समग्र निवर्तन *n.*]

Reductio ad absurdum *n. reduction to absurdity* अयुक्त सिद्धांताकडे जाणें, अयुक्तसिद्धि *f*, असंगतिप्रदर्शन *n*, व्याहतिप्रदर्शन *n.*

Redundant (re-dun'dant) [Lit. 'overflowing like waves,' L. *re* (*d*) and *unda*, a wave.] *a. superfluous* अधिक, फाजील, अतिरिक्त, अपेक्षिताधिक. Redun'dance,-cy *n.* आधिक्य *n*, अधिकाई *f*, अतिरेक *m*, *n*, अपेक्षिताधिक्य *n.* [R. OF WORDS शब्दबाहुल्य *n*, शब्दाधिक्य *n.*]

Re-duplicate (re-dū'plik-āt) [L. *re*, again and duplicate.] *v. t. to make double* दुप्पट करणें. २ (*gram.*) *to form by reduplication* (अक्षराची) द्विरुक्ति करणें, (अक्षर) द्वित्त करणें, (चा) अभ्यास (S.) करणें. Re-

duplica'tion *n.* दुप्पट करणें *n.* २ दोनदां होणें *n*, द्विगुणीभवन *n.* ३ (*gram.*) *repetition of syllable or letter in word-formation* द्विरुक्ति *f*, अभ्यास *m.* (b) *part so repeated* द्विरुक्तयक्षर *n.*

Red water (ज्यामध्यें मूत्र तांबडें असतें असा) गुरांचा व मेंढरांचा रोग *m*, तांबड्या मुताचा रोग *m.*

Re-echo ( rē-ek'ō ) *v. t. to echo over and over again* पुनःपुनः प्रतिध्वनि करणें. R. *v. i.* पुनःपुनः प्रतिध्वनि होणें.

Reed ( rēd ) [ A. S. *hreod;* Dut. and Ger. *riet.* ] *n. a kind of firm-stemmed water plant* वेत *m*, वेत्र *n.* [ Broken R. See under Broken. Writing R. वरू *m*, वोरू *m.* Pen of it लेखणी *f*, लेखण *f.* To lean on a R., *to put trust in a weak person or thing* लटपटीत मनुष्यावर किंवा गोष्टीवर विश्वास टाकणें. ] २ (*collect.* ) *wheatstraw prepared for thatching* ( शाकारण्याकरितां ) गव्हाचें काड *n.* ३ *a musical pipe* वेणु *f.* (b) *pastoral poetry* मेंढपाळांचीं गाणीं *n. pl.* ४ ( of a wind-instrument ) जिव्हाळी *f.* [ Free R. मोकळी जिव्हाळी *f.* ] (b) *pl. wind instruments* जिव्हाळीचीं वाद्यें *n. pl.* ५ *a weaver's implement for separating warp-threads and beating up weft* ( कापड विणण्याची ) फणी *f.* [ R.-hook तारफणी, आंकडी *f*, तारपन. R.-space फणी बसविण्याचे जागेची लांबी *f.* R. machinery तारफणी वनविण्याचीं यंत्रें. R. comb गुंता काढण्याची फणी *f.*] R. *v. t. to thatch with reed* काडानें शाकारणें. २ *to fit* ( *musical instrument* ) *with reed* जिव्हाळी बसविणें.

Reed'ed *a. coverd with reeds* काडानें शाकारलेला. २ ( *of a frame* ) *having ridges like reeds* उभे वेत बसविलेला.

Reed-organ *n.* (धातूच्या) जिव्हाळीचें वाद्य *n.*

Reed'y *a. full of reeds* वेतांचा, वेतांनीं भरलेला, पुष्कळ वेत असलेला. २ *made of reed* वेताचा केलेला; as, "R. couch." ३ *like a reed in weakness, slenderness, &c.* वेतासारखा बारीक, किडकिडीत, लटपटीत. ४ (of voice) *scratchy, not round and clear* फुटका ( आवाज ), चिरका ( आवाज ).

Reef ( rēf ) [ Icel. *rif*, a reef. ] *n. a line of rocks* ( *esp. lying near the surface of the water* ) खडकांची ओळ *f*, पाण्यांतले खडक *m. pl.*, खरावा *m.*

Reef ( rēf ) [ Danish *rif*, a reef. ] *n. a fold of a sail* शिकी *f.* R. *v. t. to fold or roll up a part of a sail* शिकी *f.* बांधणें.

Reek ( rēk ) [ A. s. *rēc;* D. *rook*, smoke. ] *n. smoke* धूर *m.* २ *vapour* वाफ *f.* ३ *foul or stale odour* घाणेरडा वास *m*, घाण; as, "The R. of tobacco." ४ *fetid atmosphere* घाणेरडी हवा *f.* R. *v. i. to emit smoke* ( पासून ) धूर निघणें. २ *to emit vapour* ( पासून ) वाफा निघणें. ३ *to smell unpleasantly* घाण *f.* येणें. Reek'y *a.* धुराचा, धूम्रमय. २ वाफेचा, बाष्पमय. ३ *foul* घाणेरडा, घाणेरा.

मिळकतीवरील) हक्क सोडणें, (आपला हक्क) दुसऱ्याच्या नांवावर करून -चढवून देणें, (loosely) (कोर्टामार्फत) सोडचिठी करून देणें. २ *to liberate, to set free* मोकळा -मुक्त करणें, सोडणें, सोडविणें, सोडवणूक *f* -सुटका *f* -बंदखलास करणें, कौलमुक्त करणें (कौल = lease). R. *n. legal conveyance of right or estate to another* (नांवानें) सोडचिठ्ठी *f*. (b) *acquittance from debt* सोडचिठ्ठी *f*, बेदावापत्र *n*. २ (*act*) सोडणें *n*, सोडवणें *n*, सोडवण *f*, सोडवणूक *f*, बंदखलास *m*, मोचन *n*. (b) (*state*) सुटका *f*, मोकळीक *f*, मुक्तता *f*, मुक्ति *f*, विमोचन *n*.

Released' *pa. t.* R. *pa. p.* सोडलेला, सोडविलेला, मोकळा केलेला, बंदखलास, मुक्त.

Releas'er *n*. सोडणारा *m*, सोडविणारा *m*, मुक्त करणारा, मोकळा करणारा *m*. २ (हक्क) सोडणारा, etc.

Relegate (rel'e-gāt) [L. *re*, away, and *legare*, to send with a charge or commission.] *v. t. to send to an inferior sphere* खालच्या पायरीला पाठविणें -सोंपविणें. २ *to banish into exile* देशाबाहेर पाठविणें, हद्दपार करणें. ३ *to transfer* (*matter*) *for decision or execution* (निर्णयाकरितां किंवा बजावणीकरितां -कडे) पाठविणें -सोंपविणें. ४ खालच्या अधिकाऱ्याकडे सोंपविणें.

Relega'tion *n*. खालच्या पायरीला पाठविणें *n*. २ हद्दपार करणें *n*. For more meanings, see the Verb.

Relent (re-lent') [Fr. *relentir*, to retard –L. *lentus*, pliant, flexible. Relent शब्दाचा धात्वर्थ 'मऊ होणें, मृदु होणें, वितळणें' असा आहे.] *v. i. to yield to compassion* दया *f*. येणें, कळवळा *m* -पान्हा *m*. येणें, द्रवणें, कळवळणें, काकळूत *f*. येणें, कमी कठोर होणें, कमी कडक -कमी तीव्र होणें, सौम्य होणें.

Relent'less *a*. निर्दय, क्रूर, कठोर, पाषाणहृदय, मांगहृदय.

Relent'lessly *adv*. निर्दयपणानें, कठोरपणानें, कठोर मनानें.

Relent'lessness *n*. निर्दयपणा *m*, कठोरपणा *m*, पाषाणहृदय *n*.

Rel'evance, Rel'evancy *n*. चालू विषयाशीं संबंध *m*, प्रस्तुताशीं संबंध *m*, प्रस्तुतता *f*, प्रसंगानुरूपता *f*.

Relevant (rel'e-vant) [Fr. *relevant*, pr. p. of Fr. *relever*, to raise up, to assist, to help. Relevant शब्दाचा धात्वर्थ 'मदत करणारा', 'चालू विषयाला उपयोगी' असा आहे.] *a. pertinent to the matter in hand* (प्रस्तुताशीं) लागू पडणारा, लागू असणारा, प्रस्तुत, प्रसंगोचित, प्रसंगानुरूप, प्रस्तुतोचित.

Rel'evantly *adv*. (चालू) विषयाला धरून.

Reliabil'ity, Reli'ableness *n*. विश्वासूपणा *m*, विश्वसनीयता *f*, विश्वासपात्रता *f*, खात्री *f*. [R. TRIALS (मोटार, बायसिकल, वगैरेच्या वेगाच्या किंवा टिकाऊपणाच्या) खात्रीसंबंधीं परीक्षा *f*.]

Reliable (re-lī'a-bl) [See Rely.] *a. that may be relied upon* विश्वासू, विश्वसनीय, विश्वासयोग्य, विश्वास टाकण्यासारखा, विश्वासाचा, भरंवशाचा, खात्रीलायक.

Reli'ably *adv.* विश्वासानें, विश्वासूपणानें, भरंवशानें.

Reli'ance *n. confidence* विश्वास *m*, भरंवसा *m*, भरोसा *m*, खात्री *f*. [Some terms for a person or thing in or on which reliance is placed are भरंवशाची मोट *f*, भरंवशाचें कूळ *n*, भरंवशाची म्हैस *f*.] २ आधार *m*, आश्रय *m*, अवलंब *m*, आश्रयस्थान *n*, विश्वासाचें ठिकाण *n*; as, "The boat was a poor R."

Relic (rel'ik) [Fr. *relique* –L. *reliquiæ* –L. *relinquere*, to leave behind.] *n. a remnant* शेष *m*, अवशेष *m*, शिल्लक *f*. २ (स्थळाचा) अवशेष *m*, पडका भाग *m*. (b) (साधुसंताच्या देहाचा) अवशेष *m*, (साधुसंताची मागें) राहिलेली चीजवस्त *f*. ३ (*pl.*) शव *n*, प्रेत *n*, देह *m*. (b) (amongst the Hindus) अस्थी *f. pl.*

Relict (rel'ikt) [L. *relicta* -*relinquo*. See Relinquish.] *n. a widow* विधवा *f*.

Relief' *n. deliverance from distress* (दुःख) कमी करणें *n*, (दुःख) हलकें करणें *n*, (दुःखाचा बोजा) कमी करणें *n*, (काळजीचा बोजा) कमी करणें *n*, दुःखपरिमार्जन *n*, दुःखपरिहार *m*, दुःखमोचन *n*. २ *alleviation of anxiety, pain, etc., ease* हलकें *n*, बरें *n*, आराम *m*, चैन *n*, सुख *n*, स्वस्थपणा *m*, स्वस्थता *f*, विसांवा *m*, विश्रांति *f*. ३ *reinforcement* कुमक *f*, मदत *f*. ४ वेढा उठवणें *n*. ५ *assistance given to the poor* मदत *f*. [R. WORKS मदतीचीं कामें *n. pl.*, *specif.* दुष्काळी कामें *n. pl.*] ६ (*law*) दाद *f*. ७ *replacing of person on duty* सोडविणें *n*, बदलणें *n*, बदली *f*, (पहाऱ्याचा) पालट *m*. ८ *a person appointed to take turn of duty* बदली *m*, बदल्या *m*, सोडविणारा *m*. ९ (*carving*) *raised work in sculpture or architecture* उठावाची नकशी *f*, उठावाचें खोदींव काम *n*. १० *distinctness or vividness* ठळकपणा *m*, ठळठळितपणा *m*; as, "Stands out in R." ११ (*geol.*) *the surface of a country with regard to its elevations and depressions* उठाव *m*, उंची *f*, समविषम स्थिति *f*. [GENERAL R. सामान्य उंची *f*.] १२ *that which relieves monotony or sameness* (तेंचतेंचपणाचा दोष काढून टाकणारें) वैचित्र्य *n*, विरोध *m*.

Relieve (re-lēv') [Fr. –L. *re*, again, and *levare*, to raise. Relieve शब्दाचा धात्वर्थ 'पडलेल्या मनुष्याला वर उचलणें -वर उठवणें' असा आहे. परंतु हा अर्थ सध्यां लुप्त आहे.] *v. t. to partly free* (*from pain, grief, toil*, etc.) (दुःख) कमी करणें, (दुःख) हलकें करणें, (दुःखाचा बोजा) कमी करणें, (काळजीचा बोजा) कमी करणें, आराम *m* -सुख *n*, -चैन *n*. देणें, आराम *m*-चैन *n*. पाडणें. २ *to free wholly from, to alleviate* नाहींसा करणें, शमविणें, उपशमन *n* -शमन *n*. करणें *g. of o.* [To R. NATURE मलमूत्रविसर्जन करणें.] ३ *to help in want* मदत *f*. करणें, मदत *f*. देणें. (b) *to reinforce a besieged town* कुमक पाठविणें, कुमक करणें, कुमक *f*. देणें. (c) (कुमक पाठवून) वेढा उठवणें. ४ (a sentinel, etc.) सोडविणें, बदलणें, पालटणें, सुटका *f*.

करणें *g. of o.* ५ *to remove the monotony or sameness of, to introduce a contrast or variety into* तेंचतेंचपणाचा दोष काढून टाकणें, (वैचित्र्यानें) एकपणाचा दोष काढून टाकणें; as, "The poet must sometimes R. the subject with a moral reflection." ६ *to put in relief, to give prominence or conspicuousness to* उठावांत आणणें, उठाव करणें, उठाव देणें, ठळकपणा आणणें.

Reliev'ed *pa. p.* (दुःख) कमी केलेला, (दुःखांतून) मुक्त केलेला. २ आराम दिलेला. ३ शमविलेला, हलका केलेला. ४ (नोकरीवरून) सोडविलेला. ५ कुमक पाठविलेला. ६ वेढा उठविलेला.

Reliev'er *n.* (दुःखाचा) परिहार करणारा *m*, दुःखमुक्त करणारा *m.* २ आराम देणारा *m.* ३ शमविणारा *m.* ४ बदली *m*, बदल्या *m*, (कामावरून) सोडविणारा *m.* ५ वेढा उठविणारा *m.*

Reliev'ing *pr. p.* [R. ARCH मुकी कमान *f.*]

Religion (re-lij'-un) [Lit. 'a restraint'. L. *re*, back, and *ligare*, to bind.] *n. any system of faith and worship* धर्म *m.* (b) धर्ममार्ग *m*, धर्मपंथ *m.* [ESTABLISHED R. राजानें मंजूर केलेला धर्म, राजस्थापित धर्म *m.* NATURAL R. सृष्टिसिद्ध धर्म *m*, नैसर्गिक धर्म *m.* PHYSICAL R. भौतिक धर्म *m.* REVEALED R. (ईश्वरानें स्वतः प्रेरणा केलेल्या मनुष्यांच्या द्वारें) प्रगट झालेला धर्म *m*, (amongst the Hindus) अपौरुषेय धर्म *m.*] २ *belief in, love to, and obedience and service to, God* आस्तिक्यबुद्धि *f*, धर्मबुद्धि *f.* (b) ईश्वरभक्ति *f*, देवभक्ति *f*, भक्ति *f*, भक्तिभाव *m.*

Relig'ionism *n. devotion to religion* धर्मपरायणता *f*, धर्मावर श्रद्धा *f*, धर्माची भक्ति *f.* २ *the practice of religion* धर्माचरण *n.* ३ *a pretence of religion* धर्माचें थोतांड *n*, धर्मदंभ *m.* ४ फाजिल धर्माभिमान *m.*

Relig'ionist *n.* धर्मपरायण मनुष्य *m.* २ धर्माभिमानी *m.*

Relig'ionless *a.* धर्म नसलेला, धर्महीन.

Relig'ious *a. pious, godly* धर्मपरायण, धार्मिक, देवभोळा, भाविक, आस्तिक, श्रद्धाळू. २ *of or concerned with religion* धार्मिक, धर्माचा, धर्मासंबंधींचा, धर्मविषयक, धर्म्य. [R. OBSERVANCES धर्मकृत्यें *n. pl.*] ३ *scrupulous* (a) पापभीरु. (b) ईश्वरभीतिपूर्वक, ईश्वराची भीति मनांत बाळगून केलेला, सदसद्विवेकपूर्वक, पापपुण्यविचारगर्भित, फार, अतिशय; as, "With R. care." ४ *of or belonging to a monastic order* ख्रिस्ती जोगीसंस्थेचा, ख्रिस्ती जोग्यांचा, ख्रिस्ती जोगिणींचा. [R. HOUSE ख्रिस्ती जोग्यांचा किंवा जोगिणींचा मठ *m.*] R. *n.* (in the R. C. Church) *a person bound by monastic vows* (दारिद्र्य, ब्रह्मचर्य, आज्ञापालन अशा तीन शपथा घेतलेला) रोमनक्याथोलिक जोगी *m.*

Relig'iously *adv.* धर्मपरायणतेनें, धर्मबुद्धीनें, भक्तिभावानें, धार्मिक बुद्धीनें, धार्मिकतेनें, सदसद्विवेकबुद्धिपूर्वक, ईश्वराची भीति बाळगून, पापभीरुतेनें.

Relig'iousness *n.* धर्मपरायणता *f*, धार्मिकता *f*, धार्मिकपणा *m*, धर्मनिष्ठा *f*, देवभक्ति *f.* २ पापभीरुता *f.*

Relinquish (re-ling'kwish) [Fr. *relinquish* -L. *re*, and *linquere*, to leave.] *v. t. to abandon, to give up* (प्राप्त झालेलें) सोडणें, सोडून देणें, त्याग *m.* करणें. २ (कर्ज) सोडणें.

Relin'quishment *n.* (हक्क वगैरे) सोडणें *n*, त्याग *m.* [R. OF RIGHT OR TITLE TO सत्तानिवृत्ति *f*, स्वत्व-निवृत्ति *f*, मालकीचा हक्क सोडून देणें *n.*]

Reliquary (rel'i-kwar-i) [Fr. *reliquaire.* See Relic.] *n. a receptacle for relics* मृताच्या अस्थि वगैरे ठेवण्याची पेटी *f*, अस्थिपेटिका *f*.

Relish (re'lish) [O. Fr. *relecher*, to lick or taste again.] *v. t.* (*R.*) *to make piquant* खमंग करणें, रुचकर करणें, चव *f* -स्वाद *m* -गोडी *f* -आणणें -देणें. २ *to taste or eat with pleasure, to enjoy or like the flavour of* मजेनें रुचि *f*. घेणें, रुचीनें -चवीनें खाणें, गोड वाटणें *in. con.*, गोड लागणें *in. con.*, (-ची) रुचि *f* -चव *f*. आवडणें, (-ची) रुचि *f*. पसंत असणें, रुचकर -बरें लागणें -वाटणें; as, "To R. the food." ३ आवडणें, पसंत पडणें -असणें, चांगला -बरा वाटणें; as, "Cannot R. the prospect." R. *v. i. to taste of* रुचि *f* -चव *f*. असणें, रुचकर -चवदार असणें -लागणें, छटा *f* -स्वाद *m* -गंध *m* -वास *m*. येणें -मारणें. R. *n. distinctive taste* (*of*) चव *f*, गोडी *f*, रुचि *f*. २ *slight tinge of some quality* छटा *f*, स्वाद *m*, वास *m*. ३ *a condiment* (*sauce, etc.*) तोंडीं-लावणें *n*, कोरड्यास (केलेला पदार्थ) *m*. ४ *zest or liking for* आवड *f*, गोडी *f*, अभिरुचि *f*.

Re'lishable *a.* रुचि लागण्यासारखा, आवडण्यासारखा, रुचीचा, स्वादिष्ट, रुचकर.

Reluctance, see under Reluctant.

Reluctant (re-luk'tant) [L. *reluctans,-re*, against, and *luctor*, to struggle.] *a. unwilling* नाखुष, नाराज. Reluc'tance, Reluc'tancy *n.* नाखुषी *f*, नाराजी *f*, कंटाळा *m*, विमुखता *f*. Reluc'tantly *adv.* नाखुषीनें, नाराजीनें, संकटानें.

Rely (re-lī') [L. *re*, back and Lie, to rest.] *v. i. to have confidence in* (-वर) भरंवसा *m* -विश्वास *m*. ठेवणें, पातणें, अवलंबणें, अवलंबून राहणें.

Remain (re-mān') [O. F. *remanoir* -L. *remanere re*, back and *manere*, to stay.] *v. i. to be left over after use of* उरणें, राहणें, शिलक असणें, शिलक राहणें, उबारीस or उबाऱ्यास येणें, शिलकेस असणें -राहणें, मागें पडणें, वांचणें, बाकी राहणें *g. of s.*, पारठा पडणें. २ *to stay in some place* राहणें, असणें, मुकाम *m*. करणें, मुकाम पडणें. ३ (*with compl.*) *to continue to be* राहणें, असणें; as, "I *remain* yours truly." R. *n.* (*usu. pl.*) *what remains over* शेष *m*, अव-शेष *m*. २ (*usu. pl.*) *relic of some obsolete custom or antiquity* (नष्ट झालेल्या चालीरीतींचा) अवशेष *m*, (प्राचीन वस्तूचा) अवशेष *m*. ३ (*pl.*) *dead body* शव *n*, प्रेत *n*. Remain'der *n. residue* अवशेष *m*,

शेषखंड *m*, शेष *m*, ऊर *f*, राहिलेला भाग *m*-अंश *m*, उरी *f*, उरवई *f*, उवेर *f*, उवेरी *f*. २ (law) अवशिष्ट (राहिलेला) मालकी हक्क, शेष *m*. [R. MAN शेषाधिकारी.]

*N. B.*—Remainder man is शेषाधिकारी, and Reversioner is उत्तराधिकारी. [THAT IS WITHOUT R. अशेष, निःशेष.] ३ (*arith.*) बाकी *f*, अंतर *n*, शेष *m*, अवशेष *m*. [R. THEOREM अवशेष सिद्धान्त.]

Remainder, see under Remain.

Remand (re-mand') [L. *re*, back and *mandere*, to order.] *v. t. to keep in custody* (*a prisoner, for further investigation of charges*) (पुरा पुरावा मिळेपर्यंत कच्चा कैदी) परत (अटकेंत) पाठविणें. २ कज्जा (पुन्हां चौकशीसाठीं) परत पाठविणें. R. *n. recommittal to custody* परत अटकेंत पाठविणें *n*.

Remark (re-märk') [Fr. *remarquer* -*re*, intensive, *marquer*, to mark.] *v. t. to take notice of* (-कडे) लक्ष देणें, लक्षपूर्वक पाहणें. २ *to say by way of comment* (-वर) टीका *f*. करणें, शेरा *m*. मारणें. R. *n. noticing* पाहणें *n*, लक्षपूर्वक पाहणें *n*. २ *a written or spoken comment* लेखी शेरा *m*, तोंडी शेरा *m*, टीका *f*.

Remark'able *a. worth notice* लक्षपूर्वक पाहण्यासारखा, लक्षांत येण्यासारखा, ठळक, ठसठसित. २ *exceptional, strange* विलक्षण, चमत्कारिक, अद्भुत.

Remark'ably *adv.* लक्षांत येण्याजोग्या रीतीनें, ठळकपणानें.

Re-mar'riage *n*. पुनर्विवाह *m*.

*N. B.*—In Modern Marathi पुनर्विवाह means remarriage of a widow.

Re-mar'ry *v. t.* पुनर्विवाह करणें, पुनर्विवाह लावणें.

Reme'diable *a.* उपाय्य करण्याजोगा, उपायसाध्य, परिहार करण्याजोगा, परिहार्य.

Reme'dial *a. affording a remedy* उपायाचा, इलाजाचा, परिहाराचा, परिहारक, प्रतिकारक, प्रतिबंधक.

Rem'edied *pa. t.* R. *pa. p. a.* उपाय केलेला, &c.

Remed'iless *a.* असाध्य, उपाय नसलेला, हीनोपाय.

Remedy (rem'e-di) [L. *remedium*, -*re*, back, again, *medeor*, to restore, to cure.] *n. cure for disease* उपाय *m*, इलाज *m*, उपचार *m*. [HARSH OR VIOLENT R. आसुरी उपाय *m*, राक्षसी उपाय *m* -उपचार *m*. MILD R. सौम्योपचार *m*, सौम्य उपचार, सौम्य उपाय *m*. TEMPORARY R. तात्पुरता उपाय *m*.] R. *v. t. to cure* उपाय करणें. २ *to make good* परिहार *m* -प्रतिकार *m* -निरसन *n* -निरास *m*. करणें *g. of o.* ३ (law) (नुकसानी) भरून काढणें.

Remember (re-mem'ber) [L. *re*, and *memor*, mindful.] *v. t. to keep in mind* आठवण ठेवणें, स्मरणें, स्मरण *n* -याद *f*. ठेवणें -धरणें -राखणें *g. of o.*, ध्यानांत ठेवणें -धरणें, मनांत ठेवणें, आठवण *f* -स्मरण *n*. राहणें -असणें *g. of o.*, *with in. con.* २ *to recollect* स्मरणें, आठवणें, आठवण *f*. करणें *g. of o.* ३ *to make present to, to tip* स्मरण ठेवणें, बक्षिस देणें, चिरिमिरी

देणें; as, "R. the waiter." ४ *to mention in one's prayers* ( चें ) स्मरण करणें, ( चें ) नांव घेणें, ( ची ) आठवण करणें. ५ *to convey greetings from (person) to another* ( चे ) नमस्कार सांगणें -कळविणें -विदित करणें. R. *v. i.* आठवणें, स्मरणें.

Remem'berable *a.* ध्यानांत ठेवण्यासारखा, स्मरण ठेवण्यासारखा, स्मरणीय.

Remem'bered *pa. t.* R. *pa. p.* आठवण ठेवलेला, स्मरण *n.* ठेवलेला, आठवण राहिलेला. २ आठवलेला, स्मरलेला, स्मृत.

Remem'berer *n.* आठवण ठेवणारा *m*, आठवण देणारा *m.*

Remem'bering *pr. p.* आठवण ठेवणारा, स्मरणारा, &c.

Remem'brance *n. remembering or being remembered* आठवण करणें *n*, आठवणें *n*, आठवण *f*, आठव *m*, आठवणूक *f*, याद *f*, यादगारी *f*, स्मरण *n*, स्मृति *f*; as, "Has escaped my R." [To PUT IN R. आठवण करणें, आठवण देणें.] २ *memorial* आठवण *f*, आठवणूक *f*, यादगारी *f*, स्मारक *n*, स्मरण (म्हणून दिलेली) वस्तु *f*. ३ (*pl.*) *greetings conveyed through third person* ( दुसऱ्या मार्फत कळविलेले ) नमस्कार *m. pl.*

Remem'brancer *n. one who or that which calls to remembrance* आठवण देणारा, स्मरण करणारा, आठवण करणारी गोष्ट किंवा वस्तु *f.* [ LEGAL R. सरकारला कायद्यासंबंधीं सल्लामसलत देणारा श्रेष्ठ अधिकारी *m.*]

Remind ( re-mind' ) [L. *re*, again and Mind.] *v. t. to put ( person ) in mind of* (-ला) सूचना देणें, सूचना करणें, पुन्हां आठवण *f* -स्मरण *n.* देणें-करणें, सुचविणें, मनांत -स्मरणांत आणणें, आठवणींत आणून देणें.

Remind'ed *pa. t.* R. *pa. p.* सूचना दिलेला, आठवण करून दिलेला, आठवण दिलेला.

Remind'er *n. one who or that which reminds* आठवण देणारा *m*, स्मरण देणारा, स्मृतिकारक, सूचना *f.* देणारा *m.* २ (*specif.* ) सूचना *f*, स्मरणपत्र *n*, स्मरणार्थ पत्र *n.*

Reminiscence ( rem-i-nis'ens) [Fr. -L. *reminiscentioe*, recollections-*reminiscor*, to recall to mind *re*, and *mens*, the mind.] *n.* (according to Plato) (पूर्वीच्या जन्मांतील ज्ञानाची) प्राक्स्मृति *f*, पूर्वस्मृति *f*, स्मृति *f.* २ (*pl.*) ( आयुष्यांतील ) आठवणी *f. pl.* ३ *point in a thing reminding or suggestive of the other thing* आठवण करणारा मुद्दा किंवा विषय *m*, स्मृतिकारक विषय *m*; as, "There is a R. of the Greek type in her face."

Remini'scent *a.* आठवणारा, आठवण करणारा, सूचक.

Remiss ( re-mis' ) [L. *re*, back, and *mittere -missum*, to send.] *a. negligent, careless* ढिला, शिथिल, सुस्त, भोंगळ, मंद, निरुत्साही, शेळपट, कामचुकार.

Remis'sible *a.* ढिला करण्यासारखा. २ सूट देण्यासारखा, माफ करण्यासारखा. ३ क्षमा करण्यासारखा.

Remis'sion *n.* (*act.*) मंद करणें *n*, ढिला करणें *n*, ढिलाई-वर घेणें. २ (state) ढिलेपणा *m*, कमीपणा *m*, ढिलाई *f*, सुस्ताई *f*, मंदी *f.* ३ ( पापांची ) क्षमा *f.* ४ (law)

सोडणें *n*, माफ करणें *n*, माफी *f*, सूट *f*, सोड *f*. [R. OF PUNISHMENT (राहिलेल्या) शिक्षेची माफी *f*.] ५ *diminution of force and violence* जोर कमी होणें *n*, ६ (*med.*) उतार *m*, उपशम *m*, (ज्वर कांहीं) कमी होणें *n*.

Remiss'ly *adv.* ढिलेपणानें, ढिलाईनें, सुस्ताईनें, गबाळेपणानें, निष्काळजीपणानें.

Remis'sness *n.* ढिलेपणा *m*, ढिलेपण *n*, ढिलाई *f*, हयगय *f*, आळस *m*, सुस्ताई *f*, सुस्ती *f*, शिथिलता *f*, निरुत्साह *m*, कामचोरपणा *m*.

Remit (re-mit') [Lit. 'To let go back.' L. *re*, back, and *mittere*, to send.] *v. t.* *to abate, to slacken* कमी करणें, मंद करणें, शिथिल करणें, ढिला-ढील करणें, ढिलाई *f* -सुस्ताई *f*. करणें -पाडणें-धरणें *g. of o.*, ढिलाईवर -सुस्ताईवर -आळसावर धरणें -घेणें, जोर *m* -बळ *n* -तेजगी कमी करणें *g. of o.*; as, "To R. one's efforts." २ *to forgive* (*as punishment*) सोडणें, माफ करणें, माफी देणें, (कर्जाची -दंडाची वगैरे) सूट *f* -सोड *f*. देणें -घालणें. ३ (usually of God) *to pardon* (sins) माफ करणें, क्षमा *f*. करणें, माफी *f*. देणें. ४ *to refer* (matter for decision) *to some authority* अभिप्रायाकरितां पाठविणें, अभिप्राय *m* -सल्ला *m*. विचारणें. (b) *to send back* (*case*) *to a lower court* तपासाकरितां (खालच्या कोर्टाकडे) पाठविणें. ५ *to send or put back into a previous state* पूर्वस्थितीवर आणणें, पहिल्या स्थितीवर नेणें. (b) (*specif.*) *to put again into custody* पुन्हां अटकेंत ठेवणें, पुन्हां तुरुंगांत ठेवणें. ६ (with *to* or *till*) *to postpone* लांवणीवर टाकणें, लांबविणें. ७ *to transmit* (*money*) (मनीआर्डर करून पैसे) पाठविणें. R. *v. i.* *to slacken* कमी होणें, मंदावणें, कमतावणें, हलकावणें, जोम *m*. कमी होणें *g. of s.*; as, "Pain, enthusiam, &c. begins to R." २ (as fever, &c.) कमी होणें, उतरणें.

Remit'tal *n.* *a remitting* पाठविणें *n*, पाठवणी *f*. २ *a surrender* सोडणें *n*, देणें *n*, त्याग *m*; as, "The *remittal* of the first fruits."

Remit'tance *n.* (पैसा) पाठवणें *n*. २ पाठविलेला पैसा *m*. ३ पाठविलेली वस्तु *f*.

Remittee' *n.* ज्याला पैसे पाठवितात तो *m*, पैसे घेणारा *m*.

Remit'tent *a.* (of fever) *increasing and abating* (साफ नाहींसा न होतां) चढउतार होणारा (ताप वगैरे), सान्निपातिक, (संतत) थोडाबहुत राहणारा. [R. FEVER सकाळीं कमी असून सायंकाळीं पुनः जास्त होणारा ताप *m*, संततज्वर *m*.]

Remit'ter *n.* (मनीआर्डरीनें वगैरे) पैसे पाठविणारा *m*. २ *one who pardons* माफी देणारा *m*, क्षमा करणारा *m*. ३ *remitting of case to other court* (मुकदमा) दुसऱ्या कोर्टाकडे पाठविणें *n*.

Remnant (rem'nant) [From the root of Remain.] *n. that which remains* शेष *m*, अवशेष *m*, शिलक *f*, अवशिष्टांश *m*, अवशिष्ट भाग *m*. २ *a piece of cloth offered at reduced price* तुकडा *m*, कटका *m*.

Re-model (rē-mod'l) *v. t.* (नव्या नमुन्याप्रमाणें) पुन्हां तयार करणें, नव्या रूपरेषेचा करणें; as, "To R. the map of Europe."

Remon'strance *n. a protest, expostulation* कानउघाडणी *f*, तक्रार *f*. २ *a formal statement of some grievance* (दुःखांबद्दल) सार्वजनिक तक्रार *f*, (लोकांच्या) तक्रारींचा अर्ज *m*.

Remon'strant *a.* कानउघाडणी करणारा, तक्रारीचा.

Remonstrate (re-mon'strāt) [Lit. 'to point out again and again.' L. *re*, again, and *monstrare*, to expose, to produce arguments against.] *v. i.* (with *against*, *with* and *on*) *to protest against, to expostulate* कानउघाडणी *f*. करणें, (च्या विरुद्ध) जोराची तक्रार *f*. करणें, दोन गोष्टी *f. pl.* सांगणें; as, "To R. against a course; To R. with a person on a matter."

Remon'strator *n.* कानउघाडणी करणारा *m*. २ तक्रार करणारा *m*, तक्रार मांडणारा *m*.

Remorse (re-mors') [Fr. *remorse* -L. *re*, and *mordere, morsum*, to bite.] *n. bitter repentance for wrong committed* पस्तावा *m*, पश्चात्ताप *m*, अनुताप *m*, मनस्ताप *m*, चुरचूर *f*, चुरचुराट *f*, खरखर *f*, चुणचुण *f*, चुळचूळ *f*, हळहळ *f*, चुटपुट *f*, खेद *m*, खुडसणी *f*. २ *compassionate reluctance to inflict pain or be cruel* परपीडनविमुखता *f*; as, "Without *remorse*." Remors'eful *a. repentant* पस्तावा झालेला, पश्चात्ताप झालेला, अनुतप्त, अनुताप झालेला. Remors'efully *adv.* पस्ताव्यानें, पश्चात्तापपूर्वक. Remors'eless *a. merciless* निर्दय, पाषाणहृदय, कठोर. Remors'elessly *adv.* निर्दयपणानें, कठोरपणानें. Remors'elessness *n.* निर्दयपणा *m*, (मनाचा) कठोरपणा *m*.

Remote (re-mōt') [L. *re*, again, and *movere, motum*, to move.] *a. distant in time or place* दूर, दूरचा, लांब, दूरस्थित, विप्रकृष्ट (opposed to सन्निकृष्ट), फार प्राचीन, लांबचा; as, "Memorials of R. ages; A R. ancestor; R. causes." २ (of idea, chiefly super.) *least* थोडकासा, अगदीं थोडा, यत्किंचित्; as, "Have not the *remotest* conception of what he means."

Remot'ely *adv.* दुरून, लांबून, लांबचा *decl.*

Remot'eness *n.* दूरपणा *m*, दूरता *f*, दूरस्थता *f*, मोठें अंतर *n*, विप्रकृष्टत्व *n*. २ प्राचीनता *f*.

Re-mount (rē-mownt') [L. *re*, again and Mount.] *v. t.* and *i.* पुनः वर चढणें, पुनः (घोड्यावर) स्वारी करणें. २ *to go back to specified date, period, source, &c.* मूळ तारीख पहाणें, मूळ काल पहाणें, मूळ उगम पहाणें. R. *n. the opportunity of remounting* पुनः वर चढण्याची संधि *f*. २ *a fresh horse for use when one is tired or disabled* (खोगीर घालून तयार) ताजातवाना स्वारीचा घोडा *m*; as, "To give one a R."

Remov'able *a.* हालवण्यासारखा, (दूर) नेतां येण्याजोगा, स्थान पालटण्याजोगा.

Remov'al *n.* ( *act.* ) हालवणें *n*, दूर नेणें *n*, काढणें *n*, उठवणें *n*, स्थानांतर *n*. करणें *n*, दूर करणें *n*, काढून टाकणें *n*. ( b ) ( *state* ) स्थानपालट *m*, स्थानांतर *n*, स्थलांतर *n*. ( c ) निरसन *n*, निरास *m*, दूरीकरण *n*, निष्कासन *n*.

Remove ( re-mōōv' ) [L. *re*, away, and *movere*, to move.] *v. t. to convey to another place* हालविणें, दूर नेणें, दुसऱ्या ठिकाणीं नेणें, दूर सारणें, जागा *f* -स्थान *n* -स्थळ *n*. बदलणें -पालटणें *g. of o.*, स्थानांतर *n* -स्थळांतर *n*. करणें -करविणें *g. of o.*, घेऊन जाणें, उठवणें, उचलणें, ( सामानसुमान ) नेणें. ( b ) ( टोपी ) काढणें. (c) (शाळेंतून) काढणें. २ *to take away evils, &c.* दूर करणें, घालविणें, नेणें, परिहार *m*. करणें, वारणें, हरण *n* -परिहार *m* -निरसन *n*. करणें *g. of o.* ३ *to put an end to, to kill* ठार मारणें, नाहींसा करणें; as, "Cardinal was *removed* by poison." ४ *to dismiss* काढून टाकणें, काढणें, घालविणें, दूर करणें. ५ ( *pass.* of a course at a dinner ). उचलून नेणें, काढणें. R. *v. i.* जागा *f* -स्थान *n*. पालटणें -बदलणें, स्थानांतर *n*. होणें *g. of s.*, ( -हून ) जाणें; as, "I am *removing* from London to Oxford." R. *n. a stage in gradation* पायरी *f*, अंतर *n*, पल्ला *m*, टप्पा *m*, मजल *f*. २ *a stage in consanguinity* चूल *f*, पिढी *f*. ३ *a dish that succeeds another at a table* नवीन पदार्थांची डिश *f*. ४ (*farriery*) खोलबंदी *f*.

Remov'ed *pa. t.* R. *pa. p.* हालविलेला, दूर नेलेला, उचललेला, उठविलेला, स्थानांतरित. २ मध्यें चुली असलेला, मध्यें पिढ्या असलेला.

Remov'er *n.* दूर नेणारा *m*, स्थलांतर करणारा *m*. For more meanings see the Verb.

Remov'ing *pr. p.* R. *v. n.* दूर नेणें *n*, उठवणें *n*. For more meanings, see the Verb.

Remunerate ( re-mū'nėr-āt ) [L. *re*, again, in return, and *munerare*, to give something.] *v. t. to pay for service rendered* ( केलेल्या चाकरीबद्दल ) मोबदला देणें, वेतन देणें, बक्षिस देणें, पगार देणें. २ *to compensate* भरपाई करणें.

Remunera'tion *n. reward* मोबदला *m*, पगार *m*, मुशारा *m*, देणगी *f*, देणावळ *f*, पारितोषिक *n*, वेतन *n*. २ *compensation* मोबदला *m*, भरपाई *f*.

Remu'nerative *a. yielding adequate reward* ( *for work* ) ( कामाचा योग्य ) मोबदला देणारा. २ *profitable* किफायतशीर, फायदेशीर.

Renaissance ( re-nās'-ans ) [Fr. *renaissance* -L. *re*, again, and *natus*, allied to Sk. जात, born.] *n. a new birth* नवा जन्म *m*, नवजन्म *m*, नवावतार *m*, अवतार *m*. २ *a revival* ( esp. the revival of learning and the fine arts in the fifteenth century) (पंधराव्या शतकांतील युरोपांतील विद्या व ललित कला यांचें) पुनरुज्जीवन *n*, पुनर्जीवन *n*. ( b ) पुनरुज्जीवनाचा काल *m*. ( c ) पुनरुज्जीवनपद्धति *f*.

Renal ( rē'nal ) [L. *renalis* –*renēs*, (*n. pl.*) reins.] *a. of the kidneys* मूत्रपिंडाचा, गुर्दाचा, मूत्रपिंडासंबंधीं, मूत्रपिंडविषयक, वृक्कासंबंधीं. [R. COLIC मूत्रपिंडशूल *m*, मूत्रपिंडांतून रेतीचे कण खालीं उतरतांना पोटांत कळ निघणें *n*. R. CALCULI मूत्रपिंडाश्मरी *f*, मूत्रपिंडगत अश्मरी. R. DISEASES मूत्रपिंडाचे रोग. R. VEIN वृक्कशिरा. SUPRA R. CAPSULE वृक्कोर्ध्वपेशी. ]

Renas'cence *n. re-birth* नवोद्भव *m*, नवजन्म *m*. २ Same as Renaissance.

Renascent ( re-nas'ent ) [L. *re*, again, and nascent.] *a. springing up afresh* नव्यानें उत्पन्न होणारा, नव्यानें उद्भवणारा, नवीन आरंभाचा.

Rend (rend) [A. S. *rendan*, to tear.] *v. t. to tear off* फाडणें, फाडून घेणें, फाडून काढणें, चिरणें, दोन तुकडे करणें, टरकावणें, टरकणें, विदारणें, विदारण करणें *g. of o.* [To R. IN TWO दुफाड *f*. करणें. To R. IN PIECES तुकडे-तुकडे करणें, फाडफाडून घेणें. ] २ *to split or divide in two* दुभागणें, दोन भाग करणें -होणें, द्विधा होणें, द्विधा -करणें, दुफळी करणें -होणें; as, "Europe was *rent* in two by the question; Heart is *rent* by contending emotions." R. *v. i.* फाटणें, (दोन) तुकडे होणें, दुफळी होणें.

Render ( ren'der ) [ Fr. *rendre* –L. *reddo* -*re*, away and *dare*, to give. Render lit. means 'to give back.'] *v. t. to give in return* परत करणें -देणें, उलट करणें -देणें; as, "To R. thanks." "To R. good for evil." २ (rare) स्वाधीन करणें, (ताब्यांत) देणें. ३ *to submit, to present* (जाब -हिशेब) देणें; as, "Will have to *render* an account of." ४ *to cause to be, to convert into* करणें, बनविणें, युक्त -विशिष्ट (in. comp.) करणें; as, "Age had *rendered* him peevish; The tone *rendered* it an insult." ५ *to translate* भाषांतर करणें *g. of o.*; as, "Poetry can never be adequately *rendered* in another language." ६ *to melt fat* ( चरबी असलेल्या पदार्थांतून) चरबी काढणें. Ren'dered *pa. t.* and *pa. p.*

Ren'dering *n. the act of rendering* परत देणें *n*, स्वाधीन करणें *n*. (b) परत दिलेली वस्तु *f*. २ *a translation* भाषांतर *n*. ३ *the presentation, expression or interpretation of an idea, theme or part* चित्रांत दाखविणें *n*, मांडणी *f*. ४ *lard* (वसामय पदार्थांतून काढलेली ) शुद्ध चरबी *f*.

Rendezvous ( ren'de-vōō ) [Fr. *rendez vous*, render yourselves (to a certain place).] *n. an appointed meeting-place* भेटण्याची जागा *f*, संकेतस्थान *n*, संकेतस्थल *n*, टिपण *n*, टेप *f*. २ *a meeting* जमाव *m*, जमणें *n*. R. *v. i. to meet at rendezvous* संकेतस्थळीं जमणें, मिळणें, जमाव करणें. Ren'dezvous ( rende-vooz ) *pl*.

Renegade ( ren'e-gād ) [Span. *renegado* –L. *re*, again and *negare*, to deny. Renegade lit. means 'one who has denied or forsaken his faith'.] *n*.

*an apostate* स्वधर्मत्यागी *m*, स्वपक्षत्यागी *m*, स्वमतत्यागी *m*. २ (*fig.*) कुऱ्हाडीचा दांडा *m*, स्वपक्षांतून फुटणारा *m*. R. *v. i. to turn renegade* स्वधर्मत्याग *m* -स्वपक्षत्याग *m*. करणें, स्वपक्षांतून फुटणें.

Renew (re-nū') [L. *re*, again and New.] *v. t. to restore to original condition* नवा करणें, ताजा -नव्यासारखा करणें, उजरणी *f*. करणें, उजरणें; as, "*Renewed* by baptism." २ *to begin anew* चालू -सुरू करणें, फिरून -पुनः -नव्यानें करणें, पुनः सुरवात *f* -आरंभ करणें; as, "To R. attack; To R. correspondence." ३ (करार, भाडेचिठ्ठी वगैरे) नवीन करून देणें. ४ *to patch up* ठिगळें मारणें; as, "Coat *renewed* in places." ५ नवीन भरणें -घालणें; as, "R. the water in the bowl." ६ नवीन घालणें, नवीन चढविणें, नवीन भरती करणें; as, "To R. garrison; To R. tires." R. *v. i. to become new again* पुनः नवा होणें, नवा बनणें, नव्यानें सुरवात होणें; as, "The clamour *renewed*."

Renew'able *a*. नवा करावयाजोगा. २ पुनः आरंभ -सुरवात करण्यासारखा, पुन्हां चालू -सुरू करण्यासारखा.

Renew'al *n*. नवा करणें *n*, नवीकरण *n*, उजरणी *f*. २ पुनरारंभ *m*, पुनः सुरवात *f*.

Renew'ed *pa. t.* R. *pa. p.* नवा केलेला, नव्यानें केलेला, नवीकृत. २ पुनः आरंभ केलेला, पुनरारब्ध, पुन्हां चालू केलेला, पुन्हां सुरू केलेला.

Renew'ing *pr. p.* R. *v. n.* नव्यानें करणें *n*, पुन्हां चालू करणें *n*.

Reniform (ren'i-form) [L. *renes*, the kidneys, *forma*, form.] *a.* (*bot.*) *kidney-shaped* मूत्रपिंडाकार, गुर्दाकार; as, "R. leaf." उ० ब्रह्मीचें पान.

Rennet (ren'et) [A. S. *rennan*, to cause to run; and *cog.* with Ger. *rensal.*] *n. prepared inner membrane of a calf's stomach, used to make milk run together or coagulate* (ऊन पाण्याच्या योगानें काढलेलें) वासराच्या जठरांतील पाचक अम्ल.

Renounce (re-nowns') [L. *renuntiare*, to bring back a report, also to disclaim -*re*, away, and *nuntiare*, to tell, to bring news. -*nuntius*, a messenger.] *v. t. to give up* सोडणें, टाकणें, नांव *n*. टाकणें -सोडणें *g. of o.*, तिलांजलि *f*. देणें (*fig.*), त्याग *m*. करणें *g. of o.*, शपथ *f*. वाहणें -घेणें -वाहून घेणें *g. of o.* (b) *specif.* (जगाचा) त्याग *m*. करणें. २ *to decline association or to disclaim relationship with* न मानणें, न जुमानणें, न पाळणें, अंगाबाहेर -अंगानिराळा टाकणें, अनंगीकार *m* -अस्वीकार *m*. करणें, नाकारणें; as, "To R. a treaty or a person's authority." ३ (*law*) *to refuse or resign right or position* (*esp. as heir or trustee*) हक्क *m* -संबंध *m*. तोडणें -तोडून टाकणें -सोडणें -सोडून देणें, अधिकार *m*. सोडून देणें.

Renoun'ced *pa. t.* R. *pa. p.* सोडलेला, टाकलेला, त्यक्त. २ अंगाबाहेर टाकलेला, अनंगीकृत.

Renoun'cement *n.* त्याग *m.* २ अनंगीकार *m*, अस्वीकार *m.*
Renovate (ren'o-vāt) [L. *re*, again and *novare*, to make new -*novus*, Sk. नव, new.] *v. t. to make new again* पुनः नवा करणें, पुन्हां ताजातवाना करणें, नवीन शक्ति आणणें, पूर्ववत् करणें.
Renova'tion *n.* नवीन उत्साह आणणें *n*, नवीकरण *n*, सुधारणा *f.*
Ren'ovator *n.* नवीन शक्ति आणणारा *m*, नवा उत्साह आणणारा. २ नवा करणारा *m.*
Renown (re-nown') [Fr. *renom* -L. *re*, again and *nomen*, Sk. नाम, a name.] *n. fame* कीर्ति *f*, नांव *n*, आख्या *f*, प्रख्याति *f*, विख्याति *f.*
Renown'ed *a. famous* प्रख्यात, विख्यात, नामांकित, नांवाचा, कीर्तिमान्, जगजाहीर, जगप्रसिद्ध.
Rent *pa. p.* (of Rend.) फाडलेला, चिरलेला, विदीर्ण, विदारित. R. *n. tear in garment* चीर *f*, धस *m*, वाभाडा *m.* २ *cleft, fissure* चीर *f*, भेग *f.*
Rent (rent) [Fr. *rente* -L. *reddere*, to pay.] *n.* भाडें *n*, किराया *m*, loosely भाडेंतोडें *n.* (b) (of land) धारा *m*, सारा (?) *m*, वसूल *m.* [Nominal R. नांवाचें भाडें *n.* R. paid in kind बटाई *f.* Fair R. वाजवी भाडें *m.*] R. *v. t. to let or hire for rent* (*houses*) भाड्यास -भाड्यानें लावणें -देणें, भाडें घेऊन देणें. (b) खंडानें देणें -लावणें. २ *to use or occupy at a rent* (*house*) भाड्यानें घेणें -ठेवणें, भाडें देऊन घेणें. (b) (lands) खंडानें -मक्त्यानें घेणें. ३ भाडें घेणें, भाडें आकारणें; as, "*Rents* his tenants low."
Rent'al *n. income from rents* भाड्याचें उत्पन्न *n*, खंडाचें उत्पन्न *n*, भाडें *n*, खंड *m*, वसूल *m*, धारा *m*, जमाबंदी *f.* [Gross R. कची जमाबंदी *f.* Net R. पक्की जमाबंदी *f.*]
Rented *pa. t.* R. *pa. p.* भाड्यानें दिलेला. २ धाऱ्यानें लावलेला. ३ भाड्यानें घेतलेला.
Rent'er *n.* भाड्यानें घेणारा *m*, भाडेकरी, भाडोत्री *m.* (of lands) खंडानें घेणारा, खंडकरी, मक्तेदार.
Renuncia'tion (re-nun-si-ā'shun) [See Renounce.] *n.* सोडणें *n*, सोडून देणें, अंगाबाहेर टाकणें *n*, नाकारणें *n*, नाकार *m*, अस्वीकार *m*, अनंगीकार *m.* २ टाकणें *n*, सोडणें *n*, वासनांचा समूळ नाश किंवा क्षय *m*, त्याग *m*, परित्याग *m.* [R. of the world सर्वसंगपरित्याग *m.*]
Re-paid (re-pād') *pa. t.* and *pa. p.* of Repay फेडलेला, परत दिलेला, परत केलेला.
Repair (re-pār') [Fr. *repaire*, a haunt -L. *repatriare*, to return to one's country -*re*, back and *patria*, native country.] *v. i. to resort* जाणें, येणें, येणेंजाणें, खेप *f.* घालणें, येणेंजाणें *n* -येरझार *f.* करणें. (b) पुष्कळांनीं मिळून जाणें.
Repair (re-pār') [O. F. *reparer* -L. *reparare* -*re*, again and *parare*, to prepare.] *v. t. to restore to good condition, to mend* दुरुस्त करणें, नीट करणें, रिपेरी करणें, (इमारतीची) डस्तवारी *f* -मरामत *f.* करणें

g. of o., जीर्णोद्धार m. करणें g. of o.; ( colloq. ) ठोकूनठाकून नीट करणें, ठीकठाक करणें, डागडूग f -डागडुजी or डागडोजी f -ठाकठिकी f -सांदासांद f -मोडतोड f -जोडाजोड f -लाखलिंप f. करणें g. of o., (जोडे) तांगडणें, (कपड्याला) ठिगळें मारणें. (b) थकवा नाहींसा करणें -घालविणें. (c) प्रकृति सुधारणें. २ to remedy ( error ) दुरुस्त करणें, सुधारणें, सावरणें, सावर m -सुधारणूक f. करणें g. of o. ३ to make amends for भरणें, भरून देणें, भरपाई करणें. R. n. restoring to good condition दुरुस्ती f. करणें n, सुधारणें n, नीट करणें n, सुधारणी f, सुधारणूक f, उस्तवारी f, मरामत f, जीर्णोद्धार m, ( colloq. ) डागडुजी f, डागडोजी f, डागडूग f, सांदासांद f, मोडतोड f, तोडमोड f, मोडजोड f, जोडाजोड f, लाखलिंप f, तांगडातांगड f; as, "Shop is closed during repairs". [To KEEP IN R. दुरुस्त ठेवणें, डागडुजी f -ऊर्जा f -ओज f -मरामत f उस्तवारी f. राखणें. To LOOK AFTER THE R.s OF मोडतोड f. पाहणें.] २ good condition for using दुरुस्त स्थिति; as, "The house is in R."

Rep'airable a. दुरुस्त करण्यासारखा, सुधारायाजोगता, नीट करायाजोगा -सारखा.

Repaired' pa. t. R. pa. p. दुरुस्त केलेला, नीट केलेला, तांगडलेला, ठाकठीक, डागडुजी केलेला.

Repair'er n. नीट-दुरुस्त करणारा. [WATCH -R. घड्याळजी.]

Repa'rable a. ( of loss ) that can be made good भरपाई करून देण्यासारखा, भरून देण्यासारखा.

Repara'tion n. repairing दुरुस्त -नीट करणें n, दुरुस्ती f, रिपेरी f; as, "The R. of a bridge or highway."

N. B.—In this sense repair is often used. २ making amends भरपाई करणें n, भरून देणें n. ३ amends, satisfaction मोबदला m, भरपाई f. (b) भरपाईची रक्कम f.

Repartee ( rep-ar-tē' ) [L. re, and partior, to divide, to share.] n. a witty retort खुबीदार उत्तर n, मार्मिक उत्तर n, नोकीचें -नोकझोकीचें उत्तर n, हाजिरजबाब m, रसिकोत्तर n; as, "A great power of R."

Repasses n. pl. ( Mesmerism ) उलट झाडण्या f. pl., प्रतिमार्जन n.

Repast ( re-past' ) [L. re, intensive, and pastus, food, feeding -pascere, pastus, to feed.] n. meal जेवण n, जेवणाचे पदार्थ m. pl.; as, "Rich, plentiful, luxurious R." [SLIGHT R. फराळ m, उपाहार m, अल्पाहार m.]

Repatriate (re-pa'-tri-āt) [L. re, again and patria, one's native country.] v. t. to restore ( as an exile ) to native land स्वदेशीं परत नेणें, स्वदेशीं आणणें, स्वदेशीं पोंचविणें -परत पाठवणें. R. v. i. to return to native land स्वदेशीं परत जाणें, स्वदेशीं येणें.

Repatria'tion n. restoration to one's country स्वदेशीं पोंचविणें n, स्वदेशास परत पाठविणें n. २ स्वदेशीं परत जाणें n.

Re-pay ( re-pā' ) [L. *re*, back and Pay.] *v. t. to pay back* परत देणें, परत करणें, देणें, फेडणें. २ *to requite* ( *action* ) परत -उलट -फेर देणें, फेडणें, फेड *f.* करणें *g. of o.*, प्रतिफल देणें, प्रतिदान *n.* करणें. ३ मोबदला *m.* देणें, भरपाई करणें. ४ *to pay anew or a second time as a debt* दुबार देणें, दुबार फेडणें.

Repay'able *a.* परत देण्याचा.

Re-pay'ment *n.* परत करणें *n*, परत देणें *n.* (b) परत दिलेला पैसा *m*, परत केलेली वस्तु *f.* २ परत देणें *n*, फेड *f*, प्रतिफल *n*, प्रतिदान *n.* ३ मोबदला *m*, भरपाई *f.* ४ दुबार फेड *f.*

Repeal ( re-pēl' ) [Fr. *repeal* –L. *re*, again and *appellare*, to call upon.] *v. t. to annul* ( कायदा वगैरे ) रद्द करणें, रद्दबातल करणें, मोडणें. R. *n.* रद्द करणें *n*, मोडणें *n*; as, "The R. of a law or usage."

Repeat ( re-pēt' ) [Fr. *repeat* –L. *re*, again and *petere*, to seek.] *v. t. to do or say over again* पुनः करणें, फिरून -पुन्हां -दुसऱ्यानें करणें, परतून करणें, दुसारणें, दुसारणी *f* -दुसरी आवृत्ति *f* -पुनरावृत्ति *f.* करणें *g. of o.* (b) फिरून -पुनः -दुसऱ्यानें बोलणें, आठवून -परतून बोलणें -म्हणणें -उच्चारणें. (c) (तेंच मिश्रण) पुन्हां करणें. [To R. A SECOND TIME तिसारणें, तिसारणी *f.* करणें *g. of o.*] २ *to recite* म्हणणें, म्हणणी *f.* करणें, पठन *n.* करणें. [ To R. FROM MEMORY पाठ म्हणणें. To R. FREQUENTLY SO AS TO FIX IN THE MIND घोकणें, घोकणी *f.* करणें. ] R. *v. i. to recur* पुनः येणें, पुनरावृत्ति होणें; as, "The last three figures R." [HISTORY REPEATS ITSELF इतिहासाची पुनरावृत्ति होते. ] R. *n.* (गीत वगैरे) पुन्हां म्हणणें *n.* २ (*mus.*) *passage intended to be repeated* पुनः म्हणण्याचें गीत *n.* (b) *mark indicating this* पुनरावृत्ति दर्शविणारी खूण *f.* ३ (*commercial*) *fresh consignment similar to previous one* ( पसंत पडलेल्या जिनसाबद्दल ) पुनः पुनः मागणी *f.*

Repeat'ed *pa. t.* R. *pa. p.* पुनः म्हटलेला -केलेला, पुनःपुनः केलेला, पुनरावर्तित, पुनरावृत्त. २ पाठ म्हटलेला.

Repeat'edly *adv. over and over again* पुनःपुनः, वारंवार, फिरफिरून, फिरूनफिरून, वेळोवेळ, घडींघडीं, घडोघडीं, उठतांबसतां.

Repeat'er *n.* फिरून -पुनः -दुसऱ्यानें करणारा -म्हणणारा -बोलणारा. २ *a watch which strikes again the hour that is past when a spring is touched* जबाबी घड्याळ *n*, (कमान दाबल्यावर) किती वाजले हें ठोके वाजवून सांगणारें घड्याळ *n.* ३ ( telegraph ) *an instrument for automatically repeating signals from one circuit to another.* न दिसणारा (वॉर्नर) सिगनल खालीं पडला आहे किंवा नाहीं हें केबिनमध्येंच आपोआप दाखविणारा विजेनें चालणारा धाकटा सिगनल, सिगनल रिपीटर. ४ *a fire-arm that may be discharged several times in succession without re-loading* अनेकबारी बंदूक.

Repeat'ing *pr. p. a.* [R. INSTRUMENT (*astron.*) असकृत् कोनमापक *m.*]

Repel (re-pel') [L. *repello -re*, off, back, and *pellere*, to drive.] *v. t. to drive back, to repulse* परतविणें, परत पिटाळणें, मागें -माघारां घालणें -सारणें -लोटणें -रेटणें, पळविणें, फिरविणें, हटविणें, वारणें, माघारविणें, वारण *n.* निवारण *n.* करणें. २ (*phys.*) प्रतिसारण *n.* करणें.

Repelled' *pa. t.* R. *pa. p.* परतवलेला, मागें घातलेला -सारलेला -लोटलेला, हटविलेला, निवारित, प्रतिहत. २ (*phys.*) प्रतिसारित.

Repel'lent *a.* परतवणारा, मागें घालणारा -लोटणारा, मागें सारणारा, निवारक. २ (*phys.*) प्रतिसारक.

Repel'ler *n. one who or that which repels* परत फिरविणारा, मागें हटविणारा *m*, निवारक, प्रतिसारक *m.*

Repel'ling *pr. p.* R. *v. n.* परतविणें *n*, मागें घालणें *n*, मागें सारणें *n*, हटवणें *n*, वारण *n*, निवारण *n*, प्रतिसारण *n.*

Repent (re-pent') [Fr. *repentir* –L. *re*, again and *pœnitere*, to cause to repent.] *v. i. to think with contrition of* पश्चात्ताप *m.* पावणें, पश्चात्ताप होणें, पस्तावणें, पस्तावा *m* -अनुताप *m.* पावणें, पस्तावीं -पश्चात्तापांत -अनुतापांत पडणें, पस्तावा *m.* होणें in. con., पश्चात्ताप *m.* करणें, तोबांतोबा or शिवशिव करणें (*colloq.*), कानाला खडा *m.* लावणें -लावून घेणें, कान *m.* पिळून घेणें (*colloq.*). R. *v. t.* पश्चात्ताप *m.* करणें, खेद *m.* करणें, पश्चात्ताप *m* -खेद *m.* होणें *with* विषयीं *of o.*

Repent'ance *n.* पश्चात्ताप *m*, *pop.* पस्तावा *m*, पस्तावणी *f*, अनुताप *m*, मनस्ताप *m*, पश्चात्तापबुद्धि *f.*

Repent'ant *a.* पश्चात्ताप झालेला, पश्चात्ताप पावणारा, पश्चात्ताप पावलेला, पश्चात्तापी, अनुतप्त, पश्चात्तापयुक्त.

Repent'antly *adv.* पश्चात्तापानें, पश्चात्तापपूर्वक.

Repent'ed *pa. t.* and *pa. p.* Repent'er *n.* Repent'ing *pr. p.*

Repercussion (rē-pėr-kush'un) [L. *repercussio -re*, back and *percutio -per*, through and *cutere*, to strike.] *n. driving back* (संघर्षानें) परत लोटणें *n*, उलटवणें *n*, प्रतिसारण *n.* २ (बोटानें गर्भाशयांतील वर उचललेला गर्भ) खालीं येऊन पडणें *n*, प्रतिसंघर्ष *m.* ३ *reverberation* प्रतिसंघर्षध्वनि *m*, खालीं पडल्याचा आवाज *m*; as, "Ever echoing back in endless R."

Repertory (rep'ėr-tor-i) [Fr. *repertory* –L. *repertorium -reperio*, to find -*re*, again and *pario*, I bring forth.] *n. a treasury, a storehouse* खजिना *m*, भांडार *n.* (*lit.* and *fig.*)

Repeti'tion *n. act of repeating* पुनःपुनः करणें *n*, पुनःपुनः बोलणें *n*, फिरून करणें *n*, दुसऱ्यानें करणें *n*, फिरून बोलणें *n*, दुसऱ्यानें बोलणें *n*, (b) पुनरावृत्ति *f*, दुसारणी *f*, दुसरी आवृत्ति *f*, द्विरावृत्ति *f*, पुनरावर्तन *n*, आवर्तन *n*, पौनःपुन्य *n*, पुनरुक्ति *f*, द्विरुक्ति *f*, पुनःकथन *n.* २ *saying from memory* पाठ म्हणणें *n*,

तोंडपाठ म्हणणें *n*, म्हणणी *f*, पठन *n*. ३ तोंडपाठ करण्याचा धडा *m*. ४ (चित्राची) नक्कल *f*, पुनरावृत्ति *f*.

**Repine** (re-pīn') [L. *re*, again and Pine.] *v. i. to feel discontent at* झुरणें, झुरत जाणें, क्षय लागणें, चुरमुरणें, मनांत कुडणें -कुढणें -झुरणें, धुसमुसणें, खंत *f*. धरणें -घेणें.

**Repin'ing** *n*. झुरणें *n*, झुरणी *f*, चुरमुरणें *n*, चुरमूर *f*, खंत *f*. **Repin'ing** *a*. झुरणारा, खंत घेणारा, चुरमुरणारा.

**Replace** (re-plās') [L. *re*, back, again and Place.] *v. t. to put back in place* पूर्वींच्या जागीं ठेवणें, पूर्वींच्या -स्थळीं -स्थानावर ठेवणें, फिरून ठेवणें, पुनःस्थापन *n* -पुनःस्थापना *f*. करणें *g. of o*. २ (-च्या) जागीं नेमणें, (च्या) जागेवर नेमणें, (-च्या) जागीं योजणें. ३ *to provide substitute for* डागास डाग देणें, नगास नग -वस्तूस वस्तु देऊन भरून देणें, बदला देणें. (b) (-ची) जागा भरून काढणें, (-च्या) जागीं दुसरा नेमणें.

**Replace'able** *a*. पूर्वींच्या जागीं ठेवतां येण्यासारखा. २ पूर्वींची जागा भरून काढण्यासारखा, (-च्या) जागीं नेमण्यासारखा, (-च्या) बदली चालण्यासारखा.

**Replace'ment** *n*. पूर्वींच्या जागीं ठेवणें *n*. २ (-च्या) जागेवर दुसरा नेमणें *n*, (-ची) जागा दुसऱ्यानें भरून काढणें *n*.

**Replenish** (re-plen'-ish) [Fr. *replenish* -L. *re*, again and *plēnus*, Sk. पूर्ण, full.] *v. t. to fill up again* फिरून भरणें, पुनः भरणें, फिरून भरून काढणें.

**Replen'ished** *pa. t.* R. *pa. p.* पुनः भरलेला.

**Replen'ishment** *n*. पुन्हां भरणें *n*, भरून काढणें *n*. २ *supply* भर *f*, पुरवठा *m*.

**Replete** (re-plēt') [L. *repletus*, pa. p. of *repleo* -*re*, again and *pleo*, I fill.] *a. completely filled* भरलेला, पूर्ण, परिपूर्ण, पर्याप्त.

**Reple'tion** *n*. भरलेलेपणा *m*, पूर्णता *f*, परिपूर्णता *f*, पर्याप्ति *f*. २ *fullness of blood* रक्तबाहुल्य *n*, रक्तवृद्धि *f*.

**Replica** (rep'li-ka) [It. *replica* -L. *replico*. See Reply.] *n. an exact copy of a picture made by the original artist* मूळ चित्रकारानेंच केलेली (चित्राची) दुसरी प्रत, चित्रकाराच्या हातची दुसरी प्रत *f*.

**Replicate** (rep'li-kāt) [L. *re*, and *plicare*, to fold.] *a*. (*bot.*) *folded back on itself* परावलित (पर्ण).

**Replica'tion** *n. a reply to answer* उत्तरास प्रत्युत्तर *n*. २ (*law*) *plaintiff's reply to defendant's plea* (प्रतिवादीचे म्हणण्यास) वादीचा जबाब *m*. ३ *echo* प्रतिध्वनि *m*. ४ *copy, copying* नकल *f*, नकल काढणें.

**Reply** (re-plī') [Fr. *repliquer* -L. *replico, replicatus* -*re*, back and *plicare*, to fold.] *v. t. to answer* उत्तर *n*. देणें, जबाब *m*. देणें, उत्तर करणें, बोलणें, म्हणणें. [To R. FLATLY, SMACK, ETC. ताडकन् -तडकफडक उत्तर देणें, (*colloq.*) फडका *m*. फाडणें -फाडून देणें, रोख जबाब देणें. ] २ (*law*) (उत्तराला) प्रत्युत्तर *n*. देणें, प्रतिजाब देणें. R. *n. answer* उत्तर *n*, प्रत्युत्तर

*n*, जबाब *m*, जाब *m*. [READY AT R. हजरजबाबी, जाबसाली.] २ (*in disputations*) प्रत्युत्तर *n*, कोटि *f*.

Report (re-pōrt') [L. *reporto* -*re*, back, and *portare*, to carry.] *v. t. to give an account of* हकीकत *f*. कळविणें, हकीकत *f*. लिहिणें -पाठवणें, रपोट *m*. करणें, हकीकत प्रसिद्ध करणें, बातमी सांगणें. २ दुसऱ्याच्या शब्दांत सांगणें. [IT IS REPORTED लोक म्हणतात, लोकवार्ता आहे.] ३ *to announce oneself as returned or arrived* (हजर झाल्याचा) रपोट करणें, कळवणें. ४ *to inform against to* कळवणें, विरुद्ध लिहिणें, रपोट करणें; as, "Shall R. you (your unpunctuality) to senior partner." ५ (वर्तमानपत्राला) बातमी लिहून पाठविणें, (हकीकत) लिहून कळविणें. ६ अभिप्राय (लिहून) कळविणें, अभिप्राय प्रसिद्ध करणें. Report' *v. i. to make a report* (मागितलेली) माहिती देणें. २ (सभेची, हजर झाल्याची, किंवा इतर) बातमी देणें, रपोट करणें. R. *n. common talk, rumour* बातमी *f*, आवई *f*, गप *f*, गप्प *f*, भुमका *f*, अफवा *f*, बोलवा *f*, सांगासांगी *f*, सांगोसांगी *f*, वदंता *f*, वार्ता *f*, गाजावाजा *m*, जनवार्ता *f*, चर्चा *f*, ध्वनि *m*, कुणकूण *f*. [FALSE R. कंडी *f*, कंडाळी *f*, नीळरांप *f*, *m*. FLYING R. हूल *f*. IDLE R.s कोरड्या गप्पा *f. pl.*, झोंकली बातमी *f*, बाजारबातमी *f*, बाजारअफवा *f*, बाजारआवई *f*. TO SPREAD IDLE R.S गप्पा झोंकणें, वाता उडवणें -फेंकणें -हांकणें, कंड्या पिकवणें. TO SPREAD A R. बातमी *f*. पसरणें or फुंकणें. THE R. GOES असें म्हणतात, बोलवा अशी आहे.] २ *opinion* अभिप्राय *m*, जाहीर अभिप्राय *m*, रिपोर्ट *m*. ३ *repute* लोकमत *m*, लोकांचा अभिप्राय *m*, नांव *n*, नांवलौकिक *m*, कीर्ति *f*, लौकिक *m*, अब्रू *f*. [GOOD R. कीर्ति *f*, सत्कीर्ति *f*, भलाई *f*. ILL R. दुष्कीर्ति *f*.] ४ *description or epitome of a law-case* खटल्याची हकीकत *f*, निवाडा *m*. [LAW R.s निवाड्यांचा छापील संग्रह *m*.] ४ *account given* हकीकत *f*, अहवाल *m*, रपोट *m* (corruption of the English word). ५ *sound of explosion* बार *m*, आवाज *m*, शब्द *m*. [LOUD R. धडाका *m*.] Report'ed *pa. t.* and *pa. p.* Report'er *n*. बातमी *f*. सांगणारा. २ *one who takes notes of events for publication* (वर्तमानपत्राचा) बातमीदार *m*. [LAW REPORTER खटल्यांची हकीकत टिपून घेणारा सरकारी कामगार, लारिपोर्टर. २ खटल्यांच्या हकीकतीचें मासिक *n*.]

Reporter, See under Report.

Repose (re-pōz') [Fr. *reposer* -*re*, back and *poser*, to place.] *v. t. to place trust in* भरंवसा *m* -विश्वास *m*. टाकणें -ठेवणें with वर *of o.*, टेंकणें, ओठंगणें, पातणें.

Repose (re-pōz') [Fr. *reposer* –Low L. *re*, and *pausare*, to pause.] *v. i. to rest, to lie* निजणें, आंग टाकणें, लवंडणें, आराम करणें -घेणें, शयन *n* -शय्या *f*. करणें. R. *v. t. to refresh with rest* विश्रांति *f*. देणें -घेणें, आराम देणें, विसांवा देणें. (b) (often reflexive) आराम करणें. R. *n. rest* आराम *m*, विश्राम *m*, विश्रांति *f*, विराम *m*. २ (*phys.*) विश्राम

m. [ ANGLE OF R. विश्रामकोन m. ] ३ शांत मुद्रा f, शांत वृत्ति f, प्रसन्नता f.

Reposit ( re-poz'it ) [L. re, and ponere, to place.] v. t. to lodge as for safety ( रक्षणास -रक्षणार्थ -संरक्षणार्थ ) ठेवणें, जतनेस ठेवणें, जतनेस घालणें.

Repos'ited pa. t. R. pa. p. रक्षणास -जतनेस ठेवलेला.

Repositor ( rē-poz'i-tėr ) [L. repositus, pa. p. of reponere, to put back.] n. ( surg. ) अंतरवयवाची जागा सुटली असतां तो परत जाग्यावर बसविण्याच्या उपयोगाचें शस्त्र, पुनस्स्थापनयंत्र.

Repos'itory n. a store-house सांठा m, संग्रह m, कोठार n, वखार f, दुकान n, संग्रहालय n, सांठवण n, निधि m, निधान n. ( esp. in comp. as, गुणनिधान ). २ burial-place स्मशान n, मसणवटी f. ३ recipient of confidences or secrets अंतरंगांतला मनुष्य m, विश्वासांतला मनुष्य m.

Repousse ( re-pōōsā' ) [Fr. repousser, to push or drive back.] n. ornamental metal-work hammered into relief from the reverse side आंतून ठोकून केलेली उठावाची नकशी f.

Reprehend ( rep-re-hend') [L. reprehendo -re, intensive and prehendere, to lay hold of.] v. t. to find fault with दोष m. देणें, ठपका m. ठेवणें, खोडी f. काढणें, न्यून n. दाखवणें, नांवें n. pl. ठेवणें.

Reprehen'sible a. दोष देण्यासारखा, दूषणीय, निंद्य, गर्ह्य, दोषार्ह.

Reprehen'sion n. ठपका m, दोष m, आरोप m, निंदा f, दूषण n.

Represent (rep-re-zent') [L. repræsento -re, again, and præsentare, to place before.] v. t. to display to the eye ( डोळ्यांपुढें ) मांडणें, दाखविणें, दर्शविणें, ( -चें ) चित्र उभें करणें, प्रत्यक्ष दाखविणें; as, "Can you R. infinity to yourself?" २ to describe ( वर्णनानें ) पुढें मांडणें, वर्णन n. करणें; as, "Can only R. it to you by metaphors." ३ to state by way of expostulation दाखविणें, ( कानउघाडणी करून ) पुढें मांडणें, नजरेस आणून देणें, पटवून देणें, स्पष्ट करून सांगणें; as, "Represented the rashness of it, that it could not succeed." ४ अर्ज करणें, अर्जद्वारा तक्रार मांडणें. ५ म्हणणें, भासविणें, वर्णन करणें, दाखविणें; as, "I am not what you R. me to be." ६ to play part on the stage सोंग n. घेणें, वेष m. घेणें, भूमिका करणें g. of o. ७ to symbolize, to stand for दाखविणें, (-ची) संज्ञा असणें, जागीं -वारचा -वकील असणें, ( विशेषत: पार्लमेंटच्या मदतदार संघांचा ) प्रतिनिधि असणें, (-चा) दर्शक -वाचक असणें; as, "Sovereign represents the majesty of the State." ८ नकाशा काढणें, नमुना काढणें.

Represent'able a. प्रत्यक्ष दाखविण्यासारखा, ( चें ) चित्र उभें करण्यासारखा, पटवून देण्यासारखा.

Representa'tion n. ( act. ) प्रत्यक्ष दाखविणें n, पुढें मांडणें n. २ वर्णणें n, वर्णन n. ३ a protest अर्ज करणें n,

निवेदन *n*, अर्ज *m*, विनंति *f*, विज्ञापना *f*, विज्ञप्ति *f*, अर्जद्वारा तक्रार *m*. ४ (a) खेळ *m*, प्रयोग *m*. (b) सोंग *n*, संपादणी *f*, बतावणी *f*. ५ वकिली *f*, प्रतिनिधित्व *n*. (b) प्रतिनिधित्वाचे हक्क *m. pl.*; as, "No taxation without R." ६ *image or likeness* चित्र *n*, प्रतिमा *f*, प्रतिरूप *n*, प्रतिकृति *f*. (b) नमुना *m*, नकाशा *m*.

Re-presenta'tion *n.* *a new presentation* ( निराळ्या स्वरूपांत ) पुन्हां मांडणें, पुन्हां सांगणें; as, "R. of facts previously stated."

Representa'tive *n.* ( *pol. eco.* ) प्रतिनिधि *m*. २ (law) वारस *m*. [ R. IN INTEREST हक्कसंबंध असलेला वारस. ] ३ (पार्लमेंटांतील) प्रतिनिधि *m*, लोकांतर्फेचा प्रतिनिधि *m*. [HOUSE OF R.s संयुक्त संस्थानांतील प्रतिनिधिसभा *f*.] ४ *an agent, deputy or substitute* मुखत्यार, प्रतिनिधि, मुनीम, बदली. ५ (*Nat. History*) दर्शक *m*, प्रतिनिधि *m*. R. *a.* *serving as portrayal or symbol of* द्योतक, निदर्शक, प्रतिनिधिरूप; as, "A group R. of the theological virtues". २ *that presents or can present ideas to the mind* मनापुढें मांडणारा, (-चें) चित्र उभें करणारा, निदर्शक, दर्शक; as, "Imagination is a R. faculty". ३ *typical of a class or classes* पुष्कळ गोष्टींना लागू पडणारा, प्रतिनिधिस्वरूपाचा, प्रतिनिधिरूप; as, "The truth of an allegory is R. not literal." ४ *containing typical specimens of all or many cases* सर्वजातिसंग्राहक, प्रतिनिधिरूप, (सर्व जातींचे) प्रतिनिधि असलेला. ( b ) (सर्व जातींचे) नमुने असलेला; as, "Call a meeting of R. men; A very R. selection." ५ ( of species ) तोडीचा, सारखा, सदृश. ६ *consisting of elected deputies or representatives* प्रतिनिधींचा, प्रातिनिधिक, प्रतिनिधि असलेला; as, "R. chamber; R. house." ७ *based on representation of constituencies by ( such ) deputies* प्रतिनिधिसत्ताक, प्रातिनिधिक, प्रतिनिधित्वाच्या तत्त्वावर उभारलेला; as, "R. government; R. institutions." Representa'tively *adv.* प्रतिनिधि म्हणून, प्रतिनिधीच्या नात्यानें, (सर्व जातींचे) प्रतिनिधि घेऊन.

Representa'tiveness *n.* प्रतिनिधिपणा *m*, प्रतिनिधित्व *n*.

Repress (re-pres' ) [L. *re*, back and Press. ] *v. t.* *to put down* दाबणें, दडपणें, दडपून टाकणें, दबविणें, दडपादडपी *f* -दाबादाबी *f* -दडपशाही करणें *g. of o.* २ *to reduce to subjection* ( दडपशाहीनें ) मऊ करणें, रगडणें, वठणीस आणणें, हाडें नरम करणें, दाबणें, आवरणें. ३ (-चा) निग्रह करणें.

Repres'sed *pa. t.* R. *pa. p.* दाबलेला, दडपलेला. २ मऊ केलेला, वठणीस आणलेला. ३ निगृहीत.

Repress'er *n.* दडपादडपी -दडपशाही *f.* करणारा *m*.

Repress'ion *n.* दाबणें *n*, दडपणें *n*, दडपादडपी करणें *n*. (b) दडपशाही *f*. [SENSE OR FEELING OF R. दाब *m*, दडपण *n*, दबाव *m*. ]

Repress'ive *a.* दडपादडपीचा, दडपशाहीचा.

Repressive policy दडपशाहीचें धोरण *n.*
Repressive measures दडपशाहीचे उपाय *m. pl.*
Reprieve (re-prēv') [Lit. 'to disapprove or disallow (the sentence passed).' O. F. *reprover*, to reprove.] *v. t. to suspend or delay the execution of a criminal* फांशीची तहकुबी *f.* करणें, देहांतशिक्षेची तहकुबी *f* -महकुबी *f.* करणें, देहांतशिक्षा लांबणीवर टाकणें. २ (*fig.*) *to give respite to* विश्रांति *f* -स्वस्थता *f* -विसांवा *m*, शांति *f* -शांतता *f*, देणें. R. *n.* फांशीची तहकुबी *f*, देहांतशिक्षेची -पारिपत्याची तहकुबी *f* -महकुबी *f.* (b) शिक्षाविलंबन *n.* २ फांशीची माफी *f*, फांशीची शिक्षा कमी करून दुसरी शिक्षा देणें *n.* ३ *respite* विश्रांति *f*, स्वस्थता *f*, स्वस्थपणा *m.*

Reprimand (rep'ri-mand) [Fr. *reprimande* –L. *reprimendum* -*re*, back and *primere*, to press.] *v. t. to reprove strongly* रागें भरणें, शब्दानें ताडणें, शब्दाचा मार *m.* देणें, तोंडची शिक्षा *f* -शब्दमार *m* -शब्दताडन *n* -वाग्दंड *m.* करणें, धमकी देणें. २ (अधिकाऱ्यानें) ताकीद देणें. R. *n. reproof* रागें भरणें *n*, शब्दाचा मार *m*, तोंडची शिक्षा *f*, वाग्दंड *m*, शब्दताडन *n.* २ ताकीद *f.*

Re-print (re-print') *v. t.* पुनः छापून काढणें.

Reprisal (re-prīz'al) [L. *re*, again and *prehendere*, to seize.] *n. act of retaliation* सूड घेणें *n*, प्रत्यपकार *m.* करणें *n*, प्रतिपीडन *n.* २ (*mil.*) *a seizing or striking in return* लष्करी सूड *m*, प्रत्यपहार *m*, प्रतिहरण *n*, बदला *m.* (*v.* घे.)

Reproach (re-prōch') [Lit. 'to bring (some offence) back or near to one.' Fr. *re*, again, *proche*, near –L. *propius* -*prope*, near.] *v. t. to upbraid, to blame* (-ला बद्दल) दोष देणें, ठपका *m.* देणें -आणणें -ठेवणें. २ *to censure* हजामत करणें (*fig.*), उडवणें, तुळतुळित करणें, निंदणें, निंदा *f.* करणें *g. of o.* R. *n. abuse, censure* ठपका *m.* देणें *n*, निंदा करणें *n*, हजामत करणें *n.* (b) हजामत *f*, निंदा *f*; as, "A severe R." [Term of R. अपशब्द *m.* To heap R.s on शिव्यांची लाखोली मोजणें.] २ *disgraced or discredited state* निंदास्पद स्थिति *f*, लाजिरवाणी स्थिति *f.* ३ आरोप *m*, दूषण *n*, दोष *m*; as, "Has taken away my R." ४ *thing that brings discredit or disgrace* डाग *m*, कलंक *m*, लज्जास्पद गोष्ट *f*, लाजिरवाणी गोष्ट *f*, दूषण *n*, ठपका *m*; as, "The state of the roads is a R. to civilization."

Reproach'ful *a. full of censure* निंदेचा, निंदात्मक, निंदामय, निंदारूप, गर्हात्मक. २ *shameful* ठपका आणणारा, लाजिरवाणा.

Reproach'fully *adv.* ठपका देऊन, दोष देऊन, निंदेनें, निंदापूर्वक.

Reproach'fulness *n.* ठपका *m*, दोष *m*, निंदात्मकता *f.*

Reprobate (rep'ro-bāt) [L. *reprobatus*, reproved, rejected; pa. p. of *reprobare*, to reject upon

trial. –L. *re*, back and *probare*, to try. ] *v. t. to disapprove of, to condemn* निंदणें, झिडकारणें, नापसंत करणें, नाकारणें. २ (of God) *to exclude from salvation* नरकांत टाकणें. R. *a. cast off by God, of abandoned character* देवाधर्मानें टाकलेला, देवाधर्मानें ओंवाळलेला, मुलखानें सोडलेला, निसवलेला, त्यक्तधर्म, माणसांतून उठलेला. R. *n.* पाजी *m*, नीच *m*. २ *a hardened sinner* महापापी *m*, चांडाळ *m*, बनलेला *m*.

Reproba'tion *n.* नापसंत करणें *n*, नाकारणें *n*, टाकून देणें *n*, सोडून देणें *n*. २ (जोराची) नापसंती *f*. ३ (*theol.*) नरकांत टाकणें *n*.

Re-produce ( rē-prō-dūs' ) [L. *re*, again, and Produce.] *v. t. to produce again* पुनः उत्पन्न करणें, पुनः पैदा करणें; as, "To R. light." २ *to bring forward again* (साक्षीदार) पुनः आणणें -हजर करणें, (आरोप) पुनः मांडणें, पुनः -ठेवणें. (b) ( खेळ ) पुनः रंगभूमीवर आणणें -करणें. ३ प्रजोत्पत्ति *f*. करणें, पुनरुत्पत्ति *f*. करणें, प्रजनन *n*. करणें, प्रजोत्पादन *n*. करणें. ४ पुनः वाढ करणें; as, "To R. a rose." ५ *to copy* ( -ची ) प्रतिमा -नक्कल उतरणें, (-चा) नकाशा काढणें. ६ आपल्या भाषेंत सांगणें.

Reproduc'tion *n.* पुनरुत्पत्ति *f*, पुनरुत्पादन *n*. २ आपल्या भाषेंत सांगणें *n*. ३ प्रजोत्पादन *n*.

Reproduct'ive *a.* पुनरुत्पादक. (b) पुनरावर्तक, पुनर्दर्शक; as, "R. imagination." २ प्रजोत्पादनविषयक. [ R. SELECTION प्रजननमूलक संवरण *n*. R. ORGANS जननेंद्रियें *n. pl.* ]

Reproof ( re-prōōf' ) [L. *reprobo*, the opposite of *approbo* -*re*, away, off, and *probo*, I try or prove. ] *n. a rebuke* बोलणें *n*, शब्दप्रहार *m*, बोल *m*, शब्द *m*, शब्दमार *m*, तोंडची शिक्षा *f*, वाग्दंड *m*, तंबी *f*. Reprove' *v. t. to rebuke* बोलणें, बोल लावणें, शब्द लावणें -ठेवणें, ठपका देणें -ठेवणें. २ *to chide* रागें भरणें, तोंडची शिक्षा करणें, शब्दाचा मार *m* -शब्दमार *m* -वाग्दंड *m*. करणें, तंबी देणें. Repro'ved *pa. t.* and *pa. p.* Reprov'er *n.* बोल लावणारा *m*, ठपका ठेवणारा *m*. २ तोंडची शिक्षा करणारा *m*, शब्दाचा मार करणारा *m*.

Reprove, See under Reproof.

Reptile ( rep'til ) [L. *reptilis* -*repo*, *serpo*; Sk. सृप्, to creep. ] *n*, *a crawling animal* सरपटणारा प्राणी, उरोगामी प्राणी. २ *a member of the class Reptilia* सरपटणाऱ्या वर्गाच्या प्राण्यांपैकीं एक *m*. ह्या वर्गांत साप, सुसर, कांसव, वगैरे प्राणी येतात. ३ *a mean grovelling person* क्षुद्र मनुष्य *m*, नीच मनुष्य *m*, पाजी मनुष्य *m*, हलकट मनुष्य *m*. R. *a. creeping* सरपटत चालणारा, उरोगामी. २ *mean and grovelling* हलकट, नीच, पाजी. [ THE R. PRESS सरकारच्या बगलेंतील पत्रें, बगलबच्चीं पत्रें. ]

Republic ( re-pub'lik ) [Fr. *republique* –L. *res-publica*, common weal.] *n. a state in which the*

*government is carried on by the people or its elected representatives* प्रजासत्ताक राज्य *n*, लोकसत्ताक राज्य *n*, प्रजासत्ताराज्य *n*, प्रजाराज्य *n*. २ (*fig.*) *a society of persons or animals with equality between members* समानाधिकारात्मक समाज, सर्वांस समान हक्क आहेत असा समाज *m*. [THE R. OF LETTERS विद्येचें राज्य *n*. २ विद्वज्जनसमाज *m*.]

Repub'lican *a. of a republic* प्रजासत्ताक राज्याचा. २ प्रजासत्ताक राज्यपद्धतीचा. ३ प्रजासत्ताकराज्यवादी. ४ (of birds) *living in large communities* समाजप्रिय. R. *n. a person advocating republican government* प्रजासत्ताकराज्यवादी *m*, प्रजासत्तावादी *m*.

Repub'licanism *n. the republican system of government* लोकसत्ताक राज्यपद्धति *f*, प्रजासत्ताक राज्यपद्धति *f*, प्रजासत्तापद्धति *f*. २ *attachment to, or the spirit of, republican principles* लोकसत्ताकराज्याभिमान *m*, प्रजासत्ताकराज्याभिमान *m*, प्रजासत्ताभिमान *m*.

Re-publish (rē-pub'lish) [L. *re*, again, and Publish.] *v. t.* पुनः छापून प्रसिद्ध करणें.

Repudiate (re-pū'di-āt) [L. *rupudio*, *repudiatus* -*repudium*, a putting away -*re*, away and *pudere*, to be ashamed.] *v. t. to divorce* (*one's wife*) काडी मोडून देणें, दारत्याग *m*, करणें, संबंध तोडून टाकणें, अनंगीकार करणें. २ *to reject* नाकारणें, (-शीं) संबंध नको म्हणणें, अवमानणें, नाहीं म्हणणें. ३ (हुकूम) न मानणें, न जुमानणें. ४ (कर्ज वगैरे) नाकबूल जाणें, साफ नाहीं म्हणणें.

Repudia'tion *n.* काडी मोडून देणें *n*, अनंगीकार *m*, अस्वीकार *m*, प्रत्यादेश *m*. २ नाकारणें *n*. ३ अवमानन *n*. ४ (कर्ज वगैरे) नाकबूल जाणें *n*; as, "The R. of a debt."

Repu'diator *n.* काडी मोडून देणारा *m*, प्रत्यादेश करणारा. २ अवमानणारा *m*. ३ नाकबूल जाणारा *m*.

Repug'nance *n. incompatibility* (*with, of*) विरोध *m*, विरोधभाव *m*, प्रातिकूल्य *n*, वांकडेपणा *m*. २ *strong dislike* विद्वेष *m*, तिटकारा *m*.

Repugnant (re-pug'nant) [L. *repugno* -*re*, against and *pugno*, I fight.] *a. contradictory to* विरुद्ध, विपरीत, प्रतिकूल, वांकडा. २ *distasteful to* नावडता, न आवडणारा, तिटकारा आणणारा.

Re-pullulate (rē-pūl'ū-lāt) [L. *re*, and Pullulate.] *v. i. to sprout afresh* पुनः अंकुर फुटणें, पुनः कोंब धरणें. २ (*of disease*) *to start again* पुनः उद्भवणें, उलटणें, पुन्हां उमटणें.

Repulse (re-puls') [L. *repulsus*, pa. p. of *repello*- L. *re*, off and *pello*, I drive.] *v. t. to drive back* मागें सारणें, मागें घालणें -लोटणें, हटवणें; as, "To R. an assault." २ प्रतिसारण *n*. करणें *g. of o*. ३ (*fig.*) *to foil in controversy* वादांत हटवणें, वादांत गोंधळवणें. ४ *to refuse* (request, offer) नाकारणें, झिडकारणें. R. *n. repulsing or being repulsed*

मागें हटवणें *n*, मागें सारणें *n*, हटवणूक *f*, माघार *f*, पिछेहाट *f*. २ *a rebuff* थप्पड *f*. Repuls'ed *pa. t.* R. *pa. p.* मागें हटविलेला, मागें सारलेला. २ प्रतिसारित.

Repul'sion *n.* *the act of repelling* मागें सारणें *n*, (मागें) हटवणें *n*. २ *dislike* तिटकारा *m*, किळस *f*, वीट *m*, खंत *f*. ३ (*physics*) प्रतिसारण *n*, प्रतिसारक शक्ति *f*. [CAPILLARY R. केशप्रतिसारण *n*. ELECTRIC R. विद्युत्प्रतिसारण *n*.]

Repuls'ive *a.* (*physics*) *exercising repulsion* प्रतिसारक, दूर सारणारा. [R. FORCES प्रतिसारक प्रेरणा *f. pl.*] २ *repelling* मागें हटवणारा, निवारक. ३ *loathsome, disgusting* ओंगळ, किळसवाणा, तिटकारा येण्यासारखा, तिरस्कारजनक; as, "R. manners."

Reputabil'ity *n.* प्रशंसनीयता *f*.

Rep'utable *a.* *of good repute* कीर्तिमान्, अब्रूचा, अब्रूदार, प्रतिष्ठित, प्रतिष्ठेचा, इज्जतीचा, शिष्ट, शहाजोग, माननीय, मान्य, आदरणीय, प्रशंसनीय.

Rep'utably *adv.* *by report or hearsay* ऐकिवांत, लोकांच्या सांगण्यांत.

Reputa'tion *n.* *character in public opinion* कीर्ति *f*, *pop.* कीर्त *f*, लौकिक *m*, प्रसिद्धि *f*, ख्याति *f*, नांव *n*; as, "Has not justified his R." [GOOD R. सुकीर्ति *f*, सत्कीर्ति *f*, साख *f*. ILL REPUTATION अपकीर्ति *f*, दुष्कीर्ति *f*.] २ *respectability, good fame* अब्रू *f*, आबरू *f*, आब *m*, आबदाब *m*, प्रतिष्ठा *f*, गौरव *m*, नांव *n*, नांवरूप *n*. [TO BRING INTO R. AND ESTIMATION नांवारूपास आणणें. TO COME INTO R. AND ESTIMATION नांवारूपास येणें.]

Repute (re-pūt') [Fr. –L. *reputare*, –*re*, again, and *putare*, to reckon.] *v. t.* (passive) *to be generally considered or reported of* (-ची) कीर्ति असणें, मानला जाणें, गणला जाणें, लेखिला -समजला जाणें.

Repute *n.* Same as Reputation.

Reput'ed *pa. t.* R. *pa. p.* *a.* कीर्तिमान्, सुप्रसिद्ध, नामांकित. २ *passing as but probably not being* म्हणून समजला जाणारा; as, "His *reputed* father."

Reput'edly *adv.* *in common repute* लोकदृष्ट्या, ऐकिवांत, लोकांत, लोकांच्या समजुतींत.

Request (re-kwest') [L. *re*, away, and *quærere*, to seek.] *v. t.* *to ask for earnestly* विनंति *f*. करणें, अर्ज *m*. करणें, प्रार्थना *f*. करणें, विनविणें, मागणें, प्रार्थणें.

Request' *n.* विनंति *f*. करणें *n*, मागणें *n*, अर्ज करणें *n*, प्रार्थना *f*. करणें *n*. २ *a petition* विनंति *f*, अर्ज *m*, अर्जी *f*, प्रार्थना *f*. ३ *a thing asked for* मागितलेली गोष्ट *f*, मागणें *n*, मागणी *f*; as, "You shall have your R." ४ *state of being sought after* अपेक्षा *f*, मागणी *f*, गरज *f*.

Request'ed *pa. t.* R. *pa. p.* विनंति केलेला, प्रार्थिलेला.

Request'er *n.* विनंति करणारा *m*, प्रार्थना करणारा *m*.

Requiem (rē'kwi-em) [L. *re*, + *quies*, rest.] *n.* *a hymn or special mass for the dead* मृताच्या शांतीकरितां म्हटलेला मास *m*, मृतशांत्यर्थ प्रार्थनागीत *n*.

Require ( re-kwīr' ) [ L. *re*, and *quærere*, to seek.] *v. t. to demand* ( सत्तेनें ) मागणें, हक्कानें -सत्तापूर्वक मागणें, सत्तेनें सांगणें, हुकूम *m* -आज्ञा *f.* करणें -देणें; as, "They R. my appearance." २ *to want* लागणें *in. con.*, घेणें, खाणें, खाऊन जाणें, घेऊन बसणें, अटवणें, मुरवणें; as, "Land *requires* 10lb of seed to the acre." ३ *to need* अपेक्षा *f* -गरज *f* -जरूरी *f.* असणें *in. con. with g. of o.*, लागणें *in. con.*

Requir'ement *n. act of requiring* (सत्तेचें) मागणें *n*, हक्काचें मागणें *n*, मागणें *n*, मागणी *f.* २ *need* गरज *f*, गरजा *f. pl.*, आवश्यक गोष्ट *f*, अपेक्षा *f*, जरूरी *f.*

Req'uisite *a. needful* जरूरीचा, अगत्याचा, आवश्यक, आकांक्षित, अपेक्षित. [To BE R. लागणें, पाहिजे असणें.] R. *n.* आवश्यक वस्तु *f*, अगत्याची गोष्ट *f* -वस्त *f.* [ REQUISITES साहित्य *n*, सामुग्री *f*, आवश्यक सामानसुमान *n.* ]

Req'uisiteness *n.* आवश्यकता *f*, जरूर *f*, जरूरी *f.*

Requisi'tion *n.* मागणें *n.* २ मागणी *f.* ३ पुष्कळांच्या सह्यांचा अर्ज *m* -विनंति *f.* ४ जरूरी *f.* [ To BE IN R. जरूरी असणें, मागणी केलेली असणें.]

Requisi'tion *v. t.* ( लष्करी कामाकरितां ) मागणें. २ उपयोगाकरितां मागणें, कामाकरितां मागणें.

Requital, See under Requite.

Requite ( re-kwīt' ) [L. *re*, back and Quit.] *v. t. to make return to or for* परत करणें, उलट -फेर करणें, परत देणें, उलट देणें, फेडणें, फेड *f.* करणें *g. of o.*, उसनें फेडणें *g. of o.* २ *to retaliate* बदला घेणें, उसनें घेणें, उगविणें. ३ *to reward* मोबदला देणें, बक्षीस देणें. Requit'al *n.* उसनें फेडणें *n*, उलट फेड *f*, प्रतिदान *n*, मोबदला *m.* Requit'ed *pa. t.* R. *pa. p.* मोबदला दिलेला. २ उलट केलेला.

Rescind (re-sind') [L. *re* and *scindere*, to cut.] *v. t. to annul, to repeal* रद्द करणें, रद्दबातल करणें; as, "To R. a law, a resolution, a vote, a decree, &c."

Rescis'sion *n.* रद्द करणें *n*, रद्दबातल करणें *n.*

Re-script (rē'-skript) [ Lit. 'that which is written in return.' L. *re*, back, and *scribere*, to write.] *n.* ( *Rom. Antiq.* ) रोमन बादशहाचा निर्णय -ठराव *m*-हुकूम *m.* २ ( R. C. Ch. ) पोपानें दिलेला निर्णय *m.* (b) पोपाचा ठराव *m*, पोपाचें आज्ञापत्र *n.* ३ *ruler's or government's or official edict or announcement* सरकारी ठराव *m*, सरकारी जाहीरनामा *m.* ४ *a counterpart* ( जोड ) नक्कल *f.*

Rescue ( res'kū ) [L. *re*, away, *ex*, out, and *quatere*, to shake.] *v. t. to save from danger or violence* बचाव *m.* करणें *g. of o.*, सोडवणें, बचावणें, वांचवणें, तारणें. २ ( *law* ) *to unlawfully liberate* ( *person* ) बेकायदेशीर रीतीनें सोडणें, सोडून देणें. ३ *to forcibly recover* (*property*) जबरदस्तीनें सोडवणें, दांडगाईनें ताब्यांत घेणें, कबजा करणें. R. *n.* (*act.*) सोडवणें *n*, सोडवणूक *f*, सोडवण *f*; (*state*) सुटका *f*, बचाव *m.* (b) *succour* मदत *f*, साहाय्य *n*, बचाव *m.*

२ *illegal liberation* बेकायदेशीर सुटका *f.* ३ *forcible recovery* जबरीनें कबजा करणें *n*, जबरदस्तीनें ताब्यांत घेणें *n.* Res'cued *pa. t.* R. *pa. p.* सोडवलेला, बचावलेला, वांचवलेला. Res'cuer *n.* सोडवणारा *m*, वांचवणारा, बचावणारा, तारक, त्राता, उद्धार करणारा. Res'cuing *pr. p.* बचाव करणारा, सोडवणारा.

Research (re-sèrch') [L. *re*, intensive, and Search.] *n. careful search after* (बारीक) शोध *m*, (काळजीपूर्वक -बारकाईचा) तपास *m.* २ (usually *pl.*) *course of scientific investigation* संशोधन *n.* R. *v. i. to examine with continued care* (बारकाईनें) तपासणें, काळजीपूर्वक तपास *m* -शोध *m.* करणें. २ *to make researches* संशोधन *n.* करणें.

Re-section (rē'-sekshun) *n.* आंखडलेल्या सांध्यांतील हाडाचीं टोकें कापून काढण्याची शस्त्रक्रिया.

Resem'blance *n. likeness* सारखेपणा *m*, साम्य *n*, सादृश्य *n*, सदृशता *f*, सारखवटा *m*, आनुरूप्य *n*, छाया *f*, अनुरूपता *f.* २ *thing that resembles* सारखी वस्तु *f*, सदृश वस्तु *f*, प्रतिमा *f*, प्रतिरूप *n*, प्रतिकृति *f*, प्रतिछाया *f.*

Resemble (re-zem'bl) [Fr. *resembler* –L. *re*, and *similis*, like.] *v. t. to be like or similar to* सारखा असणें, सम -बरावर -सदृश -अनुरूप असणें, तुलना *f* -बरोबरी *f.* करणें, रीतीवर -स्थितीवर -वळणावर जाणें *g. of o.*

Resent (re-zent') [Fr. *ressentir* –L. *re*, in return and *sentire*, to perceive, to feel.] *v. t. to feel insulted at, to be angry* रागावणें, मनांत खुमखुमणें, राग *m* -क्रोध *m.* येणें *g. of o.*, *with in. con.*, संताप येणें, संतापणें, संताप व्यक्त करणें.

Resent'ful *a.* लौकर रागावणारा, लौकर चिडणारा.

Resent'ment *n. anger* संताप *m*, कोप *m*, रोष *m*, राग *m*, क्रोध *m.*

Reserva'tion *n. act of reserving* राखणें *n*, राखून ठेवणें *n*, मागें ठेवणें *n.* २ *that which is kept back*, पुढें न आणलेली गोष्ट *f.* ३ (*law*) *a right or privilege reserved by an individual to himself* (स्वतः करितां) राखून ठेवलेला हक्क *m.* (b) राखून ठेवलेल्या हक्कासंबंधीं कलम *n.* ४ *a tract of public land reserved for some special purpose* राखून ठेवलेली सार्वजनिक जागा *f.* ५ *express or tacit limitation made about something* (राखून ठेवलेली) अट *f*, अपवाद *m*, निर्बंध *m*, मर्यादा *f.*

Reserve (re-zėrv') [Fr. *reserver* -L. *re*, back, and *servare*, to keep.] *v. t. to keep back for later occasion* (अस्मानीसुलतानीसाठीं किफायतींतून) काढून ठेवणें, राखून ठेवणें, शिलकीस ठेवणें, ठेवणें, राखणें, उरवणें. (b) (हक्क, जागा, वगैरे) राखून ठेवणें. R. *n.* (a) *a keeping back* राखून ठेवणें *n*, मागें टाकणें *n*, शिलकीस टाकणें -ठेवणें *n.* (b) *something reserved for future use* राखून ठेवलेला पदार्थ *m*, शिल्लक *f.* [R. FUND गंगाजळी ठेव *f.*] २ (*sing. or pl.*) *forces*

*outside regular army to reinforce or cover retreat* राखून ठेवलेली फौज *f* -तुकडी *f*, शिलकी फौज *f*. (b) शिलकी फौजेंतील शिपाई *m. pl.* २ *exception or limitation attached to something* अपवाद *m*, अट *f*, मर्यादा *f*; as, "I accept your statement without R." [SALE OR AUCTION WITHOUT R. येईल त्या किंमतीस विकणें किंवा लिलांव करणें *n*. R. PRICE (जिच्या खालीं ध्यावयाची नाहीं अशी) ठरींव -किमान किंमत *f*.] ४ *self-restraint* लाज *f*, भीड *f*, भिडस्तपणा *m*, संकोच *m*, आडपडदा *m*. ५ *avoidance of plain-speaking* भिडस्तपणा *m*, संकोच *m*, मन मोकळें करून न बोलणें *n*, मुग्धता *f*, मुग्धस्वभाव *m*. [TO SPEAK WITHOUT R. मन मोकळें करून बोलणें.] ६ (*in games*) (राखून ठेवलेला) शिलकी भिडू *m*, फाल्तू गडी *m*. ७ (*at exhibitions*) (दुसऱ्याचें बक्षीस रद्द झाल्यास) बक्षिसाकरितां राखून ठेवलेला *m*. ८ *intentional suppression of truth* सत्यापलाप *m*, खरी गोष्ट दडपून ठेवणें *n*.

Reserved' *pa. t.* R. *pa. p.* राखून ठेवलेला; as, "R. forest, R. seats, &c." २ *shy, not frank* लाजाळू, संकोची, संकोचवृत्तीचा, संकोचशील. Reserved'ly. *adv.* संकोचवृत्तीनें, लाजाळूपणानें, भिडस्तपणानें.

Reserved list *n. naval officers not in active service but kept on half-pay and in reserve for emergencies* अर्ध्या पगारावर ठेवलेले आरमारी अंमलदार.

Reserved'ness *n.* संकोच *m*, संकोचीपणा *m*, संकोचशीलता *f*.

Reserv'ist *n. one of the reserved forces of the country* राखून ठेवलेल्या सैन्यापैकीं एक *m*, शिलकी सैन्यांतील शिपाई *m*.

Reservoir (rez-ĕr-vwor') [Fr.] *n. a place where anything (esp. water) is stored* खजिना *m*, खजाना *m*, सांठवण *n*, *esp.* जलाशय *m*, टांकें *n*, हौद *m*, उस्वास *m*. [RECEIVING R. पाणी घेणारा खजिना *m*. DISTRIBUTING R. पाणी वांटणारा खजिना *m*. R. PEN शाई ठेवण्याची सोय असलेलें कलम *n*.] २ (*fig.*) संग्रह *m*, खजिना *m*; as, R. of knowledge, facts, &c."

Resetter (re-set'-tėr) [L. *re* + Set.] *n. a receiver of stolen property* (जाणून बुजून) चोरीचा माल ठेवणारा *m*.

Reside (re-zīd') [L. *re*, back, and *sedere*, to sit.] *v. i. to dwell permanently* (घर करून) राहणें, वसणें, नांदणें, असणें, घर *n* -वस्ती *f* -वास *m*. करणें. २ (of officials) (नोकरीच्या ठिकाणावर) राहणें. ३ (of powers, rights, etc.) *to rest in person, etc.* असणें. ४ (of qualities) *to be present or inherent in* (विद्यमान) असणें, जन्मसिद्ध असणें, स्वयंसिद्ध असणें, अंगचा असणें, मूळचा असणें.

Res'idence *n. residing* राहणें *n*, नांदणें *n*, वस्ती *f*, वास्तव्य *n*. [PERMANENT R. कायमचें राहणें *n* -वास्तव्य *n*. TEMPORARY R. बिऱ्हाड *n*. TO HAVE OR TAKE UP ONE'S R. (बिऱ्हाड करून) राहणें. R. IS REQUIRED (अंमलदारानें वगैरे) ठिकाणावर राहणें जरूर आहे.] २

*abode* बिऱ्हाड *n*, घर *n*, मकाण *n*, ठिकाण *n*, ठिकाणा *m*, मुक्काम *m*. (as, मुक्काम मुंबई), loosely ठावठिकाणा *m*. ३ *a mansion* घर *n*, इमारत *f*; as, "A desirable family R."

Res'idency *n*. रेसिडंटचा बंगला *m*, रेसिडेन्सी *f*. २ (कॉलेजांतील विद्यार्थ्यांचें) रहाण्याचें ठिकाण -चाळी *f. pl.*, रेसिडेन्सी *f*.

Res'ident *a*. *residing* राहणारा, रहिवासी, वस्ती करणारा, वास *m*. करणारा, स्थायी, स्थायिक, वासी, कर, करी (in comp. as, पुणेकर, गांवकरी), निवासी (in comp. as, मथुरानिवासी, द्वारकानिवासी), स्थ (in comp.). [R. POPULATION स्थाईक वस्ती *f*.] २ (of birds) *not migratary* देशान्तर न करणारा, एकाच ठिकाणीं राहणारा. ३ *having quarters on the spot* राहणारा, स्थायी, स्थानिक; as, "R. surgeon, R. tutor, &c." ४ *inherent, located* असणारा, आंगचा, मूळचा; as, "A right R. in the nation." R. *n*. *a permanent inhabitant* रहिवासी *m*, कायमचा राहणारा *m*. [AN OLD R. ठिकाणदार, वतनदार, मुन्या.] २ *Indian Governor-general's political agent residing at native courts* रेसिडेंट *m*.

Residen'tial *a*. *of residence* घराचा, घरामुळें प्राप्त झालेला; as, "The R. qualification for voters." (b) वस्तीचा, वस्तीमुळें प्राप्त झालेला. २ *suitable for or occupied by private houses* घरास योग्य, घरें असलेला; as, "R. estate." ३ राहण्याचा; as, "R. quarters."

Resid'ual *a*. *of the remainder* अवशेषाचा, अवशिष्टाचा, शेषासंबंधीं, शेषविषयक, उरीचा, बाकीचा. [R. CHARGE (*elect.*) शेषजागृति *f*.]

Resid'uary *a*. (*law*) शेषाचा, शेषासंबंधीं, शेषविषयक, बाकी राहिलेल्यासंबंधी. [R. CLAUSE (मृत्युपत्रांतील) शेषविषयक कलम *n*. R. DEVISEE शेषाधिकारी *m*. R. LEGATEE शेषधनाधिकारी *m*.]

Residue (re'zi-dū) [L. *residuum*- *residere*, to remain behind.] *n*. *remainder* शिल्लक *f*, बाकी *f*, शेष *m*, अवशेष *m*, अवशिष्टांश *m*, ऊर *f*, उरी *f*, उरलेला भाग *m*. [METHOD OF R. शेषप्रकार *m*.] २ (*law*) शेषमिळकत *f*.

Resid'uum *n*. शेष *m*, अवशेष *m*, बाकी *f*, ऊर *f*, etc. २ (*chem.*) शेष *m*. ३ (in calculations) *amount not accounted for* हिशेबांत न आलेली रक्कम *f*, अनामत रक्कम *f*. ४ *lowest stratum or dregs of population* कनिष्ठ दर्जाचे लोक *m. pl.*

Resign (re-zīn') [L. *resigno* -*resignatus*, to unseal, to annul, to give back -*re*, back and *signo*, I mark -*signum*, a mark.] *v. t. to give up* सोडणें, सोडून देणें, त्याग *m*. करणें, पाणी सोडणें. (b) (नोकरीचा, जागेचा, मालकीचा, हक्काचा) राजीनामा *m*. देणें. [TO R. A TITLE OR CLAIM हक्क *m* -वारसा *m*. सोडून देणें, मालकीचा राजीनामा देणें.] २ *to hand over*

सोंपवणें, हवालीं करणें. ३ *to reconcile oneself to one's fate* नशिबावर हवाला ठेवणें, हवाला ठेऊन राहणें, ईश्वरावर हवाला ठेवणें -ठेऊन राहणें. R. *v. i. to give up office, to retire* (नोकरीचा) राजीनामा देणें, राजीनामा देऊन (नोकरी) सोडणें, घरीं वसणें (*colloq.*).

Resigna'tion *n.* सोडणें *n*, त्याग *m*, परित्याग *m.* २ सोंपवणें *n*, हवालीं करणें *n.* ३ ईश्वरावर हवाला ठेवणें *n* -ठेऊन राहणें *n*, ईश्वरार्पणबुद्धि *f*, ईश्वरनिष्ठा *f.* ४ नोकरीचा राजीनामा देणें *n*, राजीनामा *m.*

Resigned *pa. t.* R. *pa. p.* सोडलेला, त्यक्त, परित्यक्त. २ सोंपवलेला, हवालीं केलेला. ३ ईश्वरावर -नशीबावर हवाला ठेवलेला. ४ राजीनामा देऊन सोडलेला, राजीनामा दिलेला.

Resil'ience,-ency *n. elasticity or springiness* स्प्रिंगसारखें उडणें *n*, सळदिशीं उडणें *n*, उशी खाणें *n.* २ रंगील वृत्ति *f*, आनंदी स्वभाव *m.*

Resilient (re-zil'i-ent) [L. *resiliens, resilio -re,* back and *salio*, I leap or spring.] *a. rebounding, elastic* स्प्रिंगसारखा किंवा कमानीसारखा उडणारा, सळदिशीं उडणारा, उशी खाणारा. २ (of persons) *buoyant in spirit* आनंदी, रंगेल, आनंदी स्वभावाचा.

Resin (rez'in) [Fr. *resine* –L. *resina*, resin.] *n.* राळ *f*, राळेच्या जातीचा पदार्थ *m*, लाक्षा *f.*

Res'inous *a.* राळेचा, राळेच्या गुणांचा.

Resist (re-zist') [L. *re*, against, *sistere*, Sk. स्था, to stand. Resist शब्दाचा धात्वर्थ 'च्या विरुद्ध उभें राहणें' असा आहे.] *v. t. to strive against, to successfully oppose* प्रतिकार *m.* करणें, प्रतिबंध *m.* करणें, अडथळा *m.* करणें, वारणें, निवारणें, विरोध *m.* करणें, अडती *f.* घालणें. R. *v. i. to make opposition* प्रतिकार *m.* करणें, प्रतिबंध *m.* करणें, अडणूक *f.* धरणें, अडणूक *f.* घेणें, दाद *f.* न देणें, आडवा येणें.

Resist'ance *n. opposition* प्रतिकार *m*, प्रतिबंध *m*, विरोध *m*, प्रतिरोध *m*, अडथळा *m*, अडती *f*, अडणूक *f.* [ACTIVE RESISTANCE सक्रिय प्रतिकार *m.* ARMED R. सशस्त्र प्रतिकार *m.* PASSIVE R. अक्रिय -क्रियाशून्य-प्रतिकार *m*, निःशस्त्र प्रतिकार *m.*] २ (Electri. Magnet.) *nonconductivity* प्रतिबंध *m.* [ELECTRIC R. विद्युत्प्रतिबंध *m.* EXTERNAL R. बाह्यप्रतिबंध *m.* INTERNAL R. अंतस्थ प्रतिबंध *m.*] ३ (Electr.) *part of apparatus used to offer definite resistance to current* प्रतिबंधक *m.* [RESISTANCE-BOX प्रतिबंधक पेटी *f.* R.-COILS प्रतिबंधक वेटाळीं *n. pl.*] ४ (*math.*) प्रतिबंध.

Resis'tant *a.* प्रतिकार करणारा, विरोध करणारा.

Resis'ter *n.* प्रतिकार करणारा *m*, विरोध *m* -प्रतिरोध *m* -प्रतिबंध *m.* करणारा, प्रतिबंधक.

Resistibil'ity *n. power of offering resistance* प्रतिकारक्षमता *f*, प्रतिबंधक्षमता *f*, विरोध करण्याची शक्ति *f.*

Resistible *a.* प्रतिकार -विरोध करण्याजोगा, प्रतिकार्य, प्रतिकारक्षम, अडथळा करण्याजोगा.

Resisting *a.* प्रतिकार *m.* करणारा, प्रतिबंध करणारा, &c. २ (*math.*) प्रतिबंधक.

Resist'less *a.* अनिवार्य, अप्रतिकार्य, प्रतिकार करतां न येण्यासारखा.

Res Judicata (*law*) निर्णीत गोष्टी, प्राङ्‌निर्णय *m.*

Res'oluble *a.* पृथक् करण्याजोगा. २ See Resolvable.

Res'olute *a.* *firm of purpose* निश्चयाचा, दृढनिश्चयाचा, निश्चयी, दृढनिश्चयी, चिकट, चिवट, निग्रही, नेटाचा, नेटदार. (b) *not vacillating* न डळमळणारा, ठाम निश्चय झालेला, खंबीर, धीट, धिराचा, धारिष्टवान्, दमदार, हिय्याचा.

Res'olutely *adv.* निश्चयानें, दृढनिश्चयानें, निग्रहपूर्वक, चिकाटीनें, नेट धरून.

Res'oluteness *n.* दृढनिश्चय *m*, मनाचा खंबीरपणा *m*, चिकाटी *f*, दम *m*, धैर्य *n*, धीर *m*, नेट *m*.

Resolu'tion *n.* *separation into components, decomposition* मूलतत्त्वें *n. pl.* निराळीं करणें *m*, पृथक्करण *n.* करणें *n*, पृथक्करण *n.* २ (*math.*) (अवयवांचें) पृथक्करण *n.* [R. OF FORCES प्रेरणापृथक्करण *n.*] ३ (*med.*) *disappearance of inflammation without suppuration* फोड *m* -पुटकुळी *f.* जिरणें *n*, (फोड, पुटकुळी, वगैरे) मरणें *n* -मावळणें *n*, सूज *f.* वगैरे उतरत जाणें *n.* ४ *solving of a doubt* शंकासमाधान करणें *n*, उलगडणें *n*, उलगडा *m.* ५ *formal expression of opinion by a legislative body* ठराव *m.* ६ *resolve, or thing resolved* निश्चय *m*, ठराव *m*, निर्धार *m*, संकल्प *m*, करार *m*, कृतसंकल्प *m*, कृतनिश्चय *m*, दृढ संकल्प *m.* ७ *boldness and firmness of purpose* निग्रह *m*, हिय्या *m*, हिंमत *f*, धारिष्ट *n*, धैर्य *n*, धीर *m*, दम *m*, नेट *m*.

Resolv'able *a.* द्रावणीय, द्राव्य. २ मूलतत्त्वें निराळीं करण्याजोगा, पृथक्करणीय. ३ उलगडा करण्याजोगा as, "R. ideas or difficulties."

Resolve (re-zolv') [L. *resolvo, resolutum* -re, intensive, and *solvere*, to loose.] *v. t.* (मूलावयव *m. pl.*, मूलतत्त्वें *n. pl.*, मूलप्रेरणा *f. pl.*) पृथक् करणें, निरनिराळे करणें. २ (*math.*) अवयव *m. pl.* पाडणें, पृथक् करणें. ३ *to explain, to clear doubts* (निरनिराळे भाग पाडून) समजावून देणें, विशद करणें, उलगडा *m.* करणें *g. of o.*, उलगडणें, (संशय *m.*) फेडणें, (कोडें) सोडवणें, (-चें) निरसन *n.* करणें; as, "All doubts were *resolved.*" ४ (-चें) रूप देणें; as, "Christianity might be *resolved* into a system of morality." ५ *to decide upon* ठरवणें, निश्चय *m.* करणें. (b) ठराव *m.* करणें. ६ (*med.*) *to disperse or scatter* (as an inflammation or a tumour) जिरवणें, जिरणीस पाडणें, (सूज वगैरे) फांकवणें, मावळविणें. R. *v. i.* *to dissolve* द्रवणें, विरणें, विरघळणें, रस *m.* होणें, द्रव *m.* होणें. २ *to dissipate* (a tumour) जिरणें, जिरणीस पडणें, मुरणें, मरणें, फांकणें, मावळणें. ३ निश्चय *m* -संकल्प *m.* करणें-धरणें.

Resolve' *n.* निश्चय *m*, निर्धार *m*, करार *m*, कृतसंकल्प *m*, कृतनिश्चय *m.*

Resolv'ed *pa. t.* R. *pa. p.* ठराव केलेला, निश्चय केलेला. २ (used in minutes of meeting) (पुढील) ठराव पास करण्यांत आला होता.

Resolv'ent *a.* (*med.*) *effecting resolution of tumour* जिरवणारा, जिरणीस पाडणारा, फांकवणारा. २ पृथक्करण करणारा, पृथक्कारक. R. *n.* (गळूं किंवा सूज) फांकवणारें औषध *n.*

Res'onance *n.* प्रतिध्वनि होणें *n*, प्रतिध्वनि करणें *n.* २ प्रतिध्वनि *m*, प्रतिनाद *m*, अनुनाद *m.* [R.-BOX (*phys.*) अनुनादी पेटी *f.*]

Res'onant (rez'o-nant) [L. *resono -re*, back and *sonare*, Sk. स्वन्, to sound.] *a.* (of bodies) प्रतिध्वनिजनक, प्रतिध्वनि होण्यासारखा. २ (of places) *resounding with* गजबजलेला, दुमदुमणारा.

Res'onantly *adv.* प्रतिध्वनिपूर्वक, प्रतिध्वनि करून.

Res'onator *n.* (in wireless telegraphy) *an apparatus for detecting electric waves* प्रतिध्वननयंत्र *n.*

Resort (re-zort') [Fr. *ressortir*, lit. 'to obtain again', from *re*, and L. *sortiri*, to obtain by lot, *-sors, sortis*, a lot. Resort शब्दाच्या धात्वर्थांची परंपरा (a) गेलेली वस्तु लाटरीनें पुन्हां मिळवणें; (b) वरिष्ठ कोर्टाकडे अपील करून पुन्हां मिळवणें; (c) अपील करणें, अशी आहे. अपील करणें या शेवटच्या अर्थापासून 'आश्रय करणें' हा सध्यांचा प्रचलित अर्थ निघाला आहे.] *v. i. to turn for aid to* (चा) आश्रय *m.* करणें, आश्रय *m.* धरणें, अवलंबन *n.* करणें. (b) (-चा) उपयोग *m.* करणें, (-चा) उपाय *m.* करणें; as, "To R. to force." २ *to go often to* जाणें, येणें, जा ये करणें, खेपा *f. pl.* घालणें, ये जा करणें, पैरव *f*-पैरवी *f.* घालणें. ३ *to go in numbers* झुंडींच्या झुंडी जाणें, मिळून जाणें, यात्रा *f.* जाणें. R. *n. a thing to which recourse is had* आश्रय *m*, आधार *m*, अवलंब *m*, उपाय *m.* [LAST R. शेवटचा उपाय *m*, निर्वाणींचा उपाय *m*, निदानचा उपाय *m.* (b) *the final tribunal* शेवटचें कोर्ट *n.*] (b) आश्रयस्थान *n.* २ *frequenting* जाणें *n*, येणें *n*, जाणेंयेणें *n.* ३ *a place frequented for specified purpose* बैठक *f*, (बसण्याचा) अड्डा *m*, चवाठा. (b) ठिकाण *n*, स्थान *n.* [HEALTH R. हवाशीर ठिकाण *n*, आरोग्यस्थान.]

Resound (re-zownd') [L. *re*, back and Sound.] *v. i.* (of place) *to ring or echo with* घुमणें, घुमघुमणें, दुमदुमणें, दणदणणें, धुनकणें or धुनुकणें, गाजणें. R. *v. t. to produce echoes* प्रतिध्वनि करणें, प्रतिध्वनि होणें -उठणें with *loc.* of *s.*

Resource (re-sōrs') [Fr. *ressource*, a new source, -L. *resurgere*, to rise again. Resource याचा धात्वर्थ 'नवी युक्ति *f*, नवी क्लृप्ति *f*, नवें साधन *n.*' असा आहे.] *n.* (*usu.* in *pl.*) *expedient, device* युक्ति *f*, इलाज *m*, उपाय *m*, शकल *f*, क्लृप्ति *f*, तोड *f*, गति *f*, गत *f*, तरणोपाय *m*, तजवीज *f*, साधन *n*; as "Flight was his only R." [LAST R. शेवटचा -निदानचा -निर्वाणींचा उपाय *m.* THAT HAS NO R. अगतिक. THAT HAS

NO OTHER R. अनन्यगतिक.] २ *country's collective means for support and defence* देशाचीं (संरक्षणाचीं) साधनें *n. pl., pop.* आरमार व लष्कर. ३ *practical ingenuity, quick wit* योजकता *f*, कल्पकता *f*, युक्ति *f*, हिकमत *f*; as, "He is full of R." ४ (*pl.*) *means of raising money* द्रव्य उभारण्याचीं साधनें *n. pl.*, पैशाचीं साधनें *n. pl.*, द्रव्याचीं साधनें *n. pl.*

Resourc'eful *a.* युक्तिबाज, (पुष्कळ) युक्त्या असलेला, हिकमती. २ (नाना) साधनें असलेला.

Resourc'eless *a.* युक्तिहीन, साधनें नसलेला.

Respect (re-spekt') [Lit. 'to look back upon'. L. *respicio, respectum -re*, back and *specere*, to look.] *v. t.* (R.) *to relate to* लागणें, लागू होणें -पडणें, संबंध *m* -धोरण *n.* असणें *in. con. with g. of o.* २ *to regard with deference* मान ठेवणें, मान देणें, सन्मान देणें, आदर *m* -मान *m* -सन्मान *m.* करणें -राखणें *g. of o.*, बूज *f* -भीड *f* -थोरपणा *m* -योग्यता *f* -राखणें -ठेवणें *g. of o.* Respect *n. reference, relation* संबंध *m*, धोरण *n*, संधान *n.* [WITH R. TO विषयीं, संबंधीं.] २ *heed, attention* लक्ष *n*, नजर, दृष्टि *f*; "Did it quite without R. to the results." ३ *deferential esteem* मान *m*, आदर *m*, भीड *f*, बहुमान *m*, सन्मान *m*, अदब *f*, सत्कार *m*, मान्यताबुद्धि *f*, पूज्यत्वबुद्धि *f*, freely भीडभाड or भाडभीड *f*, भीडमुरवत *f*. [R. OF PERSONS पक्षपात *m*, भेददृष्टि *f*, भेदबुद्धि *f.* RESPECTS रामराम *m*, नमस्कार *m*, सलाम *m*, मुजरा *m.* INTERCHANGE OF R.S नमस्कारचमत्कार *m. pl.*, रामराम होणें, सलामी *f.* TO PAY ONE'S R.S दर्शन *n.* घेणें, नमस्कार *m.* करणें, रामराम *m.* करणें, मुजरा *m.* करणें, सलाम *m.* करणें. TO TREAT WITH R. मानानें -आदरानें वागवणें, मर्यादा *f.* राखणें *g. of o.*] ४ *aspect, bearing point* बाबत *f*, विषय *m*, गोष्ट *f*, प्रकरण *n.* [IN THIS R. ह्या प्रकरणीं -बाबतींत.] Respectabil'ity *n. decent appearance and seemingly good character* अब्रू *f*, प्रतिष्ठा *f*, योग्यता *f*, मान्यता *f*, मानमान्यता *f*, आब *f*, इज्जत *f*, मोठेपणा *f*, थोरपणा *m.* Respec't-able *a. deserving respect* अब्रूदार, प्रतिष्ठित, संभावित, इज्जतीचा, मान्य, शिष्ट, भला, आदरणीय, पूजनार्ह. २ *not inconsiderable in amount* बराच, मोठा, बराचसा, जमेस धरायाजोगा; as, "A. R. audience." Respec'ted *pa. t.* R. *pa. p.* प्रतिष्ठित, मान्य, मानलेला, आदर केलेला, मानित, सन्मानित, मानमरातब मिळालेला, मानसन्मान मिळालेला. Res-p'ecter *n.* भीड ठेवणारा, आदर करणारा *m*, मान राखणारा -ठेवणारा, पक्षपाती. Respect'ful *a. showing deference* आदरयुक्त, आदराचा, सन्मानाचा, मर्यादशील, विनयाचा, विनयशील, मर्यादशीर, अदबशीर, मर्यादेचा, आदराचा. Respect'fully *adv.* आदरानें, आदरपूर्वक, सन्मानानें, सन्मानपूर्वक, आदरपुरःसर, सादर, अदबीनें. Respect'fulness *n.* अदब *f*, विनय *m*, मर्यादा *f*, मर्यादशीलता *f*, मर्यादशीरपणा *m.*

Respec'ting *pr. p.* R. *prep.* विषयीं, संबंधीं. Respe'ctive *a. comparative* सापेक्ष, कमीजास्ती, व्यक्तिविषयक; as, "The election depends on the R. popularity of each candidate." २ *individual, proper to each* आपापला, आपला, ज्याचात्याचा, खासगत, खास, खासगतीचा, खुद्द, क्रमागत, अनुक्रमाचा. Respe'ctively *adv.* क्रमानें, क्रमशः, अनुक्रमानें, अनुक्रमें.

Respir'able *a.* श्वासोच्छ्वास करण्यासारखा.

Respira'tion *n.* श्वासोच्छ्वास करणें *n*, श्वासोच्छ्वास *m*, श्वसन *n.* २ *single inspiration and expiration* श्वासोच्छ्वास *m*, श्वास *m.* ३ ( *bot.* ) श्वासोच्छ्वास *m.*

Re'spirator *n. an apparatus of gauze worn over mouth, nose, &c. to warm or filter inhaled air* ( श्वासोच्छ्वासाकरितां ) जाळीची टोपी *f.*

Respir'atory *a.* श्वासोच्छ्वासाचा, श्वासोच्छ्वासाच्या उपयोगी, श्वासोच्छ्वासोपयोगी, श्वासोच्छ्वाससंबंधीं, श्वासोच्छ्वासविषयक. [R. CHANGES श्वासोच्छ्वासविषयक विक्रिया *f. pl.*, श्वासविक्रिया *f. pl.* R. FUNCTION श्वासोच्छ्वासकर्म *n*, श्वसनकर्म *n.* R. ORGANS श्वासोच्छ्वासेंद्रियें *n. pl.*, श्वासेंद्रियें *n.* R. PASSAGE श्वासमार्ग *m.*]

Respire ( re-spīr' ) [L. *re*, again, and *spirare*, to breathe.] *v. i. to breathe* श्वासोच्छ्वास करणें. २ *to get rest or respite* दम *m.* खाणें, विसांवा *m* -विश्रांति *f.* घेणें. R. *v. t.* ( R. ) *to breathe out* श्वास ( बाहेर ) सोडणें. २ *to breathe in and out* श्वासोच्छ्वास *m.* करणें.

Respite ( res'pit ) [O. Fr. *respit* -L. *respectus*, Doublet of Respect.] *v. t. to give temporary relief* विसांवा *m.* देणें. २ *to postpone execution ( of sentence )* शिक्षेची -फांशीची तहकुबी *f* -महकुबी *f.* करणें. ३ (*Mil.*) *to withhold* ( पगार ) अडकवून ठेवणें. ४ ( कर्जाची ) तहकुबी देणें. R. *n. interval of rest or relief* विसांवा *m*, विश्रांति *f.* २ *a reprieve* ( शिक्षेची -फांशीची -दंडाची) तहकुबी *f* -महकुबी *f.* ३ ( कर्जाची ) तहकुबी *f.*

Resplendent ( re-splen'dent ) [L. *re*, intensive and *splendere*, to shine.] *a. shining very brightly* चकाकणारा, तेजस्वी, चकचकीत, तेजाचा, तेजःपुंज, दैदीप्यमान, झकझकीत, चमकणारा. Resplen'dence, -ency *n.* तेज *n*, तेजस्विता *f*, चकचकीतपणा *m*, चकाकी *f*, झकाकी *f*, चमक *f*, दैदीप्यता *f.* Resplen'dently *adv.* तेजस्वितेनें, चकचकीतपणानें.

Respond ( re-spond' ) [L. *re*, back and *spondere*, to promise.] *v. i. to make answer* ( वादीला ) उत्तर देणें -करणें, प्रत्युत्तर देणें, जबाब देणें. (b) अनुकूल उत्तर देणें, अपेक्षित उत्तर देणें, इच्छित उत्तर देणें. २ ( in part of the Litany and Communion Service of the Anglican Church ) ( ख्रिस्ती लोकांनीं 'ख्रीस्टला' उद्देशून ठराविक ) उत्तरवाक्यें *n. pl.* म्हणणें. २ *to perform corresponding action* संवादिनी क्रिया

करणें. ३ *to correspond to* संवादी असणें, जुळता -जुळणारा असणें.

Responde'nt *a. making answer* उत्तर देणारा, प्रत्युत्तर करणारा. २ *responsive to* संवादी. ३ (*law*) (अपीलांतील) प्रतिवादी, सामनेवाला. (b) प्रतिपक्षी, उत्तरपक्षी, समाधानपक्षी (old term), जाब देणारा. R. *n.* (अपीलांतील) सामनेवाला.

Res'ponse *n. answer* उत्तर *n*, प्रत्युत्तर *n*, जबाब *m*. २ *feeling or movement dictated by stimulus* संवादी क्रिया *f*, अपेक्षित उत्तर *n*, इच्छित उत्तर *n*, जबाब *m*, उत्तर *n*; as, "Called forth no R. in his breast." ३ (*law*) जबाब. ४ *oracular answer* उत्तर *n*, जाबसाल, कौल. ५ (*eccle.*) *any part of liturgy sung in answer to priest* उत्तरवाक्य *n*, उत्तर *n*.

Responsibil'ity *n.* जबाबदारी *f*, (loosely) जिम्मेदारी *f*, जामिनी *f*, जामिनकी *f*, जिम्मा *f*, जोखीम *f*, भर (S.), भार *m*; as, "Is not afraid of R." २ *charge for which one is responsible* जबाबदारीची गोष्ट *f*, जोखीम *n*, जबाबदारी *f*; as, "A family is a great R."

Respon'sible *a. answerable* जबाबदार, जिम्मेदार; as, "A R. ruler; A R. government." २ *reliable* भरंवशाचा, भरंवसा टाकण्याजोगा, विश्वसनीय. ३ *involving responsibility* जबाबदारीचा, जबाबदारी असलेला, जोखमाचा, जोखीम असलेला; as, "A R. office." Respon'sibly *adv.* जबाबदारीनें, जबाबदारी घेऊन.

Respon'sive *a. answering* उत्तर देणारा, प्रत्युत्तर देणारा. २ *by way of answer* उत्तरादाखलचा, उत्तर म्हणून दिलेला. ३ (of liturgy) *using responses* उत्तरवाक्यें असणारा, उत्तरवाक्यात्मक. ४ *responding readily to some influence* संवादी, प्रत्युत्तरदायी.

Respon'siveness *n.* संवादिता *f*, संवादी धर्म *m*.

Rest (rest) [A. S. *rest.*] *v. i. to be still* स्थिर होणें, स्थिरावणें, थांबणें, संथ -स्वस्थ होणें, निश्चेष्ट होणें. २ *to lie in sleep* झोंप *f.* घेणें, आराम *m.* करणें, विश्रांति *f* -विसांवा *m.* घेणें, आडवा होणें, शयन *n* -शय्या *f.* करणें. (b) *to lie in death* शेवटची झोंप लागणें, (मेल्यावर) झोंप घेत पडणें; as, "He R.s in churchyard." ३ *to cease or abstain from labour* विसांवा *m.* घेणें, विश्रांति *f.* घेणें, बसणें, थांबणें. [To R. UPON ONE'S OARS, SEE UNDER OAR.] ४ *to be tranquil* स्वस्थ असणें, चैन पडणें *in. con.*, सुखास पडणें *in. con.*, सुखी -शांत असणें, सुख *n.* पावणें -भोगणें, समाधान *n.* पावणें, सुख *n* -समाधान *n.* असणें -वाटणें *in. con.*; as, "Is too ferverish to R." ५ *to be supported or based (on)* आश्रय *m.* करणें, आधार *m* -आश्रय *m* -टेकावा *m* -नेटावा *m.* असणें *in. con. with g. of o.*, टेंकणें, (-वर) बसणें. (b) (of eyes) (-कडे) लागणें, (नजर) पडणें; as, "His gaze rested upon a strange object." ६ *to repose trust in*

विश्वास *m.* ठेवणें -टाकणें, टेंकणें. ७ *to be left in the hands or charge of* (-कडे) असणें, (-च्या) हातीं -स्वाधीन असणें. ८ *to remain in a specified state* विशिष्ट स्थितींत असणें; as, "The affair *rests* a mystery. ९ विसांवा घेणें, विश्रांति घेणें, (जमीन) पडीत राहणें, पडीत असणें. R. *v. t. to lay at rest* निजवणें, विश्रांति *f* -विसांवा *m* -आराम *m.* देणें, स्वस्थ करणें, स्वस्थ होईसा करणें. २ *to place for support* (in) बसवणें, ठेवणें, टेंकणें, सोंपविणें; as, "To R. one's case on equity." ३ शांति देणें, शांतता देणें; as, "God R. his soul." R. *n. repose or sleep* झोंप *f*, आराम *m*, निद्रा *f*, निद्रावस्था *f*. [TIME OF R. निजावयाची वेळ *f*. TO LIE DOWN TO REST विश्रांतीकरितां पडणें.] २ *stillness* स्थिरता *f*, निश्चलता *f*, संथपणा *m.* (b) (*phys.*) स्थिरता *f*, स्थिति *f*. ३ *tranquillity* स्वास्थ्य *n*, स्वस्थपणा *m*, स्वस्थता *f*, समाधान *n*, शांतता *f*, शांति *f*, चैन *n*, सुख *n.* [TO FEEL AT R. चैन पडणें, सुखास पडणें *in. con.* AT R. स्वस्थ, स्थिर. TO SET AT R. (प्रश्नाचा) निकाल लावणें, निकाल करणें. (b) (-चें मन) स्वस्थ करणें, स्वस्थता आणणें. TO LAY TO R. पुरणें.] ४ *abstinence or freedom from labour* विसांवा *m*, विश्रांति *f*, विश्राम *m*, सुटी *f*. [DAY OF R., *Sunday* विश्रांतीचा दिवस *m*, रविवार. R. CURE (अंथरुणावर पडून राहणें हा) विश्रांतीचा उपचार *m.* R. HOUSE प्रवाश्यांकरितां डाकबंगला *m.*] ५ *a prop or support* (*for gun, etc.*) बैठक *f*, नेटावा *m*, लाग *m*, आधार *m.* ६ *appointed interval of silence* यति *f*.

Rest (rest) [Fr. *reste* –L. *restare*, to remain.] *v. i. to remain* असणें, राहणें. R. *n. the remainder* बाकी *f*, शेष *m*, अवशेष *m*, ऊर *f*. २ *the others* वरकड or वरकट, दुसरे, राहिलेले, बाकीचे, अवांतर, शेष, इतर. ३ (*banking*) *reserve fund* गंगाजळी ठेव *f*.

Restaurant (res'-tō-ran *or* res'-tō-rant) [Fr. *restaurer*, to restore, to refresh.] *n. a place where refreshments may be had* फराळाचें दुकान *n*, उपाहारगृह *n.* [R. CAR आगगाडींतील फराळाचा डबा *m.*]

Rest'ful *a. favourable to repose* शांत, शांतीचा, शांततेचा, स्वस्थतेचा, शांति देणारा; as, "For R. death I cry."

Restitution (res-ti-tū'shun) [L. *re*, again and *statuare*, to make stand.] *n. a giving back, restoring* परत देणें *n*, प्रतिदान *n.* (b) मोबदला *m.* [R. OF CONJUGAL RIGHTS लग्नामुळें प्राप्त होणारे हक्क (गेलेले) पुनः मिळविणें, नष्ट वैवाहिक हक्क पुनः परत मिळविणें.] २ (*theol.*) पूर्वस्थितीवर येणें *n*; as, "The R. of all things." ३ *resumption of original shape or position by elasticity* (स्थितिस्थापकतेमुळें) पूर्वस्थितीवर येणें *n.* (b) पूर्वस्थिति *f*.

Restive (rest'iv) [O. F. *restif*, Fr. *retif*-*reste*, not moving forward.] *a. unruly* (as a horse) अडेल, अडील, अडणारा, अडखोर, अडिवाळ, खलेल. [TO BE R. अडणें, खुटणें.] २ हट्टी, द्वाड, अडेल (मनुष्य).

**Rest'iveness** *n.* अडेलपणा *m*, खलेली *f*.

**Rest'less** *a. sleepless* जाग्रणाचा, झोंपेशिवायचा, बिनझोंपेचा, निद्राहीन. २ *uneasy, agitated* चैन नसलेला, अस्वस्थ, अस्वस्थचित्त, बेआराम. (b) (as a sick person) तळमळणारा, चैन न पडणारा. [To BE R. तळमळणें, तगमगणें, चळवळणें, तडफडणें.] (c) अस्वस्थपणाचा, तळमळीचा; as, "The patient had a R. night." ३ *fidgeting* चळवळ्या, वळवळ्या, चुळबुळ्या, चंचल, चंचळ, तिरतिरा or तिरतिऱ्या, अडनड्या, घालमेल्या; as, "A R. child." (b) उलाढाल्या, लटपट्या; as, "R. schemers."

**Rest'lessness** *n.* जाग्रण *n*, निद्राराहित्य *n*, निद्राहीनता *f*. २ अस्वस्थता *f*, बेचैनी *f*, असमाधान *n*, अस्वस्थपणा *m*, अस्वास्थ्य *n*, बेआरामी *f*. (b) (of a sick person) काहिली *f*, तळमळ *f*, तगमग *f*. ३ उलाढाल *f*, घालमेल *f*. ४ चंचलपणा *m*, चपळपणा *m*, चळवळ *f*, वळवळ *f*, उठपळ *f*, अडमड *f*, *intens.* चळवळाट *m*, चुळबुळाट *m*.

**Restor'able** *a.* परत द्यावयाजोगा. २ सुधारायाजोगा. ३ पूर्वपदावर आणण्यासारखा. ४ बरा करण्यासारखा.

**Restora'tion** *n. act of restoring* परत देणें *n*, माघारा देणें *n*, प्रत्यर्पण *n*. २ सुधारणें *n*, उजरणें *n*, सुधारणूक *f*, उद्धार *m*, जीर्णोद्धार *m*. ३ पूर्वपदावर आणणें *n*, पुनःस्थापना *f*. ४ (English History) *establishment of monarchy in 1660* राज्यसत्तेची पुनःस्थापना *f*. ५ प्रकृति पूर्वींसारखी करणें *n*, पूर्वींची शक्ति *f*. आणणें. ६ (law) (मालमत्ता) परत देणें *n*.

**Restor'ative** *a. tending to restore health or strength* आरोग्यवर्धक, बलवर्धक. R. *n.* बलवर्धक औषध *n*, (b) पौष्टिक अन्न *n*.

**Restore** (re-stōr') [Fr. *restorer* –L. *re*, again, and *staurare*, to set up. Latin *staurare* is perhaps allied to Sk. स्थावर.] *v. t. to give back* परत देणें, माघारा देणें, परत करणें. २ *to bring back to its original state* पूर्वींसारखा करणें, सुधारणें, निटावणें, डागडुजी करणें, उजरणें, सावरणें, सुधारणूक *f*. करणें *g. of o.*, उद्धार *m* -जीर्णोद्धार *m*. करणें, यथापूर्व करणें, पूर्वस्थितीवर -पूर्वरूपास -पूर्वरंगावर आणणें; as, "To R. church, picture, text, &c." ३ *to bring back to dignity or right* पूर्वपदावर आणणें. ४ *to renew, to re-establish* पुनः स्थापणें, पुनः स्थापना करणें; as, "To R. harmony among those who are at variance." ५ *to cure* बरा करणें, रोगमुक्त करणें, (प्रकृति) सुधारणें.

**Restrain** (re-strān') [L. *re*, back, and *stringere*, to draw or bind tightly, or press together.] *v.t. to hold back, to check* दाबांत ठेवणें, आंवरणें, दाबणें, थांबविणें, आटोपणें, आवरता -आटपता धरणें -ठेवणें, लगामीं धरणें -ठेवणें, आळा *m* -आळाबांधा *m*. घालणें, निरोध *m* -निग्रह *m*. करणें. २ *to confine, to imprison* अटकेंत घालणें, बंदांत ठेवणें, बांधणें.

Restrain'able *a.* दाबांत ठेवण्यासारखा, आवरतां येण्यासारखा, आवरायाजोगा.

Restrain'ed *pa. t.* R. *pa. p.* दाबांत ठेवलेला, दाबलेला, आवरलेला, निगृहीत, नियंत्रित.

Restrain'er *n.* दाबांत ठेवणारा, आवरणारा, आटपता धरणारा, निग्रहकर्ता. २ अटकेंत घालणारा, बंदींत घालणारा.

Restrain'ing *pr. p.* and *v. n.* दाबांत ठेवणें *n*, &c.

Restraint' *n. restraining* दाबणें *n*, आवरणें *n*, निरोधन *n*, निग्रह *m*. (b) *being restrained* दाब *m*, दडपण *n*, आटोप *m*, आरेखा *f*, आळा *m*, आळाबांधा *m*, आळेबंद *m*, मर्यादा *f*, लगाम *m*. २ *confinement* (as of a lunatic) अटक *f*, कैद *f*, बंद *m*. [TO LIE UNDER R. अटकेंत पडणें, अटकेंत असणें.] ३ *reserve of manner* भीड *f*, संकोच *m*, दाब *m*, दबाव *m*, पडदा *m*, आडपडदा *m*. [TO FEEL UNDER R. भीड *f*. पडणें, भीड *f*. वाटणें *in. con.*, संकोच *m*. वाटणें.] ४ (in law) आसेध *m*. [R. OR LIMIT OF TIME कालासेध, R. OR LIMITATION OF PLACE स्थानासेध, R. FROM DEPARTURE प्रवासासेध, R. FROM EMPLOYMENT कर्मासेध.] ५ (लिहिण्यांत किंवा बोलण्यांत) नियमितपणा *m*, मर्यादा *f*.

Restrict (re-strikt') [See under Restrain.] *v. t. to keep within bounds* मर्यादित करणें, संकुचित करणें, मर्यादा *f* -हद्द *f* -इयत्ता *f* -परिमिति *f*. करणें -ठेवणें -घालणें, आरेखा *m* -आळा *m* -आळाबांधा *m*. करणें -घालणें, आरेखणें, नियमित करणें.

Restrict'ed *pa. t.* R. *pa. p.* मर्यादित, आळा घातलेला, नियमित. २ (in grammar, a word) योगरूढ.

Restric'tion *n.* (*act*) मर्यादित करणें *n*, मर्यादा घालणें *n*, आळा घालणें *n*. २ *that which restricts* मर्यादा *f*, आळा *m*, आळाबांधा *m*, इयत्ता *f*, परिमितता *f*, परिमिति *f*. (b) (*Pol. Eco.*) निरोध *m*, बंधन *n*, अट *f*.

Restrict'ive *a.* मर्यादित करणारा, आळाबांधा घालणारा, निरोधक, नियामक. [R. DUTY निरोधक जकात].

Result (rē-zult') [Fr. *resulter*, to rebound or leap back; also, to rise out of, to come out of; -L. *resultare*, to rebound or to leap back.] *v.i. to arise* (पासून) निघणें, (पासून) होणें -येणें -उत्पन्न होणें -उद्भव होणें -उद्भवणें, निपजणें, घडणें. २ *to follow as logical consequence* सिद्ध होणें, निघणें. ३ *to issue or end in* परिणाम *m* -शेवट *m*. होणें; as, "*Resulted* in a large profit." R. *n. consequence* परिणाम *m*, फल *n*, फळ *n*, निष्पन्न *n*, (of an examination) निकाल *m*. २ *formula given by calculation* सिद्धांत *m*, घटितार्थ *m*. ३ (*math.*) इच्छाफल *n*.

Result'ant *n.* (*mech.*) परिणामी प्रेरणा *f*, फलितप्रेरणा *f*. [R. FORCE फलितप्रेरणा *f*.]

Result'ed *pa. t.* and *pa. p.* of Result.

Result'ing *pr. p.* R. *a. consequent* (पासून) होणारा, (पासून) निघणारा.

Resum'able *a.* परत घ्यायाचा, परत घ्यायाजोगा जोगता. २ पुनः सुरू करण्याजोगा.

Resume ( rā-zū-mā' ) [Fr. L. *resumere*, to resume.] *n. a summary* गोषवारा *m*, संक्षेप *m*, थोडक्यांत सांगितलेला मजकूर *m*.

Resume ( re-zūm' ) [L. *re*, back and *sumere*, *sumptum*, to take.] *v. t. to get or take again or back* पुन्हां -परत -माघारा मिळवणें or घेणें; as, "To R. one's sway, seat, &c." २ *to begin again* फिरून -पुनः सुरू करणें, चालवणें; as, "House *resumed* work or its labours." [ To R. ONE'S DUTY कामावर हजर होणें, कामावर रुजू होणें, कामावर येणें. To R. PIPE पुन्हां चिलीम भरणें.] ३ *to recapitulate or summarize* गोषवारा *m*. सांगणें, थोडक्यांत सांगणें.

Resum'ed *pa. t.* R. *pa. p.* परत घेतलेला. २ फिरून सुरू केलेला.

Resum'er *n*. परत घेणारा. २ फिरून सुरू करणारा.

Resum'ing *pr. p.* परत घेणारा, &c.

Resump'tion *n*. पुनः परत मिळवणें *n*, परत घेणें *n*, माघारां घेणें *n*, पुनरंगीकार *m*, पुनर्ग्रहण *n*, पुनः स्वीकार *m*. २ पुनः सुरू करणें *n*, पुनः सुरवात *f*.

Resupinate ( re-sū'pin-āt ) [L. *resupinatus* -*resupinare*, to bend back, -*re*, back, and *supinus*, bent backwards. ] *a*. ( *bot.* ) *inverted, bottom up* व्यस्ततली ( पर्ण ); as, "R. leaf."

Resurgent ( re-sur'jent ) [ L. *re*, again and *surgere*, *surrectum*, to rise. ] *a*. *rising from the dead* मेलेला फिरून उठणारा, पुनरुत्थान झालेला.

Resurrec'tion *n*. *rising of Christ from the grave* ख्रिस्ताचें ( मरून ) फिरून उठणें *n*, ख्रिस्ताचें पुनरुत्थान *n*. ( b ) ख्रिस्ताच्या पुनरुत्थानाचा सण *m*. २ *rising again of men at the last day* न्यायदिनमृतोत्थान *n*, मेल्यावर पुनः उठण्याचा दिवस *m*, पुनः उठणें *n*.

Resuscitate ( re-sus'i-tāt ) [L. *re*, again, *sus*, up and *citare*, to rouse.] *v. i. to return to life* फिरून जीवंत होणें, संजीवन होणें, फिरून चेतना येणें. R. *v. t. to bring to life or vigour again* फिरून जीवंत करणें, फिरून सजीव करणें, जीव *m*. आणणें, उज्जीवन *n* -संजीवन *n*. करणें *g. of o.*

Resuscita'tion *n*. फिरून जीव आणणें *n*, संजीवन *n*, शुद्धीवर आणणें, सावध करणें *n*, हुशार करणें *n*.

Resus'citative *a*. *bringing to life again* फिरून जीव आणणारा, संजीवन करणारा.

Retail ( re-tāl' ) [Fr. *retailler*, to cut again -L *re*, again and *tailler*, to cut. ] *v. t. to sell ( goods ) by retail* किरकोळ विकणें, फुटकळ विकणें, किरकोळ विक्री *f* -फुटकळ विक्री *f*. करणें *g. of o.* २ *to relate details of* कच्ची हकीकत सांगणें, साद्यंत सांगणें -वर्णन करणें; as, "To R. slander." R. *v. i. to be sold at retail price* किरकोळ -फुटकळ विकणें (विकला जाणें). R. *n. sale of goods in small quantities* किरकोळ विक्री *f*, फुटकळ विक्री *f*, खंडविक्रय *m*. [ By R. किरकोळ, फुटकळ. ] R. *a*. किरकोळ, फुटकळ.

Retail-dealer *n.* Same as Retailer.

Retail'ed *pa. t.* R. *pa. p.* किरकोळ विकलेला, फुटकळ विकलेला.

Retail'er *n.* फुटकळ व्यापारी *m*, किरकोळ विकणारा.

Retail'ing *pr. p.*

Retain ( re-tān' ) [Fr. *retain* –L. *re*, back and *tenere*, to hold.] *v. t. to continue holding* ठेवणें, धरणें, राखणें, न सोडणें, न टाकणें, धरून असणें -वसणें. २ *to secure the services of, to engage* ( वकील बॅरिस्टर वगैरे) अडकवून टाकणें, गुंतवून ठेवणें. (b) पदरीं ठेवणें, जवळ ठेवणें, मुशारा *m* -चेतन *n.* देऊन ठेवणें.

Retain'ed *pa. t.* and *pa. p.* of Retain.

Retain'er *n.* ठेवणारा, राखणारा, राहवून घेणारा. २ *a dependant, a follower* पदरचा माणूस *m*, जवळचा माणूस *m*, आश्रित, अनुजीवी *m.* [ Body of R.s परिवार *m*, लवाजमा *m.*] ३ *a retaining fee* (बॅरिस्टर, वकील वगैरेंस) गुंतवून ठेवण्याकरितां दिलेला बयाणा *m.*

Retain'ing *pr. p.*

Retaining fee *n.* Same as Retainer ३.

Retaliate ( re-tal'i-āt ) [ L. *re*, in return, *talio*, *talionis*, like for like -*talis*, of such a kind.] *v. t. to pay like for like* (esp. evil) उलट करणें, परत करणें -देणें, उलट *f* -परत *f* -फेड *f.* करणें *g. of o.*, फेडणें, उसनें उगविणें -फेडणें *g. of o.*, उट्टें *n.* काढणें -घेणें -उगविणें *g. of o.* (b) जशास तसें करणें. २ (*Pol. Eco.*) *to impose duties on imports from foreign State in return for its import duties* (आपल्या देशांतून जाणाऱ्या मालावर बसविलेल्या जकातीबद्दल परदेशांतून येणाऱ्या मालावर) उलट जकात बसविणें.

Retalia'ted *pa. t.* R. *pa. p.* उलट केलेला, उट्टें काढलेला, उसनें फेडलेला, बदला घेतलेला, उलट जकात बसविलेला.

Retalia'tion *n.* (*act*) बदला घेणें *n*, उलट करणें *n*, उसनें फेडणें *n*, जशास तसें करणें; (*state*) बदला *m*, सूड *m*, फेड *f*, प्रत्यपकार *m.* [ Policy of R. जशास तसें वागण्याचें धोरण *n*, जशासतसेंचें धोरण *n*, उलट जकातीचें धोरण *n.*]

Retalia'tionist *n.* जशास तसें या तत्त्वाचा पुरस्कर्ता. २ उलटजकातवादी.

Retard (re-tard') [Fr. *retard* -L. *re*, back and *tardus*, slow.] *v. t. to make slow, to hinder* कमी करणें, ढिला -हलका करणें -पाडणें, वेग *m.* उणा -मंद करणें *g. of o.*, मंदता *f.* आणणें, मंदगति करणें -करविणें *g. of o.* २ *to put off, to postpone* लांबणीवर टाकणें. ३ (physical phenomenon) *to happen behind normal time* (ठरलेल्या वेळेच्या) पाठीमागून घडविणें.

Retarda'tion *n.* मंद करणें, कमी करणें *n.* २ वेगक्षीयमाणता *f*, वेगऱ्हास *m.* (b) क्षीयमाणान्तर *n.*

Retard'ed *pa. t.* R. *pa. p.* वेग कमी केलेला. २ (phys.) क्षयीभूत.

Retard'er *n.* वेग कमी करणारा. Retard'ing *pr. p.*

**Retch** (rech) [A. S. *hræcan*, to hawk.] *v. i. to try to vomit* ओकारी *f* -ओकारा *m* -ओ *f* -काढणें, ओकारी -etc. येणें *in. con.*

**Reten'tion** *n. the act of retaining* ठेवणें *n*, राखणें *n*, धरणें *n*. २ पदरीं ठेवणें *n*, जवळ ठेवणें *n*, etc. ३ *med.* अवरोध *m*. ४ (mental) धारणा *f*, धारणाशक्ति *f*.

**Retent'ive** *a. able to retain* (esp. memory) धारणेचा, धारणाशक्तिविशिष्ट, धड, दृढ. [R. MEMORY मेधा *f*.]

**Retent'iveness** *n.* मेधाविता *f*, धारणाशक्ति *f*.

**Ret'icence** *n. reserve in speech* भिडस्त स्वभाव *m*, घुमेपणा *m*. २ *concealment by silence* स्तब्धपणानें मनांतील विचार लपविणें *n*, मुग्धता *f*, स्तब्धता *f*, न बोलणें *n*.

**Reticent** (ret'i-sent) [L. *re*, again and *tacere*, to be silent. Reticent शब्दाचा धात्वर्थ 'स्तब्ध राहून मनांतील विचार लपविणारा' असा आहे.] *a. reserved in speech* कमी बोलणारा, न बोलणारा, घुम्या, भिडस्त, स्तब्ध, मुग्ध.

**Ret'icently** *adv.* स्तब्ध राहून. २ घुमेपणानें.

**Reticula'tion** *n. network* जाळी *f*, जाळीचें काम *n*, जाळीदार काम *n*, जाळें *n*.

**Retic'ular, Retic'ulated** *a. made in the form of network* जाळीदार, जाळीचा, जालाकार.

**Reticule** (ret'i-kūl) [L. *reticulum*, dim of *rete*, a net.] *n. a lady's small hand-bag* (*orig. of network*) जाळीदार पिशवी *f*. (ही बहुतकरून युरोपीयन बायकांच्या हातांत असते.)

**Reticulum** (reti-k'ūlum) [L. *rete*, net, and cule.] *n. ruminant's second stomach* (रवंथ करणाऱ्या प्राण्याचें) द्वितीय कोष्ठ *n*, दुसरी पिशवी *f*. २ *a net-like structure* जाळी *f*, जाळीदार अंतस्त्वचा *f*, जालरूप त्वचा *f*.

**Reticulum** (reti-k'ūlum) [L. Reticulus. Rhomboidalis, E. Rhomboidal Net.] *n.* जालक *f*. ही राशि दक्षिणगोलार्धांत आहे.

**Retiform** (ret'i-form) [L. *rete*, a net and *forma*, form.] *a. net-like, reticulated* जालरूप, जालाकार, जालवत्, जालसदृश, जाळ्यासारखा.

**Retina** (ret'i-na) [L. *rete*, a net.] *n. layer at back of eye-ball sensitive to light* नेत्रचतुर्थपटल *n*, (डोळ्यांतील) दृक्षजामंडल *n*, नेत्रदर्पण *m*, नेत्रादर्श *m*.

**Retinitis** (reti-nī'tis) *n.* (*med.*) दृक्षजामंडलाचा दाह *m*, दृक्षजामंडलदाह.

**Retinoscopy** (reti-nos'kō-pi) *n.* दृक्षजामंडलदर्शन *n*, नेत्रदर्शकयंत्रानें दृक्षजामंडल पाहणें *n*.

**Retinue** (ret'i-nū) [See Retain.] *n. a body of attendants* परिवार *m*, लवाजमा *m*, सवारी *f*, स्वारी *f*, जिलीब *f*. [LIGHT R. सडी सवारी *f*.]

**Retire** (re-tīr') [Fr. *retirer* -*re*, back and *tirer*, to draw.] *v. i. to go away, to withdraw* जाणें, उठून जाणें, निघून जाणें. २ *to retreat* मागें सरणें, मागें घेणें,

हटणें, काढतें घेणें, सरकतें घेणें, मागें होणें, माघारा घेणें. (b) उमेदवारांतून नांव कमी करणें. ३ *to seek seclusion* एकांतवास *m.* करणें, विविक्तवृत्ति *f.* धरणें -सेवणें. [ To R. FROM THE WORLD एकांतवास *m.* पत्करणें. To R. INTO ONESELF जगाशीं संबंध सोडून देणें. ] ४ *to go to bed* निजणें, निजावयास जाणें, झोंपावयास जाणें. [ RETIRING ROOM झोंपण्याची खोली *f.* २ हातपाय धुण्याची खोली *f.* ] ५ *to give up office or employment* नोकरी (पुरी करून) सोडणें, घरीं बसणें, रोजगार *m* -सरकारी चाकरी *f.* सोडणें, स्वस्थ बसणें. R. *v. t.* (नोकरीचा) राजीनामा द्यावयास भाग पाडणें; as, "Was compulsorily *retired* as incompetent."

Retir'ed *pa. t.* R. *pa. p.* (R.) उठून गेलेला, निघून गेलेला. २ मागें सरलेला, हटलेला, माघार घेतलेला. ३ *secluded* एकांताचा, विविक्त, विविक्तवासाचा, आडवळणी, आडवळणाचा. [A R. SPOT विजनस्थान *n*, आडवळण *n*, विविक्त स्थळ *n.* ] ४ निजलेला, निजावयास गेलेला. ५ (पुरी नोकरी करून) पेन्शन घेतलेला, पेन्शनर, सरकारी नोकरी सोडलेला. [ R. PAY पेन्शन. RETIRED LIST पेन्शनर हपीसरांची यादी.]

Retir'ement *n.* (*act*) निघून जाणें *n.* २ मागें सरणें *n*, हटणें *n*, माघार घेणें *n.* ३ विविक्तवाससेवन *n*, विविक्तवृत्तिसेवन *n.* ४ घरीं बसणें *n*, रोजगार सोडणें *n.* ५ निजणें *n.* ६ *seclusion, privacy* एकांत *m*, एकांतवास *m.* (b) विविक्तवृत्ति *f.* ७ *secluded place* एकांतस्थल *n*, एकांतस्थान *n.*

Retir'ing *pr. p.* R. *a. reserved, shy* संकोचवृत्ति, संकोची, संकोचाचा. २ एकांतवासाचा, एकांतप्रिय, एकांतसेवी, विविक्तसेवी. ३ नोकरी सोडल्यावरचा. [ R. PENSION भर पेन्शन. ]

Retort (re-tort') [ L. *retortum* pa. p. of *retorqueo* -*re*, back and *torquere*, to twist. ] *v. t.* and *i. to requite in kind* (*insult, humiliation*) परतणें, परत देणें, उलट *f.* करणें. २ *to make, or say by way of, repartee* उलट टोला देणें, उत्तरास प्रत्युत्तर करणें, टोमणा मारणें. R. *n. a ready and smart answer* टोमणा *m*, परत टोला *m*, उलटजबाब *m*, फेरजबाब *m*, फेरगोष्ट *f.*

Retort' *n.* (*chem.*) *a vessel used for distilling* ऊर्ध्वपातनयंत्र *n*, बकपात्र *n.* [ GLASS R. काचबकपात्र *n.* ]

Re-touch (rē-tuch') [L. *re*, again, and Touch.] *v.t. to improve, as a picture, by new touches* (नवीन छटा देऊन) सुधारणें *n*, दोष काढून टाकणें, निर्दोष करणें, (-वर) संस्कार करणें. २ (*photo.*) हातानें (फोटोची उलट प्रतिमा) सुधारणें, निर्दोष करणें, (-वर) संस्कार करणें. ३ (कमीजास्त करून निबंध वगैरे) सुधारणें, निर्दोष करणें. R. *n.* संस्कार *m*, रंगाची छटा देणें *n.*
Retouch'ing *n.* रंगाची छटा देणें *n.* २ निर्दोषीकरणें *n.*

Retrace (re-trās') [ L. *re*, back and Trace. ] *v. t. to trace back* (one's steps, etc.) परत जाणें -येणें. (b) परत -उलट (मूळापर्यंत) जाणें. २ (वंशपरंपरा

-वंशवृक्ष ) उलट पहात जाणें. ३ ( रूपरेषा ) पुन्हां रेखाटणें. ४ ( धडा, व्याख्यान, वगैरे ) मनांत घोळवणें. ५ ( विषयांतून ) पुन्हां जाणें.

Retract (re-trakt') [ L. *re*, back, and *trahere*, to draw. ] *v. t. to draw back* आंत ओढणें, आंत ओढून घेणें, प्रतिकर्षण करणें. २ *to withdraw* ( one's words ) परत घेणें, ( परत ) फिरविणें, माघारां घेणें, बोलणें फिरवणें, बोलणें परत घेणें, उलट *f.* खाणें.

Retract' *v. i.* आंखडणें, आंखूड होणें, प्रतिकृष्ट होणें, मागें जाणें. २ ( बोलणें ) परत घेणें, फिरणें,

Retracta'tion, Retrac'tion *n.* ( बोलणें ) परत घेणें *n*, फिरवणें *n*, माघारां घेणें *n*. २ ( *med.* ) ( कापलेलें मांस ) आंखडणें *n*, प्रतिकर्षण *n*. ३ प्रतिकृष्ट स्थिति.

Retract'ed *pa. t.* R. *pa. p.* परत घेतलेला, मागें घेतलेला. २ आंखडलेला, मागें गेलेला.

Retract'ile *a.* ( animal's claws, &c. ) *able to be drawn back* मागें खेंचतां किंवा ओढतां येण्यासारखा, प्रतिकर्षणीय.

Retract'or *n.* ( *med.* ) ( शस्त्रप्रयोगामध्यें ) घावाच्या कडा ओढून धरणारें शस्त्र *n*, प्रतिकर्षणी *f*, कर्षणी *f*. २ ( शस्त्रप्रयोगाच्या वेळची ) भाळी *f*. ३ प्रतिकर्षक स्नायु *m*. ४ बोलणें परत घेणारा *m*.

Retreat (re-trēt') [O. F. *retret* –L. *retractus* pa. p. of *retraho.*] *v. i. to draw back* मागें सरणें, मागें जाणें, हटणें, फिरणें, परतणें, उलटणें, पाठमोरा होणें, मागें होणें, माघार घेणें, काढतें -कसरतें घेणें. २ *to withdraw to a place of shelter* आश्रय *m*. करणें, आस्रा *m*. करणें. R. *n. a withdrawal* मागें जाणें *n*, मागें सरणें *n*, मागें होणें *n*. २ *a solitary place* एकांताचें स्थान *n*, एकांतवासाचें स्थल *n* -घर *n*. ३ *a refuge* आस्रा *m*, आश्रय *m*, आश्रयस्थान *n*. ४ ( in army ) *a signal to retire* परतण्याचा बिगूल *m*.

Retrench ( re-trensh' ) [ Fr. *re*, and *trencher*, to cut. ] *v. t. to curtail, to cut short* छाटणें, काटणें, तोडणें, छाटाछाट करणें, कमी करणें. [To BE RETRENCHED कटणें. ] Retrench'ment *n. economy* छाटणें *n*, कापणें *n*, छाटणी *f*, काटकसर *f*. २ *reduction in expenditure* छाटाछाट *f*.

Re-trial ( rē-trī'al ) *n.* ( *law* ) फेरचौकशी *f*.

Retribution ( ret-ri-bū'shun ) [ L. *retributio* -*retribuo*, I give back -*re*, back and *tribuere*, to give.] *n. recompense for evil* (दुष्कर्मांचें) प्रतिफल *n*.

Retrib'utive, Retrib'utory *a.* प्रतिफलाचा, प्रतिफलदायक, प्रतिफलद, प्रतिफलात्मक, दुष्कर्मांचें पारिपत्य करणारा, दुष्कर्मफलदायी. २ *just or welldeserved* योग्य ( शासन ).

Retrieve ( re-trēv' ) [O. F. *retruver*, Fr. *retrouver* -*re*, again and *trouver*, to find.] *v. t. to restore, to gain back* परत मिळविणें; as, "To R. prestige, independence." २ ( नुकसान ) भरून काढणें. Retriev'able *a. able to be retrieved* परत मिळविण्या

सारखा. २ भरून काढण्यासारखा. Retriev'al *n. the act of retrieving* परत मिळविणें *n.* २ भरून काढणें *n.*

Retriev'er *n. a dog trained to find, and bring in game that has been shot* मारलेली शिकार शोधून आणणारा कुत्रा *m.*

Retrocession ( rē-tro-sesh'-un ) [ Fr. -L. *retro* + *cedere, cessum,* to go.] *n. a moving backwards* परतणें *n,* परत जाणें *n,* उलटणें *n,* प्रतिगमन *n.* २ (मुलूख) परत देणें. ३ ( *med.* ) प्रतिगमन *n.*

Retroflexion ( rē-tro-flek'shun ) [ L. *retro,* backwards, and *flectere,* to bend. ] *n.* ( *med.* ) मागें वांकणें *n,* पश्चान्नमन *n.*

Retrograda'tion *n.* ( *astron.* ) *apparent backward motion of a planet in zodiac* वक्रीगति *f,* वक्रगमन *n,* वक्रगामित्व *n.*

Retrograde ( rē'-tro-grād ) [ L. *retrogradus-retro,* backward, and *gradior, gressus,* to go. ] *a. in or showing retrogradation* वक्र, वक्रगति, वक्रगामी, वक्रींचा. [ R. MOTION वक्रगति *f,* पश्चाद्गति *f.* ] २ *directed backwards* परागतिक, परागतीचा, परतणारा, उलटणारा, परत जाण्याचा, उलट जाण्याचा, प्रतिगामी, प्रतिगमनाचा, प्रतीप. ३ *declining* उलटा, उलट्या क्रमाचा, उतरत्या पायाचा, खचत्या पायाचा, माघार येण्याचा, अपकर्षाचा, ऱ्हासाचा, नाशाचा. R. *v. i. to show retrogradation* वक्री जाणें -येणें -असणें. २ *to move backwards* मागें होणें, परत -माघारा जाणें -येणें, परतणें, उलटणें, मागल्या पायीं -मागल्या पावलानें जाणें, प्रतिगमन *n.* करणें. ३ *to decline* उतरता पाया लागणें -असणें, अपकर्ष होणें.

Re'trogradely *adv.* परत, वक्री.

Re'trogress *v. i. to move backwards* मागें जाणें, परतणें, उलटणें, मागल्या पायीं जाणें. २ *to deteriorate* खचणें, खचता पाया लागणें -असणें, अपकर्ष होणें.

Retrogres'sion *n.* ( *astron.* ) वक्रगति *f,* वक्रीगति *f.* २ *backward movement* मागें जाणें *n,* उलटणें *n,* परतणें *n,* मागल्या पायीं जाणें *n.* ३ *deterioration* खचणें *n,* अपकर्ष *m,* खचता पाया *m.*

Retrogres'sive *a.* मागें जाणारा, परत जाणारा.

Retro-pharyngeal *a.* (*med.*) (abscess) घशाचे मागचे बाजूस होणारा ( विद्रधि ), सप्तपथप्रत्यग् ( विद्रधि ).

Retrospect ( rē'tro-spekt ) [ L. *retrospectus,* pa. p. of *retrospicio-retro,* back, and *specere,* to look. ] *n. a survey of past time or events* मागें पाहणें *n,* मागलें पाहणें *n,* मागल्याचा विचार *m,* मागला विचार *m,* गतावलोकन *n,* गतकालावलोकन *n,* सिंहावलोकन *n.* Retrospec'tion *n.* सिंहावलोकन *n.*

Retrospect'ive *a. proceeding by retrospection* सिंहावलोकन करणारा, मागें पाहणारा, गतावलोकनकर्ता. (b) सिंहावलोकनाचा, गतकालावलोकनाचा. २ *having application to the past* मागल्यास लागू पडणारा -पडायाचा, गतकालापेक्षक, गतकालापेक्षी, भूतकाल-सापेक्ष.

Retro-vaccination *n.* मनुष्याचे अंगावरील लस पुनः गाईवर घालणें *n.*
Retroversion (rētro-vėr'shun) *n.* (*med.*) (गर्भाशयाचें) मागें पडणें *n*, पृष्ठतःस्थलांतर *n.*
Return (rē-turn') [Fr. *retourner -re*, back, and *tourner*, to turn.] *v. i.* *to come or go back* परत जाणें, परत येणें, माघारां -फिरून जाणें -येणें, जाऊन येणें, पुनरागमन *n.* करणें, उलट येणें, उलट जाणें; as, "To R. to a subject; To R. to one's old habits." २ *to say in reply, to retort* प्रत्युत्तर करणें, उलट जबाब देणें. R. *v. t.* *to give or pay back* परत देणें, परत करणें, फेडणें, फेड *f.* करणें; as, "To R. a borrowed sum." २ *to send back* परत देणें, परत करणें, परत पाठविणें, माघारां पाठविणें -देणें; as, "To R. a ball in Tennis." ३ *to give in requital* परत देणें, परत करणें, फेडणें, उलट -फेड करणें, प्रतिफल देणें, प्रतिदान करणें; as, "To R. like for like." ४ *to state officially* (निकाल सांगून) परत पाठविणें, निकाल सांगणें; as, "They were all *returned* guilty." ५ (वरिष्ठ अधिकाऱ्याकडे) तक्ता -यादी -रिपोर्ट -आंकडे पाठविणें. ६ (of constituency) *to elect as M. P.* (पार्लमेंटचा सभासद) निवडून पाठवणें, निवडणें. ७ (Bible) *to bring back and make known* परत नेणें, परत कळविणें.
Return' *n.* *coming back* परत येणें *n*, परत जाणें *n*, जाऊन येणें *n*, पुनरागमन *n.* [By R. of post उलट टपालीं.] २ *profit of an undertaking* फायदा *m*, प्राप्ति *f*, उत्पन्न *n*, मिळकत *f*, पैदास्त *f*, किफायत *f*, उपज *f*, लाभ *m.* ३ *giving, paying or sending back* परत देणें *n*, परत करणें *n*, परत पाठवणें *n*, फेडणें *n*, फेड *f*, प्रतिदान *n.* ४ *thing returned or given back* परत दिलेली वस्तु *f*, उसनें वाण *n*, घेवाण-देवाण *n.* [In R. for बद्दल, मोबदला.] ५ *report* पत्रक *n*, रिपोर्ट *m*, *pop.* आंकडे *m. pl*; as, "Plague *returns*." [Tabular R. तक्ता *m.* Blank R. डौलापत्रक *n.*] ६ *candidate's election as M. P.* (पार्लमेंटच्या सभासदाची) निवडणूक *f*; as, "Secured his R." ७ (law) बजावणीचा दाखला.
Return'able *a.* परत करण्याजोगा, परत करण्यास योग्य, परत देण्याजोगा.
Return crease *n.* उलटरेघ.
Return'ed *pa. t.* R. *pa. p.* परत आलेला, माघारां आलेला, परतलेला, परत केलेला, परत दिलेला, फेडलेला.
Return'er *n.* परत येणारा *m*, परत करणारा *m*, परत देणारा *m*, &c.
Return'ing *v. n.* परत येणें *n*, परत देणें *n*, परत करणें *n*, &c. R. *pr. p.* परत येणारा, परत देणारा, फेडणारा, &c. [R. officer निवडणुकीचा अधिकारी *m.*]
Return-match *n.* परतीचा सामना *m.*
Return-ticket *n.* (परतीचें) परत तिकीट *n*, जाऊन येण्याचें तिकिट *n.*
Retuse (rē-tus') [L. *retusus -retundere*, to blunt.] *a.* (*bot.*) (*of a leaf*) *with broad end and central*

*depression* मध्यें निम्न व अग्राला स्थूल असें (पान), निम्नस्थूल.

Re-union (rē-ūn'yun) [Fr. *reunion* -*re* and Union.] *n. a meeting of persons again after separation* पुनः एके ठिकाणीं होणें, पुनः एकत्र जमणें *n*, पुनः भेटणें *n*, पुनर्भेट *f*, पुनर्योग *m*, पुनर्मेलन *n*, पुनःसंयोग *m*. २ पुनः अविभक्त कुटुंबांत राहणें.

Re-unite (rē-ū-nīt') [L. *re*, again and Unite.] *v. t.* पुनः एकत्र करणें. R. *v. i.* पुनः भेटणें, पुनः संयोग होणें. २ (*law*) पुनः अविभक्त कुटुंबांत राहणें.

Re-vaccination *n.* पुनः देवी टोंचणें *n*, पुनः देवी काढणें *n*.

Reveal (re-vēl') [Fr. *reveler* –L. *revelo-re*, reversal, and *velo*, I veil,-*velum*, a veil. धात्वर्थः 'पडदा काढून टाकणें.'] *v. t. to disclose* (गुप्त गोष्ट) फोडणें, सांगणें, कळवणें, वदणें. २ *to show* दाखवणें, बाहेर पडूं देणें, बाहेर आणणें. ३ *to make known by inspiration* (अंतःस्फूर्तीनें) प्रगट करणें, उघड करणें, प्रकाश *m* -प्रसिद्धि *f*. करणें *g. of o.*, आविष्करण *n*. करणें. Reveal'able *a.* फोडण्यासारखा, सांगण्यासारखा, कळवण्यासारखा. २ प्रगट करण्यासारखा, आविष्करण करण्यासारखा, आविष्करणीय.

Revealable, See under Reveal.

Reveal'ed *pa. t.* R. *pa. p.* फोडलेला, सांगितलेला. २ प्रगट केलेला, प्रसिद्ध केलेला, आविष्कृत. [To BE R. प्रगट होणें. R. RELIGION प्रगट केलेला धर्म *m*, ईश्वरप्रणीत धर्म, अपौरुषेय धर्म (of the Hindus).] Reveal'er *n*. Reveal'ing *pr. p.* & *v. n.* Revela'tion *n.* (*act*) फोडणें *n*, सांगणें *n* २ प्रगट करणें, उघड करणें *n*, प्रगटविणें, आविष्करण *n*, प्रकटीकरण *n*. ३ (*philos.*) *knowledge disclosed to man by divine agency* (ईश्वरानें स्वतः) प्रगट केलेलें ज्ञान *n*, (of the Hindus) श्रुति. ४ (with capital R) *the last book of the New Testament* नव्या करारांतील रिव्हीलेशन पुस्तक *n*. ५ *a striking disclosure* आश्चर्यकारक गोष्ट *f*, कधीं न ऐकलेली गोष्ट *f*; as, "It was a R. to me." Revel'ationist *n. believer in divine revelation* अपौरुषेयवादी, धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत आहेत असें मानणारा *m*. (b) सर्व धर्म ईश्वरानें प्रगट केले आहेत असें मानणारा, प्रकटीकरणवादी.

Reveille (rā-vel'yā) [Lit. 'awake', Fr. *re*, again and *veiller* -L. *vigilare*, to watch. See Vigil.] *n. military waking signal sounded in morning on bugle or drums* सकाळचा (उठविण्याचा) बिगूल *m*.

Revel (rev'el) [Fr. *revel*-L. *rebello*, I rebel.] *v. i. to feast noisily* (दारू पिऊन) धिंगामस्तीची चैन करणें, धिंगामस्ती करणें, आरडाओरडीचें जेवण करणें, खाऊनपिऊन मस्ती करणें, मौजा *f. pl.* मारणें. (b) बहर *f.* मारणें -उडवणें. Rev'eller *n.* खाऊनपिऊन मस्ती करणारा *m*, धुमश्चक्री करणारा, मौजा मारणारा, बहर मारणारा, चैनबाजी करणारा. Rev'elled *pa. t.* and *pa. p.* Rev'elling *pr. p.* and *v. n.* खाऊनपिऊन

मस्ती करणें *n*, चैनबाजी करणें *n*, मौज मारणें *n*. Rev'elry *n. loud or noisy feasting or merriment* रंग *m*, (खाऊनपिऊन) धिंगामस्ती करणें *n*, चंगळ *f*, धुमाळी *f*, धुमाकूळ *m*, रंगलूट *f*, ख्यालीखुशाली *f*.

Revelation, Revelationist, See under Reveal.

Revenge (re-venj') [L. *re*, in return, and *vindicare*, to lay claim to.] *v. t. to avenge, to take vengeance* सूड *m*. घेणें, दावा *m* -द्वेष *m* -वैर *n* -सूड *m*. उगवणें, उसनें *n*. घेणें -उगवणें -फेडणें *g. of o.*, उट्टें *n*. घेणें -उगवणें -काढणें *g. of o.*, वैरसाधन *n* -वैरप्रतिक्रिया *f*. करणें. [TO THREATEN TO R. मिशांवर ताव देणें.] R. *n*. सूड *m*. घेणें *n*, सूड *m*. उगवणें *n*, वैरप्रतिक्रिया *f*, वैरनिर्यातन *n*. २ सूड *m*, बदला *m*. ३ सूड घेण्याची वृत्ति *f*, सुडाची प्रवृत्ति *f*. ४ (in games) *opportunity given for reversing former result by a return game* डावाची संधि *f*, बदल्याचा डाव *m*; as, "To give one his R." Revenged' *pa. t.* R. *pa. p.* सूड उगवलेला, वैर साधलेला, उट्टें काढलेला, etc. Revenge'ful *a. vindictive* सूड घेणारा, अकसखोर, अकसी, खुनशी, दंशी, कुढा, कुन्हेदार. Some terms for a revengeful person are काळा साप, कृष्णसर्प, डोंब्यानाग, डोंब्यासाप, मुकी मण्यार. Revenge'fully *adv.* सूड घेण्याच्या बुद्धीनें, अकसानें, खुनसानें, अकशीपणानें. Revenge'fulness *n*. सूड घेण्याची बुद्धि *f*, अकसीपणा *m*, खुनसीपणा *m*, डंशीपणा *m*, प्रत्यपकारबुद्धि *f*. Reveng'er *n*. सूड घेणारा, सूड उगवणारा, दावा उगवणारा, उसनें फेडणारा, वैर साधणारा.

Revenue (rev'en-ū) [Lit. 'that which comes back', Fr. *revenue*, pa. p. of *revenir*, to return -L. *revenire* -*re*, back and *venio*, I come.] *n. State's annual income* जमा *f*, जमाबंदी *f*, वसूल *m*, जमावसूल *m*, महसूल *m*, तहसील *f*, कमाविशी *f*, कमावीस *f*, loosely वसूलवासूल. (b) अदा *m*, आय *m*, उत्पन्न *n*. २ *department of civil service collecting revenue* जमाबंदीखातें *n*. ३ (*pl.*) उत्पन्नाच्या रकमा *f. pl.*, उत्पन्नाच्या ठोकळ बाबी *f. pl.*

*N. B.*—The terms, given below, belonging to Revenue are quoted from Candy's Dictionary. Some of them have become obsolete, while others are on their way to becoming so. However, we have retained them in our book for their historico-linguistic interest.

Arrears of R. due through a course of years सनवाद बाकी *or* सनवात बाकी *f*, पुष्कळ वर्षांची तुंबलेली बाकी. Assignment for pay on the R. तनखा *m*, बरात *f*, वरात *f*. Balance due of the R. वसूलबाकी *f*. Collection of the R. कमावीस *f*, कमाविसी *f*, कमाविसदारी *f*, तहसील *f*, मामलत *f*, खोतकी *f*. Collection of R. due from the ryots तळाटी, तळाठी *f*. Collector of R. कमावीसदार,

तहसीलदार, वसूलदार, मामलेदार, खोत. Extra R. खेरीज जमा *f.* Fixed and regular R. ऐन जमा *f*, ऐन जमाबंदी *f.* Full R. भरवसूल *m.* General abstract of R. तरजमा *m.* Grain-R. वसुली गल्ला *m.* Gross R. भरजमा *f*; भरवसूल *m.* Net R. वसुली बेरीज *f*, नक्की वसूल. Maximum of the R. कमाल *n*, कमाल वसूल *m.* Of or belonging to the R. महसुली, वसुली. One employed in collection of R. वसुली, वसुल्या. Remission of R. सूट *f*, एहसान *n.* R. and disbursements जमाखर्च *m.* R. from the soil काळीचा वसूल *m*, काळीचा पैका *m.* R.-police सिबंदी *f.* R.-survey पाहणी *f.* R.-surveyor पाहणदार *m*, पाहणीदार *m*, पाहणी कामदार, पाहणी कारकून. R.-survey-report पहाणखरडा *m.* Settlement of the R., *assessment of lands*, &c. जमाबंदी *f.* Sum in commutation of R. in kind तसर *n.* That has an assignment on the R. वरातदार. That yields good R. वसुली. That yields full R. भरवसुली. The actual or realized R. वसुली जमा *f.* To collect R. वसूल *m.* करणें. Some other terms relating more or less closely to *revenue* are इनाम, इस्तावा, कच्ची वहिवाट, कमलावणें, कमाल, खेरीज जमा, खेरीज सक्ता, खोटवेरा, खोतखराबा, गांवनिसबत, चिल्हेर, चिल्लर, झाडपट्टी, टकबंदी, तसर, तुसारपट्टी, तोटापट्टी, भरलावणें, मजरादास्त, सालबंदी, सोस्ता, जारी, जारी अम्मल, जारी चिट्ठा.]

Reverberate (re-vėr'bėr-āt) [Lit. 'to beat back', L. *re*, back and *verbero - verbatus*, to beat -*verber*, a lash.] *v. t.* *to return, to beat back* परत करणें, माघारविणें, उलटविणें, प्रतिप्रक्षेप *m.* करणें *g. of o.*; as, "Flame is *reverberated* in a furnace." २ *to echo* प्रतिध्वनि *m.* करणें, प्रतिशब्द *m.* करणें. R. *v. i.* *to be beaten back* परत येणें, उलटून येणें. (b) (of sound) प्रतिध्वनि होणें *g. of s.* २ *to resound* गाजणें, दुमदुमणें. Reverbera'tion *n.* (*act*) परत करणें *n*, प्रतिप्रक्षेप *m*, प्रतिप्रक्षेपण *n.* २ *echo* प्रतिध्वनि *m*, प्रतिनाद *m*, प्रतिगर्जन *n*, प्रतिध्वनन *n*, प्रतिगर्जना *f.* Rever'berative *a.* प्रतिप्रक्षेपक, परत पाठविणारा. (b) प्रतिध्वनि करणारा, प्रतिध्वनिकारक, दुमदुमणारा. Rever'beratory *a.* (of furnaces for smelting) *having the flame beaten back from the roof on to the metal* धातूवर ज्वाळा परत पाठविणारी (भट्टी).

Reverberation, See under Reverberate.

Revere (re-vēr') [Fr. *reverer* –L. *re*, and *vereor*, I feel awe or reverence.] *v. t.* *to venerate* पूज्य मानणें, पवित्र मानणें, पूज्यबुद्धीनें मानणें, आदर करणें, बूज *f* -भीड *f* -थोरपणा *m* -आदर *m* -मान *m.* राखणें -ठेवणें *g. of o.*, भीड *f.* धरणें *g. of o.*, पूज्यबुद्धि दाखविणें, पूज्यबुद्धि व्यक्त करणें, सत्कार करणें.

Rev'erence *n.* *respectful awe* (थोरांविषयीं) पूज्यबुद्धि *f*, आदर *m*, दबाव *m*, श्रद्धा *f*, सत्कार *m*, आदरबुद्धि *f*,

उपास्यबुद्धि *f*, भीड *f*, दबदबा *m*; as, "To hold in R.; The rising generation lacks R." [TO LOSE ONE'S R. FOR आदरबुद्धि नष्ट होणें. WITH PROFOUND R. अतिशय पूज्यबुद्धीनें. WORTHY TO BE REGARDED WITH PROFOUND R. शिरसा वंद्य, शिरसा मान्य. ] २ *act of revering or obeisance* नमस्कार *m*, प्रणाम *m*. [ R. WITH ALL THE MEMBERS OF THE BODY शिरसाष्टांग नमस्कार *m*, शिरसाष्टांग दंडवत *m*.]

Rev'erence *v. t.* पूज्य मानणें, पूज्यबुद्धि ठेवणें.

Rev'erenced, Rever'ed *pa. p.* पूज्य मानलेला, बूज राखलेला, आदर ठेवलेला, आदृत, सत्कारित, उपासित.

Rev'erend *a. worthy of reverence* पूज्य, पूजनीय, पूजार्ह, वंद्य, श्रेष्ठ, वंदनीय, आदरणीय, मान्य, माननीय. [Abbr. Rev. (of clergyman); Very R. (of dean); Right R. (of bishop); Most R. (of archbishop); THE R. GENTLEMAN, *the clergyman in question* उल्लेख केलेला उपाध्याय *m*.] २ *of the clergy* उपाध्यायाचा, उपाध्यायवर्गाचा; as, "R. utterances."

Rev'erent *a.* आदराचा, पूज्यबुद्धीचा, आदर व्यक्त करणारा; as, "R. words, R. behaviour." २ आदरभाव उत्पन्न झालेला, आदरभावयुक्त; as, "R. disciples."

Reveren'tial *a.* आदराचा, आदरबुद्धीचा, आदरयुक्त, पूज्यबुद्धीचा, आदर *m.* असणारा, आदर *m* -पूज्यबुद्धि *f.* वाटणारा, पूज्य मानणारा, आदर *m.* व्यक्त करणारा.

Rev'erently, Reveren'tially *adv.* आदरबुद्धीनें, पूज्यबुद्धीनें, सत्कारबुद्धीनें, आदरानें, आदर करून, आदरपूर्वक.

Rever'er *n.* Rever'ing *pr. p.*

Reverie, Revery (rev'ér-i) [*Lit.* 'a dreaming.' Fr. *rever*, to dream.] *n. a dreamy state* (of the mind) भ्रम *m*, भ्रमिष्ठता *f*, वेड *n*, भ्रमण *n*, विचारभ्रमण *n*, चित्तभ्रमण *n*, मनोभ्रमण *n*. २ *meditation* ध्यान *n*, लय *m*, तंद्री *f*. ३ *a day-dream* मनोराज्य *n*.

Revers'al *n. act of reversing* उलटवणें *n*, फिरवणें *n*. २ *a reversed decision* उलट निवाडा *m*.

Reverse (re-vérs') [L. *reversus*, pa. p. of *reverto*, I turn back -*re*, back and *verto*, I turn.] *v. t. to turn the other way round* उलथा -पालथा करणें, उफराटणें, उफरांडणें, उफराटा करणें. २ *to convert to opposite character* उलटवणें, फिरवणें, परतणें, परतवणें, पालटणें, उलटा -उलट -विपरीत करणें -बोलणें -दाखविणें, इकडचा तिकडे तिकडचा इकडे -आदिपश्चात् -आदिमग करणें, परिवर्तन *n* -व्यत्यास *m*. करणें *g. of o.*, बदलणें; as, "To R. motion, policy, order, &c." ३ *to revoke, to annul* (a decree etc.) फिरवणें, रद्द करणें, उलटविणें, उलटणें. R., Reversed *a. inverted* पालथा, उलटा, उफराटा, उलटापालटा, उलटासुलटा, उलथापालथा, उफराटसुफराट, उफराटासुफराटा, पालथा केलेला, उलटा केलेला. २ *opposite or contrary* उलटवलेला, फिरवलेला, उलटा, उफराटा, विरुद्ध, व्यत्यासाचा, विपरीत, व्यतिक्रांत, विपर्यस्त, विलोम, प्रतिलोम, वाम, सव्य, अपसव्य, प्रतीप, व्यस्त. [R. ORDER व्यतिक्रम *m*, व्युत्क्रम *m*.] R. *n. the con-*

*trary* उलटा; as, "Made remarks the R. of complimentary." २ उलटा पक्ष *m*, विपक्ष *m*, प्रतिपक्ष *m*, प्रतियोगी *m*. ३ *the back surface* (as of a coin, medal, etc.) (नाणें, पदक इत्यादिकांची) उलट बाजू *f*, (मुखवटा नसलेली) उलट बाजू *f*. ४ *a piece of misfortune* उलट बाजू *f*, उलटा फेरा *m*, loosely दुर्दैव *n*, दुर्भाग्य *n*, आपदा *f*, आपत्ति *f*; as, "The *reverses* of fortune." (b) पराजय *m*, मागें पाऊल *n*, उलट पाऊल *n*.

Revers'ely *adv.* उलटा, व्यतिक्रमानें, आदिमग, आदिपश्चात्.

Reversibil'ity *n.* उलटण्याचा धर्म *m*, उलटा -विपरीत जाण्याचा धर्म *m*, वैपरीत्य *n*, प्रतीपगामित्व *n*. Revers'ible *a. able to be reversed* उलटतां येण्याजोगा, उलटवायाजोगा, फिरवायाजोगा, फिरवतां येण्याजोगा. "A R. chair; A R. back". २ (chem.) प्रतीपगामी, प्रतिलोम; as, "A R. reaction." ३ *having a pattern or finished surface on both the sides* सारख्या -उलटसुलट बाजूचा; as, "R. fabrics". Rever'sion *n. a return to a previous state* पूर्वस्थितीला जाणें *n*, पूर्वस्थिति प्राप्त होणें *n*, पूर्वदशाप्राप्ति *f*. २ (*law*) *the return of an estate to the original owner, or his heirs, at the end of the period for which the grant was made* (मालमत्ता) मूळ मालकाच्या वारसाला परत मिळणें *n*, उत्तराधिकार *m*, पुनर्भोग *m*. Revers'ional *a.* उत्तराधिकाराचा -संबंधीं -विषयीं. Revers'ionally *adv.* उत्तराधिकारानें, उत्तराधिकाराच्या नियमानुसार. Rever'sionary *a.* पुनरागमनात्मक, अन्यभोगोत्तरप्राप्य. [R. RIGHT मूळ मालकाच्या वारसाला परत मिळण्याचा हक्क *m*, उत्तराधिकार *m*, उत्तरभोग्य हक्क *m*.]

Revers'ing *pr. p.* मागें परतणारा, मागें फिरणारा. R. *v. n.* मागें फिरणें *n*, मागें परतणें *n*. [REVERSING STATION गाडी मागें फिरविण्याचें ठिकाण *n*.]

Reversion, See under Reversibility.

Reversioner (rē-vėr'shun-ėr) *n.* हिंदु कुटुंबांतील विधवेचे पश्चात् तिचे पूर्वींचे पुरुषवारसाचा जो वारस होणारा इसम असतो तो, उत्तराधिकारी *m*.

Revert (re-vėrt') [Fr. *revert* -L. *re*, back and *verto*, I turn.] *v. t. to turn or drive back* परत फिरवणें, परत नेणें, परतवणें. R. *v. i. to return* परत येणें, परतणें, परत जाणें. २ *to recur to subject* (in talk or thought) (मूळ विषयावर) परत येणें, (मूळ पदावर) परत येणें. ३ (law) *to fall in by reversion* उत्तराधिकारानें (मूळ मालकाच्या वारसाला इस्टेट) परत येणें. Revert'ible *a.* (of property) *subject to reversion* (मूळ मालकाच्या वारसाला) उत्तराधिकारानें परत मिळणारा.

Review (re-vū') [Fr. *revue*, pa. p. of *revoir*, -L. *re*, again and *video*, I see.] *v. t.* (पुस्तक, हस्तलिखित प्रत वगैरे) काळजीपूर्वक पाहणें, तपासणें; as, "To R. a book for a new edition." २ *to subject to legal*

*revision* तपासणी करणें, फिरून पाहणें, पुनः विचार करणें; as, "A higher court may R. the proceedings of a lower one." ३ *to inspect* (troops, etc.) (सैन्याची) पाहणी *f.* करणें, ( परेट ) पाहणें. ४ *to write a review of* परीक्षण करणें, समालोचन करणें, परीक्षणात्मक -टीकात्मक लेख लिहिणें, गुणदोषविवेचन *n* -गुणदोषविचार *m.* करणें *g. of o.* ५ *to retrace, to go over again* पुन्हां डोळ्यापुढें आणणें, पुन्हां मांडणें, पुन्हां वर्णन *n.* करणें; as, "Shall I the long, laborious scene R?" R. *n. a survey, examination or consideration of some subject* पाहणी *f*, सिंहावलोकन *n.* २ (*law*) *a legal revision* तपासणी *f.* [COURT OF R. तपासणीकोर्ट *n.* ] ३ *a display and formal inspection of troops, &c.* पाहणी *f*, रिव्ह्यू. ४ *a criticism on a book* परीक्षण *n*, समालोचन *n*, गुणदोषविचार *m*, टीका *f*, गुणदोषविवेचन *n.* ५ *a periodical treating of political or literary matters* नियतकालिक पुस्तक *n.* Review'ed *pa. t.* and *pa. p.* Review'ing *pr. p.*

Review'er *n. one who reviews* ( *esp.* books ) पुस्तकपरीक्षक *m*, पुस्तकपरीक्षण *n.* करणारा *m*, ग्रंथाचे गुणदोष काढणारा *m*, ग्रंथगुणदोषविवेचक *m*, टीकाकार *m.*

Revile ( re-vīl' ) [ L. *re*, again and Vile. ] *v. t. to abuse, to rail at* निंदणें, निर्भर्त्सणें, हेटाळणें, निंदा *f* -कुत्सा *f* -निर्भर्त्सना *f* -कुटाळी *f.* करणें *g. of o.* Revil'ed *pa. t.* R. *pa. p.* निंदलेला, निंदित, कुत्सित, निर्भर्त्सित, गर्हित. Revil'er *n.* निंदणारा, निर्भर्त्सक, निंदक, कुटाळ, कुटाळखोर, निंदाखोर, निंदा *f* -निर्भर्त्सना करणारा. Revil'ing *pr. p.* and *v. n.*

Revile'ment *n.* निंदणें *n*, निंदा *f*, निर्भर्त्सना *f*, हेटाळणी *f*, हेटाळी *f*, कुटाळी *f*, कुटाळकी *f*, कुचाळी *f*, गालिप्रदान *n.*

Revil'ingly *adv.* निंदा करून, निंदापूर्वक.

Revis'able *a.* उजळणी करण्यासारखा, फिरून तपासण्यासारखा.

Revi'sal *n.* फिरून पाहणें *n*, फिरून तपासणें *n*, दुरुस्त करणें *n*, दुरुस्ती *f*, शोधन *n*, शोध *m*, उजळणी *f*; as, "The R. of a manuscript, proof-sheet, &c."

Revise ( re-vīz' ) [ Fr. *reviser*-L. *re*, back and *viso*, I look at attentively, intensive of *videre*, to see. ] *v. t. to read or look over, to re-examine* सुधारणें, तपासून दुरुस्त करणें, तपासणें, तपासून पाहणें, शोध -शोधन *n* -तपासणी *f.* करणें, दुरुस्ती करून पक्का करणें; as, "To R. estimates." (b) उजळणी *f.* करणें. २ (*print.*) प्रुफ पुन्हां तपासणें, द्वितीया तपासणें. R. *n.* (*print.*) *a proof-sheet embodying corrections made in an earlier proof* (सुधारलेलें) द्वितीयेचें प्रुफ, द्वितीयमुद्रित *n.* Revis'ed *pa. t.* and *pa. p.* Revis'ing *pr. p.*

Revis'er *n.* सुधारणारा *m*, दुरुस्त करणारा *m*, तपासणारा *m*, तपासणी *f.* करणारा, फिरून पाहणारा *m*, उजळणी *f.* करणारा *m.*

Revi'sion *n.* तपासणी *f*, उजळणी *f*, दुरुस्ती *f*, सुधारणा *f*, पुनः पाहणें *n*, शोध *m.* [R. APPLICATION तपासणीचा अर्ज *m.* निकाल देणारे कोर्टास हा अर्ज घेतां येत नाहीं.]

Revi'sional *a.* तपासणीचा, दुरुस्तीचा, उजळणीचा, पुनः तपासून पाहण्याचा. [R. POWERS तपासणीचा अधिकार *m.*]

Revival, Revivalism, See under Revive.

Revive (re-vīv') [Fr. *revivre* -L. *re*, and *vivo*, I live.] *v. i. to come to life again* जीवंत होणें, (मरून) उठणें, जीव *m.* धरणें, जीव *m.* येणें *in. con.*, उज्जीवन *n* -पुनर्जीवन *n.* होणें *g. of o.* (b) पुनः शक्ति -सामर्थ्य येणें, उत्साह येणें. २ *to come to notice or vigour again* पुन्हां प्रसिद्धीस येणें. (b) सावरणें, सावर घेणें, जीव धरणें, पाठ उचलणें. ३ (*law*) (नष्ट हक्क) पुनः प्राप्त -जीवंत होणें. ४ *to come into vogue* पुनः चालू होणें -अंमलांत येणें. R. *v. t. to bring back to life* फिरून जीवंत -सजीव करणें, शरीरांत जीव *m.* घालणें -आणणें, उज्जीवन *n* -पुनर्जीवन *n.* करणें *g. of o.* २ *to bring back to vigour or notice* पुन्हां प्रसिद्धीस आणणें, उजरणें, उठावणी *f* -उचल *f.* करणें *g. of o.*, तेजगी *f* -चिवटपणा *m.* आणणें. ३ (*law*) (नष्ट झालेला हक्क) पुनः जीवंत करणें. ४ *to bring into vogue* पुनः अंमलांत आणणें, पुनः चालू करणें. Reviv'able *a.* जीव धरण्यासारखा -जोगा, सांवरण्यासारखा -जोगा, फिरून जीवंत -सजीव करण्यासारखा, उचल *f* -उठावणी *f.* करण्यासारखा. Reviv'al *n. coming back to life* जीवंत होणें *n*, जीवंत करणें *n*, जीव धरणें *n*, उज्जीवन *n*, पुनरुज्जीवन *n*, पुनर्जीवन *n.* २ सांवरणें *n*, उत्साह *m* -जोर येणें *n* -आणणें *n.* ३ *reawakening of religious fervour* धर्माचें पुनरुज्जीवन *n*, धर्माचें पुनर्जीवन *n.* Reviv'alism *n.* धर्माचें पुनरुज्जीवन *n*, धर्माच्या पुनरुज्जीवनाचें वारें *n.* २ पुनरुज्जीवनाचा मार्ग *m.* Reviv'alist *n. one who takes an active part in a revival* धर्माच्या पुनरुज्जीवनाचा अभिमानी *m*, पुनरुज्जीवनाभिमानी *m.* Reviv'er *n.* पुनरुज्जीवन करणारा. २ (*slang*) *stimulating drink* जोसाचें पेय *n.* ३ *preparation for restoring faded colour* (फिकट झालेल्या रंगाला) तजेली आणणारें द्रव्य *n.*

Re-vivifica'tion *n.* पुन्हां सजीव करणें *n.* २ नवा दम *m.* आणणें *n*, नवा जोर *m.* आणणें *n.*

Re-viv'ify *v. t.* (chiefly *fig.*) *to put new life into* जीवनक्रिया पुन्हां उत्पन्न करणें, पुन्हां जीवंत करणें, पुन्हां सजीव करणें. २ *to inspire with new vigour* नवीन दम *m* -जोर *m.* आणणें, नवीन शक्ति आणणें, नवीन उत्साह उत्पन्न करणें.

Rev'ocable *a. able to be revoked* रद्द करण्यासारखा, फिरविण्यासारखा.

Revoca'tion *n.* (law) *repeal* रद्द करणें *n*, फिरवणें *n.* २ (पूर्वीची) खंडचिठी (संपली असतां) नवीन लिहून देणें *n*, खंडचिठी फिरवून देणें *n.*

Revoke ( re-vōk' ) [L. *revoco, -re*, back and *voco*, I call. Perhaps allied to Sk. वच्.] *v. t. to repeal, to cancel* रद्द करणें, फिरवणें, बदलणें.

Revol't ( re-vōlt ) [ Fr. *revolt* –L. *re*, and *volvo*, I turn. Revolt शब्दाचा धात्वर्थ 'पासून परत फिरणें' असा आहे. ] *v. i. to rebel* बंड करणें, बंडावा करणें, अंमल *m* -अधिकार *m* -शासन *n*. झुगारून देणें, फिरणें, फितणें *with* वर, फितूर -फितुरी होणें, सरकाराविरुद्ध -राज्यसत्तेविरुद्ध उठणें, खळबळून जाणें. २ *to rise in repugnance against, to turn in loathing from* उद्वेग येणें, उद्वेग वाटणें, चीड येणें, किळस वाटणें; as, "Common sense R.s at it." R. *v. t. to shock, to affect with disgust* उद्वेग उत्पन्न करणें, किळस उत्पन्न करणें, क्षोभवणें, खळबळवून सोडणें, त्रास देणें. R. *n. rebellion* बंड *n*, बंडावा *m*, फितूर *m*, फितुरी *f*, फितवा *m*, फितावा *m*, सरकाराविरुद्ध उठणें *n*, राजसत्तेविरुद्ध उठणें *n*. २ स्वपक्षत्याग *m*, स्वामित्याग *m*.

Revolt'er *n*. बंडवाला *m*, फितूर, फितुरी, बंड *m* -बंडावा *m*. करणारा. २ स्वामित्यागी, स्वपक्षत्यागी.

Revolt'ing *pr. p.* R. *pr. p. a. shocking* क्षोभजनक, उद्वेगजनक. २ (मनोविकार) खळबळवून सोडणारा, त्रासदायक, त्रासोत्पादक, त्रासकारक, त्रासजनक, किळस उत्पन्न करणारा.

Revolute ( re-v'olūt ) [See Revolve.] *a.* (*bot.*) *with back-rolled edge* प्रतिवलिताग्र, मागें वळलेल्या अग्राचा.

Revolu'tion *n. a turning round or on a centre* भोंवतीं फिरणें *n*, परिभ्रमण *n*, भ्रमण *n*, परिवर्तन *n*, परिवर्त *m*, (दोरीचा) वेढा *m*. २ फिरवणें *n*. ३ *revolving in mind* घोळणें *n*, मंथणें *n*, मंथन or मथन *n*, आलोडन *n*, मनन *n*. ४ *a complete change* पालट *m*, उलटापालट *m*, उलथापालथ *m*. (b) दांडगा फेरफार *m*, उलाढाल *f*, क्रांति *f*. (c) (*in a government or state*) राज्यक्रांति *f*. ५ (*astron.*) प्रदक्षिणा *f*, परिक्रमण *n*, भगण *n*, फेरा *m*. [ PERIOD OF R. भगणकाल *m*, प्रदक्षिणाकाल *m*, परिक्रमणकाल *m*. SIDEREAL R. नक्षत्रपरिक्रमण *n*, नक्षत्रभगण. ]

Revolu'tionary *a. of revolution* क्रांतीचा, राज्यक्रांतीचा, राज्यक्रांतिविषयक -संबंधी. २ *involving great changes* उलथापालथीचा, उलाढालीचा, चळवळीचा. R. *n. instigator of revolution* राज्यक्रांति घडवून आणणारा, क्रांतिकारक. Revolu'tionise *v. t.* क्रांति घडवून आणणें, उलथापालथ करणें, उलाढाल करणें. २ दांडगे फेरफार घडवून आणणें. Revolu'tionist *n*. क्रांतिकारक *m*, क्रांतिवादी, क्रांतिपक्षाभिमानी.

Revolutionise, Revolutionist, See under Revolutionary.

Revolve ( re-volv' ) [L. *revolvo -revolutum -re*, back and *volvo*, I roll. ] *v. i. to turn round a centre* भोंवतीं फिरणें, भ्रमण *n* -परिभ्रमण *n*. करणें -पावणें, भ्रमण *n* -परिभ्रमण *n*. होणें *with g. of s.*, फेरी *f* -फेरा *m* -प्रदक्षिणा *f*. घालणें. R. *v. t. to turn round* फिरवणें, फिरेसा करणें, परिभ्रमण *n* -भ्रमण *n*. करविणें.

२ *to consider in the mind* (मनांत) विचार करणें, घोळणें, अरतणेंपरतणें. Revolv'ed *pa. t.* and *pa. p.*

Revolv'er *n.* अनेकबारी पिस्तूल *n*, रिव्हाल्व्हर *m*.

Revolv'ing *pr. p.* [R. BOX (*wea.*) (एक धोटा जाऊन त्या ठिकाणीं आपोआप येऊन बसतो ती पेटींत) मागेंपुढें होणारी (चामड्याची) बाहुली *f*. (ही बंगालचे बाजूस कोठें कोठें लांकडी असते).

Revulsion (re-vul'shun) [Lit. 'a tearing away'. L. *re*, away and *vellere*, to tear.] *n. sudden violent change in feeling* उलट *f*, पालट *m*.

Reward (rē- wawrd') [Fr. *regarder*, to look upon with favour.] *v. t. to make a present to* बक्षीस देणें, इनाम *n* -देणगी *f* -पारितोषिक *n*. देणें. २ *to repay, to requite* परत देणें, मोबदला देणें, उलट *f*. करणें. R. *n*. बक्षीस *n*, इनाम *n*, देणगी *f*, पारितोषिक *n*. २ *a recompense* मोबदला *m*, उलट *f*, प्रतिदान *n*, प्रतिफल *n*.

Rhapsod'ic, Rhapsod'ical *a*. असंबद्ध काव्याचा, असंबद्ध काव्यविषयक.

Rhap'sodist *n. one who recites rhapsodies* असंबद्ध काव्य म्हणणारा *m*.

Rhapsody (rap'so- di) [Fr. -Gr. *rhapsodia*, lit. 'a stringing together of songs' -*rhaptein*, to sew, *ode*, a song.] *n. any wild unconnected composition* असंबद्ध काव्य *n*.

Rheometer (rē-om'ē-ter) [Gr. *rhein*, to flow, *metron*, measure.] *n. an instrument for measuring the strength of electric current* विद्युत्प्रवाहमापक *m*. [Electrometer = विद्युन्मापक.]

Rheophore (rē'ō- fōr) [Gr. *rhein*, to flow, and *pherein*, to carry.] *n*. (*elect.*) विद्युद्वाही तार *f*.

Rheoscope (rē'ō- skōp) [Gr. *rhein*, to flow, *skopein*, to view.] *n*. विद्युत्प्रवाहदर्शक.

Rheostat (rē'-ō-stat) [Gr. *rheō*, I flow, and *statos*, standing.] *n*. (*elec.*) विद्युत्प्रवाह कमीजास्त करण्याकरितां लागणाऱ्या प्रतिबंधाचें नियमन करणारें यंत्र *n*, विद्युत्प्रतिबंधनियामक, (प्रतिबंध = Resistance.) विद्युत्समस्थापक (Perhaps a better word).

Rheotome (rē'ō·tōm) [Gr. *rhein*, to flow, *temnein*, to cut.] *n. a means by which an electric current can be periodically interrupted* विद्युत्प्रवाहव्यवच्छेदक *n*, विद्युद्व्यवच्छेदक *n*.

Rheotrope (rē'ō-trōp) [Gr. *rhein*, to flow, and *trepein*, to turn.] *n*. (*elect.*) विद्युत्प्रवाहाची दिशा बदलणारें यंत्र *n*, विद्युद्दिक्परिवर्तक *n*, विद्युत्परिवर्तक *n*.

Rhetoric (ret'o-rik) [Fr. *rhetoric* -Gr. *rhētorike* -*rhetor*, a public speaker -*rheo*, I speak.] *n. the art of composition* भाषासौंदर्यशास्त्र *n*, अलंकारशास्त्र *n*, साहित्यशास्त्र *n*. २ *the art of public speaking* वक्तृत्वकला *f*. ३ अस्खलित वाणी *f*, (भाषेचा) अस्खलित प्रवाह *m*. ४ मन वळविण्याची शक्ति *f*, आकर्षकता *f*, आकर्षण *n*; as, "Sweet silent R. of

persuading eyes." Rhetor'ical *a. pertaining to the art of rhetoric* भाषासौंदर्यशास्त्राचा, साहित्यशास्त्राचा, अलंकारशास्त्रसंबंधी -विषयक. २ वक्तृत्वकलेचा, अलंकारिक, अलंकारपूर्ण -युक्त. [A R. EXPRESSION OR FIGURE अलंकार *m.* A R. QUESTION, SEE UNDER Q.] Rhetori'cian *n. a rhetorical speaker or writer* वक्ता *m.* (b) साहित्यशास्त्रज्ञ. (c) अलंकारशास्त्रवेत्ता *m.* २ अलंकारशास्त्राचा अध्यापक *m.*

*N. B.* इंग्रजी Rhetoric शब्दांत अर्थाची प्रसन्नता, भाषेचा जोरदारपणा व कर्णमधुरता, अलंकार आणि लेखनशैली या कल्पनांचा समावेश होतो.

Rheum (rōōm) [L. *rheum* -Gr. *rheuma* - *rhein*, to flow.] *n. watery secretion of mucous membrane* श्लेष्मा *m*, पाणी *n*, रोगवणी *n.* Rheuma'tic *a. suffering from rheumatism* आमवात झालेला, आमवातग्रस्त, संधिवात झालेला. २ *pertaining to rheumatism* आमवाताचा, आमवायूचा, आमवातविषयक, आमवायुविषयक, संधिवातरोगाचा. [R. PAINS वायकळा *f. pl.*] R. *n.* (*pl.*) आमवात *m*, संधिवात *m.* २ *a rheumatic patient* संधिवाताचा रोगी *m.* Rheum'atism *n. disease marked by inflammation and pain in joints* आमवात, संधिवात. [ACUTE R. तीव्र आमवात *m*, फूट *f.* R. IN THE JOINTS संधिवात *m*, आमवात *m.* SHOOTING OF R. शिळक *or* शिळीक *f.* CHRONIC R. विलंबी आमवात. GONORRHOEAL R. पूयप्रमेहजन्य संधिवात *m.*]

Rheumatic, Rheumatism, See under Rheum.

Rheum'y *a.* (of air) *damp* थंड, गारठ्याची. २ *affected with rheum* चिपडा, पिचका. Rheumy–eyed *a.* चिपड्या डोळ्यांचा, पिचक्या डोळ्यांचा. २ (*a horse*) असुढाळ.

Rhinitis (rī-nī'tis) [Gr. *ris*, *rinos*, nose, and *-itis*, inflammation.] *n.* (*med.*) नासिकादाह *m*, नाकांतील श्लेष्मल त्वचेचा दाह *m.*

Rhinoceros (rī-nos'ĕr-os) [L. *rhinoceros* -Gr. *rhin*, *rhinos*, nose and *keras*, a horn.] *n.* गेंडा *m*, खड्ग *m*? [HORN OF THE R. खड्ग *m*, *n*, खड्गपात्र *n*?]

Rhinoplasty (rī'nō-plas-ti) [Gr. *ris*, nose, and *plassein*, to form.] *n.* (*med.*) (कापल्यामुळें किंवा अन्य तऱ्हेनें) नाक गेलें असतां (दुसरीकडील व विशेषतः कपाळावरील कातडी कापून लाऊन) तें (नाक) दुरुस्त करणें, अभिनवनासाबंध *m.*

Rhinoscleroma (rīnō-sklē-rō'-ma) [Gr. *ris*, *rinos*, nose, *scleroma*, induration.] *n.* (*med.*) मांसांकुरजनक नाकाचा एक विशेष रोग, नासामांसांकुर (रोग).

Rhinoscope (rī'nō-skōp) [Gr. *ris*, nose, and *skopein*, to see.] *n.* नासिकादर्शक, नाक तपासण्याचें यंत्र.

Rhizome (rī-zōm') [Gr. *rhizoma* -*rhiza*, a root.] *n. a prostrate root-like stem emitting roots* भूप्रकांड *n*, मूळरूपी कांड *n.* उ० आलें, हळद, वगैरे. हा अर्धवट जमिनींत असून खालीं मुळ्या व वर पानें असतात, व आडवा पसरत जातो.

Rhodium (rō'di-um) [Gr. *rhodon*, a rose.] *n. a hard white metal of platinum group* रसायनशास्त्रांतील (प्लातिनमवर्गांतील) ऱ्होदियम नांवाचें मूलद्रव्य *n*, ऱ्हद *n*. ही धातु पांढरी असते.

Rhom'bic *a*. समभुजचौकोनाचा, समचतुर्भुजाचा.

Rhom'boid *n*. (*geom.*) समप्रतिभुज (चौकोन) *m*, विषमसमचतुर्भुज *m*.

Rhom'boidal *a*. समप्रतिभुजचौकोनाचा, विषमसमचतुर्भुजाचा.

Rhombus (rom'bus) [L. *rhombus -rhembere*, to revolve.] *n*. (*geom.*) समभुज (चौकोन) *m*, समचतुर्भुज *m*.

Rhonchus (ron'kus) [L.] *n*. (*med.*) श्वासनलिकांचा दाह झाला असतां होणारा शिळीसारखा आवाज *m*, श्वासनलिकासीत्कार *m*. [SONOROUS R. घोरल्यासारखा शब्द, घुरघुर.]

Rhubarb (rōō'barb) [Fr. *rhubarbe* -L. *Rha*, the Volga, *barbarus*, foreign.] *n*. (*bot.*) रेवाचिनी *f*, रेवचिनी *f*, रेवस *m*.

Rhyme, Rime (rīm) [A. S. *rim*, number.] *n. similarity of sounds at the ends of lines in verse* यमक *m*. २ *a piece of poetry having rhyming lines* यमकाची कविता *f*, सयमक कविता *f*. ३ *a short poem* छोटी कविता *f*, लहानसें कवन *n*. R. *v. i. to agree in sound* यमक होणें -साधणें *g. of s.* recip., मिळणें, मेळ *m*. पडणें *g. of s., recip.* R. *v. t. to put into rhyme* यमकांत बसविणें, कविता *f* -कवित्व *n* -कवन *n*. करणें. [WITHOUT R. OR REASON *unaccountable* ताळ नाहीं तंत नाहीं.] Rhym'er, Rhyme'ster *n. one who makes rhymes* कविता करणारा, कवि *m*. २ *a contemptuous name for a writer in verse* यमक्या *m*.

Rhythm (rithm) [Fr. *rithm* -L. *rhythmus* -Gr. *ruthmos*, measured motion or time -*rhein*, to flow.] *n. regularity of accents in verse or music* लय *f*, (तालाची आवृत्ति करून) अव्याहत चालणारी मात्रांची गति *f*, मात्रासाम्य *n*, लयसाम्य *n*. २ *harmony or proportion* मेळ *m*, साम्य *n*. ३ (*Physio.*) (हृच्चलनाचें) गतिसाम्य *n*, सारखी गति *f*, समगति *f*.

Rhythmic,-al *a. having or pertaining to rhythm* लयसाम्य असलेला, लयात्मक, लयसाम्याचा. २ मेळ असलेला, मेळाचा. ३ समगति असलेला, समगतिक, गतिसाम्य असलेला, गतिसाम्यात्मक.

Rib (rib) [A. S. *ribb*, a rib.] *n*. (*anat.*) *one of the bones (of the body) from the backbone to the front of the chest* बरगडी *f*, फांसळी *f*, फांसोळी *f*, बरगडीचें हाड *n*, फांसळीचें हाड *n*, पार्श्वास्थि *n*, पार्श्वक *n*, परशु *f*, पर्शुका *f*. [THE R.s पंजर *m*.] २ (a) (of a leaf) दांडा *m*, दांडारा *m*, हिरकूट *n*, हीर *n*. (b) (of an umbrella) काडी *f*, शलाका *f*, सळई *f*, ताडी *f*. ३ *a piece of flesh containing one of the rib-bones* फांसळीचें मांस *n*. ४ (Mill Industry) नस.

Ribald ( rib'ald ) [O. F. *ribalt* -O. H. Ger. *ribe*, a prostitute.] *n. a low vulgar person* ( तोंडाचा ) फटकळ मनुष्य *m*, हलकट मनुष्य *m*, अभद्रभाषी. R. *a. using indecent language* फटकळ, तोंडशिंदळ, तोंडशिनळ, तोंडफटकळ, तोंडाचा फटकळ, अभद्रभाषी, पाचकळ.

Rib'aldry *n. indecent language* अभद्र बोलणें *n*, पाचकळ बोलणें *n*, अभद्र भाषण *n*, दुरुक्ति *f*.

Ribbed *a. with ribs* फांसळीचा, फांसळीदार, फांसळी असलेला.

Ribbon ( ri'b'on ) [ O. Fr. *riban*; ety. dub.] *n. a narrow woven band ( usually of silk or satin )* फीत *f*, दाल *m*. २ *the badge of an order of knighthood* ( नाइटहुडची ) फीत *f*. ३ (*pl.*) *driving reins* लगामाच्या दोऱ्या *f. pl.* Rib'boned *a.* फीत असलेला, फीत लावलेला, फितीचा, फीतदार.

Rice ( rīs ) [ Fr. -L. -Gr. *oruza*, rice. ] *n.* ( the grain with the husk on ) भात *n*, साळ or साळी *f*, शालि *m*; ( as husked ) तांदूळ *m*, तंडुल *m*.—( as boiled) भात *m*, ओदन *m*, शाल्योदन *m*, चरु *m*.

The following terms are quoted from Candy's Dictionary. They will be found useful by English students of Marathi.

There are many kinds of rice. Some are ओरगल *or* वरगल, कमोद, काळीसाळ, किंजळ, कुडा, कुडई, कोथिंबरी भात, कोळंबा, खिरसाळ, गजवेल, घुडा *or* घुड्या, घुड्यावरंगळ, घोंटवेल, घोसालवेल, चिमणसाळ, जिगरें, जिरगा, जिरवेल, जिरेसाळ, जोगें, टांकळ *or* टांकेसाळ, डामरगा, डोंगरें, तवसाळ, तांबकुडय, तांबसाळ, तुरवें *or* तुर्य, दामगा, दोडका, नवधान्य *or* नवान्न, निणगा, पटण *or* पटणी, बोडकें भात, राजावळ.

Bits of R. boiled कणेरा भात *m*. Bits among R. after pounding कणीकोंडा *m*, कणीकूट *n*. Bundle or truss of R. -straw घाड *f*, पेंढा *m*, आयंडा *m*, माचोंडा *m*, लाटा *m*. Chaff in cleaned R. तुसळ *f. n.* Chaff R. तुसळ तांदूळ *m. pl.*, तुसळ करड *f.* Clump or tuft of R.-plants चोंडा *m*. Colander for washing R. तांदुळधुणी रोवळी *f*. Division or banked up portion of a R.-field चोंढा *m*. Ear of R. कणशी *f*. Ears of R. small but full खरडा *m*. Ears of R. withered खरचिंब *n*, जडचिंब *n*. Grain of boiled R. शितकण *m*, शीत *n*. Grain of unhusked R. भातकण *m*, भातकूण *m*. Ground for the reception of R.-plants आरोंठा *m*, आरवंठा *m*. Ladle for serving out boiled R. सुदालें *n*. Land fit for the culture of R. भातजमीन *f*, भातशेत *n*. Lumped mass of boiled R. डिखळ *n*, डिखूळ *n*, *dim.* डिखळी *f*. Morsel of dressed R. उंडी *f*. Parched R. कुरमुरे *m. pl.*, कुरमुऱ्या *f. pl.*, ( *or* चुरमुरे and चुरमुऱ्या, *also* मुरमुरे and मुरमुऱ्या ) सुदामे *m. pl.* Particle of R. झुरकणी *f*. Pounder

of R.-the person गोल्या, गोलेवाला. Powder or fine particles of R. झूर *n*, झुरण *n*. Powder of parched R. कुटा *m*. R.-bed or plot खांचरी *f*, *dim.* खांचर *n*, खोंचर *n*. R. boiled dry बैठा भात *m*. R. cultivator भातकरी *m*. R. dust कूट *n*. R.-field, R.-grounds, R.-lands भातशेत *n*, भुईभाटलें *n*. R.-field, field of untransplanted R. आंवण *n*. R.-grounds as lying low खलाटी *f*, खलाठी *f*, ओंडण *n*. R.-gruel पेज *f*, पेजवणी *n*, पेजपाणी *n*, उतरवणी *n*. R.-gruel soured कांजी *f*.—boild up with flour, chillies, &c. कांजवणी *n*. R.-husk करल *n*. R. husked after parboiling उकडा तांदूळ *m*. R.-milk खीर *f*, दूधपाक *m*, क्षीर *f*, क्षिप्रा *f*, पायस *m*, लापशी *or* लाफशी *f*. R. once ground or pounded करड *f*, करडे तांदूळ *m. pl.*, बगड *f*, एकसड *f*.—twice pounded दुसड *f*, दुसड तांदूळ *m. pl.*—thrice pounded तिसड *f*, तिसड तांदूळ *m. pl.* R. raised by irrigation पाणसाळ *f*, पाणसाळी भात *n*. R. which has shotten up too rapidly, forming nothing in the ear वाभळ *f*.—Thus to shoot up -R. वाभळणें. R.-plants in the seed-plot शेळ *f*. R. plants left untransplanted काड *n*. R.-pounder or pestle गोल्या *m*, मुसळ *n*. R. pressed and flattened पोहे *m. pl.*, पृथुक *m*. R. and split pulse mixed ( boiled or unboiled ) खिचडी *f*. R. slightly pounded मुसळकांडे *m. pl.*, मुसळसडे तांदूळ *m. pl.*, भातकांडे तांदूळ *m. pl.* R.-straw भातण *or* भातेण *n*, तण *n*, सरळ *f*, पराळ *n*, पेंढा *m*, पलाल *m. n*, साळवण *or* न *n*. Shakings of R.-straw ओंस *f*, काड *n*. Soft and waxy—boiled R. मेणकुटला, मेणगट, मेणचट. Softness and waxiness of over-boiled R. मेणगटी *f*. Sproutings or after-crop of R. भादची *f*. Stale boiled R. reboiled with spices तिखमिठा भात *m*. Thrashing or treading floor of R. भातखळें *n*. Transplantation of R. आवणी *f*, आविंज *f*. Tuft of R. plants as transplanted आवा *m*. Watery—boiled R. पेजट, पेजवरा. Wet rice grounds तरी *f*. Wild or spontaneous R. देवभात *n*, नीवार *m*.

Rice-paper *n*. राइस पेपर नांवाचा कागद *m*. हा फार्मोसन वनस्पतीच्या रांध्यापासून तयार करतात व चिनी लोक यावर चित्रें काढतात.

Ricewater *n*. तांदुळाचें धुवण *n*, तंडुलधावनतोय *n*.

Rice-water evacuations *n. pl.* तांदुळाच्या धुवणासारखा मळ *m*, कांजीच्या रंगाचा मळ. असला मळ काल-यांत होतो.

Rich (rich) [A. S. *rice.*] *a. wealthy* श्रीमंत, धनवान्, धनवंत, द्रव्यवान्, दौलतवान्, पैकेवान्, पैकेकरी, पैकेवाला, सातबर, संपत्तिमान्, लक्ष्मीवान्, लक्ष्मीवंत, धनिक, सधन, धनसंपन्न, धनत्तर, श्रीमान्, तालेवार, तालेवंत, संपन्न, वित्तवान्, गब्बर, ( jocosely ) गब्रू.

[R. FROM BIRTH गर्भश्रीमंत. To GET R. श्रीमंत होणें, टेंभा *m.* पाजळणें *g. of s.*, उखळ पांढरें होणें *g. of s.*] २ (a dish, diet, &c.) *highly flavoured* मसालेदार, घवघवीत. (b) पक्वान्नाचा, मिठाईचा, श्रीमंती, थाटाचा. ३ (land, soil) *fertile* सुपीक, पिकाऊ, पिकाचा, मातबर. ४ *having abundance* संपन्न (especially in compound as, गुणसंपन्न, ज्ञानसंपन्न, etc.), मय in comp., प्रचुर in comp., बहुल in comp., समृद्ध in comp., आढ्य (in comp. as, गुणाढ्य, बलाढ्य etc.) ५ *splendid* उत्तम, उत्तमोत्तम, खासा. ६ फार किंमतीचा, मौल्यवान्, श्रीमंती; as, "R. dress, R. furniture." ७ घवघवीत (smell). ८ झगझगीत (colour). ९ (sound) मोठा, उंच, उच्च. १९ (incident) फार मनोरंजक. Richer, Compar. Richest, Superl.

Riches *n.* (*usu.* as *pl.*) *wealth* संपत्ति *f*, द्रव्य *n*, धन *n*, दौलत *f*, संपदा *f*, लक्ष्मी *f*, ऐवज *m*, वित्त *n*, वित्तविषय *m*, मालमत्ता *f*, गठडी *f*, धनसमृद्धि *f*, धनवैपुल्य *n*. [INTOXICATION PRODUCED BY R. संपत्तीचा मद *m*. THAT IS BLIND THROUGH THE INTOXICATION OF R. द्रव्यांध. THIRST *or* LUST OF R. धनाशा *f*, धनलोभ *m*.]

Rich'ly *adv.* फार, पुष्कळ. २ बहुत धनानें, बहुत पैसा देऊन, धनसमृद्धिपूर्वक. ३ थाटानें, उत्तम रीतीनें.

Rich'ness *n.* श्रीमंती *f*, मातबरी *f*, धनिकता *f*, सधनता *f*, धनवैपुल्य *n*, धनसमृद्धि *f*, धनविपुलता *f*, धनाढ्यता *f*, धनवंतपणा *m*. २ घवघवीतपणा *m*, मिष्टता *f*. ३ पिकाऊपणा *m*, सुपीकपणा *m*, मातबरी *f*. ४ झगझगीतपणा *m*. ५ मनोरंजकता *f*.

Rick (rik) [of Anglo- Saxon origin.] *n. a stack of hay* गंजी *f*, गंज *m*, ठिकी *f*, उटी *f*, कुंभेरी *f*. २ (of unthreshed corn) सुडी *f*, उडवें *n*, बुचाड *n*, कातरा *m*, उडवी *f*.

Ric'ketiness *n.* खिळखिळेपणा *m*, लटपटितपणा *m*, खिळखिळी *f*, लडबड *f*. Ric'kety *a. suffering from rickets* अस्थिमार्दवरोग झालेला. २ *tottering, feeble* खिळखिळीत, खिळखिळा, डळमळीत, लटपटीत, डगमगीत, ढिला, अदृढ. To BE R. लटपटणें, लटलटणें, लटलट करणें -हालणें.]

Rickets (rik'ets) [Prov. Eng. verb (*w*) *rick*, to twist.] *n.* (*sing.*) *a disease of children, characterised by softness and curvature of the bones* अस्थिमार्दवरोग, ज्यामध्यें हाडें मऊ होतात असा लहान मुलांचा रोग, मुडदूस, अस्थींचा वांकडेपणा.

Rickety, See under Ricketiness.

Ricochet (rik'o- shā *or* shet') [Fr. Ety. dub.] *n. a rebound (as of a ball along the ground)* (चेंडूची वगैरे) उशी *f*. R. *v. i. to rebound and skim along the surface* उशी खाणें, उशी घेणें.

Rid (rid) [A. S. *hreddan*, to snatch away.] *v. t. to make free* सोडवणें, मोकळा -मुक्त करणें, निराळा -वेगळा करणें. Rid, Ridded *pa. t.* Rid *pa. p.* सोडविलेला, मोकळा केलेला, मुक्त. [To GET RID OF

मोकळा होणें *with* पासून *of o.*, टाळणें, मुक्त होणें, वाट करणें *g. of o.*, बाहेर करणें.] Rid'dance *n.* (*act*) **सोडवणें** *n*, **सोडवण** *f*, **सोडवणूक** *f*. २ (*state*) **सुटका** *f*, **मुक्तता** *f*, **मुक्ति** *f*.

Riddance, See under Rid.

Riddle (rid'l) [A. S. *rædels* -*rædan*, to guess, to read -*ræd*, counsel.] *n.* *enigma* **कोडें** *n*, **कूट** *n*, **कूटप्रश्न** *m*, **दृष्टकूट** *n*, **उखाणा** *m*, **आहणा** *m*, **गूढ** *n*, **हुमणें** *n*, **प्रहेलिका** (*poet.*) *f*. [To FIND OUT A R. कोडें *n.* सोडवणें, कूट *n.* सोडवणें -जिंकणें.]

Riddle (rid'l) [A. S. *hriddel*, a coarse sieve.] *n.* *a large sieve* **मोठी चाळण** *f*, **घोळणा** *m*. R. *v. t.* *to sift* **चाळणें, घोळणें, घोळण** *n.* **करणें** *g. of o.* २ *to pierce with many holes* **(आंगाची किंवा जहाजाच्या बाजूची बंदुकीच्या गोळयांनीं) चाळण** *f*. **करणें** *g. of o.*, **भोंकें** *n. pl.* **पाडणें.** ३ **(पुरावा) चाळून पाहणें, तपासून पाहणें.**

Ride *v. i.* **घोड्यावर बसणें, घोड्यावर बसून जाणें, घोड्यावर स्वार होणें, घोड्यावर सवारी करणें.** २ **घोडा दौडणें, दौडत जाणें.** [To R. FOR A FALL पडण्याकरितांच घोड्यावर चढणें, मूर्खपणानें वागणें. To R. ROUGH-SHOD (दुसऱ्याच्या दुःखाचा विचार न करितां स्वतःच्या सुखाच्या दृष्टीनें) अंमल *m.* गाजवणें, सत्ता *f.* गाजविणें.] ३ **(-वर) चढणें, वेढा पडणें;** as, "Bone *rides*, Rope *rides.*" ४ (of ground) *to be of specified character for riding on* **दौड करण्यास चांगली किंवा वाईट असणें;** as, "The ground *rides* well, soft, hard, &c."

Ride (rīd) [A. S. *rīdan* –Ger. *reiten*, to move along, L. *rheda*, a carriage.] *v. t.* *to be carried on horseback, etc.* **घोड्यावर बसणें, गाडीमध्यें बसणें -बसून जाणें -येणें, सवार होणें, सवारी** *f*. **करणें.** २ *to sit and manage a horse* **सवारी** *f*. **करणें, घोड्यावर मांड** *f* **-मांडी** *f* **-आसन** *n*. **साधणें -ठेवणें.** [To R. OUT THE STORM (*lit* and *fig.*) संकटांतून निभावणें -सुरक्षित बाहेर पडणें.] ३ *to seem to float* **अति वेगानें फिरणें.** [To R. ONE DOWN भरधांव घोडा फेंकून दुसऱ्याला गांठणें. २ घोडा अंगावर घालणें, घोड्याखालीं चिरडणें. To R. ONE'S HORSE आपलेंच घोडें पुढें ढकलणें. To R. ONE'S HORSE HOBBY आपलाच मुद्दा धेऊन बसणें. To R. ONE'S HORSE TO DEATH मरेमरेसर घोडा दवडणें. २ अतिरेक करणें.] ४ *to take exercise on horse-back* **घोड्यावर बसून रपेट करणें, घोड्यावर बसून फेरफटका करणें -करून येणें.** ५ **घोड्यावर (बसून) प्रवास करणें;** as, "To R. the country." ६ *to tyrannize over* **(-वर) सत्ता** *f*- **अंमल** *m* **-वर्चस्व चालवणें, जुलूम करणें.** ७ **(वरून) नेणें, वाहून नेणें;** as, "To R. a child on one's back."

Ride *n.* *an excursion on horse-back* **घोड्यावरची रपेट** *f*, **घोड्यावरचा फेरफटका** *m*, **घोडदौड** *f*. २ *a road for riding on* **घोडेरस्ता** *m*, **घोडेवाट** *f*, **घोडदौड** *f*.

Rode *pa. t.* Ridd'en *pa. p.*

Rid'er *n.* **घोड्यावर बसणारा** *m*, **सवार** *m*, **स्वार, सवारी, स्वारी.** २ *an additional clause supplementing a*

*document* पुरवणी *f,* पुरवणीकलम *n.* ३ *a problem testing student's mastery of principles* ( मुख्य सिद्धांतावरील ) प्रश्न *m.*

Ridge (rij) [M. E.-A.S.-Ger. *rucken*, the back.] *n. back, or top edge* ( as of a mountain, roof, &c. ) कणा *m*, दांडा *m*, कडा *f.* [R. CAPPING ढापें *n.* R. POLE आडें *n*, आढें *n*, अढें *n*, अढेपाट *n*, अढोला *m.*] २ *earth thrown up by the plough* कांडोळें *n*, कांडें *n*, दंड *m*, दांड *m*, वरंबा *m*, बांध *m.* ३ (*anat.*) कंगोरा *m*, वलयाकार रेषा *f,* वलयरेषा *f.* R. *v. t. to break up* (*land*) *into ridges* कांडीं पाडणें, दंड or दांड पाडणें, वरंबा घालणें. २ *to plant* (cucumbers, &c.) *in ridges* कांडीं पाडून लावणें.

Ridg'y *a. having ridges* कडा असणारा, दांडा असणारा.

Ridicule ( rid'i-kūl ) [L. *ridiculus*, exciting laughter -*ridere*, to laugh.] *n. derision, mockery* थट्टा *f*, हंसें *n*, टर *f*, टेर *f*, उपहास *m*, रेवडी *f.* [TO INCUR R. हंसें *n.* करून घेणें.] २ थट्टेचा विषय *m*, थट्टास्पद *n*, उपहासास्पद *n*; as, "Marlborough was the *ridicule* of his contemporaries." R. *v. t.* थट्टा *f.* करणें -उडवणें, टर *f* -उपहास *m.* करणें, रेवडी *f* -हुर्रे *f* -हुर्रेरेवडी *f.* करणें -उडवणें, हंसें करणें.

Rid'iculed *pa. t.* R. *pa. p.* टर उडवलेला, उपहास केलेला, उपहसित, etc. Rid'iculer *n.* टर उडवणारा, उपहास करणारा, थट्टा करणारा, हसणारा, उपहासक. Rid'iculing *pr. p.* R. *v. n.* टर उडवणें *n*, उपहास करणें *n*, टर *f*, थट्टा *f*, उपहास *m.* Ridic'ulous *a. deserving to be laughed at* हसायाजोगा, उपहास -थट्टा करायाजोगा -सारखा, उपहासयोग्य, उपहासविषय, उपहासास्पद. (b) विक्षिप्त, विलक्षण, चमत्कारिक; as, "A R. dress or behaviour." Ridic'ulously *adv.* थट्टेनें, उपहासपूर्वक, थट्टास्पद रीतीनें. २ विलक्षण रीतीनें, हंसूं येईल असा. Ridic'ulousness *n.* उपहासयोग्यता *f*, उपहासार्हता *f.*

Rid'ing *a.* ( horse ) सवारीचा, बसता, बसायाचा, बसणीचा. Rid'ing *pr. p.* R. *v. n.* घोड्यावर बसणें *n*, सवारी or स्वारी *f*, अश्वारोहण *n.* २ (*med.*) ( मोडलेल्या हाडांचे तुकडे ) एकमेकांवर चढणें, भग्नास्थींचें अध्यारोहण *n.*

Riding-habit *n.* मडमांचा घोड्यावर बसण्याचे वेळीं घालण्याचा झगा *m.*

Riding-House, Riding-School *n.* घोड्यावर बसण्यास शिकविण्याची शाळा *f*, अश्वारोहणशाला *f.*

Riding-master *n.* अश्वारोहणशिक्षक *m*, घोड्यावर बसण्यास शिकविणारा.

Riding-whip *n.* ( सवारीच्या वेळीं वापरण्याचा ) सवारीचा चाबूक *m.*

Rife ( rīf ) [A. S.] (*predicative*) *a. prevalent* नेहमीं होणारा, प्रचारांतला, नेहमींचा, चालू, वहिवाटींतला, वहिवाटींत असणारा; as, "Before the Plague of London inflammations of the lungs were *rife*

and mortal." २ *abounding* वैपुल्य असणारा, समृद्ध, संपन्न; as, "The English language is *rife* with maxims." ३ फार, दाट, अति.

Rife'ness *n.* वहिवाट *f*, सार्वत्रिक प्रचार *m.* २ वैपुल्य *n*, समृद्धि *f.*

Riffler (rif'ler) [Ger. *riefeln*, to groove.] *n.* वांकडी कानस *f.* लांकूडकामांत व संगमरवराच्या खोदकामांत ही वापरतात.

Riff-raff ( rif'-raf ) [ M. E. ] *n. the rabble* बाजारबुणगें *n*, निपटारा *m.*

Rifle ( rī'fl ) [Fr. *rifler*, *rafler* -Ger. *raffen*, to snatch away. See Raffle.] *v. t. to carry off* ( *by force* ), *to strip* लुटणें, लुटून नेणें, लुबाडणें, बुचाडणें, नागवणें, हिरावून घेणें, हिसकावून घेणें; as, "We'll make you sit and R. you".

Rifle ( rī'fl ) [Low. Ger. *gerifelde*, rifled, grooved-Ger. *riefeln*, to channel.] *n.* रायफल नांवाची बंदूक *f*, रायफल *f.* २ ( *pl.* ) रायफलवालें सैन्य *n*, रायफलवाले *m. pl.* R. *v. t. to make spiral grooves in* ( *a gun* ) ( बंदुकीच्या आंतल्या बाजूस ) सर्पाकार खोबणी पाडणें. २ *to shoot with a rifle* रायफलनें गोळी घालणें. R. -corps, *a body of soldiers armed with rifles* रायफलवाल्या सैनिकांची तुकडी *f*, रायफलवाले. R. -man *n. a soldier armed with a rifle* रायफलवाला ( सोजीर ). R. -pit *n. a pit or hollow dug to shelter riflemen from the enemy* रायफलवाल्यांकरितां खंदक *m.* R.-range *n. a practice-ground for rifle-shooting* चांदमारीचें मैदान *n.* २ रायफलीचा पल्ला *m.* R. shooting *n.* चांदमारी *f.* R. -shot *n* रायफलीच्या माऱ्याचा टप्पा *m*, रायफलीचा मारा *m.* २ रायफल मारणारा *m.* ३ रायफलीची गोळी *f.*

Ri'fler *n. a robber* लुबाडणारा *m*, वाटमाऱ्या *m*, चोर *m*

Rift ( rift ) [Danish *rift*, a cleft. ] *n. a cleft, an opening* चीर *f*, भेग *f.* [ LITTLE RIFT WITHIN THE LUTE अन्तःकलह. ] Rift *v. t. to cleave, to rend apart* चीर *f* -भेग *f.* पाडणें, उकलवणें; as, "To R. an oak or a rock". R. *v. i. to burst open, to split* चीर पडणें, चीर जाणें, भेग जाणें, भेग पडणें. भेगळणें, उकलणें.

Rig (rig) [Icel. *rigga*, to bandage, to put on sails -*riga*, to be stiff.] *v. t.* ( *usu.* with out ) *to dress out, to clothe* कपडे घालणें, कपडे घालून सजवणें -सज्ज करणें; as, "Jack was *rigged* out in his gold and silver lace." २ ( a ship ) *to provide with necessary ropes*, etc. ( दोरखंडें, शिडें वगैरे बांधून जहाज ) सजवणें, सज्ज करणें. Rig'ging *n. the cordage of a ship* जहाजाचीं दोरखंडें *n. pl.* Rig-out *n. a complete outfit* (बाहेर जाण्याची किंवा प्रवासाची) प्रवासी तयारी *f.* Rig-out *v. t. to provide with everything necessary* ( बाहेर जाण्याची किंवा प्रवासाची ) प्रवासी तयारी करून देणें.

Rig (rig) [Ety. dub.] *n. a frolic, a trick* चेष्टा *f*, थट्टा *f*, टवाळी *f*. R. *v. i. to play a sportive trick* चेष्टा -टवाळी करणें. [To RUN A RIG कुचेष्टा *f* -टवाळी *f*. करणें.] R. *v. t. to manage or conduct fraudulently* लुच्चेगिरी करणें, लुच्चेगिरीनें चालवणें. [To R. THE MARKET, *to cause artificial rise or fall in prices* (स्वतःच पुष्कळसे शेअर विकत घेऊन, व अशा रीतीनें बाजारभाव चढविल्यावर तेच विकायाला काढून) बाजारभावाचा चढउतार करणें.]

Ri'gel *n.* (*astron.*) [L. Beta Orionis] मृगराशींतील पहिली तारा.

Rigging, See under Rig No. 1.

Right (rīt) [A. S. *riht, ryht*; L. *rectus*, right, Cf. Sk. ऋजु.] *a.* (of angle) *of 90 degrees* काटकोनाचा, समकोनाचा, नव्वद अंशांचा. [R. CONE ऊर्ध्वशंकु *m.* FIRST R. ANGLE आद्य समकोन. SECOND R. ANGLE द्वितीय समकोन *m.*] २ *not oblique* सरळ, सरळ रेषेंतला; as, "R. sailing, R. line." ३ *proper* नीट, ठीक, उजू, बरोबर, बराबर, योग्य, उचित, वाजवी, लायक, दुरुस्त, मार्गाचा, सुधा, यथायोग्य, यथायुक्त, यथोचित, युक्त, याथार्थिक, यथार्थ. [R. SPHERE यथार्थ गोल *m.*] ४ *just, morally good* रीतीचा, रीतसर, न्यायाचा, नीतीचा, यथान्याय, यथानीति, सरल, ऋजु, न्याय्य, रास्त, समंजस, साधु; as, "Acted a R. part." ५ *correct, true* खरा, बरोबर, योग्य, साच, साचा, सत्य, वास्तविक, शुद्ध, यथार्थ; as, "R. use of words." ६ *in good or normal condition, sound* स्थितींतला, सुस्थितीचा, अविकृत, सुदृढ; as, "He is in his R. mind त्याचें डोकें ठिकाणावर आहे." [To SET OR PUT R. व्यवस्थित करणें, व्यवस्थेनें लावणें -मांडणें. २ (-च्या) चुकीच्या समजुती दूर करणें -सुधारणें.] ७ *not left* उजवा, दक्षिण, अपसव्य, वामेतर. [RIGHT AND LEFT उजवा आणि डावा, सव्यापसव्य; -GLOVES, SHOES, नरमादी. To THE R. प्रदक्षिण. WINDING TO THE R. (SPIRAL LINES, ETC.) दक्षिणावर्त्त *or* र्त्ती. R. HAND उजवा हात (*fig.*) *m.* २ मुख्य मदतगार.] ८ *that is on the right hand* उजव्या हातचा, उजव्या हाताकडचा -हाताकडला -हाताकडील. ९ *rightly fixed or placed* सुफराटा, सुलटा, उजू, खरा.

Right *v. t. to restore to straight position* (a) सरळ करणें, सुलट करणें. (b) ठिकाणीं आणणें, ठिकाणावर -ताळ्यावर -जाग्यावर आणणें. (c) काटकोनांत आणणें. २ *to correct mistakes in* सुधारणें, दुरुस्त करणें, निटावणें, सुधारणें, सुथरणें, नीट करणें; as, "That is a fault that will R. itself." ३ *to justify, to vindicate* न्याय *m.* करणें, इनसाफ *m.* करणें *g. of o.*, दाद घेणें; as, "So just is God, to R. the innocent." R. *v. i. to recover vertical position* काटकोनांत येणें. (b) सुलट होणें, सरळ होणें.

Right *n. justness* न्याय *m*, नीति *f*, न्याय्यता *f*. [MIGHT IS R. बळी तो कान पिळी. MIGHT MAKES R. फांसा पडेल

तो डाव, राजा करील तो न्याय. R. AND WRONG न्यायान्याय *m*.] २ *fair claim* हक्क *m*, सत्ता *f*, वारसा *m*, अधिकार *m*. [INDIVIDUAL R. वैयक्तिक अधिकार -हक्क *m*, व्यक्तीचा अधिकार *m*. PROPRIETARY R. स्वामित्वाचा अधिकार *m*, मालकी हक्क *m*.] ५ *right side* उजवी बाजू *f*, उजवें अंग *n*, दक्षिणांग *n*. [THE RIGHT SIDE (OF A FABRIC) वरची बाजू *f*, दर्शनी अंग *n*. ON THE RIGHT SIDE OF FORTY चाळिशीच्या आंत.] ६ *vindication of a right* न्याय *m*, इनसाफ *m*, दाद *f*.

Right *adv. straight* सरळ, नीट, थेट, धडक, धडका, सडक. २ *very, to the full* अगदीं, फारच, अति. ३ *justly, properly* नीट, ठीक, दुरुस्त, बराबर or बरोबर, यथान्याय, यथामार्ग. ४ *truly* खरा, बराबर, यथार्थ, वास्तविक. ५ *to right hand* उजवीकडे.

Righteous (rīt'yus, *or* *rī'chus*) [Lit. 'in a right way.' A. S. *rihtwis -riht* and *wis*, a way or manner.] *a. upright, virtuous* सदाचरणी, धर्मानें चालणारा, नीतिमान्, न्यायाचा, न्याय्य, साधु, न्यायी, सात्विक, रास्त. Right'eously *adv.* न्यायानें, नीतीनें, सदाचरणानें. Right'eousness *n.* सदाचार *m*, सदाचरण *n*, रास्तपणा *m*, साधुत्व *n*, न्याय्यता *f*, न्यायीपणा *m*.

Right'ful *a. fair* रास्त, न्यायाचा, यथान्याय, यथानीति. २ *legitimately entitled to position* हक्कदार, हक्क असलेला. ३ (of office) *that one is entitled to* हक्काचा, सत्तेचा, अधिकारी. [R. PROPERTY हक्काची इस्टेट *f*.]

Right'fulness *n.* सरळपणा *m*, रास्तपणा *m*, न्याय्यत्व *n*, यथान्यायता *f*. Right'ly *adv. properly* नीट, सरळ, उजू, बरोबर, यथास्थित, यथायोग्य, यथोचित, ठीकठीक. २ *justifiably* न्यायानें, नीतीनें, यथान्याय, यथामार्ग, धर्मतः, न्यायतः, सम्यक्. ३ *correctly* बरोबर, बराबर, दुरुस्त, खरा *decl.* ४ उजू, सुफराटा *decl.* Right'ness *n.* सरळपणा *m*, उजूपणा *m*, ठीकपणा *m*. २ यथार्थता *f*, याथार्थ्य *n*, न्याय्यत्व *n*.

Right-hand *n.* उजवा हात *m*. [TO LEAVE ON THE RIGHT HAND (*an object, on passing it*) उजवा घालणें.]

Rightness, See under Rightfulness.

Rigid (rij'id) [L. *rigidus -rigeo*, to be stiff with cold.] *a. stiff* ताठ, ताठर, दृढ, कठिण. २ *inflexible, strict* कडक, करडा, खरमरीत, खरमऱ्या, सख्त, जालीम. ३ (*account, etc.*) *minute, exact* कवडीनकवडीचा, कवडीकवडीचा, काडीनकाडीचा, काडीकाडीचा. ४ (*math.*) दृढ, घन. [R. DYNAMICS घनगतिशास्त्र.]

Rigid'ity, Rig'idness *n.* ताठपणा *m*, ताठरपणा *m*, दृढता *f*. २ (*med.*) ताठ *m*, ताठणें *n*. [R. OF MUSCLES स्नायु ताठणें.] ३ करडेपणा *m*, कडकपणा *m*, खरमरीतपणा *m*, सख्तपणा *m*, जालीमपणा *m*. Rig'idly *adv.* करडेपणानें, सख्तपणानें. २ कांहीं न सोडतां, बिनसूट, काडीकाडीचा *decl.*, खडानखडा.

Rigmarole (rig'-ma-rōl) [A. S. *ragman-roll*, a docu-

ment with a long list of names.] *n. meaningless talk* गडबडगुंडा *m*, धटंपटं *n*, झाडेपवाडे *m. pl.*

Rigor mortis [L.] (*med.*) मृत्यूनंतर शरीरांतील स्नायू ताठ होणें, प्रेत ताठणें.

Rigorous, See under Rigour.

Rigour (rig'ur) [Fr. *rigour* -L. *rigeo*, I am stiff.] *n. severity, strictness* कडकपणा *m*, करडेपणा *m*, खरमरेपणा *m*, सख्तपणा *m*, कठोरपणा *m*, सख्ती *f*. २ *extremity or excess of (weather, etc.)* कडका *m*, कडाखा *m*. (b) ताठा *m*. (c) ठणका *m*. ३ (*in fever*) कांटा *m*, or कांटे *m. pl.* ४ *austerity of life* कडकडीतपणा *m*, कडकपणा *m*. ५ *logical accuracy, exactitude* नेमकेपणा *m*, बिनचूकपणा *m*, अचूकपणा *m*. Rig'orous *a. severe, strict* कडक, करडा, खरमरा, खरमऱ्या, सखत, सख्त, जालीम, कठोर. २ *extreme* (of weather) कडकडीत, कडक, कडाख्याचा. ३ (*account*) *exact, minute* काडीकाडीचा, कवडीकवडीचा. Rig'orously *adv.* निर्दयपणानें, करडेपणानें, सख्तपणानें, दया न करितां, कांहीं न सोडतां, बिनसूट, कडकपणानें. २ (*account*) काडीकाडीचा, कवडीकवडीचा, खडानखडा. Rig'orousness *n.* करडेपणा *m*, खरमरेपणा *m*, सख्तपणा *m*, कडकडीतपणा *m*, कडकपणा *m*, कठीणपणा *m*.

Rill (ril) [Fr. *rigole*, a furrow, a small trench.] *n. a small stream* ओहळ *m*, ओघळ *m*, ओहळी *f*, ओळ *f*, ओळी *f*, उपळी *f*, उपळ *m*, झील *f*, लघुनदी *f*. [RILLS ON THE MOON चंद्रावरील लघुनद्या *f. pl.*]

Rillet *n.* Same as Rill.

Rim (rim) [A. S. *rima.*] *n. raised edge or border* कांठ *m*, किनारा *m*, कोर *f*, कडें *n*. [R. -BROKEN (a *vessel*) कांठफुटका, मुंडा, कांठमोडा, कांठमोडका.] २ (*poet.*) *a circular object* वाटोळी वस्तु. [A GOLDEN RIM राजाचा मुगुट *m*.]

Rime (rīm) [A. S. *hrim*, Dut. *rijm.*] *n.* (*poet.*) *hoar-frost* तुषार *m*, नीहार *m*.

Rimer (rīm'ėr) *n.* (Same as Reamer) रायमर. [PARALLEL R. सीधा रायमर. TAPER R. निमुळता रायमर.]

Rind (rīnd) [A. S. *rind*, *rhind*, *-rindan*, to surround.] *n. bark of tree or fruit* साल *f*, सालपट *n*, त्वचा *f*, चर्म *n*. [HAVING THICK R. सालभेंडा.] २ *external aspect, surface* बाह्यांग *n*, पृष्ठभाग *m*.

Rinderpest (rin'dėr-pest) [Ger. 'cattle-plague.'] *n.* जनावरांच्या देवी *f. pl.*, बुळकांडी *f*, पटकी *f*, मुसळधार *f*.

Ring (ring) [A. S. *hring*. See Rink, Circus.] *n. a circlet, usu. of precious metal* कडें *n*, कडी *f*, कुंडल *n*, कटक *n*, कडोळें *n*, कडोळी *f*, वलय *n*, वाळा *f*, हलकी *f*, बांगडी *f*. [R. BINDING MALLETS, RAMMERS, ETC. मांडळ *f*, वसूं *n* (*dim.* वसवी *f*), विढी *f*. TURNING *or* MOVABLE R. भोवरकडी *f*.] २ (as an ornament for the wrist or ankle) तोडा *m*. ३ (finger or toe-ring) आंगठी *f*, वळें *n*, छल्ला *m*,

सल्ला *m*, वेढ *n*, *f*, वेढें *n*, मुद्री *f*, मुद्रिका *f*.—for the fore or middle finger or middle toe जोडवें *n*. [GEM *or* STONE OF A R. खडा *m*, ठिकडें *n*, ठीक *n*, नग *m*. GUARD R. पडखळण *n*. HOLY R. WORN DURING RELIGIOUS CEREMONIES पवित्रक *n*, पवित्र *n*, पवित्री *f*. SILVER R. FOR THE TOE OF A CHILD खटवें *n*, खट्टं *n*.] ४ *circular bend* आवर्त *m*, कडगुलें *n*; as, "He has livid R.s round his eyes." ५ *persons disposed in a circle* कडें *n*, वेढा *m*, चक्कर *n*, चक्र *n*, मंडल *n*, कोंडाळें *n*, गरका *m*, घेरा *m*, कचोळें *n*, कोचाळें *n*, मांदी *f*. (b) (*pol. eco.*) मंडळी. ६ *a circular fold* (of grass, cloth, etc.) निवणें *n*, चुंबळ *f*, चुंभळ *f*, आहरा *m*, ? आरा? ७ *circular enclosure for circus-riding* रंगण *n*. [A HIT WITHIN THE R. रंगणटोला *m*.] ८ (as of a bullock turning a mill) भोंवार *f*. ९ (of wire for the nose or ear) नथ *f*, बाळी *f*. १० (*astron.*) वलय *n*. [R. MICROMETER वलयक्रांतियंत्र *n*?] R. *v. t.* (a horse, *etc.*) चक्रावर धरणें, मंडलावर धरणें, फेरफटका *m* -फेर *m*. करणें *g. of o.*, रिंगणावर धरणें. R.-bolt *n*. हलकी *f*. R. -finger *n*. *third, esp. of left hand* डाव्या हाताचें तिसरें बोट *n*. R.-leader *n*. *chief instigator in mutiny* (बंडाचा) नायक *m*, पुढारी *m*, मुख्य *m*, मोहरक्या *m*, मोहरपी *m*, बंड उठविणारा. R.-master *n. manager of circus performance* रिंगमास्तर *m*. R. -worm *n*. *a skin-disease esp. of children in circular patches* गजकर्ण *n*, दद्रु *m*, *pop.* दाद *f*, दादड *m*, *n*, नायटा *m*, चकंदळ *n*. [TO BE AFFECTED WITH RING-WORM गजकर्ण होणें, दादडणें, नायटे होणें.]

Ring (ring) [A. S. *hringan*, to tinkle.] *v. t. to sound* (bells) वाजवणें, घणघणावणें, खणखणावणें. [TO R. THE KNELL OF नाहींसा करणें, बारा वाजवणें.] R. *v. i. to give forth a clear resonant sound* वाजणें, ठणठणणें, खणखणणें, घणघणणें, झणझणणें, सणसणणें, भणभणणें, भिरभिरणें, गोंगणें, गोंगावणें, *intens.* झणाणणें, खणाणणें, ठणाणणें, भणाणणें. २ *to resound, to re-echo* दणदणणें, *intens.* दणाणणें, घुमणें. ३ (of ears) *to be filled with sensation as of bell ringing* झणझणणें, झणक्या *f. pl.* -झणझण्या *f. pl.* मारणें, भणभणणें, *intens.* भणाणणें, भिरभिरणें. R. *n. ringing sound* झणकार *m*, नाद *m*, खणखणाट *m*. Ring'ing *v. n.* वाजवणें *n*, झणझण *f*, झणझणी *f*, भिरभिरी *f*, *intens.* झणझणाट *m*, झणाण *m*, खणखणाट *m*, खणाण *m*, घणघणाट *m*. [WITH A R. खणकन् -कर, खणखण *or* णां, खणाखण, खणाणां, घणघण, घणाणां, घणघणां.]

Ring -doubling *n*. (Mill Industry) दुहेरी सूत पिळून वळण्याचा सांचा *m*, रिंगवाला सांचा *m*.

Ring Femoral *n*. (*med.*) श्रोणिस्थानांतील एक गोल छिद्र, श्रोणिच्छिद्र *n*.

Ring-frame travellers *n*. (Mill Industry) रिंगच्या आंतील कडी *f*.

Ringent ( rin'jent ) [ L. *ringi*, to open wide the mouth. ] *a.* (*bot.*) *gaping* ( corolla ) विवृतमुख.

Ring-leader, See under Ring No. 1.

Ringlet ( ring'let ) *n. a curly lock of hair* झुलूप *n.*

Rings (abdominal, external and internal) अंडाच्या शिरांच्या मार्गांचीं बाहेरील व आंतील द्वारें, वृषणाछीला जाणारीं द्वारें (अंतर्गत व बहिर्गत), वृषणाष्ठिगामि वलयद्वारें *n.pl.*

Ring-spinning frame *n.* ( Mill Industry ) तरासन ( corruption of Throstle ) *n,* बांगड्या बसविलेला सूत काढण्याचा सांचा *m.*

Ring-worm, See under Ring 1.

Rink (ringk) [ Simply a variant of Ring, a circle.] *n. a large enclosed space* (for skating or curling) ( उंच जोड्यांनीं चालण्याकरितां कुडून केलेलें ) स्केटचें रिंगण *n,* रिंक *n.* R. *v. i. to skate in a rink* रिंगणांत स्केटजोड्यांनीं धांवणें.

Rinse ( rins ) [ O. F. *rinser -Dut. rein*, pure.] *v. t. to wash out* ( a vessel ) विसळणें, विसुळणें, धुणें. २ *to clear* ( *impurities* ) *by shaking in water* खळबळणें, खळबळावणें, खुळखुळावणें, खंगाळणें, आवळणें, धुणें. ३ (the mouth) गुळणा *m.* करणें.

Riot ( rī'ot ) [ Fr. *riotte*, riot. ] *n. loud revelry* चैनबाजी *f*, धुमाकूळ *m*, धुमश्चक्री *f*, सोदेशाई *f*, धुमाळी *f*, गोंधळ *m*, चैन *f*, दंगल *f*, रंग *m.* २ *disorder, tumult* गर्दी *f*, धामधूम *f*, दंगा *m*, धुंदाई *f*, धुंधाधुंदी *f*, पुंडावा *m.* ३ (law) दंगा *m*, गर्दी *f*, मारामारी *f*. [To RUN R. अद्वातद्वा वोलणें, धुमश्चक्री करणें, दंगा करणें, धामधूम करणें, माजणें, मातणें, भडकणें, वेडगळणें.] R. *v. i. to revel* धुमश्चक्री *f* -धुमाळी *f* -गोंधळ *m.* करणें. २ *to join in riot* दंगा *m* -गर्दी *f.* करणें -उठवणें -माजवणें. Ri'oter *n.* धुमश्चक्री करणारा. २ दंगेखोर *m*, गर्दी *f.* -दंगा करणारा. Ri'oting *v. n.* धुमश्चक्री करणें. २ दंगा -गर्दी -दंगल करणें. Ri'otous *a. indulging in revelry* चैनीचा, बहर मारण्याचा, धुमश्चक्रीचा, ऐषआरामाचा, उधळेपणाचा. [ RIOTOUS LIVING उधळेपणानें वागणें. ] २ *tumultuous* दंग्याचा, गर्दीचा, पुंडाईचा. ३ ( a person ) दंगेखोर, दंगा करणारा, दंगेबाज. ( b ) दंगल *f* -चैन *f.* करणारा, चैनखोर, चैनी, उच्छृंखळ. Ri'otously *adv.* धुमश्चक्री -गोंधळ करून, दंगल करून. २ दंगा करून, गर्दी करून, गर्दीनें, दंग्यानें. ३ चैनबाजीनें, उधळेपणानें.

Riotous, See under Riot.

Rip ( rip ) [ A. S. *rypan.* ] *v. t. to cut or tear* चिरणें, फाडणें, फोडणें, चिरून -फाडून टाकणें, विदारणें, विदारण *n.* करणें; as, "To R. out the lining." २ *to open up* उसवणें, उस्तरणें, उधडणें, उतफाळणें. ३ (up) *to expose* बाहेर काढणें, उकरणें, उकरून काढणें, उचकटणें, विचकटणें, विचकणें. [ To R. UP FAULTS उखाळ्यापाखाळ्या *f. pl.* -उखळबेरीज *f* -उखाळ्या *f. pl.* काढणें *g. of o.* ] R. *n. tear, rent* चीर *f*, फाड *f*, भेग *f.* RIPPED *pa. t.* R. *pa. p.* चिरलेला, फाडलेला,

विदारित, विदीर्ण. २ उसवलेला. ३ उचकटलेला. Rip'per *n.* चिरणारा, फाडणारा, विदारक. २ उसवणारा, उस्तरणारा. ३ उचकटणारा, विदारणकर्ता.

Riparian ( rip-ā'ri-an ) [L. *ripa*, a river-bank.] *a. of river-bank* नदीकिनाऱ्याचा, नदीकांठचा, नदीकिनाऱ्यावरील. [R. PROPRIETORS नदीच्या कांठच्या जमिनीचे मालक.]

Ripe ( rīp ) [ A. S. *rīpe -ripan*, to reap. ] *a. fully developed* पक्का, पिकलेला, पक्व, परिपक्व, पक्वदशेस आलेला, पक्वदशापन्न, जून, पिका. [THAT IS RIPE AND READY TO FALL OR BE GATHERED -(A FRUIT) पाडाचा.] २ *sound, mature* पोक्त, प्रौढ, प्रबुद्ध, प्रगल्भ.

Rip'en *v. i. to grow ripe* पिकणें, पक्का -पक्व होणें, पक्वदशेस येणें, पक्वदशेचा होणें *g. of s.*, जुनावणें. -( as mangoes, tamarinds, etc. ) गुळमटणें, गाभुळणें, गारसणें, पाडास येणें -लागणें. -( a field of corn ) काळसरणें, काळवटणें. R. *v. t.* पिकवणें, पक्वदशेस आणणें, पक्वता *f.* आणणें *with* स *of o.* Rip'ened *pa. t.* R. *pa. p.* पिकलेला, पिकवलेला. [R. IN THE HOUSE, (PARTICULAR FRUITS) कोनपिका, कोनपीक, घरांत -आढींत पिकवलेला. R. ON THE TREE वरपिका, वरपीक, झाडावर पिकलेला.] Rip'ener *n.* पिकवणारा, पक्व करणारा, पक्व दशेस आणणारा. Rip'ening *pr. p.* पिकणारा, पक्व होणारा, पक्वदशेस येणारा. R. *v. n.* Ripe'ness *n.* पक्वपणा *m*, पक्वता *f*, परिपक्वता *f*, पक्वदशा *f*, पिकेपणा *m.* २ पोक्तपणा *m*, प्रौढपणा *m*, प्रागल्भ्य *n.*

Ripeness, See under Ripen.

Ripp'ing *pr. p.* R. *v. n.* चिरणें *n*, फाडणें *n*, विदारण *n.* २ उसवणें *n.* ३ उचकटणें *n*, विदारण *n.*

Ripple ( rip'l ) [Ety. dub.] *n. ruffling of water's surface* खळखळ *f*, ( *dim.* खळखळी *f.* *and intens.* खळाळी *f*, खळ्ळाळ *m*, ) चुळचूळ *f.* २ *a small wave* ( समुद्राच्या कांठची ) लहान लाट *f*, लघुतरंग *m.* R. *v. i. to make a murmuring sound* खळखळणें, खळखळ वाहणें, खळखळ वाजणें. २ *to have a ruffled or wrinkled surface* ( पृष्ठभागीं ) सुरकुत्या असणें, सुरकुतलेला असणें. Rip'pler *n.* खळखळणारा. Rip'pling *pr. p. a.* खळखळणारा, खळखळीत. Rip'plingly *adv.* खळकन्, खळकर, खळखळ, खुळखुळ.

Rise ( rīz ) [A. S. *risan*, to rise.] *v. i. to get up from lying* उठणें, उभा राहणें, उभारणी *f.* होणें *g. of s.* २ *to get out of bed* (निजून, अंथरुणावरून) उठणें. [To R. EARLY (निजून) लौकर उठणें. To R. LATE ( निजून ) उशिरां उठणें. ] ३ *to come to life again* (मेलेला फिरून) उठणें, (जीवंत) उठणें. ४ *to grow upwards* चढणें, वाढणें, वर-वरतीं -वरता *decl.* जाणें -येणें, ऊर्ध्वगति *f.* होणें *g. of s.* ५ *to reach higher position* चढणें, वाढणें, मोठा होणें, बढती *m* -चढती *f* -वृद्धि *f* -चढती दौलत *f* -होणें *g. of s.*, पारडें चढणें -जड होत जाणें *g. of s.*, न्यहाल होणें. ६ *to come up* (a heavenly body) वर येणें, उगवणें, निघणें, उदय *m.* होणें *g. of s.*, उदय *m.* पावणें, उदित होणें. ७ *to swell* ( a river )

चढणें, फुगणें, पाणी *n.* चढणें. ८ (a blister) उतणें, उठणें. ९ (a bread, etc.) फुगणें, फुलणें, दरदरणें, तरतरणें, चढणें, दरदर -दरदरां फुगणें. १० *to have origin* होणें, लागणें, उत्पन्न -चालू -सुरू -उपस्थित -प्रवृत्त होणें, उद्भवणें, उठणें, उद्भव *m* -होणें *g. of s.* ११ *to have source* (a river) निघणें, उगम पावणें, उगम *m.* होणें *g. of s.* १२ *to increase* वाढणें, चढणें, बळावणें, जोरावणें, अधिक होणें, जोर *m.* अधिक होणें *g. of s.*, वाढ *f* -वृद्धि *f.* होणें *g. of s.*, वृद्धि *f.* पावणें. १३ (rate, price, etc.) चढणें, महाग होणें, तेजी होणें *g. of s.*; *intens.* चणचणणें, (*intens.*) चणाणणें, चडचडणें, कडकणें. १४ (an article in price) (दर *m* -भाव *m* -धारण *f* -मोल *n.*) चढणें -वाढणें *g. of s.*, चढणें. १५ *to make revolt* उठणें, बंड करणें, बिथरणें, फिरणें *with* वर. १६ *to incline upwards* चढणें, चढ *m* -चढण *f.* लागणें. १७ (of meeting) *to cease to sit for business* उठणें, बरखास्त होणें. १८ (as a sea) लाटा *f. pl.* उठणें, क्षुब्ध होणें, उसळणें, भरती येणें.

Rise *n. coming up* वर येणें *n*, उगवणें *n*, उदय *m.* [SUN R. सूर्योदय *m.*] २ *ascent* आरोहण *n*, आरोह *m*, ऊर्ध्वगमन *n*, ऊर्ध्वगति *f.* ३ *upward slope* चढ *f*, *m*, चढण *f*, चढाव *m.* [R. AND DESCENT चढउतार *m.*] ४ *hill* उंचवटा *m*, उंचवळा *m*, उंचाड *n.* ५ *social advancement, increase in rank* चढती पायरी *f*, चढती *f*, उन्नति *f*, उत्कर्ष *m*, चढ *m*, चढती दौलत *f* -पराई *f* -कळा *f*, चढता पाया *m*, चढती कमान *f*, चढती बाजू *f*, तेजोवृद्धि *f*, उदय *m*, अभ्युदय *m.* [R. AND FALL OF NATIONS राष्ट्रांची उन्नति व अवनति.] ६ *increase in price* चढ *m*, तेजी *f*; *intens.* चडचड *f*, चणचण *f.* (b) चढाव, बढाव. ७ *increase* चढती *f*, चढ *m*, वाढ *f.* (b) भरती *f.* [RISE AND FALL चढउतार *m.*] ८ *origin* उत्पत्ति *f*, उद्भव *m*, उपज *m*, मूळ *n*, उगम *m*, आगम *m*, उपक्रम *m*, आरंभ *m*, प्रवृत्ति *f*, संभव *m.*

Ris'en *pa. p.* of Rise.

Ri'ser *n.* (*civ. eng.*) अंधारी *f*, दोन पायऱ्यांमधील उभी फळी *f*, तातरा *m.*

Risibil'ity *n.* हसनशीलता *f.* २ हास्यजनकता *f*, हास्योत्पादकता *f.*

Risible (riz'i-bl) [L. *risibilis -rideo, risum*, to laugh.] *a. inclined to laugh* हसणारा, हंसूं येणारा. २ *laughable, ludicrous* हास्यजनक, हास्योत्पादक, हंसूं येण्यासारखा, हंसण्यासारखा; as, "R. absurdities."

Ris'ing *pr. p.* Ris'ing *v. n.* (*act.*) उठणें, उभा राहणें *n*, अभ्युत्थान *n.* [R. TO RECEIVE VISITOR खडी ताजीम *f*, उत्थापन *n*, प्रत्युत्थान *n. all with v.* दे *or* घे.] २ निजून उठणें *n*, उठणें *n.* ३ वर जाणें *n*, चढणें *n.* ४ उगवणें; etc. See verb. [R. AND SETTING उदयास्त.] ५ *a revolt* बंड *n*, बंडावा *m*, बंडाळी *f.* ६ (Bible) *tumour* उबाळूं *n*, उंचवटा *m.* R. *p. a.* चढता, उगवता, उदयास येणारा, पुढें येणारा, भरभराटीस येणारा, उदयोन्मुख, उत्कर्ष पावणारा. [R. SUN उगवता सूर्य *m.* २ भरभराटीस चढणारा मनुष्य *m.* R. FRONT चढतें तोंड.]

Risk ( risk ) [Fr. *risque*, to risk -L. *reseco*, I cut back, I cut short.] *n. hazard* धोका *m*, जोखीम *f*, जोखम *n*, भय *n*, संकट *n*. [AT ALL RISKS कोणतेंही संकट आलें तरी, कोणताही धोका आला तरी, जरूर, कांहीं झालें तरी. TO RUN A RISK जोखीम पतकरणें. AT OWNER'S RISK मालकाच्या जोखमीवर. R. MONEY (क्याशरजवळ) अडीअडचणीकरितां (ठेवलेली) शिलक *f*.] (b) धाडस *n*, हिंमत *f*. R. *v. t. to hazard* धोक्यांत घालणें, धोक्यांत पाडणें. २ *to venture on* धाडस करणें, हिय्या *m*. करणें, हिंमत *f*. करणें.

Risk'y *a. hazardous* जोखमाचा, धोक्याचा, संकटाचा.

Risus Sardonicus *n.* (*med.*) धनुर्वातामध्यें होणारी चेहेऱ्याची ताण *f*.

Rite ( rīt ) [Fr. *rite* -L. *ritus*, rite. ] *n. a religious or solemn ceremony or observance* विधि *m*, कर्म *n*. आचार *m*, शास्त्रोक्त कर्म *n*, देवकार्य *n*, धर्मकृत्य *n*. [RITES AND CEREMONIES नेमधर्म *m. pl.*? NEGLECTFUL OF RITES AND ORDINANCES आचारभ्रष्ट, आचारहीन. REGULAR IN THE PRACTICE OF RITES AND ORDINANCES आचारसंपन्न, आचारशुद्ध.]

*N. B.*—Rite is an act while Ritual is a procedure. Rite is कर्म, विधि or आचार while Ritual is कर्मपद्धति, or आचारपद्धति, or विधि. विधि means both an act as well as a procedure.

Ritual ( ritū'-al ) [L. *ritualis*, -root of Rite. ] *a. consisting of or prescribing rites* कर्मपद्धतीसंबंधीं, कर्मपद्धतीचा, आचारपद्धतीसंबंधीं, आचारपद्धतीचा, विधीचा, विधिविषयक, विधिसंबंधीं, विधिरूप, विधियुक्त. R. *n. prescribed order of performing religious service* कर्मपद्धति, आचारपद्धति *f*, विधिपद्धति *f*, विधि *m*. २ *a book containing rituals* कर्मपद्धति *f*.

Rit'ualism *n.* आचारप्रधान संप्रदाय *m*, कर्मकांडसंप्रदाय *m*. २ कर्मनिष्ठा *f*, आचारनिष्ठा *f*.

Rit'ualist *n.* कर्मसंप्रदायी *m*, आचारसंप्रदायी *m*. २ कर्मपद्धतिपारंगत *m*. [संप्रदायी.

Ritualis'tic *a.* कर्मपद्धतीचा, कर्मपद्धतीसंबंधीं. २ कर्म-

Rival ( rī'val ) [ Fr. *rival* -L. *rīvālis*, one who lives on the opposite bank of a river.] *n. a competitor* प्रतिस्पर्धी, प्रतिद्वंद्वी *m*, प्रतिस्पर्धा -चढाओढ करणारा, सामनेवाला. [WITHOUT A R. अद्वितीय.] R. *a. competing* प्रतिस्पर्धी, बरोबरी करणारा, चढाओढ करणारा. R. *v. t. to try to equal or excel* बरोबरी *f* -सरोबरी *f*. करणें *with* शीं *of o. or g. of o.*, प्रतिस्पर्धा करणें, सामना करणें -मांडणें *with* शीं *of o.*, सर *f* -सरी *f*. करणें -लावणें *with* शीं *of o.*, झुंजणें, लढणें, टक्कर *f*. मारणें -खाणें *with* स *or* ला, तोलास तोल *m*. घेणें -देणें. Ri'valling *pr. p.* R. *p. a.* स्पर्धा करणारा, बरोबरी करणारा, सर करणारा, बरोबरीचा. Ri'valry *n. act of rivalling, competition* स्पर्धा *f*, प्रतिस्पर्धा *f*, चढाओढ *f*, चढाओढी *f*, चुरस *f*.

Rivalry, See under Rival.

**Rive** ( rīv ) [A. S. *reófan*, to tear.] *v. i. to split, to tear asunder* फोडणें, चिरणें, विदारणें, फाडणें; as, "To R. timber for rails or shingles." R. *v. i. to be split or rent asunder* भेग *f* -चीर *f.* जाणें, भेतळणें. Rived *pa. t.* Rived, Riv'en *pa. p.*

**River** ( riv'ėr ) [ Fr. *riviere* –L. *ripa*, a bank, a shore.] *n.* नदी *f*, नद *m* ( applied only to a R. personified as *male*, as, सिंधु, शोणभद्र, शिव, ब्रह्मपुत्र ). [BEND *or* ARM OF A R. नदीचा वांक *m.* BRANCH OF A R. फांटा. CURRENT OF A R. नदीचा प्रवाह *m.* DEEP PART IN A R. डोह *m*, कोंड *f*, *n.* DRY SPOT IN A R. खांड *m*, खांडवा *m.* ONE SUBSISTING ON OFFERINGS TO A SACRED R. गंगापुत्र *m.* SACRED R. गंगा *f.* SPOT WHERE THREE RIVERS MEET त्रिवेणी-संगम *m.* SWELLING OF A R. पूर *m*, उसाण *n.* WATERED BY RIVERS, ( A COUNTRY ) नदीमातृक, जलमातृक.] २ *a copious flow* पूर *m*, पाट *m*; as, "R.s of blood; *Rivers* of oil." R.-basin *n.* नदीच्या पाण्यानें पिकणारा दोहों कांठचा मुलूख *m*, नदीप्रदेश *m*, नदीचा जलप्रदेश *m.* R.-bed *n.* नदीचें पात्र *n.* R.-God *n.* नदीदेवता *f.* R.-head *n.* नदीचें उगमस्थान *n* -उगम *m.* R.-horse *n. the hippopotamus* जलघोटक, पाणघोडा *m.* R. side *n.* नदीच्या कांठावरील जमीन *f*, नदीकांठ *m.* R.-wall *n.* बांध *m*, धरण *n.*

**Rivet** ( riv'et ) [ Fr. *rivet*–Icel. *rifa*, to tack together.] *n.* दोहीं शेवटांनीं बोळवलेला खिळा *m*, रिबिट, रवीट ( रिबिट and रवीट are corruptions of the English word rivet. ) R. *v. t. to fasten with rivets* रिबिट मारून बोळवणें, रिबिटनें बांधणें -खिळणें -जोडणें. २ *to fasten firmly* पक्का करणें, न हालेसा करणें, खिळा मारून जाम बसविणें; खिळवणें, खिळवून टाकणें, जाम करणें. ३ *to fix* ( *the eye or mind* ) *intently* वेधून घेणें, वेधून ठेवणें.

**Rivulet** ( riv'ū-let ) [L. *rivulus* -*rivus*, a stream. ] *n. a small stream* ओढा *m*, ओहळ *f*, नाला *m*, पऱ्हा *m.*

**Roach** ( rōch ) [D. *roch*; Dan. *rokke*, a roach.] *n.* 'रोच' नांवाचा गोड्या पाण्यांतील मासा *m.*

**Road** ( rōd ) [Of Anglo-Saxon origin.] *n. way, path* रस्ता *m*, मार्ग *m*, वाट *f*, पथ *m*, पंथ *m.* [ R. METAL ( *civil eng.* ) खडी *f.* R. BOOK रस्त्यांची माहिती देणारें पुस्तक *n.* R. WAY रस्त्याचा मधला भाग *m.* R. WORTHY प्रवासाचे श्रम सहन होण्यासारखा, प्रवासांत वापरण्यासारखा, वाटेनें वापरण्यासारखा. ROYAL R. राजमार्ग *m.* TO TAKE THE R. रस्ता *m.* धरणें. ON THE R. वाटेनें, वाटेंत, रस्त्यांत. RULE OF THE R. ( गाड्यांकरितां व वाटसरांकरितां ) रस्ता वापरण्याचे नियम *m. pl.*] २ ( for ships ) नांगरवाडा *m.*

**Road'-stead** *n.* नांगरवाडा *m*, खुंटवडा *m*, गलबतें खुंटवण्याची जागा *f*, चिखली बंदर *n.*

**Roadster** ( Rōd'-stėr ) *n. a ship at anchor in a*

roadstead चिखली बंदरांत नांगरून टेवलेलें जहाज *n.* २ *experienced traveller* अनुभविक प्रवाशी *m.*

Roam (rōm) [Properly one who makes a pilgrimage to Rome.] *v. i. to ramble, to wander* भटकणें, फिरणें, हिंडणें, भ्रमण *n.* करणें, भटक्या *f. pl.* मारणें -मारीत फिरणें, -children or cattle वावडणें. Roam'er *n.* फिरणारा, भटकणारा, हिंडणारा. Roam'ing *pr. p.* R. *v. n.* फिरणें *n*, हिंडणें, *n*, भटकणें *n*, भ्रमण *n*, परिभ्रमण *n.* [R. FOR PLEASURE रमत फिरणें, रमणें, विहार *m.*]

Roan (rōn) [Ety. unknown.] *n. a dark reddish-brown colour with grey and white spots* मगजीरंग *m.* २ *a soft, flexible leather, made of sheepskin* (पुस्तकं बांधण्याचें) मगजीरंगाचें चामडें *n.* R. *a.* (horse) मगजीरंगाचा (घोडा *m*).

Roar (rōr) [A. S. *rārian*, to lament, to bellow.] *v. i. to send forth loud sound* (as of lion) गर्जना *f.* करणें, गर्जणें, डरकणें, डरकाळी *f.* फोडणें -मारणें, loosely गुरगुरणें. २ *to cry aloud from pain* ओरडणें, आरोळी फोडणें -मारणें, टाहो फोडणें, हेल *m.* काढणें, हेल काढून रडणें, मोठा गळा काढून रडणें, आक्रोश *m.* करणें, आक्साबोक्शीं रडणें, उक्साबोक्शीं रडणें, आकांत करणें. ३ *to send forth a deep hoarse sound* (as of sea, thunder, wind, cannon) गरजणें, गाजणें, घोघावणें, खळाळणें, कल्लोळ *m.* करणें, सोंसों वाहणें, गडाडणें, धडाडणें, दणदणणें, दणाणणें, भणभणणें, भणाणणें, दणका *m* -दणदणाट *m* -दणाण *m.* होणें -वाजणें *g. of* ., गर्जना *f.* करणें, गर्जणें. ४ *to talk loudly* गर्जना करणें *fig.*, गागणें, गळा *m* -घांटी *f.* फोडणें -फोडून बोलणें, गळा *m.* काढणें -काढून बोलणें, शिरा ताणणें -ताणून बोलणें, ओरड *f.* करणें; as, "You need not R." ५ खोखो हंसणें, खदखदां हंसणें; as, "The hearers *roared* at his jokes." R. *v. t. to proclaim loudly* जाहीर करणें, गर्जना करून सांगणें, उच्च स्वरांत सांगणें; as, "This last action will R. thy infamy." २ उच्च स्वरांत बोलणें -म्हणणें -घेणें; as, "To R. out words, chorus, oath, etc." ३ *to put down by roaring* डरकवणें, डरकावणें, डरावणें, दणदणणें, दणाणणें, दणगारणें, गुरकावणें. R. *n. the cry of a beast* गर्जना *f*, गर्जन *n*, डरकण *f*, डरकणी *f*, डरकाणी *f*, डरका *m*, डरकी *f*, डरकाळी *f*, गुरकणी *f*, गुरगुर or री *f*, गुरगुरणी *f*, आरोळी *f.* [R. OF A LION सिंहगर्जना *f*, सिंहनाद *m.*] २ आरोळी *f*, आकांत *m*, आक्रोश *m*, आक्रंदन *n*, ओरड *f.* [To SET UP A R. आरोळी ठोकणें, रडण्याचा आकांत मांडणें.] ३ *a loud sound* (as of sea, wind, thunder, cannon) गर्जना *f*, कल्लोल or ळ *m*, खळाळ *m*, घोघाट *m*, घोष *m*, गडाड *m*, धडाड *m*, भडाड *m*, भडभडाट *m*, कडकडाट *m*, दणका *m*, खणका *m*, ठांका *m*, दणदणाट *m*, दणाण *m*, दणाणा *m*, धूम *m.* ४ *a boisterous outcry or shouting in mirth* आरडाओरड *f*, गडबड *f*, बडबड *f*, हंशा *m*; as, "Pit, boxes

and galleries were in a constant R. of laughter." Roared *pa. t. & pa. p.* Roar'er *n.* गर्जना करणारा *m*, डरकणारा, डरक्या. २ ओरडणारा, आरोळी मारणारा, टाहोफोड्या. ३ गरजणारा, गाजणारा, दणदणणारा, धडाडणारा, etc. ४ आरडाओरड करणारा *m*, दंगा करणारा *m*, दंगेखोर *m*. Roar'ing *pr. p.* गर्जना करणारा, मोठ्यानें आवाज काढणारा, ओरडणारा, गरजणारा. २ गाजणारा, दणक्याचा. [ R. NIGHT वादळी रात्र, तुफानी रात्र *f.* २ ख्यालीखुशालींत -चैनवाजींत घालविलेली रात्र *f.* TO DRIVE A R. TRADE जोराचा व्यापार करणें. ]

Roast (rōst) [O. F. *rostir*, to roast.] *v. t. to cook by exposing to open fire* भाजणें, होरपळणें, होरपळून काढणें, उघड्या विस्तवावर -निखाऱ्यावर भाजणें. २ *to calcine ore in furnace* (अशोधित धातू) भट्टींत भाजणें. ३ *to ridicule* भाजणें *fig.*, ठट्टा *f* -टेर *f* -टर *f* -रेवडी *f* -हुररेवडी *f*. करणें *g. of o.* ४ काफीच्या बिया तव्यावर परतणें. R. *v. i.* भाजणें. R. *n. that which has been roasted* भाजण *n*, भाजप *n*, भाजका पदार्थ *m.* २ *roasted meat* भाजलेलें -होरपळलेलें मांस *n.* [To RULE THE R., *to domineer* सत्ता गाजवणें, आपला उपर ठेवणें.] R. *a.* भाजका, भाजलेला, (*remiss.* भाजकट, भाजट ), भाजींव, भर्जित, शूल्य. Roasted *pa. t.* and *pa. p.*

Roast'er *n.* भाजणारा. २ *ore-roasting furnace* (अशोधित धातू) भाजण्याची भट्टी *f.* ३ डुकर *n.* (b) भाजण्याजोगा पदार्थ *m.* Roast'ing *pr. p.* R. *v. n.* भाजणें *n*, भाजणूक *f*, भाजप *n*, भाजण *n*, भर्जन *n.* २ *med.* होरपळवणें *n.* ३ भाजणूक *f* (*fig.*), ठट्टा *f*, थट्टा *f*, टेर *f*, टर *f*, रेवडी *f*, हुररेवडी *f*.

Roasting, See under Roaster.

Rob (rob) [A. S. *reafian*, to rob.] *v. t. to take by force, to plunder* (जबर) चोरी करणें, चोरणें, लूट करणें, लुटणें, लुबाडणें, झांबाडणें, झांबडणें, हिरावणें, छिनावणें, छिनणें, छिनावून -हिरावून नेणें -घेणें, झोंबाडणें, झोंबाडून नेणें, अपहरण *n.* करणें *g. of o.* [To R. ON THE HIGH WAY वाट *f* -रस्ता *m.* मारणें *g. of o.*] Robbed *pa. t.* and *pa. p.*

Robb'er *n.* दरोडेखोर *m*, लुटारू *m.* [ATTACK (UPON A VILLAGE, ETC.) OF A GANG OF R.s दरवडा *m*, दरोडा *m*, डाका *m.* GANG R. दरोडेकरी, दरोडेखोर, डाकू. GANG OF R.s दरोडा *or* दरवडा *m.* HIGH WAY R. वाटमाऱ्या, वाटपाडू, वाटपाड्या.]

Robb'ery *n.* जबर चोरी *f*, मोठी चोरी *f.* २ लुटणें *n*, लूट *f.* [BY R. AND VIOLENCE चोरूनमारून. GANG-R. दरोडा *or* दरवडा *m.* R. AND VIOLENCE चोरीमारी *f.*]

Robb'ing *pr. p.* and *v. n.*

Robe (rōb) [Fr.] *n.* झगा *m*, चुगा *m*, फरगोल *m.* [ R. OF HONOUR PRESENTED BY A KING, ETC. (मानाचीं) वस्त्रें *n. pl.*, खिलात *f.* R. AND TURBAN BESTOWED IN HONOUR *cf.* शेलापागोटें *n*, शिरपाव *m.* THE LONG R. वकिलाचा झगा *m.* THE GENTLEMEN OF

THE R. वकील *m. pl.*] R. *v. t. to dress* अधिकाराचीं वस्त्रें चढविणें, झगा घालणें, पोषाख चढवणें.

Rober Caroli *n.* (*astron.*) [Charles' oak] पारिजात. ही राशी दक्षिणगोलार्धांत आहे.

Robust (rō-bust') [Fr. *robust* –L. *robustus* -*robur*, oak, strength.] *a. sturdy, very strong* धट्टाकट्टा, धट्टाखट्टा, धडधाकट, बळकट, जोमदार, मजबूत. २ (of exercise) *requiring strength* बळाचा, जोराचा, शक्तीचा. (b) शक्तिवर्धक, उत्साहवर्धक. ३ (of intellect) *sensible, straightforward* दांडगा, विशाल, जोराचा, जोमाचा.

Robust'ness *n.* धट्टेकट्टेपणा *m*, दांडगेपणा *m*, जोम *m*, जोर *m*, बळकटी *f*, मजबुती *f*.

Rock (rok) [Fr. *roc, roche*, a projection.] *n. a large mass of stone* खडक *m*, खडपा *m*, धोंड *f*, शिला *f*, दगड *m*. [FLAT R. IN THE SEA कांसा *m*. HARD AS A R. शिलाघन. LARGE R. खडक *m*. LEDGE OF R. दांडा *m*, खडक *m*. PROJECTING R. विंडा *m*. PYRAMIDAL *or* PEAKED R. सुळकी *f*. R. IN THE SEA कांटा *m*, खरावा *m*. SHEET OR STRATUM OF R. कातळ *n*, खडक *m*, खडकूत *n*, खडप *n*, खडपा *m*, खडकाळ *n*, खडकाळी *f*, तवा *m*. SOFT, FRIABLE R. तुशा खडक *m*. TO CAUSE THE R. TO FLOW *lit. and fig.* दगडास पाझर आणणें. BUILT OR FOUNDED ON THE R. भंग नसलेला, अभंग. R. OF AGES ख्रिस्त. TO RUN UPON THE R.s खडकावर आदळून फुटणें. TO SEE R.s AHEAD पुढें खडक दिसणें, पुढील अडचणी दिसणें.] २ (*Geol.*) प्रस्तर *m*, खडक *m*. [CRYSTALLINE R. स्फटिकमय प्रस्तर, स्फटिक खडक. FOSSILIZED R. अश्मीभूत खडक. IGNEOUS R. अग्निजन्य खडक. IMPERVIOUS R. अभेद्य खडक *m*. METAMORPHIC R. रूपांतरित खडक. PLUTONIC R. पातालिक खडक. STRATIFIED R. स्तरीभूत खडक. SUBMARINE R. सिंधुमग्न खडक.] R.-oil *n.* मातीचें तेल *n*, भूमितैल *n*, राकेल *n*, घासलेट *n*. R.-salt *n.* शेंदेलोण *n*, शेंधेलोण *n*, सिंधुलवण *n*. R.-tar *n. petroleum* पेट्रोलियम तेल *n*.

Rock (rok) [A. S. *roccian*, to rock.] *v. i. to sway backward and forward* डोलणें, झुलणें, आंदुळणें, हांदुळणें, हांवदुळणें, आंदोलन *n.* होणें *g. of o.*, डगमगणें, डकडकणें, *intens.* लटलटणें, लटपटणें, लटपट हलणें. R. *v. t. to move to and fro* हालवणें, झुलवणें, डोलवणें, आंदुळणें, हांदुळणें हांवदुळणें, झुलेसा -डोलेसा करणें, झोंके *m. pl.* देणें; as, "Sat *rocking* himself in his chair." २ *to move gently* (*as in a cradle*) पाळण्यांत हलवणें, पाळण्यांत घालून झुलवणें -झोंके *m. pl.* देणें; as, "R. him to sleep." Rock'er *n. one of the curved bars on which a cradle rocks* (झुलता) पाळणा टांगण्याची दांडी *f*. Rock'ing *pr. p.* डळमळीत, डळडळीत, डगडगीत, लटपटीत. R. -chair डोलती खुर्ची *f*.

Rocker, See under Rock.

Rocket (rok'et) [It. *rocchetta*, from root of *rock*, a distaff, because its thick upper end is like a distaff.] *n. a firework sent up high in the air, used for amusement or for making military or naval signals* बाण *m*, कळकीबाण *m*, अग्निबाण *m*. [BUNDLE OF TWENTY FOUR ROCKETS केंची *f*. SKY R. हवई *f*, *or* हवाई *f*.] (b) लष्करी किंवा आरमारी (सोडलेला) बाण *m*. (c) खलाशांकरितां (सोडलेला) बाण *m*. R. *v. i.* (of horse or its rider) *to bound upwards or dart like a rocket* बाणासारखा उडणें. Rocket'ing *n.* (of birds) *flying up straight into the air when disturbed* बाणासारखें हवेंत उडणें *n*.

Rock'y *a. full of rocks* खडकाळ, खडकळ, खडकाचा, कातळाचा, कातळवट. २ *resembling rock* खडकासारखा.

Rod (rod) [A. S. *rod* -L. *rudis*, a rod.] *n. a slender, straight round stick* काठी *f*, छडी *f*, शलाका *f*. [SPARE THE R. AND SPOIL THE CHILD छडी लागे चमचम विद्या येई घमघम. TO MAKE A R. FOR ONE'S OWN BACK नसतें विघ्न उपस्थित करणें. TO KISS THE R. निमुटपणें शिक्षा सहन करणें. TO HAVE A R. IN PICKLE FOR शिक्षा करण्यास छडी तयार ठेवणें]. २ (as a symbol of office) अधिकारदंड *m*, वेत्र *n*, छडी *f*. [BEARER OF THE R. छडीदार, छडीबरदार.] ३ (as measure) काठी *f*. ४ *a pole for angling* काठी *f*.

Rodent (rō'dent) [L. *rodens*, *rodentis*, *pr. p.* of *rodo*, I gnaw.] *a. gnawing* कुरतडणारा, ध्वंसक. R. *n.* तीक्ष्णदंत प्राणी, तीक्ष्णदंती; as, उंदीर, खार.

Rodomontade (rod-ō-mont-ād') [Fr. -It. *Rodomonte*, a boastful personage in the *Orlando Furioso* (a poem by Ariosto, an Italian, (1474-1533).] *n. vain boasting* (वृथा) फुशारकी *f*, (वृथा) बढाई *f*, (नसती) प्रौढी *f*, अरेरावकी *f*, अरेरावी *f*, टाराटुरी *f*, टाराटोरी *f*, डौला *m*, गट्टापट्टा *m*.

Roe (rō) [Ger. *rogen*, roe.] *n. the spawn (eggs) of fishes* माशाचीं अंडीं *n. pl*.

Roe (rō) [A. S. *rah*; Ger. *reh*, roe.] *the female of the hart* हरिणी *f*, हरणी *f*, मृगी *f*.

Roe-buck *n. male roe* हरिण *m*.

Rogue (rōg) [Fr. *rogue*, arrogant.] *n. a knave, a rascal* लुच्चा *m*, ठक, ठग, ठकव्या, फसव्या, ठकबाज, दगेबाज, दगेखोर, दगलबाज, लबाड, सोदा, गुलाम, गुलामजादा, धूर्त, शठ, वंचक, धतुऱ्या, खट, काबूयार, काशीकर, दिल्लीचा, अवरंगाबादी, हिल्लेबाज. [A PACK OF R.S चांडाळचौकडी *f*. SLIPPERY R., ARCH R. बिलंदर *m*, वाटोळा गोटा. EVERY R. IS AT LENGTH OUTROGUED शेराला सवाशेर भेटतोच आहे.] २ *a child full of fun and mischief* गुलाम, गुंड, गुंडा, लुच्चा. ३ *an elephant living apart from others and of savage temper* (कळपांतून फुटणारा) लुच्चा हत्ती *m*. R. *v. t. to act the rogue, to cheat* लुच्चेगिरी *f*. करणें, दगलबाजी *f*. करणें, ठकबाजी *f*. करणें, फसविणें, etc.

Rog'uery *n. the act of a rogue* लुच्चेगिरी *f*, ठकबाजी *f*, लुच्चाई *f*, ठकाई *f*, ठगाई *f*, ठकविद्या *f*, दगाबाजी *f*, दगलबाजी *f*, सोदेगिरी *f*, सोदेशाई *f*, लबाडी *f*, शाठ्य *n*, लबाडीलाचाडी *f*, धत्तुरा (*v*. दाखव), फसवेगिरी *f*, छटपणा *m*, धूर्तता *f*, धूर्ताई *f*.

Rog'uish *a*. लुच्चा, ठक, ठकाऊ, फसव्या, छट, लबाड, लबाडलाचाड, ठकारू, खटनट, धूर्त, शठ, वंचक. Rog'uishly *adv*. Rog'uishness *n*.

Roil (roil) [O. Fr. *roeler*, *roler*, to disturb.] *v. t. to render turbid* गढूळ करणें, गदळ करणें, रेंदा करणें. २ *to vex, to offend* चीड आणणें, रागास आणणें, खपा -क्षुब्ध *etc*. करणें.

Roist, Roister (roist, rois'ter) [O. Fr. *rustre*, a rough, rude fellow –L. *rusticus*, a rustic.] *v. i. to revel noisily* बेफाम होणें, आरडाओरड करणें, धुमश्चक्री करणें, ख्यालीखुशालींत -चैनींत धुंद असणें.

Roist'er, Roist'erer *n*. आरडाओरड करणारा *m*, धुमश्चक्री करणारा, ख्यालीखुशालींत धुंद असणारा, ताळ सोडणारा. [मस्त, धुंद.

Roist'ing, Roist'ering *pr. p*. ख्यालीखुशाली करणारा,

Role (rōl) [Fr. *rōle* –L. *rotulus*, dim. of *rota*, a wheel.] *n. the part played by an actor* (नटाची) or (नटानें केलेली) भूमिका *f*, पार्ट *m*, सोंग *n*. २ *one's task or function* अंगीकृत कार्य *n*, पतकरलेलें -अंगावर घेतलेलें काम *n*, भूमिका *f*, सोंग *n*.

Roll (rōl) [O. F. *rolle* –L. *rotulus* -*rotula* -*rota*, a wheel.] *n. a cylinder formed by turning flexible fabric over and over upon itself* रोळ *m*, वळकटी *f*, वळी *f*, वळवटी *f*, वळवंटी *f*, बिंडा *m*, गुंडाळा *m*, गुंडळी *f*, गुंडळें *n*, गुंडाळी *f*, गुंडाळें *n*, गुंडा *m*, गुंडी *f*.—esp. of paper or cloth सुरळी *f*.—esp. of thread, etc. चिवट *n*? कोपरी *f*? कडी *f*?—of the betel-leaf पट्टी, विडी *f*.—of tape, rope भेंडाळें, भेंडोळें *n*, पेंडोळें *n*, गुंडें *n*.—as of dough, butter, &c. लाटा, लाट्या *m*., *dim*. लाटी *f*. २ *a document, esp. official record* सरकारी कागदांची गुंडाळी *f*. ३ *a register or catalogue* पट *m*, तक्ता *m*, नांवनिशी *f*, यादी *f*, इसमवारी *f*, फर्द *f*, फर्दा *m*; as, "In the R. of saints; A long R. of heroes." (b) (विद्यार्थ्यांचा किंवा पदवीधरांचा) पट *m*. [To STRIKE OFF THE ROLLS पटावरून नांव काढून टाकणें. २ (सालिसिटरचा) धंदा करण्याची मनाई करणें. R.-CALL हजिरी *f*. R. OF HONOUR (लढाईंत कामास आलेल्या) सन्मानितांची यादी *f*.] ४ *rolling motion* हेलकावा *m*, झोका *m*, हांदुळा *m*. ५ *rolling gait* डुलत चालण्याची तऱ्हा *f*, डुलकी चाल *f*. ६ *quick continuous beating of drum* ताशेरा *m*, तासरा *m*. *v*. झाड. ७ *long peal of thunder* मेघनाद *m*, मेघगर्जना *f*, मेघांचा गडगडाट *m* -कडकडाट *m*.

Roll *v. t. to move in some direction by turning over and over* गरगर लोटणें, लोटून नेणें, लोटीत नेणें,

गरगरवून नेणें, घरळवणें, घुळवणें. २ *to make to revolve* वाटोळा -गरगर फिरवणें, फिरवणें, गरगरवणें. ३ *to wrap* गुंडाळणें, लपेटणें, वेष्टणें, वेढणें. (b) (with *up*) गुंडाळणें, गुंडाळा *m* -वळकटी *f.* करणें; as, "*Rolled* himself *up* in the blankets." ४ (of eyes) *to change direction of with rotatory motion* गरगर फिरवणें, गरगरावणें. ५ *to flatten by passing roller over* लाटणें. [LUMP OR MASS OF DOUGH TO BE ROLLED OUT लाटी *f*, लाटा *m.*] R. *v. i. to move by turning over and over* लोटणें, घरळणें, घरंगळत येणें -जाणें -फिरणें -चालणें, घुळणें, फिरणें. २ *to sway or rock* (as a ship) डुलणें, डोलणें, आंदुळणें, हांदुळणें, हांवदुळणें, हेलकावणें, हेलावणें, हेलकावे *m. pl.* -झोके *m. pl.* -डोल *m. pl.* खाणें, (बोट वगैरे) हलणें. ३ *to wallow* लोळणें, गडबड लोळणें, गडबडां लोळणें, लोटांगण *n.* घालणें,—esp. as in dogged resistance लोळण *f* -लोळकंड *f* -लोळकण *f.* घेणें -मारणें -घालणें. ४ (*about* as in pain) वळवळणें, लोळणें, वळवळ *f.* करणें -मांडणें. ५ (*over* of time) लोटणें, लोटून जाणें, गुजरणें, गत होणें. ६ (with *down or along*) वरंगळणें, वरंघळणें. ७ (of horse) *to lie on back and kick about* लोळण घेणें, लोळी *f.* करणें, लोळी *f.* येणें *in. con.*

Roll-call, See under Roll *n.*

Rolled *pa. t.* and *pa. p.* [R. IRON BEAMS चरकांतल्या लोखंडी तुळया.]

Roll'er *n.* Form nouns from the verb to Roll. २ (*phys.*) परिवर्तनयंत्र *n*, रूळ *m.* ३ लाटणें *n*, लाटणी *f.* ४—for levelling ground रूळ *m.* ५ (as of a mortar) लाढ्या *m.*—of stone वरवंटा *m.* ६ (of an oil-mill) लाट *f.* ७ *bandage* (लांब व रुंद) पट्टा *m*, *dim.* पट्टी *f.* [CLOTH-ROLLER कापड गुंडाळण्याचा बीम, थूर. ROLLER-SLIDE रुळाची सरकणी.]

Rollick (rol'lik) [L. *rotulus*, *rota*, a wheel.] *v. i. to play about in a boisterous manner* हुतुतू घालणें, दंगा -गडबड करणें. R. *n. exuberant gaiety, frolic* हुतुतू *m*, मस्ती *f*, दंगा *m.*

Rol'licking *a. frolicsome* दंगा करणारा, मस्ती करणारा, हुतुतू घालणारा.

Roll'ing *pr. p.* and *v. n.* गरगर फिरणारा.

Rolling-pin *n.* लाटणी *f*, लाटणें *n.*

Rolling stock आगगाडीचे मालाचे डबे, वाघिणी *f. pl.*

Romaic (rō-mā'ik) [Fr. *Romaique* -Modern Gr. *Rhōmaikos* -*Rhōmē*, Rome.] *n. the modern Greek language* अर्वाचीन ग्रीकभाषा *f.* R. *a.* अर्वाचीन ग्रीकभाषेचा.

Roman (rō'man) [L. *Romanus* -*Roma*, Rome.] *a. of Rome* रोमचा, रोमशहराचा. R. *n. an inhabitant of Rome or the Roman Empire* रोम येथें राहणारा, रोमशहरवासी, रोमन *m*, रोमकर. (b) रोमचे साम्राज्यांत राहणारा. २ (*print.*) रोमन टाईप *m.* (abbrev. Rom.)

Roman Catholic *n.* रोमच्या पोपला सर्व धर्मप्रकरणांत श्रेष्ठ मानणारा *m*, रोमनक्याथोलिक.

Romance ( rō-mans' ) [L. *Romanus*, adj. of *Roma*, Rome.] *n. a highly imaginative or fictitious tale* अद्भुत कथा *f*, कादंबरी *f*, असंभूत कथा *f*, अद्भुत गोष्ट *f*. २ अद्भुत वाङ्मय *n*. ३ *a poetic episode in one's life* आयुष्यांतील अद्भुत गोष्ट *f*, अद्भुत प्रसंग *m*. कल्पितकथा -गोष्ट *f*. ४ *a fiction* थोतांड *n*, भंडपुराण *n*. ५ अद्भुतप्रियता *f*. R. *v. i. to write or tell romances* कादंबरी *f*. लिहिणें -सांगणें, अद्भुत कथा लिहिणें. २ *to exaggerate* अतिशयोक्ति करणें, अतिशयोक्तीचें वर्णन करणें.

Roman'cer, Roman'cist *n.* कादंबरी लिहिणारा *m*, अद्भुत कथा लिहिणारा, कादंबरी लिहिणारा.

Ro'manism *n.* रोमनक्याथोलिक धर्म *m*, रोमनक्याथोलिक धर्मपंथ *m*.

Ro'manist *n.* रोमनक्याथोलिक पंथाचा अभिमानी *m*. २ रोमनक्याथोलिकपंथी.

Ro'manize *v. t. to make Roman in character* रोमन स्वरूप देणें, रोमन करणें. २ *to make Roman Catholic* रोमनक्याथोलिक करणें, रोमनक्याथोलिक पंथाची दीक्षा देणें. R. *v. i.* रोमनक्याथोलिक होणें, रोमनक्याथोलिक पंथाची दीक्षा घेणें.

Roman'tic *a. imaginative* ( person ) अद्भुतप्रिय, अद्भुतमनस्क, अद्भुतवृत्ति. २ *wild* ( notions, etc.) अद्भुत, विचित्र, आश्चर्यभूत, अव्यवहार्य, विक्षिप्त, विलक्षण, अद्भुतरसाचा, अद्भुतरसात्मक, अद्भुतरसप्रचुर.

Rom'ish *a.* ( used in a disparaging sense ) रोमनक्याथोलिक पंथाचा, रोमनक्याथोलिक धर्माविषयींचा, रोमनक्याथोलिक धर्मासंबंधींचा,रोमनक्याथोलिक पंथास चिकटून राहणारा.

Romp ( romp ) [Fr. *ramper*, to creep, to climb. ] *v. i. to play or skip about noisily* खिदळणें, खिदडणें, धिंगडणें, धांगडणें, धिंगाणा *m* -धांगडधिंगा *m*. घालणें -मांडणें -माजवणें, नाच *m*. मांडणें, बोकळणें. R. *n. a girl who so plays* घोडगी *f*, घोडी, भोपळदेवता *f*, टोणगी *f*. २ *rude frolic* धिंगाणा *m*, धिंगामस्ती *f*, खिदडा *m*, खिदडणें *n*, धांगडणें *n*, धुमकूस *f*, धुडकूस *m*, धुडगूस *m*, धुमड *f*, धुमश्चक्री *f*, धुमाकूळ *m*, धांगडधिंगा *m*, धाबडधिंगा *m*, धिवडी *f*, तातकथय्या *m*, ताथय्या *m*, थैथैय्या *m*, थैथैयाट *m*, थैकार *m*, हंगामा *m*, हमामा *m*, हुतुतू *m*, बोकंदळ *n*.

Romp'er *n.* खिदडणारा, धांगडणारा, धिंगडणारा, धिंगाणा मांडणारा, धांगडधिंगा घालणारा *m*.

Romp'ing *pr. p.* R. *v. n.* खिदडणें *n*, धांगडणें *n*, धिंगडणें *n*.

Rondeau ( ron'dō ) [Fr. *rond*, round.] *n. a short rhymed poem of thirteen ( sometimes ten ) lines* तेरा ओळींचीं सयमक कविता *f*, त्रयोदशपदी कविता *f*.

Ronion ( run'yun ) [Fr. *rogneux* *rogne*, mange.

*odd, queer* विलक्षण, तऱ्हेवाईक, विक्षिप्त, विक्षिप्तपणाचा; as, "A R. idea; A R. fellow."

Rumble (rum'ble) [Of Danish origin.] *v. i. to make a continuous rolling noise* गडगडणें, or घडघडणें, घरघरणें, गरजणें, गडगड -गडगडां वाजणें—*intens.* गडाडणें, घरारणें. २ (*belly*) गुरगुरणें, घुरघुरणें, गरबरणें, घरघरणें. R. *v. t. to utter with a rumbling sound* गडगड स्वरानें सांगणें -बोलणें -बोलून दाखविणें. Rum'ble *n.* गडगडणें *n*, गडगड आवाज *m*, घडघड *f*, घरघर *f*, intens. गडाड *m*, गडगडाट *m*, घडाड *m*. २ गुरगुरणें *n*, गुरगूर *f*. ३ *a seat behind a carriage* (for servants or luggage) (नोकरासाठीं किंवा सामानासाठीं) गाडीच्या पाठीमागील बैठक *f*. Rum'bling *v. n.* गडगडणें *n*, गडगड आवाज *m*. Rum'blingly *adv.* गडगड आवाज करीत, गडगडत, घडघडत.

Ru'minant *a. chewing the cud* रवंथ करणारा, रोमंथक. २ *thoughtful, quiet* ध्यान करणारा, मनन *n* -चिंतन *n*. करणारा, ध्यानशील, मननशील, मनन करण्यांत गढून गेलेला, ध्यानासक्त. R. *n.* रवंथ करणारा प्राणी *m*, रोमंथक *m*.

Ruminan'tia *n. pl.* रवंथ करणारे प्राणी. ह्यांत उंट, बैल *m*, गाय *f*, मेंढा *m*, हरिण वगैरेंचा समावेश होतो.

Ruminate (rōō'mi-nāt) [L. *rumino -ruminatum -rumen*, the throat, gullet.] *v. i.* and *t. to chew the cud* रवंथ करणें, रोवंथ -रोंथ *m* करणें, रोमंथ *m*. करणें. २ *to meditate, to think deeply over* ध्यान *n* -मनन *n*. करणें, ध्यानांत असणें, (-वर) विचार करणें -चालवणें; as, "Apart from the hope of the gospel, who is there that *ruminates* on the felicity of heaven?"

Rumina'tion *n.* रवंथ करणें *n*, रवंथ *m*, रोमंथ *m*. २ ध्यान करणें *n*, मनन *n*. करणें *n*, ध्यान *n*, मनन *n*, चिंतन *n*.

Ru'minator *n.* मनन करणारा.

Rummage (rum'āj) [A. S. *rum*, room.] *v. t. to turn* (*things*) *over and about* (*usually in search for something*) धुंडाळणें, धांडळणें, हुडकणें, चाळणें, धुंडाळा *m* -चाळाचाळ *f* -चाळाचाळी *f* -उचलाउचल *f* -उचलासांचल *f*. करणें *g. of o.* [To TURN TOPSY-TURVY IN RUMMAGING अस्ताव्यस्त करणें, उलथापालथा करणें, पालथा घालणें.] २ *to fish out or up from among other things* शोधून काढणें, धुंडून काढणें, धुंडाळून काढणें. R. *n. a careful search* धुंडाळणें *n*, धुंडाळणी *f*, धुंडाळा *m*, चाळाचाळ *f*, चाळाचाळी *f*. २ (कस्टमअंमलदारानें घेतलेला) गलबताचा झाडा *m*. ३ *things got by rummaging miscellaneous accumulation* धुंडाळून काढलेल्या किरकोळ वस्तु *f. pl.* Rum'maged *pa. t.* R. *pa. p.* धुंडाळलेला, धुंडाळून काढलेला.

Rum'mager *n.* धुंडाळणारा, धुंडाळ्या, धुंडाळा करणारा

Rummage-sale *n. a sale of unclaimed goods* (गोदींतील) बेवारशी मालाची विक्री *f.* २ *a sale of odds and ends* (धर्मार्थ दिलेल्या) किरकोळ सामानाची विक्री *f.*

Rum'maging *pr. p.* and *v. n.*

Rummer (rum'ėr) [Of Dutch origin.] *n. a large drinking glass* दारू पिण्याचा मोठा गलास *m.*

Rumour (rōō'mur) [Fr. –L. *rumor*, a noise, murmur, report.] *n. a report, a hearsay* कंडी *f*, गप्प *f*, वार्ता *f*, गुणगुण *f*, अफवा *f*, कुणकुण *f*, अवई *f*, ध्वनि *m.* [GENERAL OR POPULAR R. भुमका *f.*] R. *v, t. to noise abroad, to spread news* कंडी पिकवणें, अफवा पसरणें, अवई *f.* फेंकणें -उडवणें -पसरणें *g. of o.* [TO BE RUMOURED ABROAD कंडी *f.* पिकणें -पसरणें, भुमका *f.* पसरणें.]

Rump (rump) [Of Icelandish origin.] *n. the tail end of an animal* ढिमोरा *m*, चौक *m*, कुकडी *f*, ढुंगण *n.* [TO SINK IN AT THE R. (COW, AT CALVING OR YEANING) खोलटणें, खोलगटणें, अंकडे *m. pl.* मोडणें *g. of s.*, शेपखळी *f.* पडणें *g. of s.*] २ *the hinder part* मागचा भाग *m*, पृष्ठभाग *m*, पश्चाद्भाग *m.* ३ *the fag-end of anything* अवशिष्ट भाग *m.* [RUMP PARLIAMENT क्रामवेलनें मोडलेल्या पार्लमेंटचा अवशिष्ट भाग *m*, अवशिष्ट पार्लमेंट.]

Rumple (rum'pl) [A. S. *hrympelle*, a wrinkle, a fold.] *v. t. to make wrinkles in* सुरकुत्या *f. pl.* पाडणें, चुण्या पाडणें, चुरणें, चुरडणें, घुरदळणें, गुडधावणें, गुधडणें, घुसडणें, कुसमाडणें, कुसमडणें, गुधडगुधडा *m.* घालणें, गुरधळ -गुरधळी *f.* घालणें -मांडणें, चोळाबोळा *m.* करणें *g. of o.*, चुरगळी करणें. २ *to put out of shape* बेढब करणें, चुरडून -मुरडून टाकणें. R. *n. a fold or wrinkle* सुरकुती *f*, चुणी *f.*

Rum'pled *pa. t.* R. *pa. p.* सुरकुत्या पाडलेला, चुरडलेला, घुरदळलेला.

Rum'ply *a. in a rumpled state* सुरकुत्या पडलेला, सुरकुतलेला, चुरडलेला.

Run (run) [Of Anglo-Saxon origin.] *v. i.* धांवणें, पळणें, धांवत येणें -जाणें, धांव मारणें, पळत जाणें -येणें, धांव *f.* ठोकणें, धूम *f.* मारणें, दौडणें. २ *to flee, to abscond* पळणें, पळून जाणें, पळ *m.* काढणें, बारा करणें, बाराचें करणें -म्हणणें, बाराचा फाळा *m.* वाचणें, बाराचे लेख *m. pl.* वाचणें, पळपट *f* -पळण *f.* होणें *g. of s.*, गच्छं *n* -गच्छंतीचें *n* -गच्छंती *f* -पोबारा *m.* करणें -म्हणणें, यःपलायाचें *n* -यःपलायन *n* -यःपलाय *m.* करणें -म्हणणें, शेपूट *f* -शेपटी *f.* झाडणें, झ्या *f. or* झ्याझ्या *f.* करणें. [TO R. AWAY COWARDLY शेपूट *n.* घालून पळणें. TO R. AWAY OPENLY, BOLDLY, DEFYINGLY ETC. हातावर हात देऊन *or* मारून पळणें -जाणें, हातावर तुरी देऊन पळणें.] ३ *to advance as by rolling or on wheels* घरंगळणें, घरंगळत जाणें, घळघळत जाणें. [RUNNING HAND लेखणी न उचलतां लिहिलेलें अक्षर *n*,

एकटाकी लेख *m.* HOW YOUR TONGUE RUNS जीभ किती लवलव हालते ! किती बोलतां!] ४ *to compete in a race* शर्यतींत धांवणें, शर्यतींत (-वा) येणें; as, "Ran second." ५ *to seek election* निवडून येण्याची खटपट करणें; as, "*Ran* for Parliament." ६ *to be current or operative* चालू राहणें, चालणें, अंमलांत राहणें; as, "Contract *runs* for seven years." [PLAY RAN HUNDRED NIGHTS सारखे शंभर खेळ झाले. COURAGE RUNS IN THE FAMILY कुटुंबांतील सर्व माणसांत धैर्य दिसतें.] ७ (of public conveyance by land or water) *to ply* (*from, to, between*) जाणें, जाणेंयेणें, खेपा घालणें, जाये करणें. ८ (of fire, news, etc.) *to spread rapidly from point to point* पसरणें; as, "News *ran* like wild-fire." ९ (of colour in fabric) *to spread from the dyed to the undyed parts* पसरणें, फुटणें, चरणें. १० (of thought, memory, etc.) *to pass in transitory or cursory way* चटकन वरून जाणें, फिरणें; as, "Eye R.s over object." [RUNNING COMMENTARY ओझरती टीका *f.*] ११ (of liquid, &c.) *to flow, to drip* गळणें, निझरणें, झरणें, वाहणें. [ONE'S BLOOD RUNS COLD रक्त गोठून जातें. THE SANDS ARE RUNNING OUT काळ जवळ आला, मृत्यु समीप आला. TO RUN DRY कोरडा ठणठणीत होणें, संपणें. To R. LOW, To R. SHORT खुटणें, तुटवडा येणें, खलास होणें.] १२ *to extend, to be continuous* (सारखा) वेढणें -असणें; as, "Fence *runs* round the house." १३ *to progress, to proceed* (time) जाणें, चालणें. १४ (of a slit) *to be enlarged* (चीर *f*-तोंड *n*-द्वार *n.*) मोठें होणें. १५ (of sore) *to flow with or emit* (pus, &c.) वाहणें, बरबरणें, लस वाहणें, लस निघणें, उबरणें, उबारणें, दुभणें. [RUNNING SORE वाहणारी जखम *f.*] R. *v. t. to make run or go* धांवविणें, पळवणें, धावडवणें, दवडणें, पिटविणें. २ *to pursue or to follow* चालवणें, अनुसरणें; as, "Things must R. their course." ३ *to make way swiftly through or over* घुसणें, घुसून जाणें, रस्ता करणें -काढणें. ४ *to pierce in* भोसकणें, ढोसकणें, खुपसणें, खोंचणें. ५ *to wander about* भटकणें, भटक्या मारणें; as, "*Ran* the streets." ६ *to chase, to hunt* पाठलाग करणें; as, "*Ran* fox five miles." [To R. A SCENT वासावर जाणें. To R. TO EARTH पाताळांतून हुडकून काढणें, पुरा पुरा शोध करणें. To R. ONE HARD चीत करणें.] ७ चालविणें, हाकणें, चालू -सुरू ठेवणें; as, "To R. a business." ८ (a seam) धांवता दोरा घालणें. ९ (a hazard) जोखमांत टाकणें. With prepositions:— R. across, *to fall in with* सहज भेटणें, गांठ पडणें. R. after, *to give much time to pursuit of* (-च्या) पाठीमागें लागणें, भरीं-भरणें *g. of o.*, नादीं भरणें -लागणें, नादावणें, छंद *m.* धरणें -घेणें *g. of o.*, छंदास लागणें *or* भरणें, हांव *f.* सुटणें. २ *to pursue with attention* पाठीस लागणें *g. of o.*, (-च्या) मागें लागणें, R. against, *to fall in with* (-वर)

हापटणें, आदळणें. R. at, *to assail by charging or rushing* हल्ला करणें, (-वर) चालून जाणें. R. into, *to fall into* (practice, etc.) (संवय) लागणें, (आंत) पडणें, होणें. २ *to have collision with* शीं टक्कर होणें. ३ *to reach or attain* पोंचणें, मजल मारणें; as, "The book *ran into* five editions." R. on, *to continue a course* चालू ठेवणें. २ *to abuse with sarcasms* (-वर) घसरणें. R. over, *to review, to glance over* वर नजर फेंकणें, वर डोळा फिरवणें. २ *to recapitulate* गोळाबेरीज *f*·गोषवारा *m*. सांगणें. ३ (of vehicle) *to pass over* (a prostrate person) वरून जाणें, (अंगावरून) जाणें. R. through, *to examine cursorily, to peruse* वरवर पाहणें -वाचणें, (बुकाचीं वगैरे) पानें चाळणें. २ *to consume* (*estate, etc.*) *by quick spending* उधळमाधळ करणें, उधळपट्टी करणें. ३ *to pervade* व्यापून टाकणें. ४ भोंसकणें, खुपसणें. R. to, *to reach* पोंचणें; as, "The number *ran* to hundred." With adverbs:—R. about, *to hurry from one person to another* इकडूनतिकडे (लगबगीनें) जाणें -धांवणें -पळणें. R. away, *to elope* (of a married woman) हात *m*. धरून जाणें *g. of o.*, पाठीं *or* पाठीस लागून जाणें *g. of o.*—(a man with a woman) काढणें, काढून नेणें. २ (of horse) सुटून जाणें. R. away with, *to carry* (person etc.) घेऊन पळून जाणें. २ (of horse) गाडीसकट पळून जाणें. ३ *to accept* (*a notion*) *hastily* (एकाद्या कल्पनेनें) हुरळून जाणें. R. down, (of clock) *to stop for want of winding* (घड्याळ किल्ली न दिल्यामुळें) बंद पडणें. २ (of person or his health) *to become enfeebled by overwork* (अतिशय) कामामुळें थकणें, मोडणें, मोडून जाणें, ढांसळणें, खालीं येणें -जाणें. ३ *to knock down or collide* (with a person) टक्कर होणें, टक्कर खाणें -मारणें. R. in, (of combatants) *to rush to close quarters* भिडणें. R. off, *to flee, to flow away* पळून जाणें, निघून जाणें. R. on, (of written characters) *to be joined together* एकमेकांस भिडणें, एकमेकांत घुसणें. २ *to continue in operation* चालणें, चालू असणें. ३ *to speak volubly* बडबडणें, वटवटणें, बडबड *f* -वटवट *f*. चालवणें. ४ (*print.*) *to begin in the same line as what precedes* त्याच ओळींत (त्याच प्याऱ्यांत) चालू ठेवणें, चालू राहाणें. R. out, *to come to an end* खपणें, संपणें. २ (cricket) कमफेर होणें. R. out of, *to escape from containing vessel* (आंतून) बाहेर पडणें, सांडणें. R. over, *to overflow* वाहून जाणें, ओसंडणें, भरून वाहाणें. २ *to recapitulate* पुन्हां थोडक्यांत सांगणें. ३ *to review, to glance over* वर नजर टाकणें. R. through, *to pierce with sword* तरवारीनें भोंसकणें. R. up, *to grow quickly* जोरानें वाढणें. २ *to rise in price* चढणें, वाढणें. ३ *to erect* (house, etc.) *hurriedly* उभारणें, चढवणें, बांधणें.

**Run** *n*. धांवणें *n*, धांव *f*, दौड *f*, धूम *f*, तडक *f*. [At a

R. *by one effort* एका तडाक्यानें, एका तडाक्यांत. CONFUSED AND GENERAL R. ABOUT धांवाधांव, धांवाधांवी *f*, दौडादौडी *f*. TO COME DOWN WITH A R. कोसळणें, ढांसळणें, ढकलणें, डगळणें, डघळणें, ढगळणें, धोधावणें.] २ *flight* पळणें *n*, पळ *m*, *f*, पलायन *n*. ३ ( cricket ) धांव *f*, फेरी *f*. ४ *extent of inclination or ability* धांव *f*, उडी *f*. ५ *continuous stretch or course* लांबी *f*, लांबण *f*; as, "A 500 feet *run* of pipe." [IN THE LONG R. शेवटीं, परिणामीं, अखेर, अखेरीस.] ६ *general demand* मागणी *f*, खप *m*; as, "The book has a considerable R." ७ *common or general average* सामान्य प्रत *f*. ८ (बँकेवर असलेला पैसे मागणारांचा) मारा *m*, झोड *f*, उडी *f*.

Run'about *a*. *roving* हिंडगा, हिंडफिऱ्या, पायांवर भोंवरा पडलेला, पायांवर नक्षत्र पडलेला.

Run'away *a*. *fugitive* पळून गेलेला, पळालेला, पळका, पळ्या, पळपटा, पळपट्या, पळपुटा, पळपुट्या.

Runcinate ( run'si-nāt ) [ L. *runcinatus*, pa. p. of *runcinare*, to plane off.] *a*. ( *bot.* ) ( पिसासारखें छिन्न झालेलें असून ) दळें खालीं लोंबणारें ( पान ), पिच्छवत् अधोदल.

Rune (rōōn) [A. S. *run*, a secret.] *n*. ( युरोपमधील प्राचीन रूनिक लिपींतील ) रूनिक अक्षर *n*, रून *n*.

Rung ( rung ) [ A. S. *hrung*, a pole. ] *n*. ( शिडीची) पायरी *f*, पावठणी *f*; as, "The lowest R. of Fortune's ladder."

Rung *pa. t.* and *pa. p.* of Ring.

Ru'nic *a*. *of or relating to runes* रूनिक अक्षराचा, रूनिक लिपींतला.

Run'ner *n*. धांवणारा *m*, पळणारा *m*. २ शर्यतींत पळणारा. ३ (पोस्टाची थैली घेऊन धांवणारा) रनर *m*. ४ तार घेऊन धांवत जाणारा. ५ जात्याची वरची तळी *f*. ६ छत्रीची खोळी *f*, शेंबी *f*. या खोळींत आंतल्या लहान काड्या बसविलेल्या असतात. ७ ( गुळगुळीत करणारा ) मागें पुढें हालणारा ( धांवता ) दगड *m*. ८ ( गुळगुळीत करतांना ) लेन्स धरण्याची धांवती पकड *f*. ९ ( *bot.* ) ताणा, धावनी *f*. उ० दुर्वा, स्ट्रावेरी. १० (mill industry) देंठ *m*, ओतकामाच्या पेटींत रस ओतण्याचें तोंड *n*.

Runnet ( run'net ) [ A. S. *reunan*, to run. ] *n*. वासराच्या चवथ्या जठराच्या आंतील त्वचा *f*. २ या त्वचेपासून काढलेलें द्रव्य *n*, हें दुधांत घातलें असतां त्याचें दहीं बनतें.

Running *a*. धांवता, धांवरा. २ धांवण्याच्या कामाचा. ३ लागोपाठचा, पाठोपाठचा. ४ सरळ, सुरलित. ५ वाहणारा, बरबरीत.

Runt ( runt ) *n*. *an undersized animal* खुजें जनावर *n*. २ *a dwarf* बुटका, बुटबैंगण *m*.

Rupee (rōō-pē') [Hind. *rupiyah*, Sk. रौप्य, silver.] *n*. रुपया *m*. [A HALF R. IS अधेली *f*. $\frac{1}{4}$ R. पावली *f*, पावला *m*, दोन चवल. $\frac{1}{8}$ R. चवली *f*, चवल *m*. *f*, दुअण्णी *f*. $\frac{1}{16}$ R. आणा *m*. DEFACED AND BATTERED

—A R. चेचका—*dim.* चेचकट, चेचट, चेचड. R.'s WEIGHT भार (Ex. रुपया भार, दोन रुपये भार, etc.). To CHANGE A R. मोडणें, मोड करणें, परचुटण घेणें, खुर्दा *m.* करणें. To SHELL OUT THE R.S छणछण रुपये देणें.]

**Rupia** (rū'pi-a) [Gr. *rupos*, filth.] *n.* एक प्रकारचा खवड्यासारखा उपदंशजन्य त्वग्रोग *m*, औपदंशिक पीटिका *f*.

**Rupture** (rup'tūr) [Fr. –L. *ruptum*, to break.] *n. disagreement and parting* बेबनाव *m*, वांकडें *n*, फाटाफूट *f*, फूट *f*, बिघाड *m*, बिघड *m*, स्नेहभंग *m*. [To COME TO A R. बिघाड होणें *g. of s.*] २ (*path.*) *hernia* अंतर्गळ *m*, अंत्रवृद्धि *f*. (b) *ruptured gut* पोटळा *m*, पोटाळा *m*. ३ *breach* भंग *m*, फुटणें *n*, फाटणें *n*. [R. OF THE UTERUS गर्भाशय फाटणें *n*, गर्भाशयपाटन *n*.] R. *v. t. to sever* (*connection, etc.*) संबंध *m.* तोडणें, फूट पाडणें. २ *to affect with hernia* अंतर्गळ होणें. R. *v. i. to burst or break* फाटणें, फुटणें, फुटून बाहेर पडणें. २ फूट पडणें.

**Rup'tured** *pa. t.* R. *pa. p.* फुटलेला, फाटलेला. २ संबंध तुटलेला, संबंध तोडलेला. ३ अंतर्गळ झालेला.

**Rural** (rōōr'al) [Fr. *rural* –L. *ruralis* -*rus*, *ruris*, the country.] *a. of, or suggesting the country* (*opp.* to urban) खेड्यांतला, खेड्यापाड्यांतला, खेड्यापाड्याचा, बाहेरगांवचा, शहराबाहेरचा, ग्राम्य, वन्य. २ *agricultural* शेतकामाचा, शेतापोताचा.

**Ruse** (rōōz) [Fr. *ruser*, to turn.] *n. stratagem, trick* युक्ति *f*, डाव *m*, पेंच *m*.

**Rush** (rush) [A. S. *hriscian*, to shake.] *v. i. to move along in a violent manner* घुसणें, घुसून जाणें, झपाट्यानें -सपाट्यानें जाणें -चालणें, झपाटा *m* -रपाटा *m* -सपाटा *m* -तडाखा *m.* मारणें, झपाटून -रगडून चालणें. २ *to take by sudden vehement assault* घुसणें, (एकदम) हल्ला करणें, मार *m.* मारणें -देणें, अंगावर तुटून पडणें, आदळणें, झटणें, घसरणें. ३ *to go without proper consideration into* घुसणें, दपटून शिरणें -शिरकणें, घुशी *f.* मारणें. [To R. INTO PRINT वर्तमानपत्रांत दपटून प्रसिद्ध करणें, पुस्तक दपटून प्रसिद्ध करणें.] ४ *to pass* (*obstacle*) *with a rapid dash* घुसणें, घुशी मारणें, मुसंडा *m* -मुसंडी *f* -मुसांडी *f.* मारणें, धसणें, धसून जाणें, लोटणें, धाड *f.* पडणें *g. of s.*

**Rush** *v. t. to push or urge forward with impetuosity or violence* पुढें लोटणें, जोरानें पुढें ढकलणें, खेंचणें, रेंटणें, लोटून देणें; as, "*Rushed* them into danger; Ball is *rushed* down the field." [To R. A BILL THROUGH घाईघाईनें बिल पास करून घेणें. To REFUSE TO BE RUSHED दुसऱ्याची घाई चालूं न देणें.]

**Rush** *n. a violent motion* (*along*) घुशी *f*, धांवण्याचा -चालण्याचा झपाटा *m* -रपाटा *m* -तडाखा *m* -सपाटा *m*, झपाट्यानें जाणें *n*, ओढ *f*. [EMULATIVE R. अहंपूर्विका *f*. R. AND SCRAMBLE उडी *v.* | घाल, पड.] २ *charge, onslaught* हल्ला *m*, चढाई *f*. ३ (*football*) जोराचा

हल्ला *m*, घुशी *f.* ४ (कामाची किंवा लोकांची) गर्दी *f*; as, "A R. of business." ५ (*fig.*) उडी *f*; as, "A R. for gold-fields." ६ *strong run on or for some commodity* जोराची मागणी *f.*

Rush (rush) [A. S. *risce*, a rush.] *n. a plant with long reedy stems* लव्हाळा *m*, लव्हा *m.* २ *the merest trifle* कसपट *n*, तृण *n*, काडी *f*; as, "Don't care a R.; Not worth a R." Rush'en *a. made of rushes* लव्हाळ्यांचा, लव्हाळ्यांचा केलेला.

Rush-bottomed, Rush-light, See under Rushy.

Rush'y *a. abounding in rushes* लव्हाळ्यांचा, लव्हाळे असलेला. Rush-bottomed *a.* (*of chairs*) लव्हाळ्यांच्या बुडाची. Rush-light *n. a feeble light* अंधुक उजेड *m.* २ *feeble glimmer of intelligence* बुद्धिमत्तेची लुकलुकी *f.*

Russet (rus'et) [Dim. of Fr. *rousse* -L. *russus*, red.] *a. of a reddish brown colour* तांबूस रंगाचा, तांबूस. R. *n. the colour itself* तांबूस रंग *m.*

Rust (rust) [A. S. *rost*, rust.] *n. the reddish-brown coating on iron exposed to the air* गंज *m*, तांब *f*, जंग *m*, तांबरा *m.* २ *similar coating on other metals* मोरचा *m*, मल *m*, *pop.* मळ *m*, किट्ट *n*; (of copper) कळंक *m.* ३ *a disease of some plants and flowers* तांबडा *m.* ४ (*fig.*) *impaired state due to disuse or inactivity* मालिन्य *n*, मलिनपणा *m*, अनुपस्थिति *f.* ५ बुरसा *m*, बुरा (दांतावरचा) *m.* R. *v. i.* गंजणें, तांबणें, तांबरणें, जंग *m* -मोरचा *m.* चढणें *with* वर *of o.*, मळ *m.* बसणें. २ *to lose quality or efficiency by disuse or inactivity* मळणें, मलिन होणें, जंग चढणें (*fig.*). R. *v. t. to affect with rust, to corrode* तांब *f.* आणणें, जंग *m.* चढवणें, तांबवणें, जंगवणें.

Rustic (rus'tik) [Fr. *rustique* -L. *rusticus*, *-rus*, the country.] *a. of the country, rural* खेड्यांतला, खेडेगांवचा, खेड्यापाड्याचा. २ *rude, awkward, simple* खेडेगांवी, गांवठी, गांवढळ, गांवढ्या, रानवट, रानवळ, खेडवळ, ग्राम्य. (b) साधा, साधाभोळा. (c) ओबडधोबड, गैरसफाईचा. R. *n. a countryman* खेडवळ *m*, खेडेगांवचा *m*, गांवढ्या *m*, गांवढळ *m*, गंवार *m.*

Rustic'ate *v. t. to send into the country* खेडेगांवांत रहावयास लावून देणें. २ *to send down temporarily from university as punishment* (कांहीं दिवसपर्यंत) विश्वविद्यालयांतून (शिक्षा म्हणून) काढून टाकणें. R. *v. i. to retire to, to sojourn in the country* खेडेगांवांत राहणें, खेडेगांवांत रहावयास जाणें.

Rustic'ity *n. rustic manners, rudeness* गांवढळपणा *m*, गांवढेपणा *m*, गंवारपणा *m*, ग्राम्यत्व *n*, ओबडधोबडपणा *m.*

Rust'iness *n.* जंगलेलेपणा *m*, गंजलेलेपणा *m*, तांब *f*, जंग *m.* २ मलिनपणा *m*, मालिन्य *n*, अनुपस्थिति *f*, (बुद्धीचा) मंदपणा *m.*

Rustle (rus'l) [A. S. *hristlan*; Ger. *rasseln.*] *v. i.*

*to make a soft sound, as of dry leaves* सळसळणें, सळसळ वाजणें, खळखळणें, खरखरणें, खसखसणें, खुसखुसणें, खसबसणें, खुसबुसणें, सुडबुडणें, सरसर -सरसरां *adv.* करणें -जाणें, सरसरणें. २—*as of stiff cloth* खडखडणें, खडखड वाजणें. R. *n.* सळसळ *f*, सळसळ आवाज *m*, खडबड *f*, खुडबूड *f*, खसखस *f*, खुसखूस *f*, खसबस *f*, खुसबूस *f*, खडखड *f*.

Rus'tling *pr. p. a.* सळसळणारा, सळसळ करणारा, खडखडणारा, खडवडणारा, खडवडीत, करकरीत.

Rus'tlingly *adv.* सळसळ, सरसर, सरसरां.

Rust'y *a. covered with rust* गंजलेला, तांबलेला, तांब चढलेला, जंग चढलेला, तांबेचा, जंगाचा. २ (*fig.*) *dull from inactivity or want of using* मलिन, *pop.* मळीण, मजीत, उपस्थिति नसलेला, मंद.

Rut ( rut ) [ See Route.] *n. a track left by a wheel* चाकारी *f*, चाकोरें *n*, गराडी *f*. २ *an established course* (ठरींव) वहिवाट *f*, रस्ता *m*, मार्ग *m*.

Rut ( rut ) [ Fr. *rut* -L. *rugitus -rugire*, to roar.] *n. periodic sexual excitement of various mammals* माज *m*, उधान *n*, भर *m*, मद *m*; of elephants, camels, etc., मस्ती *f*.—of mares, she-asses हात्याण *n*. [ To BE IN R. माज करणें, माजास येणें. ] R. *v. i*, *to be affected with rut* माज येणें.

Ruth ( rōōth ) [ A. S. *hreow*, pity. ] *n. pity, compassion* दया *f*, माया *f*, ममता *f*, कळवळा *m*, पाझर *m*. Ruth'less *a. pitiless* निर्दय, दयाहीन, क्रूर, पाषाणहृदयी.

Rut'ty *a. full of ruts* चाकाऱ्या पडलेला, चाकाऱ्या असलेला; as, "A R. Road."

Rye ( rī ) [ A. S. *ryge*. ] *n.* उत्तरयुरोपांतील एक धान्य *n*, 'राय' *n*. याच्या भाकरी करतात.

Ryot ( ri'ut ) [ Ar. *raaya*, to pasture.] *n.* (etymologically ) शेतकरी *m*, किरसान *m*. २ ( current meaning) प्रजा *f*, रयत *f*.

S (es) इंग्रजी वर्णमालेंतील एकुणिसावें अक्षर. याला इंग्रजी व्याकरणांत ऊष्मवर्ण व्यंजन (sibilant consonant) असें म्हणतात, व याचीं अनेकवचनें Ss, S's अशीं लिहितात. २ S च्या आकाराची वस्तु *f*. ३ S च्या आकाराचें वांकण *n*, S च्या आकाराचें वळण *n*.

उत्पत्तिः प्राचीन इजिप्शन चित्रलिपींतील श्ध्वनिदर्शक [चित्राक्षर] मूळ चित्राक्षराचें रूपांतर होत होत त्याचें फिनिशन भाषेंतील W हें अक्षर बनलें; पुढें त्याचीं वेस्टर्न ग्रीक भाषेंतील ≷ ≶ हीं अक्षरें बनलीं; व या ग्रीक अक्षरांपासून ल्याटिन व इंग्रजी भाषांतील S या अक्षराची उत्पत्ति झाली, असें युरोपियन वर्णविदांचें मत आहे.

उच्चारः S या अक्षराचे मुख्यतः स् आणि ज् असे दोन उच्चार आहेत. स् हा उच्चार This, Sack या शब्दांत येतो; व ज् हा उच्चार Wise, Is या शब्दांत येतो. या दोन उच्चारांशिवाय S चे झ् आणि, श् असेहि दोन उच्चार होतात; जसें, Measure, Sure. शब्दाच्या प्रारंभीं सीत्कारपूर्वक स् असा इंग्रजी S अक्षराचा उच्चार होतो. हेंच अक्षर शब्दाच्या मध्यें किंवा शेवटीं आल्यास त्याचा उच्चार प्रचारावर अवलंबून असतो. Isle, Debris इत्यादि शब्दांत S हें अक्षर अनुच्चारित असतें; व कांहीं शब्दांत S च्या पुढें h आला म्हणजे त्याचा श् असा उच्चार होतो; जसें, Shall, Shackle.

S या अक्षराचा व्युत्पत्तिदृष्ट्या विचार केला असतां परकी भाषेंतून व प्राचीन इंग्रजी भाषेंतून सध्यांच्या इंग्रजी भाषेंत आलेल्या शब्दांत C, Z, T, R, हीं अक्षरें त्या त्या भाषेंतील S च्या ठिकाणीं येतात; जसें, O. E. Is, E. Ice; O. E. Rase, E. Raze; Ger. das, E. that; Fr. Chaise, E. Chair.

इंग्रजी शब्दांचीं अनेकवचनें करतांना बऱ्याच शब्दांत s हा प्रत्यय शब्दाच्या शेवटीं लावतात; जसें, Banks. तसेंच वर्तमानकाळाच्या तृतीय पुरुषाचें एकवचन करण्याकरितां क्रियापदाचा शेवटीं s हा प्रत्यय लावतात. कधींकधीं s हा क्रियाविशेषणाचा प्रत्यय म्हणून योजितात; as, "Always, Needs." एकवचनी नामाची पष्ठी करण्याकरितां 's याचा उपयोग करतात. कवितेंत कधींकधीं Is हें क्रियापदाचें रूप दाखविण्याकरितां 's लिहितात. कधींकधीं us याबद्दलही 's हा संक्षेप लिहितात.

संक्षेप: S. = Saint. SS. = Saints. s. s.=screw steamer. S. P. Q. R. = small profits and quick returns. S. = Signor. S. J. = Society of Jesus. S. P. C. K. = Society for Promoting Christian Knowledge. s = Shilling. S. = South. S. A. = South Africa. S. S. = Steam Ship. Sam. = Samuel. Sen. = Senior. Sergt. = Sergeant. Sol. = Solomon. Sq. = Square. St. = Saint. Stg. = Sterling. Sup. = Supra.

Sabaoth (sa-bā'oth) [Heb. *tzeboath*, pl. of *tzaba*, an army.] *n. pl. armies* (used only in the Biblical phrase) सैन्यें *n. pl.*; as, "The Lord of S."

Sabbatar'ian *n.* साबाथ (दिवस) पाळणारा (ज्यू किंवा ख्रिस्ती) *m.* See the word Sabbath.

Sabbath (sab'ath) [L. *sabbatum*, *pl. sabbata* –Gr. *sabbaton*, Heb. *shabbath*, rest.] *n.* विश्रांतीचा दिवस *m*, शाब्बाथ *m*. (ज्यू लोकांचा साबाथ=शनिवार. ख्रिस्ती लोकांचा साबाथ = रविवार.) २ *a period of rest* विश्रांतीचा काल *m*, साबाथ *m*. S. *a.* साबाथाचा, साबाथासंबंधीं. Sabb'athless *a.* साबाथ नसलेला. २ विश्रांतीचा दिवस नसलेला.

Sabbat'ic, Sabbat'ical *a.* साबाथासंबंधीं, साबाथाला योग्य. २ *enjoying rest* विश्रांति घेणारा. ३ विश्रांतीचा.

Sabb'atise *v. t. to keep the Sabbath* साबाथ पाळणें. २ साबाथाप्रमाणें (एखाद्या दिवशीं) विश्रांति घेणें, (एखाद्या दिवशीं) साबाथ करणें.

Sabb'atism *n.* विश्रांति *f*, विश्रांतीचा काल *m.*

Saber, Sabre (sā'ber) [Fr. *sabre* –Ger. *sabel.*] *n.* वांकडी तरवार *f*, तेगा *m*, वक्रखड्ग *m*. [THE S. लष्करी अंमल *m*. S. -CUT, S. -WOUND तेग्याचा घाव *m*, तेग्यानें केलेली जखम *f*.] २ (*pl.*) घोडेस्वार *m. pl.*, अश्वसेना *f*, घोडदळ *n*; as, "Has 3000 sabres." S. *v. t.* वार *m*. करणें, कत्तल *f*. करणें, तरवारीनें मारणें.

Sable (sā'bl) [Etymology not known.] *n.* सेबल नांवाचा (काळी लोंकर असलेला) प्राणी *m*. २ सेबल प्राण्याची काळी लोंकर. Sa'bled *a.* काळ्या लोंकरीचा.

Sable (sā'bl) [Etymology not known.] *n. the black colour* काळा रंग *m*. २ *mourning garments* (ख्रिस्ती लोकांचा) काळा (सुतकी) पोषाख *m*. S. *a. blackish, dark brown* काळवट, काळा, काळाकुट्ट; as, "S. sky; S. Negro." २ *gloomy, dread* अंधारी, भयाण, भयंकर; as, "S. night."

Sabot (sa-bō') [Of French origin.] *n.* फ्रेंच शेतकरी लोकांचा लांकडी जोडा *m.*

Sabre, Same as Saber.

Sabulose (sab'ū-lōs) [L. *sabulosus* -L. *sabulo*, sand.] *a.* (*bot.*) *growing in sandy places* रेताड मातींत होणारा, वालुकामय भूमिरुह.

Sabulos'ity *n. sandiness* वालुकामयता *f*. २ (*med.*) अश्मरी रोग *m*, लघ्वींत वाळूसारखे खडे होणें *n.*

Sabulous (sab'ū-lus) [L. *sabulum*, sand.] *a. sandy* वाळूचा, वालुकामय. २ (*med.*) (of secretions esp. in urinary organs) *granular* खड्यांचा, खडे असलेला, अश्मरीयुक्त, रेती असलेला.

Sac (sak) [Fr. *sac*—L. *saccus*, a bag.] *n.* (of a plant) पेशी *f*. २ (of an animal) पिशवी *f*. ३ *a bag* पोतें *n*. ४ *a loose fitting coat* सैल कोट *m*. ५ *membranous envelope of hernia* (अंतर्गळाचा त्वचेचा) कोष *m.*

Sac'cate, Sac'cated *a.* पिशवीसारखा, पेशीसदृश, पिशवीच्या आकाराचा. २ *pouched* कोष्ठ-पिशवी असलेला. ३ (*bot.*) (corolla) पेशीसारखा फुगवट, पेशीसारखा फुगलेला, पेशीवत् आध्मात; उ० वालफ्लावरच्या पाकळ्या.

Sac'charate *n.* (*chem.*) शर्करेत *n.*

Sacchar'ic acid *n.* शर्कराम्ल *n.*

Sac'charify *v. t. to convert starch into sugar* (लाळेच्या योगानें शरीरांत पिष्टसत्त्वाची) साखर करणें, साखर बनविणें.

Saccharim'eter *n.* एकीभूत (Polarized) प्रकाशाच्या साहाय्यानें शर्करेचें प्रमाण मोजण्याचें यंत्र *n*, प्रकाश-शर्करामापक.

Saccharin, Saccharine (sak'a-rin) [Fr. *saccharin*

-L. *saccharum*, sugar.] *n.* साखरेपेक्षां अतिशय गोड पदार्थ *m*, सॅकरिन, शर्करिन. मधुमेहाचे रोगी साखरे-ऐवजीं सॅकरिन वापरतात.

Saccharine (sak'a-rīn,-rin) *a.* साखरेचा, साखरेचे गुण असलेला, शर्कराधर्मक; as, "A S. taste." २ पिष्ट-सत्वाची साखर बनविणाऱ्या विपाकाचा.

Sac'charoid,-al *a. having a texture resembling sugar* साखरेसारख्या घटनेचा, बारीक कण कण असलेला, शर्करावत् घटनात्मक; as, "S. lime-stone."

Saccharom'eter *n.* विशिष्टगुरुत्वाच्या साहाय्यानें शर्करेचें प्रमाण मोजण्याचें यंत्र *n*, गुरुत्वशर्करामापक.

Sac'charose *n. the ordinary pure sugar of commerce* उंसाची साखर *f*, शर्करा *f*, इक्षुशर्करा *f*.

Saccula'tion *n. the formation of a sac* पिशवी होणें, पेशी होणें *n*, पेशीभवन *n*. २ *a series of sacs* पेशी-परंपरा. Sac'cule, Sac'culus *n. a small sac* लहान पिशवी *f*, सूक्ष्म पेशी *f*. Sac'culi *n. pl.* of Sacculus.

Saccule, See under Sacculation.

Sacerdotal (sas-ėr-dō'tal) [L. *sacerdos*, a priest -*sacer*, sacred, and *dare*, to give.] *a. priestly* उपाध्यायाचा, ग्रीस्टाचा, ग्रीस्टाच्या अधिकाराचा; as, "S. dignity, functions, doctrines, &c."

Sacerdo'talism *n.* उपाध्येपणा *m*, उपाध्येगिरी *f*, उपाध्यायाचा धंदा *m*. २ उपाध्यायाचें कसब *n*, उपाध्याय-वर्गाची लुच्चेगिरी *f*. ३ उपाध्यायवर्गाची फाजील सत्ता *f*.

Sack (sak) [A. S. *sacc* -L. *saccus*, a coarse cloth or garment.] *n.* पोतें *n*, थैला *m*, कोथळी *f*, कोथळा *m*. [DOUBLE S. (FOR BEASTS) कंठाळ *f*, गोणी *f*, गोण *f*, गोणा *m*, पडशा *m*. LARGE S. FOR HOLDING GRAIN भोत *m*. SADDLE S. पडशी *m*.] २ *the contents of a sack* पोत्यांतील जिन्नस *m*, पोतेंभर जिन्नस *m*, गोण *m*, पोतें *n*. ३ *a measure of varying capacity* एक माप *n*, गोण *m*. S. *v. t. to put into a sack* पोत्यांत घालणें, पोत्यांत भरणें; as, "To S. corn." २ (*slang*) *to dismiss* कामावरून दूर करणें, रजा देणें, घालवून देणें, हाकलणें. ३ (*colloq.*) *to defeat in match or fight* (शर्यतींत किंवा झटापटींत) हटवणें, पराभव करणें. Sacked *pa. t.* and *pa. p.*

Sack (sak) [Fr. *sac*, plunder.] *v. t.* (of a victorious army) *to plunder, to ravage* (शहर) लुटणें, लुटालूट करणें. २ (of burglars) (माल) पळवणें, लुटून नेणें, लुटणें, लुबाडणें, लंबे करणें. S. *n. plunder* लूट *f*, लुटालूट *f*. Sacked *pa. t.* and *pa. p.*

Sack'age, Sack'ing *n.* लुटणें *n*, लुटालूट *f*, लूट *f*.

Sackbut (sak-but) [Of Fr. origin.] *n.* अलगुजा-सारखें वाद्य *n*, अलगुजें.

Sack'-cloth *n.* गोणपट *n*, तरट *n*. २ (Bible) अशौच-सूचक पोषाख *m*, पश्चात्तापसूचक पोषाख *m*.

Sack'ful *n.* पोतेंभर, गोणभर.

Sack'hoist *n. a hoist for raising sacks in a warehouse* पोतीं उचलण्याचा पाळणा *m*.

Sack'ing *n.* गोणपाट *n*, तरट *n*.

Sack'race *n.* *a race in which competitors are encased in sack* पाय पोत्यांत घालून धांवण्याची शर्यत *f*.

Sa'cral *a.* (*anat.*) त्रिकास्थिसंबंधीं, त्रिकास्थिगत.

Sacrament (sak'ra-ment) [L. *sacramentum*, a sacred thing -*sacer*, sacred.] *n.* *a solemn religious service or ordinance* संस्कार *m*; as, "The S. of marriage." २ संस्काराच्या वेळीं घेतलेली शपथ *f*.

Sacramen'tal *a.* संस्कारांचा, संस्कारासंबंधी. (b) यथासंस्कार केलेला, संस्कारित. २ संस्कारांना महत्त्व देणारा; as, "S. doctrines."

Sacrarium (sā-krā'ri-um) [L. *sacer*, sacred.] *n.* *the part of a church where the altar is* रोमनक्याथोलिक चर्चमधील वेदीजवळची जागा *f*.

Sacred (sā'kred) [L. *sacer*, sacred.] *a.* *dedicated to God* देवाला वाहिलेला, देवाला अर्पण केलेला, देवाचा, ईश्वराचा. २ *religious*, *holy* धार्मिक, धर्मविषयक, धार्मिक स्वरूपाचा, धर्मपर, धर्मसंबंधी; as, "S. writings." [S. BOOK धर्मग्रंथ *m*. S. COLLEGE रोमन क्याथोलिक कार्डिनल्स. S. CONCERT धर्मपर (गायनाचा) जलसा *m*. S. HISTORY (बायबलांतील) धर्मेतिहास. S. MUSIC धर्मपर संगीत *n*. S. NUMBER सात. S. POETRY धर्मपर काव्य *n*.] ३ *made holy* पवित्र केलेला, देवाधर्माचा, पवित्र; as, "S. place." ४ *venerable* पूज्य, पूजनीय, पवित्र; as, "A S. name." ५ धर्मस्वरूपी, धर्मानें श्रेष्ठ मानलेला, धर्मानें पवित्र मानलेला, पवित्र; as, "His most S. Majesty the King; No place was S. from him, from outrage." ६ *inviolable* अलंघ्य, अलंघनीय; as, "S. limits." Sa'credly *adv.*

Sa'credness *n.* धार्मिकता *f*, पवित्रता *f*, पाविञ्य *n*, पवित्रपणा *m*, पूज्यता *f*. २ अनुल्लंघनीयता *f*.

Sacrifice (sak'ri-fīs) [L. *sacer*, sacred, *facere*, to make.] *n.* *an offering to God* यज्ञ *m*, याग *m*, होम *m*. [FIRE FOR S. होमाग्नि *m*. HORSE S. अश्वमेध *m*. HUMAN S. नरमेध *m*, नरयज्ञ *m*. OFFICIATING PRIEST AT A S. याजक *m*, याज्ञिक *m*, होता *m*. PIT FOR S. यज्ञकुंड *n*. PIT FOR THE FIRE OF A S. होमकुंड *n*, हवनी *f*. S. OF A SHEEP BEFORE TREADING OUT CORN डाहोरा *m*, डौरा *m*. SHED FOR S. यज्ञमंडप *m*. SUPPLEMENTARY S. अवभृथ *m*, दीक्षान्त *m*, यज्ञान्त *m*. TERRACE OR FLAT FOR A S. वेदी *f*, स्थंडिल *m*.] २ (देवाला दिलेला) बळी *m*, यज्ञपशु *m*. ३ *the surrender of anything for the sake of something else* त्याग *m*, सोडून देणें *n*. [SELF-S. स्वार्थत्याग *m*.] ४ अर्पण *n*, अर्पण करणें *n*, समर्पण *n*. ५ *a victim* बळी *m*.

Sacrifice (sak'ri-fīz) *v. t.* *to offer up* (*esp.* on the altar of a divinity) यज्ञ करणें, बळी *m* -बलि *m*. देणें -करणें *g.* *of o.*, अर्पण *n*. करणें. २ *to surrender anything for obtaining something* त्याग करणें, सोडणें, सोडून देणें; as, "To S. accuracy to vividness." [To S. ONE'S SELF (TO THE SERVICE OF)

स्वतःस वाहून घेणें, आत्मयज्ञ करणें.] ३ (comm. cant) *to sell at a loss* तोट्यानें विकणें, तोटा करून विकणें. S. *v. i.* यज्ञ करणें, याग करणें. Sac'rificed *pa. t.* and *pa. p.*

Sac'rificer *n.* यज्ञ करणारा *m*, यजमान *m*.

Sacrifi'cial *a.* यज्ञाचा, यज्ञकर्माचा, यज्ञसंबंधीं, यज्ञकर्मांत वापरलेला. [S. GRASS कुश, दर्भ *m*.]

Sacrilege (sak'ri-lej) [Fr. –L. *sacrilegium*, robbery of a temple.] *n. robbery of sacred things* देवाच्या (भांडीं, अलंकार, वगैरे) वस्तू चोरणें *n*, देवाच्या भांड्यांची चोरी *f*, देवस्वापहार *m*, देवस्वचौर्य *n*. २ *the profanation of a sacred place or thing* (देवस्थान, वगैरे) बाटवणें *n*, भ्रष्ट करणें *n*.

Sacrile'gious *a.* देवस्वापहाराचा, देवस्वचौर्याचा. २ भ्रष्टपणाचा, भ्रष्ट. Sacrile'giously *adv.* देवस्वापहारपूर्वक, शिवस्वाचा अपहार करून. २ भ्रष्टपणानें, बाटगेपणानें. Sacrile'giousness *n.* भ्रष्टपणा *m*, बाटगेपणा *m*. २ शिवस्वापहार *m*.

Sacrist (sā'-krist) [Fr. –L. *sacer*, holy.] *n.* (ख्रिस्ती चर्चांतील) देवाचीं भांडीं वगैरे जपून ठेवणारा *m*, सेक्रिस्ट *m*. हा गायकांकरितां गीतांच्या नकला करतो. २ *mace-bearer* छडीदार *m*.

Sacro *a.* Same as Sacral.

Sacro-coccygeal *n.* (*anat.*) त्रिकगुदसंधि (Sacrum = त्रिकास्थि and coccyx = गुदास्थि).

Sacro-iliac *n.* (*anat.*) त्रिकनितंबसंधि. (Sacrum = त्रिकास्थि and ilium = नितंबास्थि).

Sacrosanct (sak'-ro-sankt) [L. *sacrosanctus*, consecrated.] *a.* (of person, place, law, &c.) *sacred in the highest degree* अतिपवित्र. Sacrosan'ctity *n.* अतिपवित्रता *f*.

Sacro-sciatic (sakrō-sī-at'ik) *a.* (*anat.*) त्रिक आणि आसनास्थि यांच्या मधील. (Sacrum = त्रिकास्थि and sciatic from Ischium = आसनास्थि). त्रिकासनसंबंधीं, त्रिकासनगत.

Sacro-sciatic foramen *n.* त्रिक आणि आसनास्थि यांच्या मधील छिद्र *n*, त्रिकासनच्छिद्र *n*.

Sacro-vertebral *a.* (*anat.*) त्रिक आणि मणि यांचा (vertebra = मणि or पृष्ठवंशमणि), त्रिकमणिगत, त्रिकमणिविषयक.

Sacro-vertebral angle *n.* त्रिक आणि मणि यांचा कोण *m*, त्रिकमणिसंधिकोण *m*.

Sacrum (sā'krum) [L.] *n.* (*anat.*) त्रिकास्थि *n*, माकडहाडाच्या वरच्या बाजूचें त्रिकोणाकृति हाड *n*, कण्याखालचें हाड *n*.

Sad (sad) [Anglo Saxon *sæd*, sated, sick.] *a. affected with grief, gloomy, mournful* खिन्न, उदास, उदासीन, खेदयुक्त, दिलगीर. २ *doleful, not gay* रडका, रडवा, रडकुंडा, उतरल्या तोंडाचा, म्लान, म्लानमुख, तोंड उतरलेला. ३ *expressing or causing sorrow* दुःखाचा, अनिष्टाचा, दुःखद, अतिशय दुःखकारक. ४ *serious* गंभीर, कटु अनुभव आलेला, विट-

लेला; as, "A *sadder* and wiser man." ५ *dull-coloured* निस्तेज, काळा, मजित, मळका. Sadder comparative; Saddest superlative. Sad'ly *adv.* अतिशय दुःखानें, उद्वेगानें.

Sadden (sad'n) [See Sad.] *v. t. to make sad* खिन्न करणें, उदास करणें. २ दुःखी करणें, दुःखीकष्टी करणें. S. *v. i. to grow sad* खिन्नता *f.* येणें -वाटणें, उदास होणें.

Saddle (sad'l) [A. S. *sadel, sadol,* a saddle.] *n.* (a) जीन *n*, खोगीर *n.* (b) (बायसिकलवरील किंवा नांगरावरील) खोगीर, बैठक. [FRAME OF A S. खोड *n.* (RIDING A HORSE) WITHOUT A S. उपलाणी. FORE-TIE OF A S. गोरवंद *m*, घोरवंद *m*, गळवंद *m*. LEATHER SEWN ON A S. TO SUSTAIN THE ABRASION OF THE GIRTH घशेट *f*, घशेटा *m*, घशेटें *n*, घसीट *f*, घसीटा *m*. S. COMPOSED OF FOLDS OF CLOTH चारजामा. S. HAVING TWO SIDES छापी खोगीर *n*. SIDE OF A S. छाप *m*. SITTING CLOTH OVER A S. गाशा *m*. STRIPS (OF CLOTH, &c.) APPENDED TO A S. सडकी *f*. THIGH-PAD OF A S. मांडगादी *f*. TIES CONNECTING THE SIDES OF A S. अलगुजी. S. BACKED जीनपाठीचा, जीनपाठी. S. BAG दुटें *n*, पडशी *f*. S. BOW खोड *n*. S. CLOTH घामोळें *n*. S. GIRTH, तंग *m*. STRIP OR LEATHER END OF A S. हयासा *m*. S. MAKER जिनगर *m*, खोगीर करणारा *m*. S. MAKING जिनगरी *f*. S. FRAME खोड *n*. S. FAST खोगिरावर घट्ट बसलेला किंवा बसविलेला. S. HORSE सवारी घोडा *m*. S. PIN बायसिकलवरील बैठक घट्ट बसविण्याची पिन *f*. IN THE S. घोड्यावर असतांना. २ (*fig.*) कामगिरीवर असतांना, काम करतां करतां. TO PUT THE S. ON A RIGHT HORSE खऱ्या अपराध्याच्या माथीं दोष मारणें. TO PUT THE S. ON THE WRONG HORSE भलत्याच्याच माथीं दोष मारणें. CF. MARATHI चोराला सोडून संन्याशाला सुळी देणें.] २ खोगिराच्या आकाराची वस्तु *f*. ३ (a) *a ridge between two summits* दोन शिखरांमधील कडा *m*. (b) *a support for a wire on a telegraph pole* (तारेच्या खांबावरील चिनी मातीची) तारेची बैठक *f*. S. *v. i.* खोगीर -जीन *n*. घालणें -ठेवणें. २ (*fig.*) *to burden, to encumber* लादणें, ओझें घालणें, (कर, इत्यादि) बसविणें; as, "To S. a town with the expense."

Sadd'ler *n.* जिनगर *m*, जीन करणारा, खोगीर करणारा.

Sadd'lery *n.* जिनगराचा धंदा, जिनगरी *f*. २ खोगिरासाठीं लागणारें सामान *n*. ३ जीन वगैरे घोड्याचें व गाडीचें सामान *n*, गाडीघोड्याचें सामान *n*. ४ गाडीघोड्याच्या सामानाचा कारखाना किंवा दुकान *n*.

Sadducee (sad'ū-sē) [Gr. *Saddoukaios*, Heb. *Zedukim.*] *n.* (Bible.) सादोक नांवाच्या ज्यू धर्मगुरूनें स्थापिलेल्या पंथाचा अनुयायी *m*, सादोकी पंथाचा *m*, सादोकी *m*, सादोकपंथी *m*.

Sad'ness *n.* खिन्नता *f*, उदासपणा *m*, उदासीनता *f*, विषाद *m*. २ *dolefulness, weariness* रडकेपणा *m*, रडवेपणा *m*, म्लानमुखता *f*, मुखमालिन्य *n*. ३ *dull-*

*ness or darkness* (of colours) मजीदपणा *m*, अंधुकपणा *m*, मलिनपणा *m*.

Safe (sāf) [Fr. *sauf* -L. *salvus*, safe.] *a. unharmed, unhurt* सुरक्षित, धड, शाबूत; as, "S. from disease." २ *free from danger, no longer dangerous* सुरक्षित, निर्भय, बिनधोक, बिनधोक्याचा, निष्कंटक, निरुपद्रवी, निर्विघ्न. ३ *cautious and unenterprising* सावध, जपून वागणारा; as, "A S. critic." ४ *unfailing, certain* विश्वसनीय, खात्रीचा; as, "S. methods."

Safe *n. a strong box for keeping valuables* तिजोरी *f*, सेफ. २ *ventilated cupboard for provisions* जाळीचें फडताळ *n*.

Safe'-conduct *n. a passport or permit to travel through a foreign country* परकी देशांत प्रवास करण्याचा परवाना *m*, अभयपत्र. २ *a company of soldiers escorting a traveller n.* वलावा *m*, (प्रवाशाला पोंचविण्यासाठीं बरोबर दिलेली) पहारेकऱ्यांची तुकडी *f*.

Safe'-guard *n.* संरक्षणं *n*, रक्षण *n*, बचाव *m*. २ (परदेशांत प्रवाशाच्या संरक्षणाकरितां दिलेली) पहारेकऱ्यांची तुकडी *f*, वलावा *m*? ३ *precaution* खबरदारी *f*, पूर्वयोजना *f*, सावधगिरी. S. *v. t. to keep safe, to guard* खबरदारी घेणें, सुरक्षित ठेवणें. Safe'-guarded *pa. t.* and *pa. p.* Safe'-guarding *pr. p.*

Safe'-keeping *n. preserving in safety from injury* संरक्षण करणें *n*, रक्षण करणें *n*.

Safe'ly *adv.* सुरक्षितपणानें, खुशालपणें, सुखरूपपणें, निर्भयपणानें, निर्भयपणें, बिनधोक.

Safe'ness *n.* सुरक्षितपणा *m*, सुखरूपपणा *m*, निरुपद्रवता *f*, बिनधोकपणा.

Safe'ty *n.* बचाव *m*, संरक्षण *n*. २ निरुपद्रवता *f*, बिनधोकपणा *m*. [S. BELT, *a belt of buoyant material which enables a man to float in water* (संरक्षक) कडें *n*. S. FUSE बिनधोक्याची (सुरुंगाची) वात *f*. S. LAMP रक्षक दीप *m*. S. MATCH बिनधोक्याची काडी *f*. S. PIN गळपट्टीला लावण्याची पिन. S. TUBE बिनधोक्याची नळी *f*. S. VALVE सुरक्षिततेचा पडदा *m*, बिनधोक्याचा पडदा *m*.] ३ अटकाव *m*, प्रतिबंध *m*; as, "Deliver him to S."

Safflower (saf'flowr) [Corr. of Saffron flower.] *n.* (plant) कुसुंब करडई *f*, कुसुंब करडी *f*, करडी *f*, करडई *f*. २ (seed) करडई *f*. ३ *oil expressed from safflower* करडीचें तेल *n*, करडेल *n*.

Saffron (saf'run) [Fr. *safran*; It. *zafferano* -Ar. *zafarān*, the plant cultivated by the Moors in Spain.] *n.* केशर. [S. COLOURED केशरी रंगाचा.] S. *a.* केशरी, केशरी रंगाचा. Saf'frony *a.* केशरी.

Sag (sag) [D. *zakken*, to sink.] *v. i. to sink in the middle* मोडणें, मध्येंच लटपटणें, वांकणें, दबणें, नमणें, बसणें (*fig.*); as, "A cable supported by its ends *sags*." २ *to lean from the vertical position* वांकणें, मोडणें, कलणें, लवणें; as, "A building may S. one way or another." ३ *to loiter in*

*walking* रेंगाळणें, रमणें, थकणें, दमणें, मेटाकुटीस येणें. Sag'ged *pa. t.* and *pa. p.* Sag'ging *pr. p.*
Sagacious (sa-gā'shus) [L. *sagax, sagacis -sagire,* to perceive keenly.] *a. of quick perceptions* धूर्त, तीक्ष्ण, कुशाग्रबुद्धीचा, हुषार, चलाख. २ *of quick intellectual perceptions, wise, shrewd* शहाणा, हुषार, चौरस, चपळ. Saga'ciously *adv.* Saga'ciousness *n.* हुषारी *f,* चलाखी *f,* चपळाई *f.* २ *wisdom, shrewdness* शहाणपण *n,* हुषारी *f,* चपळाई *f,* धूर्तपणा *m.* Saga'city *m.* शहाणपणा *m,* हुषारी *f,* चपळाई *f,* धूर्तपणा *m,* चलाखी *f.*
Sagacity, See under Sagacious.
Sagathy (sag'a-thi) [Fr. *sagatis.*] *n. a mixed woven fabric of silk and cotton* सूत व रेशीम यांचें बनलेलें कापड *n.*
Sage (sāj) [Fr. *sauge* (It. *salvia*) -L. *salvia -salvus,* safe, sound.] *n.* (*bot.*) कापुरकचरा *m,* गौलाकचरा *m.* Sa'gy *a.* कापुरकचरा असलेला -मिसळलेला.
Sage (sāj) [Fr. *sage* -L. *sapio,* I am wise.] *a. wise, discreet* शहाणा, विचारी, विचारवान्, दूरदर्शी, साधु, विवेकी. २ शहाणपणाचा, पोक्त, दूरदर्शीपणाचा; as, "S. advice." S. *n. a wise man* शहाणा मनुष्य *m,* साधु *m.* २ *a saint* ज्ञानवृद्ध, महापुरुष. (b) ऋषि. ३ *one having divine or spiritual knowledge* ज्ञानी *m,* सिद्ध *m,* सिद्धपुरुष *m,* ब्रह्मज्ञानी *m,* ब्रह्मवेत्ता *m,* त्रिकालज्ञ *m.* Sage'ness *n. wisdom* शहाणपणा *m,* चतुरपणा *m,* चतुराई *f.*
Sagely *adv.* साधुवृत्तीनें, शहाणपणानें, वृद्धासारखें.
Sag'ittal *a. like an arrow* बाणासारखा, बाणाकार. २ बाणासारखें टोपण असलेला. [S. SUTURE (डोक्याच्या कवचीची) तालूवरील उभी शिवण *f,* सीमन्तसन्धि. (PARIETAL BONES सीमन्तास्थि.)]
Sagittarius (saj-i-tā'ri-us) [L. *sajitta,* an arrow.] *n.* (*astron.*) *the Archer* धनरास *m,* धन, धनु *n.*
Sag'ittary *a.* Same as Sagittal.
Sag'ittate *a.* (*bot.* and *zool.*) *shaped like an arrowhead* बाणाकार, बाणासारखा, बाणाग्रवत्, बाणाच्या पात्याच्या आकाराचा; उ० चांदवेलीचें पान, कण्हेरीचा परागकोश. अळवाचीं पानें केव्हां केव्हां बाणाच्या पात्यासारखीं असतात.
Sago (sā'gō) [Malay *sagu.*] *n.* साबूदाणा *m,* सागू. [दाणा *m,* साबू.
Said (sed) *pa. t.* and *pa. p.* of Say, q. v.
Sail (sāl) [A. S. *segel,* sail.] *n.* शीड *n,* अवजार *n,* औजार *n.* [LOWER END OF THE S. YARD घोंस *m,* घोस *m.* S. FURLED ON ITS YARD वात *f.* SHEET OF A S. दमान *n.* WITH FULL OR SWELLING SAILS भरघोसानें, भरल्या घोसानें. TO CARRY SAILS शिडें असणें. TO CROWD SAILS (नेहेमींपेक्षां) पुष्कळ शिडें उभारणें, पुष्कळ शिडें लावून (झपाट्यानें निघून) जाणें. TO HOIST A S. शीड लावणें, शीड उभारणें. TO LOWER A S. शीड उतरणें -खालीं काढून ठेवणें. TO MAKE S. गलबत हांकारणें. TO SET S.

गलबत हांकारणें. To SHIFT THE S. (IN CHANGING TACKS) माचण नेणें. To SHORTEN S. शीड थोडें आवरणें. To STRIKE S. शीड उतरणें. To TAKE IN S. महत्त्वाकांक्षा आवरणें. To TAKE WIND OUT OF ONE'S SAILS प्रतिपक्ष्याच्या मुद्यांचा जोर आधींच काढून टाकणें. FULL S. *adv.* सर्व शिडें उभारून. २ (*fig.*) सर्व सामर्थ्य एकवटून. S. HO! जहाज आलें! जहाज! THE SHIP IS UNDER S. जहाज चालूं लागलें आहे.] २ *a ship, a vessel* जहाज *n*, तारूं *n*, नौका *f*. In this sense the singular is generally used for the plural; as, "Twenty *sail* were in sight." ३ *a trip in a vessel* जलपर्यटन *n*, जलप्रवास *m*. ४ *a voyage of specified duration* (ठराविक मुदतीचा) प्रवास *m*, सफर *f*; as, "It is a ten day's S." S. *v. i.* शिडावर जाणें, शिडानें जाणें, शीड हांकारून जाणें. २ *to swim* तरणें, तरंगणें, पोहून जाणें. ३ (of a vessel or person on board) *to begin a voyage* सफरीस निघणें, गलबत हांकारणें; as, "We S. next week." ४ (of bird, moon, &c.) *to glide through the air* तरंगणें, (आकाशांतून) जाणें. ५ (of women) *to walk in a stately manner* डुलत डुलत चालणें, मुरडत चालणें. [To S. BEFORE THE WIND (-ची) भरभराट होणें, (-ला) यश येणें. To S. CLOSE TO THE WIND वाऱ्याच्या उलट (दिशेनें) जहाज हांकारणें. २ (*fig.*) नैतिक किंवा राजकीय तत्त्वाचें जवळ जवळ उल्लंघन करणें.]

Sail *v. t.* गलबतानें जाणें, नौकेंतून जाणें; as, "A thousand ships were manned to S. the sea." २ *to fly through, to glide smoothly through* तरंगणें, पोहणें. ३ *to control navigation of* जहाज चालवणें.

Sail'able *a. navigable* जहाज चालण्याजोगा, जहाज जाण्याजोगा; as, "A S. river."

Sail-boat *n.* शिडाचें जहाज *n*.

Sail-cloth *n.* पडम *n*, चिवटा *m*.

Sailed *pa. t.* and *pa. p.* of Sail.

Sail'er *n.* (ठराविक गतीनें जाणारें) जहाज *n*, तारूं *n*, नौका *f*, नाव *f*; as, "A fast S."

Sail'ing *pr. p.* S. *pr. p. a.* [S. DATE बोट सुटण्याचा दिवस *m*. SAILING MASTER मालिम *m*. S. ORDERS (कप्तानाला दिलेला) सफरीचा हुकूम *m*. S. SHIP, S. VESSEL शिडानें चालणारें जहाज *n*.] S. *n. seamanship, navigation* दर्यावर्दीपणा *m*, खलाशीपणा *m*. [DIRECT SAILINGS थेटच्या सफरी *f. pl.*, थेट जाणेंयेणें *n*. PLAIN S., SMOOTH S. सरळ काम *n*, विनभानगडीचें काम *n*.]

Sail'or *n. a seaman* खलाशी *m*, नावाडी *m*. [BAD S. बोट लागणारा. GOOD S. बोट न लागणारा.]

Sail-yard *n.* शीडकाठी *f*.

Saint (sānt) [Fr. -L. *sanctus*, holy.] *n. a holy person* संत, साधु, सत्पुरुष *m*, सदाचरणी पुरुष *m*, महापुरुष *m*, जितेंद्रिय *m*. [PATRON S. रक्षक संत *m*, रक्षक पुरुष *m*.] २ *one who has been formally canonized by the R. C. Church* रोमनक्याथोलिक चर्चनें संतमालिकेंत बसविलेला संत *m*, रोमनक्याथोलिक

संत *m.* ३ *one who has passed to heaven* मुक्त. ४ पवित्राचरणाचें ढोंग करणारा *m*, ढोंगी साधु *m.* S. *v. t. to canonize* संतांच्या मालिकेंत गणना करणें, संत म्हणून मानणें. Sainted *pa. t.* S. *pa. p.* संत म्हणून मानलेला. २ पवित्र आचरणाचा. ३ मुक्त. Saint'-like, Saint'ly *a.* साधूचा, संताचा, साधुवत्, साधुसदृश, साधुवृत्तीचा, सदाचरणी. Saint'liness *n.* संतपणा *m*, साधुपणा *m*, साधुत्व *n.* [To ASSUME S. कानांत तुळशी घालणें.]

*N. B.* Sage = ज्ञानी. Saint = संत.

Saint'hood *n.* साधुपणा *m*, साधुत्व *n*, संतपणा *m.* २ साधु-संप्रदाय *m*, संतसंप्रदाय *m.* (b) संतमंडळ *n*, संताळें *n.*

Saint Vitus's dance *n.* (*med.*) कंपवात *m*, कंपवायु *m*, नृत्यवात *m.*

Sake (sāk) [Lit. 'dispute,' 'cause,' A. S. *sacu -sacan*, to strive.] *n. cause, purpose* कारण *n*, हेतु *m*, उद्देश *m.* २ *concern, regard* संबंध *m.* [FOR ONE'S OWN S. स्वतःकरितां, आत्मार्थ. FOR THE S. OF साठीं, करितां, स्तव, निमित्त, बद्दल, खातर. FOR OLD S.'s S. मागील दिवसांची आठवण म्हणून. FOR ANY S. कोणत्याहि कारणाकरितां कां होईना.]

Sal (sal) [L.] *n. salt* मीठ *n*, लवण *n.*

Salable, Same as Saleable.

Salacious (sal-ā'shi-us) [L. *salax -salio*, I leap.] *a. lustful, lecherous* कामी, कामुक, कामभावाचा, कामदृष्टीचा, कामासक्त, स्त्रीलंपट, स्त्रीरत. Sala'ciously *adv.* कामुकपणानें, स्त्रीलंपटपणानें.

Salac'ity, Sala'ciousness *n.* कामुकपणा *m*, कामभाव *m*, कामदृष्टि *f*, कामासक्ति *f*, स्त्रीलंपटपणा *m.*

Salad (sal'-ad) [Fr. -L. *sal*, salt.] *n.* (*bot.*) सालड नांवाची भाजी. [S. DAYS *inexperienced youth* अविचाराचें तारुण्य *n*, तारुण्याचा अविवेकीपणा *m*, गद्धे-पंचविशी *f.*]

Sal-ammoniac (sal-am-mōn'i-ak) [L. *sal*, salt, and Ammoniac.] *n.* (*chem.*) *chloride of ammonium* नवसागर *m*, नौसागर.

Salary (sal'a-ri) [Lit. 'salt-money,' O. F. *salarie* -L. *salarium*, money given to Roman soldiers for salt -*sal*, salt.] *n. pay, stipend* (डोक्याचें काम करणाराचा) पगार *m*, वेतन *n*, नेमणूक *f.* S. *v. t. to pay a salary to* पगार *m.* देणें, वेतन *n* -नेमणूक *f.* देणें. Sal'aried *pa. t.* & *pa. p.*

Sale (sāl) [A. S. *sellan*, to give.] *n. the exchange of anything for money* विक्री *f*, विकरा *m*, विकरी *f*, विक्रय *m.* [DEED OF S. फरोक्तखत *n*, खरेदीखत. PROFITS or AMOUNT OF S. विकरी *f.* ON S., FOR S. विक्रीसाठीं (मांडलेला).] २ *demand* मागणी *f*, खप *m*, विक्री *f*; as, "They shall have ready S. for them." ३ *amount sold* विक्री *f*, विकलेला माल *m*; as, "The *sales* were enormous." ४ *auction* लिलांव *n.* [To PUT UP FOR S. लिलांवांत मांडणें.] Sale'able *a.* खपाऊ, विकायाजोगा, विकाऊ, विक्रेय. Sale'ableness *n.*

Saleable, See under Sale.

Salep (sal'ep) [Of Arabic origin.] *n.* (*bot.*) सालंमिश्री *f*, सालमिश्री *f*.

Sales'man *n.* विक्री करणारा नोकर *m*, विक्रीवाला. २ गिऱ्हाइकी मिळविणारा अडत्या *m*.

Sales'woman *n.* विक्री करणारी स्त्री (नोकर).

Salic, Salique (sali'k) [Fr. -the *Salian* Franks, with whom the law originated.] *a.* स्त्रियांना गादीचा अधिकार नाहीं असें म्हणणारा (कायदा).

Salient (sā'li-ent) [L. *salio*, I spring. धात्वर्थः उड्या मारीत चालणारा.] *a. prominent* ठळक, मुख्य, महत्त्वाचा, (सहज) नजरेंत येणारा -पडणारा. २ *projecting outwards* बाहेर आलेला. ३ (of water) *jetting forth* (कारंजाप्रमाणें) उडणारा. Sa'lience *n.* ठळकपणा *m*. Sa'liently *adv.* ठळकपणानें.

Salif'erous *a.* लवणधारी, लवण असलेला.

Salify (sal'i-fī) [L. *sal*, salt, and *facere*, to make.] *v. t.* (अम्लाचें किंवा बेसाचें) लवण बनविणें.

Salina (sa-lī'na) [L. *sal*, salt.] *n. a salt-marsh or pond* खारटण *f*, खाजण *n*. २ *saltworks* मिठागर *m*.

Saline (sā'lī'n) *a. salty* खारा, मचुळ, खारट, मिठाचा, क्षारमय. २ (of taste) खारट. ३ (*med.*) क्षारयुक्त. S. *n. a spring of salt water* खाऱ्या पाण्याचा झरा *m*, खारें सरोवर *n*. २ मिठागर *m*. ३ खारट पदार्थ *m*. ४ रेचकाचें मीठ *n*.

Salin'ity *n.* खारटपणा *m*, खारेपणा *m*.

Saliva (sa-lī'va) [L.] *n. a fluid secreted in the mouth* लाळ *f*, लाला *f*, थुका *m*, थुंकी *f*, मुखरस *m*.

Sali'val, Sal'ivary *a. pertaining to secreting, or containing saliva* थुंकीचा, थुकीचा, लाळेसंबंधीं, लालोत्पादक, लालावाहक. [SALIVARY GLANDS लालोत्पादक पिंड *m*, लालापिंड *m*.]

Sali'vate *v. t. to produce an unusual amount of saliva* (अतिशय) लाळ उत्पन्न करणें, तोंड आणणें.

Saliva'tion *n. unusual flow of saliva* तोंड येणें *n*, लाळ उत्पन्न होणें, लाळ गळणें *n*, लालास्राव *m*. २ पोटांत जंत झाल्यामुळें किंवा पारामिश्रित पदार्थ अधिक दिल्यामुळें तोंडास फार लाळ सुटणें *n*.

Salle (sal) [Fr.] *n. a hall* दिवाणखाना *m*, उठाबसायाची खोली *f*.

Salle a manger (sal a manzhā) [Fr.] *n. dining-room* जेवण्याची खोली *f*.

Sallow (sal'ō) [A. S. *sala*, discoloured.] *a. of a pale yellowish colour* फिकट, फटफटीत, पिवट, पिकुटलेला, पांडु, निस्तेज; as, "A S. skin." २ रोगट, रोगट दिसणारा, दुखणेकरी, फिकट. [To TURN S. फिकट दिसणें, पिकुटणें.] Sal'lowish *a.* फिकट, पिंवळसर. Sal'lowness *n.* (*med.*) *paleness* (अंगाचा) फिकटपणा *m*, पिकुटपणा *m*, त्वक्‌पांडुता *f*.

Sally (sal'i) [Fr. -L. *salio*, I leap.] *n. an attack of besieged troops upon the attackers* (वेढा

देणारांवर ) छापा *m*, हल्ला *m*. २ *a sudden start into activity* उसळी *f*, झटका *m*, वेग *m*, आवेश *m*. ३ *a brilliant remark, witticism* कोटी *f*. ४ *levity* रंगेलपणा *m*, बहर *f*, रंग *m*, मौज *m*, विनोद *m*, थट्टा *f*; as, "The excursion was esteemed but a S. of wit." S. *v. i. to rush out suddenly* छापा घालण्यासाठीं बाहेर पडणें, एकदम तुटून पडणें, एकदम हल्ला करणें, एकाएकीं पुढें येणें -बाहेर पडणें, उसळी देऊन बाहेर येणें. Sal'lied *pa. t.* and *pa. p.*

Sally-port *n.* किल्ल्याची (भिंतींत ठेवलेली) चोरवाट *f*, किल्ल्यांतील खिडकी *f*.

Salmon (sam'un) [Fr. -L. *salmo -salio*, I leap.] *n.* सामन (नांवाचा खाण्याचा) मासा *m*.

Salon (sā-lon') [Fr.] *n. a drawing-room* दिवाणखाना *m*. २ *an exhibition of works of art* कलाकुसरीच्या वस्तूंचें प्रदर्शन *n*. ३ *a gathering of fashionable or distinguished persons* प्रतिष्ठित किंवा थोर लोकांची सभा *f*.

Saloon (sa-lōōn') [From French Salon.] *n. a large and well fitted up room* दिवाणखाना *m*, हाल *m*. २ (in a ship) *the main cabin* (जहाजावरील) मुख्य खोली *f*, सालून *m*. ३ *a refreshment bar* (वरिष्ठ प्रतीचें) फराळाचें दुकान *n*. ४ खेळण्याचा (सार्वजनिक) हाल *m*, खेळण्याचा अड्डा *m*; as, "Billiard S." [S. CAR (दिवाणखान्याप्रमाणें) शृंगारलेला (सलग) आगगाडीचा डबा *m*. S. DECK (सगळ्यांत) वरचा डेक *m*. सालूनमधील उतारूंना हवा खाण्यास बसण्यासाठीं हा राखून ठेवलेला असतो.]

Salpingi'tis *n.* (*med.*) नलिकादाह *m*; स्रोतदाह. (a) फ्यालोपियननलिकादाह (अंडवाहकनलिकादाह). (b) युस्टेचिअननलिकादाह *m*.

Sal'pinx *n.* (*med.*) नलिका; स्रोत *m*. (a) फ्यालोपियन नलिका. (b) युस्टेचिअन नलिका.

Salt (salt) [A. S. *sealt*, salt.] *n.* मीठ *n*, लवण *n*, क्षार *m*, खार *m*, निमक *n*. [ATTIC S., ATTIC WIT *witty thoughts* गंमतीचे बोल *m. pl.*, विनोदी चुटके *m. pl.* BLACK S. काळें मीठ *n*, पादेलोण *n*, कृष्णलवण *n*, रोचक *n*. CULINARY OR COMMON S. खाण्याचें मीठ *n*. ROCK S., SEE UNDER ROCK. TABLE S. पानावर वाढण्याकरितां (पूड केलेलें) मीठ *n*. WHITE S. सफेत मीठ *n*. S. -CAKE वाशिंग सोडा बनविण्याच्या कृतींतील पहिल्या अवस्थेचा क्षार *m*, साल्ट केक. S. -CELLAR मिठाचा पडगा *m*. S. LAKE खारें सरोवर *n*. S. -MAKER मीठगावडा *m*, मिठागरी *m*, मीठकरी *m*, मीठ करणारा खारवी *m*. S. -MINE मिठाची खाण *f*. S. -PAN, S. -PIT कोंडी *f*. S. -SPOON मीठ वाढण्याचा चमचा *m*. S. -TAX मिठावरील कर *m*. S. -WELL खारी विहीर *f*, खारा कुवा *m*. S. -WORKS मिठागर *m*. IN S. खारवलेला, मिठाच्या पाण्यांत ठेवलेला. TO EAT S. WITH (-च्या येथें) पाहुणा असणें, (-चा) पाहुणचार खाणें. TO EAT ONE'S S. (-चें) निमक खाणें, (-च्यावर) अवलंबून असणें, (-च्या) नोकरींत असणें. TO BE IMPREGNATED WITH S. खारावणें, खारणें. TO SIT ABOVE THE S.

मेजाच्या प्रमुख भागीं जेवावयास बसणें. To TAKE WITH A GRAIN OF S. अतिशयोक्तीचा समजणें, अतिशयोक्तीचा भाग काढणें. HE IS NOT WORTH HIS S. पगाराइतकी त्याची लायकी नाहीं. THE S. OF THE EARTH (समाजांतील) नीतिमान् पुरुष *m. pl.*] २ (*chem.*) क्षार *m*, लवण *n*. [ACID S. अम्लक्षार *m*. ALKALINE S. आल्कलिक्षार *m*. BASIC S. बेसिक क्षार *m*. DOUBLE S. दोन क्षारांच्या संयोगानें बनलेला क्षार *m*; उ० तुरटी. EPSOM SALT इप्सम नांवाचें रेचकाचें मीठ *n*. NEUTRAL S. निर्वीर्य क्षार *m*, उदासीन क्षार *m*.] ३ *flavour, taste* चव *f*, रुचि *f*, गोडी *f*. (b) *sting, piquancy* खोंच *f*, झणझणीतपणा *m*, लागटपणा *m*; as, "Talk full of S." ४ *a dish for salt at table* मिठाचें वाडगें *n*, मिठाचा पडगा *m*; as, "A dozen of silver *salts*." ५ (*pl.*) *marshes flooded by the tide* खाजण *n*, खारटण *n*. ६ (*pl.*) *exceptional rush of sea-water up river* उदानाचें पाणी भरणें *n*. ७ अनुभविक खलाशी *m*. ८ (*usu. pl.*) *an aperient medicine* रेचकाचें मीठ *n*, रेचक *n*.

Salt *a*. खारट, खारा, लवण, लवणमय, खारवलेला, क्षारयुक्त, क्षारविशिष्ट. [S. WATER खारें पाणी *n*. २ अश्रू.] २ (of plants) समुद्रांत वाढणारा, खारटणांत होणारा. ३ (of tears, grief, &c.) *bitter, afflicting* दुःखाचा, उद्वेगाचा, दुःखकारक. ४ (of wit) *pungent* खोंचदार, खोंचीचा, झोंबणारा. ५ (of stories) *spicy, indecent* चटकदार, फाजील.

Salt *v. t. to supply with salt* खारट करणें, (आंत) मीठ घालणें, खारविणें. २ (बर्फ वितळून जाण्याकरितां रस्त्यावर) मीठ पसरणें. ३ *to make salt* मीठ लावणें, तिखटमीठ लावणें (*fig.*). ४ (*photo.*) क्षारद्रवांत बुडवणें, क्षारद्रवांत भिजवणें.

Saltant (sal'-tant) [L. *saltare*, to dance.] *a. leaping, dancing* उड्या मारणारा, नाचणारा, बागडणारा.

Salta'tion *n. leaping, dancing* उडी मारणें, नाचणें *n*; as, "Continued his S. without pause." २ *beating or palpitation* उड्डान *n*, उडणें *n*; as, "The S. of the great artery."

Saltato'rial *a*. उड्या मारण्याचा, नाचण्याचा; as, "S. exercises."

Saltato'rious *a*. उडी मारणारा, उडी मारतां येणारा, उडी मारण्याच्या कामाचा; as, "S. insect or leg."

Saltato'ry *a*. उडी मारणारा, उडी मारण्याची शक्ति असलेला, उडी मारतांना उपयोगाचा -कामाचा.

Salt'ed *pa. t.* S. *pa. p.* मीठ घातलेला, खारट, क्षारयुक्त, खारविलेला.

Salt'er *n*. मिठागरी *m*, मीठकरी.

Salt'ern *n*. मिठागर *m*.

Salt'ing *pr. p.* S. *v. n.* मीठ घालणें *n*, खारवणें *n*.

Salt'ish *a*. थोडासा खारट, अंमळ खारट.

Salt'less *a*. अळणी, बेचव, नीरस.

Salt'ness *n*. खारटपणा *m*, खारेपणा *m*.

Salt-pe'ter, Salt-pe'tre *n*. सोरा *m*, सोरमीठ *n*.

Salt'y *a*. खारट, क्षारधर्मक.

Salubrious (sa-lōō'bri-us) [L. *salubris* -*salus*, health.] *a.* (of climate) *healthy* आरोग्यकारक, निरोगी, आरोग्यवर्धक. २ (R.) (of food, exercise) पथ्यकर, पौष्टिक, पुष्टिकर, शरीरास चांगला. Salu'briously *adv.* Salu'briousness, Salu'brity *n.* आरोग्यकारकपणा *m*, निरोगीपणा *m*. २ पौष्टिकपणा *m*.

Sal'utariness *n.* आरोग्यकारकता *f*. २ फायदेशीरपणा *m*.

Salutary (sal'ū-tar-i) [L. *salus*, health.] *a. healthful* आरोग्यकारक, फायदेशीर, गुणावह; as, "S. exercise." २ *beneficial* फायदेशीर, हितकारक, हितकर; as, "S. design." Salu'tarily *adv.*

Saluta'tion *n.* नमस्कार *m*, रामराम *m*, सलाम *m*, कुरनिशात *f*, कुरनीस *f*, अभिवादन *n*. [SOME FORMS OR PARTICULAR TERMS OF S. ARE जयश्रीराम, बावाजी, जोहार, नमस्कार, नमोनारायण, रामराम, शरणार्थ, सलाम. MUTUAL S. नमस्कारचमत्कार, रामरामी *f*, सलामी *f*.] २ (*mil.*) *honour by the discharge of guns or other arms* तोफा सोडून सलामी देणें *n*, सलामी *f*.

Salute (sal-ūt') [Lit. 'to wish health to,' L. *saluto, salutatum* -*salus*, health.] *v. t. to greet* रामराम करणें, नमस्कार *m* -सलाम *m*. करणें, अभिवंदन करणें. २ *to give a sign of good will* अभीष्ट चिंतन करणें, बरें पाहणें, सदिच्छा प्रगट करणें. ३ (*mil.*) *to honour by a discharge of cannon* सलामी देणें.

Salute' *n.* रामराम *m*, नमस्कार *m*, जयगोपाळ, सलाम *m*, &c. २ (*mil.* and *naval*) सलामी *f*. [TO TAKE THE S. सलामी घेणें. ROYAL S. एकवीस तोफांची सलामी.]

Sal'vable *a.* बचावतां येण्यासारखा, मुक्ति मिळण्यासारखा.

Salvage (sal'vāj) [L. *salvo*, I save.] *n.* (आगींतून किंवा फुटलेल्या जहाजांतून) माल वांचवणें *n*. २ (अशा रीतीनें) माल वांचवल्याबद्दल दिलेली मजुरी *f*, वांचवणावळ *f*. ३ वांचवलेला माल *m*. [S. CORPS आगींतून माल वांचविणारे लोक *m. pl.*]

Salvation (sal-vā'shun) [O. Fr. –L. *salvo*, I save.] *n. act of saving* रक्षण *n*, संरक्षण *n*, तारण *n*, बचाव *m*, त्राण *n*. २ (*theol.*) *saving of soul* मुक्ति *f*, मोक्ष *m*, अपवर्ग *m*, उद्धार *m*. [TO FIND S. मुक्ति मिळणें. २ (jocular) (आपल्या तत्त्वांच्या विरुद्ध वागण्याकरितां) पळवाट सांपडणें.] ३ *that which saves* रक्षण करणारी गोष्ट *f*, बचावाचा उपाय *m*, तरणोपाय *m*, बचाव *m*.

Salvation Army मुक्तिफौज *f*, लोकांचा धर्म व नीति सुधारण्यासाठीं वुइल्यम बूथ नांवाच्या पाद्रयानें १८७८ सालीं लष्करी शिस्तीवर स्थापना केलेली संस्था *f*.

Salva'tionist *n.* मुक्तिफौजेचा अनुयायी *m*.

Salve (salv, not säv.) [L. *salvare*, to save.] *v. t. to rescue* बुडणारें जहाज किंवा त्यांतील माल वांचवणें.

Salve (säv) [A. S. *sealf*.] *n. an ointment to cure sores* मलम *n*. (b) उपशामक (*lit.* and *fig.*) S. *v. t. to heal by medicaments* मलम लावून बरें करणें, औषध लावून बरें करणें; as, "To S. a wound."

Sal'ver, Sal'vor *n.* बुडणाऱ्या जहाजांतील माल बचावणारा *m*.

Salver (sal'vėr) [ Of Spanish Origin. ] *n.* थाळा *m*, तबक *n*.

Salvo (sal'vō) [ L. *salvo jure*, one's right being safe, an expression used in reserving rights.] *n. a reservation* सोडवण *f*, फट *f*, सवड *f*, वाट *f*, छिद्र *n*, खिसा *m*, पकड *f*, सबब *f*; as, "With an express S. of their rights." [To MAKE A S. निसरगांठ *f*. देऊन ठेवणें, खिसा *m*. राखणें, फट ठेवणें, सवड ठेवणें.]

Salvo (sal'vō) [Fr. *salvo* –L. *salve*, hail.] *n.* (*mil.*) *firing of guns as a salute* सन्मानार्थ तोफा उडवणें *n* -सोडणें *n*, तोफांची सलामी *f*. २ *a shout of applause or welcome* जयजयकार *m*, जयघोष *m*, टाळ्यांचा कडकडाट *m*. Salvoes, Salvos *n. pl*.

Salvor, Same as Salver, No. 1.

Samara (sa-mā'ra) [ L. *samara*, the seed of the elm.] *n.* (*bot.*) सपक्षफलजाति *f*, पंख असलेलें फळ *n*, गरुत्फल *n*. [गरुत् = WING OF A BIRD.] उ० मधुमालती, ऐन, बाभळ यांचीं फळें.

Samaritan (sa-mar'i-tan) [From Samaria.] *a. pertaining to Samaria, in Palestine* समेरियांतील, समेरिया देशांतील. S. *n. an inhabitant of Samaria* समेरियांतील रहिवाशी *m*, समेरिटन *m*. २ *the Samarian language* समेरिटन भाषा *f*.

Same (sām) [A. S. *same* -L. *similis*, like, cf. Sk. सम, like.] *a. uniform, unvarying* तोच, तोच तो, (emphatically) हाच. (b) एकसारखा, न बदलणारा, त्याच स्वरूपाचा. (c) (तोच तोच म्हणून) कंटाळवाणा. २ (with *this, these, that, those*) *aforesaid, previously alluded to or thought of* तोच, वर सांगितलेला, पूर्वीं सांगितलेला, पूर्वोक्त, असला, या प्रकारचा, तसला, त्या प्रकारचा; as, "What is the use of this S. patience?" ३ *identical, not different, unchanged* तोच, एकच, न बदललेला, सारखा, अभिन्न. [IT IS ALL JUST THE S. TO ME माझ्या दृष्टीनें तें अगदीं सारखेंच आहे; मला त्यांत कांहींच फरक दिसत नाहीं. AT THE S. TIME (उलट पक्षीं) त्याच वेळीं, त्याबरोबर, तसेंच. OF THE S. AGE समवयस्क. OF THE S. FORM समरूप. OF THE S. KIND समजातीय, एकजातीय. THE S. TIME समकाल.] ४ (*math.*) अभिन्न. [S. RATIO अभिन्न निष्पत्ति.]

*N. B.*—In cases of emphasis, *the same* is followed by *that* or *where*; as, "At *the same* time *that* I am endeavouring. To *the same* place, *where* I found it." In cases of comparison, *the same* is followed by *as* or *with*; as, "Bees like *the same* odours *as* we do. He held *the same* opinions *with* his illustrious friend."

Same *pron.* (with *the*) तोच, तीच, तेंच.

Same *adv.* (always preceded by *the*) तेंच, तसेंच. [ALL THE SAME तत्राप, तथापि. JUST THE SAME सारखेंच, एकच.]

Same'ness *n.* तोचतोपणा *m*, सारखेपणा *m*, अभिन्नता *f*, एकपणा *m*. २ (*Philos.*) तादात्म्य *n*, एकरूपता *f*. ३ सारखेपणा *m*, साम्य *n*, कंटाळवाणेपणा *m*.

Samiel (sā'mi-el) [Ar.] *n.* प्राणघातक उष्ण वाऱ्याची झळई *f*, झळ *f*.

Samite (sā'mīt) [Gr. *hex*, six, and *mitos*, thread.] *n.* कशिदा काढलेला उंची रेशमी कपडा *m*.

Samphire (sam'fīr) [Fr.] *n.* हदवेल *f.* ?

Sample (sam'pl) [O. F. *essample* -L. *exemplum*, a sample.] *n.* *a specimen* मासला *m*, नमुना *m*. [S. CARD नमुना दाखविणारें कार्ड *n.*] S. *v. t.* *to make up samples of* (-चे) नमुने करणें -काढणें -बनविणें. Sam'pler *n.* (used in compounds) नमुने तयार करणारा; as, "Wool-Sampler."

Sampler (sam'pler) [Formed from L. *exemplar.*] *n.* *a pattern of work* नमुना *m*, मासला *m*. २ *ornamental needlework* कशिदा *m*. [सुधारणाक्षमता *f*.

Sanabil'ity *n.* *curability* सुधारण्याजोगी स्थिति *f*,

Sanable (san'a-bl) [L. *sanabilis* -*sano*, *sanatum*, to heal.] *a.* *able to be cured* सुधारण्याजोगा-सारखा, दुरुस्त होण्याजोगा, शुद्धीवर येण्याजोगा.

San'ative *a.* बरा करणारा, सुधारणारा, रोगनाशक, रोगहारक, रोग दूर करणारा, आरोग्यकारक. San'ativeness *n.* रोगहारकत्व *n*, रोग बरे करण्याची शक्ति *f*.

Sanatorium (san-a-to'ri-um) [L. *sano* -*sanatum*, to heal.] *n.* *a health-station* हवा पालटण्याचें ठिकाण *n*, आरोग्यस्थान *n*, आरोग्यभुवन *n*. Sanato'ria *n. pl.*

San'atory *a.* रोगहारक, रोगनिवारक, आरोग्यजनक.

Sanctifica'tion *n.* (*act.*) पवित्र करणें *n*, पापहरण *n*, शुद्धीकरण *n*, प्रायश्चित्त *n*. २ (the state) पवित्रता *f*, अंतःशौच *n*, अंतःशुद्धि *f*. ३ धर्मकृत्यांकरितां निराळा काढून ठेवणें *n*. Sanct'ified *pa. t.* S. *pa. p.* पवित्र केलेला, शुद्ध केलेला, धूतपाप. २ शुद्धवृत्तीचा, शुद्ध अंतःकरणाचा. Sanc'tifier *n.* पवित्र करणारा, शुद्ध करणारा, शुद्धता आणणारा. २ *the Holy Ghost* पवित्र आत्मा *m*.

Sanctified, Sanctifier, See under Santification.

Sanctify (sank'ti-fī) [Fr. -L. *sanctificio*, -*sanctus*, sacred and *facere*, to make.] *v. t.* *to make holy or sacred* पवित्र करणें, स्वच्छ -शुद्ध करणें, पापहरण *n* -पापनाश *m* -पापध्वंस *m*. करणें *g. of o.*, अंतःशुद्धि *f*. करणें, पापहीन -निष्पाप करणें; as, "The end *sanctifies* the means." २ *to set apart for a religious use* धार्मिक कृत्यांकरितां बाजूला ठेवणें, धार्मिक कृत्यांकडे लावणें. ३ *to free from sin* पवित्र करणें, पापमुक्त करणें, शुद्ध करणें. ४ *to make productive of holiness* पवित्रता उत्पन्न होण्यास साधन -कारणीभूत करणें, पवित्रतेचें साधन करणें, पवित्रताकारक करणें. ५ *to give sanction to* मंजूर करणें, कायम करणें, अनुज्ञा देणें.

Sanc'tifying *pr. p. a.* पवित्र करणारा. [S. GRACE पवित्र करणारी (ईश्वराची) दया *f*.]

Sanctimonious (sangk-ti-mo'ni-us) [See Sanctify.] *a. holy, having sanctity* पवित्र, शुद्ध, शुद्धता असलेला, पविन्नित, पवित्र केलेला. २ *making a show of sanctity* दंभी, दांभिक, पवित्रतेचा भाव आणणारा, ढोंगी, बकध्यानी, बोकेसंन्यासी; as, "Like the S. pirate."

Sanctimo'niousness } *n. holiness, devoutness* पवित्र-
Sanc'timony } पणा *m*, पाविञ्य *n*, भाविकपणा *m*. २ *artificial saintliness, hypocritical devoutness* भाविकपणाचें -भक्तीचें -पुण्याचें -पवित्रतेचें -शुद्धीचें अवडंबर *n* -ढोंग *n* -स्तोम *n* -देव्हारें *n*, भक्तीचा डौल *m*, दंभ, डंभ *m*, बकध्यान *n*, बोकेसंन्यास *m*.

Sanction (sank'shun) [Fr. *sanction* -L. *sanctio*, *sancire*, to fix unalterably.] *n. ratification, giving authority to, confirmation* मंजुरी *f*, पसंती *f*, पसंत करणें *n*, अधिकार देणें *n*, लेखी परवानगी *f*, मुक्ररी *f*, मुकरर करणें *n*, कायम करणें *n*, अनुज्ञा देणें *n*, अनुज्ञा *f*, अनुमति *f*, अनुमोदन *n*. २ *law, decree* कायदा *m*, ठराव *m*; as, "Pragmatic S." S. *v. t.* मंजुरी देणें, कायम करणें, सही करणें, मुकरर -मान्य -कबूल करणें, पसंती *f*. देणें, अधिकार *m*. देणें.

Sanc'tionable *a.* मंजुरी देण्यासारखा.

Sanc'tioned *pa. t.* S. *pa. p.* मंजुरी दिलेला.

Sanc'tioning *pr. p.* S. *v. n.* मंजुरी देणें.

Sanc'titude *n. holiness* शुद्धता *f*, पवित्रता *f*.

San'ctity *n. holiness* पवित्रता *f*, शुद्धता *f*, पाविञ्य *n*. २ (of oath, promise, etc.) पवित्रपणा *m*. ३ *pl.* पवित्र संबंध *m*, पवित्र बंधनें *n. pl.*, पवित्र भावना *f. pl.*; as, "The S.s of the home."

Sanctuary (sank'tū-ar-i) [Fr. -L. *sanctuarium* -*sanctus*, holy.] *n. a sacred place* पवित्रस्थान *n*, पवित्र ठिकाण *n*, पुण्यस्थान *n*, पुण्यभूमि *f*. २ *a place devoted to divine service* उपासनागृह *n*, देवालय *n*, देऊळ *n*, देवळ *n*. ३ *that part of the church where the altar is* चर्चमधील वेदीजवळची जागा *f*. ४ (anciently) *a church or its precincts* चर्च *n* (या ठिकाणीं पूर्वी गुन्हेगारांना पकडीत नसत). (b) आश्रयस्थान *n*, निर्भयस्थान *n*; as, "London, the S. of political refugees." ५ *a refuge* आश्रय *m*. ६ *right of affording immunity* अभयदानाचा हक्क *m*. (b) अभयदान *n*. [TO VIOLATE OR BREAK S. चर्चचा आश्रय केलेल्या मनुष्याला पकडणें -मारहाण करणें. TO TAKE OR SEEK S. देवळाचा (म्हणजे निर्भयस्थानाचा) आश्रय करणें. RIGHTS OF S. निर्भयस्थानाचे हक्क *m. pl.*] ७ *a place of safety* संरक्षणाची जागा *f*, बचावाची जागा *f*. Sanc'tuaries *n. pl.*

Sanc'tum *n. a sacred place* पवित्रस्थान *n*, पवित्र ठिकाण *n*. २ *a room reserved for one's private use* खाजगी खोली *f*. [S. SANCTORUM, *the holy of holies, the most sacred part of the Temple at Jerusalem* जेरूसलेम येथील देवालयांतील अत्यंत पवित्र स्थान *n* -गाभारा *m* -गर्भगृह *n*.]

Sanc'tus *n.* 'सॅंक्टस' शब्दानें सुरवात होणारें गीत *n.*

Sand (sand) [A. S. *sand.*] *n.* **वाळू *f*, रेती *f*, वालुका *f*, सिकता *f*, पुळण *f*, पुलिन *n.*** [S. BAG *n.* वाळूचें पोतें *n.* S. -BATH वाळू तापवून (तिच्या योगानें सारखी) आंच देण्याचें पात्र *n*, वालुकास्वेदन *n.* S.-BANK IN WATER भाट *f*, भाटी *f*, लाग *m.* S.-BOARD धूळपाटी *f*, पाटी *f.* To DUST A S.-BOARD पाटी उधळणें. S.-FLY (*zool.*) कंबरू *n*, कंबरें *n*, घुंघरटें *n*, घुंघरडें *n.* S.-GLASS वाळूचें घड्याळ *n.* S.-PAPER (लांकूड वगैरे साफ करण्याचा) वाळूचा कागद *m.* S.-STONE वाळूचा खडक *m.*] S. *v. t.* **वाळू पसरणें, वाळू पेरणें.** San'dy *a.* **रेतीचा, वाळूचा, वालुकामय, वाळवट, रेवट, रेवसाळ, वालुकाप्रचुर.**

Sandal (san'dal) [Fr. *sandal* -L. *sandalium*; Pers. *sandal*, a kind of shoe.] *n. a kind of shoe* **चपल्या *f. pl.*, चपल, वहाण *f*, पायतण *n*, खडावा *f.*** [HEEL-TIE OF A S. खोटवाद *m.* PAIR OF SANDALS जुतें *n*, वाहाणा *f. pl.* ONE WHO IS WITHOUT SANDALS OR SHOES अनवाणी.] Sand'alled *a.* **वाहाणा घातलेला.**

Sandal (san'dal) [Port. *sandalo* -Ar. *sandal*, Sk. चंदन, sandal.] *n.* (*bot.*) **चंदनाचें झाड *n*, चंदनवृक्ष *m*, चंदन *m*, श्रीखंड *n.*** [S. WOOD चंदन *m.* BLACK S. WOOD कृष्णागरु *m*, कृष्णागर *m.* EXTRACT OF S. WOOD चंदनी अत्तर *n*, चंदनी तेल *n.* RED S. WOOD रक्तचंदन *n.*]

Sand'iness *n.* **वालुकामयता *f.***

Sands *n. pl.* **वाळवंट *n*, वाळूचा प्रदेश *m*, पुळण *f*, रेताड प्रदेश *m.***

Sandwich (sand'wich) [Named from the Earl of Sandwich.] *n. armour-plating made up of two plates of iron with a plate of wood between them or vice versa* **लढाऊ जहाजांना अगर गलबतांना दोन लोखंडाच्या पट्ट्यांमध्यें लांकडाचा तुकडा ठेऊन जोड देणें, किंवा दोन लांकडाच्या तुकड्यांमध्यें लोखंड ठेऊन सांधणें.**

Sandy, See under Sand.

Sane (sān) [L. *sanus*, sound.] *a. sound in mind* **सावध, शुद्धीवर असलेला, हुशार, चांगला.** २ (of views) *moderate and sensible* **नेमस्त व शहाणपणाचा, समजुतदारपणाचा.** Sane'ness *n.* **शुद्धि *f*, हुशारी *f*, शुद्ध *f.* २ शहाणपणा *m*, समजुतदारपणा *m.***

Sang (sang) *pa. t.* of Sing which see.

Sanguiferous (sang-wif'er-us) [L. *sanguis*, blood and *ferre*, to carry.] *a.* (physiol.) *conveying blood* **रक्तवाहक, रक्तवाही**; as, "S. vessels."

Sanguification (sangwi-fi-kā'shun) [L. *sanguis*, blood and *facio*, I make.] *n.* (*physiol.*) **रक्तीकरण *n*, (अन्नरसाचें) रक्त करणें *n.***

San'guify *v. t. to produce blood from* (chyle) **(अन्नरसाचें) रक्त करणें.**

Sanguinary (san'gwin-ar-i) [L. *sanguineus* -*sanguis*, *sanguinis*, blood.] *a. bloody, attended by bloodshed* **रक्तपाताची (लढाई), रक्तपूराचा, रक्तपातबहुल, रक्ताचे पूर वाहल्याचा.** २ *blood-thirsty, cruel* **खुनी, हिंसक, हिंस्र, रक्तप्रिय.**

Sanguine (sang'win) [L. *sanguis, sanguinis*, blood.] *a. abounding in blood* रक्तपूर्ण, रक्तप्रचुर, पुष्कळ रक्त असलेला. [S. TEMPERAMENT रक्ताचें आधिक्य असणारी प्रकृति *f*, उत्साही प्रकृति *f*.] २ *coloured like blood* रक्ताच्या रंगाचा-वर्णाचा, रक्तवर्णी, लाल, तांबडा; as, "S. flower, ant, &c." ३ *ardent, hopeful* आशापूर्ण, उत्साही, (मोठ्या) उमेदीचा, अवसान (धरून) असलेला, अवसानी. ४(of complexion) *bright, ruddy* लाल, तांबडा. Sang'uinely *adv.* उमेदीनें.

San'guineness *n.* उमेद *f*, उत्साहीपणा *m*, उत्साह *m*.

Sanguin'eous *a.* (*med.*) रक्ताचा. २ *blood-coloured* रक्तासारखा, रक्तसदृश, लालभडक. ३ रक्ताधिक्याचा.

Sanguini'vorous *a.* Same as Sanguivorous.

Sanguisuge (san'gwi-sūj) [L. *sanguisuga* -L. *sanguis*, blood, *sugere*, to suck.] *n. leech* (रक्त शोषणारी) जळू *f*.

Sanguiv'orous *a.* (*zool.*) *subsisting upon blood* रक्त पिऊन उपजीविका करणारा, रक्तोपजीवी, रक्तभक्षक.

Sanhedrim (san'he-drim) [Lit. 'a sitting together,' Heb. *sanhedrin*, from Gr. *synedrion* -*syn*, together & *hedra*, a seat.] *n.* यहुदी लोकांची सत्तर सभासदांची वरिष्ठ सभा *f*.

Sanies (sā-nēs) [L.] *n.* रक्तमिश्रित पू *m*, लस *f*, पू *m*.

Sanious (sāni-us) [L. *sanies*, serous fluid.] *a.* दुष्टरक्तमिश्रित, पूयरक्ताचा, लशीचा; as, "The S. matter of an ulcer."

Sanitarium, Same as Sanatorium.

Sanitary (san'i-tar-i) [L. *sanitas* -*sanus*, sound.] *a. free from influences injurious to health* आरोग्याचा, आरोग्यविषयक, आरोग्यरक्षणाचा. २ आरोग्याचा, आरोग्यखात्याचा; as, "S. Inspector."

Sanitation (san-i-tā'-shun) [L. *sanitas*, health.] *n.* (स्वच्छ पाणी, स्वच्छ हवा, इत्यादि) आरोग्यरक्षणाचे उपाय *m. pl.*, आरोग्यरक्षण *n*, आरोग्य *n*. [PERSONAL S. व्यक्तिविषयक आरोग्य *n*. PUBLIC S. सार्वजनिक आरोग्य *n*.] २ आरोग्यविद्या *f*.

Sanitorium, Same as Sanatorium.

San'ity *n.* डोकें ताळ्यावर असणें *n*, सावधपणा *m*, शुद्ध *f*, शुद्धि *f*.

Sank, *pa. t.* of Sink.

Santonin (san'-to-nin) [Fr. Gr. *santonion*, wormwood.] *n.* आंतड्यांतून जंत बाहेर पाडणारें औषध *n*, सँटोनाइन *n*.

Sap (sap) [Fr. *saper*, -Low L. *sappa*, a pick.] *v. t. to dig underneath, to undermine* पाया खोदून पाडणें, पाया बिघडवणें -डळमळवणें -ढांसळविणें. २ *to make trenches to cover assailant's approach to besieged place* (वेढा दिलेल्या ठिकाणीं शत्रू येऊं नये म्हणून) खंदक खणणें -खोदणें. ३ *to destroy, to ruin* नाश करणें, विनाश करणें, विध्वंस करणें. Sap'ped *pa. t.* & *pa. p.* Sap'ping *pr. p.*

Sap (sap) [A. S. *sæp* -L. *sapa*, new wine boiled thick.] *n. the vital juice of plants* (वनस्पतींचा) पिंडरस *m*, जीवनरस *m*, रस *m*. २ (*fig.*) सार *n*, सत्त्व *n*, जीव *m*, दम *m*. [S. GREEN, *a light green colour* अर्धवट हिरवा रंग *m*, हिरवट रंग *m*.]

Sapan-wood *n.* पतंगाचें लांकूड *n*, पतंग *m*.

Sapid (sap'id) [Fr. *sapid* -L. *sapidus* -*sapio*, I taste.] *a. well-tasted, savoury* चवदार, रुचकर, स्वादिष्ठ; as, "Camels, to make the water S., do raise the mud with their feet."

Sapi'dity *n. taste, savour* रुचि *f*, स्वाद *m*, चव *f*.

Sap'idness *n.* रुचि *f*, चव *f*, स्वाद *m*.

Sa'pience *n. wisdom* शहाणपणा, दूरदर्शिपणा. २ *pretended wisdom* शहाणपणाचा आव, शहाणपणाचें ढोंग *n*.

Sapient (sā'pi-ent) [L. *sapiens*, *sapientis* -*sapio*, I taste, I am wise.] *a.* (R.) *wise* शहाणा, विचारी, विचारवान्, दूरदर्शी. २ (often in irony) *discerning, sagacious* चतुर, शहाणा, (सारासार) विचार करणारा.

Sap'less *a.* वाळलेला, सुकलेला, नीरस, निस्सत्व, निस्सार, असार.

Sap'ling *n. a young tree* लहान झाड *n*, बालवृक्ष *m*, रोपा *m*, रोपडा *m*, माडा *m*. २ *a young person* तरुण *m*, ज्वान, जवान, तरणा *m*, भर उमेदींतला.

Sapo (sapō) [L.] *n.* साबण *m*.

Saponaceous (sap-o-nā'shus) [L. *sapo*, soap.] *a.* साबणासारखा, साबणाच्या धर्माचा.

Sapon'ifiable *a.* साबण करण्यासारखा, सर्जीभवनयोग्य.

Saponifica'tion *n.* साबण करण्याची पद्धति *f*. २ साबण करणें *n*. (b) सर्जीभवन *n*. ३ पांढरा होणें *n*. [S. OF A CORPSE प्रेत कुजून साबूसारखें होणें *n*.]

Sapon'ifier *n.* (आल्कलि, वगैरे) साबण करणारा पदार्थ *m*, सर्जीभवन करणारा पदार्थ *m*.

Saponify (sap-on'i-fī) [L. *sapo*, soap and -*fy*.] *v. t.* (चरबींतील अम्लांत आल्कलि मिळवून) साबण करणें, सर्जीभवन *n*. करणें.

Saporific (sapō-rif'ik) [L. *sapor*, taste, & *facere*, to make.] *a. producing taste* रुचि उत्पन्न करणारा, रुचि आणणारा, रुच्य (औषधि).

Sap'per *n.* खंदक खोदणारा. [S. AND MINER (in the British Army) *a soldier employed in the construction of forts and mines* किल्ले बांधणें व सुरुंग लावणें ह्या कामावरील शिपाई, छप्परमैना (corruption of English Sapper and Miner).]

Sapphire (saf'īr) [Gr. *sappheiros*, sapphire.] *n.* नीलमणि *m*, शनि *m*.

Sap'py *a. juicy* रसाळ, रसभरित, रसानें भरलेला -ओथंबलेला. २ (*fig.*) *young* बाल, तरुण, उमेदींतला.

Saprae'mia *n.* (*med.*) पूयजन्य ताप *m*, शरीरांत पूं भिनून गेल्यामुळें येणारा ताप *m*.

Sap'rot *n.* इमारतीच्या लांकडाचा नाश करणारा रोग *m*.

Sap-wood ( Alburnum ) *n.* (*bot.*) श्वेतकाष्ठ *n.*

Saracen ( sar'a-sen ) [L. *Saracenus* -Ar. *sharkeyn*, Eastern people.] *n.* सारासेन. हे लोक मूळचे अरब किंवा मुसलमान. परंतु युरोपांतील लोक यांना सारासेन म्हणत. [पद्धतीचा.

Saracen'ic (-al) *a.* (*esp.* of architecture ) सारासीन-

Sarcasm ( sär'kazm ) [ Gr. *sarkasmos* -*sarkazo*, to tear flesh like dogs, to speak bitterly -*sarx*, *sarkos*, flesh.] *n.* *bitter or wounding remark*, ( *esp.* one ironically worded ) टोमणा *m*, टोला *m*, ठोसरा *m*. २ *language consisting of*, *faculty of uttering*, *use of*, *such remarks* वर्मी भाषण *n*, वर्मोक्ति *f*, छद्मी भाषण *n*. (b) छद्मी भाषणाची शैली *f*.

Sarcas'tic, Sarcas'tical *a.* टोमण्याचा, टोल्याचा, छद्मी, वर्मी, तिखट, झोंबणारा, लागणारा.

Sarcas'tically *adv.* टोमणा मारून, टोला देऊन, झोंबेल अशा रीतीनें, छद्मी बोलून.

Sarcenet ( särs'-net ) [ L. *sericum*, silk -L. *seres*, a people of E. Asia, from whom the ancients got their first silk.] *n.* सार्सनेट नांवाचें तलम रेशमी कापड *n*. याचा अस्तराकडे किंवा फीत करण्याकडे उपयोग करतात.

Sarcocarp ( sär'-kō-kärp ) [ Gr. *sarkos*, flesh, & *karpos*, fruit.] *n.* (*bot.*) फळांतील ( गोड ) गीर *m*, फलमज्जा *f*.

Sarcocele ( sar'-kō-seel ) [ L. *sarkos*, flesh, *kule*, tumour.] *n.* (*med.*) मांसमय अंडवृद्धि *f*, सूज किंवा इतर विकार झाल्यामुळें होणारी अंडवृद्धि *f*. [ SYPHILITIC S. उपदंशज अंडवृद्धि *f*.]

Sarcolemma ( sarkō-lem'ma ) [L. *sarkos*, flesh, and *lemma*, rind, skin.] *n.* मांसधारी कला *f*, पेशींच्या तंतूंचें वेष्टन *n*. [पेशी = Muscle. In Modern Marathi स्नायु is now-a-days used for Muscle.]

Sarcoma (sär-kō'ma) [Gr. *sark'ōma*, -*sarkos*, flesh.] *n.* *a dangerous and painful fleshy tumour* मांसार्बुद *n*, एक प्रकारचें दुष्ट आवाळूं *n*. २ ( of plants ) *a soft, round growth* टेंगूळ *n*. Sarco'mata *n. pl.*

Sarcophagous ( sar-kōf'a-gus ) [ Gr. *sarkos*, flesh, *phagein*, Sk. भुज्, to eat.] *a.* मांसभोजी, मांसोपजीवी.

Sarcophagus ( sär-kof'-ā-gus ) [ Gr. *sarkophagus*, flesh-consuming (stone); -*sarkos*, flesh, & *phagos*, eating.] *n.* ( *esp.* among the ancients ) *a stone coffin* प्रेताची (दगडी) पेटी *f*. २ थडग्याजवळ ठेवलेली दगडाची पेटी *f*. Sarcophaguses, Sarcophagi *n. pl.*

Sarcop'tes *n.* ( *med.* ) खरजेचे जंतू *m. pl.*

Sarco'sis *n.* Same as Sarcoma, q. v.

Sardonic ( sär-don'ik ) [ Fr. -L. *Sardonica* ( herba) a Sardinian plant, causing the eater to make a wry face.] *a.* ( of a laugh, jest, &c.) *bitter*, *ironical*, *mocking* थट्टेचा, लागणारा, झोंबणारा.

**Sarsaparilla** (sär-sa-pa-ril'a) [Sp. *zarzaparilla -zarza*, bramble, & *parilla*, a little vine.] *n.* रक्तशुद्धि करणारें औषध *n*, सार्सापरिला *m*. हिंदुस्थानांत या औषधीबद्दल उपळसरी किंवा अनंतमूळ वापरतात.

**Sarse'net**, Same as Sarcenet.

**Sartorial** (sär-to'-ri-al) [L. *sartor*, a tailor.] *a.* *relating to a tailor* शिंप्याचा. २ शिवणकामाचा.

**Sash** (sash) [Pers. *shash*, a turban.] *n.* कमरपट्टा *m*, पट्टा *m*. २ खांद्यावरून घालण्याचा पट्टा *m*.

**Sash** (sash) [Fr. *chasse*, a frame –L. *capsa*, a case.] *n.* *the frame of a window, saw, &c.* खिडकीची चौकट *f*, करवतीची चौकट *f*. [S. BARS तावदानाचे गज *m. pl.*] S. *v. t.* *to provide with a sash* चौकट बसवणें. S. door *n.* तावदानाचा दरवाजा *m*.

**Sat**, *pa. t. & pa. p.* of Sit.

**Satan** (sā'-tan) [Heb. *satan*, enemy, Ar. *satana*, to be adverse.] *n.* *the Devil* सैतान.

**Satan'ic,-al** *a.* सैतानाचा. २ सैतानी, दुष्ट.

**Satan'ically** *adv.* सैतानासारखा *decl.*

**Sa'tanism** *n.* *extreme wickedness* सैतानीपणा *m*, सैतानी *f*, अत्यंत दुष्टपणा *m*. २ *profanity* नीतिभ्रष्टता *f*.

**Satchel** (sach'el) [L. *saccus*, a bag.] *n.* जुगदान *n*, जुजदान *n*, पिशवी *f*.

**Sate** (sāt) [Probably shortened from satiate. L. *satur*, full.] *v. t.* *to gratify* (desire, or the person feeling it) *to the full* विटवणें, ओकारी आणणें, वीट आणणें, सिठी बसवणें, पुरेपुरेसें -नकोनकोसें करणें. Sated *pa. t. & pa. p.* Sating *pr. p.*

**Sateen** (sä-tēn') [From the root of Satin.] *n.* साटीन *n*.

**Satellite** (sat'el-līt) [L. *satelles*, an attendant.] *n.* *a person's follower or hanger-on* आश्रित *m*, (*fig.*) बगलबच्चा *m*, उपग्रह *m*. २ *a planet revolving round another* उपग्रह *m*.

**Sa'tiable** *a.* *that may be satiated* तृप्त होण्यासारखा.

**Satiate** (sā'shi-āt) [L. *satio -satis*, enough.] *v. t.* *to oversatisfy* विटवणें, वीट आणणें, नकोसा -पुरेपुरेसा करणें. S. *a.* *glutted, surfeited* विटलेला, धालेला, नकोनकोसा झालेला. [वीट *m*.

**Satia'tion** *n.* *satiety* तृप्त करणें. (b) तृप्तता *f*, तृप्ति *f*,

**Sati'ety** *n.* *surfeit* तृप्तता *f*, तृप्ति *f*, वीट *m*.

**Satin** (sat'in) [L. *seta*, hair.] *n.* साटीन *n*. S. *a.* साटीनचा. S. *v. t.* साटीनसारखा करणें.

**Sat'inet** *n.* पातळ साटीन *n*.

**Sat'in-wood** *n.* (the tree) हेद *m*, हेदरू *m*, हेदू *m*. याच्या लांकडाच्या पेट्या करतात.

**Satire** (sat'īr) [Fr. –L. *satira, satura*, a species of poetry.] *n.* *a writing* (prose or poetry) *which exposes, ridicules, and censures the follies or vices of the time* औपरोधिक लेख *m*, औपरोधिक कविता *f*, औपरोधिक फटका *m*, निंदात्मक लेख *m*, उपहासात्मक कविता *f*. २ *a sarcastic speech* औपरोधिक भाषण

*n*, निंदापर भाषण *n.* ३ *ridicule* थट्टा *f*, निंदा *f*, उपहास *m.* ४ *a thing that brings ridicule upon something* उपहास *m*, थट्टा *f*.

Satir'ic *a.* औपरोधिक, निंदापर, उपहासात्मक, थट्टेचा.

Satir'ical *a.* औपरोधिक, निंदापर. २ *given to the use of satire* औपरोधिक भाषण करणारा, औपरोधिक लेख लिहिणारा, सद्यःस्थितीवर फटके लिहिणारा.

Sat'irist *n. one who speaks, or writes, in satires* औपरोधिक लेख लिहिणारा *m*, औपरोधिक लेखक, औपरोधिक कवि *m*, औपरोधिक भाषण करणारा *m*, औपरोधिक वक्ता *m*.

Sat'irize *v. t. to attack with satire* ( -वर ) औपरोधिक लेख लिहिणें, औपरोधिक लेखांचा भडिमार करणें, औपरोधिक फटके लिहिणें.

Satisfac'tion *n.* (*act.*) ( इच्छा ) पुरी करणें *n*, पुरविणें *n*, समाधान *n.* करणें *n.* (b) (*state*) समाधान *n*, तृप्ति *f*, संतोष *m*, इच्छापूर्ति *f*. (c) समाधानाची गोष्ट *f*. २ (*act.*) फेडणें *n.* (b) (state.) फेड *f*, ( योग्य ) मोबदला *m.* ३ (*act.*) खातरी *f*. करणें *n.* (b) (state) खातरी *f*, खातर *f*, खातरजमा *f*, संशयनिवृत्ति *f*, शंकासमाधान *n.* ४ (*theol.*) *atonement made by Christ for sins of men* ( पापांकरितां ख्रिस्तानें घेतलेलें ) देहान्त प्रायश्चित्त *n.* ५ (*eccl.*) *performance of penance* प्रायश्चित्त *n*.

Satisfac'torily *adv.* समाधानकारक रीतीनें, संतोषकारक रीतीनें. २ खात्री होईल अशा रीतीनें.

Satisfac'toriness *n.* समाधानकारकता *f*.

Satisfac'tory *a.* समाधानकारक, समाधान करणारा, तृप्ति करणारा, इच्छेसारखा, मनाजोगा, मनासारखा, योग्य, भरपूर. २ समाधानकारक, खात्रीचा, खात्री करणारा, संशयनिवृत्ति करणारा, संशयनिवर्तक; as, "S. account."

Sat'isfiable *a.* समाधान करण्यासारखा, तृप्त करण्यासारखा.

Sat'isfied *pa. t.* S. *pa. p.* समाधान केलेला, पुरवलेला, तृप्त. [ To BE S. तृप्त होणें, समाधान पावणें. ] (b) फेडलेला. २ खात्री केलेला, गतसंदेह. [ To BE S. खात्री असणें, खात्री होणें.]

Sat'isfier *n.* समाधान करणारा *m*, इच्छा पुरविणारा *m*.

Satisfy ( sat'is-fi ) [L. *satis*, enough, and *facio*, I make.] *v. t. to gratify fully the desire of* समाधान करणें, ( इच्छा ) पुरविणें, ( मनोरथ ) पूर्ण करणें, तृप्ति करणें *g. of o.*, ( -ला ) तृप्त करणें. २ *to please fully* समाधान करणें, संतोष देणें, खूष करणें. ३ *to give what is due* फेडणें, ( कर्जाची ) फेड करणें; as, "To S. a creditor." ४ *to supply with what is desired* गरज भागवणें, गरज -मागणी पुरी करणें -भागवणें. ४ *to fulfil* ( conditions ) ( अट ) पुरी करणें, पुरविणें. ५ *to convince* समाधान करणें, खात्री करणें, संशय फेडणें, शंकासमाधान करणें, खातरजमा करणें, आक्षेपाचें निरसन करणें. ६ ( of Christ ) *to make atonement for sins of men* पापाकरितां देहान्तप्रायश्चित्त घेणें, पापनिष्कृति करणें. S. *v. i. to leave nothing to be*

*desired* समाधान होणें, इच्छा पूर्ण होणें, इच्छा तृप्त होणें. २ *to make atonement* प्रायश्चित्त घेणें. ३ फेड करणें.

Satrap ( sā'-trap *or* sat'rap ) [Gr. *satrapes*, from the Persian, lit. 'chief of a district.'] *n.* (*orig.*) पर्शियन साम्राज्यांतील एका प्रांताचा सुभेदार *m*, सत्रप *m.* २ ( now, *esp.* in rhet. with implication of luxury, or tyranny ) *subordinate ruler*, *colonial governor* (ऐषआरामांत दिवस घालविणारा जुलमी ) गव्हर्नर. [पाचा अधिकार *m.*

Sat'rapy *n.* सत्रपच्या अधिकारांतील मुलूख *m.* २ सत्र-

Sat'urant *a.* संपृक्तकारी.

Saturate (sat'u-rāt) [L. *satur*, full -*satis*, enough.] *v. t. to fill to the utmost capacity, to soak completely* पुरा भिजविणें, रोमरोम भरणें, कणानकण भिजवणें किंवा युक्त करणें, उपळवणें, उमळवणें, उपळ होईसा करणें. २ *to absorb, dissolve, or combine with, to the fullest extent* संपृक्त करणें. S. *a.* पुरा भरलेला. २ संपृक्त केलेला, संपृक्त.

Satura'ted *pa. t.* S. *pa. p.* पुरा भरलेला. २ संपृक्त.

Satura'tion *n.* पुरा भरणें, रोमरोम भरणें *n.* २ संपृक्त करणें *n*, संपृक्तता *f*, (जलादि द्रवांत एखादा क्षार) शक्य तितका विरघळणें *n.*

Saturday ( sat'ur-dā ) [A. S. *sæter-dæg*, day of Saturn -L. *Sāturnī dies*, Saturn's day.] *n.* शनिवार *m.*

Saturn ( sat'urn *or* sā-'turn ) [L. *Saturnus* -*sero*, *satum*, to sow.] *n.* ( *astron.*) शनि *m*, शनैश्चर, मंद, सौर (ग्रह किंवा देवता). [SATURN'S RING शनिवलय *n.*]

Saturna'lia *n. pl.* ( scene or time of ) *boisterous revelry* धांगडधिंगा *m*, धुमश्चक्री *f*, नाचरंग *m.*

Satur'nian *a.* शनीचा. (b) शनीच्या कल्पित सुवर्णयुगाचा. २ *happy* भरभराटीचा, सुखाचा, सुखसमृद्धीचा. S. *n.* शनीवरचा मनुष्य *m.*

Satur'nic *a.* ( *path.*) शीसदोष झालेला.

Saturni-cen'tric *a.* शनिकेंद्रक, शनिमध्यस्थ.

Saturni-graphy *n.* शनिगोलविद्या *f.*

Sat'urnine *a.* (according to astrologers ) *under the influence of the planet Saturn* शनीची दृष्टि असणारा. (b) ( of looks and temperament ) *gloomy*, *melancholy* जड, मंद, उदासीन.

Satyr ( sat'ĕr ) [L. *satyrus* -Gr. *satyros.*] *n.* पशुवृत्तीचा मनुष्य *m.*

Satyriasis ( sati-r'i-asis ) [Gr. *satyros*, a satyr.] *n.* ( पुरुषाची ) प्रबल कामेच्छा *f*, अतिशय कामवासना *f*, कामातिरेक *m*, कामज्वर *m.* [THE ANALOGUE OF NYMPHOMANIA IN FEMALES.]

Sauce ( saws ) [Fr. –L. *salsus*, salted.] *n. a preparation, usually liquid, to give a relish to food* तोंडीलावणें *n*, कालवण *n*, कोरड्याचें *n*, वोढूं *n.* [To

SERVE FOR S. कोरड्यास होणें. HUNGER IS THE BEST S. भूक हेंच खरें तोंडींलावणें आहे. TO SERVE WITH THE SAME S. जशास तसें वागणें -करणें. POOR MAN'S S. भूक *f.*] २ (*fig.*) *something that adds piquancy* तोंडींलावणें (*fig.*), मीठतिखट *n* (*fig.*). ३ *solution of salt and other ingredients used in some manufacturing processes* मसाला *m*, मालमसाला *m*. ४ *sauciness, impertinent speech* उद्धटपणा *m*, उर्मटपणा *m*, आडदांडपणा *m*, ताठपणा *m*, कडकपणा *m*, दांडगाई *f*, ताठ -कडक भाषण *n*, दांडगाईचें भाषण, दांडगाईचें वर्तन *n*; as, "None of your S." S. *v. t. to season with a sauce* (-आंत) मीठतिखट घालणें, मसाला घालणें, मसाला घालून रुचकर -चवदार -झणझणीत करणें. २ (*fig.*) *to make piquant, to add relish to* झणझणीत करणें, चुरचुरीत करणें, चवदार -रुचकर करणें. Sauced *pa. t.* and *pa. p.* Sau'cing *pr. p.*

Sauce'-boat *n.* तोंडींलावणें वाढण्याचें भांडें *n*.

Sauce'-box *n.* गरम मिजाशीचा तरुण मनुष्य *m*.

Sauce'-pan *n.* (पदार्थ शिजविण्याची) कढई *f*.

Saucer (saws'ér) [या शब्दाचा मूळ अर्थ तोंडींलावणें ठेवण्याचें भांडें असा होता.] *n.* (चहाची) बशी *f*. २ कुंड्यांखालीं ठेवण्याची मोठी पसरट बशी *f*. ३ बशीच्या आकाराची वस्तु *f*, वाटी *f*, टवळें *n*. [WOODEN S. OR BOWL पडगा or पडघा *m*, पड्गें or पड्घें *n*.]

Saucer-eyed *a. having full round eyes* बटबटीत डोळ्यांचा.

Saucer-track *n. a banked-up track for bicycle races, &c.* (बायसिकलशर्यतींचा) उंच रस्ता *m*.

Sau'cily *adv.* उद्धटपणानें, दांडगाईनें, टाकून. [TO SPEAK S. टाकून बोलणें.]

Sau'ciness *n.* उद्धटपणा *m*, दांडगटपणा *m*, उर्मटपणा *m*, ऐट *f*, तोरा *m*, अविनय *m*, गमजा *f. pl.*

Sau'cy *a. rude* (*esp.* towards a superior) उद्धट, धीट, दांडगा, उर्मट, दांड, तोंड टाकणारा, टाकून बोलणारा, चरमरीत. (b) ऐटी, तोऱ्याचा.

Saunter (sawn'ter) [Of doubtful origin.] *v. i. to wander idly and aimlessly* भटकणें, फिरणें, रमतरमत -रमतेरमते फिरणें, गमणें, रिकामा फिरणें. २ (*fig.*) (चैनीनें) कालक्रमणा करणें; as, "To S. through life." S. *n. a stroll* चैनींत फिरणें, रिकामें भटकणें.

Saun'terer *n.* चैनींत फिरणारा, रिकामें भटकणारा.

Saun'tering *n.* फिरणें *n*, गमणें *n*, रमणें *n*. Saun'teringly *adv.* रमत रमत, गमत गमत, फिरत फिरत.

Sausage (saws'āj) [Fr. *saucisse*, sauce.] *n. minced and seasoned meat stuffed in a skin* (usually the intestine of an animal) तिखटमीठ घातलेलें कबाब किंवा कुलमा यांसारखें पक्वान्न *n*.

Savage (sav'āj) [O. Fr. *salvage* -L. *silvaticus*, wild, -*silva*, a wood.] *a. wild, uncivilized* रानटी, रानवट, वन्य, जंगली. २ अशिक्षित, विद्याचारहीन, असभ्य, असंस्कृत. ३ *cruel* क्रूर, निर्दय, उग्र, करडा. ४ (*colloq.*) *angry, out of temper* रागीट, रागावलेला,

S. *n.* *one who is uncivilized or barbarous* रानटी मनुष्य, रानटी स्थितींतला मनुष्य, रानटी, जंगली, विद्याचारहीन, असंस्कृत. २ *a brutal person* राक्षस *m*, सांग *m*, सांगहृदयाचा, खाटीक *m*. ३ *one who is exceedingly coarse in manners* अडाणी, आडमुख्या. S. *v. t.* (of a horse) *to attack and bite or trample* चावणें, पायांखालीं तुडवणें, लाथाडणें; as, "He was *savaged* by his horse."

Sav'agely *adv.* रानटीपणानें, क्रूरपणानें, निर्दयपणानें.

Sav'ageness *n.* रानटीपणा *m*, विद्याचारहीनता *f*, जंगलीपणा *m*. २ क्रूरपणा *m*, निर्दयपणा *m*.

Sav'agery *n.* *the condition of a savage* रानटीपणा *m*, रानटी स्थिति *f*. २ विद्याचारहीनता *f*, असंस्कृतता *f*. ३ *brutal conduct* आडदांड वर्तन *n*, राक्षसी वर्तन *n*. ४ क्रूरपणा *m*, निर्दयपणा *m*.

Savann'ah (मध्यअमेरिकेंतील) गवताळ रानें, सव्हान्ना.

Savant (sä-van') [Fr.] *n.* *a man of learning in literature or science* पंडित *m*, शास्त्रज्ञ *m*, विद्वान् *m*.

Save (sāv) [Fr. *sauver* -L. *salvere*, to save.] *v. t.* *to rescue from danger, evil, death, &c.* वांचवणें, बचावणें, बचाव *m* -रक्षण *n*. करणें *g. of o.* [To S. THE SITUATION संकट टाळणें, वेळ मारून नेणें, बाजू निभावणें -सांवरणें -सांवरून धरणें. To S. APPEARANCES वाईट स्थिति लपविण्याकरितां वरकरणी वहाणा करणें.] २ *to deliver from sin and perdition* वांचवणें, तारणें, उद्धरणें, तारण *n* -उद्धार *m*. करणें *g. of o.*, पापापासून -नरकापासून वांचवणें; as, "The *saving* of souls." ३ *to put by, to economize* वांचवणें, मागें टाकणें, शिलकीस टाकणें-ठेवणें, उरवणें, पिशवींत -संग्रहीं टाकणें. [YOU MAY S. YOUR PAINS OR TROUBLE श्रम घेण्याचें कारण नाहीं, ते व्यर्थ जातील.] ४ *to relieve* (a person) *from need of expending* (money, trouble, &c.) वांचवणें, वारणें, (प्रसंग) टाळणें, सोडवणें, निवारणें; as, "His secretary *saved* him much time or labour." ५ *to succeed in catching* साधणें, गांठणें, पकडणें, (-चें) टिपण साधणें *g. of o.*; as, "Write hurriedly to *save* the post." [SHALL WE S. THE TIDE? पाणी आहे तोंपर्यंत आपण पोहोचूं काय? आपणांस ताण सांपडेल काय?] ६ *to make reservation* फट *f*. ठेवणें, सवड *f*. ठेवणें. [SAVING CLAUSE बचावाचें कलम *n*, सुटून जाण्याचें कलम *n*.] S. *v. i.* *to be economical* वांचवणें, शिलकीस टाकणें, बचत करणें.

Save *prep.* *except* शिवाय, खेरीज, वांचून.

Save'able, Sav'able *a.* वांचविण्याजोगा, तारण्याजोगा.

Saved *pa. t.* Saved *pa. p.* वांचवलेला, बचावलेला. २ तारलेला, उद्धरलेला. ३ उरवलेला, शिलकीस टाकलेला, मागें पाडलेला, &c. [TO BE SAVED तरणें, उद्धार होणें *g. of o.*]

Sav'er *n.* वांचविणारा, बचावणारा, &c.

Sav'ing *pr. p.* वांचविणारा, बचावणारा. २ तारणारा,

तारण करणारा, उद्धार करणारा. ३ उरवणारा, शिलकीस टाकणारा. ४ निवारणारा. ५ साधणारा. ६ अपवादाचा, अपवादात्मक. (b) बचावाचा, सुटून जाण्याचा.

Sav'ing *n. the act of preserving or rescuing* **वांचवणें, बचावणें, तारणें, उद्धरणें, निवारणें,** &c. २ *a reservation* **अपवाद** *m*, **बचाव** *m*, **फट** *f*, **सूट** *f*, **दार** *n*. ३ (in *pl.*) *money put by* **शिल्लक टाकलेला पैसा** *m*, **बचत** *f*, **शिल्लक** *f*. [SAVINGS BANK (विशेषतः पोष्टाची) सेव्हिंग्ज् ब्यांक *f*.]

Saviour (sāv'-yėr) [Fr. -L. *salvare*, to save.] *n. one who saves from evil* **(संकटापासून) वांचविणारा, बचावणारा, बचाव** *m* **-रक्षण** *n*. **करणारा** *m*, **सोडविणारा.** २ *a deliverer* **तारणारा, तारक, तारण करणारा, उद्धार करणारा, उद्धर्ता.** [THE S., OUR S. येशू ख्रिस्त.]

Savour (sā'-vėr) [O. Fr. *savour* -L. *saporem -sapor*, a taste.] *n. a taste* **चव** *f*, **गोडी** *f*, **रुचि** *f*, **वास** *m*, **स्वाद** *m*. २ *distinguishing quality or character* **विशेष गुण, विशेष धर्म.** S. *v. i. to have a distinguishing taste* **(विशेष) चव** *f* **-रुचि** *f*. **असणें.** २ *to suggest presence* (of) **ची चुणूक -झुणूक** *f*. **दाखविणें;** as, "The offer savours of impertinence."

Sa'vouriness *n.* **चवदारपणा** *m*, **स्वादिष्टपणा** *m*.

Sa'vourless *a. tasteless* **बेचव, पाणचट.**

Sa'voury *a. of pleasant taste* **रुचकर, स्वादिष्ट, चवदार, खसंग, खुमारीचा, रोचक.** S. *n.* **मिष्टान्न** *n*, **पक्कान्न** *n*.

Saw *pa. t.* of See.

Saw (saw) [A. S. *sagu -secgan*, to say.] *n. proverbial saying, old maxim* **म्हण** *f*, **न्याय** *m*.

Saw (saw) [Of Anglo-Saxon origin. L. *secare*, to cut.] *n.* **करवत** *m*, *f*, dim. **करवती** *f*, **आरी** *f*, **आरा** *m*, **अरकस** *m*. [BACK S. पट्टीचा करवत, पाठीवर पितळेची पट्टी बसविलेला करवत. BAND S. पट्ट्यासारखा (चालणारा) करवत. BOW S. धनुष्याकार करवत. CIRCULAR S. वाटोळा (फिरणारा) करवत. COMPASS S. सांगाडीचा करवत. CROSS CUT S. वाढ कापण्याचा करवत *m*, मोपे कापण्याचा करवत. DOUBLE S. अढ्या करवत *m*, अडवा करवत *m*. FRET S. नकशी काढण्याचा करवत *m*. HACK S. लोखंड वगैरे धातु कापण्याचा हातकरवत. HAND S. हातकरवत. JIG S. (खालींवर चालणारा) मशीनकरवत. TENON S. कुसू काढण्याचा करवत.]

Saw *v. t.* **करवतीनें कापणें, करवतीनें चिरणें, चिरकाम करणें, अरकसणें, करवतणें.** २ *to move backward and forward* **(करवतीसारखें) पुढें पाठीमागें जाणें -येणें.** ३ (used passively) **चिरणें, चिरला जाणें;** as, "Easily *sawn*." ४ (book-binding) **(पुस्तकाची पाठ) करवतणें, (पाठीला) खांचे पाडणें.** Saw *v. i.* **करवतीनें कापणें, चिरणें, चिरकाम करणें.** २ **करवतीसारखें कापणें.** ३ **करवतणें, कापणें;** as, "The wood *saws* well." Sawed *pa. t.* Sawed, Sawn *pa. p.* Saw'ing *pr. p.*

Saw'-bench *n.* **करवतण्याचें मेज.**

Saw'-doctor *n.* **करवताचे दांते काढण्याचें यंत्र** *n*.

Saw'-dust *n.* ( चिरकामांतील ) भूस *n*, भुसा *m.* [ To LET THE SAW-DUST OUT OF ( -चा ) पोकळपणा बाहेर काढणें -उघडा करणें. ]

Saw'-file *n.* तीनधारी कानस.

Saw'-frame *n.* करवताची सांगाडी.

Saw'-horse *n.* ( चिरकामाकरितां ) लांकूड ठेवण्याचा घोडा *m*, पायखोडा *m.*

Saw'-mill *n.* करवतकामाची -चिरकामाची गिरण *f.*

Saw'yer *n.* करवतकाम करणारा *m*, चिरकाम्या *m*, करवत्या *m*, अरकसी *m*, अराकस *m.* [ SAWYER'S WORK चिरकाम *n.*]

Saxon ( saks'un ) [ A. S. *seaxa -seax*, a knife or short sword.] *n.* ( 5th and 6th centuries ) (उत्तरजर्मनींतून इंग्लंडवर स्वारी करणारांपैकीं ) सॅक्सन *m.* २ सॅक्सन भाषा. ३ अँग्लोसॅक्सन मनुष्य *m.* ४ सॅक्सनीचा रहिवाशी *m.* S. *a. relating to the Saxons* सॅक्सन लोकांचा. २ सॅक्सनीचा.

Sax'ondom *n.* सॅक्सन लोकांचा मुलूख -प्रांत *m.*

Say ( sā ) [A. S. *secgan.*] *v. t. to utter in words* म्हणणें, बोलणें, तोंडावाटे काढणें, बोलून दाखविणें. [To S. THE WORD तोंडावाटे ( हुकुमाचा ) शब्द काढणें, इच्छा व्यक्त करणें. To S. NO MORE बोलणें आटपणें, भाषण संपविणें. To S. A GOOD WORD FOR ( -ची ) तारीफ -तरफदारी करणें. To S. GRACE जेवणापूर्वी ईश्वराचा आशीर्वाद मागणें. To S. OUT मोकळ्या मनानें किंवा स्पष्ट शब्दांनीं बोलून दाखविणें. To S. ONE NAY ( -ला ) नाहीं म्हणणें, ( -ची विनंति ) नाकारणें. To S. ONE'S S. बोलावयाचें होतें तें बोलून टाकणें. THAT IS TO S. म्हणजे, दुसऱ्या शब्दांत (बोलावयाचें झाल्यास).] २ *to repeat* ( a lesson ) म्हणणें, म्हणून दाखवणें. ३ *to state, to promise* म्हणणें, सांगणें, बोलणें, वचन देणें; as, "You said you would." [IT GOES WITHOUT SAYING तें सांगण्याची जरूरी नाहीं ( अगदीं उघड आहे. ). YOU MAY WELL S. SO तुम्हीं असें खुशाल म्हणावें. ] ४ *to put into words, to express* (शब्दांनीं ) सांगणें, व्यक्त करणें, ( शब्दांत ) मांडणें; as, "That was well said." ५ *to adduce or allege in argument* बोलणें, पुढें मांडणें -आणणें; as, "There is much to be *said* on both sides." ६ *to give as one's opinion* ( -चें ) म्हणणें -मत असणें, सांगणें, अभिप्राय -मत देणें; as, "What *say* you to a theatre?" ७ *to select as example* समजणें, कल्पना करणें; as, "Well, S. it were true, what then?"

Say *n.* म्हणणें *n.* २ बोलण्याची संधि *f*; as, "Let him have his S.; Had no S. in the matter."

Say'er *n.* बोलणारा *m*, म्हणणारा *m.*

Say'ing *n.* बोलणें *n*, म्हणणें *n.* २ *a proverb* म्हण *f.*

Scab ( skab ) [ A. S. *scæb* -L. *scabies.*] *n. the rough crust which forms over a healing sore* खपली *f*, खपला *m*, खवल *n*, खवळ *n*, खवली *f*, खवला *m*, loosely कपचा *m*, कोशेटा *m*, कोशेटी *f*, कोशेरा *m*, खरपुडी *f*, पापुद्रा *m*, खवंद *m*, कवंद *m.* २ ( of cattle ) खवडे *m. pl.* ३ ( Trade unionism )

संपांत सामील न होणारा कामगार *m*, संपवाल्यांच्या जागीं काम करणारा मजूर *m*. ४ बटाट्याचा रोग *m*. S. *v. i. to form a scab over* खपली धरणें, खपली पडणें.

Scab'bard ( skab'ard ) [A. S. *sceatha*, harm, and *beorgan*, to protect.] *n. the sheath of a weapon* म्यान *n*, मेण *n*, कोप, *specif.* असिकोष *m*. [END-PIECE OF THE MOUNTING OF A S. तहनाल or तैनाल. TIE OF A SHEATH TO THE HILT सल *m*, सळ *m*. TO PUT INTO THE S. म्यानांत घालणें, मेण करणें. ]

Scab'bed *pa. t.* and *pa. p.* Scab'bedness *or* Scabb'iness *n*. खपल्या धरणें -पडणें. २ खवडे होणें *n*. Scab'by *a. covered with scabs* खपल्या धरलेला. २ खवड्या.

Scabies ( skā'-bi-ēz ) [L.] *n. the itch* खरूज *f*, खवडे.

Sca'bious *a. itchy* खरूज झालेला, खरजेला.

Scabrous ( skā'-brus ) [L. *scaber*, rough.] *a. having a rough surface* खडबडीत ( अंगाचा ), खरखरीत. २ ( *Bot.* ) खरलोमश; उ० करवतीचा पाला.

Scaffold ( skaf'old ) [O. Fr. *escafaut.*] *n. elevated platform* माळा *m*, मंचक *m*; for the execution of a criminal माचा *m*. [THE S. फांसावर मृत्यु *m*, फांशी *f*.]; for workmen परांची *f*, माळा *m*; for spectators माचोळी *f*, मंचक *m*, तारांगण *n*. [PORTABLE OR MOVABLE S. तक्तरांवा *m*.] S. *v. t. to attach scaffolding to* ( -ला ) परांची बांधणें.

Scaff'olding *n*. परांची *f*, माळा *m*, माचोळी *f*, पालख *f*.

Scalable ( skāl'a-bl ) [See Scale.] *a. that may be scaled or climbed* चढून जातां येण्यासारखा, चढण्यासारखा; as, " A S. height."

Scalariform ( ska-lar'i-form ) [L. *scalare*, *scalaria*, staircase, and Form.] *a.* ( *bot.* ) ( veins ) निःश्रेण्याकार. [ निःश्रेणी = STAIRCASE.] पृष्ठभागावरच्या बारा आडव्या रेघा दाखविणाऱ्या ( रसनलिका किंवा शिरा ); उ० सुरू व गौरीचे कंस.

Scald ( skawld ) [O. Fr. *eschalder* –L. *ex* of intensive force, and *calidus*, hot.] *v. t. to burn with a hot liquid* ( कढत पातळ पदार्थानें ) पोळणें, भाजणें; as, "Was *scalded* to death by the steam." [SCALDING TEARS (अतिदुःखाचे) ऊन अश्रू. TO SCALD ONE'S FINGERS पोळणें, आंच *f* -चटका बसणें *in. con.*] २ *to heat to the point of boiling* कढवणें, उकळी फुटेपर्यंत तापवणें, ऊन करणें. [SCALDED CREAM तापवलेल्या दुधावरील साय *f*.] ३ *to cleanse by using very hot water* ऊन पाण्यानें धुणें -साफ करणें. S. *n. injury caused by a hot liquid or steam* ( अंग ) पोळणें *n*, भाजणें, चटका *m*, आंच *f*. Scalded *pa. p.* भाजलेला, पोळलेला. [TO BE SCALDED पोळणें. ]

Scald, Skald ( skäld ) [Dan. *skal*, peel.] *n. scurf, scale* दारुणा or दारणा *m.*??

Scald-head *n. a disease of the scalp* चाई *f*, उंदरी *f*.

Scalding *pr. p.* भाजणारा, पोळणारा. [S. HOT उन्हून or उनून, जळजळीत.]

Scale (skāl) [A. S. *scalu*, a balance.] *n.* (*of a balance*) **परडें** *n*, **पारडें** *n*. २ (*pl.*) *balance* **तराजू** *f*, **तागडी** *f*. [THE THING PUT INTO THE LIGHT SCALE TO PRODUCE EQUILIBRIUM पासंग *n*. To HOLD THE SCALES EVEN तराजू बरोबर धरणें, (*fig.*) निःपक्षपातानें न्याय करणें -देणें. ] ३ (*pl. astron.*) **तूळ रास** *f*.

Scale (skāl) [A. S. *scalu*, a shell.] *n.* (of a fish, &c.) **खवला** *m*, **खवळ** *n*, **खवल** *n*, **खवली** *f*, **खपट** *n*. २ *a thin flake or layer* **पापुद्रा** *m*, **पापोद्रा** *m*, **पापोडा** *m*, **उखरवळी** *f*, **कवंद** *f*. (b) **गंज** *m*. (c) **बुरी** *f*, **बुरशी** *f*. S. *v. t. to peel off scales* **खवले काढणें, (वाटाणे वगैरे) सोलणें, (दांत) धुणें, बुरशी काढणें, (बदाम) फोडणें, पापुद्रे -उखरवळ्या काढणें.** S. *v. i.* **पापुद्रा** *m* **-खपला** &c. **निघणें** *g. of s.*, **खवले पडणें -होणें, साल निघणें, बुरशी जाणें, उखरवळ्या होणें.**

Scale (skāl) [L. *scala*, ladder.] *n.* **प्रमाणपट्टी** *f*, **स्केलपट्टी** *f*, **स्केल** *n*. (b) **(स्केलपट्टीवरील) प्रमाण** *n*, **मान** *n*. [GRADUATED S. रेघा मारलेली -रेखांकित -प्रमाणांकित स्केलपट्टी *f*. GREAT S. गुरुमान, मोठें प्रमाण *n*. SMALL S. लघुमान *n*, लहान प्रमाण *n*. ON A SMALL S. लहान प्रमाणावर, जुजबी. THAT IS ON A SMALL OR MANAGEABLE S. आटपसर, आटपता, सुटसुटीत. (b) (*fig.*) संपुष्टांतला. To REDUCE TO A SMALL S. लहान प्रमाणांत आणणें -बसवणें. S.-DRAWING प्रमाणपट्टीवरून किंवा स्केलावरून नकाशा रेखाटणें. ] २ (*music*) **ग्राम** *m*, **स्वरपद्धति** *f*. [NOTATION S. स्वरचिन्हग्राम *m*.] ३ (*math.*) **(अंकमापनाचा ठराविक) क्रम** *m*; as, "Binary S." [BINARY S. शून्य आणि एक यांनीं बांधलेली अंकपद्धति *f*, द्विक्रम *m*. DECIMAL S. दाशमिक क्रम *m*, शून्य आणि पहिले नऊ आंकडे यांनीं बांधलेली अंकपद्धति *f*.] S. *v. t. to climb up* **( शिडी लावून ) चढणें.** Scaling ladder *n*. **( शत्रूच्या किल्ल्याची भिंत ) चढून जाण्याची शिडी** *f*.

Scale'-beam *n*. **तराजूची दांडी** *f*.

Scale'-like *a*. **तराजूच्या पारड्यासारखा.**

Scalene (ska-lēn') [L. -Gr. *skalenos*, uneven.] *a*. (of a triangle) **विषमभुज ( त्रिकोण ).**

Scale'-pan *n*. **तराजूचें पारडें.**

Scalp (skalp) [Ic. *skalpr*, a sheath.] *n. the skull* **टाळकें** *n*, **डोकें** *n*. २ *the skin of the top of the head* **टाळूवरील कातडी** *f*, **डोक्यावरचें चर्म** *n*, **शिरच्छद** *m*. ३ *bare rounded hill-top* **टेंकडीचा (उजाड) माथा** *m*. S. *v. t. to cut off the scalp* **माथ्याची कातडी काढणें.**

Scalpel (skal'-pel) [L. *scalpellum* -*scalpere*, to scrape.] *n*. **शस्त्रक्रिया करण्याचा चाकू** *m*.

Scal'per, Scalping-iron *n*. **विकृत झालेलें हाड खरडून काढण्याचा चाकू** *m*, **लेखनशस्त्र** *n* (old medical word), **खरवडणी** *f*.

Sca'ly *a. covered with, or formed like, scales* **खपल्या पडलेला, पापुद्रा निघालेला. २ खवले असलेला. ३ बुरशी आलेला -चढलेला. ४ गंजलेला. ५ (*bot.*) खवलेदार, वल्कलांकित.** Sca'liness *n*.

Scaly erruption *n.* खवल्या विकार *m.*

Scamp ( skamp ) [From the root of Scamper.] *n.* *worthless fellow* सोदा *m*, हरामजादा *m*, लुच्चा *m*, पाजी *m*, उडाणटप्पू *m*. [A THOROUGH S. पुरा पुरा लुच्चा, निपटनिरंजन *m*.] S. *v. t.* *to do one's work carelessly or dishonestly* वेठ वारणें, बिगार टाळणें, कामांत कसूर *f* -कुचराई *f.* करणें. Scam'pish *a.* *roguish* पाजीपणाचा, लुच्चेगिरीचा; as, "S. conduct."

Scamper ( skamp'ėr ) [Lit. 'to quit the field.' L. *ex*, out of, from, and *campus*, field.] *v. i.* *to run away hastily* (भीतीनें) पळत सुटणें, पळणें, पळ काढणें, इया करणें -म्हणणें, पोबारा करणें, पोबारा म्हणणें, निसटणें, सटकणें, झुकणें. S. *n.* *a hasty run* (भीतीनें) पळ काढणें *n*, पोबारा *m*. २ *a hasty excursion* खडी स्वारी *f*, दौड *f*. ३ *rapid course of reading* (पुस्तकाचीं) पानें चाळणें *n*; as, "A S. through Dickens."

Scan ( skan ) [Lit. 'to climb.' L. *scandere*, Sk. स्कन्द्, to ascend.] *v. t.* *to examine closely* बारकाईनें पहाणें, बारकाईनें तपासणें, छान *f* -शोध *m* -छानणी *f.* करणें *g. of o.*, छानणें, शोधणें, छडा *m.* काढणें. २ (verse) वृत्त (तपासून) पहाणें, छंदाच्या मात्रा मोजणें. (b) मात्राचिन्हें करणें. S. *v. i.* *to be metrically correct* वृत्तशुद्ध असणें, (चें) वृत्त बरोबर असणें; as, "The line does not S." Scan'ned *pa. t.* and *pa. p.* Scan'ning *pr. p.* S. *n.* छंदाच्या मात्रा मोजणें *n*. Scan'sion *n.* *the process of scanning poetry* कवितेच्या मात्रा मोजण्याची पद्धति *f*, मात्रागणन *n*.

Scandal ( skan'dal ) [Fr. *scandale* –Gr. *skandalon*, a snare.] *n.* *malicious gossip, back-biting* निंदा *f*, कुटाळकी *f*, कंडी *f*, टवाळी *f*, टवाळकी *f*, चुगली *f*, चहाडी *f*. २ *reproachful aspersion* लोकापवाद *m*, जनापवाद *m*, जनप्रवाद *m*. ३ *disgrace* लाज *f*, शरम *f*, कलंक *m*. ४ निंदास्पद गोष्ट *f*, शरमेची गोष्ट *f*; as, "A grave S. occurred." ५ (law) *public affront, irrelevant, abusive statement* भर कोर्टांत केलेली (अप्रस्तुत) निंदा *f*, टीका *f*.

Scan'dalize *v. t.* *to speak evil of* (-ची) निंदा करणें, कुटाळकी *f.* करणें, (च्या संबंधानें) वाईट कंडी उठविणें, चुगली करणें, चहाडी करणें. २ काजळी *f.* लावणें, तुफान घेणें, कलंक *m.* लावणें, कालिमा *m.* फासणें, दोषारोप करणें, शरमवणें. Scan'dalized *pa. t.* and *pa. p.* Scan'dalizing *pr. p.*

Scan'dal-monger *n.* कुटाळ, निंदा करणारा, निंदक, (खऱ्याखोट्या) कंड्या उठविणारा, चुगलखोर, चहाडखोर.

Scan'dalous *a.* *injurious to one's character* कलंक लावणारा, कालिमा लावणारा, निंदास्पद, लाजिरवाणा. २ *defamatory* अब्रूनुकसानीचा, अब्रू घेणारा; as, "A S. story."

Scan'dalously *adv.* कालिमा येईल अशा रीतीनें, अब्रू जाईसा, लाज वाटेसा. [कालिमा *m*.

Scan'dalousness *n.* लाजिरवाणेपणा *m*, कलंक *m*,

*in detail* पुरी चौकशी *f*. करणें, छडा *m*. काढणें -लावणें, तपास *m* -शोध *m*. करणें.

Scru'tinizer *n*. चौकसनीस *m*, चौकशी *f* -तपास *m*. करणारा *m*. २ निरखून पहाणारा *m*, निरखणारा *m*.

Scru'tinizing *pr. p*. निरखून पहाणारा, न्याहाळून पाहाणारा, चौकशी करणारा. २ तपासणारा, तपासणी करणारा.

Scrutiny (skröö'ti-ni) [Fr. -L. *scrutari*, to search -*scruta*, broken pieces.] *n*. *critical gaze* निरेखणें *n*, न्याहाळणें *n*, निरखून -न्याहाळून पाहाणें *n*, टेहळणी *f*, निरीक्षण *n*. २ *close investigation, examination into details* चौकशी *f*, तपास *m*, छडा *m*, छेडणूक *f*. ३ *official examination of votes* (मतांची) छानणी *f*, छान *f*, चौकशी *f*.

Scud (skud) [Norwegian *skudda*, push.] *v. i. to run or fly straight and fast* झपाट्यानें सरळ (पुढें किंवा वर) जाणें, सोसाट्यानें जाणें. २ (of a ship) *to run before the wind* सोसाट्यानें जाणें -चालणें, झडाझड -झ्यांझ्यां चालणें. S. *n*. -*the act* झपाट्यानें -सोसाट्यानें चालणें *n* -जाणें *n*. २ *thin, wind-driven clouds* वाऱ्यानें वितळणारे ढग *m. pl*.

Scuddle (skud'-dl) [Freq. of Scud.] *v. i. to run hastily* लगबग धांवणें, दुडदुडां -तुरुतुरु धांवणें.

Scuffle (skuf'l) [A freq. of Swedish *skuffa*, to shove, *skuff*, a blow.] *v. i. to struggle closely* धकाबुकी *f*. करणें, झोंबाझोंबी *f*. करणें, धकाबुकी *f*- झोंबाझोंबी *f*. चालणें *g. of s*. recip. S. *n. a confused contest* झोंबाझोंबी *f*, धकाधकी *f*, खेंचाखेंची *f*, झटापटी *f*, हातझोंबी *f*, हातघाई *f*, हातपिटी *f*, मारामारी.

Sculk, Same as Skulk.

Scull (skul) [Icel. *skal*, a hollow.] *n*. लहान वल्हें S. *v. t. to move (a boat) with a scull* लहान वल्ह्यानें (नाव) वल्हवणें. Sculled *pa. t*. and *pa. p*.

Scull'er *n*. लहान वल्ह्यानें वल्हविणारा *m*. २ *a boat rowed with a pair of sculls* दोन वल्ह्यांनीं वल्हविण्याची नाव *f*, स्कलर बोट *f*.

Scul'lery (skul'ér-i) [O. Fr. –L. *scutella*, a little dish.] *n. a (small) kitchen, where cooking-utensils are kept and cleaned* स्वयंपाकाच्या भांड्यांची खोली *f*.

Scullion (skul'yun) [O. Fr. *escouillon*, a dish-clout.] *n. an under-servant in a kitchen* भांडेघाश्या *m*. २ *a low person* हलका मनुष्य *m*.

Sculp'tor *n. carver* मूर्तिकार *m*, खोदकाम करणारा *m*, (मूर्ति, पुतळे) खोदणारा *m*, नकासगीर *m*, नकशीवाला. Sculp'tress *n. fem*.

Sculptor's Tools [L. Cæla Sculptoris] *n*. (*astron*.) मूर्तिकारशस्त्र *n*. ही राशि दक्षिण गोलार्धांत आहे.

Sculptor's workshop [L. Apparatus Sculptoris.] *n*. (*astvon*.) मूर्तिकारयंत्र *n*. ही एक राशि आहे.

Sculp'tural *a*. खोदकामाचा, नकासकामाचा.

**Sculpture** ( skulp'tūr ) [Fr. –L. *sculptura-sculpere*, to carve.] *n. the art of carving images* खोदकाम *n*, नकासकाम *n*, नकशीचें काम *n*. २ *a carved image* मूर्ति *f*, पुतळा *m*. ३ *copper engraving* तांब्यावरील खोदकाम *n*. S. *v. t. to carve, to engrave* खोदणें, कोरणें, नकशीकाम करणें.

**Sculp'tured** *pa. t.* S. *pa. p.* खोदलेला, कोरलेला, खोदींव, कोरींव, नकशीचा, नकशीदार.

**Scum** ( skum ) [Dan. *skum*, froth.] *n.* (कढवितांना वर आलेली ) मळी *f*, तवंग *m*, फेंस *m*, करा *m*, साई *f*. २ (*fig.*) ( of the people ) गाळ *m*, खरवड *f*, निपटारा *m*.

**Scum** *v. t. to clear the scum off* मळी *f*. काढणें -छाटणें. S. *v. i. to be covered with a scum* ( -वर ) मळी येणें -जमणें. **Scum'my** *a. covered with scum* मळी आलेला, फेंस *m* -तवंग *m*. आलेला -जमलेला.

**Scurf** ( skurf ) [A. S. *scurf -sceorfian*, to scrape.] *n. thin, dry scales formed on the skin* (डोक्याच्या केंसांतील ) कोंडा *m*, भुसा *m*, खरवें *n*, मळ *m*. २ (*bot.*) कोंडा *m*, भुसा *m*. [CLAMMY S. चिकटा *m*. ROLL OF S. मळवटी *f*, मळी *f*.] **Scurf'iness** *n*. **Scurf'y** *a*. कोंडा असलेला, भुसा असलेला. २ कोंड्यासारखा, भुशासारखा. ३ कोंडा उत्पन्न करणारा.

**Scurrile** (skur'ril) [L. *scurrilis-scurra*, a buffoon.] *a. abusive, vulgar, indecent* शिवीगाळीचा, अभद्र, पचकळ, फटकळ, ग्राम्य, अश्लील, असभ्य. **Scurril'ity** *n. vulgar abuse* पचकळपणा *m*, फटकळपणा *m*, अभद्रपणा *m*. २ *coarseness of speech or conduct* असभ्यपणा *m*, अश्लीलपणा *m*. ३ *indecent language* अभद्र भाषण *n*, अश्लील भाषण *n*.

**Scur'rilous** *a. grossly coarse or abusive* शिवीगाळीचा, अपभाषणाचा, पचकळ, अभद्र, असभ्य, अश्लील. २ ( of person ) ( तोंडाचा ) फटकळ, तोंडाचा शिनळ, पचकळ, पानचट.

**Scur'rilously** *adv.* शिवीगाळीनें, पचकळपणानें, अश्लीलपणानें. **Scur'rilousness** *n.* पचकळपणा *m*, फटकळपणा *m*, अभद्रपणा *m*. २ अश्लील भाषण *n*, अपभाषण *n*, दुरुक्ति *f*.

**Scurry** ( skur'i ) [An extended form of Scour.] *v. i. to hurry along* झपाट्यानें जाणें, जोरानें निघून जाणें; as, "The rabbit *scurried* away."

**Scurvy** *n.* Same as Scorbutus.

**Scurv'y** *a. affected with scurvy* रक्तपित्तव्याधि झालेला. २ *very mean, shabby* गदळ, क्षुद्र, गचाळ.

**Scutage** ( skū'tāj ) [L. *scutum*, a shield.] *n. a pecuniary fine or tax instead of personal service paid by a tenant to his lord* जातीनें नोकरी करण्याऐवजीं कुळानें मालकाला दिलेला दंड किंवा कर *m*, जातीच्या नोकरीबद्दलचा दंड किंवा कर *m*.

**Scutcheon**, Same as Escutcheon.

**Scutiform** ( skū'-ti-form ) [L. *scutum*, a shield.] *a*. ढालेच्या आकाराचा, फलकाकृति. ( फलक = Shield. )

**Scuttle** (skut'l) [L. *scutella*, a salver, dim. of *scutra*, a dish.] *n. a shallow basket* शिपतर *n*, शिबुटलें *n*. २ *a vessel for holding coal* कोळशांचें भांडें.

**Scuttle** (skut'l) [O. Fr. *escoutille*, a hatchway.] *n. an opening in a housewall or roof, covered with a lid* शाहाणें *n*, सहाणें *n*, धारें *n*. २ *an opening in the deck or sides of a ship* (जहाजाचें) भोंक *n*, फट *f*, दार *n*, झरोका *m*, खिडकी *f*. S. *v. t. to cut holes through any part of a ship* भोंकें -खिडक्या पाडणें. २ *to sink a ship by cutting holes in it* भोंकें पाडून जहाज बुडविणें.

**Scuttle** (skut'l) [From the root of Scud.] *v. t. to hurry* लगबगीनें चालणें -जाणें, घाईघाईनें फिरणें -चालणें. S. *n. a quick pace, a short run* लगबगीचें चालणें *n*, घाईघाईनें चालणें *n*.

**Scybala** (sib'a-la) [Gr. *skubalon*, dung.] *n*. मळाचा खडा *m*, विष्ठेच्या गांठी *f. pl.*, वटक *m*.

**Scylla** (sil'a) *n*. (सिसिलीच्या किनाऱ्यावरच्या 'चारिब्‌डिस' नांवाच्या भोंवऱ्यासमोर असलेला) इतालीच्या किनाऱ्यावरचा 'सिला' नांवाचा धोक्याचा खडक *m*. 'सिला' व 'चारिब्‌डिस' हे प्राचीन ग्रीक पुराणांत दोन राक्षस कल्पिलेले आहेत. 'सिला' व 'चरिब्‌डिस' यांतील जागा मोठ्या धोक्याची आहे असें प्राचीन ग्रीक लोक मानीत असत. [FROM SCYLLA TO CHARYBDIS एका संकटांतून दुसऱ्या संकटांत. *cf.* MARATHI PHRASE आगींतून फुपाट्यांत.]

**Scythe** (sīth) [Of Anglo-Saxon origin.] *n*. कोयता *m*, विळा *m*. S. *v. t.* कोयत्यानें (गवत वगैरे) कापणें.

**Scythed** *a. armed with scythes* कोयते असलेला.

**Scythe'man** *n*. कोयतीवाला *m*, कापणारा *m*.

**Scythe'-stone** *n*. (कोयत्यांना धार लावण्याचा) निष्णा *m*.

**Sea** (sē) [A. S. *sæ*, sea.] *n*. समुद्र *m*, सागर *m*, दर्या *m*, दर्याव *m*, सिंधु *m*. [THE FOUR SEAS चतुःसमुद्र. THE SEVEN SEAS सप्तसमुद्र. A HEAVY S. उंच लाटांचा समुद्र *m*, खवळलेला समुद्र *m*. ARM OF THE S. आखात *n*. AT S. दूर समुद्रांत, भरसमुद्रांत. २ *perplexed* गोंधळलेला, भांबावलेला, गांगरलेला. THE HIGH SEAS (किनाऱ्यापासून) तीन मैलांपलीकडचा समुद्र *m*, भरसमुद्र *m*. MISTRESS OF THE SEA, MISTRESS OF THE SEAS समुद्रस्वामिनी *f*, आरमारी बलाढ्य राष्ट्र *n*. ON THE SEA गलबतांत, जहाजांत. ABLUTION IN THE S. समुद्रस्नान *n*. BY SEA AND LAND जलमार्गानें व खुष्कीनें. TO GO TO S. खलाशी *m*. होणें, दर्यावर्दी होणें. TO FOLLOW THE S. खलाशाचें काम करणें, खलाशीपणा *m*. करणें. TO PUT TO S. बंदर सोडणें. HEIGHT ABOVE THE S. समुद्रसपाटीपासून उंची *f*.] २ *a great wave* उंच लाट *f*, मोठी लाट *f*. [SEAS MOUNTAINS HIGH डोंगराएवढ्या लाटा *f. pl.*] ३ *a vast quantity or expanse of* समुद्र (*fig.*) *m*; "S. of troubles; S. of cares." ४ *a large lake* सरोवर *n*.

Sea'-air *n.* ( आजाऱ्यांकरितां ) खारी हवा *f.* Sea'-anchor *n.* (तुफानाच्या वेळचा) तरता नांगर *m.* Sea'-bathing *n.* समुद्रांत आंघोळ करणें *n.* Sea'-beach *n.* समुद्रकिनारा *m*, समुद्रकांठ *m*, पुळण *f*, वाळवंट *n.* Sea'-board *n.* समुद्रकिनारा, समुद्रकांठ *m.* Sea'-breeze *n.* ( opposed to land-breeze ) समुद्राकडून जमिनीकडे वाहणारा वारा *m*, खारा वारा *m*, समुद्रवायु *m*, मतलई *f.* Sea'-boat *n.* मोठ्या समुद्रांत चालणारी आगबोट, जौळी तारूं *n*, जौळी गलबत *n*, जौळी जहाज *n.* Sea'-borne *a.* जहाजांतून नेलेला, जहाजी ( व्यापार ), समुद्रावरचा. Sea'-captain *n.* जहाजाचा कप्तान *m*, (opposed to a captain in the army). Sea'-chart *n.* समुद्राचा नकाशा *m*, (यांत बेटें, किनारे वगैरे दाखविलेले असतात.) समुद्रपट *m.* Sea'-coast *n.* समुद्रकिनारा *m*, समुद्रकांठ *m*, समुद्रतीर *n*, दर्याकिनारा *m*, समुद्रतट *m.* Sea'-compass *n.* खलाशाचें होकायंत्र *n.* Sea'-dog *n.* डागफिश नांवाचा मासा *m*, सीलमासा *m.* २ कसलेला खलाशी *m.* Sea'-farer *n.* दर्यावर्दी *m*, सफरी *m*, नौकाजीवी *m*, नाविक *m*, बेंडू *m*? Sea'-faring *a.* (सदोदित समुद्रांत) सफर करणारा, दर्यावर्दी, सफरी, खलाशाचें काम करणारा, जहाजावर काम करणारा. Sea'-fight *n.* समुद्रावरील युद्ध *n.* Sea'-gauge *n.* *the depth, to which the keel of a ship sinks* जहाजाची ( पाण्यांत बुडाल्याची ) खोली *f*, तलमज्जन *n.* २ समुद्राची खोली मोजण्याचें यंत्र *n*, समुद्राचा तळ पाहाण्याचें यंत्र *n*, समुद्रतलमापक, briefly तलमापक Sea'-girt *a.* समुद्रानें वेष्टिलेला, समुद्रवलयांकित. Sea'goat *n.* (*astron.*) [L. Capricornus.] मकर राशि *f.* Sea'-going *a.* (of a ship) (भर) समुद्रांतून जाणारें (गलबत). २ ( of person ) सफर करणारा. Sea'-horse *n.* समुद्रघोडा *m.* हा तोंडाकडे घोड्यासारखा, व पाठीकडे माशासारखा असतो. Sea'-king *n.* चांचेलोकांचा राजा *m.* Sea'-legs *n. pl.* हालत्या गलबतांत चालण्याची संवय *f.* Sea'-level *n.* समुद्राची सपाटी *f.* Sea'-line *n.* *horizon at sea* समुद्रावर टेंकलेली क्षितिजरेषा *f*, सामुद्रक्षितिज *n.* Sea'-man खलाशी *m*, लस्कर *m.* [ ABLE-BODIED S. हुषार खलाशी *m.* FAIR WEATHER S. तडीचा पोहणारा *m.* SEAMEN'S ENVELOPES खलाशांचीं (केलेलीं एक आणा किंमतीचीं पोष्टाचीं) पाकिटें. ] Sea'-manship *n.* गलबत चालविण्याची विद्या *f*, नाविकविद्या *f*, खलाशाचें काम *n.* Sea'-mark *n.* ( दीपगृह, बोयरा वगैरे जहाजांना वाट दाखविणारी ) समुद्रांतील खूण *f.* Sea'-mile *n.* समुद्रांतील मैल *m.* हा ६०८० फूट असतो. Sea'-monster *n.* ( *astron.* ) [ L. Cetus ] तिमिंगल राशि. Sea'-police *n.* समुद्रावरचें पोलिस *n.* Sea'-port *n.* बंदर *n.* २ बंदरी गांव *m.* Sea'-post *n.* समुद्रांतील पोष्टआफिस. Sea'-robber *n.* चांचा *m.* Sea'-room *n.* जहाज जाण्यायेण्यापुरती वाट *f.* Sea'-rover *n.* चांचा *m.* २ चांचें गलबत, लुटारू गलबत *n.* Sea'-salt *n.* ( opposed to mineral salt ) समुद्राचें मीठ *n.* Sea'-scape *n.* ( opposed to landscape ) समुद्राचा देखावा *m.* Sea'-

serpent *n.* (*astron.*) [ L. Hydra ] वासुकी राशि. Sea'-service *n.* समुद्रावरची नोकरी *f*, विशेषतः मनवरावरील ( लढाऊ जहाजावरील ) नोकरी *f*. Sea'-shore *n.* समुद्रकिनारा *m*, बंदरकांठ *m*, बंदरकिनारा *m*, दर्याकिनारा *m*. [ ROAD BY THE S. बंदरवाट *f.* ] Sea'-sick *a.* आगबोट लागलेला, समुद्र लागलेला. [To BE S. आगबोट लागणें, गलवत *n* -समुद्र *m.* लागणें. ] Sea'-sickness *n.* आगबोट लागणें *n*, समुद्र लागणें *n*, जलप्रवास करतांना मळमळून वांति होणें *n*, ओकणें *n*. Sea'-side *n.* समुद्राची बाजू *f*, समुद्रकिनारा *m*. Sea'-snail *n.* खुबा *m*, dim. खुबी *f.* Sea'-term *n.* खलाशांचा ( पारिभाषिक ) शब्द *m*. Sea'-wall *n.* समुद्रांतील बांध *m*. २ धक्का *m*. Sea'-way *n.* जहाजाची मजल *f*. २ ( तुफानांतील ) जहाजाचें (उभें राहण्याचें) मकाण *n*. Sea'-weed *n.* समुद्रवेली *f. pl.* Sea'-worthy (of a ship) आंत पाणी न येऊं देणारा, जौळी, समुद्रांत लोटण्याजोगा. २ डोलकाठ्या, दोरखंडें, वगैरे सामान मजबूत असलेलें ( जहाज ).

Seal ( sēl ) [Of Anglo-Saxon origin.] *n.* सील नांवाचा जलचर प्राणी *m*.

Seal ( sēl ) [ O. Fr. *seel* -L. *sigillum*, dim. of *signum*, a mark.] *n. an engraved piece of metal or stone used for impressing its device on sealing wax* मोहोर *f*, शिक्का *m*. [S. RING सीलाची आंगठी *f*, मोहोरेची आंगठी *f*.] २ *the mark made* मोहोर *f*, शिक्का *m*, सील *n*. ३ *the wax impressed* ( सीलाची ) लाख *f*. ४ *the fastening of a letter* सील करणें *n*, सीलानें बंद करणें *n*. ५ *a confirmation or pledge* सील (*fig.*) *n*. ६ (*fig.*) *significant or prophetic mark* शिक्का *m*, मोहोर *f*, सील *n*, चिन्ह *n*; as, "Has the S. of death in his face." [GIVEN UNDER MY HAND AND S. सहीशिक्यानिशीं. TO SET ONE'S S. TO सील मारून कायम-मंजूर करणें. UNDER S. OF SILENCE गुप्त ठेवण्याच्या अटीवर. GREAT S. मोठा शिक्का *m*. हा लार्ड चॅन्सलर किंवा लार्ड कीपर यांच्या दप्तरीं असतो; व तहनामे, पार्लमेंटाचे ठराव, व महत्वाचे सरकारी कागद यांजवर मारण्यांत येतो. S. OF LOVE मुका *m*, चुंबन *n*. २ *birth of child* मूल होणें *n*, अपत्यजन्म *m*. ]

Seal *v. t. to affix seal to, to certify as correct with seal* सील *n.* करणें, शिक्का मारणें, शिक्कामोर्तब करणें, मोहोर *f.* करणें, मोहोरबंद करणें. २ *to close securely or hermetically* पक्का बंद करणें, सील करणें, सील *n.* मारणें. [ MY LIPS ARE SEALED मला बोलतां कामा नये. IS A SEALED BOOK TO ME (-चें) ज्ञान मला नाहीं किंवा होऊं शकणार नाहीं, (हें) मला अज्ञात राहणार. ] ३ *to set significant mark on, to set apart* ( -वर ) शिक्का मारणें, मोहोर *f.* मारणें -करणें, शिक्का मारून निराळा काढणें; as, "Death has *sealed* her for his own."

Sealed *pa. t.* S. *pa. p.* मोहोर *f.* केलेला, सील केलेला.

Seal'ing-wax *n.* सील करण्याची लाख *f*, सीलाची लाख *f.*

Seam (sēm) [A. S. *seam* -*seowian*, to sew.] *n.* शिवण *f*, सीवन *n.* (b) *the joining line of two edges of cloth* सांधा *m*, जोड *m*, संधि *m*, दूण *f.* [RAISED STRIP ALONG A S. दंड *m.* TO OPEN AT THE S. उसवणें, उघडणें.] २ *the joining of a ship's planks, layers of a wall* सांधा *m*, जोड *m*, दरज *f*, फट *f*, फुलकप्पी *f.* [FILLING UP THE SEAMS दरजगिरी *f.*] ३ *the scar of a wound* डाग *m*, माव *f*, वण *m.* ४ *a line of separation between two strata* सांधा *m*, संधिरेषा *m.* (b) *thin stratum of coal between thicker strata* (दगडी कोळशांच्या दोन थरांमधील) पातळ थर *m*, सांधा *m*, सांध्याचा थर *m*, संविस्तर *m.* ५ (*anat.*) *suture* शिवण *f*, सीवनी *f.*

Seam *v. t.* (सांध्यावर) शिवणें, (सांध्यावर) शिवण *f.* घालणें. (b) सांधणें, जोडणें. (c) दंड भरणें -घालणें. २ *to scar* माव *f* -डाग पाडणें, वण *m* -चरा *m* -वट्टा *m.* पाडणें; as, "*Seamed* over with wounds which his own sabre gave."

Seamed *pa. t.* and *pa. p.* Seam'ing *pr. p.*

Seam'less *a.* बिनशिवणीचा, शिवण नसलेला, एकसंधी.

Seam'stress, Semp'stress *n. a needlewoman* शिवण-काम करणारी *f.* (b) कशिद्याचें काम करणारी *f.*

Seam'y *a. having seams or displaying them* शिवण असलेला, दूण *f.* असलेला. (b) डाग असलेला, मावा असलेला, काळा; as, "Everything has its fair, as well as its S. side." [THE S. SIDE काळी बाजू *f.*]

Seance (sā'ängs) [Fr. –L. *sedere*, to sit.] *n. sitting of a society or deliberative body* सभा *f*, बैठक *f*, अधिवेशन *n.*

Sear (sēr) [A. S. *sear*, dry.] *a.* (of leaves, flowers &c.) *withered, dried up* वाळका, वाळलेला, वाळ-कुंडा. २ (*fig.*) (of age) वाळलेला, सुकलेला. S. *v. t.* (R.) *to wither up, to blast* वाळविणें, सुकविणें. २ *to scorch surface of esp. with hot iron, to cauterize, to brand* भाजणें, डागणें, चरका *m.* देणें, डाग *m.* देणें, भाजून बहिरा -सुना करणें. ३ *to make callous* कोडगा -लोचट करणें; as, "A *seared* conscience."

Search (sėrch) [O. Fr. *cercher* -L. *circare*, to go about.] *v. t. to look over or through to find something* शोधणें, शोध *m.* करणें, पाहणें, धुंडणें, हुडकणें. (b) (closely, carefully or strictly) झाडा *m.* -घेणें *g. of o.*, झडती *f.* घेणें *g. of o.* (c) (narrowly or thoroughly) धुंडाळणें, चाळणें, धुंडाळा *m.* करणें *g. of o.* २ (with *for*) शोधणें, पाहणें, धुंडणें, हुडकणें, तलास *m* -शोध *m.* करणें, शोध *m* -सुगावा *m.* लावणें -काढणें *g. of o.* ३ (with *out*) *to trace* शोधून काढणें, शोध *m.* काढणें, उमगून काढणें, शोध *m.* लावणें *g. of o.* ४ *to probe* (a wound) पाहणें, तपासणें. S. *v. i. to seek, to make inquiry* शोधणें, पाहणें, तपास *m* -तलास *m* -शोध *m.* करणें; as, "Once more *search* with me."

**Search** *n. act of searching, investigation, quest* **शोधणें** *n*, **धुंडणें** *n*, **शोध** *m*, **तलास** *m*, **तपास** *m*. २ **झडती** *f*, **तलाशी** *f*. [IN S. OF (-च्या) शोधांत, तलासांत, पाठीमागें. THE S. FOR, THE S. OF (चा) शोध *m*. RIGHT OF S. (मनाई केलेल्या मालाबद्दल तटस्थ राष्ट्रांच्या जहाजांची) झडती घेण्याचा (युद्धयमान राष्ट्रांना असलेला) हक्क *m*. S. LIGHT (शत्रूची टेहळणी करण्याकरितां) टेहळणीचा दिवा *m*. S. PARTY (हरवलेल्या किंवा लपविलेल्या मालाचा) तपास लावणारी तुकडी *f*. (b) (*specifically*) झडती घेणारी पोलीसतुकडी *f*. S. WARRANT झडतीचें वारंट.]

**Searched** *pa. t.* and *pa. p.*

**Search'ing** *pr. p. a. testing severely, thorough* **कडक, सूक्ष्म, बारीक, छानणीचा, पक्का**; as, "S. examination." २ (of a look, &c.) *penetrating* **सूक्ष्मपणानें पाहाणारा, सूक्ष्म.**

**Searing-iron** *n*. **डाहाणी** *f*.

**Season** (sēz'n) [O. Fr, *seson*, -L. *satio,-onis*, seed-time.] *n. division of the year* **ऋतु** *m*. [THE HINDUS DIVIDE THE YEAR INTO SIX SEASONS वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत, शिशिर, CONSISTING OF TWO MONTHS EACH. THE FOUR SEASONS (पाश्चात्यांचे) चार ऋतू. SPRING (वसंत), SUMMER (ग्रीष्म), AUTUMN (वर्षा), WINTER (हेमंत). THE DRY S. उन्हाळा *m*. THE COLD S. हिंवाळा *m*. THE HOT S. उन्हाळा *m*, ग्रीष्म *m*, *pop*. गीम OR गिमाळा *m*. GRAIN RAISED IN THE HOT S. BY IRRIGATION गिमवा *m*, गिमवस *f*. THE RAINY S. पावसाळा *m*. THE SEASONS षड्ऋतू (OF THE HINDUS]. २ *proper time, favourable opportunity* **हंगाम** *m*, **मोसम** *m*, **सराई** *f*, **सुगी** *f*, **ताण** *n*, **काल** *m*, **समय** *m*, **दिवस** *m. pl.*, **वेळ** *f*, **वेळा** *f*. [IN S. वेळीं, योग्य वेळीं, वेळेवर. IN S. AND OUT OF S. वेळींअवेळीं. CLOSE OR LAST DAYS OF THE S. सरता पालव *m*. HEIGHT OF THE S. ऐन हंगाम *m*. THE HOLIDAY S. (नाताळ, ईस्टर वगैरे) सुटीचे दिवस *m. pl.*, सुटीचा मोसम *m*. OPEN S. (शिकारीचा) चालू हंगाम *m*, सुरू हंगाम *m*. CLOSE S. (शिकारीचे) बंदीचे दिवस *m. pl.*, मनाईचे दिवस *m. pl.*] ३ *auspicious or fit hour or moment* **मुहूर्त** *m*, **पर्व** *n*, **पर्वणी** *f*. ४ *period of various length* **(कांहीं) वेळ** *f*, **(कांहीं) मुदत** *f*; as, "May endure for a S." [S. TICKET (रेल्वे, वगैरेचें) मुदतीचें तिकिट *n*, *pop*. पास. FOR A S. कांहीं वेळ, कांहीं दिवस, कांहीं वेळपर्यंत, कांहीं वेळपावेतों.]

**Sea'son** *v. t. to bring into efficient or sound condition by habituation, exposure, special preparation, &c.* **तरबेज करणें, संवयीचा करणें, रांबवणें**; as, "*Seasoned* soldiers." २ (timber) **रांपवणें, पक्का करणें.** ३ *to make palatable* **मसालेदार -स्वादिष्ठ-खमंग करणें, चव** *f* **-रुचि** *f*. **आणणें**; as, "Highly *seasoned* dishes; conversation *seasoned* with humour." ४ *to temper, to moderate* **सौम्य करणें**; as, "Let mercy S. justice." S. *v. i. to become fit for use by being*

*seasoned* संवयीचा होणें, तयार होणें. (b) (timber) कडक होणें, पक्के होणें, रांपणें, निरढणें.

Sea'sonable *a. suitable to, of the kind usual at, the season* ऋतूला योग्य, समयाला योग्य, कालाला योग्य, कालसदृश, कालोचित, कालोद्भव, ऋतुजात; as, "S. weather." २ *opportune, meeting the needs of the occasion* वेळेवरचा, प्रसंगोचित, वक्तशीर, समयोचित; as, "S. aid; S. caution; S. arrival of."

Sea'sonableness *n.* समयोचितता *f*, उचितकालिकता *f*, &c. २ समयानुरूप्य *n*, समयौचित्य *n*, कालानुकूल्य *n*.

Sea'sonably *adv.* वेळेस, वेळेवर, समयास, प्रसंगास, यथाकाळीं, यथाकाल, वक्तशीर, बरा *decl.*, नेमका *decl.*

Sea'soned *pa. t.* S. *pa. p.* तरबेज केलेला. २ रांबवलेला, रापवलेला. ३ मसाला घातलेला, मसालेदार, स्वादिष्ठ, खमंग. [HIGHLY S. चमचमीत, खमखमीत.] ४ सौम्य केलेला; as, "Justice S. with mercy."

Sea'soning *v. n.* मसाला घालणें *n.* २ *sauce* मसाला *m.* ३ (*fig.*) मसाला; as, "Wit is the S. of conversation."

Seat (sēt) [A. S. *sæte*, an ambush -*sitan*, to sit.] *n. that on which one sits* बैठक *f*, बसक *f*, आसन *n*. [CHIEF S. (AT ASSEMBLIES, &c.) अग्रासन *n*. EASY S. सुखासन *n*. SWINGING S. चौपाळा *m*, चौफळा *m*.] (b) *occupation of a seat* बैठक *f*; as, "Took his S. on the throne." २ *thing spread to sit on* बिछाईत *f*, बैठक *f*, बसक *f*, बसकर *n*. ३ *place of abiding, inherence*, &c. स्थान *n*, अधिष्ठान *n*, ठिकाण *n*, आशय *m*, (*esp. in comp.*; as, पित्ताशय), वसति *f*, घर *n*, पीठ *n*, धाम *n*. [THE S. OF WAR युद्धस्थान *n*. S. OF LEARNING विद्येचें घर *n*, विद्यापीठ *n*.] ४ *country mansion esp. with park* खेड्यांतील वाडा *m*; as, "Has a S. in Norfolk." ५ *right to sitting-accomodation or to sit as member of board or esp. House of Commons* बैठक *f*, खुर्ची *f* (*fig.*), जागा *f*; as, "Have taken two *seats* for *Macbeth*; Has a S. on the Board." [TO LOSE ONE'S SEAT, TO LOSE THE S. (पार्लमेंटांतील) जागा गमावणें.] ६ *manner of sitting horse, bicycle*, &c., बैठक *f*, आसन *n*; as, "Has a good, firm S." ७ (खुर्चीचें वगैरे) बूड *n*.

Seat *v. t.* बसविणें, ठेवणें, बसायास -बसायाला लावणें; as, "Took up the child and *seated* him on the book-case." (b) बसविणें, स्थापणें, स्थापना करणें, पदारूढ करणें. [To S. CANDIDATE (पार्लमेंटसभेकरितां) उमेदवार निवडणें. TO BE SEATED बसणें.] २ *to fit or provide* (church, room, &c.) *with seats* बैठका ठेवणें -मांडणें, बैठकांची तजवीज करणें; as, "Is seated for 5000." ३ (of room) *to have seats for* (*number*) (अमुक मनुष्यें बसण्याइतकी) जागा असणें, बैठका असणें. ४ *to mend seat of* (*chair*, &c.) (नवें) बूड घालणें. ५ *to establish in position, to fix in particular place* बसविणें, ठेवणें; as, "To S. machinery." (b) (-चें)

ठाणें बसविणें, ठाणें देणें; as, "The Turks *seated* themselves on the Bosporus." ६ *to assign a seat to* जागा देणें, नेमणें.

Seated *pa. t.* S. *pa. p.* बसविलेला, बसावयास लावलेला. २ बैठका मांडलेला -लावलेला. ३ बैठका असलेला. ४ बैठक घातलेला, बूड दुरुस्त केलेला. ५ ठाणें धरून राहिलेला.

Seat'ing *v. n.* बसविणें *n.* २ बैठका ठेवणें *n.*

Sebaceous (sē-bā'shus) [L. *sebum*, sweat.] *a.* (त्वचेंतून निघणाऱ्या) चरबीसंबंधीं, त्वक्स्नेहविषयक. २ त्वक्स्नेहोत्पादक. [S. GLANDS त्वक्स्नेहोत्पादक पिंड *m*, त्वक्स्नेहपिंड.]

Seborrhœa (sē-bō-rhi'-a) [L. *sebum*, sweat, and Gr. *rhein*, to flow.] *n.* केसामध्यें मळ उत्पन्न होणें *n.*

Sebum (sē'-bum) [L. *sebum*, sweat.] *n.* त्वचेंतून येणारी एक प्रकारची चरबी *f*, त्वक्स्नेह *m.*

Secant (sē'kant) [L. *secans*, *secantis*, *pr. p.* of *secare*, to cut.] *n.* (*math.*) वृत्तखंडिनी *f*, वृत्तच्छेदनरेषा *f.* २ (*trig.*) व्युत्क्रमकोटिज्या. (कोटिज्या = cosine).

Secede (sē-sēd') [L. *se*, away, and *cedere*, to go.] *v. i. to withdraw formally from membership* फुटणें, निघणें, वेगळा होणें, बाहेर होणें -पडणें, संगत *f.* सोडणें, फळी *f.* फोडणें, फटकून राहणें.

Seceded *pa. t.* S. *pa. p.* फुटलेला, फटकून राहिलेला.

Seced'er *n.* फुटणारा *m*, वेगळा होणारा *m*, &c.

Seced'ing *pr. p.* S. *v. n.* फुटणें *n*, वेगळा होणें *n.*

Secess'ion *n.* फुटणें *n*, वेगळा होणें *n.*

Seclude (se-klōōd') [L. *se*, apart, and *claudere*, to shut.] *v. t. to separate, to keep apart* वेगळा करणें, निराळा करणें -ठेवणें, एकांतीं राहविणें -बसवणें, एकांतवासांत ठेवणें, पडद्यांत ठेवणें. २ (oneself) एकांतवास *m.* करणें, एकांतांत राहणें -बसणें. S. *v. i. to shut apart, to keep apart* वेगळा -एकटा राहणें, एकांतांत काळ घालविणें, एकांतवास पत्करणें, विविक्तस्थानीं राहणें.

Seclud'ed *pa. t.* S. *pa. p.* एकांतांत ठेविलेला, पडद्यांत ठेवलेला. २ एकांतवासाचा, एकलकोंडा, एकटा; as, "A S. spot, S. life."

Seclu'sion *n. secluding or being secluded, retirement* एकांतवास करणें *n*, एकांतवास *m*, विविक्तवृत्ति *f.* २ *secluded place* एकांतस्थान *n*, विविक्तस्थान *n.*

Second (sek'und) [Fr.-L. *secundus* -*sequi*, *secutus*, to follow.] *a. next after the first* दुसरा, द्वितीय, दुजा. [IN THE S. PLACE दुसऱ्यानें, दुसरें असें कीं. S. FLOOR तिसरा मजला. (GROUND FLOOR = तळमजला *m.* FIRST FLOOR दुसरा मजला *m.*)] २ *additional, supplementary* दुसरा, आणखी एक, अधिक, पुरवणीवजा; as, "S. advent of Christ." [S. CHAMBER, *upper House in bicameral parliament* दुसरी (लार्डांची) सभा *f*, वरची सभा *f.* S. COMING (खिस्ताचें) द्वितीयागमन *n.* S. NATURE दुसरा उपजत स्वभाव. S. TEETH (जाणत्या

मुळांचे ) पक्के दांत *m. pl.* S. THOUGHTS मागाहून (सुचलेले) विचार *m. pl.*] २ *of secondary kind, subordinate, derived* दुसऱ्या प्रतीचा, दुय्यम, अप्रधान, गौण, अमुख्य. [S. CAUSE गौण कारण *n*, गौण हेतु *m.* To PLAY S. FIDDLE TO ( -ची ) री ओढणें. AT S. HAND कर्णोपकर्णीं, ऐकींव. S. BEST दुसऱ्या नंबरचा. S. HAND (OF CLOTHES, BOOKS, FURNITURE, &c.) आडगिऱ्हायकी, जुना, अन्योपभुक्त. २ (OF INFORMATION) *taken on another's authority* ऐकलेली -ऐकींव ( माहिती ). ३ ( RESEARCH ) दुसऱ्याचा, अन्योक्त, अन्यकृत. S. RATE (OF SHIP) *not of superior quality* दुसरे प्रतीचा, दुय्यम प्रतीचा.] ४ *being of the same kind as another that has preceded* दुसरा, प्रति; as, "S. Cato." [S. SIGHT (भविष्य जाणण्याची ) दुसरी दृष्टि *f*, भविष्यज्ञानदृष्टि *f.* ]

Second *n. one next to the first* दुसरा *m*, दुसऱ्या प्रतीचा *m*, द्वितीय *m.* २ *a supporter* ( in a duel or boxing-match ) पाठीराख्या *m*, पाठराख्या *m*, पाठ राखणारा *m*, बाहिदार *m*, सारथी *m.* ३ *the sixtieth part of a minute* सेकंद *m*, loosely *short time* क्षणभर. (b) *the sixtieth part of a degree* विकला *f.* ४ (*pl.*) दुय्यम प्रतीचा माल *m.* (*specif.*) *an inferior flour* हलकी कणीक *f.*

Second *v. t. to support, to back up* आधार देणें, पाठ *f.* राखणें *g. of o.*, बाजू *f.* राखणें -संभाळणें *g. of o.*, पुष्टि *f* -टेंकू *m*-जोर *m.* देणें; as, "To S. words with deeds." २ (of member of a debating body) *to give the necessary formal support to* अनुमोदन देणें.

*N. B.* Propose = सूचना करणें. Proposer = सूचक. Second = अनुमोदन देणें. Seconder = अनुमोदक. Support = दुजोरा देणें, पुष्टि देणें. Supporter = दुजोरा देणारा, पुष्टि देणारा.

Sec'ondarily *adv. in a secondary manner or degree* गौणपणानें, गौणभावानें, दुय्यमपणानें -रीतीनें, मागाहून.

Sec'ondariness *n.* गौणपणा *m*, दुय्यमपणा *m*, गौणता *f*, अप्रधानता *f.*

Sec'ondary *a. of second place, origin, or rank* दुसरे प्रतीचा, दुसऱ्या दर्जाचा, दुसऱ्या नंबरचा, दुय्यम प्रतीचा -किंमतीचा. [S. EDUCATION दुय्यम (प्रतीचें) शिक्षण *n.* S. SCHOOL दुय्यम (शिक्षणाची) शाळा *f.*] २ *not primary, subordinate* गौण, अप्रधान, अमुख्य, दुय्यम, दुय्यम प्रतीचा. ३ ( *chem.*) द्वितीय; as, "S. salt." (b) ( of colours ) मिश्र. ४ ( *med.*) *dependent or consequent upon another disease* अवलंबी; as, "Bright's disease is often S. to scarlet fever." (b) *occurring in the second stage of a disease* द्वितीयावस्थेचा, दुसऱ्या अवस्थेचा; as, "The S. symptoms of syphilis." [S. SYMPTOMS गौण लक्षणें, अप्रधान लक्षणें *n. pl.* S. STAGE ( रोगाची ) द्वितीयावस्था. S. SYPHILIS द्वितीयोपदंश *m.* S. UNION द्वितीय मेलन *n.* ] ५ ( *physics* ) द्वितीय, दुय्यम; as, "S. action, S. axis, S. battery."

Sec'ondary *n. deputy or delegate* दुय्यम *m*, दुय्यमाधिकारी. २ (*astron.*) *a secondary circle* गौणवृत्त *n*. (b) *a satellite* उपग्रह *m*.

Secondary embryo *n*. उपगर्भ *m*.

Secondary embryo -sac *n*. उपगर्भकोटर *n*.

Sec'onder *n*. अनुमोदक *m*, अनुमोदन देणारा. २ बाजू संभाळणारा, पाठ राखणारा.

Second-hand, See under Second No. 1.

Sec'ondly *adv*. दुसरा *decl*., दुसऱ्यानें.

Se'crecy *n. keeping of, ability to keep, or habit of keeping, secrets* गुप्तपणा *m*, गुप्तता *f*, रहस्यगोपन *n*, मौनपणा *m*. २ *tendency to concealment, secretiveness* मौनवृत्ति *f*, रहस्यगोपनवृत्ति *f*, (मनाचा) खोलपणा *m*. ३ *unrevealed state* गुप्तपणा *m*, गौप्य *n*; "There can be no S. about it." [ In S. गुप्तपणें, चोरून. ] ४ *seclusion, privacy* एकांतवास *m*, विविक्त *n*; as, "The pensive S. of desert cell."

Secret (sē'kret) [ L. *se*, apart, and *cernere*, to separate. ] *a. kept private, not made known* गुप्त, गुह्य, गुप्तपणाचा, अंतःस्थ, चोरटा, चोरीचा, चोर (in *comp*.; as, चोरखण S. drawer, चोरखिसा S. pocket, चोरवाट Secret passage. ) [ S. TREATY गुप्त तह *m*, चोरटा तह *m*. S. UNDERSTANDING अंतःस्थ ठराव *m*. THE S. PARTS गुह्य अवयव *m*. *pl*., जननेंद्रियें *n*. *pl*.] २ (R.) *close, reticent* खोल, तोंडाचा खबरदार, गुजराख्या, गुह्यभाषी. ३ (of place) *secluded, retired* आडवळणी, आडवळणाचा, एकांताचा, विविक्त. ४ *occult* गुह्य, गूढ.

Se'cret *n. thing kept secret* गुप्त गोष्ट *f*, गूज *n*, गुजगोष्ट *f*, गुपित *n*, गौप्य *n*, रहस्य *n*. [ DISCLOSURE OF SECRETS गौप्यस्फोट *m*, रहस्यस्फोट *m*, अन्तर्भेद *m*. DIVING INTO THE S. OF रहस्यभेद *m*, गुप्तभेद *m*. -PERSON THAT DIVES गुप्तभेदी *m*. KNOWER OF THE SECRETS OF भेद्या *m*. OPEN S. उघडें गौप्य *n*.] २ *mystery* गूढ *n*, गुह्य *n*, कोडें *n*; as, "The *secrets* of nature." ३ *true but not generally recognised method for attainment of* रहस्य *n*, हक़ीक़त *n*, गुरुकिल्ली *f*, मर्म *n*, वर्म *n*. ४ (as of a piece of mechanism) मर्म *n*, *n*, किल्ली *f*, गुरुकिल्ली *f*.

Secreta'rial *a*. सेक्रेटरीचा, चिटणिसाचा, चिटणिसाच्या कामाचा. (b) मंत्र्याचा, मंत्र्याच्या कामाचा -संबंधीं.

Sec'reta'riat, Secreta'riate *n. the office of a secretary* चिटणिसाची कचेरी *f*, सेक्रेटेरिएट *n*.

Secretary (sek'-re-tar-i) [Low L. *secretarius* -L. *secretus*, secret. Secretary etymologically means a confidential officer. ] *n. one who writes letters, reports, for an employer or society* चिटणीस *m*, चिटणवीस *m*, सेक्रेटरी *m*. [ PRIVATE S. खानगी सेक्रेटरी *m*, खासगी सेक्रेटरी. HONORARY S. सन्मान्य (बिनपगारी) सेक्रेटरी.] २ *an official in charge of a department of government* चिटणीस *m*, सेक्रेटरी. [ CHIEF S. मुख्य सेक्रेटरी *m*. UNDER S. मदतसेक्रेटरी *m*. ASSISTANT S. दुय्यम सेक्रेटरी *m*. EDUCATIONAL S.

शिक्षणखात्याचा सेक्रेटरी *m.* POLITICAL S. (संस्थानांचा) पोलिटिकल सेक्रेटरी.] ३ मंत्री *m.* [HOME S. स्वराष्ट्रीय मंत्री *m*, देशांतल्या राजकारणाचा मंत्री *m.* FOREIGN S. परराष्ट्रीय मंत्री *m.* WAR S. युद्धमंत्री *m.* COLONIAL S. वसाहतींचा मंत्री. S. OF STATE FOR INDIA पार्लमेंटाचा हिंदुस्थानाकरितां मंत्री.]

Sec'retaryship *n.* सेक्रेटरीची जागा *f*, सेक्रेटरीचा हुद्दा *m.*

Secrete (se-krēt') [L. *secretum*, to set apart.] *v. t. to put* (object, person, oneself) *into place of concealment* लपवणें, झांकणें, लपवून ठेवणें. २ (*physiol.*) *to produce by secretion* (विमोचनानें) वेगळा करणें, वेगळा काढणें, (-चें) विमोचन *n.* करणें, आन्तरोत्सर्ग करणें.

Secre'tion *n.* लपविणें *n*, लपवून ठेवणें *n.* २ वेगळा करणें *n*, वेगळा काढणें *n*, विमोचन *n*, वियोजन *n.* ३ *that which is secreted* (लाला, मूत्र, मल इत्यादि) आन्तरोत्सर्ग *m*, स्राव *m.* [S. OF THE LARGE INTESTINES बृहदंत्रक्रियाजनित पदार्थ *m.* S. OF THE NOSE शेंबूड *m.* S. OF THE THROAT कफ *m.* S. OF THE BOWELS मल *m.*]

*N. B.*—Secretion is आन्तरोत्सर्ग, विमोचन. Excretion is बाह्योत्सर्ग. विसर्जन *n.*

Secret'ive *a. causing secretion* आंतरोत्सर्गकारी. २ *keeping secret* गुप्त ठेवणारा, रहस्यगोपनवृत्तीचा, मौनवृत्तीचा.

Secret'iveness *n.* आंतरोत्सर्गकारिता *f.* २ मौनवृत्ति *f.*

Se'cretly *adv.* गुप्तपणें, गुप्तपणानें, चोरून.

Se'cretness *n.* गुप्तपणा *m*, गुप्तता *f.*

Secre'tory *a.* आन्तरोत्सर्गासंबंधीं, आन्तरोत्सर्ग करणारा, विमोचक. [S. GLANDS विमोचक पिंड *m*, आंतरोत्सर्गपिंड.]

Sect (sekt) [Fr. *secte* –L. *secta*, a set of people –L. *sequi*, to follow.] *n. a religious denomination* पंथ *m*, संप्रदाय *m*, शाखा *f*, मत *n*, मार्ग *m.* २ *the disciples of a philosopher or teacher* (तत्त्ववेत्त्याची किंवा धर्मोपदेशकाची) शिष्यमंडळी *f*, सांप्रदायी *m*, *pl.*, पंथाचे लोक *m. pl.*, शिष्यशाखा *f.*

Secta'rian *a.* विशिष्ट पंथाचा, विशिष्ट संप्रदायाचा, विशिष्ट शाखेचा, विशिष्ट मार्गाचा. (b) विशिष्ट जातीचा. (c) विशिष्ट वर्गाचा. २ *bigoted* आपल्याच पंथाचा -मताचा अभिमानी. (b) आपल्याच जातीचा विशेष अभिमानी. S. *n.* स्वतःच्याच पंथाचा विशेष अभिमानी. २ स्वतःच्या जातीचा विशेष अभिमानी *m.*

Secta'rianism *n. the tendency to form sects* लहान लहान धर्मपंथ किंवा पोटजाती पाडण्याचा स्वभाव *m.* २ *bigotry* स्वतःच्याच जातीचा दुरभिमान *m*, जात्यभिमान *m*, स्वजातिविषयक अभिमान *m.* (b) स्वसंप्रदायाभिमान *m*, स्वमताभिमान *m.*

Sectio (sek-shi-ō) [L.] *n.* छेदन *n.*

Sectio Cadaveris प्रेतच्छेदन *n.*

Section (sek'shun) [Fr.–L. *sectio* -*sectum*, to cut.] *n. a cutting* छेदन *n*, परिच्छेद *m*, कापणें *n.* २ *a part cut off* कापलेला भाग *m*, तुकडा *m*, काप *m*, भाग *m*,

छेद् *m*, अंश *m*. ३ *a class of people* (विशिष्ट लोकांचा) वर्ग *m*, जात *f*, जाति *f*. ४ (of a book) भाग *m*, विभाग *m*, खंड *m*, स्कंध *m*. ५ (*med.*) छेदन *n*, छेद *m*. [CÆSARIAN OR ABDOMINAL S. उदराला व गर्भाशयाला छेद करून गर्भ बाहेर काढणें.] ६ (*archit.*) (छेदाचा) देखावा. [HORIZONTAL S. आडवा देखावा *m*. VERTICAL S. उभा देखावा *m*.] ७ (*math.*) छिन्न *n*, छेद *m*. [CONIC SECTIONS शंकुछिन्न *n*.] ८ हृद्द *f*.

**Sec'tional** *a*. विशिष्ट भागाचा. (b) विशिष्ट वर्गाचा. (c) विशिष्ट जातीचा, जातीजातीचा. (d) स्थानिक, विशिष्ट ठिकाणचा. २ *consisting of sections* निरनिराळे (सुटे) भाग किंवा अवयव असणारा -असलेला. (b) अवयव किंवा भाग निराळे करतां येण्याजोगा -सारखा; as, "A S. steam-boiler." ३ (of paper) *ruled in small squares* चौरस आडवा उभा आंखलेला. **Sec'tionally** *adv*. भागाभागांनीं.

**Section-writer** *n*. कोर्टातील नकला करणारा कारकून *m*.

**Sector** (sek'tur) [L. *sector-secare*, to cut.] *n*. (*geom.*) द्वैत्रिज्यवृत्तखण्ड *n*, द्वैत्रिज्य *n*. २ *a mathematical instrument used in drawing plans* (घराचे प्लान वगैरे काढतांना वापरण्याचा) सेक्टरकंपास *m*. ह्याची आकृति वर्तुळाच्या सेक्टरसारखी असते. ३ *an instrument for measuring the arc between a star and the zenith* नतांशयंत्र *n*.

**Secular** (sek'ū-lar) [Fr. -L. *secularis -seculum*, a generation, an age, the world. Secular शब्दाचा धात्वर्थ पुष्कळ काळानें होणारा, शतकानें होणारा, किंवा पुष्कळ युगांनीं होणारा असा आहे.] *a*. *pertaining to the present world or to things not spiritual, unconnected with religion* ऐहिक, प्रापंचिक, सांसारिक, व्यावहारिक, या लोकचा, इहलोकचा, इहलोकविषयक, लौकिक, संसाराविषयींचा. २ (of a priest) *not under a monk's vows* (oppo. to regular monk, not a layman.) रेग्युलर मंकपासून भिन्न असलेला, सेक्युलर मंक, मठबाह्यवासी मंक. ३ *belonging to the laity, lay, not clerical* सांसारिक, गृहस्थाश्रमी, सांसारिकांचा.

**Sec'ular** *n*. *a layman* सांसारिक *m*, संसारी *m*, प्रापंचिक *m*, कौटुंबिक *m*, कुटुंब करून राहणारा *m*. २ सेक्युलर मंक *m*, मठाच्या बाहेर राहणारा मंक *m*.

**Sec'ularism** *n*. ऐहिकवाद *m*.

**Sec'ularist** *n*. ऐहिकवादी *m*. २ धर्मविहीनशिक्षणवादी *m*.

**Secular'ity** *n*. प्रापंचिकता *f*, सांसारिकता *f*, ऐहिकता *f*, ऐहिकदृष्टि *f*, ऐहिकबुद्धि *f*. २ धर्मविहीनता *f*.

**Sec'ularize** *v. t.* *to convert from regular or monastic into secular* रेग्युलर 'मंक'चा 'सेक्युलर मंक' करणें, मठवासी मंकचा मठबाह्यवासी मंक करणें; as, "To S. a priest or a monk." २ *to convert from spiritual to secular or common use* प्रपंचाच्या उपयोगास लावणें; as, "To S. a church property."

**Sec'ularly** *adv*. प्रापंचिकासारखा, प्रापंचिकाच्या दृष्टीनें.

Secundine ( sek'un-dīn ) *n.* ( *usu. pl.*) ( प्रसूतीनंतर निघणारी ) वार *f*, खोळ *f*, गर्भवेष्टन *n*. २ (*bot.*) (ओव्ह्यूलचें ) अन्तर्वेष्टण *n*, द्वितीय वेष्टण *n*.

Secur'able *a*. प्राप्त करून घेण्यासारखा.

Secure ( se-kūr' ) [L. *se*, without, and *cura*, care.] *a. without care or anxiety* निश्चिंत, चिंता नसलेला, चिंताविरहित, काळजी नसलेला. २ *free from fear* निर्भय, निर्भयपणाचा, भयातीत. ३ *free from danger* सुरक्षित, निर्विघ्न, निरुपद्रव. ४ *overconfident* (in bad sense ) ( स्वतःसंबंधानें ) फाजील विश्वास असणारा, निर्धास्त. ५ (Bible) *careless* निष्काळजी.

Secure' *v. t. to make safe, to guard from danger* निर्भय करणें, निजोखमी करणें, सुरक्षित करणें, निर्भयपणा *m*. करणें *g. of. o.*, निर्भयपणा *m*. आणणें, बंदोबस्त *m* -बंदोबस्ती *f* -रक्षण *n*. करणें *g. of o.* २ *to put beyond hazard of losing or of not receiving* निर्धास्त करणें, निजोखमी करणें; as, "To S. a creditor against loss." (b) *to make certain* खचित करणें, निश्चित करणें, खचिती *f*. करणें, बंदोबस्त *m* -बंदोबस्ती *f*. करणें; as, "To S. a debt by a mortgage." ३ *to make fast* गच्च करणें, मजबूत करणें, आंवळणें, आंवळून बांधणें. ४ *to get possession of, to acquire certainly* आपल्या ताब्यांत घेणें, मिळवणें, संपादन करणें; as, "To S. an estate."

Secure'ly *adv*. निर्भयपणें, भयरहित, निश्चितपणें.

Secure'ness *n*. निर्धास्तपणा *m*, सुरक्षितपणा *m*.

Securi'ty *n*. निश्चिंतपणा *m*, निःशंकपणा *m*. २ निर्भयपणा *m*, निजोखमीपणा *m*, निर्भयता *f*, निर्विघ्नता *f*. ३ *pledge given, surety* तारण *n*, जामिनी *f*, जामिनकी *f*, *n*, हमी *f*, जामिनात *f*. [SECURITY BOND जामीनकतबा *m*, जामीनखत *n*.] ४ (of persons) जामीन *m*, जामीनदार *m*, हमीदार *m*. ५ ( for goods or money ) मालजामीन *m*, as distinguished from हाजीरजामीन which is security for the appearance of the person.

Sedan ( sē-dan' ) [Invented at Sedan in France.] *n*. दोन माणसांनीं न्यावयाची खुर्ची *f*, नालकी *f*.

Sedate ( se-dāt' ) [L. *sedāre, -atum*, to seat. Sedate etymologically means *seated* or *settled*. ] *a. quiet, serene, serious* स्थिर, गंभीर, शांत, स्थिरबुद्धि.

Sedate'ly *adv*. स्थिरपणें, शांतपणानें, गांभीर्यपूर्वक, गंभीरपणें, स्थिरबुद्धीनें.

Sedate'ness *n*. स्थिरपणा *m*, गंभीरपणा *m*, शांतपणा *m*, गांभीर्य *n*, स्थिरबुद्धि *f*, स्थिरता *f*.

Seda'tive *a. tending to make sedate* स्थिर करणारा, शांत करणारा, सौम्य करणारा. २ ( *med.* ) शामक, उपशामक. S. *n*. ( *med.* ) शामक औषध *n*.

Sed'entariness *n*. बैठेपणा *m*, बसून काम करण्याची संवय *f*.

Sedentary ( sed'en-tā-ri ) [L. *sedentarius -sedere*, to sit.] *a*. ( of persons ) *accustomed to sit much*

*or long* (पुष्कळ वेळ) असून काम करणारा, बैठें काम करणारा, बसकामी, बैठकामी, बसकाम्या, बैठकाम्या. २ *requiring much sitting* बसून करण्याचा, बैठकीचा, बसकीचा, बैठा; as, "A S. employment; A S. life."

Sedge (sej) [Of Anglo-Saxon origin.] *n.* लव्हाळा *m.*

Sediment ( sed'i-ment ) [L. *sedimentum* -*sedere*, to sit, to settle.] *n. that which settles at the bottom of a liquid, dregs* गाळ *m*, गदळ *m*, सांखा *m.* २ ( *med.* ) लघ्वींतील सांखा *m*, खर *f.*

Sediment'ary *a.* गाळाचा, गदळाचा.

Sediment'ation *n.* खर वगैरे बसणें *n.* २ ( *geol.* ) खडक बनविणारा गाळ बसणें *n.*

Sedition ( se-dish'un ) [L. *se*, away and *ire*, *itum*, to go.] *n.* राजद्रोह *m.*

*N. B.*—राजद्रोह is the only Marathi word that is now universally used in the Maharashtra for sedition.

Sedi'tious *a.* राजद्रोहाचा, राजद्रोहात्मक, राजद्रोहोत्पादक, राजद्रोही. [ S. ARTICLE राजद्रोहात्मक -राजद्रोही लेख *m.* ] २ ( of person ) राजद्रोही.

Sedi'tiously *adv.* राजद्रोहपूर्वक.

Sedi'tiousness *n.* राजद्रोहिपणा *m*, राजद्रोहात्मकता *f.*

Seduce ( se-dūs' ) [L. *se*, aside, and *ducere*, to lead, to draw.] *v. t. to draw aside from rectitude* फुसलावणें, भुलवणें, फुसलावून -भुलवून -भुलथाप *f.* देऊन -भुलवण *f.* घालून कुमार्गांत नेणें, पाऊल वांकडें पाडविणें *g. of o.*, पाय वांकडा पाडणें -पाडविणें *g. of o.*, आडवाटेस -आडमार्गास -चुकीच्या मार्गास लावणें, फितवणें, फितावणें, फितूर करणें, फोडणें, फितवाफितव *f.* करणें *g. of o.* २ *to corrupt* (as a female) फुसलावून भ्रष्ट करणें -अंगाखालीं घालणें, वश करून -बधवून पातिव्रत्याचा नाश *m.* करणें. [ To S. AND ELOPE WITH काढणें, काढून नेणें. ]

Seduce'd *pa. t.* S. *pa. p.* (फुसलावून) बहकवलेला -बिघडवलेला -आडमार्गास नेलेला. २ (बधवून) भ्रष्ट केलेला.

Seduce'ment *n.* फुसलावणी *f*, फुसलावणें *n.*

Sedu'cer *n.* फुसलावणारा *m*, भुलवणारा *m*, फुसलावून आडमार्गास नेणारा. २ (बधवून) भ्रष्ट करणारा *m.*

Sedu'cing *pr. p.* फुसलावणारा, भुलवणारा, &c.

Seduc'tion *n.* फुसलावणें *n*, भुलवणें *n*, फुसलावून नेणें *n*, फुसलावून बहकविणें *n.* २ बधवून उपभोगणें *n*, कापट्यपूर्वक सतीत्वनाश *m*, स्त्रीसंग्रहण *n.*

Seduc'tive *a.* फुसलावणारा, भुलथाप देणारा, भुलवणारा, ( फुसलावून ) आडमार्गास लावणारा. २ भुलविण्याचा, भुलथाप देण्याचा. ३ बधवून भ्रष्ट करणारा -करण्याचा.

Sedu'lity, Sed'ulousness *n.* उद्योगिपणा *m*, उद्योग *m*, उद्यम *m*, व्यासंग *m*, परिश्रम *m*, चिकाटी *f*, व्यवसाय *m.*

Sedulous ( sed'ū-lus ) [L. *sedulus* -*sedere*, to sit. Sedulous etymologically means 'sitting constantly' ( सारखी बैठक मारून बसणारा. ).] *a. diligent, constant* उद्योगी, उद्यमी, व्यासंगी, परिश्रमी, सारखी मेहेनत करणारा, व्यवसायी, चिकाटीचा.

Sed'ulously *adv.* उद्योगपूर्वक, ताण देऊन, श्रम घेऊन, व्यासंगपूर्वक, परिश्रमपूर्वक, चिकाटी देऊन, चिकाटीनें.

See (sē) [O. Fr. *se*, *sied* –L. *sedes* -*sedere*, to sit.] *n.* बिशपची गादी *f*, आर्चबिशपची गादी *f*, बिशपची मुख्य जागा *f*, आर्चबिशपची मुख्य जागा *f*. २ बिशपच्या अधिकारांतील प्रांत *m*.

See (sē) [A. S. *seon*, to see.] *v. i. to have the power of sight* पाहणें, डोळे *m. pl.* -दृष्टि *f.* असणें *in. con.*, दिसणें *impers.*, डोळस &c. असणें. २ *to exercise the power of sight* पाहणें, डोळे *m. pl.* उघडणें; as, "Cannot S. till the ninth day." ३ *to be attentive, to direct the sight* पाहणें, बघणें, दृष्टि *f.* लावणें. ४ *to examine, to inquire* पाहणें, बघणें, शोध *m* -चौकशी *f.* करणें, विचार *m.* करणें; as, "Will S. about it." ५ *to take care* पाहणें, बघणें, जपणें, संभाळणें; as, "To S. to the house; See that ye fall not by the way." ६ (*fig.*) *to have intellectual apprehension, to perceive* (often with *through* or *into*) पाहणें, जाणणें, वर्म *n* -मर्म *n.* जाणणें. (b) (of preternatural acuteness of intelligence) सूक्ष्म दृष्टीनें पाहणें. [SEEING IS BELIEVING *one's own observation is the best evidence* डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहणें हाच उत्तम पुरावा. cf. मनासारखा ग्वाही त्रिभुवनांत नाहीं.]

See *v. t. to perceive by the eye, to observe* पाहणें, बघणें, अवलोकणें, अवलोकन *n.* करणें, दिसणें *in. con.*, दृष्टीस पडणें *in. con.* २ (with *through*) *not to be deceived by* पाहणें, (लुच्चेगिरी पूर्णपणें) जाणणें -ओळखणें. (b) *to detect the nature of* (-चें) स्वरूप *n* -मर्म *n* -वर्म *n.* ओळखणें. ३ *to descry, to discern by sight* (प्रत्यक्ष) पाहणें. [To S. THE LIGHT जन्मणें, जन्माला येणें. २ प्रसिद्ध होणें, प्रकाशित होणें. To S. VISIONS दृष्टांत *m.* होणें, (स्वप्नांत) दर्शन होणें. To SEE THINGS भ्रम होणें. To S. STARS (डोळ्यापुढें) काजवे दिसणें. To S. THE SIGHTS प्रेक्षणीय स्थळें पाहणें. To S. OVER A HOUSE घराच्या चारी बाजू (फिरून) पाहाणें.] ४ *to discern mentally, to apprehend* पाहणें, समजणें, जाणणें, ताडणें, डोक्यांत भरणें, लक्षांत येणें in. con.; as, "Cannot S. the point." [AS FAR AS I CAN S. *to the best of my understanding* माझ्या समजुतीप्रमाणें. To S. LIFE, *to gain experience of men and manners esp. by dissipation, &c.* (सर्व करून सवरून) जगाचा अनुभव घेणें. To S. SERVICE (नोकरी करून) वाकबगार -म्हातारा होणें. To S. A THING THROUGH *or* OUT पुरा करणें, शेवटास नेणें.] ५ *to grant an interview, to pay a visit to* भेटणें, भेट *f.* घेणें, भेट *f.* देणें, मुलाखत *f.* घेणें -देणें; as, "Refused to S. me; Can I S. you on business?" (b) *to consult for any particular purpose* भेटणें, (भेटून) सल्ला -अभिप्राय घेणें. ६ *to call up a picture of, to imagine* पाहणें, (-ची) कल्पना *f.* करणें, मनांत आणणें; as, "Cannot *see* myself submitting to it." ७

(with *off*) *to conduct on the way* वाट दाखवणें, घालवणें, बोळवणें, बोळवणी *f.* करणें *g. of o.*; as, "Mind, you S. him off the premises." ८ *to escort* बरोबर जाणें, पोंचविणें; as, "May I *see* you home?" ९ *to stand by and countenance* (with *through*) (जवळ उभें राहून) उत्तेजन देणें, (-कडून) करवणें; as, "Will you *see* me *through* the difficulty." १० *to have opinion* (निराळ्या) दृष्टीनें पाहणें, मानणें, मत *n.* असणें; as, "I *see* life differently." ११ (with *after*) *to take care of* पाहणें, बघणें, काळजी घेणें -बाळगणें, जपणें. [SEE TO IT THAT (-च्या विषयीं) काळजी घे.]

Seed (sēd) [A. S. *sæd*, *-sawan*, to sow.] *n.* बीं *n*, बीज *n.* [RAISED FROM S. बिजारू. S. SPRINGING OR JUST SPRUNG रुजवण *n*, रोव *m*, रहू *m*, रोह *m*.] २ (of stone-fruits) आठील *f*, अठळी *f*, अठी *f*, अठोळी *f*. ३ *male fecundating fluid, semen* शुक्र *n*, वीर्य *n*, रेत *n*, धातु *f*, बीज *n.* ४ (Bible) *off-spring, progeny* बीज *n*, बिजवट *n*, संतति *f*, संतान *n*, वंश *m*. [FAILURE OR EXTINCTION OF S. बींबूड *f*, निर्वंश *m*. TO RAISE UP S. मुलें होणें *in. con.* with ला *of s.* THE S. OF ABRAHAM आब्राहामचा वंश *m*, ज्यू लोक *m. pl.*] ४ *germ, prime cause, beginning* बीं *n*, बीज *n*, मूळ *n*, मूलकारण *n*, उगम *m*; as, "*Seeds* of strife." [TO SOW SEEDS OF (-चें) बीज पेरणें.] ५ (*pl.*) (reserved for sowing) बियाणें *n*, बेणें *n*, बियांचा दाणा *m*, बिरवण *f*, बींबिरवण *f*. [MIXED SOWING S. बेवड *f*. S. ROOTS, SLIPS, &c. RESERVED FOR SOWING AND SETTING बींबियाणें *n*, बींबेणें *n*, बींच्याणें *n*, बींभरण *n*.]

Seed *v. i. to sow seed* बीं पेरणें. २ *to shed the seed* बीं (गळून) पडणें. ३ *to grow to maturity and produce seed* (पूर्णदशेस येऊन) बीं होणें, बीं येणें -भरणें. S. *v. t. to sow, to plant seeds in* बीं पेरणें, बींबियाणें लावणें; as, "To S. a field." २ *to remove seeds from* (fruit, &c.) आठील *f*. काढणें, अठी *f*. काढणें. (b) (as cotton) लोढणें, वटणें. [COST OF SEEDING COTTON लोढाई *f*.]

Seed-bag *n.* बीं ठेवण्याचें पोतें *n.*

Seed-bed *n.* रोप तयार करण्याचा वाफा *m.* See Seed-plot.

Seed-coat *n.* टरफल *n*, तूष *n.* बियांचें वरील आच्छादन किंवा टरफल. उ. एरंडी. Seed-coat is not बीजकोश, as the latter is restricted by some to ovary. Seed-coat is टरफल while Pericarp is फलकवच.

Seed-cod *n.* बीं ठेवण्याची टोपली *f.*

Seed-corn *n.* बीं *n*, बियाणें *n.*

Seed-cotton *n.* सरकीसकट कापूस *m.*

Seed-crusher *n.* (दाबून) तेल काढण्याचें यंत्र *n.*

Seed-cup *n.* चाढें *n.*

Seed-drill *n.* पाभर *f.*

Seed-field *n.* बीं तयार करण्याचें शेत *n.* Seed-field मध्यें बीं तयार करण्याकरितां बीं अगर झाडाचा दुसरा कोण-

ताही भाग लावतात. उदाहरण, जोंधळा, कापूस, आलें, बटाटा.

Seed-grain *n.* बीं *n*, बियाणें *n.*

Seed-hopper *n.* चाडें *n.*

Seed'ing *n.* बीं येणें *n*, बीं भरणें *n.*

Seeding machine *n.* धान्य ओळींत पेरण्याचें यंत्र *n*, पाभर *f.* See the word Seed-Sower.

Seed-leaf *n.* *cotelydon* दल *n*, डाळिंबी *f.* See Seed-lobe.

Seed-less *n.* बीं नसलेला, बिया नसलेला. २ फोलकट. ३ निर्बीज.

Seed'ling *n.* रोप *n*, रोहं *m*, रोपा *m.*

Seed-lobe *n.* *a cotelydon* दल *n*, डाळिंबी *f.* Seed-leaf आणि Seed-lobe यांमध्यें कांहीं फरक नाहीं.

Seed-oil *n.* बियांचें तेल *n.*

Seed-pearls *n. pl.* लहान मोत्यें *n. pl*, दाण्यासारखीं बारीक मोत्यें *n. pl.*

Seed-plot *n.* रोप तयार करण्याची जागा *f.* यांत एकाहून अधिक वाफे व ते निरनिराळ्या रोपांचे असूं शकतात. Seed-bed व Seed-plot यांमध्यें रोप तयार करून तें दुसरीकडे लावतात. उदाहरण, कांदे, वांगीं, मिरची, भात.

Seeds'man *n.* बियांचा व्यापारी *m.* Seeds'men *n. pl.*

Seed-sower *n.* धान्य फेंकून पेरण्याचें यंत्र *n.* Seeding machine व Seed-sower या दोहोंमध्यें फरक आहे. Seeding machine नें धान्याची पेरणी ओळींत होते व Seed-sower नें धान्य सर्व शेतभर पसरून पडतें.

Seed-time *n.* पेरणीचा हंगाम *m*, पेरणीचा समय *m.*

Seed-vessel *n.* *the pericarp which contains the seeds* बीजकवच *n.*

Seed-wheat *n.* बियाण्याचा गहूं.

Seed'y *a.* *abounding with seeds* बीजप्रचुर, बहुबीज, पुष्कळ बिया असलेला. २ *run to seed* बीं भरलेला, बीं आलेला. ३ *looking or feeling unwell* म्लान, आजारी. ४ जुना, जीर्ण, फाटकातुटका; as, "A S. coat."

See'ing *n.* पहाणें *n*, बघणें *n.* S. *conj.* *since* पाहातां, ज्या अर्थीं, करितां; as, "He did well, seeing that he was so young.

Seek ( sēk ) [ A. S. *secan*, to seek.] *v. t.* *to go in search of, to look for* शोधणें, पाहणें, (-चा) शोध *m* -तलास *m.* करणें. [ SOUGHT-AFTER इष्ट, हवासा, हवा असलेला. २ फार जरूर असलेला, फार मागणी असलेला.] २ *to ask for, to solicit* मागणें, याचना *f.* करणें *g. of o.*, इच्छिणें, प्रार्थना *f.* करणें. ३ *to pursue* (सत्याचें) अन्वेषण करणें, (-च्या) पाठीमागें लागणें, (-चा) शोध *m.* करणें, शोधून काढणें. ४ *to consult* (-कडे) जाणें, (-ला) विचारणें, (-चा) विचार *m* -सल्ला *m.* घेणें. ५ *to endeavour to do* (-चा) प्रयत्न *m.* करणें. [To S. (ONE'S LIFE) (एखाद्याचा) जीव घेण्याचा प्रयत्न करणें, (एखाद्याला) ठार मारण्याचा प्रयत्न करणें. ]

Seek *v. i.* *to make search or inquiry* शोधणें, पाहणें, शोध *m*-तलास *m.* करणें, (-च्या) शोधांत असणें. (h) *to*

*try* ( शोधण्याकरितां ) प्रयत्न *m.* करणें. २ ( Bible ) ( with *to* ) ( -कडे ) जाणें -येणें; as, "All the earth *sought* to Solomon, to hear his wisdom." Sought *pa. t.* and *pa. p.*

Seek'er *n.* शोधणारा *m*, शोध करणारा *m*, तलास करणारा *m.* २ ( *philos.* ) अन्वेषी, अन्वेष्टा *m.* [S. AFTER TRUTH सत्यान्वेषी *m.* ] ३ मागणारा *m*, अर्थी *m.* [SEEKER AFTER LEARNING विद्यार्थी. SEEKER AFTER WEALTH धनार्थी. ]

Seek'ing *pr. p.* S. *v. n.* शोधणें *n*, तलास लावणें *n.* २ मागणें *n*, प्रार्थना करणें *n.* ३ प्रयत्न करणें *n.*

Seem ( sēm ) [A. S. *seman*, to satisfy, to suit.] *v. i.* *to appear*, *to look* दिसणें, वाटणें, भासणें, गमणें. २ *to have a show* दिसणें, बाहेरून -वरून दिसणें, रंग *m* -डौल *m* -घाट *m* -धोरण *n.* असणें *in. con.*

Seem'ing *pr. p. a.* ( usually with suggestion of falsity ) दिसणारा, भासणारा, बाहेरून दिसणारा, बाहेरच्या डौलाचा. S. *n. appearance*, *semblance* दिसणें *n*, आकार *m*, रूप *n*, स्वरूप *n*, डौल *m.*

Seem'ingly *adv. in appearance* दिसण्यांत, बाहेरून, बाह्यात्कारीं, जणूं.

Seem'liness *n. comeliness* सुंदरपणा *m*, दिखाऊपणा *m*, डौल *m.* २ उचितपणा *m*, औचित्य *n.*

Seem'ly *a. comely* सुरेख, सुंदर, डौलदार, दर्शनीय. २ *becoming* योग्य, उचित, लायक, शिस्तीचा, शिस्तवार.

Seen *pa. p.* of See.

See'r *n.* पाहणारा *m*, बघणारा *m.* २ द्रष्टा *m.* ३ भविष्य पाहणारा, त्रिकालज्ञ.

See-saw ( sē'-saw ) [Probably a reduplication of Saw.] *n. motion to and fro as in the act of sawing* झोंकाझोंकी *f*, झुलाझुली *f.* २ सीसा नांवाचा लांब फळीचा खेळ *m.*

Seethe ( sēth ) [Of Anglo-Saxon origin.] *v. t. to boil* शिजवणें, उकडणें, उकळणें, रांधणें. S. *v. i.* शिजणें, उकडणें. २ ( *fig.* ) *to be agitated* खवळणें, क्षुब्ध होणें, शिजणें ( *fig.*).

Seethed *pa. t.* S. *pa. p.* शिजवलेला, उकडलेला.

Seeth'er *n.* शिजविण्याचें भांडें *n.*

Seething *pr. p.* शिजवणारा, उकडणारा. २ शिजणारा, क्षुब्ध होणारा, खवळणारा.

Segar ( sē-gar ) [Incorrect for cigar] *n.* शिगार *f*, चुट्टा *m.*

Segment ( seg'-ment ) [L. *segmentum* -*secare*, to cut.] *n. a part cut off*, *a portion* खंड *m*, अंश *m*, भाग *m.* २ ( *geom.* ) वृत्तखंड *n*, वर्तुलखंड *n*, धनुष्य *n*, चाप *n.* [ANGLE IN A SEGMENT चापान्तर्गत कोण *m*, चापीय कोण *m.* ANGLE ON A S. चापोपरिस्थ कोन *m*, चापकोन *m.* SIMILAR SEGMENTS सरूप खंडें *n. pl.* SEGMENT OF THE BASE OF A TRIANGLE BY ITS HEIGHT आबाधा *f.*]

Segment *v. t.* खंड करणें. S. *v. i.* खंड होणें. २ (biol.) *to divide or separate into parts in growth*, *to*

*undergo cleavage as in the segmentation of an ovum* प्रभेदन होणें. २ (*physio.*) *to reproduce by gemmation* (मूळ प्राण्याची वाढ होत होत त्याच्या अग्राच्या) प्रभेदनानें नवीन प्राणी उत्पन्न होणें, प्रभेदनोत्पत्ति होणें.

Segmenta'tion *n.* प्रभेदन *n.* २ प्रभेदनोत्पत्ति *f.*

Segregate (seg're-gāt) [L. *se*, apart, and *grex*, *gregis*, a flock.] *v. t. to put apart from the rest, to isolate* (इतरांपासून) दूर ठेवणें, दूर करणें, निराळा ठेवणें, एकीकडे ठेवणें, वेगळा ठेवणें. S. *v. i.* (*geol.*) *to separate from a mass and collect together about centres or along lines of fracture, as in the process of crystallization or solidification* वेगळा होणें, सुटा होणें, वेगळा होऊन मध्यबिंदूजवळ एकत्र जमणें.

Seg'regated *pa. t.* S. *pa. p.* दूर ठेवलेला, दूर केलेला, निराळा केलेला -झालेला. Seg'regating *pr. p.*

Segrega'tion *n.* स्थानत्याग *m*, स्थलान्तर *n*, दूर ठेवणें *n*, दूर करणें *n*, निराळा -एकीकडे ठेवणें *n*; Specifically (प्लेगादि संसर्गजन्य रोगांत) वस्तीपासून दूर ठेवणें *n*, पृथक् ठेवणें *n.* २ दूर होणें, वेगळा होणें *n.*

Seignior, Seigneur (sēn'yėr)[Fr. *seigneur* -L. *senior*, elder.] *n. a feudal lord* (लष्करी) मोकाशी *m.* २ *a title of honour* (बहुमानदर्शक) सीनियर पदवी *f.* ३ *a person of rank* बडा मनुष्य *m*, सरदार *m.* [GRAND S. तुर्कस्थानचा सुलतान *m.*]

Seismograph (sīs'mō-graf) [Gr. *seismos*, an earthquake, *graphein*, to write.] *n.* भूकंपाचे आघात नोंदणारें यंत्र *n*, भूकंपलेखक *n.* Seismograph'ic,-al *a.* भूकंपलेखकानें नोंदलेला. Seismog'raphy *n.* भूकंपविद्या *f.*

Seismom'eter *n.* भूकंपाचा जोर व स्थळ दाखविणारें यंत्र *n*, भूकंपमापक *n.* Seismom'etry *n.* भूकंपमापनविद्या *f.*

Seis'moscope *n.* भूकंपदर्शक *n.*

Sei'zable *a.* ताब्यांत घेण्यासारखा, जप्त करण्यासारखा.

Seize (sēz) [O. Fr. *seisir* -Low L. *sacire*, to take possession of.] *v. t. to lay hold of forcibly or suddenly* (हातांत -मुठींत -पंजांत) धरणें, पकडणें, झोंबणें, जबरदस्तीनें घेणें, हिरावून घेणें, हिसकावणें, हिसकावून घेणें, हिसडून घेणें, रगडणें, रपटणें, दपटणें, गवाळ्यांत घालणें -टाकणें. (b) बळकावणें, काबीज करणें. २ *to invade suddenly* घेरणें, पछाडणें, ग्रासणें, आक्रमणें, ग्रस्त करणें. ३ (with *upon*) झोंबाडणें, झोंबाडा *m.* घालणें, पटकावणें, मटकावणें. ४ *to comprehend quickly or clearly* आकलन करणें, ग्रहण करणें, डोक्यांत घेणें, पटणें *in. con.*; as, "Seized an idea, a distinction." ५ (law) *to put in possession of* (chiefly in *pa. p.*) (-चा) ताबा देणें, (-च्या) ताब्यांत देणें. ६ *to take possession of* (contraband goods, documents, &c.) *by warrant or legal right, to confiscate, to attach* ताब्यांत घेणें, जप्त करणें.

**Seized** *pa. t.* S. *pa. p.* ताबा दिलेला, ताब्यांत दिलेला. २ ताब्यांत घेतलेला, जप्त केलेला, जप्त. ३ धरलेला, पकडलेला, (जबरदस्तीनें) हिरावून घेतलेला, हिसडलेला, दपटलेला, रगडलेला. ४ घेरलेला, पछाडलेला. ५ बळकावलेला, काबीज केलेला. ६ पटकावलेला, मटकावलेला. ७ ग्रहण केलेला, आकलन केलेला.

**Sei'zin, Seisin** *n.* ( *law* ) *possession* ताबा *m.*

**Seizing** *pr. p.* For meanings see the Verb.

**Sei'zor** *n.* ( *law* ) *one who takes possession* ताबा घेणारा *m.*

**Sei'zure** *n. the act of seizing* धरणें, पकडणें, बळकावणें *n.* २ जप्त करणें, जप्ती *f.* ३ *that which is seized* काबीज केलेला माल, जप्त केलेला माल *m.* ४ *a sudden attack of illness* घेरणें *n*, पछाडणें *n.*

**Seldom** ( sel'dum ) [ A. S. *seldum cf.* Ger. *selten*, rare. ] *adv. rarely often* क्वचित्, विरळा. [ S. TO BE FOUND दुर्लभ.]

**Select** ( sē-lekt' ) [ L. *se*, aside, and *legere*, to choose.] *v. t. to pick out as best or most suitable* निवडून घेणें, पसंत करणें, निवडणें, निवडून काढणें, loosely छानणें, वेंचून घेणें.

**Select'** *a. picked, choice* निवडक, निवडींव, वेंचलेला, पसंत केलेला, शेलका. [S. SOCIETY निवडक (लोकांचा) समाज *m.* S. COMMITTEE निवडक (लोकांची) कमेटी *f.*]

**Selec'tion** *n. act.* निवडून घेणें *n*, पसंत करणें *n*, निवडणें *n*, वेंचून घेणें *n*, निवडणूक *f.* २ वेंचा *m*, निवडक उतारा *m.* [ SELECTIONS FROM A BOOK वेंचे *m. pl.*, निवडक उतारे *m. pl.* ] ३ वेंच्यांचें पुस्तक *n*, सारसंग्रह *m.* ४ (biol.) संवरण *n*, निवड *f*, पसंती *f.* [ NATURAL S. स्वाभाविक पसंती *f*, नैसर्गिक पसंती *f.* ]

**Selec'tive** *a. choosing carefully* काळजीपूर्वक निवड करणारा, काळजीनें पसंत करणारा. २ संवरणात्मक, पसंतीचा, संवरणमूलक.

**Selenite** ( sel'en-īt ) [ Gr. *selenites*, moon-like, -*selene*, the moon. ] *n.* स्फटिकरूप व पारदर्शक अशी जिप्समची जात *f*, सेलेनाइट *n.* २ सेलेनियमचा क्षार *m*, सेलेनाइट. ३ चंद्रावरील ( काल्पनिक ) रहिवाशी *m.*

**Selenium** ( selē'-nium ) [Gr. *selene*, moon.] *n.* सेलीनियम नांवाचें अधातु मूलद्रव्य *n.* याला त्या शब्दाच्या ग्रीक धातूवरून 'सोम' हें नांव आम्हीं योजिलें आहे.

**Seleno-cen'tric** *a.* (*astron.*) चंद्रकेंद्रक, चंद्रमध्यग.

**Selenog'raphy** *n.* चंद्रगोलविद्या *f.*

**Self** ( self ) [A. S. *self*, very. ] *n.* आपण, स्वतः, तोच *m*, स्वत्व *n*, व्यक्तित्व *n.* २ *ons's own interest* स्वतःचें हित *n*, स्वतःचा फायदा *m*, स्वार्थ *m.* ३ (*philos.*) आत्मा *m.* *N. B.*—Self हा शब्द पुष्कळ इंग्रजी सामासिक शब्दांत पूर्वपद म्हणून वापरतात. [S. ABNEGATION आत्मसंयमन *n*, आत्मनिग्रह *m.* S. ABUSE हस्तमैथुन *n*, मुष्टिमैथुन *n. pop.* वीर्यनाश *m.* S. ABSORBED आपल्यांतच गढून गेलेला. S. ACTING आपोआप चालणारा, आपोआप काम करणारा, स्वयंगतिक. S. ADJUSTING आपोआप जुळणारा. S. ADMIRATION आत्मप्रौढी *f.* S.

AGGRANDISEMENT स्वतःची फाजील बढती, स्वतःचा उत्कर्ष. S. APPLAUSE आत्मस्तुति *f*, आत्मश्लाघा *f*, स्वतःची वाहवा *f*. S. ASSERTING, S. ASSERTIVE आपलेंच चालवणारा; आपलेंच घोडें पुढें ढकलणारा. S. ASSUMED स्वतःच घेतलेला, स्वतः धारण केलेला, स्वगृहीत. S. ASSUMPTION स्वतःला मोठें समजणें *n*, आढ्यता *f*. S. BEGOTTEN, S. BORN स्वयंभू. S. BINDER आपोआप (कापून पेंढ्या) बांधणारें यंत्र *n*. S. CENTRED आपल्याच दंगांत असणारा, आपल्याच तोऱ्यांत असणारा, स्वकेंद्रस्थ. S. CLOSING (DOOR, &c.) आपोआप बंद होणारा. S. COLOUR एकच (जातीचा) रंग *m*. S. COLLECTED स्थिरचित्त. S. COMMAND मनोनिग्रह *m*, मनोजय *m*. S. COMMUNION आत्मचिंतन *n*. S. COMPLACENT आत्मसंतुष्ट. S. COMPLACENCY आत्मसंतुष्टता *f*. S. CONCEIT मीपणा *m*, अहंकार *m*, अहंमन्यता *f*, शेखी *f*. S. CONQUEST मनोजय *m*. S. CONSCIOUS स्वतःचें विस्मरण न पडणारा, स्वतःस न विसरणारा. S. CONFIDENCE आत्मविश्वास *m*. S. CONJUGATE (*math.*) स्वसहचरित, मिथोबद्ध. S. CONSISTENT स्वानुरोधी, स्वसंबद्ध. S. CONSISTENCY स्वानुरोधिता *f*, स्वसंबद्धता *f*. S. CONSTITUTED आपणच केलेला -बनविलेला, स्वघटित. S. CONTAINED घुम्या, आपले विचार आपल्याशींच ठेवणारा. २ (of a house) सर्व सोयी असलेलें. S. CONTEMPT स्वतःचा तिरस्कार. S. CONTENTED आत्मसंतुष्ट, स्वसंतुष्ट. S. CONTRADICTION स्वविरोध *m*. S. CONTRADICTORY स्वविरोधी. S. CONTROL आत्मसंयमन *n*. S. DECEIT आत्मवंचन *n*, आत्मप्रतारणा *f*. S. DENIAL स्वसुखत्याग *m*. S. DEFENCE स्वतःचा बचाव *m*. (b) स्वतःचें संरक्षण *n*. S. DEGRADATION स्वतःची मानहानि *f*, स्वतःचा अधःपात *m*. S. DENYING आत्मसंयामक. SELF DEPENDENT स्वावलंबी. SELF DEPENDENCE स्वावलंबन *n*. S. DEVOTION आत्मार्पण *n*. S. EVIDENT स्वतःसिद्ध, स्वयंप्रमाण. S. EXAMINATION आत्मपरीक्षण *n*. S. EXISTENCE स्वयंभूत्व *n*, स्वयंभूपणा *m*. S. EXISTENT स्वयंभू. S. FERTILIZATION स्वतः परागाधानक्रिया करणें. S. FEEDING आपोआप पुरवठा करणारा. S. GOVERNMENT स्वराज्य *n*. २ आत्मसंयमन *n*. LOCAL SELF-GOVERNMENT स्थानिक स्वराज्य *n*. S. INTEREST स्वार्थ *m*, स्वहित *n*. S. HELP स्वावलंबन *n*. S. IMPORTANCE स्वतःचें महत्व *n*. S. IMPOSED स्वतःवर लादलेला, स्वतः शिरावर घेतलेला. S. IMPOSTURE स्वतःची फसवणूक *f*. S. INDULGENCE भोगासक्ति *f*, विषयासक्ति *f*, विषयरतता *f*. S. KNOWLEDGE स्वत्वज्ञान *n*. S. LESS निःस्वार्थी, स्वार्थशून्य. SELFLESSNESS स्वार्थशून्यता *f*. S. LOVE आत्मप्रीति *f*, आत्मप्रेम *n*. S. MURDER आत्महत्या *f*, आत्मघात *m*. S. MURDERER आत्महत्या करणारा *m*, आत्मघातकी *m*. S. OPINIONED आपलींच मतें घेऊन बसणारा, आपल्याच मतांचा (खोटा) अभिमान असणारा. S. POSSESSED मन जिंकलेला, मन ताब्यांत असलेला, निग्रही. S. POLLUTION, SAME AS SELF ABUSE. SELF POSSESSION प्रसंगावधान *n*, सावधगिरी *f*. *n*. S. PRAISE आत्मस्तुति *f*, आत्मश्लाघा *f*. S. PRESERVATION आत्मसंरक्षण *n*, स्वसंरक्षण *n*. S. RESPECT स्वाभिमान *m*. S. RESPECTING

स्वाभिमानी. SELF RESTRAINED आत्मनिग्रही. S. RESTRAINT आत्मनिग्रह *m*, आत्मसंयम *m*. S. REGISTERING आपणच मोजणारा -मापणारा -नोंदणारा, स्वयंलेखक. S. REALIZATION आत्मसाक्षात्कार *m*, स्वस्वरूपज्ञान *n*, आत्मानुभव *n*. S. SACRIFICE स्वार्थत्याग *m*, आत्मयज्ञ *m*. S. SAME तोच, ह्याच, अनन्य. S. SEARCHER आत्मदर्शी, आत्मान्वेषी. S. SEEKER स्वार्थनिष्ठ, स्वार्थपर, स्वार्थपरायण. S. SEEKING स्वार्थदृष्टीचा, स्वार्थाचा. S. SUFFICIENCY अहंमन्यता *f*, आपणच पुरते शहाणे आहों असें मानणें. S. SUFFICIENT अहंमन्य. S. SUPPORTING स्वाश्रयी. S. WILLED स्वच्छंदी, स्वेच्छाचारी, आपल्याच इच्छेनें वागणारा.]

Self'ish *a.* (of a person) **स्वार्थी, आपलपोट्या, आपमतलबी, आपस्वार्थी, गरजसाधु, स्वार्थदृष्टि, स्वार्थपरायण, स्वहितदृष्टि, स्वहितपरायण, स्वार्थनिष्ठ, आपलेंच हित पाहणारा.** २ (of actions) **स्वार्थबुद्धीचा, स्वार्थदृष्टीचा, आपलपोटेपणाचा.** Self'ishly *adv.* **स्वार्थदृष्टीनें, स्वार्थबुद्धीनें, आपलेंच हित पाहून.** Self'ishness *n.* **आपलपोटेपणा** *m*, **स्वार्थिपणा** *m*, **आपस्वार्थिपणा** *m*, **स्वार्थदृष्टि** *f*, **स्वार्थबुद्धि** *f*, **स्वहितबुद्धि** *f*.

Sell (sel) [A. S. *sellan*, to hand over.] *v. t. to dispose of for money or other consideration* **विकणें, विकत देणें, पैसा घेऊन देणें, मोलानें देणें, (जमीन वगैरे) फरोक्त करणें, बेचन देणें, ओपणें.** [To S. ONE'S LIFE DEARLY पुष्कळांना मारून आपण मरणें, पुष्कळांचे जीव घेऊन आपला जीव खर्ची घालणें. SELLING RACE (अधिक किंमत देणाराला जिंकणारा घोडा) विकण्याची शर्यत *f*. To S. OFF (कमी किंमतीला) विकून काढणें. To S. ONE UP (कर्ज फेडण्याकरितां -ची) मालमत्ता विकणें.] २ **विकणें, विक्रीकरितां ठेवणें;** as "Do you S. candles?" ३ *to betray for money* **(पैशाकरितां) विश्वासघातानें स्वाधीन करणें, गळा कापणें;** as, "To S. one's country." ४ *to prostitute for money or other considerations* **(पैशाकरितां) शरीरविक्रय** *m.* **करणें.** (b) **अनीतीचा व्यवहार करणें.** [To S. JUSTICE न्याय विकणें, न्यायविक्रय करणें. To S. ONE'S HONOUR अब्रू *f*. विकणें, मानविक्रय करणें. To S. ONE'S CHASTITY पातिव्रत्य विकणें.]

Sell *v. i.* **विकणें, खपणें, विकत जाणें;** as, "It will never S." [To S. OUT शेअर वगैरे विकणें.] २ **विक्री** *f*. **करणें.** Sold *pa. t.* and *pa. p.*

Sell'er *n.* **विकणारा** *m*, **विक्रेता** *m*, **विकत देणारा** *m*, **विक्या** (in *comp.* **लोणीविक्या**), **वाला (भाजीवाला).**

Sell'ing *pr. p.*

Selvage, Selvedge (sel'vāj) [Old Dutch *self*, self, and *egge*, edge.] *n. the self-edge or woven edge of cloth* **आंगचा कांठ** *m*, **विणलेली किनारी** *f*. २ *an edge formed of the fabric itself* **दशा** *f. pl.* ३ *edge-plate of lock with opening for the bolt* **(आंगची किंवा लावलेली) कडेची पट्टी** *f*.

Selves *n. pl.* of Self.

Semaphore (sem'a-fōr) [Gr. *sema*, a sign, and

*pherein*, to bear.] *n. a mast with pivoted arms, used in signalling* (रेलवे-लाइनीवरचा किंवा केबिन-मधील पेटींतला) सिग्नलाचा (हात असलेला) खांब.

Semblance (sem'blans) [Fr. *sembler* -L. *similis*, similar.] *n. likeness* सारखेपणा *m*, सादृश्य *n*, आभास *m*, भास *m*. २ *appearance, form* रूप *n*, डौल *m*, आकार *m*; as, "Bears the *semblance* of an angel and the heart of a devil." ३ (*philos.*) सरूपता *f*.

Semen (sē'-men) [L. *semen*, seed. -L. *serare*, to sow.] *n.* रेत *n*, वीर्य *n*, शुक्र *n*, बीज *n*. [TO EMIT S. (MAN OR BEAST) खरणें, खर लागणें.]

Semi (se'-mi) [L.] *prefix* अर्धा, अर्धसर, बराचसा.

Semi-anchylosis *n.* हाडांचे सांधे अर्धवट ताठ होणें *n*.

Semi-circle *n.* वृत्तार्ध, अर्धवर्तुल, अर्धवृत्त.

Semi-diameter *n.* व्यासार्ध *n*, त्रिज्या *f*.

Semi-diurnal arc *n.* दिनार्धचाप *m*.

Semi-diurnal motion *n.* अहोरात्रवृत्तार्धभ्रमण *n*.

Semi-logical fallacies मिश्रहेत्वाभास *m*.

Semi-lunar *a.* अर्धचंद्राकृति, अर्धचंद्राकार.

Semi'nal *a.* रेताचा, बीजाचा, बीजासंबंधीं. [S. FLUID धातु *f*, वीर्य *n*. S. VESICLE रेताशय *m*. S. FORCES प्रकृतिवीर्य *n*.]

Seminary (sem'in-ar-i) [L. *semenarium*, seed-plot -*semen*, seed.] *n.* रोपें वाढविण्याची जागा *f*, आवण तयार करण्याची जागा *f*, वाफा *m*. २ *a place of education* शाळा *f*.

Semina'tion *n. process of seeding* (स्वाभाविक) बीज-विकिरण (क्रिया).

Seminif'erous *a.* बीजवाही, रेतवाही, वीर्यवाही, रेतोवह.

Semiology, Semeiology (se-mi-ol'ō-ji) [Gr. *semeion*, a mark,+logy.] *n.* (निदानशास्त्रांतील) रोगलक्षण-प्रकरण *n*, रोगलक्षणपरीक्षा *f*.

Semi-paralysis *n.* अर्धांगवायु *m*.

Semi-sextile (aspect) (*astrol.*) तीस अंशांची (दृष्टि), वृत्तषष्ठांशार्ध (दृष्टि *f*).

Semi-square (aspect) (*astrol.*) पंचेचाळीस अंशांची (दृष्टि *f*), अर्धवर्तुलपाद (दृष्टि *f*).

Semitic (sem-it'ik) [From Shem (Genesis X. 21) *a.* सेमिटिक (भाषासंबंधाचा). [S. LANGUAGES सेमिटिक भाषांचा संघ *m*. या संघांत हिब्रू, अरेबिक, फिनिशन, वगैरे भाषा येतात.]

Semi-tone *n.* अर्धस्वर *m*, कोमल स्वर *m*.

Semi-transparent *a.* अर्धवट पारदर्शक, अर्धपारदर्शक.

Semi-unconscious *a.* अर्धवट बेशुद्ध.

Semi-vowel *n.* अर्धस्वर *m*; उदाहरण, w, y.

Sempiternal (sem-pi-ter'nal) [L. *sempiternus*-*semper*, ever, *aeternus*, eternal.] *a. everlasting* शाश्वतिक.

Semps'tress *n.* Same as Seamstress.

Senary (sen'ar-i) [L. *seni*, six.] *a.* षट्क्रमिक; as, "S. scale."

Senate (sen'āt) [L. *senatus -senex -senis*, an old man.] *n.* प्राचीन रोमन (लोकांतील) राज्यव्यवस्थाविषयक सभा *f.* (ह्या सभेकडे राज्यव्यवस्थेचें, कायदे करण्याचें व लोकांना न्याय देण्याचें हीं कामें असत). २ फ्रान्स आणि युनायटेड स्टेट्समधील पार्लमेंटाची वरिष्ठ सभा *f,* सीनेट *f.* ३ (generally) नियमनिर्माणक सभा *f,* कायदे करणारी सभा *f.* ४ (युनिव्हर्सिटीची) व्यवस्थापक सभा *f,* व्यवस्थापक मंडळ *n,* सीनेट *f.* S. house *n.* (युनिव्हर्सिटीचें) व्यवस्थापकसभागृह *n.*

Senator *n.* सीनेटचा सभासद *m,* सीनेटर *m.*

Senato'rial *a.* सीनेटरचा. (b) सीनेटचा. २ सीनेटरजोगा. (b) सीनेटजोगा.

Send (send) [A. S. *sendan*, to send.] *v. t.* पाठवणें, धाडणें, पाठवून -धाडून देणें. [To SEND WORD निरोप पाठविणें.] २ (with *away* or *off*) *to dismiss* घालवणें, वाटेला -वाटेस लावणें, हाकलून देणें, घालवून देणें. ३ (with *away*, as a visitor) निरोप देणें, पाठवणी *f-* बिदागी *f-* पाठवणूक *f-* करणें, रवानगी *f-* करणें. [GIFT ON SENDING AWAY बिदागी *f,* पाठवणी *f,* रवानगी *f.*] ४ (with *for*) *to request by message to come* बोलावणें, बोलवायास पाठवणें, बोलावणें पाठविणें. ५ (with *for, as a book*) *to request to be brought* आणवणें, मागवणें. ६ (with *out* or *forth*) (बाहेर) टाकणें, सोडणें, फेंकणें. ७ (*Bible*) पाठवणें, (भोगावयास) लावणें. Send *v. i.* (*Bible*) (दूत, निरोप्या) पाठवणें.

Send'er *n.* पाठवणारा *m,* धाडणारा *m.* २ (*teleg.*) प्रेषक *n.*

Send'ing *pr. p.* पाठवणारा, धाडणारा. S. *n.* पाठवणें *n,* धाडणें *n.* [S. INSTRUMENT (*teleg.*) प्रेषक.]

Send'-off *n.* (शुभचिंतनपूर्वक) पाठवणी *f.*

Senescence (sē-nes'ens) [L. *senescens, -entis pr. p.* of *senescere*, to grow old.] *n.* क्रमाक्रमानें वृद्ध किंवा जीर्ण होणें *n,* जीर्यमाणता *f.* २ क्रमाक्रमानें कुजत जाणें *n,* सडणें *n,* शीर्यमाणता *f.*

Senile (sē'-nīl) [L. *senilis -senex, senis*, old.] *a.* म्हातारपणाचा, उतारवयांतील, वार्धक्यविषयक, वृद्धावस्थेचा, वृद्धपणाचा, वार्धक्याचा; as, "S. garrulity, atrophy, &c." [S. GANGRENE म्हातारपणीं पायाला होणारें कोथभवन *n,* म्हातारपणीं पाय वगैरे सडण्याचा रोग *m.*]

Senil'ity *n.* वृद्धपणा *m,* म्हातारपणा *m,* वृद्धावस्था *f,* वार्धक्य *n.*

Senior (sēn'yor) [L. comparative of *senex*, old.] *a.* (opp. to junior) (वयानें) मोठा, वडील, ज्येष्ठ. (b) (मानानें किंवा अधिकारानें) मोठा, वरचा, वरिष्ठ, अगोदर नेमलेला, जुना (अंमलदार). (c) (विद्यार्थी) वरचा, आधींचा, अगोदरचा. [S. PARTNER (एखाद्या व्यापारी कंपनीचा) जुना भागीदार *m,* आधींचा पातीदार *m.* S. OPTIME केंब्रिज युनिव्हर्सिटींत गणिताच्या शाखेंत दुसऱ्या वर्गांत पास झालेला विद्यार्थी *m.* S. WRANGLER केंब्रिज युनिव्हर्सिटींत गणिताच्या शाखेंत पहिल्या वर्गांतील पहिल्या नंबरचा विद्यार्थी *m.* S. MEN (OPP. TO FRESHMEN) (वरच्या वर्गांतील) वरचे विद्यार्थी.]

Senior *n.* वडील मनुष्य *m.* २ (नोकरींतला) जुना मनुष्य *m.* ३ वरिष्ठ कामगार *m.* ४ (दर्जानें, मानानें, अनुभवानें) जुना *m*, वडील *m.* ५ आधींचा -अगोदरचा विद्यार्थी *m.*

Senior'ity *n.* वडीलपणा *m*, ज्येष्ठपणा *m.* २ जुनेपणा *m*, अगोदरचेपणा *m*, वरचेपणा *m*, पहिलेपणा *m.*

Senna ( sen'a ) [Fr. -Ar. *sena.*] *n.* सोनामुखी *f.* [BLUNT-LEAVED VARIETY OF S. आयरण, ऐरण.]

Senor ( se-nyōr' ) [Of Spanish origin.] *n. Mr., Sir, gentleman* शिनोर. Senores, Senors *n. pl.* Senora *n. fem.*

Sensation (sen-sā'shun) *n.* (ज्ञानेंद्रियांना होणारें) ज्ञान *n*, निर्विकल्पज्ञान *n.* [S. PERVERTED मिथ्या ज्ञान होणें.] २ चेतना *f*, जाणीव *f*, बोध *m*, भावना *f.* ३ (*philos.*) संवेदना *f*, संज्ञा *f.* ४ *a state of excited feeling* खळबळ *f*, क्षोभ *m*, संक्षोभ *m.* (b) गवगवा *m*, गडबड *f.*

Sensa'tional *a.* संवेदनेचा, निर्विकल्पज्ञानाचा. (b) संवेदनावाहक. (c) चेतनावाहक. २ खळबळ उडवून टाकणारा, संक्षोभजनक.

Sensa'tionalism *n.* संवेदनाप्रामाण्यवाद *m*, संवेदनावाद *m*, मनुष्याच्या सर्व कल्पना संवेदनाजन्य आहेत, स्वयंभू नाहींत, हा वाद *m.*

Sensa'tionalist *n.* संवेदनावादी *m.*

Sense ( sens ) [Fr. –L. *sensus -sentire*, to feel.] *n. principle or organ of percipience* इंद्रिय *n*, ज्ञानेंद्रिय *n*, इंद्रियशक्ति *f*, ज्ञानेंद्रियशक्ति *f.* [THE FIVE SENSES OR ORGANS OF SENSE (पंच ज्ञानेंद्रियें) ARE (१) त्वगिंद्रिय = THE S. OF TOUCH (२) चक्षुरिंद्रिय = THE S. OF SIGHT (३) श्रोत्रेंद्रिय = THE S. OF HEARING (४) रसनेंद्रिय = THE S. OF TASTE (५) घ्राणेंद्रिय THE S. OF SMELL. THE FIVE ORGANS OF ACTION पंच कर्मेंद्रियें ARE (१) वागिंद्रिय (२) हस्तेंद्रिय (३) पादेंद्रिय (४) गुदेंद्रिय (५) उपस्थेंद्रिय. SIXTH OR MUSCULAR S. पेशीगत संवेदनाशक्ति *f*, पेशीगत ज्ञानशक्ति *f*, स्नायुगत ज्ञानशक्ति *f*, स्नायुज्ञान *n.* OBJECT OF S. इंद्रियविषय *m*, इंद्रियार्थ *m.* THE OBJECTS OF S. शब्दादिविषय *m. pl.* DEAD TO THE OBJECTS OF S. विषयपराङ्मुख, जितेंद्रिय. PLEASURES OF S., SENSUAL PLEASURES विषयसुख *n*, इंद्रियसुख *n.* PERCEPTIBLE BY THE SENSES इंद्रियगोचर. EVIDENT TO THE S. प्रत्यक्षसिद्ध. RESTRAINING THE SENSES इंद्रियदमन *n*, इंद्रियनिग्रह *m.*] २ (*pl.*) *person's sanity or ordinary state of mind* भान *n*, अक्कल *f*, शुद्ध *f.* [RESTORED TO ONE'S SENSES शुद्धीवर आलेला, ताळ्यावर आलेला. TO BE ON ONE'S SENSES OR IN ONE'S RIGHT MIND शुद्धीवर असणें, देहावर असणें. TO COME TO ONE'S SENSES शुद्धीवर येणें, देहावर -ध्यानावर -स्थितीवर येणें. TO LOSE ONE'S SENSES अक्कल जाणें, वेड लागणें, चळणें, वेडावणें, वेडाळणें, वेडगळणें, पिसाटणें, पिसाळणें.] ३ *sense-perception* इंद्रियद्वारा मिळालेलें ज्ञान *n*, इंद्रियज्ञान *n.* [ERRORS OF THE SENSES इंद्रियद्वारा मिळालेल्या ज्ञानांत

शालेली चूक *f.* ] ४ *keen or accurate appreciation of* **बुद्धि** *f*, **समज** *m*, **उमज** *m*, **जाणीव** *f*, **जाणण्याची शक्ति** *f*, **समजण्याची शक्ति** *f*. [S. OF DUTY कर्तव्याची जाणीव *f*. S. OF GRATITUDE कृतज्ञताबुद्धि *f*. S. OF HONOUR मानसन्मानाची कल्पना *f*. AESTHETIC S. कृत्रिमसौंदर्यबुद्धि *f*. MORAL S. नीतिबुद्धि *f*. RELIGIOUS S. धर्मबुद्धि *f*. ] ५ *practical wisdom* **व्यावहारिक ज्ञान** *n*, **अक्कल** *f*, **शहाणपणा** *m*, **वकूब** *m*, **समज** *m*, loosely **बुद्धि** *f*. [COMMON S. व्यवहारज्ञान *n*. MAN OF S. व्यवहारज्ञ (मनुष्य) *m*, चतुर *m*. TO TALK S. शहाण्यासारखें बोलणें, शहाणपणानें बोलणें. ] ६ *reasonable meaning* **हांशील** *n*, **जीव** *m*, **ऐवज** *m*, loosely **अर्थ** *m*. ७ *signification* **अर्थ** *m*. [IT DOES NOT MAKE S. त्याचा कांहीं अर्थ होत नाहीं, त्याच्यापासून कांहीं बोध होत नाहीं. IN THE FIGURATIVE S. अलंकारिक अर्थानें. IN THE LEGAL S. कायद्याच्या दृष्टीनें. IN THE LIMITED S. संकुचित अर्थानें, विवक्षित अर्थानें. IN THE LITERAL S. शब्दशः, शब्दार्थानें. IN THE METAPHORICAL S. लाक्षणिक अर्थानें. IN THE MORAL S. नीतिदृष्टया. IN THE STRICT S. सरळ अर्थानें, उजू अर्थानें. IN VAGUE S. सरासरी अर्थानें, ठोकळ अर्थानें, स्थूलार्थानें. IN EVERY S. कोणत्याहि अर्थानें -दृष्टीनें. ] ८ *prevailing sentiment among a number of people* **मत** *n*, **विचार** *m*, **वाटणें** *n*, **अभिप्राय** *m*; as, "S. of the meeting."

**Sense-capsule** *n.* **ज्ञानेंद्रियविवर** *n.* ( smell, sight, and hearing.)

**Sense-cell** *n.* **ज्ञानपेशी** *f*, **ज्ञानगोलक** *m*, **ज्ञानपिंड** *m*.

**Sense-centre** *n.* **ज्ञानकेंद्र** *n.*

**Sense'less** *a. foolish, unwise* ( of persons ) **मूर्ख, बेअकली, अक्कलशून्य, गाढव, असमंजस, निर्बुद्ध.** २ *unreasonable* ( action ) **मूर्खपणाचा, बेवकुबीचा, वेडेपणाचा, अज्ञानाचा, असमंजस,. युक्तिविरुद्ध, अयुक्त.** ३ *unconscious, without sensibility or feeling* **निश्चेष्ट, बेशुद्ध, धुंद, गुंग, निश्चेत, निपचित, निपचेत.** ४ *unmeaning* **निरर्थक, अर्थशून्य.**

**Sense'lessness** *n.* **मूर्खपणा** *m*. २ **असमंजसपणा** *m*, **वेडेपणा** *m*, **युक्तिविरुद्धता** *f*, **अयुक्तता** *f*.

**Sense-organ** *n.* **ज्ञानेंद्रिय** *n.*

**Sensibil'ity** *n.* **ज्ञानग्रहणशक्ति** *f*, **ज्ञानशक्ति** *f*. (b) **संवेदना** *f*. २ **(मनाचा) कोंवळेपणा** *m*, **नाजूकपणा** *m*, **कोमलता** *f*. ३ (R.) **सूक्ष्मभेदग्राहिता** *f*.

**Se'nsible** *a. perceptible by the senses* **समजायाजोगा, इंद्रियगोचर, इंद्रियगम्य, इंद्रियग्राह्य**; as, "S. phenomena." २ *appreciable* **ठळक, व्यक्त, दिसण्यासारखा**; as, "S. difference." (b) **भासणारा, भासमान.** [S. HEAT भासमान उष्णता *f*.] (c) **गोचर, दृश्य**; as, "S. pores." ३ *not unmindful of* **सावध, जाणणारा, स्मरणारा, जाणता, जाणीव असणारा, ज्ञान असणारा**; as, "S. of one's kindness." ४ (of persons) *judicious, reasonable* **समजूतदार, समजदार, समंजस, सुजाण, सुज्ञ**; as, ". man." ५ ( of flesh ) *not callous* **गोडा.** ६

*quickly sensible of pain* दुखरा, गोडा, कोंवळा, कोमल, नाजूक. ७ (of things) सयुक्तिक, शहाणपणाचा, युक्त, समजूतदारीचा, सुज्ञपणाचा; as, "S. compromise." ८ *possessing one's senses* सावध, हुषार, भान असलेला. ९ *capable of receiving impressions* जाणता, विषयग्रहणक्षम, इंद्रियविषयग्राही.

Sen'sibleness *n.* इंद्रियगोचरता *f.* २ ठळकपणा *m*, जाणीव *f*, जाणतेपणा *m.* ४ समजूतदारपणा *m*, समंजसपणा *m*, सुज्ञता *f.* ५ गोडेपणा *m.* ६ दुखरेपणा *m*, नाजूकपणा *m*, कोंवळेपणा *m*, कोमलता *f*; as, "Sense and Sensibility." ७ शहाणपणा *m*, समजूतदारपणा *m*, युक्तता *f.* ८ सावधपणा *m*, हुषारपणा *m*, भान *n*, शुद्धि *f.* ९ स्पर्शज्ञान *n*, संवेदनाशक्ति *f*, चेतना *f.*

Sen'sibly *adv.* समजायाजोगा, समजायासारखा, कळायाजोगा, ध्यानांत यायाजोगा. २ समंजसपणानें, शहाणपणानें, सुज्ञतेनें, शहाण्यासारखा, चांगलें, सुज्ञतापूर्वक.

Sen'sitive *a. having sense or feeling, capable of receiving impressions from external objects* विषयग्रहणक्षम, संज्ञाग्राहक, ज्ञानग्राहक, सचेतन, इंद्रियज्ञानविशिष्ट, संवेदक. २ *highly susceptible* कोंवळ्या मनाचा, कोमलहृदय, हळवा, कोंवळ्या अंतःकरणाचा. ३ ( *phys.* ) सूक्ष्मभेदग्राही; as, "S. thermometer; S. scales." (b) ( *chem.* and *photo.* ) शीघ्रग्राही, सुग्राही, सचेतन, प्रतिमाग्राहक. [ S. PAPER (औषधें लावून केलेला) प्रतिमाग्राहक कागद *m.*] ४ *depending on sensation* इंद्रियज्ञानाचा, संवेदनावलंबी; as, "S. motions." ५ *liable to quick changes of price* लवकर तेजीमंदी होणारा; as, "S. market."

Sen'sitiveness *n.* संवेदना (शक्ति) *f.* २ हळवेपणा *m.*

Sen'sitivity *n.* ( *chem.* and *photo.* ) प्रतिमाग्राहकता *f.* २ संविदिष्णुता *f*, ( perhaps the best word for Sensitivity in Biology).

Sen'sitize *v. t.* ( *photo.* ) ( औषधें लावून प्रकाशलेखाचा कागद किंवा काचपट ) सचेतन करणें, शीघ्रग्राही करणें, प्रतिमाग्राहक करणें.

Sen'sitizer *n.* ( *photo.* ) सचेतन करणारें औषध *n*, प्रतिमाग्राहक करणारें औषध *n.*

Senso'rial, Same as Sensory.

Sensorium ( sen-sō'ri-um ) [L. *sentire, sensum*, to discern.] *n.* ज्ञानाचें स्थान *n*, संवेदनाःस्थान *n*, ज्ञानतंतुपीठ *n.*

Sen'sory *a. of the sensorium* ज्ञानाचे स्थानाचा. २ *of sensation* संवेदनेचा, ज्ञानवाहक, संज्ञावाहक, ज्ञान नेणारा, बोधक. [S. NERVES संज्ञावाहकतंतु, ज्ञानवाहकतंतु.] ३ *of the senses* ज्ञानेंद्रियांचा.

Sensory-motor *a.* गतिसंज्ञावाहक.

Sen'sual *a.* इंद्रियाचा, इंद्रियजन्य. २ विषयासक्त, विषयलोलुप, विषयलंपट, कामी.

Sen'sualise *v. t.* विषयासक्त करणें, विषयलंपट करणें.

Sen'sualism *n.* विषयासक्ति. २ संवेदनाप्राधान्यवाद *m*, संवेदनावाद *m.* ३ भोगप्राधान्यवाद *m*, भोगवाद *m.*

Sen'sualist *n.* विषयासक्त, भोगासक्त, विषयलोलुप. २ संवेदनावादी *m.* ३ भोगवादी *m.*

Sensual'ity *n.* विषयलोलुपता *f*, विषयासक्ति *f.*

Sen'suous इंद्रियांचा, इंद्रियगत. २ इंद्रियविषयांचा, इंद्रियविषयगत.

Sentence ( sen'-tens ) [L. *sententia*, opinion.] *n.* वाक्य *n.* २ (law) *judgment* शिक्षा *f*, शिक्षेचा हुकूम *m.* S. *v. t.* शिक्षा सांगणें, शिक्षा देणें. Sen'tenced *pa. t.* and *pa. p.* Sen'tencing *pr. p.*

Senten'tious *a.* म्हणींचा, न्यायवचनें असलेला. २ थोडक्यांत सांगितलेला, सूत्रबद्ध. ३ *affected in style* शब्दावडंबराचा, शब्दविस्ताराचा.

Sen'tience *n.* ज्ञानग्रहणक्षमता *f.* २ ज्ञानविशिष्टता *f.* ३ ज्ञानवाहकता *f.*

Sentient ( sen'shi-ent ) [L. *sentire*, to feel.] *a. having the power of sense-perception* ज्ञानग्रहणक्षम. २ ज्ञानविशिष्ट. ३ ( *physiol.* ) संज्ञावाहक, ज्ञानवाहक; as, "S. nerves."

Sentiment ( sen'ti-ment ) [L. *sentio*, I feel.] *n. feeling* भावना *f*, कल्पना *f*, भाव *m*, मनोविकार *m*, मनोधर्म *m*, मनोवृत्ति *f*, (मनाची) समजूत *f*, (जिवाची) समजूत *f.* २ *opinion* अभिप्राय *m*, मत *n.* ३ *an inclination to be emotional or romantic* ( *esp.* to excess) ( नाजूक ) मनोविकार *m. pl.*, हळवें मन *n.* ४ *passion* भाव *m*, रस *m.* These are eight: शृंगार, हास्य, करुण, रौद्र, विस्मय, बीभत्स, वीर, भयानक. To these eight, three more are added, namely शांत, वात्सल्य and भक्ति.

*N. B.*—Sometimes the following restriction is observed: भावना = feeling; उच्चतम भावना = Sentiment.

Sentiment'al *a.* भावनेचा, कल्पनेचा, मनोविकाराचा. २ हळव्या मनाचा, नाजूक मनोवृत्तीचा ( person ). ३ रसप्रधान, रसात्मक. ४ केवळ भावनेंतच असणारा, भावनात्मक, काल्पनिक. Sentimen'tally *adv.* भावनेनें. २ हळव्या मनानें.

Sentiment'alism, Sentimental'ity *n.* भावनात्मकता *f*, भावना *f.* २ भावनेचा उत्कर्ष *m*, प्रबळ मनोधर्म *m*, प्रबळ मनोविकार *m.* ३ हळवें मन *n*, नाजूक मनोवृत्ति *f.*

Sentiment'alist *n.* हळव्या मनाचा, नाजूक मनोवृत्तीचा, भावनेनें वाहून जाणारा *m.*

Sentinel (sen'ti-nel) [Fr. *sentinelle*—It. *sentinella*, a watch.] *n. a watch* पहारेकरी *m*, चौकीदार *m*, संत्री *m.* [DISPOSITION OF S.s पहारेबंदी *f.*]

Sen'try *n.* Same as Sentinel.

Sen'try-box *n.* संत्र्याची ( उभें राहण्याची ) खुंगी *f.*

Sepal ( sep'al ) [ Fr. *sepale* –L. *separ*, separate.] *n.* पुष्पाच्या बाह्यकोशाचें दल *n*, पुष्पबाह्यदल *n*, बाह्यदल *n*, बहिर्दल *n.*

Sep'aloid *a.* बाह्यदलासारखा, बहिर्दलासारखा, हिरवा, हरित.

Sep'alous *n.* बहिर्दलाचा, बाह्यदलाचा. २ बाह्यदलें असलेला, बहिर्दलें असलेला.

Sep'arable *a.* निराळा करण्यासारखा, वेगळा करण्यासारखा, भेद्य, विभाज्य. [S. ACCIDENT भेद्य उपाधि.] Sep'arableness, Separabil'ity *n.* निराळें करतां येण्याची स्थिति, भेद्यता, भेदनीयता. Sep'arably *adv.*

Separate ( sep'-a-rāt ) [L. *separare*, to separate.] *v. t. to disunite, to divide* निराळा करणें, वेगळा करणें, पृथक् -भिन्न -विभक्त -वियुक्त करणें, फूट *f* -तूट *f* -भेद *m* -वियोग *m.* करणें *g. of o.*, संबंध तोडणें -मोडणें *g. of o.*; as, "From the fine gold, I *separate* the alloy." २ *to come between, to lie between* मध्यें येणें, मध्यें येऊन वेगळा निराळा करणें; as, "The Mediterranean Sea *separates* Europe and Africa." ३ *to set apart* निराळा काढणें, निराळा -वेगळा -बाजूस ठेवणें. Sep'arate *v. i. to part, to become disunited* वेगळा होणें, निराळा होणें, तुटणें, सुटणें, फाटणें, तूट *f* वियोग *m* -भेद *m.* होणें *g. of s.*, दुरावणें, विभक्त होणें.

Sep'arated *pa. t.* S. *pa. p.* निराळा केलेला. २ विरही, अन्तरित.

Sep'arate *a. physically disconnected* निराळा, वेगळा, सुटा, जुदा, अलग, अलाहिदा, विभक्त. २ *distinct* भिन्न, निराळा, स्वतंत्र, पृथक्. [SEPARATE ESTATE स्त्रीधन *n.* S. MAINTENANCE नवऱ्यानें आपखुषीनें बायकोला दिलेली पोटगी.]

Sep'arately *adv.* निरनिराळेपणानें, वेगळा *decl.* निराळा -वेगवेगळाला *decl.* Sep'arateness *n.* निराळेपणा *m*, वेगळेपणा *m*, पृथक्त्व *n*, भिन्नता *f*, विभक्तता *f.* २ भेद *m*, फरक *m.* [SENSE OF S. भेदबुद्धि *f*, भेदभाव *m.*]

Sep'arating *pr. p.* S. *a.* निराळा करणारा, वेगळा करणारा.

Separa'tion *n.* (*act.*) निराळा करणें *n*, वेगळा करणें *n*, फोडणें *n*, फोड *f*, भेद *m*, वियोजन *n.* (b) ( state ) वेगळीक *f*, भेद *m*, तूट *f*, फूट *f*, फाटाफूट *f.* ( c ) विभक्तपणा *m.* २ ( *chem.* ) ( *specif.*) पृथक्करण *n.* ३ दांपत्यसंबंध नष्ट झालेल्या नवराबायकोचा विभक्तपणा *m.* [JUDICIAL S. कोर्टाचे हुकमावरून नवराबायकोमधील दांपत्यसंबंध तुटला तरी त्यांस त्यांच्या हयातींत लग्न करूं न देणें.] ४ ( of lovers, friends ) विरह *m*, वियोग *m*, विघड *m*, विश्लेष *m.* [VIOLENT AND PAINFUL S. तुटातूट *f.*]

Sep'aratism *n.* विभक्ततावाद *m.*

Sep'aratist *n.* (पूर्वींच्या धर्मपंथांतून) फुटणारा *m*, वेगळा पडणारा *m*, विभक्ततावादी *m.*

Sep'arator *n.* निराळा करणारा *m*, वेगळा करणारा *m.* २ पृथक्कारी यंत्र *n.*

Sepia ( sēpi-a ) [L. -Gr. *sepia*, the cuttle fish.] *n.* फोटो छापण्याची सीपिया रंगासी शाई.

Sepsis ( sep'sis ) [Gr. *sepsis*, putrefaction.] *n.* रोगविष रक्तांत शिरून पू होणें *n*, पूयीभवन *n.*

September (sep-tem'bėr) [L. *septum*, seven, *ber* = *fer*, Sk. भृ, to carry. It was the seventh month

of the old Roman year which began in March.] *n.* सेपटेंबर, सपटंबर (महिना). (बहुतकरून भाद्रपद व आश्विन महिन्यांत हा येतो).

Septenary (sep'ten-ar-i) [L. *septem*, Sk. सप्तन् seven.] *a. consisting of seven* सप्तसंख्याक (अंकनपद्धति), सप्त (in *comp.*) [S. SCALE सप्तक्रम *m.*] २ *lasting for seven years* सात वर्षें टिकणारा, सप्तवार्षिक.

Sep'tenate *a.* (*bot.*) *having seven parts* सप्तदल (पर्ण), सात दलें असलेला.

Septen'nate *n.* सात वर्षांचा काल *m.*

Septennial (sep-ten'yal) [L. *septum*, Sk. सप्तन् seven, and *annus*, a year.] *a. lasting seven years* सात वर्षें चालणारा, सप्तवार्षिक; as, "S. Parliament." २ सात वर्षांनीं होणारा, सप्तवार्षिक; as, "S. elections."

Septic (sep'tik) [Gr. *septikos*, putrefying.] *a.* पूययुक्त, कुजलेला. २ कुजवणारा, सडवणारा.

Sep'tical, Same as Septic.

Septicæ'mia *n.* पूतिज्वर *m*, पूयजन्य ज्वर *m*, रोगजंतू शरीरांत शिरल्यामुळें ज्वर येणें *n.*

Sep'ticidal *a.* (*bot.*) भित्तिच्छेदक. (भित्ति=Septum.)

Septif'ragal *a.* (*bot.*) भित्तिवियोजक; as, "S. valves of a pod." (भित्ति=Septum.)

Septuagenarian (sep-tū-aj-e-nā'ri-an) [L. *septuagenarius -septuageni*, seventy each *-septem*, seven.] *n.* सत्तर वर्षांचा म्हातारा *m.*

Septuagesima (sep-tu-a-jes'i-ma) [L. *septuagesimus -septem*, seven.] *n.* लेन्ट सणाच्या पूर्वींचा तिसरा आदित्यवार *m.*

Septuagint (sep'tū-a-jint) [L. *septuaginta*, seventy.] *n.* बहात्तर विद्वानांनीं केलेलें जुन्या कराराचें ग्रीक भाषांतर *n*, ग्रीक जुना करार. हें भाषांतर इ. स. पूर्वी ३०० वर्षें करण्यांत आलें होतें.

Septum (sep'tum) [L. *septum -sepire*, to enclose.] *n.* (*anat.*) *a partition separating two cavities* नासापटल *n*, नाकांतील पडदा *m.* २ (*bot.*) भित्ति *f*, पडदा *m.* [TRUE S. खरा पडदा *m.* FALSE S. खोटा पडदा *m.*] Septa *n. pl.*

Sepulchre (sep'ul-kėr) [Fr. –L. *sepulchrum -sepelire, sepultum*, to bury.] *n.* थडगें *n*, समाधि, कबर *f*, शवमंदिर *n.* [A WHITED S. ढोंगी *m*, दांभिक *m.* THE HOLY S. (जेरुसेलम येथील) ख्रिस्ताची कबर *f.*]

Sepulture (sep'ul-tūr) [L. *sepultus*, to bury.] *n.* (प्रेत) पुरणें *n*, मूठमाती *f.* २ (प्रेत) पुरण्याची जागा *f.*

Sequel (sē'kwel) [Fr. –L. *sequela -sequor*, Gr. *hepomai*, to follow.] *n. that which follows* उत्तरभाग *m*, उत्तरार्ध *m*; शेषभाग *m.* २ *consequence* परिणाम *m*, शेवट *m*, अंत *m.*

Sequela (sē-kwē'la) [L. *sequela.*] *n.* एका रोगामुळें उद्भवणारा दुसरा रोग *m*, परिणामभूतरोग *m*; as, "Heart disease is one of the sequelae of rheumatic fever." Sequelae *n. pl.*

Sequence (sē'kwens) [L. *sequor*, to follow.] *n. an order of succession* अनुक्रम *m*, क्रम *m*. २ आनुपूर्व्य *n*, अन्वय *m*. [S. OF TENSES (*gram.*) काळांचें आनुपूर्व्य *n*.] ३ परिणाम *m*, शेवट *m*. Se'quent *a*. क्रमाचा. २ परिणामभूत. Sequen'tial *a*. क्रमाचा, अनुक्रमाचा.

Sequester (se-kwe'stėr) [Fr. –L. *sequester*, a trustee.] *v. t. to separate* वेगळा करणें, निराळा करणें. २ (*law*) *to confiscate* जप्त करणें. ३ *to put* (*disputed property*) *for a time into the possession of a person not involved in the dispute* (वादांतील मालमत्ता) तिऱ्हाइताच्या स्वाधीन करणें. ४ *to withdraw* (*oneself*) *from society* एकांतवास *m*. करणें. [To S. ONESELF एकांतवास करणें.] S. *v. i.* (of a widow) *to disclaim further concern with her late husband's property* (विधवेनें) पहिल्या नवऱ्याच्या मालमत्तेवरील हक्क सोडणें. S. *n*. (वादांतील मालमत्ता ज्यापाशीं ठेवतात तो) तिऱ्हाईत *m*, मध्यस्थ *m*. Seque'stered *a. retired, secluded* एकांतवासाचा, आडवळणी, आडवळणाचा, विविक्त. २ जप्त केलेला. ३ वेगळा ठेवलेला, निराळा ठेवलेला.

Seques'trate *v. t.* जप्त करणें, कबजा घेणें.

Sequestra'tion *n*. जप्त करणें *n*, जप्ती *f*, कबजा *m*. [S. BEFORE JUDGMENT कच्ची जप्ती *f*.] २ *seclusion from society* एकांतवास *m*.

Sequestra'tor *n*. जप्त करणारा *m*, कबजांत घेणारा.

Sequestrum (sē-kwes'trum) [L. *sequester*, a depositary.] *n*. हाडाचा कुजलेला किंवा सडलेला लोंबता तुकडा *m*. हा हाडाच्या चांगल्या भागापासून सुटा झालेला असतो.

Seraglio (se-ral'yō) [It. *serraglio* -Low L. *serrare*, to lock up –L. *sera*, a door-bar.] *n*. जनानखाना *m*, अन्त:पुर *n*, शुद्धान्त:. [ROYAL S. राणिवसा *m*.]

Seraph (ser'af) [Heb. lit. 'a prince of heaven.' akin to *sar*, a prince.] *n*. (पहिल्या प्रतीचा) देवदूत *m*. Seraphs, Seraphim *n. pl.*

Serenade (ser-e-nād') [Fr. –It. L. *serenus*, clear.] *n*. संध्याकाळचें गीत *n*, (वाद्याबरोबर किंवा वाद्याशिवाय म्हणण्याचें) संध्याकाळचें संगीत *n*. हें गीत विवाहेच्छू तरुण आपल्या प्रीतिपात्राकरितां म्हणतो.

Serene (se-rēn') [L. *serenus*, clear.] *a*. (of sky) *cloudless* निरभ्र, नितळ, स्वच्छ, निवळ. २ (of weather) *fair* स्वच्छ, विनधुक्याची. ३ (of sea) *unruffled* शांत, संथ, निश्चल. ४ (of temper, look, life) *placid, tranquil* शांत, प्रसन्न.

Serene'ly *adv*. स्वच्छतेनें. २ शांततेनें.

Seren'ity, Serene'ness *n*. निरभ्रता *f*, निवळपणा *m*. २ संथपणा *m*, निश्चलता *f*. ३ शांतता *f*, शांति *f*, प्रसन्नता *f*.

Serf (serf) [Fr. –L. *servus*, a slave.] *n*. (शेतकी करणारा) गुलाम *m*, दास *m*. Serf'dom *n*. गुलामगिरी *f*, दास्य *n*.

**Serge** ( sėrj ) [ Fr. -L. *serica*, silk -*Seres*, the Chinese.] *n.* सर्ज (कापड).

**Sergeant, Serjeant** ( sär′jent ) [Fr. *sergent* -L. *serviens*, -*entis* *pr. p.* of *servire*, to serve.] *n.* सार्जंट *m*, कार्पोरलच्या वरचा बिनसनदी अधिकारी. हा बराकींतल्या सोजरांवर देखरेख ठेवतो. २ (पोलिसांतील) सार्जंट *m*.

**Serial** ( sē′ri-al ) *a.* क्रमाचा, क्रमिक. [ S. NUMBER क्रमांक. ] २ क्रमानें प्रसिद्ध होणारा, क्रमिक. S. *n.* क्रमिक गोष्ट *f*, क्रमिक कादंबरी *f*. २ क्रमिक पुस्तक *n*.

**Se′rially** *adv.* क्रमानें, क्रमशः. २ रांगांत, ओळींत.

**Se′riate** *a.* क्रमांत बसविलेला, निरनिराळ्या रांगांत बसविलेला. S. *v. t.* क्रमांत बसविणें, क्रम लावणें.

**Series** ( sē′ri-ēz ) [L. *serere*, to join together.] *n. sing.* and *pl.* माळा *f*, माला *f*, मालिका *f*, माळका *f*, क्रम *m*, हार *f*, शेज *f*, सांखळी *f*, शृंखला *f*, आवली *f*, परंपरा *f*. [SUM OF THE S. (*math.*) सर्वधन *n*.] २ (*math.*) श्रेढी *f*, श्रेणि *f*. ३ (*biol.*) श्रेणि *f*.

**Serious** ( sē′ri-us ) [L. *serius*, grave ?] *a.* गंभीर, गंभीरवृत्ति, बिनथट्टेचा, खरोखर. २ *important* मोठा, भारी, भारदस्तीचा. ३ *attended with danger* जोखमाचा, भयाचा. ४ (*theol.*) पारलौकिक, पारमार्थिक; as, "S. subjects." Se′riously *adv.* गंभीरपणानें, खरोखर, थट्टेवांचून, न हंसतां.

**Se′riousness** *n.* गांभीर्य *n*, गंभीरपणा *m*, गंभीरता *f*. २ गंभीर स्वभाव *m*. ३ खरेपणा *m*, विनोदाभाव *m*. ४ मोठेपणा *m*, भारीपणा *m*.

**Sermon** ( sėr′mun ) [L. *sermo*, *sermonis* *serere*, to bind together, to compose.] *n. a religious discourse* (*usu.* based on a text of Scripture) उपदेश *m*, धर्मोपदेश *m*. [LAY S. (चर्चशिवाय) खासगी ठिकाणीं केलेला धर्मोपदेश *m*. ] २ *moral reflection suggested by natural objects* नीत्युपदेश *m*, उपदेश *m*, धडा *m*; as, "Sermons in stones". ३ *a serious or reproving address* कानउघाडणी *f*, उपदेश ( used ironically ). S. *v. t. to administer sermon to* (कानउघाडणीचा) उपदेश करणें.

**Ser′monize** *v. t. to preach to* (-ला) धर्मोपदेश करणें. २ (-ला) नीत्युपदेश करणें. ३ *to reprove* (-ची) कानउघाडणी *f*. करणें.

**Serous** ( sē′rus ) [See Serum.] *a. of or pertaining to serum* रक्तजलाचा, रक्तांतील जलाचा, रक्तद्रवाचा, रक्तरसाचा. [S. MEMBRANE रक्तजलत्वचा *f*. S. GLAND रक्तजलविमोचन करणारा ग्रंथि *m*, रक्तजलविमोचक ग्रंथि *m*, रसविमोचक ग्रंथि *m*, रसविमोचक पिंड *m*.] २ *like serum* रक्तजलासारखा, रसासारखा.

**Serpent** ( sėr′pent ) [ L. *serpens*,-*entis*, *pr. p.* of *serpere*, to creep.] *n.* साप *m*, सर्प *m*, किरडूं *n*, सिवाणूं *n*, उरग *m*, नाग *m*. २ *a treacherous person* (सापासारखा) विश्वासघातकी मनुष्य *m*, सर्प (*fig.*) *m*. ३ (*astron.*) भुजंग *f*. ही राशि भुजगधारीच्या पूर्वपश्चिम बाजूस आहे.

Serpenta'rius *n.* ( *astron.* ) भुजगधारी राशि.

Serpent-bearer *n.* ( *astron.* ) भुजगधारी राशि.

Serpent-charmer *n.* सापाचा मंत्री *m*, गारुडी *m*.

Serpent-charming *n.* सर्पमंत्रविद्या *f*, गारुड्याची विद्या *f*, गारुड *n*, मदारीपणा *m*.

Serpe'ntiform *a.* सापाच्या आकाराचा, सर्पाकृति.

Ser'pentine *a.* सापाचा, सर्पाचा, सर्पविषयक. २ नागमोडीचा, नागमोडी, सर्पगतिवत्, सर्पगत्यात्मक. [S. MOTION वळवळ *f*.]

Serpig'inous *a.* ( *med.* ) चरत जाणारा, पसरत जाणारा (नायटा, वगैरे).

Serrate, Serrated ( ser'rāt, -ed ) [L. *serratus,-serra*, a saw.] *a.* ( *bot.* ) करवतीच्या दांत्यासारखा, क्रकचदंताकार; उ० गुलाबाचें किंवा केवड्याचें पान. दांत्यांचीं टोंकें पुढच्या अंगास वळलेलीं असतात. हीं टोंकें मागच्या अंगास वळलेलीं असलीं तर त्या पानाला Retro-serrate असें म्हणतात. ( क्रकच Saw ). २ ( *anat.* and *zool.* ) क्रकचदंताकार.

Serration *n.* ( *archit.* ) दंतुरता *f*.

Serrulate ( ser'u-lāt ) [L. *serrula*, a little saw.] *a.* ( *bot.* ) सूक्ष्मक्रकचदंताकार. [ क्रकच = Saw. ]

Serum ( sē'rum ) [L. *serum*, whey.] *n.* रक्त थिजल्यावर त्यांतून सुटें होणारें पाणी *n*, रक्तजल *n*, रक्तरस *m*. २ (रोगप्रतिबंधक) रस *m*, लसिका *f*, loosely लस *f*. ३ दह्याला सुटलेलें पाणी *n*.

*N. B.*—Serum is nowadays translated by रोगप्रतिबंधक रस or inaccurately by लस. *Cf* देवीची लस टोंचणें, (प्लेग न होऊं देण्याकरितां) प्लेगची लस टोंचणें.

Serum Therapy, Serum Therapeutics *n.* रक्तजलानें रोग बरे करण्याची विद्या, रक्तजलोपचार *m*, रक्तजल चिकित्सा *f*. जनावराच्या शरीरांत एखाद्या रोगाचें बीज घालून त्याच्या (जनावराच्या) अंगांत रोगहारकशक्ति उत्पन्न झाली म्हणजे त्याच्या रक्ताचा प्रवाही भाग काढून तो रोगी मनुष्य किंवा जनावर यांच्या अंगांत टोंचून घालून रोग बरा करण्याची विद्या *f*.

Servant ( serv'ant ) [Fr. –L. *servire*, to serve.] *n.* नोकर *m*, चाकर *m*, सेवक *m*, (old word) शागीर्द, भृत्य *m*, दास *m*, किंकर *m*, परिचारक *m*, अनुचर *m*. (b) ( in some Hindu temples ) सेवेकरी *m*. (c) चाकरमानी *m*. [BY OR THROUGH SERVANTS नोकरांकडून, चाकराचाकरीं. RELATION BETWEEN S. AND MASTER सेव्यसेवकभाव *m*. SECOND OR INFERIOR S. पडचाकर *m*. SERVANTS ( COMPREH. ) नोकरचाकर *m. pl.*, चाकरमाणसें *n. pl.*, चाकरपेशा *m*, सेवकवर्ग *m*. S. OF SERVANTS दासानुदास *m*. S. WHO RECEIVES NO WAGES, BUT ONLY FOOD पोटावारी नोकर *m*, पोटबंदा *m*. TABLE S., WAITING S. वाढणारा *m*, वाढपी *m*, वाढप्या *m*. YOUR HUMBLE S. आपल्या पायांचा सेवक *m*, आपला नम्र सेवक *m*. PUBLIC SERVANTS सरकारी नोकर *m. pl.* CIVIL SERVANTS ( वरिष्ठ ) मुलकी ( नोकरींतील ) कामगार *m. pl.* OUTDOOR SERVANTS बाहेरकामाचे नोकर *m. pl.*;

जसें, घोडेवाला, माळी, वगैरे. INDOOR SERVANTS घरकामाचे नोकर *m. pl.*; जसें, आचारी, बुटलेर, मोलकरीण, वगैरे. DOMESTIC OR GENERAL SERVANT हरकाम्या नोकर *m*, पडकाम्या नोकर *m*. SERVANT'S HALL नोकरांची (जेवण्याची) खोली *f*. ] २ *a devoted follower* दास *m*, बंदा नोकर *m*, *pop.* गुलाम *m*.

Serve (sėrv) [Fr. –L. *servio*, I serve.] *v. t. to be servant to, to do service to* चाकरी *f*. करणें *g. of o.*, नोकरी *f*. करणें *g. of o.*, सेवा *f*. करणें *g. of o.*, (-कडे) नोकरीस -चाकरीस असणें, (च्या) नोकरींत असणें. [To S. TWO MASTERS (*fig.*) दोन दगडींवर पाय ठेवणें. ] (b) (*esp. God*) उपासना *f*. करणें *g. of o.*, पूजा *f* -अर्चा *f*. करणें, आराधना *f*. करणें, (ईश्वराला) भजणें, सेवा *f*. करणें. २ *to be useful to* (च्या) उपयोगीं पडणें, (च्या) कामास येणें; as, "Indiscretion sometimes *serves* us much." ३ *to suffice, to satisfy* निभावणें, गरज भागविणें *g. of o.*, पुरता होणें, पुरेसा होणें, बस-पुरा होणें; as, "That excuse will not *serve* you." ४ *to be instead of* (बद्दल) काम करणें, उपयोग होणें *g. of o.*, बद्दल कामास येणें; as, "To S. the purpose of." ५ (with up) (साहेबलोकांत वेटरनें खान्याचे वेळीं) निरनिराळ्या वशा देणें, वाढणें, घालणें; as, "To S. up dinner." [To SERVE WITH THE SAME SAUCE सूड उगविणें, जशास तसें करणें. ] ६ *to distribute* वांटणें, वांटून देणें, वांटणी *f* -वांटावांट *f*. करणें; as, "To S. ammunition, rations." ७ *to supply* (person *with*) देणें, पुरवणें, पुरवठा *m*. करणें; as, "Was *serving* the customer *with* stockings." ८ *to deliver* (*a writ*) (नोटीस) देणें, लागू करणें, बजावणें. ९ *to treat* वागविणें; as, "Has *served* me shamefully." १० (with *out*) *to requite* (शीं) जशास तसें वागणें, मोबदला *m* -फेड *f*. करणें, बदला *m*. घेणें; as, "Shall manage to *serve* him *out*." [To S. ONE'S APPRENTICESHIP उमेदवारी करणें, उमेदवारीची मुदत पुरी करणें. To S. A SENTENCE पूर्ण शिक्षा भोगणें. To S. ONE'S TIME नोकरी पुरी करणें. २ शिक्षा पुरी भोगणें. To S. TIME शिक्षा *f*. भोगणें. To S. BATTERY, GUN, ETC. तोफा डागीत राहणें. To S. (A MARE) (घोडा) दाखवणें, फळवणें. ]

Serve *v. i. to be a servant* चाकरी *f*. करणें, नोकरी *f*. करणें, चाकरी असणें *in. con.*, चाकर असणें; as "He *serves* in the army." २ *to be useful, to be suitable* कामास येणें, उपयोगास येणें, उपयोगीं पडणें, चालणें; as, "This will S." [As OCCASION SERVES वेळ पाहून. AS MEMORY SERVES आठवण होईल तेव्हां. As TIDE SERVES (भरतीचें किंवा ओहोटीचें) ताण पाहून. ]

Serve *n.* (*tennis*) पहिला टोला *m*. २ पाळी *f*, डाव *m*, खेळणी *f*; as, "Whose S. is this?"

Served *pa. t.* S. *pa. p.* चाकरी केलेला, सेवा केलेला, सेवित. २ आराधित, उपासित. ३ वाढलेला. ४ पुरवलेला, वांटलेला. ५ लागू केलेला. ६ वागविलेला.

Serv'er *n.* चाकरी करणारा, सेवा करणारा. २ आराधना-उपासना करणारा. ३ वाढणारा. ४ पुरवणारा, वाटणारा. ५ लागू करणारा. ६ वागविणारा. ७ ( *esp.* ) थाळा *m.*

Serv'ice *n.* (a) चाकरी *f*, नोकरी *f*. [S. EXACTED ( BY GOVERNMENT OR PERSON IN POWER ) WITHOUT REMUNERATION वेठ *f*, बिगार *f*, बेगार *f*.] (b) सेवा *f*, शुश्रूषा *f*, खिदमत *f*. (c) चाकरीचा पेशा *m*, नोकरीचा पेशा *m*, नोकरपेशा *m*, चाकरपेशा *m*. २ (a) ( सरकारी ) खातें *n*. (b) सरकारी नोकर *m. pl.* (c) सरकारी नोकरी *f*. [S.-BOOK नोकरीचें पुस्तक *n*. MILITARY S. लष्करी नोकरी *f*, शिपायगिरी *f*, शिपाईपेशा *m*. GRANT FOR MILITARY S. सरंजाम *m*. GRANT FOR PERSONAL S. जातसरंजाम *m*. ACTIVE S. मोहिमेवर जाणें *n*, युद्धावर जाणें *n*. २ मोहिमेवर गेलेले ह्पीसर *m. pl.* JUNIOR S. लष्कर *n*, लष्करी खातें *n*. SENIOR S. आरमार *n*, आरमारी खातें *n*. THE FIGHTING S.s, THE S.s युद्धखातें *n*, लष्कर आणि आरमार *n*. TO BE ON S., TO BE IN ACTIVE S. प्रत्यक्ष मोहिमेवर जाणें. TO SEE S. लढाईत काम करणें. THE PREVENTIVE S. मनाईखातें *n*. THE PROVINCIAL S. प्रांतिक ( सरकारची ) नोकरी *f*. THE IMPERIAL S. वरिष्ठ ( सरकारची ) नोकरी *f*.] ३ काम *n*, कामकाज *n*, सेवा *f*, आज्ञा *f*; as, "I am at your S." [ON HIS MAJESTY'S S. ( ABBREV. O. H. M. S. ) सरकारी कामाबद्दल. ON POSTAL S. पोस्टाच्या कामाबद्दल. S. STAMPS सरकारी ( पत्रव्यवहाराचीं ) तिकिटें *n. pl.* या तिकिटांवर O. H. M. S. किंवा SERVICE हीं अक्षरें छापलेलीं असतात. ] ४ जाये *f*, येजा *f*; रहदारी *f*. [PASSENGER S. उतारू गाड्यांची येजा *f*. LOCAL PASSENGER S. स्थानिक ( आसपासच्या ) गाड्यांची येजा *f*.] ५ *use, assistance* उपयोग *f*, मदत *f*, फायदा *m*; as, "Can I be of S. to you?" [S. PIPE ( मुख्य नळाचा घरांत आणलेला ) नळाचा वापरण्याचा फांटा *m*. S. RESERVOIR वापरण्याचा (पाण्याचा) खजिना *m*. S. WIRE ( मुख्य तारेचा ) तारेचें काम करण्याचा फांटा *m*.] ६ उपासना *f*. [S. BOOK साधारण प्रार्थनेचें पुस्तक *n*, सार्वजनिक प्रार्थनेचें पुस्तक *n*. ७ ( *law* ) बजावणें *n*, लागू करणें *n*, बजावणी *f*. ८ भांड्यांचा संच *m*; as, "Tea S." ९ वाढणें *n*, वाढप *n*, वाढण्याची तऱ्हा *f*. (b) खान्याच्या बशांचा क्रम *m*. १० ( tennis ) टोला *m*. (b) टोला मारण्याची पद्धति *f*. (c) पाळी *f*, डाव *m*, खेळणी *f*. (d) भिडूंची बाजू *f*. [S. LINE नेमरेषा *f*, ( टेनिसच्या फेंकीची) पहिली मर्यादा *f*.]

Serv'iceable *a. useful, profitable* उपयोगी, उपयोगाचा, कामाचा, कामास येण्यासारखा. २ टिकाऊ, मजबूत, बळकट.

Serv'iceableness *n.* उपयोगिपणा *m*, उपयुक्तता *f*.

Servile ( sërv'il ) [L. *servilis*-*servus*, a servant, a slave.] *a. slavish* गुलामगिरीचा, दास्याचा. (b) गुलामाचा, दासाचा. २ *cringing* खुषामती, आर्जवी, थुकी झेलणारा. (b) छंदानुरोधाचा, छंदानुवृत्तीचा. Serv'ilely *adv.* गुलामासारखा. २ आर्जवानें, खुषामतीनें, थुकी झेलून.

Servil'ity *n.* गुलामगिरी *f*, दास्य *n.* २ आर्जवीपणा *m*, आर्जव *n*, खुषामत *f*, छंदानुरोध *m*.

Serving *pr. p.* S. *v. n.* चाकरी करणें *n*, सेवा करणें *n*.

Serv'itor *n.* नोकर *m*, चाकर *m*, सेवक *m*.

Serv'itude *n. slavery* गुलामगिरी *f*, ताबेदारी *f*, दास्य *n.* २ (*law*) Same as easement, which see.

*N. B.*—Servitude and Easement are used indiscriminately by common law-writers.

Ses'ame, Same as Sesamum.

Ses'amoid *a.* तिळासारखा, तीलकाकृति.

Sesamum (ses'a-mum) [Gr.] *n.* तीळ *m.* [BLACK S. काळा तीळ *m.* WHITE S. पांढरा तीळ *m*, हवरा *m*, हौरी. S. OIL तिळेल.]

Sesqui-quadrate (seskwi-kwa-drāt) [L. *sesqui*, one and a half; *quatour*, four. cf. Sk. चतुर्.] सार्धचतुष्टय (दृष्टि), एकशें पस्तीस अंशांची (दृष्टि *f.*).

Sessile (ses'il) [L. *sessilis*, low –*sedere*, *sessum*, to sit.] *a.* (*bot.*) अवृन्त, बिनदेंठी, बैठें (पान); उ० कांटेधोत्र्याचें पान *n*, वेलबोंडोचें फूल, निशिगंधाचें फूल. २ (*zool.*) मान नसलेलें, अग्रीव (ग्रीवा = मान); उ० बेडकाचें डोकें (स्पष्ट मान नसते म्हणून).

*N. B.*—देंठ = Footstalk, वृंत = Penduncle.

Session (sesh'un) [Fr. –L. *sessio*, a sitting.] *n.* बैठक *f*, सत्र *n*, सेशन *n.* २ बैठकीचा काल *m*, बैठक *f*, सेशन *n.* [CRIMINAL SESSIONS फौजदारी सेशन *n.*]

Sesspool *n.* Same as Cesspool.

Set (set) [A. S. *settan*, to set.] *v. t. to put, to lay* ठेवणें, मांडणें, घालणें, स्थापणें, मांडणी *f*-मांडणूक *f* -स्थापना *f.* करणें *g. of o.*, बसवणें, उभा करणें. [To S. LOAD OR PASSENGER DOWN माल किंवा उतारू खालीं उतरणें. To S. STATUE UP पुतळा बसवणें -उभा करणें. To S. FOOT ON (-वर) पाय ठेवणें. To S. A THING AGAINST ANOTHER विरुद्ध उभा करणें, आडवा ठेवणें. To S. APART शिलकेस ठेवणें. २ वेगळा ठेवणें. To S. ASIDE बाजूला ठेवणें. २ रद्द करणें, गाळणें. To S. BY शिल्लक ठेवणें. To S. ONE THINKING (ला) विचार करावयास लावणें. To S. STONE OUT वरचा दगड (खालच्या दगडाच्या) थोडा बाहेर मांडणें. To S. A PERSON OVER OTHERS वर नेमणें, वर ठेवणें.] २ *to apply a thing to* लावणें. [To S. PEN TO PAPER कागदाला टांक लावणें. To S. BUGLE TO ONE'S LIPS बिगुल वाजवणें. To S. SPURS TO HORSE घोड्याला (बुटाची) टांच मारणें. To SET ONE'S HAND TO A DOCUMENT सही घालणें, सही करणें. To S. ONE'S SEAL TO A DOCUMENT सील करणें, शिक्कामोर्तब करणें. To S. ONE'S HAND TO A TASK एखाद्या कामाला हात घालणें, एखादें काम सुरू करणें. To S. FIRE TO पेटवणें. To S. THE AXE TO तोडणें. To S. ONE'S WITS TO A QUESTION प्रश्न सोडवणें. To S. ONE'S WITS TO ANOTHER'S वादविवाद करणें. To S. ONE'S SHOULDER TO A WHEEL (एखाद्या कामास) आपली सर्व शक्ति लावणें.] ३ (उपयोगाकरितां किंवा खुलवून दाख-

विण्याकरितां ) ठेवणें, तयार ठेवणें, विवक्षित ठिकाणीं किंवा विवक्षित दिशेला ठेवणें. [To S. THE WATCH पहारेवाले (योग्य ठिकाणीं) उभे करणें. To S. CHAIRS (भेटीस येणारांकरितां) खुर्च्या मांडणें. To S. CLOCK OR WATCH घड्याळ लावणें, घड्याळ चालू करणें. To S. ALARUM गजर लावणें. To S. HEN (अंडीं उबवण्याकरितां) कोंबडीं बसवणें. To S. EGGS उबवण्याकरितां अंडीं मांडणें. To S. SEED OR PLANT बीं रोवणें, रोपा लावणें. To S. A POST खांब रोवणें -पुरणें. To S. SAIL शीड उभारणें. २ जहाज हाकारणें. To S. A TRAP सांपळा लावणें. To S. A RAZOR वस्तऱ्याला धार लावणें, धार काढणें, पाजवणें. To S. SAW (करवतीच्या दांत्यांना) विणी वाळणें, रेवड घालणें. To S. A TABLE खान्याकरितां मेज मांडणें. To S. or S. UP TYPE टाइप जुळणें. To S. UP MANUSCRIPT हस्तलिखित प्रत टाइपांत जुळणें. To S. CLOSE जवळजवळ जुळणें. To S. WIDE दूरदूर जुळणें. To S. OUT, To S. WIDE टाईप वगैरे पसरणें. ] ४ *to join, to attach, to fix, to appoint, to establish* **जोडणें, बसवणें, ठेवणें, जडवणें.** [To S. LEG, BONE, JOINT, &c. मोडलेला किंवा निखळलेला पाय, हाड, सांधा बसवणें, जोडणें. To S. EYES ON टक लाऊन पाहाणें. To S. DIAMOND हिरा कोंदणांत जडवणें To S. ONE'S HEART, MIND, HOPES, &c. ON (-वर) आशा *f* -मन *n.* ठेवणें. To S. ONE'S LIFE ON A CHANCE जीविताचा जुगार करणें, जीवित जुगारांत घालणें, जिवाची पैज मारणें. To S. PRICE ON (-ची) किंमत ठरवणें -लावणें -ठेवणें. To S. A PRICE ON ONE'S LIFE OR HEAD एखाद्याला ठार मारण्याकरितां बक्षीस लावणें. To S. STORE BY OR MUCH STORE BY मोठ्या किंमतीचा लेखणें. To S. ONE'S FACE *or* ONESELF AGAINST -च्या (सारखें) विरुद्ध असणें, (-चा) सारखा विरोध करणें. To S. ONE'S TEETH दांत आंवळून धरणें. २ (*fig.*) ठाम निश्चय करणें.] ५ *to determine* **नेमणें, ठरविणें.** ६ **दहीं करणें;** as, "To S. milk for cheese." ७ (music) *to adjust* **लावणें.** ८ *to stud* **जडणें, जडित -खचित करणें.** ९ *to point out the seat of* **शिकारीची जागा दाखविणें.** १० (as food) **वाढणें.** [To S. AGOING चालू करणें. To S. AT DEFIANCE तुच्छ मानणें, तृणवत् मानणें. To S. AT EASE स्वस्थ करणें, शांत करणें, चैन पाडणें, शमविणें. To S. AT NAUGHT तुच्छ -हलका मानणें. To S. AT WORK OR To S. TO WORK कामास -कामावर लावणें, चालू करणें. To S. BEFORE पुढें करणे, पुढें मांडणें, द्यायास काढणें. To S. ONE IN मार्गास लावणें. To S. RIGHT नीट करणें, दुरुस्त करणें. To S. THE FASHION नवी तऱ्हा प्रचारांत आणणें. To S. THE TEETH ON EDGE दांत आंबवणें. ]

**Set** *v. i. to solidify, to harden* **घट्ट होणें, गोठणें, विरजणें, थिजणें, वाळणें, ठरणें;** as, "Plaster of Paris *sets* quickly." २ *to plant* **लावणें, पुरणें;** as, "To sow dry and S. wet." ३ *to strike root* **रुजणें, मूळ धरणें, जगणें, वाढणें;** as, "Cuttings S. well." ४ *to develop* **वाढणें, वाढीस लागणें, वाढ होणें;** as, "Blossom *sets* (into fruit)." ५ **(स्थिर) बसणें, स्थिरावणें, स्थिर होणें, निश्चल होणें, (दांत) बसणें;** as,

"Eyes S. in death, swoon &c." ६ ( of a heavenly body) मावळणें, अस्तास जाणें, बुडणें, अस्त होणें. ७ (of tide, current, &c.) *to have motion, to gather force, to sweep along* येणें, लागणें, वहाणें, ( चा ) ओघ असणें; as, "Tide *sets* in or out." ८ (of feelings, customs, &c.) वाहणें, होणें, (-कडे) वळणें, झुकणें, ओढा असणें, वळण *n* -ओघ *m* -झोंक *m*- प्रवाह *m*- रोंख लागणें -जाणें *g. of s.*; as, "Opinion is setting against it." ९ ( sporting dog ) शिकार हुंगून काढणें; as, "*Sets* well." १०. ( of dancers ) समोरासमोर (जोडीनें) उभें राहाणें. ११ (of garment) बसणें, होणें; as, "A coat *sets* well, badly, &c." [ To S. ABOUT चिकाटीनें सुरुवात करणें, झट्न सुरुवात करणें, सुरू करणें. To S. BACK मागें परतवणें, मागें हटवणें, पिछेहाट करणें. To S. DOWN लिहिणें, लिहून काढणें. २ स्थापणें, नेमणें. ३ दावणें, दडपणें. To S. FORTH (पुढें) मांडणें, स्पष्ट करून सांगणें, जाहीर करणें. २ पुढें चालूं लागणें. To S. FORWARD पुढें जाणें, पुढें सरणें, पुढें कूच करणें. To S. IN लागणें, सुरू होणें, धरणें, बसणें, स्थिरावणें. To S. OFF निघणें, (प्रवास) सुरू करणें. २ खुलवणें, शोभा वाढवणें. To S. ON OR UPON हल्ला करणें, चढून जाणें, अंगावर तुटून पडणें. २ *to incite* छू करणें, चिथवणें. To S. OUT (प्रवासास) निघणें, बाहेर पडणें, निघून जाणें, वाटेस लागणें, वाट चालणें, वाट चालूं लागणें, मार्गस्थ होणें, रवाना होणें. २ वांटून देणें, नेमून देणें; as, "To S. out the share of each partner." ३ जडवणें, नटवणें; as, "A rich habit S. out with jewels." To S. UP ( धंदा, संस्था ) सुरू करणें, काढणें, घालणें. २ ( -ला ) दुकान -धंदा काढून देणें, संसारास लावणें, संसारांत बसवणें. ३ लावणें, मांडणें. ४ (स्वर) चढवणें. ५ पुढें करणें, पुढें मांडणें; as, "To S. up new doctrines." ६ उदयास किंवा रूपास आणणें; as, "This good fortune quite S. him up." To S. UP FOR ( -चा ) आव आणणें -घालणें; as, "*Sets up* for a scholar."

Set *n. a number of things*, संच *m*, जोड *m*, गट *m*, गंज *m*, डाव ( पत्त्यांचा ) *m*, माला ( व्याख्यानांची ) *f*, जोडी *f*. २ (*of persons*) संघ *m*, समुदाय *m*, थवा *m*, झुंड *f*. [A S. OF ROGUES चांडाळचौकडी *f*.] ३ *a section* ( of Society, &c.) वर्ग *m*, मंडळ *n*. ४ *a slip or shoot for planting* कलम *n*, रोपा *m*. ५ *young fruit just set* तोर *n*. ६ (*poet.*) *setting of sun or day* अस्त *m*, मावळणें *n*. ७ *current, way, opinion* ओघ *m*, प्रवृत्ति *f*, वळण *n*, झोंक *m*, मार्ग *m*; as, "The S. of his mind is towards intolerance." ८ *habitual posture* मांड *f*, मांडणी *f*; as, "The S. of the hills." (b) *bend* कल *m*, झुकाव *m*; The S. of his head." ९ *alternate deflection of saw-teeth* करवतीच्या दांत्यांची विणी *f*, रेवड *f*. १० *last coat of plaster on a wall* प्लास्टरचा शेवटचा थर *m*, प्लास्टरचा शेवटचा हात *m*. ११ (*print.*) दोन अक्षरांमधील ठराविक अन्तर *n*, सेट. १२ पक्ष्यानें एका वेळीं घातलेलीं अंडीं *n. pl.*, वीण *f*. १३ ( कुत्र्याचें ) शिकार दाखवणें *n*. [ To MAKE A DEAD S. AT (विरुद्ध कोट्या

करून) पुरा चीत करण्याकरितां एकत्र होणें.] १४ (theatre) (निरनिराळे भाग एक करून दाखविलेला) जोडदेखावा.

Set *a.* न बदलणारा, ठराविक; as, "A S. countenance." २ *firm, unchanging* ठराविक, ठरलेला, बेताचा, पक्का, ठाम, दृढ, न बदलणारा; as, "S. opinions; S. prejudices." ३ *regular, uniform* ठराविक, ठरींव, नियमित. ४ *established, prescribed* ठरलेला, ठराविक, विहित; as, "S. forms of prayer."

Set *pa. t.* S. *pa. p.* ठेवलेला, मांडलेला, स्थापित. २ लावलेला, रोंवलेला. ३ जडलेला, जडित, खचित (in *comp.* as रत्नखचित). ४ आसक्त, आसक्तमनस्क, &c.

Set back *n.* माघार *f*, पिछेहाट *f*, मागें हटण्याचें अंतर *n.*

Set-off *n.* तोलाची गोष्ट *f*, तोल *m*, तोड *f*. (b) पासंग *m*. २ कोंब *m*. ३ शोभा *f*, अलंकार *m*. ४ उलट दावा *m*. (b) वजावट *f*, वजा करावयाची रक्कम *f*.

Seton (sē'tn) [L. *seta*, a bristle.] *n.* पोत घालण्याकरितां विवर *n*, पोत *f*. (b) सूत घालून वाहविण्याचें विवर *n*, सूत्रण *n*.

Set out *n.* प्रारंभ *m*, आरंभ *m*. २ पुढें मांडणें *m*, बाहेर काढणें *n*.

Set-square *n.* तिकोनी काटकोन्या *m*.

Settee (setē') [From the root of Set.] *n.* पाठ असलेलें बांक *n*.

Set'ter *n.* बसून पारध दाखविणारा कुत्रा *m*. For more meanings, see the verb.

Set'ting *pr. p.* S. *n.* (*act.*) ठेवणें *n*, मांडणें *n*, स्थापणें *n*, मांडणी *f*, मांडणूक *f*, मांडणावळ *f*, मांड *m*, स्थापना *f*. २ लावणें *n*, रोपणें, &c. ३ जडणें *n*, जडण *f*, जडप *n*, जडाव *m*, कोंदण *n*. ४ मावळणें *n*, अस्त *m*, &c. ५ कुत्र्याकडून पक्षी धरवणें *n*. ६ झोंक *m*, वळण *n*. ७ गिलावा जमणें *n*, गिलावा बसणें *n*.

Setting-rule *n.* जुळलेल्या टाइपांपुढें बसविण्याची पोलादी किंवा पितळी रूळपट्टी *f*, कंपाझिटरची रूळपट्टी *f*, रुळी *f*.

Setting-stick *n.* कंपाझिटरच्या हातांतील टाइप जुळण्याची स्टिक *f*, कंपाझिटरची पकड *f*.

Settle (set'l) [A. S. *setlan*, to fix.] *v. t. to place at rest* स्थिर करणें, बसवणें. २ *to fix in life* थाऱ्यास लावणें, स्थिरस्थावर *n.* करणें, सोईस लावणें, सोय *f* -जन्माची सोय -संस्था करणें. ३ *to clear of dregs by causing them to sink* (गाळ) बसवणें, (गाळ बसवून) स्वच्छ करणें; as, "To S. coffee." ४ (of ground, roads,) *to restore to a smooth, dry or passable condition* बसवणें, वाळवणें, जाण्यायेण्याजोगा करणें; as, "Clear weather *settles* the roads." ५ *to cause to sink* (तळाला) बसवणें, खालीं बसवणें, स्थिरावणें. ६ *to decide, to determine* ठरवणें, फैसला *m*. करणें, निकाल करणें, निवाडा *m*. करणें, निश्चय करणें, निर्णय *m*. करणें, निर्धार *m*. करणें. ७ (a pension, an allowance, &c.) नेमणूक ठरविणें, नेमणूक करून देणें. ८ *to quiet, to still* शांत करणें, स्वस्थ करणें, स्थिर करणें; as, "To Settle the mind when agitated." ९

*to adjust* (a dispute, &c.) तोडणें, मिटवणें, संपविणें, तोड *f* -समेट *m.* करणें *g. of o.* १० (a debt) चुकवणें, चुकतें करणें, फेडणें, पुरा करणें, फेड *f.* करणें. (b) (accounts) नक्की करणें. [To BE SETTLED चुकता होणें, फिटणें. २ नक्की होणें.] ११ *to colonize* वसवणें, (मध्यें) वसाहत करणें; as, "The French first *settled* Canada."

Settle *v. i. to become fixed* बसणें, स्थिरावणें, स्थिर होणें, (वारा) धरणें. २ *to fix one's residence* घर करणें, घर करून राहणें. ३ वसाहत करणें. ४ *to enter into the married state* विवाह *m.* करणें, घरदार करणें, संसार करणें, संसार करूं लागणें. ५ *to be established in an employment or profession* कायम होणें, जम बसणें, बस्तान बसणें; as, "To S. in the practice of law." ६ (of ground, roads, &c.) वाळणें, सुकणें, जाण्यायेण्याजोगा होणें; "The roads *settled* late in the spring." ७ *to become clear after being turbid* निवळणें, स्थिरावणें. ८ *to sink to the bottom* (खालीं) बसणें, तळाला बसणें. ९ (the foundation of a house) बसणें, जमणें. १० *to become calm* शांत होणें, स्थिर होणें, स्वस्थ होणें, स्थिरावणें. ११ *to adjust differences or accounts* तोड करणें, तोडजोड करणें. (b) (हिशेब) पुरा करणें, चुकता करणें, चुकवणें; as, "He has *settled* with his creditors." १२ (बायकोची मृत्युपत्रानें) व्यवस्था करणें, नेमणूक करून देणें.

Settled *pa. t.* S. *pa. p.* स्थिरावलेला, स्थिर केलेला, &c. २ ठरींव, ठराविक, निश्चित.

Set'tlement *n. establishment in life, in business* स्थिरावणें *n*, जमणें *n*, जम बसणें *n*, बस्तान *n.* बसणें, घडी बसणें *n*, जम *m.* २ वसाहत करणें *n*, वसविणें *n.* (b) वसाहत *f.* ३ चुकवणें *n*, चुकता करणें *n.* (b) तोड *f.* ४ (भांडण) तोडणें *n*, मिटवणें *n.* (b) तोड *f*, समेट *m.* ५ (of a controversy) निकाल *m*, निर्णय *m.* ६ नेमणूक करून देणें *n*, नेमणूक *f.* ७ (of revenue) धारेबंदी *f.* [PERMANENT S. कायमची धारेबंदी *f.*]

Set'tler *n.* स्थिर होणारा *m*, घरदार करणारा, &c. २ वसाहत करणारा *m*, वसाहतवाला *m.* [OLD S. मुम्या.]

Set'tling *pr. p.* S. *v. n.* स्थिरावणें *n*, थारावणें *n*, &c. २ (*pl.*) *dregs, sediment* (तळाला बसलेला) गाळ *m.* ३ हिशेब चुकता करणें *n.* [SETTLING DAY हिशेब चुकता करण्याचा दिवस *m.*]

Seven (sev'n) [A. S. *seofon*, Gr. *hepta*, L. *septem*, Sk. सप्तन्, seven.] *a.* सात. S. *n.* साताचा आंकडा *m*, सात. २ सातांचा समुदाय *m*, सप्तक *n.* Sev'enfold *a.* सातपट, सप्तगुण. S. *adv.* सातपट, सातपटीनें, सप्तधा. Sev'enth *a.* सातवा. S. *n.* सातवा भाग *m*, सप्तमांश *m.* Sev'enthly *adv.* सातव्यानें.

Seventeen (sev'n-tēn) *a.* सतरा. S. *n.* सतरांचा आंकडा *m*, सतरा. Sev'enteenth *a.* सतरावा S. *n.* सतरावा हिस्सा *m.*

Seventy (sev'nti) *n.* सत्तर. २ सत्तराचा आंकडा *m*,

सत्तर. Seventieth *a.* सत्तरावा. S. *n.* सत्तरावा हिस्सा *m.* Sev′enty-one एकाहत्तर. Seventy-two बाहत्तर. S. three त्र्याहत्तर S. four चौऱ्याहत्तर. S. five पंचाहत्तर. S. six शाहत्तर. S. seven सत्त्याहत्तर. S. eight अठ्याहत्तर. S. nine एकुणऐशीं.

Sever ( sev′-ėr ) [Fr. –L. *separare*, to separate.] *v. t. to separate* वेगळें करणें, निराळें करणें, पृथक् करणें. २ *to cut or break off* तोडणें, खांडणें, छेदणें, फोडणें, फांदडणें, फांदाडणें. ३ (*law*) *to disunite* (an estate) वेगळा करणें, वांटप *n.* करणें; as, "To S. an estate in joint tenancy." S. *v. i. to be parted or separated* निराळें होणें, वेगळा होणें, पृथक् राहणें.

Several ( sev′ėr-al ) [L. *separale*, a separate thing.] *a. separate, diverse,* वेगवेगळा, वेगळा, निराळा, निरनिराळा, पृथक्. (b) *individual, respective* आपला, आपापला, स्व; as, "All of us in our S. stations." २ *a few, more than two but not many* कित्येक, अनेक, कांहींएक. S. *pron. moderate number, more than two but not many* कित्येक, कांहींएक.

Sev′erally *adv.* वेगवेगळा, निरनिराळा. २ आपापल्या परीनें, ज्यानें त्यानें.

Sev′erance *n. separation* निराळेपणा *m*, वेगळेपणा *m*, पृथक्त्व *n.* २ भंग *m*, खंड *m*, छेद *m.* ३ ( *law* ) वांटणी करणें *n*, वांटणी *f*, वांटप *n.*

Severe ( se-vēr′ ) [Fr. –L. *severus*, severe.] *a.* ( of persons ) *strict, rigorous* कडक, करडा, कडवा, खरमरा, कठोर, कठीण, प्रखर, निष्ठुर, कहरी, तरवारीच्या धारेवर धरणारा, करवतीवर वागवणारा. २ (of punishment, measures, &c. ) कडक, जबर, जालीम, सख्त, तिखट, प्रखर, तीव्र, उग्र, कहरी, कहराचा, दुःसह. ३ ( cold, heat, &c. ) *intense* कडक, कडकडीत, कडाक्याचा, दुःसह, अतिशय, फार, पराकाष्ठेचा. ४ ( a sickness, &c. ) *violent* दुःसाध्य, भारी, जबर, जबरा, जिवावरचा, कठीण, अवघड, मोठा. ५ *unadorned, stripped of all that is unessential, terse* साधा, रुक्ष, अनलंकारिक; as, "S architecture." ६ *sarcastic* कडक, उग्र, लागट, लागणारा, झोंबणारा; as, "S. remarks".

Severe′ly *adv.* कडकपणानें, करडेपणानें, कठीणपणानें, कठोरपणानें, उग्रतेनें. २ कडाक्यानें.

Sever′ity *n.* कडकपणा *m*, करडेपणा *m*, खरमरीतपणा *m*, कठोरपणा *m*, कठीणपणा *m*, प्रखरता. २ कडकपणा *m*, जालीमपणा *m*, उग्रता *f*, तीव्रपणा *m*, दुःसहता *f.* ३ कडकपणा *m*, कडका *m*, कडाखा *m.* ४ भारीपणा *m*, दुःसाध्यता *f.* ५ साधेपणा *m*, रुक्षपणा *m.* ६ लागटपणा *m.*

Sew ( sō ) [Of Anglo-Saxon origin, Perhaps connected with L. *suo*, Sk. सीव्. ] *v. t.* शिवणें, शिवून देणें, दोरा घालणें;–compreh. to sew, to stitch, to tack, &c. शिवणेंटुपणें, शिवणेंटिपणें. [To S. UP शिवून टाकणें, शिवून बंद करणें.] S. *v. i.* शिवण-

काम करणें, शिवणें. Sewed *pa. t.* Sewed, Sewn *pa. p.* Sew'ing *v. n.* शिवणें *n*, शिवणकाम *n*. [COST OF S. शिवणावळ *f*, शिलाई *f*. S. WORK शिवणकाम *n*. S. MACHINE शिवण्याचें यंत्र *n*.]

Sewage ( sū'aj ) [O. Fr. *seuwiere*, a canal –L. *ex*, out, and *aqua*, water.] *n. the whole sewers of a city* गटारें *n. pl.* २ *the refuse carried away through drains* गटारांतली घाण *f*. [S. FARM गटारांतील घाणीवर होणारें शेत *n*.] S. *v. t. to manure with sewage* ( शेताला ) गटारांतील घाणीचें खत घालणें.

Sew'er *n.* ( झांकलेलें ) गटार *n*, नहर *m*, नाला *m*.

Sew'erage *n.* शहरांतील गटारें किंवा नाले *m. pl.* २ नाल्यांनीं पाणी बाहेर काढून देण्याची व्यवस्था *f*, गटारें *n. pl.* गटारांची व्यवस्था *f*.

Sex ( seks ) [Fr. *sexe* –L. *sexus* -*secare*, to cut.] *n.* ( of animals and plants ) जाति *f*, लिंग *n*. [ THE MALE S. पुरुषजाति *f*, नरजाति *f*. THE FEMALE S. स्त्रीजाति *f*, बायकांची जात *f*. THE FAIR, GENTLE, SOFTER, WEAKER S. स्त्रीजाति *f*. THE S. (*facet.*) स्त्रीजाति *f*. THE STERNER S. पुरुषजाति *f*.] २ (*pl.*) स्त्रीपुरुष, पुरुष आणि बायका.

*N. B.*—लिंग or जाति in Botany = Sex; लिंग in Grammar = Gender.

Sexagenarian ( seks-a-jen-ā'ri-an ) *n.* साठ वर्षांचा म्हातारा *m*.

Sexagenary (seks-aj'en-ar-i) *a.* साठ वर्षांचा. २ साठ संख्या दाखविणारा, साठ संख्या असणारा, षष्ठिसंख्यात्मक. S. *n.* साठ वर्षांचा म्हातारा. २ षष्ठिभागात्मक वस्तु *f*.

Sexagesima ( seks-a-jes'-i-ma ) [L. *sexagesimus*, sixtieth.] *n.* लेंटच्या पूर्वींचा दुसरा आदित्यवार *m*. हा ईस्टरच्या पूर्वीं साठ दिवस येतो.

Sexagesimal ( seksa-jes'i-mal ) [L. *sexagesimus*, sixtieth Cf. Sk. षष्टी *f*.] *a.* साठ अंकांवर बसविलेला, षष्ठ्यंश (पद्धति) *f*. साठ सेकंद म्हणजे एक मिनिट व साठ मिनिटें म्हणजे एक डिग्री या मापनपद्धतीस Sexagesimal System असें म्हणतात.

Sexennial ( seks-en'yal ) [L. *sex*, six, and *annus*, a year.] *a.* सहा वर्षें जगणारा, षड्वर्षायु. २ *happening once in six years* सहा सहा वर्षांनीं होणारा, षडब्दिक.

Sextant ( seks-tant ) [L. *sextans* -*sextus*, Sk. षष्ठ, sixth.] *n.* (*math.*) वर्तुळाचा सहावा भाग *m*, वृत्तषष्ठांश *m*. २ ( *astron.* ) षडंशराशि. ही राशि विषुववृत्तांत सिंह आणि वासुकी यांचे मध्यें आहे. ३ ( *phys.*) ( दोन पदार्थांमधील ) कोनीय अंतर मोजण्याचें यंत्र *n*, षष्ठांशयंत्र *n*.

Sextile ( seks-til ) [L. *sextus*, sixth. Cf. Sk. षष्ठ.] *n.* साठ अंशांची दृष्टि *f*, द्विराश्यंतरदृष्टि *f*.

Sexton ( sek's-tun ) [A corruption of Sacristan.] *n.* चर्चमधील पाद्र्याच्या हाताखालचा नोकर *m*, सेक्स्टन. हा चर्च संभाळतो, व प्रेताकरितां खाडे खणतो.

Sextuple (seks'-tū-pl) [L. *sextus*, sixth, and *plcore*, to fill.] *a.* सहापट, षड्गुण. S. *v. t.* सहापट करणें.

Sexual ( seks'ū-al ) [From Sex.] *a. of sex, a sex, or the sexes* स्त्रीजातीचा, पुरुषजातीचा, लिंगविषयक, स्त्रीपुरुषविषयक, स्त्रीपुरुषांचा. [S. ORGANS (स्त्रीपुरुषांचीं) जननेंद्रियें *n. pl.* S. INTERCOURSE, S. COMMERCE स्त्रीपुरुषसमागम *m*, स्त्रीपुरुषव्यवहार *m*. S. AFFINITY स्त्रीपुरुषांचें परस्पराकर्षण *n*, स्त्रीपुरुषस्नेहाकर्षण *n*. SEXUAL REPRODUCTION (योनिज) प्रजोत्पादन *n*, शुक्रशोणितजनन *n*. SEXUAL SELECTION कामिक संवरण *n*, लिंगसंवरण *n*. S. APPETITE कामवासना *f*, सुरतेच्छा *f*. S. INDULGENCE अतिविषयसेवन *n*.] २ ( *bot.* of classification ) *based on the distinction of sexes in plants* स्त्रीनरभेदाचा, स्त्रीनरभेदावरून ठरविलेला, स्त्रीनरभेदमूलक, लिंगमूलक.

Sex'ualist *n.* लिंगविशिष्टतावादी *m*.

Sexual'ity *n.* लिंगविशिष्टता *f*.

Shabb'iness *n.* घाणेरडेपणा *m*, फाटकेपणा *m*, मजीतपणा *m*, मळकेपणा *m*. २ भिकारपणा *m*, भिकारीपणा *m*. ३ पाजीपणा *m*, हलकटपणा *m*.

Shabby ( shab'i ) [A form of Scab.] *a.* (of clothes) *worn, threadbare* मळका, फाटलेला, जीर्ण, घाणेरडा, फाटका, मजीत, गचाळ, पोतेऱ्याचा. २ *poor-looking* भिकार, भिकारी, भिकारलक्षणाचा, भिकारचाळ्याचा, दर्भ्या. ३ ( of conduct ) *mean* हलकटपणाचा, भिकारपणाचा, पाजीपणाचा, पाजी, हलकट, नीचपणाचा; as, "Played me a S. trick."

Shackle ( shak'l ) [A. S. *sceacul*, a shackle.] *n. metal loop or staple* फांसा *m*, वाळा *m*. २ ( *usu.* in *pl.* ) *a fetter* बिडी *f*, बेडी *f*, खोडा *m*, पायबंद *m*. ३ *a hindrance* अडथळा *m*, आडकाठी *f*, हरकत *f*, खोडा (*fig.*) *m*; as, "The *shackles* of convention." ४ (तारेचा फांटा नेण्याकरतां उपयोग करण्याची) चक्री *f*. S. *v. t. to fetter* बेडी घालणें, खोडा *m* -पायबंद *m*. घालणें. २ *to impede*, अडथळा *m*. करणें, पाय *m. pl.* बांधणें ( *fig.* ), पायांत खोडा *m*. घालणें ( *fig.* ).

Shad'dock *n.* पपनस, पोपनीस, पपनीस, चकोत्रें *n*.

Shade ( shād ) [Of Anglo-Saxon origin.] *n. comparative darkness caused by interception of light* छाया *f*, सावली *f*. २ ( *fig.* ) *comparative obscurity* छाया ( *fig.* ) *f*, अप्रसिद्धता *f*. [To THROW INTO THE S. स्वतःच्या तेजानें दिपवणें, मागें सारणें -टाकणें -हटवणें. ] ३ ( often *pl.* ) *cool or sequestered retreat* सावलीची जागा *f*, एकान्तवासाची जागा *f*, विविक्तस्थान *n*. ४ ( *pl.* ) *darkness of night or evening* अंधार *m*, अंधकार *m*, काळोख *m*, अंधकाराची छाया *f*. ५ *darker part of a picture* छाया *f*, छाया पडलेला चित्राचा भाग *m*. [WITHOUT LIGHT AND S. ( OF PAINTINGS) प्रकाश व छाया (यांचें योग्य प्रमाण) नसलेला.(२) ( OF DESCRIPTIONS OR CHARACTERS) वैचित्र्य नसलेला, एकसारखा. ] ६ *a colour esp. with regard to its*

*depth* रंगाची छटा *f*, रंगाची छाया *f*. ७ *slight difference, small amount* थोडासा *m*, अल्पांश *m*; as, "I am a S. better to-day." ८ *unsubstantial or unreal thing* छाया *f*, भ्रम *m*. (b) पिशाच्च *n*. ९ *soul after death* छाया *f*; as, "Spoke with the S. of Homer." [To GO DOWN TO THE SHADES मरणें.] १० *a screen* पडदा *m*; as, "Candleshade." ११ *a minute difference or variation* (as of thought, expression) सूक्ष्मभेद *m*, फरक *m*; as, "the Shades of meaning in synonyms." १२ (*pl.*) *the region of spirits* पिशाच्चांचा प्रदेश *m*, भूतांचा प्रदेश *m*.

**Shade** *v. t. to screen from excessive light* सावली *f*. करणें, आडोसा *m*. करणें, छाया *f*. करणें -पाडणें, पडदा लावणें, अंधार पाडणें. २ *to moderate* कमी करणें. ३ *to make dark or gloomy* निस्तेज करणें, काळा करणें. ४ (*drawing*) छाया काढणें. ५ *to pass off by degrees into other colour or variety* (क्रमाक्रमानें) छटा बदलीत बदलीत जाणें. Shaded *pa. t.* and *pa. p.* Shad'ing *pr. p.*

**Shade'ful** *a*. छाया असलेला, सावली असलेला, गर्द.

**Shade'less** *a*. छाया नसलेला, रुक्ष.

**Shad'iness** *n*. सावली *f*, सावट *n*.

**Shad'ing** *v. n*. छाया करणें *n*, सावली करणें *n*. &c. २ (*drawing*) शेडिंग *n*, छाया *f*.

**Shadow** (shad'ō) [Doublet of Shade.] *n. shade* छाया *f*, सावली *f*. (b) अंधार *m*, काळोख *m*. [SHADOW OF DEATH मरणाची छाया *f*. २ भयंकर अंधार *m*.] २ *dark part of a picture* छाया *f*, (छाया दाखविलेला) काळा भाग *m*. ३ (*fig.*) *one's inseparable companion* छाया *f*, नित्याचा नोकर *m*, खुशामत्या *m*. ४ *reflected image* छाया *f*, पडछाया *f*, प्रतिबिंब *n*, प्रतिच्छाया *f*. ५ *faint representation* छाया *f*, पूर्वसूचन *n*, पूर्वसूचना *f*; as, "Coming events cast their *shadows* before." ६ *slightest trace* छाया *f*, छटा *f*, गन्ध *m*, वास *m*; as, "Without a S. of doubt." ७ *unsubstantial or unreal thing* छाया *f*, सोंग *n*; as, "What *shadows* we are! Having only the S. of freedom." ८ *phantom, ghost* छाया *f*, अपच्छाया *f*, आभास *m*. ९ *privacy, obscurity* एकान्त *m*, एकान्तवास *m*; as, "To live in the S." १० *shelter, protection* छाया *f*, आश्रय *m*, आसा *m*; as, "Under the S. of the Almighty."

*N. B.—Shade* differs from *Shadow* as it implies no particular form or definite limit; whereas a *shadow* represents in form the object which intercepts the light. When we speak of the *shade* of a tree, we have no reference to its form; but when we speak of measuring a pyramid or other object by its *shadow*, we have reference to its form and extent. Webster.

Shad'ow *v. t.* छाया पाडणें, सावली करणें, छाया करणें, आडोसा करणें, उष्णनिवारण करणें, अंधार पाडणें, उजेड धरणें. २ *to shelter, to protect* आसरा देणें, आश्रय देणें. ३ *to represent faintly* अन्धुक रीतीनें दाखविणें, अस्पष्ट किंवा पुसट रीतीनें दाखविणें, (-ची) छाया दाखविणें. ४ *to cloud, to darken* काळवंडणें; as, "I must not see the face I love thus *shadowed.*" ५ *to follow and watch closely* मागेमागें राहणें, सारखें पाठीस रहाणें, पावलावर पाऊल ठेऊन मागें चालणें, चिकटून -लकटून -धरून -बरोबर असणें; as, "A detective *shadows* a criminal." Shadowed *pa. t.* and *pa. p.*

Shad'owiness *n.* अंधुकपणा *m*, अस्पष्टपणा *m.* २ मंद-तेजस्कता *f.* ३ छायात्मकता *f*, अवास्तविकता *f*, फोलपणा *m.*

Shad'owing *n.* छाया *f.* २ *a faint representation* अस्पष्ट उल्लेख *n*, अस्पष्ट कल्पना *f.* (b) छाया *f.* ३ For more meanings, see the verb.

Shadow'less *a.* छाया नसलेला, छायाहीन.

Shad'owy *a.* छायेचा, सांवटीचा. (b) छाया करणारा, छाया पाडणारा; as, "A S. desert." २ *dark, gloomy, dim* अंधुक, अस्पष्ट, पुसट पुसट दिसणारा, अंधकाराची छाया असलेला; as, "The S. past." ३ *not brightly luminous* कमी तेजाचा, मंदतेजस्क, न्यूनप्रभ; as, "S. moon." ४ *unsubstantial, unreal* छायेचा, छायारूप, छायात्मक, अवास्तविक, मायिक, स्वप्नवत्; as, "S. honour."

Shad'y *a. abounding with shade* छायेचा, सावलीचा, सावटाचा, सावटीचा, सावटांतला, छायामय. २ *equivocal, dubious or corrupt* लुच्चेगिरीचा, लबाडीचा, लपवालपवीचा, अप्रामाणिक, फसवेगिरीचा; as, "A S. business." [ON THE S. SIDE OF FIFTY पन्नाशीच्या पुढें.]

Shaft (shaft) [A. S. *sceaft*, a dart.] *n.* (भाल्याचा) दांडा *m.* २ *lance* भाला *m.* ३ *an arrow* बाण *m.* (b) (*fig.*) वाग्बाण *m*; as, "*Shafts* of satire, ridicule, envy, &c." ४ *a ray of light* (प्रकाश) किरण *m.* ५ *bolt of lightning* विजेची अर्गला *f.* ६ *a column* (between base and capital) (खांबाचा) वाटोळा दांडा *m.* (b) (गिरणीची, धुराड्याची) चिमणी *f.* (c) (पिसाची) मध्यशिरा *f.* ७ *handle of a tool* मूठ *f*, दांडा *m*, थरूं *n*, परज *m.* ८ (of a carriage) दांडी *f*, दांडा *m.* ९ (*mech.*) लाट *f*, वाटोळा दांडा *m.* [TAPPET SHAFT (OF A LOOM) खालची लाट. CRANK SHAFT वरची लाट.] १० *a kind of well, forming the entrance to a mine* (खाणींत जाण्याचा) गाळा *m.* ११ *tunnel of glass -furnace* (भट्टीला हवा पोंचविणारा) नळ *m.* १२ (घाणेरडी हवा वर नेणारा) नळ *m*, उच्छ्वास *m.* [VENTILATING S. स्वच्छ हवा खेळवणारा बंब *m*, उच्छ्वास.] १३ *bot.* दंड *m*, दांडा *m*, धड *n.*

Shaft'ing *n. mech.* लाटांची माळ *f.*

Shag (shag) [A. S. *sceaega*, a head of hair.] *n.*

*cloth with a coarse nap* भरभरीत (फुलाचें) कापड *n*, खरबरीत कापड *n*. २ *rough hair* जाड व रांठ केंस *m. pl.*, पेळू *f*. ३ *shredded tobacco* बारीक व लांब तंतु केलेला तमाखू *m*. Shag'gy *a. having long rough hair* लांब व रांठ केंस असणारा, केंसाळ, झिपऱ्या. २ ( of hair ) रांठ, न विंचरलेला, पेळवा झालेला, जटा झालेला -पडलेला. ३ ( of land ) *over-grown with forest or rough vegetation* रान माजलेली (जमीन). ४ ( of trees ) वांकड्यातिकड्या फांद्या असलेला.

Shag'giness *n*. केंसाळपणा *m*, केशविपुलता *f*, &c.

Shaggy, See under Shag.

Shagreen (sha-grēn') [Fr. *chagrin* –Turkish *saghri*, back of a horse. ] *n*. (घोड्याचें, गाढवाचें, किंवा उंटाचें ) कच्चें खरखरीत चामडें *n*, साग्री चामडें *n*. २ शार्क माशाचें चामडें *n*. याचा पालिस करण्याकडे उपयोग करतात.

Shake (shāk) [A. S. *seaçan*, to shake.] *v. t*. हालवणें, हांदुळणें, डुलवणें, डोलवणें, घोळणें, घुसळणें. [To S. HANDS हस्तांदोलन करणें, हातांत हात घालून हालवणें.] २ ( cloth ) झाडणें, झटकणें, झटकावणें, झटका *m*. देणें. ३ *to make tremble or rock* हालवणें, हालवून टाकणें-सोडणें, कांपवणें, धक्का -हिसडा -हिसका देणें, हादरून टाकणें; as, "To S. the house." ४ *to brandish* उगारणें, दाखवणें, चमकावणें, परजणें. [To S. ONE'S FIST OR STICK AT OR IN A PERSON'S FACE मूठ उगारणें. ] ५ *to disturb, to shock* हालवून सोडणें, क्षुब्ध करणें, अस्वस्थ करणें, ( मनाला -अंतःकरणाला ) धक्का देणें; as, "Was much *shaken* by, with or at the news." ( b ) हालवून जागा करणें. ( c ) बिघडविणें; as, "*Shook* my composure." ६ *to weaken* ( confidence, courage, &c. ) कमी करणें, हालवून टाकणें -सोडणें, धक्का *m*. देणें -बसवणें, धक्का पोंचणें *in. con.*, घसरेसा -ढळेसा करणें, नाहींसा करणें, लटपटीत करणें, डळमळीत करणें, घाबरवणें; as, "His faith in Providence was greatly *shaken*." ७ ( with *down* ) हालवून पाडणें; as, "To S. down fruit from a tree." ८ (धान्य वगैरे) भांड्यांत हालवून भरणें. [To S. OFF (धुरळा वगैरे) झाडून टाकणें. २ ( *fig.* ) ( आळस वगैरे ) झाडून टाकणें, दूर सारणें. To S. OFF THE DUST FROM ONE'S FEET, *to depart indignantly* त्वेषानें -संतापानें निघून जाणें. To S. OUT ( भांड्यांतील जिन्नस वगैरे ) बाहेर ओतणें, भांडें रिकामें करणें. २ ( कपड्यावरील धुरळा ) झाडून टाकणें, झटकून टाकणें. ३ (निशाण वगैरे) झटकीत पसरणें. To S. UP हालवणें, हालवून मिसळणें ( औषध वगैरे ). २ ( हालवून ) उठवणें.] S. *v. i. to tremble or rock* हालणें, कांपणें, हादरणें, डुलणें; as, "The earth *shook*." २ ( with fear, cold, &c. ) ( भीतीनें, थंडीनें, ) कांपणें, थरथरणें, थरथरां कांपणें, लटलटणें, लटलट हालणें, लटलट करणें, कांपरें भरणें-सुटणें. [ His HAND SHAKES ( लिहितांना ) त्याचा हात कांपतो. ] ३ ( liquids in a vessel ) डुचमळणें, डुच-

मळणें. ४ (*music*) (आवाज) कांपणें, (आवाजाला) कंप असणें. S. *n.* हालणें *n*, हालवणें *n*, डोलवणें *n*, डोलवाडोलव *f.* २ झटकणें *n.* ३ *a jerk, a jolt* धक्का *m*, हिसका *m*, झटका *m*, झटकारा *m*, हिसडा *m*, हबका *m.* ४ *a trembling* (भीतीनें, थंडीनें, वगैरे) कांपणें *n*, कंप सुटणें *n*, कंप *m*, कांपरें *n.* ५ हस्तांदोलन *n*, शेकह्यांड *m.* ६ (music) कंप *m*, गिरकी *f*, झील *f.* ७ (वाढत्या झाडाला पडलेली) भेग *f*, चीर *f.*

Shake'down *n.* (जमिनीवर किंवा कोचावर केलेला) गवताचा किंवा ब्लांकेटाचा तात्पुरता बिछाना *m.*

Shaken *pa. p.* Shaking *pr. p.* Shook *pa. t.* Shak'y *a. tottering, ready to fall to pieces* डळमळीत, डळमळणारा, हालूं लागलेला, मोडकळीस आलेला, पडावयास झालेला; as, "A S. house." २ *infirm* थकलेला, लटपटणारा, (हातपाय) लटलट कांपणारा; as, "A S. old man." ३ *unreliable, wavering* ढांसळलेला, डळमळीत, लटपटीत, अविश्वसनीय, बदलणारा, चंचल; as, "S. credit; S. voters." ४ (timber) *split* चीर गेलेला, फट पडलेला, भेताळा गेलेला, भेताळलेला.

Shaker *n.* हलवणारा *m*, झटकणारा *m*, &c.

Sha'kiness *n.* डळमळीतपणा *m*, लटपटीतपणा *m.*

Shale (shāl) [A form of Scale.] *n. a kind of slaty rock, containing much bitumen from which paraffin is produced* स्लेटीसारखा खडक *m.* [S. OIL एक प्रकारचें राकेल.]

Shall (shal) [A. S. *sceal*, to be obliged. Shall चा धात्वर्थ 'भाग असणें' असा आहे.] *v. i.* हें साहाय्यकारी क्रियापद असून कोणत्याहि क्रियापदाचें भविष्यकाळाचें रूप सिद्ध करण्याकरितां त्या क्रियापदाच्या पूर्वी योजितात; as, "I *shall* write." २ प्रथम पुरुषीं *Shall* हें फक्त भविष्यकाळ दाखवितें; व द्वितीय आणि तृतीय पुरुषीं बोलणाराची (a) इच्छा, (b) आज्ञा, व (c) धमकी दाखवितें; as, "(a) You *shall* go. (b) He *shall* go. (c) He *shall* die." ३ संकेतार्थी (उभयान्वयी अव्ययाच्या पुढें) *Shall* हें कोणत्याहि पुरुषीं भविष्यकालवाचक असतें; जसें, "If he *shall* be defeated, &c." ४ बायबलाच्या आज्ञांत, पार्लमेंटाच्या ठरावांत, व सरकारी हुकुमांत द्वितीय आणि तृतीय पुरुषीं Shall चा उपयोग करतात; as, "Thou *shalt* love thy neighbour as thyself; The Governor of Bombay for the time *shall* be the Chancellor of the said University; Whoever commits robbery *shall* be punished." ५ बायबलाच्या जुन्या करारांतील भविष्यवाद्यांच्या भविष्यवचनांत Shall चा उपयोग करतात; as, "The days *shall* come upon thee (Jerusalem) that thine enemies *shall* cast a trench about thee." ६ बायबलमध्यें अभिवचन व्यक्त करण्याकरितां Shall चा उपयोग करतात; as, "Blessed are the peace-makers for they *shall* be called the children of God." ७ *Shall* चें द्वितीय पुरुषीं एकवचनीं *Shalt* हें रूप होतें. ८ *Should* हें Shall चें भूतकाळाचें रूप आहे.

**Shallow** (shal'ō) [Perhaps connected with Shoal.] *a. not deep* उथळ, उत्तान; as, "S. water; A S. stream; A S. dish." [S. WATER MAKES MUCH NOISE (*lit* and *fig.*) उथळ पाण्याला खळाळी फार.] २ (of rice-ground) उखर, करवंडा. ३ (*fig.*) *slight, superficial* (बुद्धीचा मनाचा -विद्येचा) उथळ, उथळ बुद्धीचा, मनाचा उथळ, विद्येचा उथळ, वरवरचा, अल्प, अल्पविद्येचा, अल्पबुद्धीचा, वरकरणी; as, "A S. mind; A S. argument; A S. love; A S. man." [S. BRAINED, S. PATED उथळ बुद्धीचा, विशेष डोकें नसलेला.] ४ *without force of character* थिल्लर, क्षुद्र. S. *n. a shoal, a sand-bank* भाट *f*, भाटी *f*, लाग *m*, पार *m*. S. *v. i. to become shallower* उथळ होत जाणें. S. *v. t. to make shallow* उथळ करणें.

**Shallowness** *n.* (मनाचा, वगैरे) उथळपणा *m*.

**Shalt**, 2nd per. Sing. of Shall.

**Sham** (sham) [From the root of Shame.] *a. counterfeit, pretended* लटका, कृत्रिम, ढोंगाचा, सोंगाचा, मिषाचा, बहाण्याचा, बतावणीचा, कपटाचा, ओढून आणलेला, ओढून चंद्रबळाचा; as, "S. illness." [S. FIGHT लटकी लढाई *f*. S. PLEA पोकळ सबब *f*.] S. *n. a pretence, imposture* ढोंग *n*, सोंग *n*, बहाणा *m*, मिष *n*, छल *m*, निमित्त *n*, कोंगें *n*; as, "This age of shams." २ *person that deceives* सोंगाड्या *m*, ढोंगी *m*. S. *v. i. to pretend, to make false pretences* सोंग *n* -बहाणा *m*. करणें, ढोंग करणें, (-ची) बतावणी करणें, मिष करणें, सोंग घेणें. S. *v. t. to deceive or delude with false pretences* फसविणें, ठकविणें; as, "*Shammed* into a conviction."

**Shamble** (sham'bl) [Of doubtful origin.] *v. i. to walk with an awkward unsteady gait* तिरपागडीं पावलें टाकीत चालणें. S. *n.* तिरपागडें पाऊल *n*, तिरपागडी चाल *f*. Sham'bling *pr. p. a.* तिरपांगडा; as, "S. trot." S. *n.* तिरपागडें पाऊल *n*, तिरपागडी चाल *f*.

**Shambles** (sham'blz) [A S. *scamel*, a bench.] *n. pl.* कसाईखाना *m*. २ *a meat market* खाटिकबाजार *m*, सागोतीचा बाजार *m*. ३ *a scene of carnage* कत्तलीचें ठिकाण *n*; as, "The place became a S."

**Shame** (shām) [A. S. *sceamu*, shame.] *n. the sensation or feeling of conscious guilt, &c.* लाज *f*, लज्जा *f*, शरम *f*. (b) संकोच *m*, ओशाळी *f*, ओशाळगत *f*, ओशाळीक *f*. २ *sense of shame* लाज *f*, लज्जा *f*, शरम *f*, खंत *f*, दरद *m*. [To CAST OFF S. लाज झुगारून देणें, पडदा *m*. उडवणें. To TAKE S. TO ONE'S SELF लाजणें, शरमणें, ओशाळणें, लाज *f*. वाटणें *in. con.* TO THROW OFF ALL SENSE OF SHAME नाक तोडून कडोस्रीस खोवणें, नाक कापून हातांत घेणें, लाज सोडणें. WITHOUT S., LOST TO S. निर्लज्ज, निगरगट्ट.] ३ *shamedness, reproach* अपमान *m*, अप्रतिष्ठा *f*, मानभंग *m*, पाणउतारा *m*, (तोंडास) काळोखी *f*, कालिमा *m*. [To PUT TO S. लाजवणें, खजिल करणें, अपमान करणें. To PUT TO

S. AND CONFUSION पाण्यापेक्षां पातळ करणें, खालीं पहावयास लावणें.] ४ *cause or reason of shame* लाजेस कारण *n*, लज्जेस कारण *n*, लज्जाहेतु *m*. Shame *v. i. to be ashamed* लाजणें; शरमणें, ओशाळणें. S. *v. t. to bring shame on, to put to the blush* लाजविणें, खालीं पहावयास लावणें, शरमविणें, ओशाळवणें, तोंड *n* -मान *f*. खालीं करणें *g. of o.*, ओशाळा -सलज्ज करणें, चपापवणें.

Shame'faced *a. shy, overmodest* लाजाळू, लाजरा.

Shame'facedly *adv.* लाजाळूपणानें, लाजरेपणानें.

Shame'facedness *n.* लाजरेपणा *m*, संकोच *m*, लाज *f*, लज्जा *f*, भीड *f*.

Shame'ful *a. disgraceful* लाजिरवाणा, बेशरमपणाचा, लज्जास्पद, लाजेचा, लज्जेचा, अब्रू घेणारा, शरमेचा. २ *raising shame in others, indecent* अश्लील, अचकटविचकट, अशिष्ट, ग्राम्य; as, "A S. sight; A S. picture." Shame'fully *adv.* लाज सोडून, अब्रू सोडून. २ अचकटविचकटपणानें.

Shame'less *a. wanting shame or modesty* बेशरम, निलाजरा, निर्लज्ज, लज्जाहीन, निसत, निसवलेला, कोडगा, निगरगट्ट, लाज सोडलेला, त्यक्तलज्ज. २ *indicating want of shame* अश्लील, ग्राम्य; as, "A S. picture."

Shame'lessly *adv.* बेशरमपणानें, निलाजरेपणानें, निर्लज्जतेनें, लाज सोडून -टाकून. Shame'lessness *n.* निर्लज्जपणा *m*, निलाजरेपणा *m*, बेशरमपणा *m*, कोडगेपणा *m*, निगरगट्टपणा *m*, त्यक्तलज्जता *f*.

Shampoo (sham-pōō') [Hindi *champna*, to squeeze.] *v. t. to massage the limbs* चंपी करणें, मुटकणें, मुटकळणें, मळणें, रगडणें, मुटके *m. pl.* मारणें -देणें. २ *to wash thoroughly with soap and water* (डोकें) साबण लावून धुणें, चोळून चोळून धुणें.

Shank (shank) [A. S. *sceanca*, the leg.] *n. the part of the leg between knee and ankle* ढोंपर *n*. २ *the shin-bone* नळी *f*, नळा *m*, नळकुटी or नळगुटी *f*, नळगुडी *f*, नडघा *m*, नडगी *f*. ३ (in contempt) *the whole leg* तंगडी *f*, तंगड *n*, डोंका or डोका *m*, टांग *f*. [LONG SHANKED लांबटांग्या.] ४ *the shaft of an anchor or column* (खांबाचा) वाटोळा दांडा *m*. ५ (*print.*) टाइपाची जाडी *f*.

Shan't, contraction of shall not.

Shape (shāp) [A. S. *sceapan*, form.] *n. form* आकार *m*, आकृति *f*, घाट *m*, डौल *m*, वळण *n*, रूप *n*; as, "Spherical in S.; Has the S. of a boat." २ *appearance, guise* (बाह्य) रूप *n*, आकार *m*; as, "Monster in human S." ३ *concrete presentment, embodiment* (मूर्त) स्वरूप *n*, (शब्दांनीं) व्यक्त स्वरूप, आकार *m*, रूप *n*; as, "Intention took S. in action." ४ *kind, description, sort* स्वरूप *n*, तऱ्हा *f*, रीत *f*, प्रकार *m*; as, "Made no overtures in any S. or form." ५ *symmetrical or definite form, orderly arrangement* व्यवस्थित स्वरूप *n*, निश्चित

स्वरूप *n*, ठराविक ठसा *m*; as, "To get one's ideas into S." [To LICK INTO S. ठरींव सांच्यांत बसवणें. To GIVE S. TO (-ला) व्यवस्थित आकार देणें. To TAKE S. (-ला) निश्चित आकार येणें, व्यक्त स्वरूप प्राप्त होणें.] ६ *apparition, ghost* भूत *n*, मनुष्याकृति *f*; as, "A S. loomed through the mist." ७ (कारागिरांकरितां) नमुना *m*, सांचा *m*.

Shape *v. t. to form, to fashion* बनविणें, घडणें, तयार करणें, (-ला इच्छित) आकार देणें; as, "Grace *shaped* her limbs, and beauty decked her face." २ *to adapt, to make conform to* मिळता करणें, जुळता करणें -करून घेणें; as, "I S. my foolishness to their desire." ३ *to plan, to devise* (बेत वगैरे) ठरविणें, निश्चित करणें. ४ *to regulate* ठरविणें, निश्चित करणें, (ची) दिशा ठरवणें; as, "To S. the course of a vessel." ५ *to imagine, to conceive* कल्पनेनें (मनापुढें) उभें करणें, कल्पणें; as, "Oft my jealousy *shapes* faults that are not." S. *v. i. to give signs of future shape* पुढचा आकार दिसूं लागणें, (ला) आकार येणें; as, "This *shapes* well."

Shape'less *a. without regular form* बेडौल, बेढब, अरूप, विरूप, कुरूप, रूपहीन, आकारहीन, विद्रूप. Shape'lessness *n.* बेडौलपणा *m*, बेढबपणा *m*, विरूपता *f*, विद्रूपपणा *m*.

Shap'eliness *n.* डौलदारपणा *m*, निटसपणा *m*, आकारशुद्धता *f*, वळणशुद्धता *f*, अवयवशुद्धता *f*, बांधेसूदपणा *m*. Shape'ly *a. comely, symmetrical* डौलदार, रूपस, निटस, नीटनेटका, बेताबाताचा, आकारशुद्ध, रूपशुद्ध, अवयवशुद्ध, बांधेसूद.

Shap'er *n.* आकार देणारा, वळण देणारा; as, "The S. of one's fortunes." २ आकार देण्याचें यंत्र *n*.

Share (shār) [A. S. *scear.*] *n. ploughshare* (नांगराचा) फाळ *m*. [S. BEAM वसू.]

Share (shār) [A. S. *scearu*, a cutting.] *n. a portion* भाग *m*, हिस्सा *m*, वांटा *m*, वांटणी *f*, अंश *m*. [To GO SHARES (नफानुकसान) सारखें वांटून घेणें. CALCULATING THE SHARES हिस्सेरसी *f*. EQUAL S. सारखा वांटा *m*, समभाग *m*. SCHEDULE OF SHARES वांटणीपत्र *n*. S. AND S. ALIKE सारखी वांटणी करून. LION'S S. See Under Lion.] २ *a part one gets or contributes* भाग *m*, वांटा *m*, अंग *m*; as, "Had a large share in bringing it about, but no S. of the credit." ३ *part-proprietorship* (समाईक इस्टेटींत) भाग *m*, हिस्सा *m*, अंश *m*, पाती *f*, भागी *f*. [HALF S. अर्धेल *f*. PERSON HOLDING IT अर्धेली, अर्धेल्या.] (b) (कंपनीनें भांडवल जमविण्याकरितां काढलेले) भाग, शेअर. [PREFERENCE SHARES सवलतीचे भाग *m. pl.* हे भाग घेणारांना ठराविक व्याज, किंवा फायद्याचा ठराविक हिस्सा देण्याची कंपनीनें हमी घेतलेली असते; व कंपनीचें दिवाळें निघालें असतां, तिच्या राहिलेल्या मालमत्तेवर या भागीदारांचा पहिला बोजा असतो. ORDINARY SHARES साधे

भाग *m. pl.* सवलतीच्या भागीदारांना नफा वांटून झाला म्हणजे शिल्लक राहिल्यास त्या नफ्याची वांटणी साध्या भागीदारांना मिळते. DEFERRED SHARES मागचे भाग *m. pl.* सवलतीच्या भागीदारांना व साध्या भागीदारांना ठरलेला नफा वांटून झाला म्हणजे कांहीं रक्कम शिल्लक राहिल्यास ती मागच्या भागीदारांना कंपनीच्या नियमांप्रमाणें मिळते. S. HOLDER शेअरवाला *m*, भागीदार *m*. S. LIST ( निरनिराळ्या कंपनींतील ) शेअरांचें ( चालू भावांचें ) पत्रक *n*. S. BROKER शेअरांचा दलाल *m*. S. CAPITAL भाग काढून जमविलेलें भांडवल *n*, शेअरांचें भांडवल *n*. ] S. *v. t. to apportion* **वांटणें, वांटणी करणें, वांटे पाडणें.** २ *to give away part of* **वांटून देणें, वांटून घेणें.** ३ *to partake with another* **(-चा) वांटेकरी होणें.** S. *v. i. to participate, to part* **वांटा घेणें, वांटा मिळणें** *in. con.*, **वांटा असणें, (-च्या बरोबर ) भाग ठेवणें;** as, "Will S. with you in the undertaking."

Shared *pa. t.* S. *pa. p.* **वांटलेला, वांटणी केलेला.** २ **वांटणी करून दिलेला. ३ सहोपभोग केलेला, सहोपभुक्त.**

Sharer *n.* भागीदार *m*, हिस्सेदार *m*. Sharing *pr. p.*

Shark ( shärk ) [Of doubtful Origin. ] *n.* **शार्क मासा** *m*. २ *a person who preys on others* **ठक** *m*, **छट** *m*. S. *v. i. to play the swindler* **ठकवणें, फसवणें;** as, "*Sharks* for a living." S. *v. t. to gather up by dishonest means* **लवाडीनें (पैसा) मिळवणें.** २ *to swallow voraciously* **(अधाशासारखें) गपागप खाणें.** Shark'er *n. a swindler* **फसविणारा** *m*, **छट** *m*.

Sharp ( sharp ) [ A. S. *scearp.* ] *a. keen-edged, not blunt* **तिखट धारेचा, धारेचा, पाणी दिलेला, पाणीदार, लागणारा, तीक्ष्ण.** २ *peaked, pointed* **(पुढें) टोंकदार, अणीदार, टोंक आलेला, टोंक असलेला, अणकुचीदार, तीक्ष्णाग्र, सूच्यग्र, तीक्ष्ण;** as, "A S. summit, ridge, &c." ३ *well-defined* **स्पष्ट, सूक्ष्म, स्पष्ट करून सांगितलेला, स्पष्ट केलेला;** as, "A S. distinction." ४ *clean-cut* **स्पष्ट, रेखीव, स्पष्टपणें काढलेला, रेखलेला;** as, "S. outline; S. features." ५ *abrupt, angular* **एकदम वळणारा;** as, "A S. turn." ६ *pungent, acid* **आंबट, तिखट;** as, "A S. flavour; S. wine." ७ *shrill, piercing* **कर्कश, कानठाळ्या बसविणारा, कर्णकटु;** as, "S. voice, S. cry." ८ *biting* **झोंबणारा, कडक, कडाक्याचा, खर, तीव्र;** as, "S. cold; S. frost; S. air." ९ *harsh, sarcastic* **झोंबणारा, मर्मभेदक, कठोर, लागणारा, लागट, खोंचक, तीक्ष्ण, तिखट, झणझणीत;** as, "S. words; S. tongue." १० *acrimonious, severe* **कडक, तीक्ष्ण, झणझणीत;** as "S. temper." ११ *painful* **तीव्र;** as, "S. attack of gout." १२ *acute, quick* **तीक्ष्ण, तीव्र, तिखट;** as, "S. eyes; S. ears." १३ *keen-witted, clever* **चुणचुणित, शहाणा, हुशार, चलाख, कुशाग्रबुद्धि, तीक्ष्णबुद्धि, चौरस, सुजाण, धूर्त, चिमखडा, चपळ.** [ To KEEP A S. LOOK-OUT ( चोहोंकडे ) बारीक नजर ठेवणें. As S. AS A NEEDLE फार हुषार, कुशाग्रबुद्धि. ] १४ *careful of one's own interest* **स्वार्थदक्ष, स्वार्थतत्पर.** १५ ( person ) *unscrupulous*, **लुच्चा, छट.** १६

(act) लुच्चाईचा, लबाडीचा, लुच्चेगिरीचा. १७ *vigorous, not loitering* झपाट्याचा, जोराचा, न रेंगाळणारा; as, "To take a S. walk."

Sharp *v. i.* (खेळांत) लबाडी करणें.

Sharp *n. a cheat* लबाड मनुष्य *m*, फसव्या *m*. २ (*pl.*) *the harder parts of ground wheat* रवा *m*.

Sharp *adv. exactly to the appointed time* ठरल्या वेळीं, नक्की, बरोबर; as, "At 3 p. m. *sharp*."

Sharp-edged *a.* तीक्ष्ण धारेचा, तिखट धारेचा.

Sharp'en *v. t. to give a keen edge to* धार लावणें, धार काढणें, पाणी देणें, (वस्तरा) लावणें. (b) टोंकदार करणें, अणकुचीदार करणें, टोंक काढणें. २ *to make more eager* (इच्छा) अधिक तीक्ष्ण करणें, (भूक) अधिक प्रदीप्त करणें, अधिक तेज करणें. ३ (दुःख) अधिक तीव्र करणें; as, "To S. pain or disease." ४ अधिक मर्मभेदक करणें, अधिक कठोर -कटु करणें; as, "To S. each word." ५ *to render more shrill or piercing* अधिक कर्कश करणें; as, "To S. sound." ६ *to make more acid* अधिक आंबट करणें, अधिक तीव्र करणें; as, "The rays of the sun S. the vinegar."

Sharp'ened *pa. t.* S. *pa. p.* धार लावलेला, धार काढलेला, पाणी दिलेला. २ टोंकदार केलेला, अणीदार केलेला. ३ अधिक प्रदीप्त केलेला. ४ अधिक तीव्र केलेला. ५ अधिक कठोर केलेला, अधिक मर्मभेदक केलेला. ६ अधिक कर्कश केलेला. ७ अधिक आंबट केलेला.

Sharp'ening *pr. p.* धार लावणारा, &c. For more meanings, See the verb.

Sharper *n. a cheat* धूर्त *m*, फसव्या *m*, लबाड *m*.

Sharp'ly *adv.* सूक्ष्मपणानें, बारकाईनें.

Sharp'ness *n.* तीक्ष्णता *f*, पाणी *n*. २ टोंकदारपणा *m*, बोंचरेपणा *m*. ३ सूक्ष्मता *f*, स्पष्टता *f*. ४ रेंखलेपणा *m*. ५ आंबटपणा *m*. ६ कर्कशपणा *m*, कर्णकटुता *f*. ७ कडकपणा *m*. ८ लागटपणा *m*, मर्मभेदकपणा *m*. १० तीव्रता *f*, तीक्ष्णता *f*, शीघ्रग्राहित्व *n*. ११ चुणचुणितपणा *m*. १२ स्वार्थतत्परता *f*. (b) लुच्चाई *f*.

Sharp-pointed *a.* टोंकाचा, टोंकदार, अणीदार, तीक्ष्णाग्र.

Sharp-set *a. hungry* भुकावलेला, भूक लागलेला, बुभुक्षित, क्षुधार्त.

Sharp-shod *a.* (of horses) खरखरीत -अणकुचीदार नाल [मारलेला.

Sharp-shooter *n.* अचुकसंधानी, अचूक बंदूक मारणारा, नेम मारणारा *m*.

Sharp-sighted *a.* तीक्ष्णदृष्टीचा, डोळस, तीव्रदृष्टि. २ हुशार, सूक्ष्मबुद्धि. S. -sightedness *n.* तीक्ष्णदृष्टि *f*, तीव्रदृष्टि *f*.

Sharp-witted *a.* तीक्ष्णबुद्धि, कुशाग्रबुद्धि, तीक्ष्णबुद्धीचा, [कुशाग्रबुद्धीचा.

Shatter (shat'ėr) [A doublet of Scatter.] *v. t.* तुकडेतुकडे करणें, चकाचूर करणें, खुर्दा -चुराडा करणें, खंडविखंड करणें -करून टाकणें, शतचूर्ण करणें. २ *to ruin* (hopes) भंग करणें, मोडणें, नाश *m* -विघात *m*. करणें, धूळ *f* -घाण *f* -माती करणें *g. of o.* ३ *to disorder* (nerves, constitution &c.) बिघडविणें, नाश करणें, मातेरें करणें. ४ (बुद्धि) बिघडविणें. S. *v. i. to*

*be broken into fragments* फुटणें, चुराडा होणें, तुकडे-तुकडे होणें, चकाचूर -चकनाचूर होणें, मोडणें, बिघडणें, नाश होणें. S. *n.* (chiefly in the phrase *into shatters*) *a fragment* तुकडा, खुर्दा *m*, चूर *m*, चुरा *m*.

Shat'ter-brained, Shatt'er-pated *a. disordered in intellect* डोकें फिरलेला, डोकें बिघडलेला, वेड लाग-लेला.

Shat'tered *pa. t.* S. *pa. p.* तुकडेतुकडे केलेला, चकाचूर -चकनाचूर केलेला. २ भंग केलेला, मोडलेला, मोड केलेला. ३ बिघडवलेला, बिघडलेला.

Shat'terer *n.* चुराडा करणारा *m.* Shat'tering *pr. p.* चुराडा करणारा, &c. Shat'tery *a. brittle* ठिसूळ, सहज मोडणारा, सहज फुटणारा; as, "A S. spar."

Shave (shāv) [A. S. *scafan*, Dut. *schaven*, to rub, to shave.] *v. t.* हजामत *n.* करणें, क्षौर *f.* करणें, श्मश्रु करणें. २ (beard, whiskers, &c.) दाढी करणें. ३ (in contempt) भादरणें, बोडणें, तासणें. [To S. CLEANLY झील चढवणें, गुळगुळीत हजामत करणें.] ४ *to pare off* तासणें, तासणी *f.* करणें. ५ *to pass close to without touching* (थोड्यावरून) निसटून जाणें, निसटता जाणें, थोडक्यांत चुकणें. ६ *to cheat* फसवणें, लुबाडणें, गंडा घालणें, गंडवणें, लुबाडणी *f.* करणें. S. *v. i.* हजामत करणें, हजामत बनविणें; as, "He does not S. every-day." Shaved *pa. t.* Shaved, Sha'ven *pa. p.*

Shave *n. having one's beard, &c. shaved* दाढी करणें *n* -करवणें *n*, हजामत करणें *n* -करवणें *n*, हजामत *f*, दाढी *f*; as, "Must have a S.; A penny S." २ *close approach without contact, narrow escape* निसटून जाणें *n*, थोडक्यांत चुकणें *n*; as, "Had a close S. of it." ३ *a thin slice, a chip* ढलपी *f*, ढलपा *m*, ढपली *f*, सळप *n.* ४ *trick, deception* ठगाई *f*, फसवेगिरी *f*, लुच्चाई *f*, लुबाडणी *f.* ५ (*mech.*) *a spokeshave* कोकशी *f.*

Shave-hook *n.* भांड्यांना डांख करण्यापूर्वीं तीं खरवड-ण्याचें हत्यार *n*, खरवडणी *f.* कासाराचा (आडणी-सारखा) रंधा *m.*

Sha'ver *n.* हजामत करणारा *m*, specifically न्हावी *m*, नापिक, हजाम, कारागीर *m.* २ *one who is sharp in bargains, a cheat* (व्यवहारांत) धूर्त *m*, लुच्चा *m*, सोदा *m*, फसव्या *m.* ३ (*mech.*) कोकशीचें यंत्र *n.*

Sha'ving *pr. p.* S. *n.* हजामत करणें *n*, हजामत *f.* [S. BRUSH (हजामत करतांना साबण लावण्याचा) न्हाव्याचा ब्रश *m.*] २ (*usu. pl.*) *a chip* ढलपी *f*, ढलपा *m*, ढपला *m*, सळप *n.* [SHAVINGS (OF IRON) कीस *m*, भुगा *m*, भुसा *m.* SHAVINGS (OF WOOD) सळपें *n. pl.*]

Shaving-horse तासकामाचा घोडा *m.*

Shawl (shawl) [Pers. *shal*, a fine cloth.] *n.* शाल *f.* [COLOURED S. (for boys) पामरी, (for girls) फडकी *f.* DOUBLE SHAWL शालजोडी *f.*] S. *v. t. to put a shawl on* (a person) शाल (वर) घालणें, शाल ओढणें, (-वर) शाल घालून झांकणें.

She ( shē ) [M. E. *sche.*] *pron. fem.* ती *f.* S. *n.* *a woman, a female* स्त्री *f*, ती *f*; as, "Is the child a he or she?" (b) मादी *f*; as, "A litter of two *shes* and a he." S. *a.* ( usually hyphened ) *female* मादी; as, "S. -goat, S. -ass." (b) स्त्री; as, "S. -devil." She *v. t.* (in theatrical language ) स्त्रीचा वेष देणें; as, "She him."

Sheaf ( shēf ) [A. S. *sceaf.*] *n. a bundle of stalks of wheat, &c.* पेंढी *f*, पेंडकी *f*, कवळी *f*, भारा *m.* २ *a collection* ( कागदांचा ) जुडगा *m*, जुडगें *n*, पुडकें *n*, ( बाणांचा ) भारा *m*, remissly ढीग *m*, रास *f*. ३ *a wheel moving in a block* चक्री *f*. Sheaves *n. pl.*

Sheaf *v. t. to bind in sheaves* पेंढ्या बांधणें, कवळ्या करणें, भारा बांधणें. Sheafed *pa. t.* and *pa. p.* Sheaf'ing *pr. p.* पेंढ्या बांधणें, भारा बांधणें.

Shear ( shēr ) [A. S. *sceran.*] *v. t. to clip* ( as wool from a sheep's back, &c. ) कातरणें, कापणें, भादरणें, कातरणी *f* -भादरणी *f.* &c. करणें *g. of o.* २ ( *fig.* ) *to fleece* लुबाडून घेणें, नागवणें, बुचाडणें. [To S. CLOTH फूल मोडणें -नाहींसें करणें -कातरणें. ] ३ ( *mech.* ) कातरून आकार बदलणें. Sheared, (rarely) Shore *pa. t.* Shorn, (rarely) Sheared *pa. p.* Shear'er *n.* कातरणारा *m*, भादरणारा *m.*

Shear'ing *pr. p.* S. *v. n.* कातरणें *n*, भादरणें *n*, कातरणी *f*, भादरणी *f*, कापणी *f.* २ कातरणी करून काढलेली लोंकर *f*; as, "The whole *shearing* of a flock." ३ पहिल्या कातरणीचें मेंढरूं *n.* ४ कात्र्यांना उपयोगीं पडणारें पोलाद तयार करण्याची पद्धति *f.*

Shear'ling *n. sheep once shorn* पहिल्या कातरणीचें मेंढरूं *n.*

Shears *n.* ( *pl.* ) *a large kind of scissors* कैंची *f*, कातर *f*, कर्तरी *f.* २ *a shearing* ( used in designating the age of sheep ) कापणी *f*, कातरणी *f*, भादरणी *f*; as, "A two-*shear* ram."

Shear-steel *n.* चाकू, कात्री, वगैरे हत्यारांचें पोलाद *n.*

Sheath ( shēth ) [A. S. *sceath*, a sheath. ] *n. a case for a sword, knife, etc.* म्यान *n*, मेण *n*, ( सुरीचें ) शांकण *n*, कोष *m.* [ S. OF A FIDDLE गवसणी *f.* S. OF A DRUM गिलेफ. ] २ ( *bot.* ) पानाच्या देंठाचें वेष्टन *n*, देंठवेष्टन *n*, पर्णदंड वेष्टन *n.* ३ ( *zool.* ) ( कीटकाच्या पंखाचा ) कोष *m* ४ ( *anat.* ) वेष्टन *n.* [ MEDULLARY S. मज्जामय वेष्टन *n*, मज्जावेष्टन *n.* ] ५ *a structure of loose stones for confining a river within banks* तीरावरचा बं[illegible] *m*, गडगा *m.*

Sheathe ( sh[illegible]h ) [ A. S. *sceath* ] *v. t. to put into a sheath* ( तरवार ) [illegible]नांत घालणें -ठेवणें. [ To S. THE SWORD, *to cease from war* लढाई बंद करणें, तह *m* -संधि *n* -समेट करणें. ] २ ( of a ship ) *to case with sheets of copper* तांब्याचा पत्रा चढवणें, तांब्याच्या पत्र्यानें मढविणें. ३ *to protect with a casing* ( -ला ) आवरण *n* -वेष्टण घालणें. (b) गवसणी *f* -गिलेफ *m.* घालणें. Sheathed *pa. t.* S. *pa. p.* म्यानांत घातलेला.

२ पत्रा चढविलेला. ३ वेष्टण घातलेला, आच्छादन घातलेला. ४ (*bot.*) *invested by a sheath* (*as* the stalk or culm) वेष्टित, वेष्टन असलेला, वेष्टनयुक्त. Sheath'ing *pr. p. a. inclosing with a sheath* वेष्टक, वेष्टनकारी; as, "The S. leaves of grasses." S. *n.* आगबोटीला मारलेला तांब्याचा पत्रा *m*, ताम्रपत्रकवच *n*.

Sheave ( shēv ) [ Low Ger. *schive*, a disc.] *n. the wheel of a pulley* चक्री *f*, चक्कर *n*.

Sheaves, *pl.* of Sheaf.

Shed ( shed ) [A. S. *sceddan*, to shed.] *v. t. to part with, to throw off* पाडणें, बाहेर टाकणें, बाहेर फेंकणें, पसरणें; as, "To *Shed* light." २ *to pour forth*, or *out* गाळणें, ढाळणें, पाडणें, सांडणें, वाहविणें; as, "To *shed* tears; To shed rain." [To S. TEARS रडणें, आंसवें *n. pl.* -अश्रू *m. pl.* गाळणें -काढणें -ढाळणें.] ३ *to let fall, to cast* गाळणें, झाडणें, टाकणें, सांडणें; as, "Fowls *shed* their feathers. Trees S. leaves." [To BE SHED गळणें, झडणें.] ४ *to cause* (other's blood) *to flow* ( रक्ताचा पूर ) वाहविणें, (रक्त) पात करणें. ५ *to cause to flow off without penetrating* वरच्यावर वाहविणें -वाहून नेणें; as, "A covering of oiled cloth *sheds* water." ६ ( *weaving* ) पेला पाडणें. S. *v. i. to let fall* (फळाचें किंवा बियाचें वरचें साल) गळणें, गळून जाणें. Shed *pa. t.* and *pa. p.*

Shed *n. the act of shedding* ( used in composition as in blood-shed ) पात करणें *n*, ( रक्ताचा पूर ) वाहविणें *n*. २ *that which parts, divides, or sheds* (in water-shed) विच्छेदक, विभाजक. ३ ( *weaving* ) पेला *m*.

Shed ( shed ) [A variant of *Shade.*] *n. a temporary erection* छप्पर *n*, छप्परी *f*, आवसा *m*, निवारा *m*. (b) ( for goods, workshop,) छप्पर *n*. (c) सोपा *m*, पडवी *f*. [Cow S. गोठा *m*, वेडें *n*. FESTIVE S. मांडव *m*, मंडप *m*. FORKED POST OF FESTIVE S. मांडवमेढ *f*. LONG S. सोपा *m*. OPEN AND RUDE S. मांगर *m*. S. FOR CATTLE DURING THE HEAT OF THE DAY कावण *n*, खानवटा, खानवठा *m*. RUNNING S. इंजिनें (बाहेर) सोडण्याची छपरी *f*. WAITING S. इंजिनें थांबण्याची छपरी *f*. WORK S. कारखाना *m*.]

Shed'der *n.* गाळणारा *m*, ढाळणारा. २ वाहविणारा *m*, &c; as, "A S. of blood."

Shed'ding *n.* गाळणें, झाडणें *n*, ढाळणें *n*, वाहविणें *n*.

Sheen ( shēn ) [A. S. *scene*, bright.] *n. brightness, glitter, splendour* चकचकीतपणा *m*, चकाकीतपणा *m*, चकचकाट *m*, लखलखाट *m*, तेज *n*, तेजस्विता *f*, चकाकी *f*, लकाकी *f*; as, "Throned in celestial S."

Sheep ( shēp ) [A. S. *sceāp.*] *n.* मेंढा *m*, मेंढी *f*, मेंढरूं *n*, मेष *m*, मेषी *f*. २ *a simpleton* भोळा *m*, साधा *m*, अजागळ *m*, बावळट *m*, आचरट *m*. ३ ( in *pl.* ) *fig.* पांढरींतील लोक *m. pl.*, ख्रिस्ताचा कळप *m*. [BLACK S. *scoundrel* पाजी इसम *m*, हरामी *m*. TO CAST SHEEP'S

EYES (*at*) प्रेमकटाक्ष फेंकणें, डोळे मारणें. TO FOLLOW LIKE S. (स्वतः कर्तबगारी नसल्यामुळें) दुसऱ्याच्या तंत्रानें (मेंढरासारखें) चालणें. S. THAT HAVE NO SHEPHERD निराश्रित लोक *m. pl.*, (मुधानी नसल्यामुळें) सैरवैर झालेले लोक *m. pl.*, अस्ताव्यस्त झालेले लोक *m. pl.* S. COT, S. COTE, S. FOLD, S. PEN मेंढवाडा *m.* SHEEP DOG धनगराचा कुत्रा *m.* SHEEP FARMER, मेंढरांची उपज करणारा. S. RUN, S. WALK (मेंढरांकरितां) चराऊ रान *n*, कुरण *n*. S. SHEARING मेंढ्यांची लोंकर कातरणें. २ लोंकर कातरण्याचा सण *m.*] Sheep'ish *a. overmodest, meanly diffident* नेभळट, लाजरा, बावळट, मेलतोंड्या, मेंगा, मेषरास, मेषपात्र. Sheep'ishly *adv.* नेभळटपणानें, मेलतोंडेपणानें, बावळटपणानें, मेंढरासारखा. Sheep'ishness *n.* नेभळटपणा *m*, बावळटपणा *m*, मेषपात्रपणा *m*, लाजरेपणा *m*, मेलतोंडेपणा *m.*

Sheep-cot, See under Sheep.

Sheep-fold *n.* See under Sheep.

Sheep-master *n.* मेंढरांच्या कळपांचा धनी *m.*

Sheer (shēr) [A. S. *scir*, clear.] *a. mere, simple, downright, absolute* निवळ, निखालस, केवळ, शुद्ध; as, "S. force, S. waste." २ (of rock) *very steep* उभा, सुळासारखा, उभ्या सुळाचा, मोठ्या चढाचा, उभ्या चढाचा; as, "A S. precipice of a thousand feet." ३ (of cambric, &c.) *very thin or transparent* फार पातळ, तलम. S. *adv. perpendicularly* उभा, उभाच्या उभा, सरळ; as, "Fell 3000 ft. S."

Sheer (shēr) [A form of *sheer.*] *v. i.* (of a ship) *to turn from the right course* (सरळ रस्ता सोडून) बाजूला वळणें -झुकणें -जाणें, वाट सोडून जाणें. [TO S. OFF (आपणांस अप्रिय किंवा अपमान करणाऱ्या मंडळींतून) निघून जाणें.] S. *n.* गलबत बाजूला वळणें *n* -झुकणें *n.*

Sheet (shēt) [Lit. "That which is *shot* or spread out. A. S. *sciete -sceotan*, to shoot, to extend.] *n. a broad piece* (of linen or cotton cloth) चादर *f*, चद्दर, पलंगपोस. [S. GATHERED UP AT THE CORNERS झोळणा *m*, झोळी *f.*] (b) (कागदाचा) ताव *m*, पान *n*, दुटें *n*, दुट्टा *m*, दुंडा *m.* [HALF S. पान *n.* S. DOUBLED INTO FOUR LEAVES चौवंदी पान; -INTO TWO LEAVES दुवंदी पान *n.* S. DOUBLED BREADTHWISE वंद *m.*] (c) (धातूचा) पत्रा *m*, पट *m*, पत्र *n*, *n*, तकट *n*, तकटें *n.* (d) (आगीचा) लोळ *m*, डोंब *m*, लोट *m.* (e) (कांचेचें) पान *n*, पत्रा *m.* (*f*)(पाण्याचें) विस्तृत क्षेत्र *n*, विस्तृत आशय *m.* २ *an extended surface* (of snow, ice, &c.) मैदान (*fig.*), विस्तीर्ण प्रांत *m.* ३ *a sail* शीड *n.* ४ *a rope at the lower corner of a sail* वासरूं *n.* ५ (a) *a letter* पत्र *n*, चिठी *f.* (b) *a newspaper* वर्तमानपत्र *n*, वृत्तपत्र *n.* [S. ANCHOR (सर्वांत) मोठा नांगर *m*, मोठा लंगर *m.* २ *one's main support* निदानींचा आसरा *m.* S. LIGHTNING लांबवर पसरलेला विजेचा लोळ *m.*] Sheet *v. t. to cover with a sheet* (-वर) चादर घालणें. २ वस्त्रांत गुंडाळणें

-ढांकणें; as, "The *sheeted* dead." ३ *to extend as a sheet* (वस्त्रासारखें लांबलचक) पसरणें. ४ वासरानें शीड बांधणें. Sheet'ed *pa. t.* and *pa. p.* Sheet'ing *pr. p.* S. *n.* चादरीचें कापड *n.*

Sheet-iron लोखंडाचे पत्रे.

Sheet-metal धातूचे पत्रे.

Shelf (shelf) [A. S. *scylfe.*] *n. a horizontal board* (कायम मारलेली) फळी *f.* २ *a ledge* (of rocks) (एकावर एक चढत गेलेल्या पायऱ्यांसारखी) थराची पायरी *f.* ३ *a sandbank* भाटी *f.* Shelves *n. pl.* [ON THE SHELF मागें टाकलेला, मागें पडलेला.]

Shell (shel) [A. S. *scell.*] *n.* (of an egg, a nut, &c.) कवची *f,* कंवटी *f,* कवच *n.* [COCOANUT S. कवटी *f,* करटी *f,* नरटी *f,* नरोटी *f.*] २ (of an animal) घर *n,* कवची *f,* कवच *n.* [CONCH-SHELL शंख *m,* शंबूक *m.* OYSTER S. शिंपला *m,* शिंपा *m,* कालव *n* —HALF OF ONE S. शिंप *f,* शिंपी *f,* शुक्ति *f.* S. OF THE CYPROCA MONETA कवडी *f.*] ३ (of the seeds of plants) *husk* साल *n,* टरफल *n.* ४ (as of a house) सांगाडा *m.* ५ (of a tent) कलंदरा *m,* कलंद्रा *m.* ६ *a bomb* तोफेचा गोळा *m.* ७ कुलपी गोळ्याची कवची *f.* ८ (*poet.*) *lyre* वीणा *m.* ९ *inner coffin* प्रेताची (आंतली) पेटी *f.* १० *outline of a plan* रूपरेषा *f.* ११ *a light racing boat* शर्यतीची हलकी होडी *f.* [TO COME OUT OF ONE's S. मंडळींत मिसळणें, मंडळींत येऊन गप्पागोष्टी करणें.] S. *v. t. to break off, to take out of the shell* फोडणें, सोलणें, सोलून -फोडून काढणें, (शेंगा) फोलणें. २ *to assault with bombs* कुलपी गोळ्यांचा भडिमार करणें, कुलपी गोळे टाकणें -फेंकणें -सोडणें. S. *v. i.* कवटी *f* -कवच *n* -साल *n.* वगैरे गळणें -गळून पडणें. २ *to fall out of the pod or husk* (शेंगांतून किंवा टरफलांतून) बाहेर येणें -पडणें; as, "Nuts *shell* in falling." ३ *to be disengaged from the ear* गळणें, घळणें; as, "Wheat or rye *shells* in reaping." Shelled *pa. t.* S. *pa. p.* सोललेला, सोलींव. [A S. BEAN, PEA, &c. सोला, सोलाणा *m.* SPECIFICALLY (हरभऱ्याचे) सोलाणे, सोले, (वाटाण्याचे) मटर *m. pl.*] २ कुलपी गोळे टाकलेला, &c. S. *a.* (*zool.*) (as a snail) *having a shell* घर असलेला, कवच असलेला, सकवच, कवची. Shel'ling *pr. p.* Shell'-less *a.* कवची नसलेला, कवचहीन. Shell'-proof *a.* कुलपी गोळ्यांना दाद न देणारा, कुलपी गोळ्यांनीं अभेद्य. Shell'y *a.* शंख, शिंपा वगैरे असणारा -आढळणारा; as, "A S. shore."

Shellac (shel'lak) [Shell + Lac.] *n. lac prepared in thin plates* लाखेच्या कांड्या *f. pl.* [Written also Shell-lac.]

Shell-proof, See under Shell.

Shelly, See under Shell.

Shelter (shel'tėr) [A. S, *scild,* a shield, and *truma,* a troop.] *n. that which shields or pro-*

tects, a refuge, a retreat आश्रय m, आसरा m, छाया f, थारा m, थार m, शरण n, छत्र n. [S. FROM WIND निवारा m.] २ place of safety or immunity निवाऱ्याची जागा f, निर्धास्त स्थळ n. ३ shielded condition आसरा m, निवारा m. [IN S. निवाऱ्यास, आडोश्यास. TO TAKE S. आश्रय m -आसरा m. करणें. TO FIND S. आश्रय -आसरा मिळणें.] ४ protection सावट f, आडोसा m. ५ a guardian आश्रय देणारा m, आश्रयस्थान n, आश्रय m. S. v. t. to give shelter to आश्रय देणें, आसरा देणें, पाखर f. घालणें. २ (one's self) आश्रयास जाणें, आश्रय m, करणें, आसरा m. करणें. ३ to protect बचाव करणें. Shel'tered pa. t. S. pa. p. आश्रय दिलेला, आश्रय केलेला. Shel'tering pr. p.

Shel'terless n. निराश्रय, आश्रयरहित, निराश्रित, आसरा नसलेला.

Shelve (shelv) [From Shelf.] v. t. to put on shelf (पुस्तकें वगैरे) फळीवर ठेवणें. २ (fig.) to abandon or defer consideration of मुदतीवर टाकणें, मागें टाकणें, मागें सारणें, तहकुबीवर ठेवणें. ३ to cease to employ (a person) काढून टाकणें, उडवून देणें, कामावर न ठेवणें. ४ to fit with shelves (कपाटाला वगैरे) फळ्या मारणें. Shel'ved pa. t. and pa. p. Shel'ving pr. p. S. n. the furnishing with shelves (पुस्तकें ठेवण्याकरितां) फळ्या मारणें n. २ फळीवर ठेवणें n. ३ shelves or materials for shelves फळ्या f. pl., फळ्यांचें सामान n.

Shelve (shelv) [Unconnected with shelf. Of doubtful origin.] v. t. to slope gently उतरत जाणें, उतरता होणें; as, "The bottom shelves from the shore."

Shelv'ing [From Shelve No 2.] a. उतरता, ढळता.

Shelv'y a. full of shelves or shoals, shallow भाट असलेला, भाट्या पडलेला, पार पडलेला, उथळ.

Shepherd (shep'erd) [A. S. sceap-hyrde, sheepherd.] n. धनगर m, मेंढपाळ m, मेंढराख्या m, मेंढका m, मेंढक्या m. २ the pastor of a parish or congregation (पांढरीचा किंवा मंडळीचा) पालक m, पाळक m. [THE GOOD S. ख्रिस्त m, येशू ख्रिस्त m.] S. v. t. (poet.) to tend (sheep) मेंढरें राखणें -पाळणें. २ (fig.) जोपासना करणें, सांभाळ करणें, पालन करणें.

Shep'herdess n. fem. धनगरीण f, मेंढरें राखणारी f.

Sheriff (sher'if) [A. S. scir, shire, gerefa, a governor.] n. शेरीफ m.

N. B.—शेरीफ ही संस्था इंग्लंडांतून हिंदुस्थानांत इलाख्याच्या मुख्य शहराच्या ठिकाणीं आणलेली आहे. परंतु, हिंदुस्थानांतील शेरीफ व इंग्लंडांतील शेरीफ यांचीं कामें एकच नाहींत. शेरीफ हा अंशतः लोकांच्या तर्फेचा व अंशतः हायकोर्टाच्या तर्फेचा अधिकारी असतो. लोकांच्या तर्फेनें जाहीर सभा भरवणें, फौजदारी सेशनकोर्टांत हजर असणें, हीं मुख्यतः (हिंदुस्थानांतील) शेरिफाचीं कामें आहेत. हायकोर्टाच्या तर्फेनें ज्यूरी बोलावणें, समन्सांची बजावणी करणें, व हायकोर्टाचे हुकूमनामे बजावणें, हीं कामें त्याला करावीं

लागतात. शेरीफ या नात्यानें इलाख्याच्या मुख्य शहरांतील तुरुंग तपासण्याचा त्याला अधिकार असतो, व लोकांच्या तर्फेचा अधिकारी म्हणून लोकांतहि त्यास बरीच मानमान्यता असते. याचें हायकोर्टांत स्वतंत्र हपीस असतें.

Sher'iffalty *n.* **शेरीफचा हुद्दा** *m.*

Sher'iffdom *n.* **शेरीफच्या अधिकाराचा प्रांत** *m.*

Sherry ( sher'i ) [ From *Xeres*, in Spain where made. ] *n.* **शेरी (नांवाची) दारू** *f.*

Shew *v.* usually written as Show.

Shibboleth ( shib'bo-leth ) [ Heb. *shibboleth*, an ear of corn *shabal* to grow. See *Judges* XII. 6. ] *n.* ( Old Testament ) **एफ्राइमी व गिलादी लोकांमधील भेद जाणण्याकरितां योजिलेला शिबोलेथ हा शब्द. शिबोलेथ शब्दामधील शचा उच्चार एफ्राइमी लोकांस करतां येत नसे. शिबोलेथचा उच्चार एफ्राइमी लोक सिबोलेथ असा करीत. २ खुणेचा शब्द** *m*, **संकेतशब्द**; as, "Guru Nanak ki fateh is the S. of the Sikhs."

Shield ( shēld ) [A. S. *scild*, to defend.] *n.* **ढाल** *f*, **फलक** *m.* [ARMED WITH A S. ढालाईत, फलकपाणि. ] २ *one who or that which defends* **ढाल** *f* ( *fig.* ), **संरक्षण** *n*, **संरक्षक** *m*, **रक्षणकर्ता** *m.* ३ *cover, protection* **पांघरूण** *n*, **राखण** *n*, **रक्षण** *n.* S. *v. t. to cover, to defend* **रक्षण करणें, संरक्षण करणें, (-वर) ढाल धरणें, राखणें.**

Shield'less *a.* **ढाल नसलेला. २ बचावाचें साधन नसलेला, संरक्षणाचें साधन नसलेला.**

Shift ( shift ) [O. E. *sciftan*, to divide.] *v. t. to change the place of* **बदलणें, जागा** *f.* **बदलणें, स्थळ** *n* **-स्थान बदलणें, हालवणें, (जागेचा) पालट करणें**; as, "To S. a burden from one shoulder to another; To S. the blame." २ *to change the position of* **फिरवणें, दिशा बदलणें, रोंख पालटणें -बदलणें, दिशेचा पालट -बदल करणें**; as, "To S. the helm or sails." ३ *to change* **बदलणें, पालटणें**; as, "To S. the clothes; To S. the scenes." ४ *to put out of the way by some expedient* **वाटेस लावणें, चालता करणें, निरुत्तर करणें**; as, "I *shifted* him away." [To SHIFT OFF ढकलाढकली करणें, (जबाबदारी) कोलवणें -कोलणें -लोटणें -ढकलणें. To S. ONE'S GROUND निराळी भूमिका घेणें. २ *to take up new position in an argument* निराळीच दिशा घेणें, निराळीच बाजू उचलणें. ] S. *v. i. to change place, direction, &c.* **स्थान** *n* **-स्थळ** *n* **-दिशा** *f* **-रोंख** *m.* &c. **पालटणें -फिरणें, बदलणें, दिशेचा पालट** *m* **-बदल** *m.* **पालट होणें** with *g. of s.* २ *to manage to make a livelihood* **कसा तरी निर्वाह** *m* **-गुजारा** *m* **-गुजराण** *f.* **करणें, उदरनिर्वाह करणें, हातपाय हालवणें.** ३ *to practise evasion* **लबाडी -लुच्चाई करणें, युक्तिप्रयुक्ति काढणें, उडवाउडव करणें.** ४ *to change* **बदलणें, पालटणें, हालणें.** S. *n.* (R) *a change* **(जागेचा -स्थळाचा) पालट** *m*, **बदल**

m, ( दिशेचा -रोंखाचा ) पालट m, बदल m, स्थिलंतर n, स्थानांतर n, स्थळांतर n. २ *a contrivance* युक्ति f, युक्तिप्रयुक्ति f, कल्पना f, तोड f. ३ *trickery* लुच्चेगिरी f, सवड f, सोडवण f, ( पळून जाण्याला ) वाट f, खिडकी f, कुलंगडें n. ४ *a gang of workmen who relieve others* सोडवणारे मजूर m. pl. ५ *their hours of work* ( त्यांच्या ) कामाचे तास m. pl. [To MAKE S., To MAKE A S. कसेंतरी भागवणें -चालवणें.] Shift'er n. बदलणारा m, पालटणारा, &c. २ उडवाउडवी f -टोलवाटोलवी f -लुच्चाई f -वस्तादी करणारा m -चालवणारा m.

Shift'iness n. *trickiness, resourcefulness* लुच्चेपणा m, वस्तादपणा m, डावपेंच m. pl., युक्त्या काढण्यांत तरबेजपणा m.

Shift'ing *pr. p. a.* बदलणारा, हालणारा, पालटणारा; as, "S. winds; S. opinions." [ S. SANDS दांडा m.] २ *adapted or used for shifting anything* सामान हालवण्याच्या उपयोगाचा.

Shift'less *a. without resource, skill, or energy* डावपेंच नसलेला, साधा, नेभळट; as, "S. fellow; S. management." २ सुस्त, आळशी, गैदी. Shift'lessly *adv.* बावळटपणानें, ऐदीपणानें, &c.

Shif'ty *a. tricky* हिकमती, वस्ताद, पक्का, पुरा, लुच्चा. २ *resourceful* युक्त्या f. pl. -शकला f. pl. काढण्यांत तरबेज, डोक्याचा. ३ *avoiding direct answers* व्यर्थी उत्तरें देणारा, उडवाउडवी करणारा.

Shilling ( shil'ing ) [A. S. *scilling.*] n. बारा आणे किंमतीचें चांदीचें नाणें n, शिलिंग m. [To TAKE THE KING'S ( OR QUEEN'S ) S. पलटणींत दाखल होणें. To CUT OFF (ONE'S HEIR, &c.) WITH A S. (वारसाला) एक पैहि न ठेवतां ( सगळी इस्टेट ) दुसऱ्यांना देणें. ]

Shilly-shally (shil'-li-shal'-li) [ From shall ? ] n. *a foolish wavering, want of resolution* घरसोड f, कांकूं n, होयनाहीं n, अनिश्चय m, कांकूं करणें n.

Shilly-shally *v.i. to act as if not knowing one's mind* मागेंपुढें करणें, कांकूं करणें, होय नाहीं करणें. २ *to occupy oneself with trifles* क्षुल्लक गोष्टींत वेळ घालवणें.

Shim (shim) [Of doubtful origin.] n. *thin slip or wedge used in machinery, &c., to make parts fit* ( सांधा घट्ट बसण्याकरितां मारलेली ) खीळ f, पाचर f. S. *v. t. to fit or fill up thus* खीळ मारणें, पाचर बसवणें.

Shimmer ( shim'er ) [ A. S. *scima*, lustre, brightness.] *v. i. to gleam* लिकलिकणें, लिकलिक प्रकाशणें. S. *n. a faint gleam* लिकलिक f.

Shin ( shin ) [ A. S. *scina*, the shin (*esp.* in the compound *scin-ban*, shin-bone).] n. *the large bone of the leg or the forepart of it* ( पायाची ) पुढची नळी f, नडगी f. [S. BONE *tibia* अग्रजंघास्थि n, गुडघ्यापासून घोट्यापर्यंतच्या पायाच्या नळीचें त्रिकोणाकार हाड n. S. GUARD ( worn at foot-ball ) ( फूटबाल खेळतांना घालण्याचा ) नळीवरचा स्टाकिंग. ] S. *v. t. to*

*climb up* ( tree, wall, ladder, &c. ) हात व पाय यांनीं ( आळीपाळीनें धरून ) चढणें. २ *to kick shins of, to hack* ( फुटबालांतील गड्याच्या ) नळीवर लाथ मारणें.

Shine ( shīn ) [A. S. *scinan*, light.] *n. light, brightness* चकचकीतपणा *m*, कांति *f*, चकाकी *f*, झकाकी *f*, तकाकी *f*, प्रभा *f*, तेज *n*, तकतकीतपणा *m*; as, "To put a good *shine* on boots, &c." [ To TAKE THE S. OUT OF निस्तेज -फिका करणें, टवटवी -नवेपणा नाहींसा करणें. २ ( ला ) हटवणें - मागें टाकणें. ] २ *fine weather* ऊन *n*, निवर *n*. [RAIN *or* S. हवा कशीहि असो, Lit. पाऊस असो कीं ऊन असो. ] S. *v. i. to gleam* प्रकाशणें, प्रकाश *m*. पाडणें -करणें, किरण *m. pl.* पाडणें, उजेड *m*. पाडणें. [FAINT AND TREMULOUS SHINING ( as of an expiring lamp) लिकलिकी *f*, लुकलुकी. To S. TREMULOUSLY लिकलिकणें, लुकलुकणें. To S. OUT SUDDENLY गोंडा *f*. फोडणें. ] २ *to sparkle, to glitter, to gleam* चकाकणें, चकचकणें, तकतकणें, झकझकणें, चमकणें, चकमकणें, झगमगणें, झमकणें, लकलकणें, झळकणें, झळझळणें, झिगझिगणें, लुकलुकणें, झळक *f*. मारणें, तकतक -लुकलुक -लकलक -लिकलिक करणें; –brightly, glaringly, intensely, &c. झकाकणें, झगागणें, तकाकणें, चकाकणें, झळकणें, लकाकणें. ३ *to be glossy* तकतकणें, तकतकी *f* -तजेला मारणें, तकतकीत -दैदीप्यमान दिसणें, तकतकीत -लुसलुशीत असणें, तिळतिळणें, तुळतुळणें, लुसलुसणें, टवटवणें. ४ *to be eminent or conspicuous* ( -चें ) तेज पडणें, गाजणें, प्रसिद्ध असणें, चमकणें, शोभणें; as, "Does not S. in conversation, society, &c." ५ *to be splendid, gorgeous, fine, &c.* विराजणें, विलसणें. S. *v. t. to make bright, to polish* ( घांसून -पुसून बूट वगैरे) चकचकीत -लकलकीत -स्वच्छ करणें. Shin'ing *pr. p.* प्रकाशणारा, प्रकाश पाडणारा. २ चकाकणारा, तकाकणारा, झकाकणारा, झळकणारा. ३ तकतकीत -लुसलुशीत असणारा, दैदीप्यमान, शोभमान, प्रकाशमान, तेजस्वी, तेज पडणारा. ४ *illustrious, distinguished* ढळढळीत, ठळक, प्रख्यात, प्रसिद्ध. ५ *having the surface smooth and polished* तुळतुळीत, गुळगुळीत; as, "S. leaves." Shi'niness *n.* चकचकीतपणा *m*, प्रकाशितपणा *m*. Shin'y *a. bright* चकचकीत, लकलकीत. २ *glossy* गुळगुळीत, तुळतुळीत, लुसलुशीत. ३ *cloudless* स्वच्छ, निरभ्र; as, "S. day." Shone, ( in Bible Shined ) *pa. t.* and *pa. p.*

Shingle ( shing'gl ) [Scan. *singla*.] *n.* ( on seashore ) *gravel and pebbles* रेंव *f*, वाळू *f*, कंकर *m*, गोटा *m*. Shin'gly *a.* रेंव, वाळू गोटे इत्यादि असलेला.

Shingle ( shing'gl ) [ L. *scindula*, a plank. ] *n.* छपराकरितां वापरण्याची पातळ लांकडी फळी *f*. S. *v. t.* फळ्यांचें छप्पर करणें.

Shingles ( shing'glz ) [ L. *cingula*, a girdle. ] *n. pl.* Same as Herpes Zoster, which see under Herpes.

Shingly, See under Shingle No. 1.

Shininess, See under Shine.
Shining, See under Shine.
Shinto (shin-tō) [Chinese, *shin* god, *to* law.) *n.* **जपानी लोकांचा शिंटो धर्म. प्राचीनकाळीं यांत निसर्गोपासना प्रधान होती, सध्यां पितरांची उपासना प्रधान आहे.**
Shiny, See under Shine.
Ship (ship) [A. S. *scip*, a vessel.] *n.* **जहाज** *n*, **बोट** *f*, **गलबत** *n*, **नौका** *f*, **नाव** *f*, **तारूं** *n*, **तारूंतरांडें** *n*. २ *a three-masted sailing vessel* **तिरकटी तारूं** *n*. [THE BOTTOM OF A S. पठार *n*. IMPORTED ON A S. तारवटी. SIDE OF A S. *or* BOAT बोडद् *n*. TOLL PAID BY A SHIP ON CLEARING OUT पाग *f*. S. OF BURDEN मालाची बोट *f*, कावाडी गलवत *n*. S. OF WAR लढाऊ गलवत *n*, आरमारी गलवत *n*. BATTLE S. लढाऊ गलवत *n*. S. OF THE LINE लढाऊ जहाज *n*. MERCHANT S. व्यापारी बोट *f*. WAR S. लढाऊ गलवत *n*. SISTER S. दुसऱ्या जहाजावरहुकूम बांधलेलें जहाज *n*. SHIP BISCUIT जहा.ावर वापरण्याचें बिस्कुट *n*. S. BOARD *n*. जहाजाचा डेक *m*. ON S. *adv*. जहाजावर, डेकवर. SHIP BREAKER *n*. (जुनीं भ.डकींतोडकीं) जहाजें फोडणारा *m*, जहाजफोड्या *m*. SHIP BROKER जहाजांची खरेदीविक्री करणारा *m*, जहाजांचा व्यापारी *m*. २ मालाची भरताड करणारा दलाल *m*. ३ गलबताचा विमा उतरणारा एजंट. SHIP BUILDER जहाजें बांधणारा *m*. SHIP BUILDING जहाजें बांधणें *n*. SHIP CANAL (for conveying ships inland) जहाजें नेण्याकरितां कालवा.S. CARPENTER जहाजें बांधणारा *m*. २ जहाजें दुरुस्त करणारा S. CHANDLER जहाजाचें (दोरखंडें वगैरे) सामान विकणारा *m*. S. LETTER टपालाच्या बोटीशिवाय दुसऱ्या बोटीनें पाठविलेलें पत्र *n*. S. LOAD (गलबताच्या) भरताडीचा माल *m*. S. MATE गलवतावरील खलाशी *m*. २ एकाच गलवतावरील उतारू *m* -प्रवाशी *m*. S. MAN खलाशी *m*, नावाडी *m*. S. MEN *n. pl*. S. MASTER कप्तान *m*, नाखवा *m*, नाखोदा *m*; of a small vessel तांडेल *m*. S. MONEY जहाजपट्टी *f*, आरमाराला लढाऊ जहाजें पुरविण्याकरितां बसविलेला आरमारी कर. हा कर पूर्वीं इंग्लंडांत होता. आतां नाहीं. S. OWNER जहाजें असणारा *m*, जहाजांचे भाग विकत घेतलेला. S. RAILWAY जहाजें नेण्याकरितां आगगाडी *f*, रेलवे. S. SHAPE *a*. *trim*, *orderly* सुव्यवस्थित, ठाकठीक. S. SHAPE *adv*. व्यवस्थेनें, व्यवस्थित रीतीनें, ठाकठीक. S.'S PAPERS जहाज कोठलें, कोणाचें, आंत माल काय आहे, वगैरेंच्या माहितीचे कागद *m. pl*. S.'S HUSBAND (जहाज बंदरांत असतांना मालकाच्या वतीनें) जहाजांवर देखरेख करणारा *m*. S. WRECK *n*. जहाज फुटणें *n*. २ (*fig*.) *loss* नाश *m*. TO MAKE S. WRECK *to be ruined* नाश होणें, नाश पावणें. TO MAKE OR SUFFER S. WRECK OF ONE'S HOPES आशेचा भंग -आशाभंग करणें. (b) आशाभंग होणें. S. WRECK *v. t.* *to inflict shipwreck on* (person, hopes, &c.) (एखाद्याच्या आशेचा) भंग करणें, (एखाद्याला) निराश करणें. S. WRECK *v. i.* निराश होणें, आशाभंग होणें. S. WRECKED (*pa. t.* and *pa. p.*) *q*. बुडालेला,

आशाभंग झालेला. S. WRIGHT जहाजें बांधणारा *m*, जहाजें दुरुस्त करणारा *m*. S. YARD जहाजें बांधण्याचा कारखाना *m*. To TAKE S. गलबतावर चढणें, गलबतांत बसणें, गलबतांत बसून जाणें.]

Ship *v. t. to put, to take, or send away* (goods, passengers, sailors, &c.) *on boardship* **जहाजांत (माल) भरणें, जहाजांत चढविणें, (उतारू) बोटींत घेणें, (जहाजांत) भरून पाठविणें -पोंचता करणें, जहाजांतून पाठविणें. २** (commerce) **माल (पुढें पाठविण्याकरितां) जहाजाच्या एजंटाच्या स्वाधीन करणें. ३** *to fix* (mast, rudder, &c.) *in its proper place* **(डोलकाठी वगैरे) जागच्या जागीं बसविणें.** [To S. OARS वल्हीं काढून आंत ठेवणें.] S. *v. i. to embark* **जहाजांत बसणें -बसून जाणें. २** (of a sailor) *to take service on a ship* **गलबतावर नोकरीस रहाणें. ३ जहाज लोटणें -हाकारणें.** Shipped *pa. t.* and *pa. p.*

Ship'ment *n. the shipping of goods* **माल जहाजांत भरणें -चढवणें** *n.* **२** *goods &c. shipped* **जहाजांत भरलेला माल** *m*, **जहाजांत चढवलेला माल** *m*, **जहाजांतून आलेला माल** *m*.

Ship'per *n.* **जहाजांत माल चढवणारा -भरणारा** *m.* **२ खलाशी** *m.*

Ship'ping *pr. p.* S. *n.* **जहाजांत माल भरणें** *n.* **२** (collectively) *ships* **जहाजें** *n. pl.*, **तारवें** *n. pl.*, **गलबतें** *n. pl.* **३ जहाजाचें भरताड** *n.* **हें टनांत दाखवितात.** S. agent *n.* **आगबोटीच्या कंपनीचा (एखाद्या बंदराचा) एजंट** *m.* S. articles *n. pl.* **कप्तान आणि खलाशी ह्यांच्या मधील पगारासंबंधींचा करार** *m.* S. bill *n. an invoice of goods shipped* **चढविलेल्या मालाची कस्टमहौसनें दिलेली चिठ्ठी** *f*, **शिपिंग बिल** *n.* S. department *n.* **दर्यावर्दीखातें** *n.* S. intelligence *n.* **बोटीसंबंधीं माहिती** *f.* S. trade *n.* **(जहाजांतून होणारा) दर्यावर्दी व्यापार** *m*, **द्वीपांतराशीं व्यापार** *m.* S. master *n.* **ज्या अधिकाऱ्याच्या देखत खलाशांना पगार देतात, पगाराचे (कप्तान आणि खलाशी ह्यांमधील) लेखी करारमदार होतात तो.** S. office **आगबोटीच्या एजंटाचें हपीस** *n.*

Shire (shīr) [A. S. *scir*, a division *sceran*, to shear, to cut.] *n. a county* **(इंग्लंडांतील) परगणा** *m*, **प्रांत** *m.* [THE SHIRES ज्या परगण्यांच्या नांवांच्या शेवटीं *shire* आहे असे (इंग्लंडांतील) परगणे *m. pl.*, विशेषतः इंग्लंडच्या मध्यभागांतील परगणे *m. pl.* S. HALL परगण्याचें कोर्ट *n.* S. MOOT परगण्यामधील महाजनसभा *f*, पंचसभा *f*.]

Shirk (sherk) [A form of vulgar *shark*, to play the thief, to shift for a living, from *shark*, the fish.] *v. t. to avoid, or to try to avoid, doing one's duty* **(काम) चुकवणें, (चाकरी) चुकवणें, टाळणें, टाळण्याचा प्रयत्न -टाळाटाळी करणें, (भेकडपणानें) आंग** *n.* **काढणें -चोरणें, काढतें घेणें.** S. *n.* Same as Shirker. Shirked *pa. t. & pa. p.* Shirk'ing *pr. p.*

Shirk'er *n.* काम चुकवणारा *m*, (जबाबदारी) टाळणारा *m*, टाळाटाळी *f* -चुकवाचुकव करणारा *m*, कामचुकार *m*, कामचुकाऊ *m*, कामचोर *m*, चुकारतट्टू *m*, आंगचोर *m*, आंगचुकार *m*, निमित्तखोर *m*, आंगचुकाऊ *m*.

Shirk'y *a.* (*colloq.*) *disposed to shirk* माघार घेणारा, चुकवाचुकव *f.* करणारा, टाळाटाळी *f.* करणारा, आंगकाढ्या.

Shirt (shert) [A. S. *scyrta.*] *n. a man's or boy's under-garment* शर्ट *m*, खमीस *n*, कमीज *n.* २ *woman's blouse* बायकांचा गुडघ्यापर्यंतचा झगा *m.* [S.-FRONT (क्यान्‌व्हस भरलेली) शर्टाची छाती *f.*] Shirt'-ing *n.* शर्टाचें कापड *n.*

Shiver (shiv'-ėr) [Low Ger. *schive*, a thin piece.] *v. t. to dash to pieces* तुकडेतुकडे करणें, चकाचूर करणें, चकनाचूर करणें, खंडेंखंडें -खंडविखंड करून टाकणें; as, "To S. a glass goblet." S. *v. i. to fall to pieces* तुकडेतुकडे होणें, चकाचूर होणें, खंडविखंड होणें, छिन्नभिन्न होणें. S. *n.* (फुटलेल्या वस्तूचा) तुकडा *m*, खंड *m*, छिन्न *n.* Shivers *n. pl.* तुकडेतुकडे *m. pl.*, चुराडा *m*, चूर *m*, चकनाचूर *m*, चकाचूर *m.* Shiv'ery *a.* सहज फुटणारा, सहज मोडणारा.

Shiver (shiv'-ėr) [Imitative.] *v. i. to shake* (with fear, cold, &c.) कांपणें, हुडहुडी भरणें, हुडहुडणें, शिरशिरणें, खुडखुडणें, थडथडून हींव *n.* येणें -वाजणें *in. con.*, हींव *n* -कांप *m* -कांपरा *m* -कांपरी *f* -कांपरें -शिसारी सुटणें -भरणें *in. con.*, कांटा भरणें, थंडी वाजणें *in. con.* S. *n. a trembling* कांपरें *n*, हुडहुडी *f*, शिरशिरी *f*, कांप *m*, कांपरा *m*, कांपरी *f*, थंडी *f*, कुडकुड *f.* २ (*pl.*) *a shaking fit* कांपरें *n*; as, "Gives me the *shivers.*" ३ *ague* हींव *n*, थंडी *f.* Shivered *pa. t. & pa. p.* Shive'rer *n.* कांपणारा *m*, कांप सुटलेला, हुडहुडी भरलेला. Shiver'ing *pr. p.* S. *n.* कांपणें *n*, कांपरें *n*, कांपरी *f*, शिरशिरी *f*, हुडहुडी *f.* Shiver'ingly *adv.* कांपत कांपत, कांपरें भरून, &c

Shiv'ery *a.* कांपणारा, हींव भरलेला.

Shoal (shōl) [A variant of shallow.] *n. a shallow part of a river or sea* (नदीची किंवा खाडीची) उथळ पाण्याची जागा *f*, उथळ पाणी *n*, भाट *f*, भाटी *f*, लाग *m*, खांड *m*, दांडा *m*, खांडवा *m*, खांडें *n.* २ (*fig.* usu. *pl.*) *hidden dangers or impediments* नकळल्या अडचणी *f. pl.*, गुप्त संकटें *n. pl.* S. *a. shallow, not deep* (only *lit.* of water) उथळ. S. *v. i. to become shallow* उथळ असणें, उथळ होत जाणें, भाट *f* -पार *m* -दांडा *m.* पडणें -होणें; as, "The colour of the water shows where it *shoals.*" २ *to come upon a shoal* दांड्यावर -पारावर (गलबत) लागणें -अडकणें, उथळ पाण्यांत येणें. Shoal'y *a. full of shoals* भाट *f* -पार -दांडा *m.* असलेला, उथळ पाण्याचा; as, "The tossing vessel sailed on S. ground." Shoal'iness *n.* (पाण्याचा) उथळपणा *m.*

Shoal (shōl) [A. S. *scolu*, a company -L. *schola*, a school.] *n. a great multitude* (of fishes swim-

ming in company) माशांचा समुदाय *m.* २ *a crowd a great number* झुंड *f*, घोळका *m*, थवा *m*, समुदाय *m*; as, "*Shoals* of people." S. *v. i.* (of fish) *to form shoals* एकत्र होणें, थवा करणें.

Shoaly, See under Shoal No 1.

Shoar *n.* थिरा *m*, तीर *m*.

Shock (shok) [Fr. *choc*, a dashing.] *n. violent collision* धक्का *m.* ढका *m*, गचका *m*, गचकी *f*, धडका *m*, हिसका *m*, आंचका *m*; as, "*shocks* of earthquake." २ *a violent onset* निकराचा हल्ला *m*, चढाई *f*; as, "S. tactics." ३ *sudden and disturbing physical or mental impression* धक्का *m*, धडकी *f*, लक *n*, धस *n*, धस्स *n*, धपका *m*, धबका *m*, आंचका *m*, दचका *m*, दचक *f*, डचक *f*; as, "Was a great S." ४ *a serious disturbance of the nervous system* (मज्जातंतूंना बसलेला) धक्का *m.* ५ *the sensation caused by an electric discharge* धक्का *m*; as, "Electric S." ६ *injury inflicted on credit, stability, &c.* धक्का *m*, नुकसान *n.* S. *v. t. to give a shock to, to shake suddenly* धक्का *m.* देणें -मारणें, हबकणें, आंचकणें. २ *to strike with horror and disgust* धसका *m.* बसणें *in. con. with* ला *of* S., त्रास *m.* देणें -आणणें, (-ला) चमत्कारिक -बीभत्स वाटणें -लागणें. [TO BE SHOCKED धक्का *m.* बसणें *in. con.*, लक *n.* होणें, धडक *f.* भरणें *in. con.*] Shocked *pa. t.* and *pa. p.* Shock'er *n. a sensational tale* पोटांत धस्स होण्यासारखी गोष्ट *f*, अंगावर शहारे येण्यासारखी गोष्ट *f* -कादंबरी *f.* Shock'ing *a.* धडकी बसविणारा, अघोर, घोर, बीभत्स, घाणेरडा.

Shock (shok) [Ger. *schock*, Dut. *schokke*, a heap.] *n. a heap or pile of sheaves of corn* गंज *m*, गंजी *f*, जुडी *f*, सुडी *f.* S. *v. t. to arrange corn in shocks* पेंढ्यांची गंज लावणें -रचणें, खळवटणें, खळवटणी करणें *g. of o.*

Shock (shok) [A form of Shag.] *n. thick, matted hair* पेळू *f*, पेळवा झालेले -न विंचरलेले केंस *m. pl.* जटा.

Shock-headed *a.* डोक्यावर जाड व रांठ केंस असणारा.

Shocking, See under Shock No 1.

Shod *pa. t.* & *pa. p.* of Shoe.

Shoe (shōō) [A. S. *sceo*, a shoe.] *n.* (घोंट्यापर्यंतचा) बूट *m*; *remissly* वहाण *f*, पायतण *n*, जुती *f*, मोचा *m*, जोडा *m*, पायपोस *m*, पैजार *f*, revilingly as old, torn, &c., or with reference to striking with it खेटर *m*, *n*, खांसडा *m*, मोचा *m.* [COARSE AND CLUMSY SHOES जासुदी जोडा *m.* WOODEN SHOES खडावा *f. pl.*, पादुका *f. pl.* THAT'S ANOTHER PAIR OF SHOES ती निराळी बाब आहे. DEAD MEN'S SHOES वारसाला मिळण्याची इस्टेट व हक्क, स्थावर व जंगम इस्टेट. TO BE IN A PERSON'S SHOES त्याच्याच अडचणींत असणें. TO DIE IN ONE'S SHOES अपघातानें (विशेषतः फांशीं जाऊन) मरणें. THE WEARER BEST KNOWS WHERE THE SHOE PINCHES *cf. Marathi phrases* अळवाची खाज अळवास

ठाऊक, जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे. To PUT THE S. ON THE RIGHT FOOT खऱ्या अपराध्याचे माथीं दोष मारणें.] २ (for a horse) नाल *m.* S.-black *n.* जोड्यांना ब्लाकिंग करणारा *m*, जोडे पालिस करणारा *m.* S. horn *n.* बूट चढविण्याची पट्टी *f.* S. leather *n.* जोड्यांकरितां कमावलेलें कातडें *n.* S. maker *n.* चांभार *m*, चाम्हार *m*, चर्मकार *m*, मोची *m.*

Shoe ( shōō ) *v. t.* ( घोड्याच्या पायांला ) नाल मारणें, नालबंदी करणें *g. of o.*, नाल *pl.* बांधणें *dat.* of *o.* [To S. ALL FOUR FEET चौबंदी करणें. To CHANGE THE SHOES खोलबंदी करणें. ] २ वसवी ( वगैरे ) घालणें; as, "A pole *shod* with iron." Shod *pa. t.* and *pa. p.* Shoe'ing *pr. p.*

Shoe-black *n.* See under Shoe *n.*

Shoe-flower *n.* –*the plant* जास्वंद *f*, जपा *f*, –the flower जास्वंद *f*, जपा *f*.

Shoe-horn *n.* See under Shoe *n.*

Shone *pa. t.* and *pa. p.* of Shine.

Shook *pa. t.* of Shake.

Shoot ( shōōt ) [A. S. *sceotan*, to shoot.] *v. t.* ( as from a gun or bow ) मारणें, सोडणें, उडवणें, काढणें. २ *to strike with something shot* मारणें ( with the word expressive of the missile, बाण मारणें, to shoot with an arrow, गोळी मारणें, to shoot with a bullet), बंदुकीनें -बाणानें -गोळीनें &c. मारणें, गोळी घालणें. ३ ( a bolt, &c.) *to propel* सारणें, पुढें करणें. ४ (a gulf, &c.) *to pass with swiftness* झडकन -वेगानें -त्वरेनें पार जाणें, पार करणें. ५ (leaves, branches, &c.) फुटणें, येणें *in. con.* ६ (with *off*) सोडणें, डागणें. ७ (*carp.*) *to fit by planing* तासून ठीक -बसेसा -मिळता करणें. ८ *to discharge* टाकणें, बाहेर काढणें, ओतणें; as, "To S. rubbish." [ To S. NIAGARA अशक्य गोष्ट करण्याचें साहस करणें. ] ९ निरनिराळ्या तकाकीच्या उभ्याआडव्या धाग्यांनीं विणणें.

Shoot *v. i.* *to discharge a gun, arrow, &c.* बंदूक *f* -बाण *m.* &c. मारणें -सोडणें, निशाणबाजी करणें. २ *to sprout* फुटणें, पालवी *f* -अंकुर येणें; as, "A tree *shoots.*" ३ *to burst the ground* ( जमिनींतून ) वर येणें -बाहेर येणें, मोख *m* -मोड *m.* फुटणें, रुजणें, उगवणें. ४ वर येणें; as, "A flame *shoots* up." ५ *to move with velocity* वेगानें -त्वरेनें -झडकन -बाणासारखा जाणें -चालणें; as, "A boat *shot* out from the creek." ६ (of aches, &c.) *to feel a shooting pain* दुखणें, ठुणठुणणें, टचटचणें, शिणकणें, तिडीक *f.* उठणें -येणें, उसण *f.* भरणें -निघणें, शिळक *f.* निघणें; as, "A tooth *shoots.*" ७ ( with *out* ) *to project* पुढें येणें -निघणें; as, "Cape *shoots* out." ८ (with *up*) *to grow* वाढणें, उफाटणें, उचलणें; –of sugarcane कांडारणें; as, "The child is *shooting* up." ९ ( of corn ) निसवणें, पोसवणें, कणसें येणें. १० ( *naut.* ) *to move ahead by force of momentum* पुढें निघून जाणें. [ To S. AHEAD शर्यतींत प्रतिस्पर्ध्यांच्या पुढें जोरानें

निघून जाणें.] ११ एकदम चढणें, वाढणें, कडकणें, तेजी होणें; as, "Prices *shot* up."

Shoot *n. the act of shooting* गोळी मारणें *n*, गोळीबार करणें *n*, बंदुक झाडणें *n*. (b) गोळीबार *m*. २ *a shooting party* शिकारी *m. pl.*, शिकारी लोक *m. pl.* ३ *shooting practice* निशाणबाजी *f*. ४ *a rapid* जोराचा प्रवाह *m*. ५ *a sprout* अंकुर *m*, कोंब *m*, कोम *m*. ६ (*bot.*) मोख *m*. [S.S FROM REAPED CORN THROUGH RAIN करा *m*.] (b) *seed shot up* रुजवण *n*, रुझवण *n*, आवण *n*. (c) *a young branch* फणगडा *m*, फांटा *m*, पागोरा *m*. ७ *an inclined trough* (down which coal, grain, &c. are shot) कलता डबा *m*. ८ *a place where rubbish is emptied* कचरा ओतण्याची जागा *f*, कचरा टाकण्याची जागा *f*, कचरपट्टी *f*.

Shoot'er *n*. गोळी मारणारा, गोळी घालणारा *m*.

Shoot'ing *pr. p.* S. *n*. गोळीबार करणें *n*. (b) शिकार करणें, शिकार *f*. [S. BOX शिकारी राहण्याकरितां बांधलेली छपरी *f*. S. COAT, -JACKET, &c. गोळीबाराच्या वेळीं -शिकारीच्या वेळीं घालण्याचा कोट वगैरे.] २ फुटणें *n*, उद्भेद *m*, मोख फुटणें *n*. ३ *shooting pain* शिळक *f*, शिणक *f*, शिणीक *f*. ४ (कणसांची वगैरे) निसवणी *f*, निसवणें *n*.

Shooting Star *n*. उल्का *f*, तुटणारा तारा *m*.

Shop (shop) [A. S. *sceoppa*, a stall.] *n. a building or room for retail sale* दुकान *n*, विक्रयशाला *f*. २ *a workshop* कारखाना *m*. (b) (मोठ्या कारखान्यांतील) खातें *n*, शाखा *f*; as, "Engineering S., Pattern S." ३ (slang) *an institution* संस्था *f*; as, "The other S. प्रतिस्पर्धी संस्था *f*." ४ *one's profession* स्वतःचा पेशा *m* -धंदा *m* -उद्योग *m*. (b) *things connected with one's profession* स्वतःच्या धंद्याच्या गोष्टी *f. pl.*, स्वतःच्या धंद्याची भाषा *f* -भाषण *n*. [To SMELL OF THE S., *to indicate too distinctly one's occupation or profession* (चा) धंदा स्पष्ट कळून येणें. To SET UP A S. दुकान घालणें -मांडणें -स्थापणें. To SHUT UP THE S. दुकान मोडणें, धंदा *m* -रोजगार *m*. बंद करणें, चालू काम बंद करणें. To SHUT UP THE SHOPS (as under some uproar) बाजारांत हरताळ *m*. पाडणें. To SINK THE S. *to refrain from talking shop* आपल्याच धंद्याच्या गोष्टी सांगण्याचें बंद करणें. २ *to conceal one's occupation* आपला धंदा लपवणें. To TALK S. आपल्याच धंद्यासंबंधानें बोलत राहणें -बोलत सुटणें.] S. bell *n*. दुकानाच्या दारावरील घंटा *f*. S.-book *n*. दुकानाची वही *f*, दुकानवही *f*. S. boy *n*. दुकानांतला नोकर *m*. S. keeper *n*. (किरकोळीचा) दुकानदार *m*, वाणी *m*. [A NATION OF SHOP-KEEPERS इंग्रज लोक *m. pl.*, इंग्लंड *n*.] S. keeping *n*. दुकानदारी *f*, उदीम *m*. S. lifter *n*. (गिऱ्हाईक म्हणून दुकानांत जाऊन तेथील वस्तू लांबविणारा) उचल्या *m*, उपट्या *m*, भामट्या *m*. S. lifting *n*. (दुकानांतून) उचलणें, उपटणें *n*, उचलेपणा *m*, भामटेपणा *m*. S. man *n*. (किरकोळीचा) दुकानदार *m*, (दुकानदाराचा) नोकर *m*. S. WORD, S. soiled *a*. (विक्रीसाठीं बाहेर ठेवल्या-

सुळें) दुकानांत मळलेला -बिघडलेला. S. walker *n.* नोकरांवर देखरेख ठेवणारा *m*, गिऱ्हाइकांची व्यवस्था ठेवणारा *m.* S. window *n.* नमुन्यांची (दुकानांतील) खिडकी *f.*

Shop *v. i.* बाजार करणें, सौदा -सवदासुलूख करणें. Shopped *pa. t.* and *pa. p.* Shop'ping *pr. p.* S *n.* बाजार करणें *n*, सौदा करणें *n.*

Shop-keeper *n.* See under Shop *n.*

Shop-lifter *n.* See under Shop *n.*

Shop'py *a.* दुकानाचा, कारखान्याचा, कारखान्यासंबंधीं. २ धंद्याचा, उद्योगाचा, पेशाचा. ३ स्वतःच्याच धंद्यासंबंधानें बोलत सुटणारा, स्वतःच्याच धंद्याचें स्तोम *n* -महत्व *n.* वाटणारा.

Shop-walker, See under Shop *n.*

Shore (shōr) [Lit. the place where the land is *cut* or broken off. A. S. *score-sceran*, to shear, to divide.] *n. coast* किनारा *m*, (नदीचा किंवा तळ्याचा) कांठ *m*, तड *f*, तीर *n*, तट *m*, कांठा (in Guj. as, महीकांठा, रेवाकांठा, &c.). [FURROW OR CHANNEL WORN INTO A SHORE ओहोर *m*, ओहर *m*. TO GET TO S. (with any business) *fig.* तड *f* -शेवट घेणें, तडीस जाणें -पोंचणें. IN S. किनाऱ्यानजीकच्या पाण्यांत, किनाऱ्यानजीक.] २ (law) *land between ordinary high and low water marks* भरसुकतीच्या खुणांमधील जमीन *f*, किनारा *m*. Shore'less *a.* किनारा नसलेला, अति विस्तीर्ण; as, "S. ocean."

Shore (Shōr) [From the root of Shear.] *n. a prop* (of timber) *used as support* धिरा *m*, नेटावा *m*, टेंका *m*, पुस्ती *f*, तीर *m* (जहाजाला, भिंतीला, किंवा झाडाला दिलेला). S. *v. t. to support or hold up with shores* धिरे *m. pl.* -नेटावे *m. pl.* देऊन उचलून धरणें, नेटावे देणें. Shored *pa. t. & pa. p.*

Shore'less *a.* See under Shore No. 1.

Shore'ward, Shore'-wards *adv.* किनाऱ्याकडे.

Sho'ring *n.* (collectively) *props, supports* धिरे *m. pl.*, नेटावे *m. pl.*, &c.

Shorn *pa. p.* of Shear कातरलेला, भादरलेला, केंस [कापलेला.

Short (short) [A. S. *sceort*, short.] *a.* थोडा, लहान, अल्प, स्वल्प, लघु, लहान पल्ल्याचा; as, "A S. way off, A S. time ago." २ *not of long duration* थोड्या मुदतीचा, थोड्या काळाचा, अल्पकालिक, अल्प -स्थायी, अचिरस्थायी, दोन दिवसांचा, थोड्या दिवसांचा; as, "A S. breath." ३ *of deficient length, of short size* आंखूड, तोकडा, अपुरता, अपुरा, टिचका, कोता, लांडा, टांचा, बुटुकणा, बुटका. ४ *inadequate, scanty* थोडा, थोडका, उणा, कमी, कोता, अपुरा, न्यून, बेताचा; as, "A S. supply of water." ५ (usually with *of*) *deficient in* उणा, कमी, न्यून, &c. all with *g. of o.*, अल्प (in *comp.*; as, अल्पबुद्धि S. of wit, अल्पधन S. of money, &c.). ६ (of stature) ठेंगू, ठेंगणा, लहान, मटगा, सखल, ऱ्हस्व, बुटुकणा. [S. AND COME-

LY ठेंगणारेंगणा, ठेंगणाठुसका. S. AND STOUT गबदूल, गिड्डा, ढूल, गड्डू.] ७ (as breathing) दम्याचा, धापाचा, धाप्या. ८ *brief* संक्षेपाचा, संक्षिप्त, अल्पविस्ताराचा. [IN S. थोडक्यांत, संक्षेपतः, संक्षेपानें, एकूण, एवंच.] ९ (metal.) *brittle, friable* ढिसूळ, तुटरा, तुटीर. १० ऱ्हस्व, लघु (स्वर). ११ *forgetting easily* लौकर विसरणारी (स्मरणशक्ति). १२ *hasty* उतावळा, संयम नसणारा; as, "S. temper." [S. TEMPERED उतावळ्या, उतावीळ स्वभावाचा.] १३ *uncivil* उर्मट, दांडगट, तुटस, असभ्य; as, "Was very S. with me." १४ (of stocks, stock-broker, crops, &c.) विकलेला, खलास. [S. -BREAD, S. -CAKE *n.* पुष्कळ लोणी व साखर घालून केलेली कणकेची केक *f.* S. CIRCUIT *n.* (*elec.*) (अल्पप्रतिबंधात्मक) लघुमंडळ *n.* S. -COMING *n.* (generally in *pl.*) दोष *m*, न्यून *n*, न्यूनता *f*, न्यूनपणा *m*, कमीपणा *m*, उणेपणा *m.* S. CUT *n.* SEE UNDER CUT. S. DATE *n.* (हुंडी लागू होण्याची) थोडी मुदत *f.* S. DATED *a.* थोड्या मुदतीची (हुंडी). S. HAND *n.* लघुलेखनपद्धति *f*, लघुलिपि *f.* S. HANDED *a.* कमी माणसें कामावर असलेला. S. LIVED *a.* थोडा वेळ जगणारा, थोडा वेळ टिकणारा, अल्पायुषी, अल्पायु. S. LEG, S. SLIP *n.* (in cricket) जवळचा पायपाळती *m.* S. METRE चार चरणांची कविता *f.* S. RIB (*anat.*) आंखूड फांसळी *f.* A S. SEA *n. short broken waves* लहान लाटा *f. pl.* S. SHRIFT (फांशीं देण्यापूर्वी देवाचें नांव घेण्यापुरता) थोडा अवकाश *m.* S. SIGHT *n.* जवळचेंच दिसणें *n*, ऱ्हस्वदृष्टि *f*, ऱ्हस्वदृष्टिविकार *m.* २ (*fig.*) पुढचा पोंच नसणें *n*, पुढचा विचार न करणें, अदूरदर्शिपणा *m.* S. SIGHTED *a.* जवळचेंच दिसणारा, जवळच्या दृष्टीचा, ऱ्हस्वदृष्टि. २ (*fig.*) अदूरदर्शी, अदूरदृष्टि, पुढचा पोंच नसणारा, मागचापुढचा विचार नसणारा *m.* S. SIGHTEDNESS *n.* ऱ्हस्वदृष्टि *f*, जवळची दृष्टि *f*, जवळचेंच दिसणें *n.* २ (*fig.*) अदूरदर्शिपणा *m*, अदूरदर्शित्व *n*, अविचारिपणा *m.* S. SIZED *a.* लहानसर, आटपसर, बेताचा, लहान. S. WAIST *n.* (पोषाखांत) आंवळ कमर *f*, तंग कमर *f.* S. WAISTED *a.* आंवळ कमरेचा, आंवळत्या कमरेचा. S. WEIGHT *n.* (दाखविल्यापेक्षां) कमी माप -वजन, तुटकें माप *n.* S. WIND *n.* दम लागणें *n*, फार लांब धांवतां न येणें *n.* २ (*fig.*) फार वेळ बोलण्याची किंवा लिहिण्याची कुवत -ताकद *f.* नसणें. S. WINDED *a.* दम लागणारा, दम्या. S. WINDEDNESS *n.* दम लागणें *n.* THE LONG AND THE SHORT तात्पर्य *n*, सारांश *m.* FOR S. *by way of a short name* थोडक्यांत, संक्षेपार्थ; as, "Is called Bob for *short.*" SOMETHING S. दारूचा पेला *m*, पेलाभर दारू *f*, दारू *f*, मद्य *n.* TO BE S. OF HANDS पुरेशीं माणसें नसणें. TO COME S. OF अटकळीप्रमाणें न भरणें -उतरणें. २ *to be deficient in duty* (-ला) चुकणें. ३ *to fail of proper development* योग्य वाढ न होणें. TO CUT S. *to bring to an end before natural time* (थोडक्यांत -तडकाफडकी) निकाल लावून टाकणें; as, "To cut a matter S. तटका तोडणें, तटका तोडून टाकणें or देणें, दोन तुकडे करणें." To

FALL S. OF कमी पडणें, अपुरा पडणें. TO MAKE S. WORK OF, *to get rid of* ( an adversary ) *easily* सहज दूर -नाहींसें करणें, सहज नाहींसें करून टाकणें, ठार मारणें. २ *to perform* ( a task ) *quickly* झपाट्यासरशीं संपविणें, तडफेनें पुरें करणें. TO RUN S. थोडाच ( शिल्लक -जवळ ) रहाणें -असणें, थोडा होणें, (ची) तूट पडणें; as, "Our tea ran S.; We ran S. of tea." TO TAKE S. VIEWS तात्पुरतें पहाणें. TO TURN ROUND S. त्याच पावलीं परतणें, त्याच पायीं परतणें, त्याच पावलीं परत फिरणें.]

Short *adv. abruptly, before the natural or expected time* **मध्येंच, एकदम, अकस्मात्, अटकळीपूर्वीं, स्वाभाविक काळापूर्वीं**; as, "To stop S." [To STOP S. एकाएकीं बंद पडणें, मध्येंच थांबणें. To BRING UP S., To PULL UP S. एकदम -मध्येंच थांबवणें -थांवणें. To BE TAKEN S. *to have sudden motion of bowels* एकदम रेच होणें. S. SPOKEN मितभाषी, थोडें बोलणारा. S. OF (तें) खेरीज करून. ]

Short *n. a short syllable* **लघु अवयव** *m*, **ऱ्हस्व अवयव** *m*; as, "Longs and *shorts*." २ *a mark indicating that the vowel is short* **स्वर ऱ्हस्व आहे हें दाखविणारें चिन्ह** *n*, **ऱ्हस्व ( स्वर ) चिन्ह** *n*; as, "ă."

Short'age *n. the amount of deficiency* **खूट** *f*, **कमताई** *f*, **न्यूनता** *f*, **कमीपणा** *m*; as, "There is no S.; A S. of 100 tons."

Short'coming *n.* See under Short.

Short'en *v. t. to make* ( actually *or* apparently ) *shorter or short* **लहान करणें, थोडा करणें, कमी करणें.** २ *to reduce the amount of sail spread* **आंखूड करणें.** S. *v. i.* **आंखूड होणें, लहान होणें, थोडा -कमी होणें, अंवटरणें.**

Short'est *a. superl. of short (math.)* **अल्पतम, ऱ्हसिष्ठ.**

Short'hand, See under Short No. 1.

Shot'-lived, See under Short No. 1.

Short'ly *adv. before long* **थोडक्यांत, लौकरच, थोड्या वेळानें, थोड्या काळानें.** २ *in a few words* **थोडक्यांत, थोड्या शब्दांत, थोड्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे.** ३ *curtly* **तुटसपणानें, उद्धटपणानें.**

Short'ness *n.* **थोडेपणा** *m*, **लहानपणा** *m*, **अल्पपणा** *m*, **स्वल्पपणा** *m*, **लघुता** *f*. २ **थोडा काळ** *m*, **थोडी -अल्प मुदत** *f*, **( काळाचा ) थोडेपणा** *m*. ३ **आंखूडपणा** *m*, **तोकडेपणा** *m*, **अपुरेपणा** *m*. ४ **कोतेपणा** *m*, **कमीपणा** *m*, **न्यूनता** *f*, **कोताई** *f*. ५ **ठेंगूपणा** *m*, **ठेंगणेपणा** *m*, **सखलपणा** *m*, **बुटकेपणा** *m*. ६ **अल्प विस्तार** *m*, **विस्ताराभाव** *m*. ७ **ढिसूळपणा** *m*, **तुटरेपणा** *m*. ८ **(स्वरांची) ऱ्हस्वता** *f*. ९ **( स्वभावाचा ) उतावळेपणा** *m*.

Shorts *n. pl. a coarse part of meal* **रवा** *m*. २ *very short breeches worn by runners* **मांडचोळणा** *m*.

Short-sighted, see under Short.

Short-winded, See under Short.

Shot (shot) [ A form of Scot. ] *n. a person's share of expenses* **स्वतःचें बिल** *n*. [ TO PAY ONE'S S. स्वतःचें बिल देणें, स्वतःचें बिल चुकतें करणें.]

Shot ( shot ) [ From the root of Shoot.] *n. the act of shooting* गोळी झाडणें *n*, बंदुक मारणें *n*. २ *a ball or bullet* गोळा *m*, *dim*. गोळी *f*, छर्रा *m*. ३ (collectively) *projectiles* अस्त्रें *n. pl*. ४ *the flight or range of a projectile* टप्पा *m*, पल्ला *m*. ५ *a marksman* निशाण मारणारा *m*, नेम धरणारा *m*, नेमाड्या *m*, अचुकसंधानी *m*, लक्ष्यवेधी *m*. ६ *a charge of blasting powder* बार *m*. [A S. IN THE LOCKER मागें टाकलेली रक्कम *f*, शिलकी रक्कम *f*. ] S. *v. t*. बंदुकींत बार भरणें.

Shot *pa. t*. of Shoot S. *pa. p. a*. ( of coloured material ) निरनिराळ्या कोनांवर निरनिराळे रंग दिसावे अशा रीतीनें विणलेला, निरनिराळ्या रंगांची तकाकी असणारा; as, "S. silk."

Should ( shood ) Shall या साहाय्यकारी क्रियापदाचा भूतकाळ. Should हें संकेतार्थी वापरतात; जसें, "If you *should* happen to be there." एखादी गोष्ट प्रत्यक्ष घडली असें मानण्याकरितां Should चा उपयोग करतात; as, "I *should* think you could go." कर्तव्य दाखविण्याकरितां किंवा अमुक एक केलें असतां बरें, किंवा फायद्याचें आहे, हें दाखविण्याकरितां *Should* चा उपयोग करतात.

Shoulder (shōl'dėr) [A. S. *sculder*.] *n*. खांदा *m*, स्कंध *m*; -contemptuously or loosely खांदाड;—with reference to carrying a dead खांद. [ (TO BLOW OR SHOVE WITH THE ) S. बकांदा *m*, बखंडी *f*, बखांदी *f*, हुंदडा *m*, हुंडका *m*. (मारणें, देणें) TOP OR UPPER PART OF THE S. वावखंड *n*, बावखड *n*. TO LEND A S. बाही देणें, खांदा देणें. TO PUT ONE'S S. TO THE WHEEL (*lit*. and *fig*.) चाकाला खांदा देणें, (स्वतःची) कंबर बांधणें. TO GIVE THE COLD S. (TO) तुटसपणानें बेपर्वाईनें वागणें.] २ (of an animal) फरा *m*, खांदा *m*. [GALL OR SORE BETWEEN THE SHOULDERS खुबेनाल *f*.] ३ (neck or shoulders, with reference to carriage) खांदा *m*, खांदाडी *f*, खांद *m*. [CHANGING THE S. खांदेपालट *m*, खांद बदलणें. UPON THE S.s (OF) आंगावर, गळ्यांत, माथ्यावर, डोईवर, शिरावर. TO TAKE UPON ONE'S OWN S. शिरावर घेणें.]

Shoulder-belt *n*. खांद्यावरून घालण्याचा पट्टा *m*.

Shoulder-blade *n*. खवाटा *m*, खवाट्याचें हाड *n*, अंसफलक *m*.

Shoulder-knot *n*. ( डगल्याचा ) खांद्यावरील गोंडा *m*.

Shout ( showt ) [Of doubtful origin.] *n. a loud cry* आरोळी *f*, आरडा *m*, कुई *f*, पुकारा *m*, कल्लोळ *m*, महाघोष *m*. २ (of joy) जयघोष *m*, जयध्वनि *m*, जयजयकार *m*, गजर *m*. [ALL IS OVER BUT THE S. (शुष्क) ओरडीशिवाय ( आतां ) कांहीं राहिलें नाहीं. (कारण वादाचा निकाल लागला ).] S. *v. i*. ओरडणें, आरोळी मारणें, पुकारा करणें, ललकारणें. २ जयघोष करणें, जयजयकार करणें. S. *v. t*. ओरडून व्यक्त करणें, हाक मारून सांगणें, मोठ्यानें बोलून दाखवणें; as, "*Shouted* approbation."

Shove ( shuv ) [ Of Anglo-Saxon origin. ] *v. t*.

ढकलणें, रेंटणें, लोटणें. २ *to make one's way* (along, past, through, &c.) *by pushing* **ढकलून वाट करणें, ढकलून वाट काढणें, लोटून -बाजूला सारून वाट करणें -काढणें.** ३ (*colloq.*) *to put somewhere* (कोठें तरी) **कोंबणें, ठेवणें;** as, "S. it in the drawer." [To S. OFF वोटींत बसून (पुढें) जाणें, वोट हाकारणें.] S. *n.* **ढका** *m*, **रेंटा** *m.* [A RUDE S. IN PASSING BY घसरा *m*, घष्टा *m.* SHOVING AND PUSHING ढकलाढकली *f*, रेंटाई *f*, रेंटारेंटी *f*, रेंटारेंट *f*.] S. off *n.* **ढका** *m*, **हात** *m*, **मदत** *f*; as, "To give one a S. off."

Shovel (shuv'l) [Of Anglo-Saxon origin.] *n.* **(कोळसे मारण्याचें) फावडें** *n*, **शिवाळी** *f*. S. *v. t.* *to lift up and throw with a shovel* **फावड्यानें कोळसे मारणें, शिवाळीनें कोळसे मारणें.** २ *to gather in large quantities* **ढीग करणें, रास करणें.** [To S. FOOD INTO ONE'S MOUTH गपागप खाणें, वोकणे मारणें.] S. *v. i.* **फावडें चालवणें.** Shov'elled *pa. t.* and *pa. p.* Shov'elling *pr. p.* Shov'elful *n.* **फावडेंभर.** Shovelfuls *n. pl.*

Show (shō) [Of Anglo-Saxon origin.] *v. t.* *to cause to be seen* **दाखविणें, नजरेस पाडणें, दृष्टीस पाडणें, पाहविणें, (चें) प्रदर्शन** *n.* **करणें, उघड करणें, प्रगट करणें.** [To S. ONESELF चारचौघांत दिसणें -दृष्टीस पडणें. To S. OFF ONE'S SELF (खोटी) ऐट दाखविणें, ऐटीनें वागणें. To S. FIGHT झटापट करणें, दोन हात करणें. To. S. ONE'S COLOURS, *to show one's party or character* आपला पक्ष दाखविणें, आपण कोणत्या पक्षाचे किंवा बाजूचे आहों हें जाहीर करणें. (b) आपला स्वभाव दाखविणें. To S. ONE'S HAND आपला डाव दाखविणें (*fig.*), आपला बेत जाहीर करणें. T. S. THE HOOF OR CLOVEN HOOF दुष्टस्वभाव प्रकट करणें. To S. THE WHITE FEATHER भित्रेपणा दाखविणें, शेपूट घालणें, भागूबाईसारखें वागणें. To S. CLEAN PAIR OF HEELS, *to escape by speed* यःपलाय करणें, जीव घेऊन पळणें. To S. A LEG आंथरुणावरून उठणें, झोंपून उठणें. To S. A THING THE FIRE थोडी आंच देणें. To S. ONE THE WAY (-ला) रस्ता दाखविणें, मार्ग दाखविणें. To S. ONE THE DOOR (-ला) घालवून देणें, हांकलून देणें. ON YOUR OWN SHOWING तुमच्याच म्हणण्यावरून (देखील). To S. ONE OUT (दाराच्या) बाहेरपर्यंत पोंचवणें. To S. ONE IN (दार उघडून) आंत घेणें. To S. UP, *to expose* (लुच्चेगिरी, लबाडी) उघडकीस आणणें. To S. ONE ALL OVER THE HOUSE सर्व घरभर फिरून दाखविणें.] २ *to indicate, to point out* **दाखविणें, दर्शविणें, सुचविणें.** ३ *to inform* **कळविणें, माहिती देणें.** ४ *to confer* (दया, &c.) **दाखविणें, करणें.** ५ *to manifest* **दाखविणें, प्रदर्शित करणें, व्यक्त करणें, बाहेर पडूं देणें, समजूं देणें;** as, *Showed* neither joy nor anger. ६ *to make an exhibition of* **(चें) प्रदर्शन** *n.* **करणें, प्रदर्शनांत ठेवणें -मांडणें;** as, "To S. articles in an exhibition." ७ *to prove, to explain* **दाखविणें, सिद्ध करणें, स्थापित करणें.** ८ **दाखविणें, शिकविणें, समजावून देणें;** as, "To S. a

person how to write." Show *v. i.* *to look* दिसणें. [To S. OFF ( श्रीमंतीनें किंवा कौशल्यानें ) छाप *f.* बसवणें, नांव करणें. To. S. UP उघडकीस येणें. ] Showed *pa. t.* Shown or Showed *pa. p.*

Show *n.* दाखविणें *n*, प्रदर्शन करणें. २ *a spectacle* ( चित्रांचा, बाहुल्यांचा) खेळ *m*, तमाशा *m*. ३ *an imposing demonstration* प्रदर्शन *n*. [FLOWER S. पुष्पशाकप्रदर्शन *n*, फुलें, भाजीपाला व फळफळावळ यांचें प्रदर्शन *n*. HORSE S. अश्वप्रदर्शन *n*, घोड्यांचें प्रदर्शन *n*. CATTLE S. पशुप्रदर्शन *n*, गुरांचें प्रदर्शन *n*. AGRICULTURAL S. कृषिविषयक प्रदर्शन *n*, कृष्युपयोगी प्रदर्शन *n*, शेतकीचें प्रदर्शन *n*.] ४ *a display or a parade* थाट *m*, थाटमाट *m*, प्रदर्शन *n*, आव *m*, अवडंबर *n*, भपका *m*, टामटूम *n*, डौल *m*, डामडौल *m*. [To MAKE A S. OF (-चें) प्रदर्शन करणें. To GIVE AWAY THE S. (-चा) पोकळपणा बाहेर येणें किंवा फुटणें.] ५ *mere appearance* दाखवणूक *f*, भासवणूक *f*, सोंग *n*, पोम *n*, स्तोम *n*, दंभ *m*, ढोंगधत्तुरा *m*, नसता डौल *m*, पोकळ डौल *m*. [IN MERE OUTWARD S. बाह्यतः, वरवर दिसण्यांत, वरवर, वरवरती. ] ६ *semblance, look* आकार *m*, रूप *n*, स्वरूप *n*, घाट *m*, डौल *m*, आभास *m*. ७ (*obstetrics*) *discharge indicating the approach of labour* प्रसवसूचक रक्तस्राव *m*, प्रसवस्रावदर्शन *n*. Show- bill *n*. (किमतीसकट) जिनसांची जाहिरात *f*. S. -box *n*. चित्रें दाखविण्याची पेटी *f*, चित्रदर्शनपेटिका *f*. Show-bread *n*. जेरुसेलम येथील हिब्रू लोकांच्या देवळांत देवासमोर ठेवलेली भाकर *f*. इस्रायल लोकांच्या बारा जाति दाखविण्याकरितां अशा बारा भाकरी ठेवितात. S.-case *n*. वस्तुसंग्रह दाखविण्याचें कांचेचें कपाट *n*, वस्तुसंग्रहदर्शक कपाट *n*. S.-man *n*. खेळकरी *m*. (b) वस्तुसंग्रहाचा मालक *m*, वस्तुसंग्रह दाखविणारा *m*. S. place *n*. प्रेक्षणीय स्थळ *n*, पहाण्यासारखें स्थळ *n*. S.-room *n*. माल दाखविण्याचें दुकान *n*, वस्तुदर्शनालय *n*. Side-show *n*. प्रदर्शनांतील बाजूचा भाग *m*. Show of hands हात वर करणें, हातांनीं दाखवणें.

Show-bill, Show-bread, See under Show *n*.

Show'er *n*. दाखविणारा, दर्शक, प्रदर्शक *m*.

Shower (show'er) [Of Anglo-Saxon origin.] *n. a temporary fall of rain* वर्षाव *m*, वृष्टि *f*, सर *f*. [APRIL OR SPRING S. चैत्रसर *f*, चैत्रशिंपणें *n*, चैत्रवणी *n*. HEAVY S. दगडसर *f*, दांडगी सर *f*, मोठी सर *f*. IN HEAVY S.s चळकधार. SCANTY AND PASSING S. शिडशिडी *f*. SUNSHINE S. ऊनपाऊस *m*, नागवा पाऊस *m*.] २ (*fig.*) *profuse fall, copious distribution* ( बाणांची वगैरे) वृष्टि *f*, वर्षाव *m*, पाऊस *m*; as, "A S. of gifts; A S. of honours." ३ *a large supply* ढीग *m*, वर्षाव *m*; as, "Letters come in S.s." S. *v. t. to pour down, to rain* पाऊस पाडणें, वृष्टि *f*. करणें *g. of o.* २ (*fig.*) (बाणांचा, देणग्यांचा वगैरे ) वर्षाव *m* -वृष्टि *f*. करणें, पाऊस *m*. पाडणें. S. *v. i.* वृष्टि *f* -वर्षाव *m*. होणें, पाऊस पडणें. Show'ered *pa. t.* S. *pa. p.* पाऊस पाडलेला, वृष्टि केलेला.

Show'ery *a.* झडीचा, मोठ्या सरीचा.
Show'iness *n.* दिखाऊपणा *m*, भपका *m*, डौल *m*.
Show'ing *pr. p.* S. *v. n.* दाखविणें *n*, प्रदर्शन करणें *n*, प्रदर्शन *n*.
Shown *pa. p.* of show दाखविलेला, प्रदर्शित.
Show'y *a. splendid, gaudy* दिखाऊ, भपक्याचा, भपकेदार, डौलाचा.
Shrapnel (shrap'-nel) [After General H. *Shrapnel* (1761-1842), the inventor, 1803.] *n.* श्रेपनेल नांवाचा गोळा *m*. वजन = १५०० पौंड. किंमत = १९००० रुपये.
Shred (shred) [Of Anglo-Saxon origin.] *n. strip* चिंधी *f*, चिरटी *f*, चिंधडी *f*, चिंधूक *n*, चिंधुकली *f*, चिंधूट *n*, चिंधोटी *f*, धुडका *m*, धुडकी *f*, वाभारा *m*, धांद *f*, धांदोटी *f*, चिरफळी *f*, फाळा *m*, परकळा *m*, पिंजुळी *f*, पिंजोळी *f*. [ORNAMENTAL S. (OF PAPER, CLOTH, FRINGE, &c.) झिळमिळी *f*. SHREDS चिंधड्या *f. pl.*, छाट *m*, छाटछूट *m*. SHREDS AND TATTERS (AS OF A GARMENT) लक्तऱ्या *f. pl.*, वागुऱ्या *f. pl.*, वागोऱ्या *f. pl.* with *v.* उडविणें.] २ *a small portion* अल्पांश *m*, तिळभर *n*, थोडें *n*, यत्किंचित् *n*; as, "Not a S. of evidence." S. *v. t. to cut into shreds* चिंध्या *f. pl.* करणें, चिरफळ्या *f. pl.* &c. करणें -काढणें.
Shred, Shred'ded *pa. t.* and *pa. p.*
Shrew (shrōō) [A. S. *screawa*, the venomous mouse. From the root of Shrew.] *n. a brawling troublesome woman, a scold* कर्कशा *f*, कैदाशीण *f*, त्राटिका *f*.
Shrewd (shrōōd) [Lit. "having the nature of a shrew."] *a.* (of person) *sly, arch* धूर्त, लुच्चा, कागडा, गुंड, धोरणी, विचक्षण, चाणाक्ष, शाहणा, हुशार, चतुर, चौकस, चौकसदार; as, "A S. observer." २ (of things) धूर्तपणाचा. [A S. FACE धूर्तपणाची मुद्रा *f*, धूर्तपणाचा चेहरा *m*.] ३ *proceeding from cunning or sagacity* शहाणपणाचा, चातुर्याचा, चतुराईचा, दूरदृष्टीचा.
Shrewd'ly *adv.* धूर्तपणानें, शहाणपणानें.
Shrewd'ness *n.* धूर्तपणा *m*, शहाणपणा *m*, धूर्तता *f*: चतुराई *f*, चातुर्य *n*.
Shrew'ish *a.* कर्कशेचा, कर्कशेसारखा.
Shriek (shrēk) [A form of Screech.] *v. i.* (भीतीनें किंवा दुःखानें) किंकाळणें, किंकाळी *f*. फोडणें. [To S. OUT किंकाळी फोडून सांगणें.] २ *to laugh uncontrollably* खोखो हंसणें, गदगदां हंसणें. S. *n.* किंकाळी *f*.
Shrieked *pa. t.* S. *pa. p.* किंकाळी फोडलेला. Shriek'ing *v. n.* किंकाळी फोडणें *n*.
Shriev'alty *n.* Same as Sheriffalty, which see.
Shrift (shrift) [A. S. *scrift. scrifan*, to shrive.] *n.* (archaic) *confession to a priest and absolution* ख्रीस्तजवळ केलेला पापांगीकार व त्यामुळें झालेलें पापमोचन *n*; as, "Have you got leave to go to S. today?" [SHORT S. (फांशीची) शिक्षा व तिची अंमलबजावणी यांमधील अति थोडा काल *m*, loosely अति अल्प काल *m*.]

Shrike ( shrīk ) [Lit. the 'shrieking' bird, Ice *skrikja*, a shrike.] *n.* ( crested ) टीव *f.* २ (rufous-backed ) लटोरा *m.*

Shrill ( shril ) [Imitative.] *a. sharp, acute, piercing* कर्कश, कर्णकटु. २ (*fig.*) *importunate, insisting on being heard* (*esp.*) *in complaint or accusation* गयावया करणारा. S. *v. i.* (of a cry) *to sound shrilly* कर्कश ओरडणें. S. *v. t.* ( of person ) कर्कशशब्दांत सांगणें, रडव्या शब्दांत सांगणें; as, "He *shrills* out his complaint." Shril'lness *n.* कर्कशपणा *m*, किन्हरेपणा *m*, &c. Shril'ly *adv.* कर्कशपणानें, कर्कश आवाजानें.

Shrimp ( shrimp ) [Of German origin.] *n.* ( the shell-fish ) झिंगा *m*; *dim.* झिंगी *f*, झिंगरूं *n*, चिंगाटी *f*, कोळंबी *f.* २ *puny, meagre man, &c.* क्षुद्रतर.

Shrine ( shrīn ) [Lit. 'a chest for written papers.' A. S. *scrin* -L. *scrinium*, a casket.] *n. a case for an idol* देव्हारा *m.* २ *a saint's tomb* समाधि *f*, कबर *f*, छत्री *f*, थडगें *n.* ३ *an altar* स्थंडिल *n.* ४ *a place of worship* प्रार्थनामंदिर *n*, ( of the Hindus ) देऊळ *n.* ५ पवित्रस्थान *n.*

Shrink ( shrink ) [Of Anglo-Saxon origin.] *v. i. to contract* आंखडणें, अखुडणें, आटणें, आंवळणें, घटणें, दाटणें, ओढणें, अवटरणें, चिरमुटणें, संकोचणें, आकुंचन *n.* होणें *g. of o.* खचणें. २ ( with *from or back* ) *to draw back* ( with fear, doubt, ) कचरणें, कचणें, कच *f.* खाणें, माघार *f.* &c. घेणें, मागें सरणें -पाहणें -होणें. [To S. INTO ONESELF, *to become reserved* संकुचितवृत्ति होणें *in con.* Shrink *v. t.* आंखडवणें. Shrank, Shrunk *pa. t.* Shrunk, Shrunken *pa. p.* Shrink'age *n.* आखडणी *f*, आवटर *f*, आकुंचन *n*, घटाव *m*, खचणें *n.* "How much must we allow for the S." Shrink'ing *pr. p.* S. *v. n.* आंखुडणें *n*, संकोचणें *n*, कचरणें, चपापणें &c. Shrunk'en *a.* बसलेला, खप्पड, सुकलेला, चिंबलेला, सुरकुतलेला; as, "A S. face."

Shrivel (shriv'l) [Of doubtful origin.] *v. i. to contract or be drawn into wrinkles* चिरमुटणें, अखुडणें, अंवळणें, संकोचणें, अवटरणें, चिरम्या *f. pl.* -सुरकुत्या *f. pl.* -वळ्या *f. pl.* &c. पडणें *in. con.* Shrivel *v. t. to contract or draw into wrinkles* अखुडणें, चिरमुटवणें, अवटारणें, चिरम्या *f. pl.* -सुरकुत्या *f. pl.* -&c. पाडणें. Shrivelled *pa. t.* S. *pa. p.* चिरम्या पाडलेला -पडलेला, &c. चिंबका, चिंबट, चेंबट, चिंबा, वाळका. २ ( features, as from age ) खप्पड.

Shroff (shrof ) [Arabic *sarraf.*] *n.* सराफ *m.* [A LINE OR ROW OF S.s सराफा *m*, सराफकट्टा *m.* BUSINESS OF A S. सराफी *f.* SEAT OR STAND OF A S. पेढी *f.*] Shroff'age *n.* नाण्यांची पारख *f*, ( खऱ्याखोट्या ) नाण्यांची निवड किंवा परीक्षा *f.*

Shroud ( shrowd ) [A. S. *scrud*, a garment.] *n. a covering* ( *esp. of the dead* ), *a winding sheet*

कफन *n*, प्रेतवस्त्र *n*. २ *a concealing agency* आवरण *n*, झांकण *n*, गोपनवस्त्र *n*; as, "Wrapped in a S. of mystery." ३ (*pl.*) (*naut.*) डोलकाठीचीं दोरखंडें *n. pl.* S. *v. t.* प्रेतावर कफन घालणें. २ *to cover, to conceal* झांकून ठेवणें, लपवून ठेवणें, ( -वर ) झांकण घालणें.

Shrove-tide *n.* (*lit.*) पापांगीकाराचे दिवस *m. pl.* २ रोमनक्याथोलिक लोकांच्या लेंटच्या सणाच्या पूर्वीचे दिवस *m. pl.* (सेक्झाजेसिमा डे आणि ॲश् वेन्सडे यांच्यामधील ).

Shrub (shrub) [ Of Anglo-Saxon origin. ] *n.* झुडप *n*, झुडूप *n*, क्षुद्रवृक्ष *m*. [ DENSE AND SPREADING S. झांकर *n*.] Shrub'by *a.* पुष्कळ झुडपें असलेला.

Shrub'bery *n.* झाडी *f.*

Shrug (shrug) [ Ety. dub. ] *v. i. to draw up* (*one's shoulders*), *in sign of surprise, doubt, dislike, &c.* खांदे *m. pl.* -बाव्हळे *m. pl.* उचलणें -चढवणें -हालवणें -मुरडणें *or* उचलून &c. नाकारणें, माफ *n*. मोडणें -मुरडणें -उडवणें, कान *m. pl.* झाडणें, कानावर हात *m*. ठेवणें, कानांत बोट *n*. घालणें. Shrug *n.* खांदे *m. pl.* मुरडणें *n*, खांदमोड *f.* Shrugged *pa. t.* and *pa. p.* Shrug'ging *pr. p.* खांदे मुरडणें *n*.

Shrunk *pa. t.* and *pa p.* of Shrink.

Shrunken *pa. p. & a.* See under Shrink.

Shudder (shuder) [ Of Dutch origin.] *v. i. to shake with fear or aversion* (अंग) कांपणें, अंगावर कांटे उभे रहाणें, (थंडीनें) कुडकुडणें, थरारणें, रोमांच उभे रहाणें, शिसारी येणें -वाटणें. S. *n.* (अंग) कांपणें *n*, हुडहुडी *f*, लटलट *f*, रसकस *f*.

Shuffle (shuf'l) [ A by-form of Scuffle, thus connected with Shove and Shovel. ] *v. t. to huddle together* ( -चा ) गोंधळ करणें, एके ठिकाणीं कोंबणें, ढवळणें, गफलतणें, गोंधळ *m* -गफलत *f* -घालमेल करणें *g. of o.* २ ( cards ) ( पत्ते ) पिसणें, ( गंजिफांची ) गलद करणें, घोळणें, घोळ *m* -घोळंकार *m*. करणें. ३ ( with *off*) *to push off* लोटणें, ढकलून देणें, लोटून देणें, टाळा *m*. देणें; as, "To S. off responsibility upon others." [To S. OFF THE MORTAL COIL मर्त्यदेह टाकणें, देहावसान करणें.] ४ ( with *up*) *to make or form in haste or confusion* गडबडगुंडा करणें, लाटून देणें, ढकलणें, ढकल *f* -चालढकल *f*. करणें. ५ *to quibble* शब्दच्छल करणें, द्व्यर्थी बोलणें.

Shuffle *v, i. to play mean tricks* लपंडाव करणें, अकडं-तिकडं -छक्केपंजे करणें -लावणें -मांडणें -चालवणें. २ ( in gait or walk ) *to shove the feet about* पाय घांशीत चालणें, पाय ओढीत चालणें, लटपट -लटपटत चालणें.

Shuffle *n.* गोंधळ करणें *n*. २ पाय घांशीत चालणें *n*.

Shuffled *pa. t.* and *pa. p.*

Shuf'fler *n.* गोंधळ करणारा, घालमेल करणारा, गफलती, गफलत्या. २ पिसणारा, गलद करणारा. ३ (दुसऱ्यावर ) लोटणारा, ढकलणारा, टाळा देणारा, टोलवाटोलवी करणारा. ४ पाय घांशीत चालणारा.

**Shu'ffling** *pr. p.* S. *n.* गोंधळ करणें *n.* २ पिसणें *n*, गलद करणें. ३ ढकलणें *n*, चालढकल करणें *n.* ४ पाय घांशीत जाणें *n.*

**Shun** (shun) [A. S. *scunian*, to shun.] *v. t. to avoid, to eschew* चुकवणें, टाळणें, सोडणें, टाकणें, जवळ न जाणें, दूर रहाणें with पासून *of o.*, सावलीस किंवा वाऱ्यास उभें न राहाणें, सावलीस उभें न राहूं देणें. Shunned *pa. t.* & *pa. p.* टाळलेला, चुकवलेला, टाकलेला, दूर सोडलेला. Shun'ning *pr. p.* टाळणारा, चुकवणारा &c. S. *v. n.* टाळणें *n*, चुकवणें *n.*

**Shunt** (shunt) [M. E. *shunten*, to turn aside.] *v. t. to turn (a train) into a siding* बाजूच्या रुळावर (गाडी) घालणें. २ *to postpone or stifle discussion of* (subject), *to lay aside* (project) लांबणीवर टाकणें, दाबून टाकणें, मागें टाकणें. S. *v. i.* (of a train) बाजूच्या रुळावर जाणें -येणें. S. *n. a side rail* बाजूचा रूळ *m.* २ (विजेच्या प्रवाहाचा भाग बाजूला नेणारा) बाजूचा वाहक *m*, पार्श्ववाहक *m.*

**Shunt-winding** *n.* (*elec.*) (विद्युदुत्पादकाची) पार्श्ववाहकयुक्त गुंडाळणी *f.* पार्श्ववाहक = Shunt.

**Shut** (shut) [Anglo-Saxon *scyttan*, conn. with Shoot, from the shooting forward of the bar.] *v. t. to close* बंद करणें, लावणें, झांकणें, ढांपणें, मिटणें, मिटविणें (door, window, shutters, &c.). [To S. ONE'S EYES TO (-कडे) डोळेझांक करणें, कानाडोळा करणें. To S. ONE'S EARS TO कान न देणें, न ऐकलेंसें करणें, मनावर न घेणें. To S. THE DOOR UPON विचाराबाहेर टाकणें, विचाराबाहेर सोडणें.] २ (with *up*) *to block in* रोधणें, कोंडणें, कोंडून टाकणें. ३ (with *up*) *to conclude* आटपणें, बंद करणें, संपवणें, गुंडाळणें, पुरें करणें, बस करणें, समारोप करणें. [SHUT UP! पुरें कर, बस कर.] ४ (with *off*) (पाण्याचा प्रवाह) प्रविष्ट होऊं न देणें, दाबणें, थांबवणें. (b) दूर ठेवणें, अलग ठेवणें, अलिप्त ठेवणें, बहिष्कृत करणें; as, "To S. off from society." ५ (बोट, वगैरे) सांपडणें, सांकटणें; as, "S. his finger into the door hinge." [To S. DOWN (झडप) खालीं पाडणें. To S. IN आंत घेऊन बंद करणें, वेढून बंद करणें, कोंडणें. To S. OUT येऊं न देणें. To S. TO घट्ट बंद करणें. To S. UP (वाऱ्या, दरवाजे, वगैरे) बंद करणें. To S. UP SHOP (कायमचा, तात्पुरता) धंदा (व्यवहार) बंद करणें.]

**Shut** *v. i.* बंद होणें, लागणें, मिटणें, झांकणें, ढांपणें, (फूल) पाकळणें, मावळणें. २ *to cease speaking* भाषण बंद करणें, भाषण पुरें करणें, तोंड खळणें, तोंडाला खीळ घालणें. ३ (with *down*, of mill, &c.) बंद होणें. [To S. TO घट्ट बंद होणें.] Shut *pa. t.* S. *pa. p.* बंद केलेला.

**Shut'ter** *n.* ढांपण *n.* २ झडप *n.* [SLIDING S. सरकतें झडप *n.* DROP S. पडतें झडप *n.* FOLDING S. घडीचें झडप. (FIXED OR MOVABLE) VENETIANED S. (कायमच्या किंवा फिरत्या) झुलक्यांचें झडप. HINGED S. हिंजवर फिरणारें झडप *n.*] २ (*photo.*) क्यामेऱ्याचें झांकण *n.* S. *v. t.* (-ला) झडप करणें, झडप बसवणें. २ झांकण करणें.

Shuttle (shut'l) [O. E. *scyttel*, bolt.] *n.* (*weaving*) **धोटा** *m*, **धोटें** *n*, **बिरकांडी** *f*, **नाडीचीर. २** *a shuttle-cock* **पीसचेंडू** *m*, **पिच्छकंदुक** *m*. [FLY SHUTTLE धांवता धोंटा *m*. S. BOX (हत्याचे दोन्ही टोंकांस बसविलेली) धोंटा रहाण्याची पेटी *f*. S. RACE ज्यावरून धोंटा धांवतो ती पट्टी *f*. ही पट्टी हातमागांत लांकडाची, व वाफेच्या मागांत लोखंडी असते. S. GUARD हत्याची शीग *f*. S. GUIDE पेटीची लोखंडी पुढची बाजू *f*. S. REST फाल्तू धोंटा ठेवण्याची जागा *f*. S. TONGUE धोंट्याची सुई.]

Shy (shī) [Of Anglo- Saxon origin.] *a. fearful of near approach, timid* **लाजाळू, बुजट, भित्रा,** (said of oxen, &c.) **बुजरा, बुजीर, बिचका, बिचक्या. २ लाजरा, सभाभीरु, भाषणविमुख.** S. *v. i. to shrink back* (said of a horse) **बुजणें, बिचकणें.** Shied *pa. t.* and *pa. p.* Shier, Shyer *compar.*, Shiest, Shyest, *super.* Shy'ing *pr. p.* [To FIGHT SHY OF माघार घेणें, हातपाय गाळणें.] Shy'ly *adv.* **लाजाळूपणानें, लाजून. २ बुजरेपणानें, बुजून.**

Shy'ness *n.* **लाजरेपणा** *m*, **लाजाळूपणा** *m*, **बुजरेपणा.**

Sibilant (sib'i-lant) [L. *sibilare*, to hiss.] *n.* **(मराठींतील श, ष, सप्रमाणें इंग्रजींतील** S **आणि** Z **हे) ऊष्मवर्ण.** S. *a.* **ऊष्म** (in *comp.*) **२ शिळीसारखा.**

Sibilus *n.* **सीत्कारध्वनि, शीळ घातल्यासारखा शब्द.**

Sibyl (sib'il) [Of Greek origin.] *n.* **देवाची भाकणूक बोलून दाखविणारी स्त्री** *f*. **२** *prophetess* **भविष्य कथन करणारी** *f*, **जातजोशीण** *f*.

Sick (sik) [A. S. *seoc*, sick.] *a.* **आजारी, दुखणाईत, दुखणेकरी, बीमार, रोगी, मान्दा, व्याधिग्रस्त, रुग्ण, सीक.** [THE S. MAN, *the Turkish Empire* तुर्की साम्राज्य *n.*] **२ ओकारी आलेला, मळमळूं लागलेला.** [To BE S. पोटांत ढवळणें. To MAKE S. ओकारी आणणें.] **३** *disgusted* **कंटाळलेला, विटलेला, वीट आलेला, त्रासलेला;** as, "S. of flattery." [To BE S. OF (-चा) वीट येणें, विटणें.] **४** (of a ship) *needing repair* **डागडुजी आलेला, डागडुजीस झालेला.** [NAIL-SICK नवीन खिळे बसविण्यास झालेला. PAINT-SICK रंग देण्यास झालेला. S. BAY जहाजाच्या मुख्य डेकावरील इस्पितळ *n*. S. BED आजाऱ्याचा बिछाना *m*. २ आजारीपणा. S. BERTH (लढाऊ जहाजावरील) आजाऱ्याची खोली *f*. S. HEAD-ACHE पित्तामुळें डोकें दुखणें. S. LIST (सैन्यांतील) आजारी मनुष्यांची यादी *f*. To BE ON THE SICK-LIST आजारी असणें. S. LEAVE आजारीपणाची रजा *f*, सीकरजा *f*. S. ROOM आजाऱ्याची खोली *f*.]

Sick'en *v. t.* (R.) *to make sick* **आजारी पाडणें. २** *to make squeamish* **कळमळवणें, कंटाळविणें, कळमळ -मळमळ आणणें, ओकारी -किळस आणणें.** S. *v. i. to become sick* **आजारी पडणें, आजारी होणें. २** *to get qualmish* **ओकारी वाटणें, कळमळ वाटणें, किळस येणें, विटणें, मन विटणें. ३ फिका पडणें, सुखास न येणें;** as, "All pleasures S. and all glories sink."

Sick'ened *pa. t.* S. *pa. p.* **ओकारी आलेला, उद्विग्न.**

Sick'ening *pr. p. a.* आजारी पाडणारा. २ ओकारी आणणारा, वीट आणणारा, उद्वेगजनक.

Sickle (sik'l) [O. E. *sicol* -L. *secula* -*secare*, to cut.] *n.* कोयता *m*, कोयती *f*, कोयतें *n*, लवित्र *n*. [DENTICULATED S. दांतविळा *m*, दांतरें कोयतें *n*.]

Sick'liness *n.* रोगिपणा *m*, रुग्णता *f*, रोगटपणा *m*.

Sick'ly *a.* रोगट, रोगी, दुखणेकरी, रुग्ण, रोगिष्ठ. [S. FROM NATURE OR BIRTH जन्माचा रोगी, पिंडाचा रोगी, जातरोगी.] २ *insalubrious* रोगट, रोगकारक. ३ किळस आणणारा, त्रास आणणारा; as, "S. smell." Sickly-looking *a.* कयाहीन, पिकुटलेला, निस्तेज, कळाहीन.

Sick'ness *n.* आजारीपणा *m*, रोगिपणा *m*. २ रोग, विकार, विकृति. ३ *nausea* कळमळ, मळमळ, ओकारी *f*.

Side ( sīd ) [A. S. *side*, side.] *n.* ( of person or animal ) बाजू *f*, कूस *f*, आंग *n*, कुक्षि *f*, पार्श्व *n*, पार्श्वभाग *m*, पक्ष *m*, कडण *f*, अर्धांग *n*, कडसणी *f*, बरगडी *f*, कक्ष. [PAIN IN THE S. पार्श्वशूल *m*, कुक्षिशूल *m*, पाठींतलें दुखणें *n*, पाठदुखी *f*. HOLLOW OF A S. ( *esp.* from fasting ) बखळ *f*, वाखल *n*. TO LIE ON ONE SIDE कुशीवर निजणें. S. BY S. चिकटून, लागून. २ ( *fig.* ) बरोबर, एकाच वेळेला, एकदम. TO SHAKE ONE'S SIDES खोखो हंसणें, खदखदां हंसणें. S. SPLITTING खोखो हंसविणारा, हंसवून मुरकुंडी वळविणारा. ON ALL SIDES चहूंकडे, आजूबाजूस. ON BOTH SIDES दुतर्फा, दुहींकडे. ON ONE S. एकीकडे, एकपक्षीं. NEAR S. ( OF A HORSE, VEHICLE, &c. ) डावी बाजू *f*. ON THE RIGHT S. OF FORTY चाळिशीच्या आंत. ON THE WRONG S. OF FORTY चाळिशीच्या बाहेरचा, चाळिशी उलटलेला.] २ *surface* पृष्ठभाग *m*, बाजू *f*, तोंड *n*; as, "A cube has six *sides*." ३ कागदाची बाजू *f*, ताव *m*; as "Sent him six *sides* of argument." ४ *face, part distinguished* बाजू *f*, आंग *n*. [RIGHT S. ( OF CLOTH ) वरची बाजू *f*. WRONG S. आंतली बाजू *f*, आंतलें आंग *n*. FAIR S. दर्शनी आंग *n*.] ५ *part or region near margin* बाजू *f*, कडा *f*, बाजूचा भाग *m*. ६ *a party, cause* बाजू *f*, पक्ष *m*, तरफ *f*, फळी *f*. [OPPOSITE S. प्रतिपक्ष *m*, विरुद्ध बाजू *f*. TO TAKE THE S. OF पक्ष धरणें *g. of o.*, कड ओढणें -धरणें *g. of o.*] ( b ) (team ) बाजू *f*, टोळी *f*, खेळाडू *m. pl.*, मंडळी *f*; as, "Cambridge has a strong S." ६ *line of descent through father or mother* बाजू *f*, पक्ष *m*, वंश *m*. ७ शाखा *f*. Side-arms तरवार *f*, बागनेट *n*, पिस्तूल, वगैरे, बाजूला लटकावण्याचीं हत्यारें. Side-light *n.* बाजूचा उजेड. २ ( गलबताच्या ) बाजूचा दिवा. ३ बाजूची माहिती. Side-line *n.* धंद्याची उपशाखा. Side-long *a.* बाजूकडचा, पार्श्विक, अनुपार्श्व, पार्श्वस्थ, अपांग; as, "S. looks of love." Side-long *adv. laterally* बाजूकडे, बाजूनें, बाजूवर, आडवा *decl.* Side-look *n.* कटाक्ष *m*, नेत्रकटाक्ष *m*, अपांगदृष्टि *f*. S. note *n.* बाजूला (समासांत) दिलेली टीप *f*. S. saddle *n.* स्त्रिया बसण्याचा जीन *m*, जनानी जीन *m*. S. show *n.* ( मुख्य तमाशां-

तील ) बाजूचा ( कमी महत्वाचा ) तमाशा *m* -देखावा *m* -भाग *m.* S. slip *n.* ( मोटार, बायसिकल वगैरेचें ) चाक निखळणें *n.* २ मोड *m*, कोंब *m.* ३ अनौरस मूल *n.* S. ways, S. wise *adv. laterally* बाजूकडे, बाजूनें, बाजूवर, आडवा *decl.* S. wind *n.* बाजूचा वारा *m*, कडेचा वारा *m.* २ *something acting indirectly* अप्रत्यक्ष साधन *n.*

Side *a. lateral* बाजूचा, कडेचा, पार्श्वगत, पार्श्वीय, पार्श्वस्थ. २ *indirect, devious* आडबाजूचा, आड-कुशीचा, आडवाटेचा.

Side ( with *with* ) *v. i. to lean to a side or party* पक्ष *m.* धरणें, पक्ष घेणें, बाजू *f.* घेणें.

Sid'ed *pa. t.* and *pa. p.* of side.

Sid'er *n.* बाजू घेणारा. [अनिष्ट.

Sideral ( sīd'er-al ) *a.* नक्षत्राचा, नाक्षत्र. २ (*astrol.*)

Sidereal ( sīdē'-rē-al ) [L. *sideris*, a star.] *a. relating to stars* नक्षत्राचा, नक्षत्रविषयक, नक्षत्रसंबंधी, नाक्षत्र. [S. DAY (*astron.*) नाक्षत्रदिवस *m.* S. TIME नाक्षत्रकाल *m.* SIDEREAL YEAR नाक्षत्रवर्ष *n*, नाक्षत्र-सौरवर्ष *n.*]

Sid'ing *pr. p.* S. *n.* बाजू *f*, बाजूचे रूळ *m. pl.*

Sidle (sī'dl) *v. i. to move side foremost* बाजूबाजूनें चालणें -जाणें, सरकत जाणें. Si'dled *pa. t.* and *pa. p.* Si'dling *pr. p.*

Siege ( sēj ) [ Orig. 'a seat.' L. *sedes*, a seat. ] *n.* वेढा *m*, गराडा *m.* [TO LAY S. TO वेढा देणें, गराडा *m.* घालणें. TO PUSH THE S. वेढा चालू ठेवणें. ] २ वेढ्याचा काल *m*, वेढा (*fig.*) *m.* ३ *persistent effort to win one's affections, influence, etc.* वेढा *m*, चिकाटीचा प्रयत्न *m.* S. gun *n.* वेढ्याची तोफ *f.* S. train *n.* वेढ्याचा तोफखाना *m.* S. works *n. pl.* वेढा देणाऱ्या सैन्यानें स्वतःच्या संरक्षणाकरितां खटलेले खंदक व लावलेले मोर्चे *m. pl.*, वेढ्याचीं कामें *n. pl.*

Siesta ( si-es'ta ) [L. *sexta* (*hora*), the sixth (hour) after sunrise, the hour of noon.] *n. a short afternoon nap, a short sleep* ( *after eating, etc.* ) ( जेवणानंतर दुपारचा ) निद्रेचा चुटका *m*, वामकुक्षि *f*, आराम *m.* [TO TAKE A S. वामकुक्षि *f.* करणें.]

Sieve (siv) [A. S. *sife*, a sieve.] *n.* चाळण *f*, चाळणी *f.* २ ( for washing rice, etc.) रोवळा *m*, (*dim.*) रोंवळी *f.* ३ *a person who cannot keep secrets* तोंडांत कोणतीहि गोष्ट न राहणारा *m.* S. *v. t. to put through a sieve* चाळणें.

Sift ( sift ) [A. S. *siftan*, to sift.] *v. t. to separate by a sieve* ( *from* or *out* ) चाळणें, छानणें, झारणें. [ DIRT SEPARATED BY A SIFTING गाळ *m.* MATTER TO BE SIFTED चाळण *n.* PRICE OR COST OF SIFTING चाळणावळ *f.* ] २ (grain, etc., in a fan) घोळणें, वैचणें, आसुडणें, पाखडणें, खिरणें, झटकणें. ३ (*fig.*) *to investigate minutely* चाळणें, छानणें, छान करणें.

Sift *v. i.* ( of snow, light, etc. ) *to fall as from a sieve* थोडथोडा पडणें, चाळणींतून पडणें.

Sifted *pa. t.* S. *pa. p.* चाळलेला, आसुडलेला, पाखडलेला, छानलेला, etc.

Sift'er *n.* चाळणारा, घोळणारा, आसुडणारा, पाखडणारा, छानणारा, छान करणारा.

Sift'ing *pr. p.* S. *n. act* चाळणें *n*, चाळण *n*, घोळणें *n*, पाखडणें *n*, पाखडणी *f.* [FAN OR BASKET FOR S. सूप *n.* ] २ छानणें *n.*

Sigh ( sī ) [ A. S. *sican*, to sigh. ] *v. i. to breathe deeply as in grief* सुसकारा टाकणें, उसासा *m.* टाकणें. २ (with *for*) *to long for* (इच्छित किंवा हरवलेल्या वस्तूबद्दल ) हायहाय करणें. ३ ( of wind ) सुसकाऱ्याप्रमाणें आवाज करणें -होणें. S. *n. a deep breathing* सुसकारा *m*, उसासा *m.* [A S. OF RELIEF समाधानाचा सुसकारा *m*, भार -ओझें हलकें झाल्याचा सुसकारा *m.*] Sighed *pa. t.* and *pa. p.*

Sigh'er *n.* सुसकारा टाकणारा, उसासा टाकणारा, उसासा देणारा. Sigh'ing *pr. p.*

Sight (sīt) [A. S. *siht*, sight.] *n. power or function of the organ of sight* दृक्शक्ति *f*, पाहण्याची शक्ति *f*, दृष्टि *f*, डोळे *m. pl.*, नेत्र *m. pl.* [DECEPTION OF S. (AS EFFECTED BY CONJURORS) देखतभूल *f.* ERROR OF S. नजरचूक *f.* IN THE S. OF देखत, देखतां, नजरेसमोर. LOSS OF S. आंधळें होणें *n*, अंधत्व *n.* OBJECT OF S. चक्षुर्विषय *m*, दृग्विषय *m.*] २ *the organ of seeing* चक्षुरिंद्रिय *n*, डोळा *m*, नेत्र *m.* ३ *the act of seeing* पाहणें *n*, दृष्टि *f*, दर्शन *n*, नजर *f*, अवलोकन *n*, ईक्षण *n.* [AT S. (in commerce) दर्शनीं, देखत. AT THE VERY FIRST S. सकृद्दर्शनीं. KNOWLEDGE ( OF A PERSON ) BY S. तोंडओळख *f.* TO BE IN S. *to be visible* दिसणें, दिसून येणें, दृष्टीस पडणें. TO BE IN S. (OF) *to be visible from* दृष्टीच्या टप्प्यांत -दृष्टीच्या आटोक्यांत असणें. TO BE UNABLE TO BEAR THE S. OF ( THROUGH ENVY, ETC. ) देखूं न शकणें, *impers.* डोळे फुटणें *g. of s.* TO CATCH S. OF नजरेस पडणें, दिसणें, दिसूं लागणें. TO LOSE S. OF दिसेनासा होणें, दृष्टीआड होणें, (-च्या) हालचालीसंबंधानें माहिती नसणें. TO GET A S. OF नजरेस पडेल असें करणें, नजरेस पाडणें, पाहणें.] ४ (*of a gun*) माशी *f*, मासकी *f*, मख्खी *f.* ५ *a spectacle* ( esp. as novel or remarkable ) तमाशा *m*, देखावा *m*, कौतुक *n*, मौज *f.* [SEEKER OF S.S AND SHOWS तमाशांचा शोकी or शोकीन.] ६ दृष्टीचा टप्पा *m*; as, "Is in S. or out of S." [TO PUT OUT OF S. बाजूला सारणें, दृष्टीआड करणें.] Sight'less *a.* नेत्रहीन, आंधळा. Sight'liness *n.* देखणेपणा *m.* Sight'ly *a.* देखणा, दिखाऊ, दर्शनीय.

Sight *v. t.* पहाणें, बघणें. २ (*astron.*) (दृग्यंत्रानें) ताऱ्यांचा वेध घेणें. ३ बंदुकीला माशी बसवणें. ४ बंदुकीची माशी लावणें. ५ माश्यांच्या साहाय्यानें नेम धरणें.

Sightless, See under Sight *n.*

Sign (sīn) [Fr. *signe* -L. *signum*, a mark.] *n. an indication of something to come* चिन्ह *n*, खूण

*f*, लक्षण *n*, सूचक *n*. [AUSPICIOUS OR GOOD SIGN सुचिन्ह *n*. INAUSPICIOUS OR BAD S. दुश्चिन्ह *n*, अवचिन्ह *n*, अवलक्षण *n*, कुलक्षण *n*. SECRET S. अंतरखूण *f*, चोरखूण *f*. SIGNS OF RAIN पावसाचे डोहळे *m. pl.*, पावसाचें चिन्ह *n*, पावसाचा रंग *m*.] २ *a prodigy, a portent* उत्पात *m*, अद्भुत *n*, चमत्कार *m*. ३ (*astron.*) राशि *f*. [SIGNS IN ASTROLOGY ARE: MASCULINE SIGNS पुरुषराशि. FEMININE S. स्त्रीराशि *f*. FIERY S. अग्निराशि *f*. EARTHLY S. पृथ्वीराशि *f*. AIRY S. वायुराशि *f*. WATERY S. जलराशि *f*. S. OF SHORT ASCENSION लघुसंक्रमणराशि *f*. S. OF LONG ASCENSION दीर्घसंक्रमणराशि *f*. FIXED S. स्थिरराशि *f*. COMMON S. द्विस्वभावराशि *f*, द्विमुखराशि. Barren S. वंध्या-राशि *f*. DOUBLE-BODIED S.s जुळ्या राशि *f. pl.* EQUINOCTIAL S.s. विषुवदिनराशि *f. pl.* TROPICAL S. ट्रापिकल राशि *f. pl.* VARIABLE S.s चर राशि *f. pl.* SIGNS OF THE ZODIAC ARE: ARIES (मेष), TAURUS (वृषभ), GEMINI (मिथुन), CANCER (कर्क), LEO (सिंह), VIRGO (कन्या), LIBRA (तूळ), SCORPIO (वृश्चिक), SAGITTARIUS (धनु), CAPRICORNUS (मकर), AQUARIUS (कुंभ), PISCES (मीन).] ४ *an indicative nod or action, a gesture, a signal* खूण *f*, इशारत *f*, इशारा *m*, संकेत *m*, इंगित (S) *n*, संज्ञा *f*. ५ (*math.*) चिन्ह *n*. [SIGN OF ADDITION योगचिन्ह *n*, बेरजेचें चिन्ह *n*. S. OF SUBTRACTION व्यवकलनचिन्ह *n*, वजाबाकीचें चिन्ह *n*. S. OF MULTIPLICATION गुणनचिन्ह *n*, गुणाकाराचें चिन्ह *n*. S. OF DIVISION भाजनचिन्ह *n*, भागाकाराचें चिन्ह *n*. S. OF EQUALITY साम्यचिन्ह *n*, साम्याचें -बरोबरीचें चिन्ह *n*. S. OF INFINITY अनंतत्वाचें चिन्ह *n*, आनन्त्यचिन्ह *n*. S. OF PROPORTION प्रमाणचिन्ह *n*. SAME S. सरूपचिन्ह *n*. DIFFERENT SIGNS विरूपचिन्हें *n. pl.*] ६ सही *f*. [S. MANUAL (*law*) (-ची) सही *f*, स्वदस्तुर *m*, हस्ताक्षर *n*. २ राजाची सही *f*.]

Sign *v. t. to affix one's name or mark to* **सही करणें, सही घालणें -देणें, दस्तुर घालणें -लावणें, निशाणी करणें. २ (बाप्तिस्म्यांत) क्रुसाची खूण करणें. ३** (with *away*) **(फरोक्तखतावर सही करून) दुसऱ्याच्या नांवें करून देणें. ४** *to communicate by gesture* **खुणेनें कळविणें, खूण *f*. करणें.** S. *v. i.* **खूण करणें;** as, "He *signed* to me to come."

Signal (sig'nal) *n*. **सिग्नल** *m*, **बावटा** *m*. [DISTANT S. दूरचा सिग्नल S. HOME S. जवळचा सिग्नल. STARTING S. चालू करणारा सिग्नल. THROUGH S. एकदम जाण्याचा सिग्नल. HAND S. हातानें दाखविण्याची सिग्नल. हा हातानें, बावट्यानें किंवा कंदिलानें दाखवितात. FOG S. *or* DETONATOR धुक्याचे वेळीं आवाज होणारा फटाका.] २ **इशारा** *m*.

Signal *a. distinguished from what is ordinary* **विशेष, विलक्षण, नामी, मोठा, महत्वाचा.**

Signal *v. t. to make signals* **सिग्नल दाखवणें, बावटा दाखवणें. २ बावट्यानें बातमी देणें.** [पुस्तक *n*.

Signal-book **सिग्नलासंबंधींच्या माहितीचें व नियमांचें**

Signal-box (or cabin) (आगगाडीच्या रस्त्यावरील) सिग्नल ओढण्याची जागा *f*, केबिन *f*.

Signal-code *n*. सिग्नलांच्या ठराविक खुणा *f. pl*.

Sig'nalize *v. t. to render noteworthy* गाजवणें, मिरवणें, प्रसिद्ध करणें. [दिलेला.

Signalled *pa. t.* S. *pa. p*. सिग्नल दाखवलेला, सिग्नल

Sig'naller *n*. तारमास्तर *m*.

Sig'nalling *n*. सिग्नल दाखवणें *n*, बावटा दाखवणें *n*. २ तारमास्तरचें काम *n*. [अतिशय.

Sig'nally *adv*. विशेष रीतीनें, विलक्षण रीतीनें, खूप,

Signal-station *n*. बोट आली म्हणजे बावटा लावण्याचें स्टेशन *n*, बोटीच्या बावट्याचें स्टेशन.

Sig'natory *n*. सही घालणारा *m*. S. *a*. सहीचा. २ सही घालणारा.

Signature (sig'na-tūr) *n*. सही *f*, हस्ताक्षर *n*. [S. OF THE AMANUENSIS बिकलम *n*, दस्तुर *m*, हस्ताक्षर *n*. TO AFFIX ONE'S S. सही *f*. करणें, पांढऱ्यावर काळें करणें.] २ फर्म्यांचा आंकडा *m*, फर्म्यांची खूण *f*.

Sign-board *n*. नांवाची पाटी *f*.

Sign-board painter *n*. नांवाची पाटी लिहिणारा *m*, नांवाची पाटी रंगविणारा *m*. [आंगठी *f*, मोहोर *f*.

Signet (sig'net) [From Sign.] *n*. मुद्रा *f*, मुद्रिका *f*,

Signet-ring *n*. सिक्काची आंगठी *f*.

Significance (sig-nif'i-kans) *n*. अर्थसूचकता *f*, अर्थबोधकता *f*; as, "With a look of deep S." २ अर्थ *m*, अभिप्राय *m*, हेतु *m*, स्पष्टार्थ *m*. ३ *importance* महत्त्व *n*, विशाद, बिशात with *neg. con*.

Signifi'cant *a*. *having a meaning* अर्थाचा, स्पष्टार्थाचा, अर्थबोधक, अर्थसूचक, सार्थ. २ *indicative, declarative, expressive* सूचक, संकेतगर्भित, हेतुगर्भ, दर्शक, दर्शी (in comp.). ३ *important* महत्वाचा; as, "S. event."

Signification (sig-nif'fi-ka'-shun) *n*. अर्थ *m*, अभिप्राय *m*. [ETYMOLOGICAL S. मूलार्थ *m*, धात्वर्थ *m*.]

Significative *a*. अर्थसूचक, अर्थबोधक, सूचक, दाखविणारा.

Signify (sig'-ni-fī) [L. *significo, -atus -signum*, and *facio* I make.] *v. t. to make known by a sign* खुणेनें सांगणें, खूण करून सांगणें, खुणेनें &c. -समजावणें -सुचवणें. २ *to make known, to communicate* कळवणें, सुचवणें, समजावणें, जाणवणें, सूचना *f*. -&c. करणें *g. of o*., विदित -माहीत करणें. ३ *to have a certain sense* अर्थ *m*. -&c. असणें *g. of o*., with *in. con*., अर्थ *m*. -&c. दाखवणें. ४ *to matter, to import, to have consequence* अर्थ *m* -महत्व *n*. -बिशात *f*- -&c. असणें *g. of o*. with *in. con*. S. *v. i*. अर्थ असणें, महत्व असणें. Sig'nified *pa. t.* S. *pa. p*. खुणेनें सुचविलेला. २ कळवलेला, जाणवलेला. ३ अर्थ दाखवलेला. ४ अर्थ असलेला.

Signor, Signior (sēn'-yor) [It. *signore*, signor.] *n*. शिनोर. इंग्रजी Sir किंवा Mr. या ऐवजीं वापरण्याचा इटालियन शब्द.

Signora *n. fem.* of Signor.
Sign-manual, See under Sign *n.* [खांब *m.*
Sign-post *n.* खुणेचा खांब *m.* २ रस्ता दाखविणारा
Silage (sĭl'-ij) *n.* ओला चारा, कडबा वगैरे ओलेपणींच खाड्यांत दाबून ठेवण्याची क्रिया *f.* २ ओलेपणीं दाबून ठेवलेला चारा. S. *v. t.* ओलेपणीं चारा दाबून ठेवणें.
Silence (sī'lens) [L. *silens -entis, pr. p.* of *silere,* to be silent.] *n. forbearance of speech* स्तब्धता *f,* गुपचुपी *f,* मौन *n,* अभाषण *n.* [VOW OR RULE OF S. मौनव्रत *n.* TO KEEP S. *to restrain one's speech* मौन धारण करणें, गुळणी *f.* धरणें, मूग *m. pl.* खाणें -गिळणें, मौनावणें.] २ सामसूम *n,* शांतता *f,* स्तब्धता *f.* ३ विस्मृति *f;* as, "Has passed into *silence.*" Silence *interj.* चुप ! चुप्प ! चप ! गप ! गुप्प ! गुप ! खामोश ! Silen'ce *v. t.* (a) *to stop the speaking of* तोंड *n.* -बोलणें *n.* -&c. बंद करणें *g. of o.,* उगा करणें, चुप करणें, उगा राहवणें, तोंड *n.* मिटणें -मिटविणें, *g. of o.,* फेंपरी *f* -पुंगी *f.* बंद करणें *g. of o.* (b) निरुत्तर करणें. (c) (तोफखाना) बंद करणें.
Silent (sī'lent) *a. not speaking, mute* न बोलणारा, मौन धरणारा, गपचिप असणारा. २ *having no noise* शांत, बिनगडबडीचा, सामसुमीचा, निःशब्द. ३ (*gram.*) अनुच्चारित. Si'lently *adv.* गुपचुप, गपचिप, मुकाट्यां, मुकाट्यानें, उगा, उगी, चिप, चुप, निमूट.
Silica (sil'i-ka) [L. *silex, silisis,* flint.] *n.* सिकता *f,* गार *f,* गारगोटी *f.*
Silicious, Siliceous (si-lish'us) *a.* गारेचा, रेताड.
Silicon (sil'i-kon) [L. *silex, silicis,* flint.] *n.* रसायनशास्त्रांतील 'सिक' नांवाचें अधातु मूलद्रव्य *n.*
Silicula (sili-k'ūla) [L. *silicula, dim.* of *siliqua,* a pod.] *n.* (*bot.*) स्फुटनशील लहान लांबट शेंग *f.* ही एक फळांची जात आहे. उ. डिंगरी किंवा मुळ्याची शेंग *f.*
Siliqua (sili'-kwa) [L.] *n.* (*bot.*) स्फुटनशील बोंड *n.* ही एक फळांची जात आहे. उ. मोहरी, तिळवण.
Silk (silk) [A. S. *seolc* -L. *sericum* -Gr. *Serikos,* pertaining to the *Seres -Ser,* a native of China, whence silk was first obtained.] *n.* रेशीम *n.* [IMITATION S. बनावट रेशीम *n,* खोटें -नकली रेशीम *n.* REFUSE S. रेशमाचा कचरा *m.* ROLL OF S. फाळा *m;* (AS WOUND OFF THE WHEEL) असार. S. CORD कंकरी *f.* SPUN S. कांकरी *f.* SPUN S. YET RAW OR UNBOILED कोरट *f.* STICK OF S. कळी *f.* (FOUR कळीS FORM ONE थोक, TWO थोकS FORM ONE शेरिया) TWISTED S. मखतूल *m.* WASHED S. नखी *f.*] २ *stuff made of silk* रेशिमाचें कापड *n,* रेशमी कापड *n,* नरमिना *m,* दुकूल *n,* पट्ट *m,* पट्टकूल *n.* [CERTAIN STUFFS ARE एरंडें, कद *m,* कलिंदरा *m,* किनखाब *m,* कोशेरें *n,* खजूरछडी, गुलबदन, घोडेघाटी, चिकटा *m,* चिवली *f,* चेतावदरेशीम, तसरांव, ताफता *m,* पाटाऊं OR व, पांबरी OR पामरी *f;* पीतांबर OR पितांबर *m,* मशरू *m,* मुगवा OR मुगा *m,* मुसज्जर.]

Silk *a.* रेशमाचा, रेशमी, कौशेय.
Silk-cotton *n.* शेवरीचा कापूस, सांवरीचा कापूस.
Silk-cotton-tree *n.* शेवरी *f*, सांवर *f*, सांवरी *f*.
Sil'ken *a.* रेशमाचा, रेशमी, कौशेय. २ रेशमी पोषाख केलेला; as, "A S. wanton." ३ *delicate* नाजूक, मऊ, मृदु; as, "S. cord of love."
Silk-mercer *n.* रेशमाचा व्यापारी.
Silk-reel *n.* आस्तरी *f*.
Silk-thrower, silk-throwster *n.* रेशीम कातणारा.
Silk-weaver *n.* खतरी, रेशमी कपडा विणणारा.
Silk-worm *n.* रेशमाचा किडा *m*, कोसला *m*, कोळिसरा *m*, कोशकार *m*, तंतुकीट. [CORD OR COCOON OF SILK-WORM कोसला *m*, कोळिसरा *m*, कोशेटा *m*.]
Sil'ky *a.* रेशमाचा, रेशमी. २ मऊ, मृदु.
Sill (sil) [A. S. *syll*, a sill.] *n.* उंबरठा *m*, उंबरा *m*.
Sil'liness *n.* मूर्खपणा *m*, अजागळपणा *m*, खुळसरपणा *m*.
Silly (sil'i) [Orig. 'happy' 'blessed,' and so 'innocent,' 'simple,' A. S. *sælig*; good.] *a. weak in intellect, simple, &c.* मूर्ख, खुळा, खुळकट, खुळसट, खुळसर, वेडसर, अचरट, भोळा, बावळा, गयाळ, गचाळ. २ (action, conduct, &c.) मूर्खपणाचा, वेडेपणाचा, खुळकटपणाचा, भोळेपणाचा, &c., वेडसर, वेडावांकडा, वावगा. S. *n.* अचरट मनुष्य *m*, बावळट मनुष्य *m*. Sillier, *comp.* Silliest, *super.* Sill'ily *adv.* मूर्खपणानें, खुळसरपणानें, बावळेपणानें.
Silo (sīlō) *n.* ओलेपणीं चारा दाबून ठेवण्याचा खाडा *m*. S. *v. t.* ओलेपणीं चारा दाबून ठेवणें.
Silt (silt) [Prov. E. *sile* allied to Low Ger. *sielen*, SW. *sila*, to let water off, to strain.] *n. mud, sand, &c., deposited by water* मळई *f*, रेंदा *m*, पंक.
Silvan or Sylvan (sil'van) [L. *silvanus*, *-silva*, wood.] *a. pertaining &c., to woods or groves* वनाचा, वनासंबंधींचा, वन्य, वनेचर, आरण्यक. Sylvan-beast *n.* वनपशू *m*. Sylvan-beauty *n.* वनश्री *f*. Sylvan-deity *n.* वनदेवता *f*. Sylvan-sage *n.* आरण्यक ऋषि *m*.
Silver (sil'vėr) [A. S. *silfer*, silver.] *n.* रुपें *n*, रौप्य *n*, रजत *n*. [PURE S. चांदी *f*. PLATED WITH S. रुपेरी, चांदीचा मुलामा दिलेला.] २ *coins made of silver* रुप्याचीं नाणीं *n. pl.*, रुपये *m. pl.* ३ चांदीचीं भांडीं *n. pl.*, चांदीचे डाग *m. pl.* ४ (*photo.*) (कागद सचेतन करण्याकरितां) रुप्याचा क्षार *m*, रौप्यक्षार *m*. [S. BATH काडीखाराचा द्रव *m*. २ काडीखाराचा द्रव ठेवण्याचें पात्र *n*, रौप्यक्षारपात्र *n*. S. HAIR रुपेरी केश *m. pl.* S. LEAF रुप्याचा वर्ख *m*. S. PAPER पातळ (रुपेरी) कागद. २ (loosely) कथिलाचा वर्ख *m*. S. PLATE चांदीच्या मुलाम्याचीं भांडीं. S. SMITH रौप्यकार *m*, LOOSELY सोनार. S. SOLDER रुप्याचा डांक *m*. S. STANDARD रुप्याचें चलन *n*, रौप्यचलन *n*.]
Sil'ver *a. made of silver* रुप्याचा, चांदीचा, रौप्य, रजत; as, "A S. cup." २ *second best* दुसऱ्या नंबरचा

दुसऱ्या प्रतीचा. ३ *white like silver* रुपेरी, रुप्यासारखा, पांढरा, रौप्यवर्ण, शुभ्र. ४ ( tone ) खणखणीत.

Sil'ver *v. t. to coat with silver* रुप्याचा मुलामा देणें, रुप्याचें पाणी देणें. २ (कांचेला) पारा लावणें, पाऱ्याची कल्हई लावणें. ३ (*fig.*) रुप्यासारखा करणें, रुपेरी करणें, पांढरा करणें, शुभ्र करणें. S. *v. i.* पांढरा होणें, रुपेरी होणें.

Sil'veriness *n.* पांढरेपणा *m*, शुभ्रपणा *m*.

Sil'vering *n.* रुप्याचा मुलामा देणें *n.* २ (कांचेला) पारा लावणें. ३ रुप्याचा मुलामा *m.* ४ पाऱ्याचा मुलामा.

Silver-Jubilee *n.* पंचविसावा वार्षिकोत्सव *m*.

Silver-Nitrate *n.* काडीखार *m*.

Silver-ware *n.* रुप्याचें ( भांडीं वगैरे ) सामान *n*.

Silver-wedding *n.* लग्नाचा पंचविसावा वाढदिवस *m*.

Sil'very *a. white like silver* रुपेरी, पांढरा, शुभ्र, रौप्यवर्ण, रौप्यसदृश. २ खणखणीत; as, "S. tone."

Similar (sim'i-lar) [Fr. *similaire* -L. *simis*, *similis*, like, same.] *a.* सारखा, बराबर, तुल्य, सम, समान, सदृश. २ ( *math.* ) सजातीय, सरूप. Similar'ity *n.* सारखेपणा *m*, सारखवटा *m*, सारखवट *n. f*, बराबरी *f*, सादृश्य *n*, तुल्यता *f*, समता *f*, साम्य *n*. Sim'ilarly *adv. in like manner* तसाच *decl.*, त्याचप्रमाणें, त्यासारखा *decl.*, तद्वत्.

Similarity, See under Similar.

Simile ( sim'i-li ) [L. *similis*, similar.] *n.* ( *rhet.* ) *a comparison* उपमा *f*. Similes *n. pl.*

Simil'itude *n. likeness* सारखेपणा *m*, सादृश्य *n*, सदृशता *f*, साम्य *n*, समता *f*. २ *a simile* उपमा *f*. ३ *a representation, a copy* प्रतिकृति *f*, अनुरूप वधू *f*, अनुरूप वर *m*; as, "Man should wed his S." ४ ( Bible ) *parable* दृष्टांत. ५ ( math. ) साजात्य *n*, सजातित्व *n*.

Simious ( sim'i-us ) [L. *simia*, an ape.] *a.* माकडाचा, माकडासारखा, मर्कटसदृश, माकडी; as, "That strange S., schoolboy passion of giving pain to others."

Simmer ( sim'er ) [From the sound.] *v. i. to boil with a gentle hissing sound* चरचरणें, चटचटणें, सणसणणें, सणसण वाजणें, उकळणें, उकळी येणें. २ (*fig.*) *to be in a state of suppressed anger, indignation or laughter* आंतल्या आंत उकळणें, शिजणें, उकळी येणें, उकळी फुटणें. S. *v. t.* मंदाग्नीवर शिजवणें, उकळणें.

Simoom ( si-mōōm' ), Simoon ( si-mōōn' ) [ Fr.—Ar. *samm*, poisoning. ] *n.* उत्तरआफ्रिका आणि अरबस्थान यांतील वाळूच्या मैदानांवरून वाहणारा उष्ण गुदमरून टाकणारा वारा *m*, सिमूम *m*, सिमून *m*.

Simper ( sim'per ) [Of doubtful origin.] *v. i. to smile in a silly affected manner* वेड्याप्रमाणें ( दिमाखानें गालांतल्या ) गालांत हंसणें. S. *v. t. to express by or with simpering* गालांतल्या गालांत हंसून सांगणें किंवा व्यक्त करणें; as, "To S. consent." S. *n.* दिमाखानें गालांतल्या गालांत हंसणें *n.* Sim'per-

ed *pa. t.* and *pa. p.* Sim'pering *pr. p.* Sim'peringly *adv.* गालांतल्या गालांत हंसून.

Simple ( sim'pl ) [Lit. 'one-fold', Fr. -L. *simplus*, once.] *a. plain*, साधा, बिनभपक्याचा, अपरिष्कृत; as, "S. dress." २ *undesigning, sincere, true* साधा, साधाभोळा, सरळ, निष्कपट, निष्प्रपंच, बाळबोध, उजू, सालस, साळसूद, साळढाळ. ३ ( manners ) *unaffected* साधा, साधेपणाचा, उजू, सरळ, सरळपणाचा. ४ (of statement ) *clear* साधा, सरळ, स्पष्ट, उघड, असंदिग्ध. ५ *foolish, silly* साधा, भोळा, भोळसर, भोळसट, भावार्थी, भोळाभावार्थी, मूर्ख; as, "I am not so S. as to suppose." (b) अननुभवी, अज्ञानी. ६ *easily understood* साधा, सहज समजण्यासारखा, सरळ, बाळबोध; as, "Gave me a S. explanation; Can he be cured by a S. device." ७ *not luxurious, plain* साधा, बेताचा; as, "S. diet; S. way of living." ८ *lowly, undistinguished* साधा, क्षुद्र, गरीब, बिचारा, बाळबोध; as, "A. S. husbandman." ९ *absolute, unqualified* साधा, शुद्ध, निखालस, केवळ, नुस्ता; as, "To give an infant alcohol is S. murder or madness." १० ( *gram.* ) साधा, सरळ; as, "S. sentence." ११ (*math.* ) (a) साधा, सरळ. [S. INTEREST सरळ व्याज *n.*] (b) एकवर्ण. [S. EQUATION एकवर्णसमीकरण.] १२ (*chem.* ) एकाकी. १३ (*bot.*) सलग, एकाकी, अविभक्त. [S. LEAF अविभक्त पर्ण. S. PISTIL अविभक्त स्त्रीकेसर, एकाकी स्त्रीकेसर.] १४ (*med.* ) साधा; as, "S. fracture = साधा अस्थिभंग." १५ *low in the scale of evolution* साधा, उत्क्रान्तीच्या खालच्या पायरीवरचा, अल्पविकसित; as, "S. forms of life." १६ ( of sound ) शुद्ध, निर्भेळ. १७ ( law.) बिनमोबदल्याचा, साधा. [S. CONTRACT बिनमोबदल्याचा (लेखी, तोंडी, गर्भित ) करार, साधा कर्जरोखा. ]

Simple *n.* निर्भेळ पदार्थ *m*, अमिश्रित पदार्थ. २ औषधिवनस्पति *f.* ३ वनस्पतींचें औषध *n.*

Sim'ple-hearted *a.* साधा, साधाभोळा, निष्कपट.

Sim'ple-minded *a.* साधा, भोळा, भोळाभावार्थी, निष्कपट, निष्प्रपंच. Sim'ple-mindedness *n.* साधेपणा *m*, भोळेपणा *m*, निष्कपटपणा *m*, निष्प्रपंचता *f.*

Sim'pleness *n.* साधेपणा *m*, भोळेपणा *m*, निष्कपटपणा *m.* २ निर्भेळपणा *m*, शुद्धपणा *m.* ३ भोळसटपणा *m*, मूर्खपणा *m.*

Sim'pler *n.* औषधिवनस्पति गोळा करणारा *m.*

Sim'pleton *n. foolish person* भोळा मनुष्य *m*, मूर्ख *m*, भोळा सांब *m*, सांब *m.*

Simplic'ity *n.* निर्भेळपणा *m*, शुद्धता *f*, एकाकिपणा *m*; as, "The S. of metals." २ ( स्वभावाचा ) साधेपणा *m*, भोळेपणा *m*, निष्कपटपणा *m*, भावार्थिपणा *m.* ३ साधेपणा *m*, अकृत्रिमपणा *m*, स्वाभाविकता *f*; as, "S. of dress, diet, language, &c." ४ साधेपणा *m*, सरळपणा *m*, स्पष्टपणा *m*, असंदिग्धता *f*; as, "The S. of an explanation." ५ भोळसटपणा *m*, मूर्खपणा *m.*

Simplifica'tion *n.* अतिसंक्षेप रूप देणें, सरळ रूप देणें. २ अधिक स्पष्ट करणें *n*, कमी भानगडीचा करणें.

Sim'plified *pa. t. & pa. p.* of Simplify.

Sim'plify *v. t.* अतिसंक्षेप रूप देणें, सरळ रूप देणें, साधें रूप देणें, कमी भानगडीचा करणें, अधिक स्पष्ट करणें. Simplified *pa. t. & pa. p.*

Sim'ply *adv.* निखालस, शुद्ध, केवळ, निवळ. २ सहजरीतीनें, सहजगत्या, एरवीं, सहज. ३ फक्त, केवळ, नुसतें.

Simulant *a.* (त्या) सारखा दिसणारा.

Sim'ulate (sim'u-lāt) [L. *simulatus -similis*, like.] *v. t. to assume the appearance of* सोंग घेणें, वेष घेणें, रूप घेणें, डौल घालणें, डौल धरणें.

Simula'tion *n.* सोंग घेणें *n*, रूप घेणें *n*, डौल *m*, सोंग *n*.

Simulator *n.* वेष घेणारा, वेषधारी.

Simultaneous (sim-ul-tā'ne-us) [L. *simultaneus -simul*, at the same time.] *a. occurring or operating at the same time* एककालिक, समकालिक, एकाच वेळीं होणारा, एकदम चालणारा. [SIMULTANEOUS EQUATION समकालिक समीकरण.] Simulta'neously *adv.* एकाच वेळीं, एकदम, एकसमयावच्छेदेंकरून. Simulta'neousness *n.* एककालिकता *f*, एकसमयता *f*, कालैक्य *n*.

Sin (sin) [A. S. *synn*, sin.] *n. a violation of a law of God* पाप *n*, पातक *n*. २ *immorality* पापाचरण *n*, पापकर्म, कुकर्म *n*, दुरित *n*, दुष्कृति *f*. ३ अन्याय *m*, अपराध *m*, गुन्हा *m*, दोष *m*, अतिक्रम *m*, उल्लंघन *n*. ४ पापप्रवणता *f*, पापबुद्धि *f*. [ORIGINAL S. मूळपाप *n*, स्वाभाविक पापप्रवणता *f*, उपजत पापबुद्धि *f*. DEADLY OR MORTAL S. (मनुष्याची आध्यात्मिक अधोगति करणारें) महापातक. THE SEVEN DEADLY SINS (ACCORDING TO R. C. DOCTRINE) ARE PRIDE, COVETOUSNESS, LUST, GLUTTONY, ANGER, ENVY, SLOTH. THE FIVE DEADLY SINS ACCORDING TO THE HINDUS ARE ब्रह्महत्या *f*, सुरापान *n*, सुवर्णस्तेय *n*, गुरुतल्पगमन *n*, तत्संसर्ग *m*. S. OFFERING पापार्पण *n*. AWFUL S. अघोर पातक *n*, अघोर पाप *n*. HEINOUS OR FLAGRANT S. महापातक, महापाप *n*. SECRET SINS प्रच्छन्न पातकें *n. pl.*] S. *v. i. to commit sin* पाप करणें, पातक करणें, पापकर्म -दुष्कृत्य करणें. २ (with *against*) -चें उल्लंघन करणें, गुन्हा करणें, अपराध करणें, अन्याय *m.* करणें, अतिक्रम करणें. Sinned *pa. t. & pa. p.* Sin'ning *pr. p.*

Since (sins) [Old E. *sith-tham*, after that.] *adv. after specified or implied past time, throughout* पासून, नंतर, अनंतर; as, "Has been healthy eversince." (b) अलीकडे, आलीकडे; as, "Have not seen him S." २ *ago* मागें, पूर्वीं, झाला, गेला; as, "एक महिना झाला a month S."

Since *prep. after* (specified past time or event) पासून.

Since *conj. from the past time when* पासून, नंतर; as, "What have you done S. we met?" २ *seeing that, in as much as* ज्याअर्थीं, ज्यापक्षीं, ज्यापेक्षां,

ज्यासाठीं, म्हणून; as, "S. that is so, there is no more to be said." ३ ( *ellipt.* ) *as being* म्हणून, साठीं; as, "A more dangerous, S. unknown, foe."

Sincere ( sin-sēr' ) [Fr. -L. *sincerus*, clean.] *a. unfeigning, guileless* खरा, निष्कपट, निष्कृत्रिम, अकृत्रिम, सात्त्विक. २ *real, heartfelt* खरा, मनापासूनचा, खराखुरा, वास्तविक, अकृत्रिम, निष्कपट, पोटांतला, जिव्हाळ्याचा, अंतर्यामींचा, आस्थेचा. ३ *pure, unmixed* शुद्ध, निर्भेळ; as, "There is no S. acid in any animal juice."

Sincere'ly *adv. honestly, unfeignedly* खरोखर, मनापासून, मनोभावेंकरून, पोटांतून, अंतर्यामापासून, मनःपूर्वक, निष्कपटपणानें, अकृत्रिमपणानें.

Sincere'ness, Sincer'ity *n.* खरेपणा *m*, निष्कपटपणा *m*, अकृत्रिमपणा *m*, निष्कृत्रिमता *f*, सत्यता *f*, सरळपणा *m*, प्रामाणिकपणा *m*, अकपट *n*.

Sinciput ( sin'si-put ) [lit. 'half a head' L. -*semi*, half, and *caput*, the head.] *n.* टाळू *f*, तालु (S.), कंवटी *f*, मस्तकाग्रभाग *m*, टौकी *f*, टवळी *f*. ( distinguished from *occiput.* )

Sine ( sīn ) [L. *sinus*, a curve.] *n.* ( *geom.* ) ज्या *f*. [VERSED S. इषु *m*. S. OF HALF THE ANGLE अर्धाशज्या *f*. S. OF THE SUM OF TWO ANGLES योगज्या *f*. S. OF THE DIFFERENCE OF TWO ANGLES अंतरज्या *f*. S. OF DOUBLE THE ANGLE द्विगुणमापकज्या *f*. S. OF TREBLE THE ANGLE त्रिगुणमापकज्या *f*.]

Sinecure ( sī'-ne-kūr ) [L. *sine*, without, and *cura*, care.] *n. an office with a salary, but with few ( or no ) duties* बैठा रोजगार *m*, बैठी नोकरी *f*, बैठी असामी *f*, बैठी चाकरी *f*, बैठें वेतन *n*, चैनीची नोकरी *f*. २ ख्रिस्ती उपाध्यायाला कांहीं काम नसतां दिलेली वृत्ति *f*, बैठी वृत्ति *f*.

Si'necurist *n.* बैठा पगार खाणारा *m*, बैठी असामी असणारा *m*.

Sinew ( sin'ū ) [A. S. *sinu.*] *n. a tendon, joining a muscle to a bone* स्नायूचें अग्र, कंडरा *f*, अस्थिबंधन *n*. २ ( *pl.* ) *muscles, bodily strength* शारीरिक सामर्थ्य *n*, बळ *n*, ताकद *f*. ३ ( *fig.* ) *resources* मुख्य साधन *n*, साधन *n*. [THE SINEWS OF WAR, *money* द्रव्यबळ *n*.] ४ *that which sustains or holds together* आधार *m*, मजबुती *f*, बळकटी *f*. S. *v. t. to bind as by sinews* स्नायूंनीं घट्ट बांधणें, स्नायूंसारखें मजबूत बांधणें. ( b ) घट्ट बांधणें -आंवळणें. २ *to strengthen* मजबूत करणें, मजबुती करणें -आणणें.

Sin'ewed *a. furnished with sinews* मजबूत स्नायू असलेला, स्नायुयुक्त; as, "A strong -*sinewed* youth." २ ( *fig.* ) *equipped, strengthened* सज्ज, सज्ज केलेला, बळकटी -मजबुती आणलेला -आलेला; as, "When he sees *ourselves* well-sinewed to our defence."

Sin'ewiness *n.* बळकटी *f*, मजबुती *f*, ताकद *f*, सामर्थ्य *n*.

Sin'ewless *a. having no sinews* दुबळे स्नायु असलेला. (b) निःशक्त, अशक्त, निर्बल, लटपटीत.

Sin'ewy *a.* *well-knit with sinews* स्नायूंनीं मजबूत बांधलेला, स्नायूंनीं मजबूत केलेला. २ *strong* मजबूत, बळकट, सामर्थ्यवान्, दृढ.

Sin'ful *a.* पापी, पापाचा, पातकी, पातकाचा, पापयुक्त.

Sin'fully *adv.* पापानें, पाप करून, पापबुद्धीनें.

Sin'fulness *n.* पापीपणा *m*, पापिष्ठता *f*. २ पापबुद्धि.

Sing ( sing ) [A. S. *singan*; to sing.] *v. i.* *to utter musical sounds* गाणें, गाणें *n* -गायन *n* -गान *n.* करणें; *in a* hoarse or cracked voice रेंकणें; badly गद्धेमल्हार *m* -कुत्तेमल्हार करणें. [To S. OUT मोठ्यानें सांगणें. To S. SECOND WITH स्वर *m.* देणें, सूर धरणें. To S. SMALL चुप बसणें -होणें, नांगी मोडणें. ] २ ( as a bee, top, &c.) गुंगणें, गोंगणें, गोंगावणें, चुचावणें, भिरभिरणें, रुणरुणणें, चूं *adv.* -घूं *adv.* करणें, सणका करणें. ३ ( as a kettle in boiling ) सणसणणें, सळसळणें, चरचरणें, चटचटणें. S. *v. t.* गाणें, गाऊन म्हणणें, सुरावर -चालीवर म्हणणें; as, "He *sang* another song or tune." २ ( *fig.* ) *to praise* ( गुण ) गाणें, (स्तुति) गाणें, वाखाणणें, वर्णन करणें, वाखाणणी करणें; as, "He always *sings* his brother's praises." ३ *to compose poetry, to celebrate* काव्यांत गुण गाणें, ( -वर ) काव्य करणें -रचणें, कविता करून प्रशंसा करणें; as, "To S. a hero, beauty, great event, &c." ४ गाणें गाऊन सूचित करणें, ( -चें ) गाणें गाणें; as, "To sing out an old year; To S. in a new year." [To SING TO SLEEP गाणें म्हणून झोंपविणें -निजविणें. To S. INTO GOOD HUMOUR गाणें गाऊन खूप करणें.] Sang, Sung *pa. t.* Sung *pa. p.* Singing *pr. p.*

Singe ( sinj ) [A. S. *sengan*, *lit.* to make to sing.] *v. t. to scorch, to burn the surface of* बाहेरून भाजणें, वरवर भाजणें, हुरडणें, होरपळणें, हुरफळणें, होळपणें; as, "To S. a person's hair; His reputation is a little singed." २ रंग दिल्यावर इस्तरी करणें. [To S. ONE'S FEATHERS OR WINGS (एखादा साहसाचा प्रयत्न करीत असतांना) इजा *f* -दुखापत *f.* होणें.] S. *v. i.* इस्तरी होणें; as, "Your dress is singing." Singed *pa. t.* and *pa. p.* [ To BE SINGED पोळणें, जळणें, शेकावणें, हुरडणें.] Sin'ger *n.* रंगविलेल्या कपड्यावर इस्तरी करणारा *m.* २ रंगविलेला कपडा साफ करण्याची इस्तरी *f.* Singeing *pr. p.*

Sin'ger *n.* गाणारा *m*, गवई *m*, गवय्या *m*, गायक *m.* [PROFESSIONAL S. गवय्या *m.*]

Singing *n.* गाणें, गायन *n.* S. gallery *n.* ( ख्रिस्ती चर्चांतील) गायकांना बसण्याची गॅलेरी *f.* S. man *n.* पगारी गवई *m.* S. master *n.* गायनमास्तर *m*, गायनाध्यापक *m.* S. voice *n.* गातांना निघणारा स्वर *m*, गाण्याचा आवाज *m.*

Single ( sing'l ) [L. *singulus*, simple.] *a. one only, individual, separate* एकेरा, एकेरी, एकटा, एकच, एक; as, "A S. star." २ *alone, having no companion* एकटा, एक, एकला, एकुलता, एकुलता एक, एकाकी. ३ *unmarried* सडा, सडासांट, सडेसांटा, सडे-

सोट, अविवाहित, लग्न न झालेला; as, "S. chose to live, and shunned to wed." ४ *not doubled or twisted together* एकेरा, एकेरी, सुटा; as, "A S. thread." ५ *performed by one person,* (दर बाजूस) एकेकट्यानेंच खेळण्याचा, एकेकट्याचा; as, "A S. combat." ६ *honest, sincere* सरळ, शुद्ध; as, "I speak it with a S. heart." S. *v. t.* (*gener.* with *out*) *to choose out as an example* (नमुनेदार किंवा विशेष म्हणून) निवडून काढणें, निवडणें, पसंत करणें, निवडून घेणें. S. acting *a.* (*mach.*) पिस्टनच्या एकाच बाजूच्या वाफेनें चालणारें, एकाच बाजूनें कार्य करणारें. S. bed एका मनुष्यापुरता बिछाना. S. blessedness *n.* अविवाहित दशा *f.* S. breasted *a.* एकाच बाजूला बटनें असलेला; as, "A S. coat." S. combat *n.* द्वंद्वयुद्ध *n.* S. court (Lawn-tennis) एकेरी लान-टेनिसकोर्ट *n,* अशा कोर्टांत एके बाजूला एकेकच गडी खेळूं शकतो. S. eyeglass *n.* एकाच डोळ्याचा चष्मा *n.* A S. eye *n. devotion to one purpose* एकच प्राप्तव्य डोळ्यांपुढें ठेवणें *n,* एकाग्रदृष्टि *f.* S. -eyed *a.* एकच विचार डोळ्यांपुढें ठेवणारा, एकरोंखी, एकलक्षी. २ एकाक्ष, एकडोळ्या. S. fire *a.* (of a cartridge) एक-बारी, एकदाच उडवतां येण्याजोगें (काडतूस). S. hearted, S. minded *a.* एकनिष्ठ, एकचित्त, एकरोंखी, एकाकार, एकानुसन्धानी. S. mindedness *n.* एकनिष्ठा, अनन्यभाव *m.* S. handed *a.* एकटा, एकाकी, असहाय, स्वतःच्या हिंमतीचा, दुसऱ्याच्या मदतीशिवाय; "By his S. handed efforts." २ (of a sword) एकधारी, एका हातानेंच वापरण्याची (opposed to two-handed). S. handed *adv. without help from other persons* आपल्या एकट्याच्या हिंमतीनें; as, "It cannot be done S." २ *with one hand* एका हातानें; as, "The men played S. against the women with both hands."

Sin'gleness *n.* एकेरेपणा *m,* एकेरीपणा *m,* एकटेपणा *m, m,* एकाग्रता *f.* २ अवरठेपणा *m,* अविवाहित्व *n.*

Sing'ly *adv.* एकेरा, एकपदरी. २ एकटा, एकला, मदती-वांचून, सहायावांचून. ३ एकएक, एकामागून एक.

Sing-song *n. a monotonous chant* एकआवाजी गीत, कंटाळवाणें गीत *n.* २ *drawling, monotonous speaking or reading* एकच आवाजांत बोलणें, हेल काढीत वाचणें. ३ *a musical party* गाण्याची (शोकी लोकांची) पार्टी *f.*

Singular (sing'ū-lar) [Fr. -L. *singularis,* single.] *a.* (*gram.*) एकवचनी, एकवचनाचा. २ *single, individual* एक, एकटा, एकेकटा, व्यक्तिशः; as, "All and S." ३ *existing by itself, unexampled* अद्वितीय, असदृश, अप्रतिम, अनुपम, अपूर्व, अनन्यसाधारण. ४ *queer* विलक्षण, विचित्र, विक्षिप्त, तऱ्हेवाईक, तऱ्हेचा, निराळा, एकप्रकारचा. ५ *remarkable* विशेष, असा-धारण, लोकोत्तर. ६ (*phil.*) व्यक्तिवाचक. [A PURE S. TERM शुद्ध व्यक्तिपद *n.* A COLLECTIVE S. TERM समाहारव्यक्तिपद *n.*] ७ (*math.*) विशेष. [S. POINTS विशेष बिन्दु. S. SOLUTIONS विशेष क्रिया *f. pl.*] S, *n.* (*gram.*)

एकवचन *n.* [LANGUAGE (ADDRESS OR MENTION) IN THE S. NUMBER एकेरा शब्द *m.* TO USE LANGUAGE IN THE S. NUMBER एकेरीवर येणें.]

**Singular'ity** *n. uncommonness* विलक्षणता *f*, असाधारणता *f*, अद्वितीयता *f*, अप्रतिमता *f*, लोकोत्तरता *f*. २ *strangeness* (of manner or appearance) विक्षिप्तपणा, तऱ्हेवाईकपणा *m.* **Sing'ularly** *adv. extraordinarily* विलक्षणपणें, विशेष रीतीनें, विशेष, (इतरांपेक्षां) किती तरी; as, "S. exact in his statements; S. considerate of others." २ *strangely, oddly* विक्षिप्तपणानें, तऱ्हेवाईकपणानें; as, "To behave S." ३ *so as to express one or the singular number* एकवचनीं.

**Sinister** (sin'is-tėr) [L. *sinister*, on the left.] *a.* (of a coat-of-arms) डावा (भाग), डावीकडचा, डाव्या बाजूचा. २ *of evil omen, inauspicious* अनिष्ट, अशुभ, अभद्र, अमंगल; as, "Sinister planetary influence." ३ *ill-looking, of malignant or villainous aspect* (दिसण्यांत) भेसुर, उग्र, दुष्ट. ४ *dishonest, crooked* दुष्ट, कपटाचा; as, "S. motives."

**Sink** (sink) [A. S. *sincan*, to sink.] *v. i. to descend* (*esp. in water*) बुडणें, डुबणें, बसणें, खालीं बसणें, निमज्जन *n.* होणें *g. of s.*; as, "The ship *sinks*." २ *to penetrate into* रुपणें, रुतणें, आंत जाणें. (b) भिनणें, मुरणें, मुरून जाणें, जिरून जाणें, जिरणें; as, "The bayonet *sank* into the hilt." ३ *to come gradually to a lower level* उतरणें, बसणें, खचणें, दबणें; as, "To S. in one's estimation." (b) (as a river) ओसरणें, उतरणें. ४ *to become hollow* (cheeks, etc.) बसणें, खोल जाणें, आंत जाणें, खोलगटणें, ओढणें. ५ (with *into*) *to be impressed on one's mind* बिंबणें, भिनणें, ठसणें, भरणें; as, "Lesson *sinks* into the memory." ६ *to decline* उतरणें, गळणें, खालावणें, घसरणें, अवतार *m.* होणें -संपणें *g. of s.*, पारडें *n.* उतरणें -बसणें *g. of s.* ७ *to fall* (*as through bodily weakness*) गळणें, थकणें, खचणें, खंगणें; as, "The sick man *is sinking*." S. *v. t. to cause to sink* बुडविणें, डुबविणें; as, "To S. a ship." २ *to dig* (a well, etc.) खणणें, खोदणें, उकरणें. ३ *to invest* (money) *in enterprise* (एखाद्या नव्या धंद्यांत पैसा) बुडीत म्हणून घालणें, बुडीत गुंतवणें. ४ *to keep in background, to conceal* लपवणें, मागें ठेवणें, उघडकीस न आणणें, दृष्टीआड ठेवणें, चोरणें; as, "To S. one's name or title." ५ *to reduce by payment* (पैसे देऊन कर्ज) कमी करणें, उतरवणें; as, "To S. the national debt." S. *n. a drain for carrying off dirty water* नाला *m*, मोरी *f*. २ कुंडी *f*. ३ रंगभूमींतील आरपार फट *f*. Sank, Sunk *pa. t.* Sunk, Sunken *pa. p.*

**Sunken** *pa. p. a.* आंत गेलेला, खोल गेलेला, चिंबलेला; as, "S. cheeks, eyes etc."

**Sink'er** *n.* बुडणारा. २ बुडवणारा. ३ *weight used to sink fishing line* बुडीद *m.*

Sink'ing *pr. p.* S. *v. n.* बुडणें *n.* २ बुडवणें. ३ खचणें *n.* ४ उतरणें *n, &c.* ५ *internal bodily sensation caused by hunger or apprehension* गळणें *n*, गळहाटणें *n*, ग्लानि *f.* ६ (sick person) खंगत जाणें, खंगणें. [S. -FUND (*Pol. Eco.*) बुडीत फंड *m.*]

Sin'less *a.* निष्पाप, निष्कलंक, निर्दोष, शुद्ध.

Sin'ner *n.* पापी *m*, पाप करणारा *m*, पापकर्मा. २ उल्लंघन करणारा, अतिक्रम करणारा, गुन्हेगार *m.* ३ (*theol.*) *an unregenerate person* नष्टात्मा *m*, अपुनीतात्मा *m.*

Sinuate (sin'ū-āt) [L. *sinuare*, to bend.] *a.* (*esp. bot.*) *wavy-edged* वीचितरंगवत, नागमोडीसारखी कडा असलेलें (पान).

Sinuos'ity *n. a winding* नागमोड *f.* २ (*bot.*) वीचितरंगवत्ता *f.* ३ नागमोडीसारखी कडा. [MOTTLED SINUOSITIES दगडावरील शिरा.]

Sin'uous Sinuose, *a. winding* वांकांवांकांचा, नागमोडीसारखा, वीचितरंगवत्.

Sinus (sī'-nus) [L. *sinus*, bending.] *n. a cavity in a bone* हाडांतील पोकळी *f*, अस्थिविवर *n.* २ (*path.*) नाडी *f*, नाडीव्रण *m*, नासूर *m.* See the word Fistula.

Sip (sip) [O. E. *sypian*, to sip.] *v. t.* चाखतचाखत पिणें, ओंठानें थोडथोडें पिणें. S. *n.* चाखतचाखत पिणें *n*, *loosely* घुटका *m.* Sipped *pa. t.* and *pa. p.* Sipping *pr. p.* S. *v. n.* चाखतचाखत पिणें *n*, घोट *m.*

Siphon (sī'-fun) [Fr. *siphon*, a hollow tube.] *n.* वक्रनलिका *f*, वांकडी नळी *f*, सायफन. [S. BAROMETER वक्रनलिकाभारमापक.] २ (सोडावाटरची वगैरे) सायफनबाटली *f*, वांकड्या नळीची बाटली *f.* ३ (खालीं असलेलें) तेल (वर) खेंचणारें (लोंकरीचें) सूत.

Sir (sėr) [Shortened from Sire.] *n.* महाराज, साहेब, खुदावंत, जी. २ *a titular prefix to a name of knight or baronet* (नाइट किंवा ब्यारोनेट यांच्या नांवाच्या पूर्वी लावण्याची) बहुमानाची सर ही पदवी *f.* S. *v. t.* सर म्हणणें; as, "Don't S. me."

Sire (sir) [O. F. *sire* -L. *senior*, elder.] *n.* (*poet.*) *father* पिता *m*, बाप *m*, जनक *m.* २ (*poet.*) *ancestor* वाडवडील, पूर्वज *m.* ३ *a title used in addressing a king* महाराज. ४ पोळ *m*, वळू *m*, सांड *m.*

Siren (sī-ren) [L. -Gr. *seirēn*, *lit.* an entangler.] *n.* (in Gr. Mythology) *a sea-nymph who lured sailors to destruction* (ग्रीकपुराणांतील) सायरेन नांवाची जलदेवता *f.* २ *a fascinating woman* मोहिनी *f*, मोहणारी स्त्री *f.* ३ (*phys.*) स्वरमापक. ४ *enticing* (*esp. to evil or ruin*) भुलवून टाकणारा.

Siriasis (sirī'a-sis) [Gr. *seiriare*, to be hot.] *n.* उन्हाची तिरीप लागणें *n*, उन्हाचा तडाखा लागल्यापासून होणारा एक प्रकारचा लूक, लूत. २ *sunbath as medical treatment* आतपोपचार *m*, आतपस्नान *n.*

Sirius (sir'i-us) [L. -Gr. *seirios*, scorching.] *n. the Dog-star* व्याध *m*, लुब्धक *m.*

Sirup, See Syrup.

Sister (sis'-ter) [ A. S. *sweostor*, Sk. स्वसृ, sister. ] *n.* वहीण *f*, भगिनी *f*, स्वसा *f*. [ ELDER S. वडील -थोरली वहीण *f*. S.'s DAUGHTER भाची *f*. S.'s HUSBAND मेहुणा *m*, साला *m*, श्यालक *m*, श्यालक *m*. S.'s SON भाचा *m*. YOUNGER S. धाकटी वहीण *f*. ] २ *a woman of the same faith or religious community* भगिनी *f*, धर्मभगिनी *f*.

Sis'ter-hood *n. the relationship of a sister* वहीणपण *n*, वहीणपणा *m*, भगिनीत्व *n*, वहिणीचें नातें. २ *a society of women, (esp. religious)* भगिनीसमाज *m*, भगिनीसंप्रदाय *m*.

Sister-in-law (*pl.* Sisters-in-law) *n. wife's sister* मेहुणी *f*, जायाभगिनी *f*. २ *husband's sister* नणंद *f*, वनसें. ३ *brother's wife* भ्रातृजाया *f*, भावजय *f*.

Sis'terly *a. like or befitting a sister* वहिणीचा, बहिणीसारखा, वहिणीला योग्य, भगिनीयोग्य.

Sit (sit) [ A. S. *sittan*, Sk. सद्, to sit.] *v. i.* बसणें, बैठक *f* -बसक *f*. मारणें -घेणें, --in cant phraseology वूड *m. n.* टेंकणें. [ To S. DOWN IN DESPAIR वसकण *f*. मारणें -घेणें.] २ (of birds) *to perch* बसणें. ३ *to be inactive* (स्वस्थ -निरुद्योगी) बसणें. ४ *to brood* (उबविण्याकरतां) बसणें, पाखर घालणें. ५ (an assembly) बसणें, (बैठक) चालू असणें; as, "The courts are *sitting*." ६ (with *down*) बसणें, खालीं बसणें. ७ (with *on* or *upon*) *to hold an enquiry into* (चौकशीकरितां) बसणें. ८ (with *out*) *to wait till the end (of a business or enterprise)* अखेरपर्यंत बसणें; as, "*Sat* out the next dance." ९ (with *under*) *to belong to a congregation of a clergyman or the class of a professor* शिष्यत्वानें बसणें, (चें) शिष्यत्व पत्करणें; as, "To S. under a preacher." १० (with *up*) (a) *to rise from a recumbent posture* उठून बसणें. (b) *to remain out of bed* बसणें, जागणें, जागत बसणें, जागरण *n*. करणें; as, "To S. up late at night." [To S. AT A TABLE मेजावर खान्यास बसणें.] Sat *pa. t.* and *pa. p.*

Site (sīt) [ Fr. –L. *situs*, site. ] *n.* (इमारतीची किंवा शहराची) आसपासची खुली जागा *f*, स्थान *n*.

Sit'ter *n. person sitting for portrait* छबी काढण्याकरितां बसलेला मनुष्य *m*, उपवेष्टा *m*, बसणारा.

Sit'ting *pr. p.* बसणारा, बसलेला, आसीन, उपवेष्टा. S. *v. n.* बसणें *n*. (b) बैठक *f*, बसक *f*. २ *time during which one sits continuously* बैठक *f*, बसणें *n*, बसणी *f*; "He wrote the whole poem at a S." [ AT ONE S. एका बैठकीस. ] ३ *session* बैठक *f*, अधिवेशन *n*. ४ छबी काढण्याकरितां बसणें *n*. ५ अंडीं उबवण्याकरितां बसणें *n*. S. *a.* बसलेला, बसण्याचा, etc.; as "A S. posture." S. –room *n.* बसण्याची खोली *f*, बसण्याची जागा *f*, दिवाणखाना *m*. २ *enough room to be seated in* बसण्यापुरती जागा *f*.

Situate,-d (sit'ū-āt,-ed) [Fr. –L. *situs*, a site. ] *a. residing, stationed* (ठिकाणीं) असलेला, स्थित,

Sta'tionery *n.* ( कागद वगैरे ) लिहिण्याचें सामान *n*, लेखनसाहित्य *n.*

Station-yard *n.* स्टेशनाचें आवार *n.*

Statist ( stā'tist ) *n.* आंकडेशास्त्री *m.*

Statis'tical *a.* आंकडेशास्त्राचा -संबंधी. [S. ABSTRACT लोकस्थितिदर्शक आंकड्यांचा गोषवारा *m.* S. REPORT लोकस्थितीचे आंकडे देणारा रिपोर्ट *m.* S. SOCIETY आंकडेशास्त्रविषयक सभा *f.*]

Statis'tically *adv.* आंकडेशास्त्राच्या दृष्टीनें, आंकडे देऊन, आंक..र्नीं.

Statist'ician *n.* आंकडेशास्त्राचा अभ्यासक *m*, आंकडेशास्त्री *m.* (b) आंकडेशास्त्रावर ग्रंथरचना करणारा *m.*

Statistics ( sta-tisti'ks ) [Gr. *statizein*, to set up.] *n.* लोकस्थितिदर्शक आंकड्यांचा संग्रह *m.* ह्यांत जननमरण, आयुर्मान, प्रापंचिक स्थिति, कला, उद्यागधंदे, लष्करी व आरमारी खर्च, शिक्षण, उत्पन्नाच्या बाबी, गुन्हे, अपघातापासून मृत्यु, इत्यादि विषयांच्या आंकड्यांचा संग्रह होतो. [VITAL S. जन्ममृत्यूचे आंकडे *m. pl.*, जननमरणाचे आंकडे *m. pl.*] २ ( in this sense *sing.*) आंकडेशास्त्र *n*, लोकस्थितिगणित *n.*

Stat'uary *n. the art of making statues* पुतळे तयार करण्याची कला *f*, पुतळे घडणें *n*, मूर्ति खोदणें *n*, मूर्तिकरण *n.* २ *image-carver* पुतळे घडणारा *m*, मूर्ति खोदणारा *m*, मूर्तिकार *m.* ३ ( collectively ) *statues* पुतळे *m. pl.*, मूर्ति *f. pl.* ४ पुतळे विकणारा, मूर्ति विकणारा.

Statue ( stat'ū ) [Fr. -L. *statua -statuare*, to cause to stand.] *n.* पुतळा *m*, मूर्ति *f*, प्रतिमा *f.*

Statuesque ( stat-ū-esk') [Fr.] *a. like a statue* (*esp. in pose*) पुतळ्यासारखा ( उठावदार, डौलदार ).

Statuette ( stat-ū-et' ) [Fr.] *n.* लहान पुतळा *m.*

Stature ( stat'-ūr ) [L. *statura*, standing posture.] *n. tallness, height* ( of human body ) शरीराची उंची *f*, उंचपणा *f*, शरीराची काठी *f*, भुई *f.* [TO BE OF SHORT OR LOW S. भुई *f.* ठेंगणी असणें *g. of s.*, काठी खुजी -ठेंगणी असणें *g. of s.* TO BE OF TALL OR HIGH S. भुई *f.* उफाड्याची असणें, काठी उंच असणें *g. of s.*]

Status ( stā'tus ) [L.] *n. rank, social position* योग्यता *f*, दर्जा *m*, पद *n*, पदवी *f*, अधिकार *m*, मान्यता *f*, किंमत *f*, प्रतिष्ठा *f*, अवस्था *f.* २ *state of affairs* स्थिति *f*, अवस्था *f.* [STATUS QUO ( lit. *the state in which* ज्या स्थितींत ) *the original state of affairs* मूलस्थिति *f*, पूर्वस्थिति *f.*] ३ ( law ) स्थावर मिळकतींतील हक्कसंबंध *m.*

Statute (stat'-ūt) [Fr.-L. *statutum*, established.] *n.* ( पार्लमेंट वगैरेचा ) कायदा *m*, नियम *m*, ठराव *m.* २ २ ( Bible ) *divine law* ईश्वरी कानून *m*, दैवी नियम *m.* [DECLARATORY S. विद्यमान कायद्यांचा अर्थ ठरविणारा कायदा *m.* PRIVATE S. व्यक्तिविषयक कायदा *m.* GENERAL OR PUBLIC S. सार्वजनिक कायदा *m.*]

**Stat'utory** *a. enacted, required, imposed by statute* कायद्याचा, कायद्यानें स्थापलेला, कायद्यानें निर्माण केलेला. [S. CIVILIAN विशेष नियमानें नेमणूक होणारा मुलकी अधिकारी *m.*]

**Staunch** (stänsh) [See Stanch.] *a. trustworthy, loyal* कट्टा, प्रामाणिक, विश्वासू.

**Staunch'ly** *adv.* प्रामाणिकपणानें, करारीपणानें, इमानानें.

**Stave** (stāv) [A form of Staff.] *n. a staff* दांडा *m,* काठी *f.* २ *a narrow board used in cask-making* (पिंपें करण्याच्या कामाची) बारीक फळी *f.* ३ (of a song) कडवें *n.* S. *v. t. to make a hole in* भोंक पाडणें, तोंड *n.* उघडणें, फोडणें. २ (with *off*) *to postpone, to ward off* पुढें ढकलणें, टाळणें, निवारणें; as, "To S. off rúin, exposure, &c."

**Staved** or **Stove** *pa. t.* and *pa. p.* **Sta'ving** *pr. p.*

**Stay** (stā) [O. Fr. *estayer*, to support.] *v. t.* (now chiefly literary) *to check, to stop* (progress, inroads of disease, &c.) थांबवणें, थोपवणें, राहविणें, स्थिरावणें, थारवणें. [To S. ONE'S STOMACH तात्पुरती भूक शांत करणें.] २ *to postpone* (judgment, decision) तहकूब करणें, मुदतीवर टाकणें, लांबणीवर टाकणें. ३ *to support, to prop (up)* धिरा *m.* देणें.

**Stay** *v. i. to remain* राहणें, बसणें, ठरणें, टिकणें, तगणें, थारावणें, थिरावणें; as, "Will not S. where it is put." २ *to dwell temporarily* राहणें, उतरणें, मुक्काम *m.* करणें, वास्तव्य *n.* करणें. ३ *to pause in movement, action, speech* थांबणें, थोपणें. ४ *to show endurance* जीव *m* असणें, जीवटपणा *m* -वकूब असणें; as, "Does not seem able to S."

**Stay** *n. remaining, esp. dwelling in a place* राहणें *n,* मुक्काम करणें *n,* वास्तव्य करणें *n,* ठरणें *n.* २ *duration of a stay* मुक्काम *m;* as, "Made a long S. in London." ३ *suspension of judicial proceedings* (खटल्याच्या चौकशीची) तहकुबी *f,* मुदत *f.* ४ *check, restraint* खोळंबा *m,* खोटी *f,* दाब *m,* दडपण *n;* as, "Will endure no S." ५ *endurance, staying power* दम *m,* जीव *m,* जिवटपणा *m.* ६ *a prop* धिरा *m,* तणावा *m,* मेढ्या *m,* जोर *m,* तीर *m.* [GUSSET STAYS फायरबाक्सच्या पत्र्याचे मजबुतीकरतां रिव्हेट केलेले टेंकू *m. pl.*] ७ (*pl.*) कांचोळी *f.*

**Stay-at-home** *a. remaining habitually at home* घरकोंबडा. S. *n.* घरकोंबडा *m.* [S. TENDENCIES घरकोंबडेपणा *m,* कूपमंडूकवृत्ति *f,* स्वदेशींच राहण्याची प्रवृत्ति.]

**Stay of proceedings** *n.* खटल्याच्या चौकशीची तहकुबी.

**Stay-order** *n.* दावा बंद ठेवण्याचा हुकूम *m,* मनाई-हुकूम *m,* तहकुबीचा हुकूम.

**Stead** (sted) [Lit. 'a standing-place,' A. S. *stede*, from root of Stand.] *n. place* (of another person or thing) जागा *f,* स्थान *n,* ठिकाण *n,* स्थळ *n.* [IN STEAD OF (-च्या) जागीं, ऐवजीं, बदल. THAT IS IN THE S. OF वारचा, वांटचा, बदली.] २ *service* उपयोग *m.* [TO STAND ONE IN GOOD S. (-च्या) कामास येणें.]

Steadfast ( sted'fast ) *a. firmly fixed or established* स्थिर, निश्चळ. २ *constant, firm* निश्चयाचा, स्थिर, स्थिरचित्त, धिराचा.

Stead'fastly *adv.* स्थिरपणानें, धिरानें, निश्चयानें. २ एका धोरणानें.

Stead'fastness *n.* स्थिरपणा *m*, स्थिरता *f*, निश्चय *m*, कायमपणा *m*.

Stead'ily *adv.* स्थिरपणानें, एकचालीनें, एक धोरण धरून, स्थिरबुद्धीनें, निश्चयानें.

Stead'iness *n.* स्थिरपणा *m*, स्थिरता *f*, स्थैर्य *n*, स्थिरबुद्धिता *f*, निश्चलपणा *m*, सारखेपणा *m*, समगतित्व *n*.

Steady ( sted'i ) [A. S. *stedig* -*stede*, place.] *a. standing firmly, not tottering* स्थिर, न डळमळणारा, न हालणारा, निश्चळ, नीट; as, "Not S. on his legs." २ *uniform, regular* एकसारखा चालणारा, समगति, एकसारखा, स्थिर; as, "Went off at a S. pace." ३ *of uniform conduct, sober* एकमार्गी, एकचालीचा, स्थिरवृत्तीचा, स्थिरबुद्धि. ४ *firm, resolute* निश्चयाचा, अढळवृत्तीचा, करारी; as, "S. in his principles." Steadier *comparative*; Steadiest *superlative*. S. *v. t. to make steady* स्थिर करणें, स्थिरावणें, स्थिरपणा *m* -स्थिरता *f*. आणणें; as, "Adversity will S. him." [Steadying of mind धारणा ( एक योगांग. ).] S. *v. i. to become steady* स्थिर होणें, स्थिरता *f*. येणें; as, "The boat *steadied*."

Steady-going *a. industrious* ठरींव मार्गानें काम करीत राहणारा, एकचालीचा, एकधोरणी, धिमा.

Steak ( stāk ) [Ic. *steikja*, to broil.] *n. a slice of meat* मांसाचा तुकडा *m*.

Steal ( stēl ) [A. S. *stelan*.] *v. t. to take away secretly* चोरणें, चोरून नेणें -घेणें, चोरी *f*. करणें, चोरी करून नेणें -घेणें. २ *to obtain surreptitiously or by surprise* चोरून घेणें, गुपचुप घेणें, डोळा चुकवून घेणें, एकदम घेणें, अचानक घेणें; as, "*Stole* a kiss; A *stolen* interview." ३ ( also with *away* ) *to win by insidious arts or attractions* वळवणें, भुलवणें, मोहवणें, आपलासा करून घेणें; as, "To S. a person's heart." [To S. a march on, *to get the start of, in an unobserved manner* नकळत सुरुवातीला फायदा घेऊन बसणें, सुरुवातीला चोरटा फायदा मिळविणें.] S. *v. i. to move* ( in, out, away, &c. ) *secretly or silently* मुकाट्यानें निघून जाणें, चोरपायानें -चोरपावलानें -चोरून -लपून -गुपचुप येणें -जाणें; as, "*Stole* out of the room." Stole *pa. t.* Stolen *pa. p.*

Steal'ing *n. theft* चोरी करणें *n*, चोरी *f*.

Stealth ( stelth ) *n.* चोरी करणें *n*. २ *secrecy, underhandedness* चोरी *f*, छपवणूक *f*, छपवाछपवी *f*. [By S. चोरून, गुपचुप, लपतछपत.] Stealthi'ly *adv.* चोरीनें, चोरून, अलगत, न कळत, चोरपावलें टाकीत. Stealth'iness *n.* चोरटेपणा *m*, लपवालपवी *f*, छपवाछपवी *f*. Stealth'y *a.* चोरीचा, चोरपावलांचा.

Stealthy, See under Stealth.

Steam ( stēm ) [A. S. *steam.*] *n.* ( of water ) बाष्प *n*, वाफ *f.* [S. BATH वाफारा *n*, वाष्पस्नान *n.* २ स्वेदनयंत्र *n.* S. BOAT आगबोट *f*, वाष्पनौका *f.* S. BOILER वाष्पोत्पादक *m.* S. CRANE वाफेची यारी *f*, वाफेनें चालणारी यारी *f.* S. CHEST, S. BOX सरकपड्या ( Slide-valve ) वरील वाफेची पेटी *f.* S. DOME ( बायलरावरचा ) वाफेचा खजिना *m.* S. GAUGE बाष्पमापक. S. ENGINE वाफेचें इंजन *n*, वाष्पयंत्र *n.* S. LAUNCH वाफेनें चालणारा पडाव *m.* S. NAVIGATION वाफेनें जहाजें चालविणें, वाष्पनौकानयनविद्या. S. NAVIGATION COMPANY बोटींची कंपनी *f.* S. PIPE वाफेचा नळ *m.* S. PLOUGH वाफेचा नांगर *m.* S. POWER वाष्पशक्ति *f*, वाफेची शक्ति *f.* S. PRESS वाफेनें चालणारा छापखाना *m.* S. PRINTING वाफेच्या शक्तीनें छापणें. S. SHIP वाफेनें चालणारी आगबोट *f.* S. WHISTLE वाफेनें वाजणारी शिटी *f.* S. YACHT वाफेनें चालणारी क्रीडानौका *f.*] २ *visible vapour* सजलबाष्प *n.* ३ ( *colloq.* ) *energy* जोम *m*, जोस *m*, शक्ति *f*, उत्साह *m*, सामर्थ्य *n*; as, "To Put on S."

Steam ( stēm ) *v. i. to give forth steam* वाफ टाकणें, वाफ सोडणें, वाफ सुटणें -येणें *in. con.*, वाफ निघणें *g. of s.* २ *to evaporate* बाष्प होणें -बनणें *g. of s.*, वाफेच्या रूपानें वर जाणें. ३ ( *colloq.* ) *to make great progress* जोराचा प्रयत्न करणें, जोरानें काम करणें, जंगी प्रगति करणें; as, "To S. ahead." S. *v. t. to cook with steam* वाफेवर ( अन्न ) शिजवणें. २ *to treat with steam* ( वांकविण्याकरितां लांकडाला ) वाफारा *m.* देणें. ३ *to move by the agency of steam* वाफेच्या शक्तीनें चालविणें, वाफेनें चालविणें.

Steam'er *n.* आगबोट *f*, वाफेनें चालणारें जहाज *n.* [MAIL S. टपालाची बोट. CARGO S. मालाची बोट *f.*] २ *a fire-engine worked by steam* आग विझविण्याचा ( वाफेचा ) बंब *m.* ३ *a vessel in which things are steamed*, esp. *cooked by steam* ( पदार्थ ) वाफेनें शिजविण्याचें पात्र *n*, बाष्पपाकपात्र *n.* उदाहरणार्थ the मोदकपात्र of the Hindus. ४ बाष्पोत्पादक *m.*

Steam'iness *n.* बाष्पमयता *f.* २ बाष्पसदृशता *f.*

Steam-oven *n.* ( पदार्थ ) वाफेनें सुकविण्याची भट्टी *f.*

Steam-vessel *n.* आगबोट *f.*

Steam'y *a. consisting of or like steam* वाफेचा, बाष्पयुक्त. (b) वाफेसारखा, बाष्पतुल्य. २ *full of steam or vapour* बाष्पप्रचुर, बाष्पमय, वाफेनें भरलेला.

Stear'ic acid *n.* चरबींतून निघणारें अम्ल *n.*

Stearine ( stē'a-rin ) [Gr. *stear*, suet.] *n. the chief solid constituent of animal fat* चरबीचा मुख्य घटक *m*, स्टिअरिन. मेणबत्त्या करण्याकरितां मेणाच्या ऐवजीं याचा उपयोग करतात.

Steatite ( stē'a-tīt ) [Gr. *steatites* -*stear*, suet.] *n.* शिंप्याचा खडू *m.* कापडावर खुणा करण्याकडे इंग्लंडांतील शिंपी याचा उपयोग करतात.

Steed ( stēd ) [A. S. *steda*, from the root of stand.] *n. a horse, esp. a war-horse* खंद्या घोडा *m*, तरतरीत घोडा *m*, फुरफुरणारा घोडा *m*, वारू *m*.

Steel ( stēl ) [A. S. *stiel.*] *n.* पोलाद *n*, तिखें *n*. [COLD S. तरवार, &c. CAST S. जातिवंत पोलाद. ह्याचीं छिन्या, टांक्या, करवती, सामते, वाकस, किंकरी इत्यादि हत्यारें करतात. MILD S. पाणी न चढणारें पोलाद, नरम पोलाद.] २ सुरी *f*, कट्यार *f*, तलवार *f* ( वगैरे पोलादी हत्यार *n*.). ३ (rod of ) (चाकू वगैरेंना) धार लावण्याची पोलादी कांब *f*. ४ ( झगा तंग करण्याकरितां ) पोलादाची पट्टी *f*. ५ *sternness* कडकपणा *m*, ताठपणा *m*. ६ *constancy* एकसारखेपणा *m*, कायमपणा *m*, निश्चितपणा *m*. S. *a. made of or like steel* पोलादी, पोलादाचा केलेला. (b) पोलादासारखा, बळकट, मजबूत.

Steel *v. t. to harden* ( one's self, one's heart, &c. against compassion ) (मन) कठिण करणें, कठोर -निष्ठुर -निर्दय करणें, न द्रवेसा करणें. २ पोलादासारखें पाणी देणें -पाजणें. S. *v. i. to be hard or unfeeling* (-चें ) मन कठिण -निर्दय होणें.

Steel-beam *n.* पोलादी बहाल *n*, पोलादी तुळई *f*.

Steel-clad *a.* चिलखत घातलेला.

Steel-engraving *n.* पोलादी प्लेटीवर केलेलें खोदकाम *n*. २ पोलादी प्लेटीवरून घेतलेलें छायाचित्र *n*.

Steel-pen *n.* पोलादी टांक *m*.

Steel-ware *n.* पोलादाचे जिन्नस *m. pl.*

Steel'y *a. made of or like steel* पोलादी, पोलादाचा केलेला, पोलादासारखा कठिण, टणक. २ *inflexibly severe* अभेद्य, दुर्भेद्य, पाषाणसम; as, "S. glance."

Steel-yard *n.* एकपारड्याचा तराजू *m*.

Steep ( stēp ) [A. S. *steap.*] *a. sloping abruptly* मोठ्या चढाचा, उभ्या चढाचा, उभ्या चढावाचा, उभ्या चढणीचा, उभ्या सुळाचा, उभा, खर, घस. २ (*colloq.*) (of price, demand, &c.) *exorbitant, unreasonable* फाजील, गैरवाजवी; as, "Seems a bit S. that we should have both the trouble and the expense." S. *n. a precipice* चढण *f*, डगर *f*, कडा *f*, उभी चढण *f*, सूळ *m*, उभा सूळ *m*, घसरड *f*, घांटी *f*.

Steep ( stēp ) [Dut. *stippen.*] *v. t. to soak* भिजविणें, भिजत घालणें, भिजूं घालणें, (प्रवाही पदार्थांत) बुडवून काढणें. २ ( *fig.* with *in* ) *to impregnate with, to pervade with* बुडवणें, भिजवणें, लोळवणें; as, "*Steeped* in misery; *Steeped* in Latin and Greek." S. *n. a process of steeping* भिजवण्याची पद्धति *f*. २ *the liquid in which a thing is steeped* भिजवण *n*.

Steep'en *v. i. to become steep* चढ होणें, चढाचा -खर -घस होणें, खर -घस होत जाणें. Steep'ened *pa. t.* and *pa. p.* Steep'ening *pr. p.*

Steep'er *n.* (पदार्थ) भिजविण्याचें पात्र *n*. पीप *n*, टीप *n*.

Steeple ( stēp'l ) [A. S. *stepel.*] *n. a spire* शिखर *n*, कळस *m*, सुळका *m*, सुळकी *f*.

Steep'lechase *n.* खंदक, कुंपणें वगैरे उडून जाण्याची घोड्याची शर्यत *f.*
Steep'led *a.* शिखर असलेला, कळस असलेला.
Steep'ness *n.* उभेपणा *m*, चढण *f*, उभा चढ *m*, सूळ *m*.
Steer ( stēr ) [A. S. *steor.*] *n. a young ox, esp. a castrated one* (बडवलेला) खोंड *m*, पाडा *m*, गोऱ्हा *m*.
Steer ( stēr ) [A. S. *steoran.*] *v. t. to direct with the helm* (सुकाणूनें) चालवणें. २ *to guide* ( motor, balloon, &c. ) चालवणें, मार्गावर ठेवणें, वळवणें, फिरवणें, हाकणें. ३ ( *colloq.* ) *to direct* करणें, लावणें, वळवणें; as, "*Steered* his flight heavenwards." [To S. CLEAR OF टाळणें, वहिवाटणें, ओलांडणें.]
Steer *v. i. to direct a ship in her course* सुकाणूं फिरवणें, सुकाणूं चालवणें. २ *to be directed* वळणें, फिरणें, कलणें, झुकणें; as, "We *steered* for the railway station." ३ (*fig.*) *to pursue a course* रस्ता *m.* धरणें, वाट *f.* धरणें, उपाय *m* -तजवीज *f.* करणें.
Steer'age *n.* गलबत हांकारणें *n*, गलबत चालवणें *n*.
Steers'man *n.* सुकाणूं धरणारा *m*, सुकाण्या *m*.
Stellar ( stel'ar ) [L. *stellaris, -stella,* a star.] *a.* ताऱ्यांचा, नक्षत्रांचा, नक्षत्रसंबंधीं, नाक्षत्र.
Stell'ary *a. of stars* ताऱ्यांचा.
Stell'ate, Stell'ated *a.* (*bot.*) *like a star* ताऱ्यासारखा, तारकासदृश; as, "S. leaves." २ *formed of rays* प्रकाशसंभव, प्रकाशयुक्त, देदीप्यमान.
Stell'ular *a. formed like little stars* तारकाकृति.
Stel'lulate *a.* तारकाकृति.
Stem *v. t. to check, to dam up* ( stream, &c. *lit.* and *fig.*) अडवणें, बांध घालणें, रोधणें. २ *to make headway against* ( tide, current, &c. *lit.* and *fig.*) उभा -समोर तोंडीत जाणें, स्रोतावर -ओघावर चढणें -जाणें.
Stem ( stem ) [A. S. *stefn,* Ger. *stamm,* trunk.] *n. main body of a trunk or plant* खोड *n*, दंड *m*, स्कन्ध *m*, प्रकांड *m*.[SUBTERRANEAN S. (भूमिगत -भूमींत जाणारा) दंड *m*, कुडें *n*. AERIAL S. आंतरिक्ष दंड *m*, हवेंत वाढणारा दंड. DIFFERENT KINDS OF STEMS ARE :— BULB = कांदा, गड्डा *m*, कंद *m*. BULBIL = लघुकंद, कंदक. CORM = गड्डा, घनकंद, करमगड्डा, सकंदकोष्ठ. OFFSET = भुईसरपट व जाड देंठ. PHYLLOCLADE = दंडपर्ण ( ON THE ANALOGY OF राजर्षि ), पर्णकोष्ठ. PRICKLE, SPINE AND THORN SEE UNDER SPINE. RHIZOME = भूप्रकांड *m*, मूलरूपी कांड, मूळकोष्ठ. RUNNER = ताणा *f*, धांवती फांदी *f*, धावनी *f*. STOLON = गुल्मिनी *f*. SUCKER = चोपक दंड. TENDRIL = प्रतान, ताणा, लताकर, सूत्रकोष्ठ. TUBER = ग्रंथिकंद, ग्रंथिकोष्ठ.] २ *a branch* फांदी *f*, शाखा *f*. ३ *peduncle of a leaf* देंठ *m*, डेंख *m*, वृंत *n*. ४ (*gram.*) सामान्य रूप *n*. ५ *lines of ancestry, branch of a family* शाखा *f*, कुल *n*, गोत्र *n*, घराणें *n*. ६ *the forepart of a ship* नाळ *f*. ७ ( दिव्याच्या बैठकीवरची उभी ) दांडी *f*.
Stench ( stensh ) [A. S. *stenc.*] *n.* घाण *f*, दुर्गंध *m*.

Stencil ( sten'sil ) [L. *scintilla*, a spark.] *n.* अक्षरें, फुलें किंवा वेलबुट्टी कातरून काढलेला पत्रा *m*, स्टेन्सिलचा पत्रा. S. *v. t.* स्टेन्सिलच्या पत्र्यानें अक्षरें, फुलें किंवा वेलबुटी काढणें. Sten'cilled *pa. t.* and *pa. p.*

Sten'ciller *n.* स्टेन्सिलच्या पत्र्यानें रंगवणारा.

Stenographer ( sten-og'ra-fėr ) [Gr. *stenos*, narrow, and *graphein*, to write.] *n.* *a shorthand-writer* लघुलेखक *m.* [लघुलेखनविद्येचा.

Stenograph'ic,-al *a.* लघुलेखनाचा, लघुलेखनविषयक,

Stenog'raphy *n.* लघुलेखनविद्या *f.*

Stenosis ( sten-ō'sis ) [Gr. *stenein*, to contract.] *n.* ( *med.*) अरुंद होत जाणें *n*, आकुंचन *n*.

Stentorian ( sten-tō'ri-an ) [Gr. *Stentor*, herald of the Greeks in the siege of Troy.] *a.* ( of voice ) *very loud* फार मोठा, खडा, ताठ, खणखणीत.

Step ( step ) [A. S. *stæpe*, a step.] *n.* पाऊल *n*, कदम *m.* [At every S. पावलोपावलीं, पदोपदीं.] २ *distance gained by a step* पाऊल *n*, पाऊलभर अंतर *n*, कदम *m*, ढेंग *n.* (b) *a short distance* चार पावलांची वाट *f*, चार पावलांचें अंतर *n.* ३ *mark left by foot on the ground* पाऊल *n.* ४ *sound made by setting the foot down* पाऊल *n*, पावलांचा आवाज *m*, पावलें वाजल्याचा आवाज *m*, चाहूल *f.* ५ *manner of walking* चाल *f*, चालण्याची ढब *f*; as, "Do you know her S." ६ *hold for the foot, a stair* पायरी *f*, पावका *m*, पायंडा *m*, पावंडा *m*, पायंडी *f*, पावठणी *f*. -as notched on a tree, down a well, &c. पावंडा *m*, पावठी *f*, पावठाणा *m.* [Flight of steps जिना *m*, शिडी *f.* (b) पायऱ्या *f. pl.*, पायऱ्यांची रांग *f.*] ७ *gradation, stage* पायरी, क्रम, अनुक्रम *m.* [S. by S. पायरीपायरीनें, क्रमाक्रमानें, क्रमशः.] ८ ( *usu. pl.*) *measure taken* उपाय *m*, तजवीज *f.* ९ *promotion* ( *esp. in the army*) बढती *f*, फीत *f*; as, "Give him a S. in the peerage."

Step *v. i.* *to place the foot on the ground in moving* पाऊल *n.* टाकणें, पाऊल *n.* ठेवणें, पावलें टाकीत जाणें, पाय ठेवणें, पदन्यास *m.* करणें. २ *to walk a little distance* चार पावलें चालणें, चार पावलें -चार कदम चालणें -चालून येणें -जाणें. [To S. out लांब पाऊल करणें -टाकणें, भरकदम -भरपावलांनीं, &c. चालणें. To S. short जवळ पाऊल टाकणें, सावकाश चालणें. To S. back हटणें, पाठीमागें सरणें -सरकणें. To S. forth पुढें होणें -येणें, पुढें सरकणें. To S. into ( a boat ) चढणें. To S. in आंत जाणें. २ ( *fig.* ) *to intervene* मध्यें पडणें, मध्यें तोंड घालणें. To S. up वर चढणें. To S. down खालीं उतरणें. To S. aside भलतीकडेच -बाजूला पाऊल टाकणें. २ ( *fig.* ) *to make digression* विषयांतर करणें.] S. *v. t.* *to measure* ( distance ) *by stepping* पावलें घालून मोजणें, पावलें टाकून मोजणें. Stepped *pa. t.*

Step-brother *n.* सावत्रभाऊ *m*, सापत्नबंधु *m.*

Step-child *n.* सावत्रमूल *n*, पहिल्या घरचें मूल *n*, आदल्या घरचें मूल *n*; jocosely अइता, ओढ्या.

Step-daughter *n.* सावत्र मुलगी *f*, पहिल्या घरची मुलगी *f*, पहिल्या बायकोची मुलगी *f*. [सावत्र बाप.
Step-father *n.* दुसरा बाप *m*, पाटाचा बाप *m*, loosely
Step-girl *n.* पायऱ्या झाडणारी मोलकरीण *f*.
Step-mother *n.* सावत्र आई *f*, सापत्नमाता *f*.
Steppe (step) [Russ. *stepe.*] *n.* रशियामधील विस्तीर्ण माळरान *n*.
Stepping-stone *n.* (वाहाळांतून) पाऊल टाकण्याकरितां दगड *m*. २ *means to an end* साधन *n*, आधार *m*.
Step-sister *n.* सावत्र बहीण *f*, सापत्नभगिनी *f*.
Step-son *n.* सावत्र मुलगा, सवतीचा मुलगा *m*, पहिल्या बायकोचा मुलगा *m*, पहिल्या घरचा मुलगा *m*.
Stercora'ceous vomitting *n.* मलयुक्त वमन *n*.
Stereo (stēr'ē-ō) [Short for Stereotype.] *n.* *stereotype* कायमचा ठसा *m*, कायमच्या ठशाचा पत्रा. Stereos *n. pl.* [घनचित्र *n*.
Stereog'raph *n.* घनपदार्थांचा कांचेवर घेतलेला लेख *m*,
Stereographic (stēr-ē-ō-graf'-ik) [Gr. *stereos*, hard, and *graphein*, to write.] *a.* घनचित्रकलेसंबंधीं. २ घनचित्रकलेनें दाखविलेला.
Stereog'raphy *n.* घन पदार्थांचीं कांचेवर चित्रें काढण्याची कला *f*, घनचित्रकला *f*, घनचित्रणकला *f*.
Stereom'eter *n.* विशिष्टगुरुत्वमापक *m*. २ घनावकाशमापक. [*n*, भरींवदर्शक.
Ster'eoscope *n.* फोटोंवरून भरींव वस्तु दाखविणारें यंत्र
Stereoscop'ic *a.* भरींवदर्शकानें दाखविलेला.
Ster'eo-type *n.* (टायपांच्या कंपोजवरून पाडलेला मजकुराचा) कायमचा ठसा, कायमच्या ठशाचा पत्रा. २ स्टिरियोचा उपयोग करणें *n*, स्टिरियो वापरणें *n*. S. *v. t. to make stereotypes of* (-चा) स्टिरियो किंवा कायमचा ठसा बनविणें -तयार करणें. २ *to print by use of stereotypes* स्टिरियोवरून छापणें, कायमच्या ठशावरून छापणें. ३ (*fig.*) *to make unchangeable* ठरवून टाकणें, कायम करून टाकणें.
Stereo-type-block *n.* स्टिरियो बसविण्याचा लांकडाचा ठोकळा *m*, स्टिरियोचा ठोकळा *m*.
Stereotyper *n.* स्टिरियो तयार करणारा *m*.
Ster'eotypist *n.* स्टिरियो (कायमचे ठसे) पाडणारा *m*, स्टिरियो (कायमचे ठसे) तयार करणारा *m*.
Ster'eotypy *n.* स्टिरियो पाडण्याची कला *f*.
Sterile (ster'il) [Fr. -L. *sterilis*, Gr. *stereos*, hard, Gr. *steira*, Sk. स्तरी, a barren cow.] *a. barren, unproductive* वरड (जमीन), नापीक (जमीन). २ *free from living germs* रेतजन्तु नसलेला, रेतजन्तुशून्य, वन्ध्या. ३ (of style) *bald* रुक्ष, पोंचट, निर्जीव.
Steril'ity *n.* नापीकपणा *m*. २ पोंचटपणा *m*, रुक्षता *f*. ३ रेतजन्तुशून्यता *f*, वन्ध्यात्व *n*, वांझपणा *m*.
Steriliza'tion *n.* -*act.* रोगजन्तुशून्य करणें *n*. [S. OF MILK दुग्धशुद्धि *f*.] २ (-ला) वन्ध्यात्व आणणें *n*.
Ster'ilize *v. t. to make sterile* (-ला) वन्ध्यात्व आणणें, (-ची) प्रजननशक्ति नाहींशी करणें. २ *to free from*

*harmful microbes* (ऊन पाण्यांत उकळवून) रोगजन्तु-शून्य करणें. Ster'ilized *pa.t. pa. p.* Ster'ilizing *pr. p.*

Sterling (ster'ling) [From *Easterlings*, North German merchants.] *a. denoting the standard British coinage* ब्रिटिश शिक्क्याचा. [S. MONEY इंग्रजी चलनी नाणें.] २ *genuine* खरा, अस्सल, शुद्ध, मुळचा. ३ टिकाऊ, चांगला, चांगल्या जातीचा, उत्तम प्रतीचा.

Stern (stern) [Of Scandinavian origin.] *n.* वराम *n.* [STERN -POST वरा *f.*]

Stern (stern) [A. S. *sterne*, stern.] *a. severe in look or manner* (दिसण्यांत) उग्र, कडक, कडवा, खरमरा, झणझणीत, खणक्या, निष्ठुर. २ *resolute* करारी, बाणेदार, पिळाचा.

Stern'ly *adv.* कडकपणानें, कडक शब्दांनीं, निष्ठुरपणें.

Stern'ness *n.* कडकपणा *m*, बाणेदारपणा, निष्ठुरपणा *m.*

Sternum (ster'num) [L. -Gr. *sternon*, the chest.] *n.* उराचें हाड *n*, उराचा दांडा *m*, उरोस्थि *n.* Ster'na *pl.*

Sternuta'tion *n. sneezing, a sneeze* शिंकणें *n*, शिंका *f.* येणें *n.* २ शिंका *f.*

Sternutatory (ster-nū'ta-tor-i) [L. *sternuere*, to sneeze.] *a.* शिंका आणणारा (पदार्थ). S. *n.* शिंका आणणारा पदार्थ *m*, औषधी तपकीर *f*, नस्य *n.*

Stertorous (ster'tō-rus) [Fr. -L. *stertere*, to snore.] *a. snoring* घोरणारा. २ (of breathing or breather *esp.* in apoplexy) *making snore-like sounds* घोरण्यासारखा आवाज निघणारा -करणारा.

Stethoscope (steth'o-skōp) [Lit. 'the chest-examiner.' Gr. *stethos*, the breast, and *skopein*, to see.] (छातींतील) आवाज ऐकण्याची नळी *f*, श्रवण-नलिका *f*, छाती तपासण्याची नळी *f.*

Stethoscopic *a.* श्रवणनलिकेनें केलेला.

Stevedore (stē'v·e-dōr) [Sp. *estivador*, a packer of wool.] *n. one who loads or unloads ships* बोटींत माल चढविणारा किंवा उतरणारा.

Stew (stū) [O. Fr. *estuve*, a stove.] *n. stewed meat and vegetables* वाफेवर शिजविलेलें मांस आणि भाजी-पाला. २ (*colloq.*) *anxiety* धांदल *f*, त्रेधा *f*, तिरपीट *f*, तारातीर *f.* S. *v. t. to boil slowly* मंदाग्नीवर शिज-विणें, मंद विस्तव ठेवणें, मंदाग्नीनें शिजविणें -रांधणें, वाफविणें, वाफ देणें. [TO BE STEWED फार वेळ चुलीवर राहणें, फार वेळ चुलीवर ठेवल्यामुळें बिघडणें; as, "The tea is *stewed* चहा कडवट झाला आहे." २ (*fig.*) *to be oppressed by close or moist warm atmosphere* शिजून निघणें, शिजणें.]

Steward (stū'-erd) [A. S. *stiweard*, keeper of a sty.] *n. the manager of an estate &c.* कारभारी *m.* २ *purveyor of provisions, &c. for a college, club, ship, &c.* सामान पुरविणारा *m*, वाकनीस *m*, कोठावळ्या *m*, कारभारी *m.* ३ *an official managing a race-meeting, ball, show, &c.* शर्यतीचा व्यवस्थापक. (b) नाचाचा व्यवस्थापक *m.*

**Stew'ardess** *n.* कारभारीण *f.* २ वाकनिशीण *f.*

**Stew'ardship** *n.* कारभाऱ्याचें काम *n.* २ वाकनिशी *f.*

**Sthenic** (sthen'ik) [Gr. *sthenos*, strength.] *a.* मज्जातंतूच्या क्षोभामुळें किंवा रोगस्थानाच्या दाहामुळें झालेला, जोराचा. [S. DISEASES जोराचे रोग *m. pl.* S. INFLAMMATION जोराचा दाह *m.*]

**Stick** (stik) [A. S. *stician*, to pierce.] *v. t. to pierce or thrust into* भोंसकणें, खुपसणें, ढोसणें, टुपणें, टोंचणें, खोवणें. २ *to fasten by piercing* खोंवून -खोंचून ठेवणें, टुपून ठेवणें, घालणें, चढवणें; as, "To S. a feather in a cap." ३ *to cause to adhere* चिकटविणें, डकविणें, लावणें; as, "S. no bill." ४ (with *out, up*) *to cause to project* बाहेर काढणें, पुढें काढणें, लांब करणें; as, "To S. out one's chest." ५ *to provide* (plant) *with a stick as support or to climb up* (-च्या आधाराला) खुंट मारणें -पुरणें. ६ *to set* (type) *in composing* जुळपट्टींत जुळणें, पकडींत किंवा स्टिकमध्यें (टाइप) जुळणें; as, "To S. type."

**Stick** *v. i. to adhere* चिकटणें, डकणें, लागणें, धरणें, बिलगणें; as, "This envelope will not S." २ (with *out*) वर येणें, बाहेर येणें, पुढें येणें; as, "How his stomach *sticks* out!" ३ (जागच्या जागीं) थबकणें, खिळणें, पुढें न सरणें, (-ची) प्रगति न होणें, अडकणें, अडणें, अटकणें, खुंटणें, थकणें, फसणें. [To S. IN THE MUD, *to be unprogressive* (जागच्या जागीं) खिळून राहणें, अडकणें. To S. UP TO (-च्या पुढें) मान न वांकवणें. To S. UP FOR (विशेषतः हजर नसलेल्या मनुष्याची) बाजू *f.* घेणें -उचलणें, (-चें) समर्थन करणें, (-च्या वतीनें) भांडणें. To S. ON A HORSE घोड्यावर मजबूत बसणें. To S. TO (-ला) चिकटून राहणें, न ढळणें. २ चिकाटी धरणें, करीत राहणें. To S. IN OR INDOORS घरांतच बसून राहणें, बाहेर न पडणें. To S. OUT FOR A HIGHER PRICE एकदां बोललेलाच दर घेऊन बसणें. To S. AT NOTHING मागेंपुढें न पाहणें, (-च्या) मनांत शंका न येणें. SOME OF THE MONEY STUCK IN OR TO HIS FINGERS त्यापैकीं थोडासा पैसा त्यानें गिळंकृत केला.] Stuck *pa. t. & pa. p.*

**Stick** *n.* काठी *f,* लकडी *f;*—short and little काटकी *f,* कुटकी *f,* काटूक *n,* शिरपुटी *f,* &c. २ *a staff or walking-stick* हातांत घेण्याची काठी *f,* यष्टि *f,* सोंटा *m,* लठ्ठ *m.* ३ (of an umbrella) दांडी *f,* काठी *f,* दांडा *m.* ४ (for punishing) काठी *f,* वेत *m;* as, "Wants the S. मार हवा आहे, मार दिला पाहिजे." ५ *anything in the form of a stick* कांडी *f;* as, "*Sticks* of wax, soap, sugar-candy, &c." ६ (*in carpentry*) कसणी *f,* खेंचणी *f.* ७ (weaving) काठी *f.* [PICKING STICKS OF A SHUTTLE धोट्याला मारण्याची काठी *f.*]

**Sticker** (stik'ėr) *n.* (*cricket*) *a batsman who scores slowly and is hard to get out* लौकर बाद न होणारा भिडू *m,* चिकट भिडू *m.* २ *a person who stays too long on a visit* फार वेळ बसणारा भेटायास आलेला मनुष्य *m.*

**Sticking plaster** *n.* गम्पलासची पट्टी *f.*

Stick-in-the-mud *a.* *slow, unprogressive* बशा, आळशी, कूपमंडूक, अप्रागतिक, घरीं बसून राहणारा. S. *n.* बशा मनुष्य *m*, आळशी मनुष्य *m*.

Stickle (stik'l) [ Prov. E. *stickle*, to be an umpire.] *v. i. to interpose between combatants* (दोन प्रतिस्पर्ध्यांच्या) मध्यें पडणें, भांडण तोडणें. २ *to contend obstinately* हट्टानें भांडत राहणें, आग्रह *m* -अट *f* -अडती *f* -हट्ट *m*. धरून बसणें, ओढून धरणें, भांडणें.

Stick'ler *n. a second or umpire in a duel* (द्वंद्वयुद्धांतील) प्रतिस्पर्धी *m*. (b) मध्यस्थ. २ *an obstinate contender, esp. for something trifling* क्षुद्र गोष्टीकरितां हेकटपणानें भांडणारा *m*, हेकेखोर *m*, आग्रह धरणारा *m*, अट धरणारा *m*, तकरारी. ३ चिकटून बसणारा *m*, ओढून धरणारा *m*, हट्ट घेऊन बसणारा *m*.

Stick'ling *n.* आग्रह *m*. धरणें *n*, अट *f*. धरणें *n*. २ आग्रह *m*, तकरार *f*, वाद *m*.

Stick'y *a.* चिकट, चिकण, चिकटाऊ, चिकचिकीत, गिजगिजीत. [S. OR CLAMMY MATTER चिकटा *m*, चिकचीक *f*. To BE S. चिकचिकणें.]

Stiff (stif) [A. S. *stif*, stiff.] *a. not easily bent* ताठ, ताठर. २ *thick and viscous* घट्ट व चिकचिकीत. ३ (as a limb) खुडा, खुडकलेला, ताठरलेला, ताठ. ४ (of style, manner, behaviour, &c.) औपचारिक, ताठ्याचा, डौलाचा, आढ्यतेचा, कवायती; as, "A S. reception; A S. bow." ५ *obstinate* कडक, उग्र, हेकेखोर, हट्टी. ६ (of a task) *difficult* कठिण, अवघड, परीक्षेचा; as, "A S. examination." ७ (of wind) *boisterous* जोराचा, सोसाट्याचा. ८ *not working freely* ताठ, घट्ट, अडस; as, "A S. hinge; A S. piston." [STIFF-NECKED हट्टी, हेकेखोर. TO KEEP A S. UPPER LIP, *to show firmness of character* करारीपणा दाखविणें, निश्चय दाखविणें. S. MARKET (भाव जसेच्या तसे असल्याचा) कडकलेला बाजार. S. PRICE कडक भाव *m*.] Stiff'ly *adv.* ताठपणानें, कडकपणानें, डौलानें, जोरानें, &c.

Stif'fen *v. t. to make less pliant* ताठ करणें, ताठर करणें. २ *to thicken* घट्ट करणें, कडक -खडखडीत करणें. S. *v. i. to become less flexible* ताठणें, ताठरणें, ताठर होणें -होत जाणें. २ *to become hard* कडक होणें -होत जाणें. ३ (as a limb) खुडकणें, ताठणें, खुडा होणें.

Stif'fened *pa. t. & pa. p.* Stiffening *pr. p.* of Stiff.

Stif'fener *n.* ताठ करणारा *m*.

Stif'fener, Stiff'ening *n.* ताठ करण्याकरितां घातलेला कपडा (क्यान्व्हास वगैरे).

Stiff-joint *n.* (*med.*) संधिस्तंभ *m*, (सांध्याच्या विकारानें) सांध्याची हालचाल बंद होणें *n*, सांधे ताठ होणें.

Stiff-neck *n.* मान वांकडी होऊन हालवितां न येणें, मान ताठणें *n*, मन्यास्तम्भ *m*.

Stiff'ness *n.* ताठपणा *m*, ताठरपणा *m*, ताठा *m*. २ कडकपणा *m*. ३ औपचारिकपणा *m*, कवायतीपणा *m*.

Stifle (sti'fl) [Origin uncertain.] *n.* घोड्याचा पुठ्याखालील पुढें आलेला भाग *m*. २ घोड्याचा गुडघी रोग *m*.

Stifle ( stī'fl ) [Ic. *stifla*, to repress.] *v. t. to smother, to choke* दम कोंडणें, श्वास *m*. कोंडणें, दम *m*. कोंडून मारणें, कोंडमार *m* -कोंडमारा *m*. करणें *g. of o*. २ ( *fig.* ) *to repress* दाबणें, दाबून टाकणें; as, "To S. a passion." ३ *to deaden* ( sound ) दाबून टाकणें, नाहींसा करणें; as, "To S. the voice of conscience."

Stigma ( stig-ma ) [Fr. -L. -Gr. *stigma*, a prick.] *n. a stain on one's character* कालिमा *m*, कलंक *m*, लांछन *n*, डाग *m*, काळें *n*, दूषण *n*, ठपका *m*. २ *a spot on the skin* डाग *m*, लासें *n*. ३ ( *bot.* ) *the top of the pistil of a flower* सूद *f*, पुष्पयोनि *f*, नलिकाग्र, स्त्रीकेसराग्र. ४ *a breathing-pore* (of an insect) श्वासरंध्र *n*. ५ *(pl.) marks like those on Christ's crucified body* (क्रुसावर मारलेल्या ख्रिस्ताच्या हातापायांवरील व डोक्यांतील खिळ्यांच्या) खुणा *f. pl*. Stig'mas, Stig'mata *pl.*

Stigmat'ic *a. marked or branded with a stigma* डाग असलेला. २ *giving infamy or reproach* दूषणीय, कालिमा आणणारा. ३ (*bot.*) सुदेचा, स्त्रीकेसराग्राचा. [S. FLUID सूदरस *m*, स्त्रीकेसराग्ररस *m*.]

Stig'matise *v. t. to denounce, to apply terms of disgrace to* कालिमा लावणें, कलंक -लांछन लावणें, ठपका *m*. ठेवणें, नांव ठेवणें.

Stile ( stīl ) [A. S. *stigel*, a step.] *n. a step or steps for climbing over a wall or fence* पायरी *f*, पायऱ्या *f. pl*., आंगर *n*.

Stile ( stīl ) [Same as Style.] *n.* (*of a dial*) शंकु *m*.

Stilette ( stilet' ) [L. *stilus*, stake.] *n.* ( *med.*) मूत्र काढण्याच्या नळींत ताठपणाकरितां घातलेली तार *f*.

Stiletto ( sti-let'ō ) [It. dim. of *stilo*, a dagger.] *n*. जंब्या *m*. Stilett'os *pl.*

Still ( stil ) [A. S. *stille*, fixed, firm.] *a. quiet, silent* निवांत, शांत, निःशब्द, सामसुमीचा, गलबलीवांचूनचा. [S. SMALL VOICE सदसद्विवेकबुद्धि *f*, अन्तःकरण *n*.] २ *motionless* स्थिर, निश्चल, अचल. ३ *subdued* निर्वात, शांत, अक्षुब्ध. ४ ( a place) निवांत, निरुपद्रव, निष्कंटक. ५ *not effervescing* फेंस जिरलेला, फेंस न येणारा, बिनफेंसाचा; as, "S. wines."

Still *adv.* ( *archaic.*) नेहमीं, सतत. २ *till now* अजून, आजपर्यंत, आजपावेतों, आजवर, अद्याप, अद्यापि. ३ *nevertheless* तरी, तथापि, तत्रापि, तदपि, तत्राप. ४ *in increasing degree* ( much used with comparatives ) आणखी, अधिक.

Still *n. deep silence* शांतता *f*, सामसूम *n*.

Still ( stil ) *v. t. to stop the noise of* चुप करणें, गप करणें, बोलणें *n* -बडबड *f* -शब्द *m*. बंद करणें, उगा राहविणें. २ *to stop the motion of* स्थिर करणें, निश्चल करणें, स्थिरावणें, थीरथावर *f*. करणें. ३ *to appease* शांत करणें, संथावणें, शमविणें, सांत्वन करणें, थंडा करणें. S. *v. i.* शांत होणें, थंडें होणें.

Still (stil) [L. *stillare*, to drip -*stilla*, a drop.] *v. t. to cause to fall by drops, to distil* थेंबथेंब गाळणें, भट्टींतून गाळणें, गाळणें.

Still *n. an apparatus for distilling liquids* दारू वगैरे गाळण्याचें यंत्र *n*, भवकारा *m*, ऊर्ध्वपातनयंत्र *n*.

Still-birth *n*. मूल मेलेलें जन्मणें *n*.

Still-body *n*. ऊर्ध्वपातनाचा तापक *m*.

Still-born *a*. पोटांतच मेलेला, मेलेलेंच जन्मास आलेलें [(मूल).

Still-head *n*. ऊर्ध्वपातनाचें डोकें *n*, ऊर्ध्वपातनशीर्ष *n*.

Still-life *n*. (फळें, टेबलें, &c.) निर्जीव वस्तूंचीं चित्रें *n. pl*.

Still-room *n*. दारू, लोणचीं वगैरे ठेवण्याची खोली. (b) चहा, कॉफी वगैरे तयार करण्याची खोली *f*.

Stilt (stilt) [Swedish *stylta*, a prop.] *n*. (*used in walking*) घोडा *m*, घोडेकाठी *f*.

Stilt'ed *a*. (of style or manner) *affectedly pompous, wanting in ease and naturalness* शब्दावडंबराचा, अवडंबराचा, कृत्रिम, डौलाचा, सजवलेला.

Stimulant (stim'ū-lant) [L. *stimulus*, a goad.] *n. a stimulating drug* उत्तेजक औषध *n*. [ALCOHOLIC S. मद्यार्कविशिष्ट उत्तेजक. SPECIAL S. विशिष्ट इंद्रियांस उत्तेजन देणारें औषध, विशिष्ट उत्तेजक.] २ उत्साहवर्धक गोष्ट *f*, चैतन्योत्पादक गोष्ट *f*. ३ *an alcoholic beverage* मादक पेय *n*; as, "Never takes *stimulants*." S. *a*. (in medicine) *stimulating* उत्तेजक (औषध).

Stimulate (stim'ū-lāt) [L. *stimulus*, a goad.] *v. t. to rouse to action* चेतवणें, प्रोत्साहन देणें, उत्तेजित करणें, प्रवृत्त करणें. २ (in medicine) चेतना *f*. वाढवणें, चेतनावृद्धि *f*. करणें *g. of o*.

Stim'ulated *pa. p*. उत्तेजित, चेतवलेला, प्रोत्साहित.

Stim'ulating *a*. चेतवणारा, प्रोत्साहन देणारा. २ (*med*.) उत्तेजक. [S. properties उत्तेजक धर्म.]

Stimula'tion *n*. चेतवणें *n*, उत्तेजन देणें *n*, प्रोत्साहन *n*. २ (*bot*.) उत्तेजन *n*. ३ चेतनावर्धन *n*, उत्तेजन *n*.

Stimulative (stim'ū-lāt-iv) *a. of stimulating effect* उत्तेजक, चेतनावर्धक. S. *n*. उत्तेजक औषध *n*, उत्तेजक द्रव्य *n*.

Stimulus (stim'ū-lus) [L.] *n. that which spurs to action* उत्साहवर्धक (गोष्ट) *f*, उत्तेजक (कृत्य), प्रोत्साहक. २ (*physiol*.) *thing that evokes functional reaction in tissues* उत्तेजक. Stimuli *pl*.

Sting (sting) [A. S. *stingan*, to sting.] *v. t. to pierce with a sting* नांगी *f*. मारणें, डसणें, चावणें, दंश करणें.—fiercely and eagerly as mosquitoes, gnats, &c. चणचण तोडणें, -चणचणा तोडणें. २ (as conscience, &c.) खाणें, टोंचणें, खुपणें, चुरचूर *m* -खवखव *f*. लागणें *in. con*. ३ (as speech) लागणें, झोंबणें. ४ (as peppers) लागणें, झोंबणें, सिरसिरणें, खवखवणें, खाजणें. ५ (a scorpion) चावणें, फणकावणें, ठणकावणें, झणकारा *m*. मारणें. S. *v. i. to feel acute pain* दुखणें, वेदना होणें; as, "My hand *stings*." २

*to be able to sting, to have a sting* चावणें, दंश करणें, नांगी मारूं शकणें, नांगी असणें; as, "Some bees do not S." Stung *pa. t.* & *pa. p.*

Sting *n.* नांगी *f*, कांटा *m*, नांगा *m*. २ *the thrust of a sting into the flesh* दंश *m*. [THE BURNING FROM A SCORPION'S S. फणफण *f*, फणका *m*, फणकारा *m*; *intes.* फणफणाट *m*, झणझणाट *m*.] ३ गांध *f*. ४ दंशापासून होणाऱ्या वेदना *f*, फणफण *f*. ५ मर्म *n*, मर्मस्थल *n*, मखी *f*, खोंच *f*, खुबी *f*, मेख *f*. ६ (of plants) *a hair secreting a poison* विषारी कांटा.

Stin'gily *adv.* कंजूषपणानें, कृपणपणानें, लोभटपणानें.

Stin'giness *n.* कंजूषपणा *m*, लोभटपणा *m*, कृपणपणा *m*.

Sting'ing *a. painful* दुःखकारक, वेदना उत्पन्न करणारा. २ *sharp* तीव्र, असह्य, झोंबणारा, लागणारा; as, "S. cold, S. rebuke."

Sting'less *a.* नांगी नसलेला.

Stingy ( stin'ji ) [Of doubtful origin.] *a. niggardly, avaricious* कंजूष, कृपण, लोभट, लोभी, कद्रु.

Stink ( stink ) [A. S. *stincan*; Ger. *stinken*, to smell.] *v. i. to smell very offensively* घाण *f* -वास *m*. येणें, वास मारणें, घाणवणें, घाणणें, वासट असणें. २ *to have a bad reputation* कानफाटें नांव असणें. S. *n. bad smell* घाण *f*, दुर्गंध *m*, दुर्गंधी *f*, पूतिगंध *m*. [INTENSE OR EXCEEDING S. अष्टघाण *f*.] Stank, Stunk *pa. t.* Stunk *pa. p.* Stink'ing *pr. p.*

Stint ( stint ) [A. S. *styntan*, to dull.] *v. t. to keep on short allowance* मोजला देणें, मोजलेला देणें, मोताद *f* -मर्यादा &c. करणें -ठेवणें, आळा *m* -आळाबांधा करून देणें -घालणें, मोतादीवर -प्रमाणावर ठेवणें -राखणें; as, "To S. a person in food." २ *to supply or give in niggardly amount* हात आंखडून देणें, कष्टानें देणें, जेमतेम देणें, सरासरी पुरेइतका देणें, पोट बांधणें, उपासमार *m*. करणें, फांके *m. pl.* पाडणें; as, "To S. food, money, service, &c." S. *n. limitation of supply or effort* मोताद *f*, इयत्ता *f*, आळा *m*, आळाबांधा *m*, मर्यादा *f*, मोजमाप *n*; as, "Laboured without S." २ *quantity assigned or allowed* मोजकें माप *n*. Stint'ed *pa. t.* and *pa. p.* Stint'ing *pr. p.* S. *v. n.* मोतादीवर राखणें *n*, मोजला देणें *n*. २ पोट बांधणें *n*, उपासमार *m*, उपासमारा *m*.

Stipend ( sti'pend ) [ L. *stipendium*, *-stips*, a donation, and *pendere*, to weigh out. ] *n. a salary* वेतन *n*, मुशारा *m*, मुशाहिरा *m*, पगार *m*.

Stipen'diary *a.* पगारी, वेतनी, पगार *m* -वेतन *n*. मिळणारा. S. *n.* पगार मिळणारा *m*, पगार घेऊन काम करणारा *m*. २ *a paid magistrate*( in large towns ) पगारी ( ऑनररी नव्हे ) म्याजिस्ट्रेट *m*.

Stipulate ( stip'ū-lāt ) [ Fr. -L. *stipulus*, firm. ] *v. i. to contract* ठराव करणें, करार *m*. करणें, बोली करणें. S. *v. t. to agree on certain terms* ( कांहीं ) अटींवर कबूल होणें, अटी घालणें, अटी करणें. Stipulated *pa. t.* and *pa. p.* Stip'ulating *pr. p.* Stipula'-

tion *n.* बोली *f.* करणें *n*, ठराव *m.* करणें *n.* २ *agreement* बोली *f*, ठराव, करार. ३ ( law ) शर्त *f*, अट *f*.

Stipulation, See under Stipulate.

Stip'ulator *n.* ठराव करणारा *m*, करार करणारा *m*.

Stipule ( stip'-ūl ) [ L. *stipula*, a stalk.] *n.* ( bot.) उपपर्ण *n*, वृन्तपर्ण *n.* [ BRACT = पुष्पोपांगपर्ण, *or* पुष्पोपांगपत्र, *or* उपांगपत्र, *or* उपपत्र. ADNATE S. संलग्न उ०. AXILLARY S. कक्षागत उ०. FREE *or* CAULINARY S. सुटा किंवा मोकळा उ०. OCHREATED S. परिवेष्टक उ०. OPPOSITE S. संमुख उ०. PETIOLAR S. वृन्तीय उ०. SYNOCREATE S. संमुखवेष्टक उ०. उ० = उपपर्ण.]

Stip'uliform *a.* उपपर्णाकार, उपपर्णाकृति.

Stir ( stėr ) [ A. S. *styrian*, to drive.] *v. t. to move* सरकविणें, हालवणें, चालवणें, सारणें. २ ( *about* or *up*, as to mix or separate ) कालवणें, ढवळणें, घोळणें; as, " To S. up rice." ३ *to rouse, to incite* चेतवणें, चिथवणें, उठवणें, भडकवणें, बहकवणें, उत्तेजन *n.* देणें *g. of o.*; as, "To S. up strife, mutiny, &c.' S. *v. i. to move* हालणें, सरकणें, सरणें, चालणें, हालचाल *f.* करणें, चिडमिडणें, चिडमीड *adv.* करणें, फिरकणें; as, "If you S. I shoot." २ *to be in motion* चालणें, खेळणें, चालता असणें -होणें; as, "Not *stirring* yet."

Stir *n. disturbance, excitement* हालचाल *f*, गडबड *f*, धांदल *f*, धामधूम *f*. २ *slightest movement* यत्किंचित् हालचाल *f*; as, " Not a S."

Stirred *pa. t.* S. *pa. p.* हालवलेला, हालवून सोडलेला. २ ढवळलेला. ३ चेतवलेला, चिथवलेला, उठवलेला.

Stir'ring *pr. p. a. full of business or excitement* हालवून सोडणारा, खळबळ उडवून देणारा, चळवळीचा; as, " S. events; S. speech."

Stir'rup *n.* रिकिब *f*, रिकिबी *f*, रिकेबी *f*.

Stirrup-leather *n.* रिकिबवादी *f*.

Stitch ( stich ) [ A. S. *stice*, a prick.] *v. t. to sew* शिवणें, दोरा घालणें, टांका घालणें-मारणें. २ *to do needle-work* शिवणकाम करणें. S. *n.* टांका *m*, शिवण *f*. [ DOUBLE S. टीपदोरा *m*. RUNNING S. उभा दोरा, धांवता दोरा *m*, धांवदोरा *m*.] २ *a bit of clothing* चिंधी *f*, चिंधूक *n.* ३ *a pain in the side* उसण *f*, कचक *f*, पार्श्वशूल *m.* ४ ( *in ploughing* ) *the space between furrows* तास *m*. [ नकशीचें शिवणकाम *n.*

Stitch'ery *n. ornamental needle-work* कशिदा *m*,

Stithy ( stith'i ) [Of Icelandic origin. ] *n. a blacksmith's shop* लोहाराची शाळा *f*, लोहाराचें दुकान *n.* २ *an anvil* ऐरण *f*.

Stock ( stok ) [ A. S. *stocc*, a stick.] *n. stem* स्कंध *m*, कांड *n*, खोड *n*, सोट *m.* २ *stump* खुंट *m*, बुंठण *n.* ३ *a holder, a handle* दांडा *m.* ४ *the butt-end of a gun* दस्ता *m*, कुंदा *m.* ५ *the cross-bar of an anchor* नांगराचा दांडा *m.* ६ *family* घराणें *n*, वंश *m*, मूळवंश *m*, अन्वय *m.* ७ *breed* ताणा *m*, बिजवट *n.* [OF A GOOD S. ( A HORNED BEAST ) थडीचा, थळीचा, खाणीचा. ] ८ *property* मालमत्ता *f*, पैसाअडका *m.* ९

*wealth in cattle* **गोधन** *n*, **पशुधन** *n*, **गुरेंढोरें** *n. pl.* [S.-BREEDER, S.-FARMER गुरांढोरांची पैदास करणारा *m.* LIVE S. गुरेंढोरें *n. pl.* DEAD S. शेतकीचीं आउतें वगैरे. S.-MAN गुराखी *m*, राखणा *m.*] १० *store ready for drawing on* **( मालाचा किंवा विक्रीच्या वस्तूंचा ) सांठा** *m*, **बेगमी** *f.* [TO HAVE IN S. सांठा *m.* असणें, शिलकींत असणें. S. ARGUMENT नेहमींचा -खिशांतील मुद्दा.] ११ *equipment for trade* **( धंद्याला लागणारें ) साहित्य** *n*, **सामान** *n*, **सामानसुमान** *n.* [S.-IN-TRADE धंद्याला लागणाऱ्या आवश्यक वस्तू *f. pl.* ROLLING S. आगगाडीचे डबे, इंजनें वगैरे. TO TAKE S. मालाची यादी *f.* करणें. TO TAKE S. OF (*fig.*) ( शील किंवा स्वभाव ताडण्याकरितां ) बारकाईनें पहाणें.] १२ *capital contributed by individuals and divided into shares* **ठेव** *f*, **( भाग काढून जमविलेलें ) भांडवल** *n.* [ PRIVATE S. घरचें भांडवल *n*, पदरचा पैसा *m.* SCANTY OR SMALL S. तुटपुंजें भांडवल *n*, तुटपुंजी *f.* COMMON S. समाईक भांडवल *n*, गणद्रव्य *n.* S. ACCOUNT ( सबंध ) भांडवलाचा जमाखर्च *m.* TO LIVE UPON ONE'S S. पदर *m.* खर्चणें -खाणें, पदर *m.* मोडणें. ] १३ *shares in a financial company or in national or municipal debt* **( कंपनीचे ) विकत घेतलेले भाग** *m. pl.*, **रोखे** *m. pl.*, **सरकारी रोखे** *m. pl.* [S. EXCHANGE (सरकारी रोखे विकण्याचा) सराफकट्टा *m.* २ रोख्यांचा व्यवहार करणाऱ्या दलालांची संस्था *f.* S. -BROKER रोखे विकणारा *m*, रोख्यांचा दलाल *m.* S. -JOBBER रोख्यांचे सट्टे करणारा *m.* S. -MARKET सराफकट्टा *m.* २ सराफकट्ट्यावर झालेले व्यवहार *m. pl.* ३ गुरांचा बाजार *m.*] १४ ( *pl.* ) ( for the legs ) **खोडा** *m.* १५ *the support of a ship during construction* **ढिरा** *m*, **शिपाई** *m.* १६ *a person who has little sense* **धुंभ** *m*, **दगड** *m.* [S.S AND STONES निर्जीव वस्तु *f. pl.* २ सुस्त माणसें *n. pl.*]

Stock *a. kept for sale or use* **विक्रीकरितां ठेवलेला, खासगी उपयोगाकरितां ठेवलेला.** २ *of long standing* **जुना, कसलेला, रुळलेला;** as, "A S. actor." ३ *common-place* **नेहमींचा, ठराविक;** as, "A S. sermon."

Stock *v. t. to store* **( -ची ) बेगमी करणें, भरून ठेवणें, सांठा करणें.** २ *to keep for sale* **विक्रीकरितां ठेवणें, संग्रहीं ठेवणें.** ३ *to provide with stock* **( -चा ) भरणा करणें, आवश्यक गोष्टींचा पुरवठा करणें;** as, "A well-*stocked* larder, library, &c." ४ *to fit a gun with a stock* **दस्ता बसवणें.**

Stockade ( stok-ād' ) [ Fr. *estocade* -*estoc* -Ger. *stock*, a stick. ] *n.* **मेढेकोट** *m*, **लकडकोट** *m.* S. *v. t. to surround or fortify with a stockade* **मेढेकोट** *m.* **करणें, लकडकोट** *m.* **करणें.**

Stock-broker, See under Stock.

Stock-exchange, See under Stock.

Stock-holder *n.* **सरकारी रोखे विकत घेतलेला** *m.*

Stocking ( stok'ing ) [ Of doubtful origin. Probably a cover for the *stocks* or stump.] *n.* **पायमोजा** *m*, **इस्टाकीण** *f.*

ock'-still *a. still as a stock or post* गपचिप, चूप, काष्ठवत्, थंड, निश्चल; as, "His whole work stands S." [ To SIT S. देवासारखा बसणें, चित्रासारखा बसणें. ]
oic (sto'ik) [L. -Gr. *Stoikos -stoa*, a porch or colonnade ( where zeno taught ).] *n.* झेनोचा अनुयायी *m*, स्टोइक *m*. (झेनो: ग्रीकतत्त्ववेत्ता. खिस्ती शकापूर्वी ३४२-२७० ). सुखदुःखाविषयीं पूर्णपणें उदासीन राहून प्रत्येकानें सद्धर्माचरणार्थ झटावें ही त्याची मुख्य शिकवण होती. २ *one who bears suffering without show of feeling or complaining* आनंदानें दुःख भोगणारा *m*, सुखदुःखाविषयीं अनुद्विग्न, सुखदुःखाविषयीं पूर्णपणें उदास *m*, स्टोईक *m*.
o'ic, Sto'ical *a.* स्टोइक पंथाचा, स्टोइकपंथासंबंधीं. २ *not affected by passion* (सुखदुःखाविषयीं उदासीन राहून ) निर्विकार, विकाररहित.
o'ically *adv.* स्टोइकाप्रमाणें, (सुखदुःखाविषयीं पूर्णपणें) उदास राहून, धैर्यानें, अनुद्विग्न मनानें.
o'icism *n. the doctrines of the Stoics* स्टोइकपंथाचीं मतें *n. pl.*, उदासीनतावाद. २ *fortitude* धैर्य *n.* ३ *patient endurance* (सुखदुःखाविषयीं पूर्ण) उदासीनता *f*, विकाराराहित्य *n*, अविकार *m*.
oke (stōk) [Dut. *stoken.*] *v. i. to stick, stir, or tend a fire* निखारे सारखे करणें. २ निखारे हालवणें. ३ कोळसा (आंत) टाकणें.
ok'er *n.* कोळसे मारणारा *m*.
ole *pa. t.* of Steal, *q. v.*
ole (stōl) [L.-Gr. *stole*, a robe.] *n.* बिशपांनीं व प्रीस्टांनीं खांद्यावर घेण्याचें उपवस्त्र *n*, स्टोल *m*. २ *a loose robe* सैल झगा *m*, पोकळ झगा *m*.
ol'en (*pa. p.* of Steal) *a.* चोरलेला, चोरून नेलेला, चोरींव, चोरीचा.
olid (stol'id) [ L. *stolidus*, firm. ] *a. dull, stupid* मठ्ठ, ठोंबा, सूर्ख, दगड.
olid'ity *n.* मठ्ठपणा *m*, बुद्धीची मंदता *f*, मूर्खपणा *m*.
olon (stō'lon) [L. *stolo*, a twig.] *n.* (bot.) गुल्मिनी. ही एक देंठाचा प्रकार आहे. ही एक प्रकारचा ताणा आहे. ही ऊर्ध्वगति पावून पुन्हां जमिनीस मिळते, व तेथें तीस मुळें फुटतात, व पुन्हां ती ऊर्ध्व होते.
oma (stō'mȧ) [Gr. *stoma, -atos*, a mouth.] *n.* (*anat.*) रंध्र *n.* २ (*bot.*) मुख *n*, रंध्र *n*, त्वग्रंध्र *n*.
omach (stum'ak) [Fr. -L. -Gr. *stomachos*, the gullet.) *n.* पोट *n*, कोठा *m*;—strictly जठर *n*, आमाशय *m*, अन्नाशय *m*. [CARIDAC END OF S. आमाशयाचें हृदयाकडचें द्वार *n*. CLEARING OR CLEAREDNESS OF S. AND BOWELS कोठ्याची शुद्धि *f*, कोष्ठशुद्धि *f*. PIT OF THE S. मणिपूर *n*. WEIGHT IN THE S. (as of food) दबका. WITH OR UPON AN EMPTY S. रिकाम्या पोटीं, अनशवे पोटीं. A FULL STOMACH LOATHES THE HONEY-COMB CF. भरले पोटा उंबर कडू. ] २ (in animals) कोठा *m*, जठर *n*. [FIRST S. प्रथम जठर *n*, पहिला कोठा *m*. SECOND S. द्वितीय जठर *n*, दुसरा कोठा

*m*. THIRD S. तृतीय जठर *n*, तिसरा कोठा *m*. FOURTH S. चतुर्थ जठर *n*, चवथा कोठा *m*.] ३ *appetite for* (food, &c.) भूक *f*, अन्नेच्छा *f*. ४ *inclination, spirit* प्रवृत्ति *f*, कल *m*, उत्साह *m*, जोम *m*; as, "Had no S. for the fight." [PROUD OR HIGH S. *haughtiness* ताठपणा *m*, गर्विष्ठपणा *m*, उर्मटपणा *m*. S. ACHE पोटांत दुखणें, पोटदुखी *f*, पोटशूळ *m*. S. PUMP पोटांतून विषारी पदार्थ किंवा नासलेलें अन्न काढण्याचा पंप *m*. S. TUBE कोठा धुण्याकरितां घशांतून घालण्याची नळी *f*.]

Stom'ach *v. t. to eat with relish* रुचीनें खाणें, चवीनें खाणें, चव *f*-रुचि *f*. लागणें, तोंडाला गोड लागणें. २ (*fig.* usually with a negative) *to suffer patiently* (a wrong, insult, &c.) पोटांत घालणें, सहन करणें, खपणें, सोसणें; as, "Cannot S. it."

Stomach'ic *a*. कोठ्याचा, जठराचा. २ *stimulating the stomach* पाचक, पचनक्रिया वाढविणारा, भूक वाढविणारा, जठराग्नि प्रज्वलित करणारा. S. *n*. पचनक्रिया वाढविणारें औषध, अग्निमांद्यावर औषध *n*, पाचक *n*.

Stomati'tis *n*. अन्नपचन न झाल्यामुळें तोंडांतील पिच्छात्वचेचा दाह होणें *n*, मुखपाक *m*. Stomatitis has nothing to do with Stomach. Here Greek *stoma* means mouth.

Stone (stōn) [A. S. *stan*.] *n*. धोंडा *m*, दगड *m*, खडा *m*. [TO GIVE A S. FOR BREAD मदत दिल्याचें नांव करणें, मदतीची थट्टा करणें. TO MARK WITH A WHITE S. आनंदाचा दिवस म्हणून लिहून ठेवणें. TO LEAVE NO STONE UNTURNED चहूंकडे दगड मारून पहाणें, प्रयत्नाची शिकस्त *f*. करणें. TO BREAK STONES खडी फोडणें. TO CAST *or* THROW STONES *or* A STONE AT (-ची) निंदा *f*. करणें, (-वर) दोषारोप करणें. THOSE WHO LIVE IN GLASS-HOUSES SHOULD NOT THROW STONES AT OTHERS आपण लागून बोललों कीं दुसरा टोमणा मारतोच.] २ *a precious stone* रत्न *n*, मणि *m*, माणिक्य *n*. ३ (for building) मोठा धोंडा *m*, दगड *m*, पाषाण *m*. [BLACK S. काळवथर *m*, काळेथर दगड *m*. (A BUILDING) OF HEWN STONES चिरेबंदी. EFFLORESCENCE (THROUGH MOISTURE) FROM S. दगडफूल *n*. FOUNDATION S. पायाचा दगड *m*. CORNER S. कोणशिला *f*. HEWN AND SHAPED S. चिरा *m*. HUGE S. OR MASS OF S. धोंड *f*. LARGE, FLAT SMOOTH S. (*to wash clothes on, to sit on*, &c.) पाथर *f*. PHILOSOPHERS' S. परीस *m*. ROUND, ROLLING S. गडगडा धोंडा *m*, गुंडा *m*. SMOOTH, ROUNDISH S. गोटा *m*, गोटी *f*. S. FOR GRINDING KNIVES, &c. साहाण *f*, निष्णा *m*. S. SMOOTHED ON ONE SIDE तोड *f*. S. VESSEL, S. TROUGH दगडी *f*. STRIKING OF THE FOOT AGAINST A S. ठेंच *f*. THIN AND FLAT PIECE OF S. चीप *f*. HAS A HEART OF S. पाषाणहृदयी आहे. THE S. AGE पाषाणयुग *n*, दगडाचीं भांडींकुंडीं व हत्यारेंपातारें असलेल्या स्थितीचा काळ *m*.] ४ *a monumental tablet* स्मारकशिला *f*. ५ *the kernel of some fruits* आठीळ *f*, अठळी *f*, अठी *f*, अष्टि *f*, कोय *f*, बांठा *m*, बांठी *f*. ६

*concretion in the kidney or bladder* मुतखडा *m*, अश्मरी *f*, सिकता *f*. ७ अंड *m*, *pop.* आंड *m*, कोय *m*. ८ चौदा पौंडांचें वजन *n*, स्टोन *n*.

Stone *v. t. to pelt with stones* दगड *m. pl.* मारणें, धोंडे *m. pl.* मारणें, धोंडेमार *m* -दगडमार *m*. करणें. २ *to free* (fruit) *from stones* आठळ्या *f. pl.* काढणें, कोया *f. pl.* काढणें. ३ *to pave with stones* लाद्या *f. pl.* मारणें -बसविणें, फरशी *f.* करणें, दगडांनीं बांधणें, as, "To S. a well." ४ *to rub, to scour, with a stone* दगडानें घांसणें, दगडानें साफ करणें.

Stone-axe *n.* पिकिंदर *m*.

Stone-blind *a.* अगदीं आंधळा, ठार आंधळा.

Stone-breaker *n.* खडी फोडण्याचें यंत्र *n*.

Stone-cutter *n.* धोंडफोड्या *m*, पाथरवट *m*. २ दगड कापण्याचें यंत्र *n*. [Chisel of a stone-cutter टंक *m*, टांकी *f*. Splitting implement of a stone-cutter सुतकी *f*, सुंबा *m*, ढोंकण *f. n.*]

Stone-cutting *n.* दगड कापणें *n*. २ दगड घडणें *n*, पाथरवटाचें काम *n*, पाथरवटकाम, दगड फोडणें *n*.

Stone-deaf *a.* पुरापुरा बहिरा.

Stone-digger *n.* बेलदार *m*.

Stone-fruit *n.* अठळी किंवा कोय असलेलें फळ *n*.

Stone-hearted *a.* पाषाणहृदयी, निर्दय, निष्ठुर, सांग.

Stone-horse *n.* वळू *m*, सुरू *m*, आंडील घोडा *m*.

Stone-mason *n.* पाथरवट *m*, गंवडी *m*.

Stone-masonry *n.* दगडाचें बांधकाम *n*.

Stone-pecker *n.* (-the bird) पाथरफोड *m*, पाथरवट *m*.

Stone-pit *n.* दगडाची खाण *f*, चिऱ्यांची खाण *f*.

Stone-plover *n.* तणमोर *m*.

Stone-'ware *n.* हलक्या जातीचीं चिनी भांडीं *n. pl.* हीं कठिण असतात, व यांवर ठोकलें असतां दगडासारखा यांतून आवाज निघतो, म्हणून यांस Stone-ware असें म्हणतात.

Stone'-work *n.* दगडी बांधकाम *n*. [Coursed Stone-work थरांचें दगडी बांधकाम. Dressed Stone-work घडीव दगडांचें बांधकाम.]

Ston'ily *adv.* निष्ठुरपणानें, निर्दयपणानें.

Stoni'ness *n.* निष्ठुरपणा *m*, निर्दयपणा *m*.

Sto'ny *a.* दगडाचा, दगडी, पाषाणमय. २ *like a stone* दगडासारखा, कठिण. ३ *abounding in stones* दगडाचा, दगडाळ, पाषाणप्रचुर, धोंडाळ, खडकाळ. ४ *inflexiable, cruel* निष्ठुर, पाषाणसदृश, बनलेला.

Stood *pa. t.* and *pa. p.* of Stand.

Stook (stōōk) [Low Ger. *stuke*, a heap.] *n. sheaves of corn put up together in a field to dry* वाळत घातलेल्या कवळ्या *f. pl.*

Stool (stōōl) [A. S. *stol.*] *n. a seat without a back* स्टूल *n*. मोडा, चवई, तिवई are some of the varieties of a stool. [To fall between two S.s दोन डगरींवर हात ठेवल्यामुळें फसणें. *cf.* दोहों घरचा पाहुणा

उपाशीं.] २ शौचाचें स्टूल n. [To GO TO S. शौचाला जाणें.] ३ शौचाला बसणें n. ४ शौच m, विष्ठा f. (b) ढाळ m. [LOOSE S. बुळकांडी f, बुळकी f, भसरें n. SCANTY AND SUDDEN S. पिळकी f.] ५ *root or stump of a plant from which shoots spring* मुळवा m, खुंट m. S. *v. i. to throw up shoots from a root* फुटणें, धुमारे फुटणें. २ *to go to stool* शौचाला जाणें, शौचाला बसणें.

Stoop (stōōp) [A. S. *stupian.*] *v. i. to bend down* ओणवणें, ओणवा होणें, लवणें, नमणें, झुकणें, कोंक n, पोंक n. &c., वळणें g. of s. [To S. IN ONE'S WALK ओणव्यानें चालणें.] (b) वांकत चालणें. २ *to submit, to yield* वांकणें, नमणें, लवणें, दबणें, वश होणें, हार जाणें, हार f. खाणें. ३ *to deign, or condescend to do* मोठेपणा m. अभिमान सोडणें, खालच्या पायरीवर येणें. ४ (of hawk, &c.) *to swoop, to pounce* झडप घालणें, झेंप घालणें, झडपणें, झेंपावणें. S. *v. t. to incline* (head, neck, shoulders, back &c.) *forward and down* वांकवणें, लववणें, नमवणें. S. *n. stooping carriage of body* ओणवणें n, वांकत चालणें n.

Stoop, Stoep (stōōp) [Dut. *stoep.*] *n. front steps* पुढल्या पायऱ्या, तोंडच्या पायऱ्या. २ *a porch* द्वारमंडप m. ३ *a verandah* ओटी f, ग्यालरी f.

Stop (stop) [A. S. *stoppian*, to stop up.] *v. t. to stuff or close up* बंद करणें, थांबवणें, बांधणें, बुजणें, बुजवणें, चोंदणें; as, "To S. a leak." [To S. ONE'S EARS (ऐकूं येऊं नये म्हणून) कानांत बोटें घालणें. २ (*fig.*) *to refuse to listen* ऐकण्याचें नाकारणें. To S. A TOOTH बांधणें, पक्का करणें. To S. A WOUND रक्त (वाहण्याचें) बंद करणें. To S. ONE'S MOUTH (लांच देऊन -चें) तोंड बंद करणें, (-चें) तोंड बांधणें. To S. A GAP (तात्कालिक) गरज भागवणें, (तात्कालिक) गरज करणें.] २ *to render impossible* बंद करणें, रोधणें, रोखणें. [To S. THE WAY अडथळा करणें, अडचण उपस्थित करणें -काढणें.] ३ *to hinder, to intercept* थांबवणें, अटकावणें, अटकवणें, अडकवणें, अडवणें, खुंटवणें, रोखणें, अटकाव m -अडथळा m -अवरोध m -प्रतिबंध करणें g. of o., मोडती f -मोडा m. घालणें, मेख f. मारणें, पाचर f. मारणें; as, "To S. progress." [To S. BLOW WITH ONE'S HEAD (*facet.*) ठोसा खाणें. To S. ONE'S BREATH गळा दाबून मारणें, गळा दाबून जीव घेणें. To S. A FACTORY कारखाना बंद करणें.] ४ *to restrain* आवरणें, थांबवणें, उभा करणें, रोकणें, (-चा) गतिस्तंभ m. करणें. ५ *to cut off, to suspend* कापणें, बंद करणें, तकूब करणें, (ची) तकुबी f -महकुबी f. करणें; as, "Shall S. your wages, holidays, &c." [To S. PAYMENT OR A CHEQUE पैसे देऊं नये म्हणून ब्यांकेला कळविणें -वर्दी देणें. To S. PAYMENT दिवाळें काढणें.] ६ *to punctuate* विराम देणें, विरामचिन्हें करणें लिहिणें -देणें; as, "A badly spelt and *stopped* letter." ७ (Etching) (with *out*) (कांचेच्या ज्या भागावर अम्लाचें कार्य नको असेल त्यावर) अम्लाचें कार्य न होणाऱ्या रंगाचा हात देणें. ८ (*photog.*) (with

*down*) यवाचा (नको असेल तो) भाग पडद्यानें झांकणें. (यव=Lens) ९ (*founding* with *off*) सांच्यांतील रिकामी जागा वाळूनें भरणें.

Stop *v. i. to cease, to come to an end* थांबणें, बंद होणें, बंद राहणें, बंद पडणें, खळणें, उभा राहणें; as, "My watch has *stopped.*" [ To S. SHORT एकदम -मध्येंच बंद पडणें -होणें. ] २ *to desist, to leave off* राहणें, पुरे -बस *adv.* करणें, थांबणें, सोडणें, अटपणें, हात काढणें -अटोपणें. ३ (*colloq.*) *to stay, to sojourn* राहणें, उतरणें, बिऱ्हाड *n.* करणें. [To S. UP जागत बसणें.] ४ (with *for*) थांबणें, खोळंबणें, वाट *f.* पाहणें.

Stop *n. pause, check* थांबणें *n*, खळणें *n*, उभा होणें *n*, खळ *m*, विराम *m*, अवसान *n*, &c. [TO PUT A S. TO बंद करणें, (-ची) बंदी करणें. TO COME TO A S. बंद होणें, बंद पडणें. TO BRING TO A S. बंद करणें -करवणें. TO BE AT A S. ची प्रगति खुंटणें, बंद असणें.] २ *a punctuation mark* विरामचिन्ह *n*. ३ *a finger-hole of a wind instrument* वायुवाद्याचें (बोटें ठेवण्याचें) भोंक *n*. ४ (in music) यति *f*, अवसान *n*, विराम *m*, थाक *f*.

Stop-cock *n.* चावी *f*, पाणी बंद करण्याचा काक *m*.

Stop'page *n. a stopping* खळणें *n*, थांबणें *n*, बंद पडणें *n*, बंद होणें *n*, उभा होणें *n*, उभा राहणें *n*, खोळंबा *m*, खोटी *f*. २ *obstruction* अडथळा *m*, अटक *f*, प्रतिबंध *m*, बंदी *f*, खोटी *f*, गुंता *m*. ३ (in transit) माल खरेदीदारास पोंचण्यापूर्वी तो वाटेंत अडकविण्याचा बेचनदाराचा हक्क *m*, वाटेंत केलेला अटकाव *m*.

Stop'per *n.* थांबवणारा *m*, उभा करणारा *m*, गतिरोधक *m*, अटकवणारा *m*, &c. २ *a plug for closing bottle* कांचेचें बूच *n*. S. *v. t. to close or secure with a stopper* कांचेचें बूच मारून बंद करणें.

Stopp'ered *pa. t.* S. *pa. p.* कांचेच्या बुचानें बंद केलेला. २ कांचेचें बूच असलेला.

Stopple ( stop'l ) *n. a cork or plug* बूच *n*, गुडदी *f*, बुटणें *n*, चोंदी *f*, दट्टा *m*.

Storage ( stōr'āj ) *n. the storing of goods* कोठींत -वखारींत ठेवणें *n*, नीट जपून ठेवणें *n*. २ *the charge for storing* ठेवणावळ *f*. [ S. BATTERY विद्युतत्संचायक माला *f*, संचायक विद्युन्माला *f*.]

Storax ( stō-raks ) [ Gr. *styrax.* ] *n.* शिलाकुसुम *n*, शिलापुष्प *n*, शिलारस *m*. हा झाडाच्या सालींतून निघतो.

Store ( stōr ) [ O. Fr. *estoire*, provisions –L. *instaurare*, to renew.] *n. a stock* सांठा *m*, संग्रह *m*, बेगमी *f*, भरणा *m*, दास्तान *n*, भांडवल *n*, डबोलें *n*. [IN S. संग्रहीत, सांठवून ठेवलेला, संचित.] २ *abundance* रेलचेल *f*, लूट *f*, भरपुरी *f*, रगाडी *f*, समृद्धि *f*. [To SET S. BY अतिशय महत्वाचा किंवा मौल्यवान् समजणें. ] ३ *a ware-house* वखार *f*, गोदाम *n*. ४ ( *pl.* ) *supplies* प्रपंचाला लागणारें सामान *n*. ५ *a shop supplying a large variety of goods* विविधवस्तुभाण्डार *n*, सर्व प्रकारच्या सामानाचें दुकान *n*. ६ सामान ठेवण्याची जागा *f*.

**Store** *v. t. to gather in quantities* गोळा -जमा करणें. २ *to lay up in store* सांठा करून ठेवणें, (माल) भरून ठेवणें, बेगमी करणें. ३ *to place in a ware-house* कोठींत भरणें, वखारींत ठेवणें -भरणें. ४ *to hold, to contain* (-आंत) राहणें, मावणें; as, "A single cell can S. 2,000,000 foot-pounds of energy."

**Store-house** *n.* कोठी *f*, वखार *f*, गोदाम *n*.

**Store-keeper** *n.* कोठावळा *m*, कोठनीस *m*, स्टोरवाला *m*.

**Store-room** *n.* घरांतील सामानाची खोली *f*.

**Storey,** Same as Story No. 1.

**Storied** (stō'rid) *a. famous in legend or history* गाथाग्रंथांत सांगितलेला, पुराणप्रसिद्ध, इतिहासप्रसिद्ध. २ *ornamented with legendary or historical figures* पौराणिक किंवा ऐतिहासिक पुरुषांचीं किंवा प्रसंगांचीं चित्रें असलेला; as, "S. halls." ३ *having an inscription or story upon it* (प्रसंगाचें) वर्णन असलेला, ऐतिहासिक किंवा धार्मिक प्रसंगांची हकीकत असलेला, धार्मिक वचनें वर खोदलेला; as, "*Storied* urn." ४ (of a building) मजले असलेला, मजली.

**Stork** (stork) [A. S. *storc.*] *n.* (बगळ्यासारखा) करकोंचा पक्षी *m*. White-necked S. कौरव.

**Storm** (storm) [A. S. *storm.*] *n. a tempest* वादळ *n*, तुफान *n*, जौळ *n*, वावटळ *f*, झंझावात *m*, चंडवात *m*, *esp.* with rain वाऱ्याचा पाऊस *m*, वाऱ्यापावसाची गर्दी *f*. २ *an attack on a stronghold* छापा *m*, हल्ला *m*, चढाई *f*. [To TAKE BY S. छापा घालून सर करणें. २ (*fig.*) (मनुष्यावर -श्रोतृसमुदायावर) एकदम छाप पाडणें, एकदम मोहित -अनुकूल करणें.] ३ *tumult, agitation* गर्दी *f*, धामधूम *f*, चळवळ *f*, खळबळ *f*. [S. AND STRESS (व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या आयुष्यांतील) धामधुमीचा काळ *m*.] ४ *dispute* कडाक्याचें भांडण *n*, कडाक्याचा वाद *m*, तडफडाट *m*, जळफळाट *m*, आदळआपट *f*, दणदणाट *m*. ५ *vehement shower* (अस्त्रांचा) वर्षाव *m*, (टाळ्यांचा) गजर *m*, कडकडाट.

**Storm** *v. i.* (of wind, rain, &c.) *to rage, to be violent* घोंघावणें, कडकडणें, दणदणणें. २ *to talk violently, to fume* वादळणें, चडफडणें, जळफळणें, चवताळणें, फोफावणें, वरदळणें, आदळआपट *f*. करणें, दणकावणें. S. *v. t. to take by storm* (a fort) (-वर) छापा घालणें, हल्ला करणें, हल्ला करून -छापा घालून घेणें.

**Storm-beaten** *a.* वादळांत (सांपडून) फुटलेला.

**Storm-belt** *n.* (नेहमीं) वादळें होणारा कटिबंध *m*.

**Storm-bound** *a.* वादळामुळें वरवा करून राहिलेला, वादळामुळें बंदरांत अडकून राहिलेला.

**Storm-card** *n.* वादळाचा नकाशा *m*. याच्या साहाय्यानें कप्तानाला वादळाचा मुख्य बिंदु काढतां येऊन त्याप्रमाणें वादळांतून वाट काढून जहाज निभावून नेतां येतें.

**Storm-centre** *n.* वादळाचा मुख्य बिंदु *m*. २ (*fig.*) *subject &c. upon which agitation or disturbance is concentrated* वादाचा मुद्दा *m*, वादाचें मूळ *n*.

**Storm-cloud** *n.* वादळी ढग *m*, जोराच्या पावसाचा

ढग *m.* २ *state of affairs that threatens disturbances* अस्वस्थता *f.* [लांकडी दरवाजा *m.*
Storm-door *n.* वादळाच्या वेळीं उपयोग करण्याचा फाल्तू
Storm'iness *n.* जौळीपणा *m*, वादळी हवा *f*.
Storm'ing *n.* छापा घालणें *n*, हल्ला करणें *n*.
Storm-proof *a.* वादळांत टिकणारा; as, "S. lamp." २ वादळांत न बुडणारी (बोट).
Storm-signal *n.* वादळाचा बाहुटा *m*.
Storm-tossed *a.* वादळांत हेलकावे खाणारी (बोट).
Storm'y *a. tempestuous* वादळाचा, तुफानाचा, वादळी, तुफानी, वारेवावटळीचा, जौळी. २ चळवळीचा, धडफडीचा, कडाक्याचा, आवेशाचा; as, "S. life; S. debate." ३ *associated with or threatening storms* वादळाचा, वादळाचा सूचक; as, "S. petrel."
Story (stō'-ri) [O. Fr *estorer*, to build.] *n. a floor of a building* मजला *m*. [LOWER S. पहिला म०. SECOND S. दुसरा म०. THIRD S. तिसरा म०. AN UPPER S. GENER. उपरमाडी *f*, उपरखणी *f*, माडी *f*, माळा *m*, मजला *m*. OF ONE S. एकमजली, एकमजला. OF TWO STORIES दुमजला, दुमजली. OF THREE STORIES तिमजला, तिमजली. OF FOUR STORIES चौमजली, चौखणी, चौताली. THE UPPER S. (*fig.*) *brain* मेंदू *m*; as, "*Is a little wrong in the upper story.*" CLEAR STORY खोटा मजला, दिखाऊ -लटका मजला.] Stories *pl.*
Story (stō'ri) [Short for History.] *n. history* कथा *f*, वृत्तान्त *m*. [REMAINING ONLY IN S. कथाशेष.] २ *past course of life* (भूतकालीन) आयुष्यक्रम *m*, आयुष्यक्रमांतील गोष्टी *f. pl.*; as, "His S. is an eventful one." ३ *account given of an incident* हकीकत *f*, वर्णन *n*. [ACCORDING TO HIS OWN S. त्याच्याच सांगण्याप्रमाणें. TO MAKE A LONG S. SHORT थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे. IT IS QUITE ANOTHER S. NOW आतां कांहीं निराळेंच ऐकूं येतें, वस्तुस्थिति निराळीच दिसते. THE S. GOES असें सांगतात.] ४ *a narrative, a tale* गोष्ट *f*, कथा *f*, नकल *f*, कहाणी *f*, आख्यायिका *f*. [IDLE S. गप *f*, बात *f*, दंतकथा *f*. LONG-WINDED S. चन्हाट *n*, चर्पटपंजरी *f*. TO MAKE A COCK AND BULL S. सातपांच करणें. TO TELL A LONG S. ABOUT चन्हाट लावणें, रड गाणें. TO TELL IDLE STORIES बाता *f. pl.* कुटणें, बाता *f. pl.* छाटणें, बाता *f. pl.* मारणें -ठोकणें.] ५ *main facts or plot of a novel, or an epic or play* कथानक *n*. ६ *facts or experiences that deserve narration* संस्मरणीय गोष्टी *f. pl.*, वर्णनीय प्रसंग *m. pl.*; as, "That face must have a S. belonging to it." ७ *a lie* गप्प *f*, थाप *f*, बात *f*.
Story-book *n.* गोष्टींचें पुस्तक *n*, कादंबरी *f*.
Story-teller *n.* (धंदेवाला) गोष्टी सांगणारा *m*. २ गोष्टी लिहिणारा *m*. ३ बातेज्या *m*, गप्पीदास *m*, बाताड्या.
Story-telling *n.* गोष्टी सांगणें *n*.
Story-writer *n.* लहानलहान गोष्टी लिहिणारा *m*.
Stout *n.* स्टाउट नांवाची पिण्याची दारू *f*.

**Stout** (stowt) [O. Fr. *estout.*] *a. bulky, fat, strong* धांडगा, लठ्ठ, धट्टाकट्टा, जाडा, जाड, ताठ, जोमदार, जब्बर, बळकट, राकट; Some terms for a stout sturdy fellow are लट्ठेश्वर, लट्ठंभारती, धटिंगण, दांडगेश्वर, पोळ; rather stout जाडगेला, जाडसर, जाडेला. २ (of things) बळकट, मजबूत, जाड, दणगट, ठासर, कणखर. ३ *bold* धाडशी, छातीचा, हिंमती. Stouti'sh *a.* लठ्ठसर. Stout'ly *adv.* जोरानें, धैर्यानें, नेटानें. Stout'ness *n.* लठ्ठपणा *m*, जाडेपणा *m*, कणखरपणा *m*, मजबुती *f*, बळकटी *f*. २ हिंमत *f*, धैर्य *n*.

**Stout-hearted** *a.* धीराचा, हिंमती, धैर्याचा.

**Stout-heartedness** *n.* धीर *m*, हिंमत *f*.

**Stove** (stōv) [*Orig.* 'a hot-house,' allied to Ger. *stove.*] *n.* (*for cooking*) (ग्यासलेटाची) चूल *f*, स्टव.

**Stow** (stō) [A. S. *stow*, a place.] *v. t. to pack* (goods, &c.) *in right or convenient places* तजविजीनें भरणें, सोईनें -बंदोबस्तानें ठेवणें -घालणें, जेथला तेथें ठेवणें -लावणें. २ *to store away* सामानानें गच्च भरणें, सामान गच्च पण व्यवस्थित भरणें.

**Stow'age** *n.* तजविजीनें भरणें *n*, व्यवस्थित लावणें *n*. २ *room for stowing* माल भरण्याची जागा *f*, वाव *m*, सांठ *m*. ३ *charge for stowing* भरणावळ *f*.

**Stow'away** *n.* गलबतांतून फुकट प्रवास करणारा *m*.

**Stowed** *pa. t.* S. *pa. p.* सोईनें भरलेला, सोईनें लावलेला.

**Strabismus** (stra-biz'-mus) [Gr. *strabos*, oblique.] *n. squinting* तिरवेपणा *m*, तिरळेपणा *m*. (b) काणेपणा *m*, चकणा डोळा *m*.

**Straddle** (strad'l) [Freq. formed from A. S. *strœd*, *pa. t.* of *stridan.*] *v. i. to stand or walk with the legs apart* टांगा *f. pl.* फांकणें, पाय फांकटून उभा राहणें, पाय फांकून चालणें, फेंगडा चालणें. २ (*fig.*) *to vacillate between two policies* दोन डगरींवर पाय ठेवणें. S. *v. t. to sit astride* (घोड्यावर वगैरे) पाय फांकून बसणें, पाय ताणून बसणें; as, "Cannot S. his horse." S. *n.* टांगा फांकून चालणें *n*, टांगा फांकटून उभें राहणें *n*. २ (*fig.*) दोन डगरींवर हात ठेवणें *n*.

**Straggle** (strag'l) [A. S. *strican*, to go.] *v. i. to be scattered* पांगणें, पांगापांग होणें. २ *to ramble* (पांगून -फुटून) इकडेतिकडे फिरणें, रानोमाळ फिरणें, चार वाटा चालणें -फिरणें. ३ *to grow irregularly* वेडावांकडा वाढणें -वर जाणें; as, "A plant *straggles.*" ४ *to occur here and there* तुटक -अलग असणें; as, "*Straggling* houses." Strag'gling *a.* सुटा, तुटक, अलग, फुटकर, तुटलेला. Strag'glingly *adv.* फुटून, पांगून, भटकून, रानोमाळ.

**Straight** (strāt) [Lit. 'stretched,' A. S. *streccan*, to stretch.] *a. not crooked* सरळ, सरल, नीट, ऋजु, उजू, सुती, सुतांतला. २ *direct* (एकदम) सरळ, सीधा, थेट, तडक. ३ *honest, candid* सरळ, प्रामाणिक, मार्गाचा, मनमोकळा, स्पष्ट, उजू, निटस, चोख; as, "S. dealings." ४ *in proper order or place* सुव्यवस्थित, नीटनेटका, टापटिपीचा; as, "Are the pictures S.?"

**Straight** *adv. directly* तडक, तसाच, तेव्हांच, लागलाच. २ *not turning aside* सरळ, थेट, नीट, समोर. ३ नेमका, अचुक; as, "To shoot *straight.*"

**Straight** *n. a straight direction* सरळ दिशा *f.* २ *a part of a race-course* घोडदौड *f.*

**Straight'en** *v. t. to make straight* सरळ करणें, नीट करणें, उजू करणें. २ *to reduce to order* व्यवस्था करणें -लावणें; as, "To S. one's affairs." [To S. ONE'S FACE हंसें आंवरणें, गंभीर मुद्रा करणें.]

**Straightfor'ward** *a.* (a road) सरळ, धोपट, सडक. २ *honest, frank* सरळ, धोपटमार्गी, खणखणीत, सडखडीत, खसखशीत. [S. SPEECH सरळ भाषा *f.*]

**Straightfor'wardly** *adv.* सरळ, उघड, सरळपणानें. २ खसखशीत, स्पष्ट, स्पष्टपणें, साफ.

**Straightfor'wardness** *n.* सरळपणा *m*, स्पष्टपणा *m.*

**Straightness** *n.* सरळपणा *m.* २ चोखपणा *m.*

**Straightway** *adv.* एकदम, ताबडतोब, तडक.

**Strain** (strān) [O. Fr. *straindre*, -L. *stringere*, to draw tight.] *v. t. to stretch tightly* ताणणें, ताण *m.* देणें, तणावा *m.* देणें -बसवणें, खेंचणें, ओढणें, आंवळणें; as, "To S. a rope to breaking-point." २ *to wrest or distort from true intention or meaning* ताणणें, (अर्थाची) ओढाताण करणें, (अर्थाचा किंवा हेतूचा) विपर्यास *m.* करणें. [To S. EVERY NERVE शिकस्त करणें. To S. ONE'S EYES, EARS, &c. कान उभारून ऐकणें, डोळे भरून पाहणें, लक्षपूर्वक पाहणें किंवा ऐकणें. To S. ONE'S AUTHORITY, RIGHTS, POWERS, &c. अधिकाराचा -सत्तेचा -हक्कांचा अतिरेक करणें, मर्यादातिक्रम *m.* करणें. To S. A POINT फारच ताणून धरणें, ताणून गैरवाजवी फायदा करून घेणें. A STRAINED INTERPRETATION OR SENSE ओढाताण करून केलेला किंवा काढलेला अर्थ.] २ *to hug* (a person) *to oneself or one's breast* कवटाळणें, पोटाशीं धरणें. ३ *to overtax* ताणणें, ताण देणें, शीण पाडणें, शीण देणें, लचक भरविणें, लचकवणें, ताण पाडून बिघडविणें; as, "Take care not to S. your eyes." ४ *to force beyond propriety* ओढणें, ओढून -ताणून -खेंचून आणणें. ५ *to squeeze through, to filter* वस्त्रगाळ करणें, गाळणें, गाळून काढणें, छानणें. S. *v. i. to run through, to filter* गळणें, पाझरणें, क्षरणें. २ *to make violent efforts* नेट *m.* करणें, कुंथणें, कष्ट -श्रम घेणें -करणें, धडपड करणें; as, "Plants *straining* upwards to the light."

**Strain** *n. pull, tension, stress* ताण *m*, कर्ष *m*, ओढ *f*, ओढा *m*, तणावा *m*, नेट *m*, जोर *m.* २ *injury from over-exertion* ताण *m*, शीण *m*, लचक *f*, कचक *f*, करक *f*, चमक *f.* ३ (*poet.* and *rhet.* usu. in *pl.*) *burst or snatch or spell of music or poetry* चुटका *m*, कडवें *n*; as, "Martial or inspiring S.s." ४ *tone or key* स्वर *m*, सूर *m*, ताण *f*, तान *f.* ५ *moral tendency forming part of a character* वळण *n*, झोंक *m*, रोंख *m*, छटा *f*, सूचन *n*; as, "There is a S.

of weakness in him." ६ *breed of animals, human stock or family* कुळ *n*, वंश *m*, जात *f*; as, "Comes of a good S."

Strained *pa. t.* S. *pa. p. a.* ताणलेला, ताण दिलेला. २ *artificial, forced* ओढून आणलेला, बळेंचा, बळेंबळेंचा, बळयांबळयांचा, वरकरणी, औपचारिक, कृत्रिम; as, "S. manner; S. laugh." ३ *stiff, uneasy* ताणलेला, अस्वाभाविक. [S. RELATIONS बेबनाव *m.*]

Strain'er *n. a sieve* चाळण *f*, चाळणी *f*, गाळणी *f*, गाळणें;—of cloth सोधणें *n*, साफी *f*;—of bamboo रोवळा *m*, रोवळी *f*. २ चाळणारा *m*, गाळणारा *m*.

Strain'ing *n.* ताणणें *n*, ताण देणें *n* -बसवणें *n*, ओढणें *n*, ओढाताण *f*. करणें *n*. २ कुंथणें *n*, नेट करणें *n*, बळ करणें &c. ३ गाळणें *n*, शोधणें *n*, चाळणें *n*. ४ ताण *m*, ओढाताण *f*.

Strait (strāt) [O. Fr. -L. *strictus*, drawn tight.] *a. narrow* अरुंद, सांकड, अप्रशस्त; as, "S. gate. Matt. VII. 14." २ (of a garment) तंग, सांकड, अडस, दाटका. ३ *rigorous, strict* कडक, कडकडीत.

Strait *n.* (Usu. *pl.*) (*geog.*) सामुद्रधुनी *f*, खाडी *f*. २ *a narrow mountain-pass* खिंड *f*, नळी *f*, नळीची वाट *f*. ३ (*pl.*) *distress* संकट *n*, अडचण *f*. [To BE IN STRAITS संकटांत -अडचणींत -पेंचांत असणें.]

Strait'en *v. t. to narrow* संकुचित -मर्यादित करणें. २ *to distress* संकटांत आणणें, अडचणींत आणणें, अडचणींत पाडणें -टाकणें -घालणें. [STRAITENED CIRCUMSTANCES दारिद्र्य *n*, गरीबी *f*, कंगालस्थिति *f*.]

Strait-handed *a.* (R.) चिकट, कद्रु, कंजूष.

Strait-laced *a. rigid in morals* (आचरणांत) कडक, कडकडीत. २ *narrow-minded* कोत्या समजुतीचा, र्‍हस्वदृष्टीचा, क्षुद्र मनाचा.

Stramon'ium *n.* (*bot.*) धोतरा *m*, धत्तुरा *m*.

Strand (strand) [A. S. -Ice. *strönd*, border.] *n. one of the parts twisted to form a rope or wire* पदर *m*, पेड *m*, पेढ *m*.

Strand (strand) [A. S.] *n. shore, beach* किनारा *m*, कांठ *m*, तीर *n*, तट *n*. S. *v. i. to be driven ashore* कांठावर आदळणें, कांठावर आपटणें, तीरावर लागणें. २ *to be left helpless, distressed, or at a strand* उघडें पडणें, असहाय होणें, अडचणींत -संकटांत पडणें, पैशाच्या अडचणींमुळें मागें पडणें. S. *v. t. to run aground* किनाऱ्यावर चढवणें, कांठावर आदळवणें. Strand'ed *pa. p.* (पैशाच्या अडचणीमुळें) मागें पडलेला.

Strange (strānj) [O. Fr. *estrange* -L. *extraneus*, outward.] *a. foreign* परका, परक्या देशांतला, परदेशचा, परदेशी, विदेशी. २ *of another family* परका, परगोत्रांतला, परगोत्राचा, बाहेरचा, अन्य. ३ *novel, marvellous* विलक्षण, अजब, विचित्र, चमत्कारिक. ४ *odd, unusual* तऱ्हेवाईक, तऱ्हेचा, एकतऱ्हेचा, विलक्षण. [S. FELLOW चिन्ह *n.*] ५ *uncommon*

लोकोत्तर, अलौकिक, अपूर्व, लोकबाह्य, विशेष. ६ *unknown or new to* नवा, परकी, अनोळखी, परका, अपरिचित; as, "I am S. to the work." ७ *bewildered* घाबरलेला. [To FEEL S. अवघड वाटणें.]

Strange'ly *adv. wonderfully* चमत्कारिक रीतीनें, विलक्षण रीतीनें, आश्चर्य वाटेल असा -इतका; as, "How S. active are the arts of peace!"

Strange'ness *n.* परकेपणा *m*, पारखेपणा *m*. २ विलक्षणपणा *m*, नवलपणा *m*. ३ अलौकिकपणा *m*, अचाटपणा *m*. ४ नवेपणा *m*, अनोळखीपणा *m*, अपरिचय *m*.

Stran'ger *n.* परकीय *m*, परकी *m*, परदेशांतील मनुष्य *m*, परदेशस्थ *m*, परदेशी *m*, विदेशी *m*, उपरी *m*. २ *one not of the family* परका *m*, बाहेरचा *m*, बाहेरचें माणूस *n*. ३ *an unknown person* अनोळखी. *m*, बाहेरचा *m*, तिऱ्हाईत *m*. ४ *an inexperienced person* गैरवाकबदार *m*, गैरमाहीत, अपरिचित *m*, अनभ्यस्त *m*. ५ *a guest or visitor* पाहुणा *m*, अभ्यागत *m*.

Strangle (strang'l) [Gr. *strangos*, twisted.] *v. t. to throttle, to kill by squeezing wind-pipe* गळा दाबून ठार मारणें, गळा दाबणें, गळफांसानें मारणें, गळफांस देऊन -घालून मारणें. २ (of collar, &c.) *to squeeze* (neck) आंवळणें, दाटणें. ३ (*fig.*) *to suppress* (movement) दाबणें, दडपून टाकणें, दडपणें.

Strang'ling *v. n.* गळा दाबणें *n*, गळा दाबून मारणें *n*. २ श्वासावरोध *m*, कोंडमारा *m*.

Strangulate (strang'ū-lāt) [L. *strangulare* -Gr. *straggos*, twisted.] *v. t.* (R.) गळा दाबणें, (*path.* and *surg.*) *to prevent circulation through* (vein, intestine, &c.) *by compression* (शीर, धमनी वगैरे करकचून आंवळून) रुधिराभिसरण बंद करणें, मार्ग बंद करणें. २ करकचून आंवळणें, फांस घालणें.

Strang'ulated *a.* करकचून आंवळलेला, गळ्याभोंवतीं फांस बसलेला, पाशग्रस्त. [STRANGULATED HERNIA आंतड्याच्या दुणीला फांस बसल्यामुळें आंवळत गेलेला अन्तर्गळ, सपाश अन्तर्गळ.]

Strangula'tion *n.* (*med.*) करकचून आंवळणें *n*, आंवळून जाणें *n*, आंवळलें जाणें *n*. २ घट्ट बांधलें जाणें *n*. ३ गळा दाबून मारणें *n*. ४ श्वास कोंडणें *n*, श्वासरोध *m*.

Strangury (strang'ū-ri) [Gr. *straggouria* -*stragx* a drop and *ouron*, urine.] *n.* मूत्रकृच्छ्र *n*, अश्मरी *f*, थेंबथेंब लघ्वी होऊन दुखणें *n*.

Strap (strap) [A. S. *stropp.*] *n. a band* (of leather, cloth, metal, &c.) वादी *f*, चिंधी *f*, पट्टी *f*. [THE S., S. OIL चामड्याच्या वादीनें दिलेला मार *m*.] २ *an iron-plate, joining planks* लोखंडी पट्टी *f*, चिमटा *m*, आंकडा *m*. ३ *a strap for sharpening a razor* (वस्तऱ्याचें) थापटणें *n*, पलाटणें *n*, लटपटणें *n*.

Strap *v. t. to secure with a strap* वादीनें बांधणें, वादीनें घट्ट आंवळणें. २ *to whet* पलाटण्यावर धार आणणें -देणें. ३ *to flog with a strap* वादीनें मारणें -बडवणें. ४ पट्टी बांधणें, पट्टी बांधून जखम बंद करणें.

Strapped *pa. t. & pa. p.*

Strapp'ing *pr. p. a. tall, handsome* उंच, भव्य, दांडगा, गलेलठ्ठ, धिप्पाड, गबदूल, घणघाव, खमाद्या. S. *n.* वादीचा मार *m.* २ वाद्या करण्याचें कातडें *n.*

Strata, *pl.* of Stratum, *q. v.*

Stratagem ( strat'a-jem ) [Fr. -L. -Gr. *stratēgos*, a general.] *n. an artifice* कल्पना *f*, युक्ति *f*, कसब *n*, उपाय *m*, डाव *m*, डावपेंच *m.* २ *device for deceiving an enemy* व्यूह *m.*

Strat'egic, Strat'egical *a. relating to strategy* व्यूहाचा, व्यूहात्मक, व्यूहरचनाविद्येचा, व्यूहरचनाविद्याविषयक. २ *serving the ends of strategy* मान्याची ( जागा ), सोईची ( जागा ); as, "S. position."

Strateg'ically *adv.* व्यूहरचनाशास्त्राच्या दृष्टीनें.

Strat'egist *n. an expert in strategy* व्यूहरचनाविद्येंत निपुण *m*, व्यूहविद्याकुशल *m*, सैन्यरचनाविद्यापारंगत.

Strate'gy *n. the art of directing the movements of an army* सैन्यरचनाविद्या *f*, ( युद्धाच्या पूर्वीची ) व्यूहरचनाविद्या *f*, युद्ध सुरू होण्यापूर्वी तोफा, सैन्य वगैरेची रचना करण्याचें कौशल्य *n.*

*N. B.*—युद्ध सुरू होण्यापूर्वीं सैन्याची, छावण्यांची, तोफांची जी रचना तिला शास्त्रीय लष्करी भाषेंत Strategy असें म्हणतात; व युद्ध सुरू झालें म्हणजे शत्रूला फसविण्याकरितां ज्या युक्त्या किंवा जे डावपेंच योजितात त्यांस Tactics असें म्हणतात.

Stratifica'tion *n.* स्तरीकरण *n*, स्तरीभवन *n.*

Stra'ti'fy *v. t. to arrange in strata* ( *esp.* in *pa. p.*) थर *m.* करणें -बसवणें. Stratified *pa. t.* and *pa. p.*

Stratocracy ( strā-to-k'ra-si ) [Gr. *stratos*, army, +*-cracy*.] *n. military government* सैन्यसत्ताक राज्यपद्धति *f*, लष्करी प्राबल्याची पद्धति *f*, लष्करी प्राबल्य.

Stratum ( strā'-tum ) [L.] *n.* ( *geol.* ) *a. layer of rock, sand, or other mineral matter* थर *m*, स्तर *m*, पडदा *m*, मजला *m*, माळ *m.* Strata *n. pl.*

Straw ( straw ) [A. S. *streaw.*] *n. the stalk of a corn-plant* काडी *f*, काड *f.* २ ( collectively ) *cornstalks after threshing* गवत *n*, पेंढा *m*, पराळ *n*, साळवण *n*, तणस *f.* ३ *something worthless* काडी (*fig.*), कसपट *n* (*fig.*), तुच्छ वस्तु *f*, कवडीकिंमतीची वस्तु *f.* [MAN OF S. यःकश्चित् मनुष्य *m*, कस्पट *n.* TO CATCH AT A S. काडीचा आश्रय करणें. THE LAST S. थोडीशीच भर *f*, शेवटची काडी *f.* A S. SHOWS WHICH WAY THE WIND BLOWS *Cf.* शितावरून भाताची परीक्षा.]

Straw-berry *n.* स्ट्राबेरी ( वनस्पति ). हिला फुलें व फळें येतात; व ही माथेरान, महाबळेश्वर अशा थंड ठिकाणीं होऊं शकते.

Stray ( strā ) [O. Fr. *estraier.*] *v. i. to wander* भटकणें, भटक्या मारीत फिरणें, भटक्या मारणें. २ *to go wrong* चुकणें, रस्ता *m* -वाट *f.* चुकणें, रस्ता *m.* चुकून जाणें, बहकणें, भकणें, रस्ता *m.* सोडून जाणें, रान *n.* घेणें, चुकारी *f.* भरणें, भ्रमणें. S. *a. gone astray* चुकलेला, चुकार. २ चुकलामाकला, एखादुदुसरा, नवीन,

गैरमाहित; as, "A S. customer or two came in." ३ *occurring or met with now and then* निरन्वय, प्रकीर्ण, किरकोळ; as, "S. thoughts; S. instances." S. *n. a strayed animal* चुकार गुरूं *n.*

Streak (strēk) [A. S. *stric, strica,* a stroke, a line.] *n. a mark or line* रेघ *f*, रेघोटी *f*, लकीर *f*. [S. IN WOOD, STONE, &c. दोरा *m*, शीर *f*. S. ON CERTAIN SNAKES फांकी *f*. WHITE VERTICAL S. ON THE FOREHEAD OF A DOG, HORSE, &c. नाम *m*. S. OF LIGHTNING विद्युल्लेखा *f*. THE SILVER S. इंग्लिश चानल.] २ *strain or element* छटा *f*, अंश *m*; as, "Has a S. of humour in him."

Streak *v. t.* (*usu.* in the *pa. p.*) *to mark with streaks* रेघा *f. pl.* काढणें, पट्टया *f. pl.* काढणें, रेषांनीं चित्रविचित्र करणें.

Streak'ed *a.* रेघा काढलेला, पट्टापट्टीचा, रेषांनीं चित्रविचित्र केलेला. २ (of cattle) बाहळा, बाळा, बांडा.

Streak'y *a.* रेषांकित, रेषांनीं सुशोभित दिसणारा; as, "The S. west."

Stream (strēm) [A. S. *stream*; Ger. *strom.*] *n. running water* प्रवाह *m*, झरा *m*, धार *f*, ओढा *m*, वहाळ *m*. [S. OF THOUGHT विचारप्रवाह. SEPARATED AND MINOR S. IN THE BED OF A RIVER तास *m*. S. TURNED INTO FIELDS ओहळ *m*, ओहण *n.*] २ *a current* प्रवाह *m*, ओघ *m*. (b) (*fig.*) लोकप्रवृत्ति *f*, बहुजनप्रवृत्ति *f*, कल *m*, ओढा *m*. [TO GO WITH THE STREAM लोक वागतील तसें आपण वागणें, प्रवाहाबरोबर जाणें. TO GO AGAINST THE STREAM लोकमताच्या विरुद्ध आचरण करणें, प्रवाहाविरुद्ध जाणें.] ३ *something proceeding continuously* धार *f*, प्रवाह *m*; as, "Streams of blood, tears, lava, &c."

Stream *v. i. to flow or issue in a stream* वाहणें, (-चा) प्रवाह चालणें. २ *to emit streams of* (blood, &c.) धार *f*. लागणें, पाट लागणें -वाहणें, पाट सुटणें. ३ (of banner, loose hair, &c.) *to float or wave in the wind* फडकणें, फडफडणें.

Stream'er *n. a flag* बावटा *m*, निशाण *n*, फरारा *m*. २ *a beam of light from the horizon* क्षितिजापासून निघणारी किरणच्छटा *f*.

Stream'ingly *adv.* घळघळ, घळघळां, फळफळ, फळफळां.

Stream'let *n.* ओहळ *m*, ओहळी *f*, वाहळी *f*, ओळ *f*.

Street (strēt) [A. S. *stræt.*] *n. a road lined with houses* (दुतर्फा घरें असलेला) रस्ता *m*, आळी *f*, पेठ गल्ली *f*, &c. [ON THE STREETS *living by prostitution* तनुविक्रयोपजीवी.]

Street-arab *n.* रस्त्यांतून भटकणारा गलिच्छ मुलगा *m*.

Street-orderly *n.* रस्ते झाडणारा *m*, झाडू *m*.

Street-sweeper *n.* रस्ते झाडण्याचें यंत्र *n*.

Street-walker *n.* बाज़ारबसवी *f*, हट्टविलासिनी *f*.

Strength (strength) [A. S. *strengthu.*] *n. force, vigour, power, intensity* सामर्थ्य *n*, जोर *m*, शक्ति *f*,

बळ *n*, जोम *m*, बळकटी *f*, कुवत *f*, ताकत *f*, ताकद *f*, तेज *n*, धमक *f*. २ *firmness, hardness* जीव *m*, कस *m*, जोर *m*, त्राण *n*, ऐवज *m*. ३ (of liquors) *potency* तेज *n*, बिरी *f*, वीर *f*, तेजगी *f*, जहाली *f*, जोस *m*. ४ *what makes strong* आधार *m*, भरंवसा *m*, शक्ति *f*, सामर्थ्य *n*; as, "God is our S." ५ (*of men in an army*, &c.) संख्या *f*, सामर्थ्य *n*, मनुष्यबळ *n*.

Strengthen (strength'n) *v. t. to make strong or stronger* बळकट -मजबूत -बलवान् करणें, बळ *n*. -शक्ति *f* -जोर *m* -बळकटी *f*. देणें, बळ *n* -शक्ति *f*. वाढवणें *g. of o.*, बलवृद्धि *f* -बलवर्धन *n*. करणें *g. of o.* २ *to establish, to corroborate* बळकट -दृढ -शाबीत -निश्चित करणें, बळकटी *f*. देणें -आणणें, पुष्टि *f*. देणें. ३ *to encourage* धीर *m*. देणें, जीव *m*. आणणें.

Strength'en *v. i. to grow strong* बळ *n*. धरणें, बळावणें, जोरावणें, बळकट -जोराचा -सबळ होणें -होत जाणें.

Strength'ened *pa. t.* S. *pa. p.* बळकट -मजबूत केलेला.

Strength'ener *n.* बळकट करणारा *m*, बळ देणारा *m*, शक्ति आणणारा *m*, बलवर्धक *m*.

Strength'ening *pr. p.* S. *n.* बळकट करणें *n*, बळ *n*. देणें *n*, बलवर्धन *n*, बलवृद्धि *f*.

Strenuous (stren'ū-us) [L. *strenuus.*] *a. energetic, persistent* जोराचा, दांडगा, आस्थेचा, आस्थापूर्वक, उत्साहपूर्वक, उत्साहयुक्त. २ उद्योगी, परिश्रमी.

Strenuos'ity, Stren'uousness *n.* उत्साह *m*, औत्सुक्य *n*. २ परिश्रम *m*, उद्योगिपणा *m*.

Stren'uously *adv.* उत्साहानें, उत्साहपूर्वक. २ परिश्रमानें.

Strepto-coccus *n.* (*med.*) शृंखलाकार रोगजन्तु.

Stress (stres) [Short for Distress.] *n. force, pressure, strain* ओढ *f*, ओढा *m*, ताण *m*, नेट *m*, जोर *m*, बळ *n*, दाब *m*, दबाव *m*. २ *stretch* ताण *m*, तणावा *m*, ताणलेलेपणा *m*, ओढा *m*, ओढ *f*. ३ (शब्दावर किंवा शब्दावयवावर दिलेला) जोर *m*.

Stress *v. t. to emphasize* (शब्दावर वगैरे) जोर देणें, जोरानें उच्चारणें. २ *to apply mechanical stress* दाबणें, दाब देणें.

Stretch (strech) [A. S. *streccan*, to stretch. Stretch lit. means 'to make stiff or hard' as in straining a cord.] *v. t.* ताणणें, लांब करणें, लांबविणें. २ (हात) पोंचविणें. ३ *to expand* पसरणें, विस्तारणें; as, "To S. cloth." ४ *to tighten* ताठ करणें, ताणणें. ५ (a muscle) ताणणें, ओढणें, ओढून -खेंचून आणणें, ताण *f* -तणावा *m*. देणें. ६ (an argument, truth) ओढाताण करणें, ओढूनताणून अर्थ करणें -काढणें. S. *v. i.* पसरणें, पोंचणें, जाणें, पावणें, लागणें, ठेपणें. २ *to open out on wear* सैल -ढिला होणें. ३ *to lie along* वाहणें, वाहणी असणें *g. of s.*, वळण *n*. असणें. S. *n.* ताणणें *n*, ताण देणें *n*. (b) ताण *f*, ओढ *f*. (c) प्रयत्न *m*, तिडिक *f*, बळ *n*, नेट *m*, तडाका *m*. [AT A S. एकदम, एका तडाक्यानें, एक वेळीं, एका ओढीनें.] २ *continuous expanse or tract* विस्तार *m*, विस्तृत

प्रदेश *m.* ३ (*naut.*) *distance covered on one tack* एका खेपेला तोडलेलें अंतर *n.* ४ धोरण *n*, वळण *n.* ५ आंवाका *m.* Stretched *pa. t.* and *pa. p.* पसरलेला, विस्तारलेला, प्रसृत, विस्तृत. २ लांब केलेला. ३ ताणलेला, ताण दिलेला. ४ ओढून ताणून आणलेला.

Stretch'er *n.* ताणणारा *m*, पसरणारा, ओढणारा, &c. २ (वल्हविणाराची) पांवडी *f.* ३ क्यानवास ताणण्याची चौकट *f.* ४ (गोणपाटाची) डोली *f.* ५ (छत्रीची) आंतली काडी *f*, तीर *m.* ६ (बूट सैल करण्याचा) कालबुथ *m.* ७ (प्रेत नेण्याची) ताटी *f.*

Stretching machine *n.* (कांजी देऊन सुकविल्यावर) कपडा ताणून रुंद करण्याचें यंत्र *n.*

Strew (strōō) [A. S. *streowian*, to strew.] *v. t.* (वाळू, फुलें वगैरे) पसरणें, पसरून टाकणें, विखरणें. (b) (-वर) पसरून झांकणें. Strewed *pa. t.* Strewed, Strewn *pa. p.* Strewing *pr. p.*

Stria (strī'a) [L.] *n.* रेघ *f*, रेषा *f.* Striāē *n. pl.*

Stria of aviadaum (पुष्कळ) मुलें झालेल्या स्त्रीच्या पोटावरील रेषा *f. pl.*

Stri'ate, Stri'ated *a.* रेखांकित, रेषांकित.

Strick'en *pa. p.* of Strike.

Strick'le (strik'l) *n.* शीग मारण्याची पट्टी *f.*

Strickle-struck *a.* शिगलोटा.

Strict (strikt) [L. *stringere*, to draw tight.] *a.* *accurate, precise* खरा, खास, निश्चित. २ रेखलेला, बांधलेला, रेखीव, बांधीव. ३ *severe* कडक, कडकडीत, सख्त, निक्षूनचा. Strict'ly *adv.* खास, खास रीतीनें. २ कडक रीतीनें, कडकपणानें, सख्तपणानें, दया न करितां. ३ बजावून, हडसून, निक्षून. Strict'ness *n.* खासपणा *m*, खरेपणा *m.* २ रेखलेलेपणा *m*, बांधलेलेपणा *m*, बांधीवपणा *m.* ३ कडकपणा *m*, सख्तपणा *m.*

Stric'ture *n.* (*med.*) संकोच *m*, आकुंचन *n.* [S. OF THE URETHRA मूत्रमार्गसंकोच *m.* S. OF A TUBE नलिकासंकोच *m*, मूत्रादिनलिका चिकटल्यामुळें बंद होणें.] २ *unfavourable criticism* विरुद्ध टीका *f.*

Stride (strīd) [A. S. *stridan*, to stride.] *v. t.* and *v. i.* ढेंगें टाकीत चालणें. S. *n.* ढेंग *n.* २ ढेंग (अंतर) *n.* Strode *pa. t.* Strid'den *pa. p.*

Strident (strī'dent) [L. *stridens*, creaking.] *a.* करकर वाजणारा, कर्कश, किंकाळीसारखा.

Stridor (strī'dor) [L. *stridere*, to creak.] *n.* (*med.*) श्वासोच्छ्वासाचे वेळीं शिटीसारखा आवाज होणें *n.*

Strife (strīf) [M. E. *strif*, strife.] *n.* *struggle for victory* स्पर्धा *f*, प्रतिस्पर्धा *f*, चढाओढ *f.* २ *contest* झोंबी *f*, झटापट *f*, झुंज *n.* ३ *discord* झगडा *m*, भांडण *n*, तकरार *f*, तंटा *m.*

Strigose (strī'-gos) [L. *striga*, a furrow -*stringere*, to contract.] *a.* (*bot.*) केसांनीं खरबरीत झालेला, रुक्षरोमांकित.

Strike (strīk) [M. E. *striken*, originally, to proceed, to advance, to flow; and hence, used of smooth, swift motion; to strike with a rod or

sword. In the Icelandic and Latin relics of this word, the ideas such as 'to stroke, to rub, to wipe, to strike' are present.] *v. t. to hit* (टोला, ठोका, तडाखा) मारणें, हाणणें, ठोकणें, पिटणें, प्रहार करणें, आपटणें. [S. WHILE THE IRON IS HOT Cf. Marathi तवा तापलेला आहे तों भाकरी भाजून घ्या. STRIKING FORCE (एकदम) हल्ला करण्यास सज्ज सैन्य *n.* To S. A BLOW FOR (करितां) दांडगा प्रयत्न करणें. STRICKEN HEART शोकाकुल अंतःकरण *n.* STRICKEN IN YEARS म्हातारा झालेला. STRICKEN WITH PLAGUE प्लेग झालेला, प्लेगनें पडलेला. A STRICKEN FIELD ठाणावरची लढाई. To S. AT नेम धरणें. To S. AT THE ROOT OF मुळावर घाव घालणें. To S. BACK परत टोला मारणें -लगावणें. To S. HOME नेमका घाव मारणें -घालणें. To S. A TRACK माग लावणें. To S. COIN नाणें पाडणें. To S. A BARGAIN सौदा ठरविणें. To S. A MATCH कांडी पेटविणें. To S. A LIGHT कांडी पेटवून उजेड करणें. *N. B.* In the above, S.=Strike.] २ टाकणें, फेंकणें; as, "To S. blood on the side-posts." ३ (a bell) वाजविणें. ४ (-वर) आपटणें, आदळणें; as, "Ship *strikes* a rock." ५ अंगावर पडणें, लागणें; as, "He was *struck* by lightning." ६ (तास) वाजविणें, ठोके -टोले वाजविणें; as, "Clock *strikes* the hours." ७ *to wipe out* काढून टाकणें, खोडून टाकणें; as, "To S. out a name or item." ८ (नशिबानें) सुचणें, लक्षांत येणें; as, "An idea *struck* me that." ९ (निशाण, शीड, तंबू, वगैरे) खालीं उतरणें, खालीं पाडणें, खालीं करणें. १० संप करणें, हरताळ पाडणें; as, "To S. work." ११ ओसकणें; as, "To S. a knife." १२ शीग मारणें; as, "To S. a measure of corn." १३ (बाकी) ठरविणें; as, "To S. a balance." १४ (सरासरी) काढणें; as, "To S. a mean." १५ (with wonder) चकित करणें, थक्क करणें. १६ (with *off*) तोडून टाकणें, कापून टाकणें; as, "To S. the head off." १७ (with *up*) वाजवूं लागणें; as, "To S. up a fiddle." १८ (a plaint) काढून टाकणें; as, "To S. a plaint off the file." १९ (a stamp) (सही, तारीख, वगैरे घालून) रद्द करणें. २० *to stroke or pass lightly* (-वरून) हात (वगैरे) फिरविणें; as, "He will S. his hand over the place and recover the leper." २१ (Bible) शिक्षा करणें; as, "To S. the princes for equity." [To S. ONE BLIND आंधळा करणें. To S. DOWN खालीं पाडणें. To S. OUT A PLAN डोक्यांतून नवीन युक्ति काढणें. To S. OUT A LINE FOR ONESELF आपल्याकरितां डोक्यांतून नवीन मार्ग काढणें. To S. UP AN ACQUAINTANCE लौकर ओळख पाडणें. To S. OFF छापून काढणें. To S. OIL खाण सांपडणें. २ (*fig.*) डबोलें सांपडणें.]

Strike *v. i.* पुढें जाणें; as, "To S. into the fields." २ टोला देणें, तडाखा देणें, घाव घालणें; as, "S. now, or else the iron cools." ३ (-वर) आपटणें, आदळणें; as, "A ship *struck* in the night." ४ वाजणें; as, "The clock *struck.*" ५ पार जाणें; as, "A dart

*struck* through his liver." ६ (निशाण, वगैरे) खालीं करणें, शरण जाणें; as, "A ship should not *strike*." ७ संप करणें; as, "To S. for more wages." ८ (जाऊन) चिकटणें; as, "Oysters *strike*." ९ (with *out* as a swimmer) झांप *f.* टाकणें, झेंप *f.* टाकणें, झेंपावणें. १० (निराळया दिशेकडे) वळणें; as, "S. to the right." [To S. INTO A GALLOP दौडूं लागणें. To S. UPON AN IDEA, PLAN, &c. एकदम सुचणें. THE HOUR HAS STRUCK तासाचा ठोका पडला. २ (*fig.*) आणीबाणीची -संकटाची वेळ आली -येऊन गेली. LIGHT STRIKES UPON AN OBJECT वस्तूवर प्रकाश पडतो. A MATCH WILL NOT STRIKE कांडी पेटणार नाहीं.] Struck *pa. t.*

Strike *n.* संप *m*, हरताळ *m*. [STRIKE-PAY संपवाल्यांना (ट्रेड्युनियननें दिलेला) पगार *m*. To BE ON S. संप केलेला असणें.] २ (geology) वळण *n*, दिशा *f*.

Stricken, Struck, *pa. p.* of Strike.

Strik'er *n.* ठोकणारा *m*, मारणारा *m*. २ घाव मारणारा (लोहाराचा मदतनीस) *m*. ३ संप करणारा *m*, संपवाला *m*. ४ टोला मारणारा *m*, ब्याटवाला *m*.

Strik'ing *a.* मारणारा. २ चकित करणारा, थक्क करणारा, चमत्कारिक, चमत्कारी. ३ लक्षांत येण्यासारखा, ठळक, ठळठळीत, ढळढळीत, झळझळीत, धडधडीत, स्पष्ट. S. *v. n.* हाणणें *n*, मारणें *n*. २ लागणें *n*, धक्का *m*, ठोकर *f*. [S. OF THE FOOT AGAINST ठोकर (*v.* खाणें), ठेंच (*v.* लागणें).]

String (string) [L. *stringere*, to draw tight.] *n.* दोरी *f*, सुतळी *f*, रश्शी *f*, रज्जु *m*, सडा *m*, सूत्र *n*. [S. OF TWISTED SILK कंकरी *f*. S. OF A PUPPET कळसूत्र *n*. TO PULL THE STRINGS (एखाद्या कामाचीं) सूत्रें हालविणें.] २ (of a musical instrument) तंतु *m*, तांत *f*, तार *f*. (b) *pl.* तंतुवाद्यें *n. pl.* [To TOUCH THE STRINGS तंतुवाद्य वाजविणें. To HARP ON ONE S. एकच विषय घेऊन बसणें. To TOUCH A S. (एखाद्याच्या) मनांतली गोष्ट (विनचूक) सांगणें, (एखाद्याच्या) मनांतलें विनचूक सांगणें.] ३ (*bot.*) शेंगांच्या सांध्यावरची शीर *f*; as, "The *strings* of French beans." ४ *a succession or series of things* सर *m*, माला *f*, माळा *f*, माळ *f*, हार *m*, जाल *n*. [S. OF PEARLS मोत्यांचा सर *m*. S. OF FLOWERS फुलांची माळ *f*.] ५ *thread of a rope or twist* पदर *m*, पेड *m*. ६ (of a bow) दोरी *f*, ज्या *f*, गुण *m*. ७ *ribbon* फीत *f*. ८ बंद *m*, कसणी *f*, कसा *m*. ९ (*anat.*) मज्जातंतु *m*, मज्जारज्जु *m*. १० (of horses) तांडा. ११ (बिलियर्ड खेळांतील) डाव मांडण्याची माळ *f*.

String *v. t.* तारा लावणें, तांती चढवणें, तंतुयुक्त करणें. २ *to put in tune* लावणें; as, "To S. a violin." ३ *to put on a string* गोवणें, ओंवणें, गुंफणें, पटविणें. ४ *to make tense or firm* ताणणें, तणतणावणें, तणतणीत करणें, मजबूत करणें, ताठ करणें. ५ *to take the strings off* बंद सोडणें, कसणी सोडणें. [To S. A BOW धनुष्याची दोरी चढविणें, गुण चढविणें.] ६ (*bot.*) शेंगांच्या (सांध्यावरच्या) शिरा काढणें.

String-course *n.* (*archit.*) कार्निसची लांबलचक रांग *f*, गलथा *m*.

Stringed instruments *n. pl.* तंतुवाद्यें *n. pl.*

Strin'gency *n.* कडकपणा *m.* २ चणचण *f*.

Stringent (stri'njent) [ L. *stringere*, to draw tight. ] *a.* (of rules, stipulations, &c.) कडक, सख्त, कडकडीत, पळवाट नसलेला. २ (of money-market) *tight* चणचणलेला, कडक, कडकलेला.

Strin'gently *adv.* कडकपणानें, सख्तपणानें.

String'iness *n.* दोराळपणा *m*, दोर *m*, तार *f*, रेषा *f*.

String'y *a.* *fibrous* तंतुमय, सूत्रमय. २ *viscid* दोर झालेला, दोराळ, तार सुटलेला. [S. SUBSTANCE लुकण *n.* TO BE S. दोरावणें. ]

Strip (strip) [Of Anglo -Saxon origin.] *v. t. to lay bare* नागवा करणें, उघडा -वस्त्रहीन करणें, वस्त्रें -वेष्टन काढून टाकणें -उतरणें *g. of o.* [To S. ONE TO THE SKIN दिगंबर करणें. To S. A HOUSE घरांतील सामानसुमान काढून टाकणें. To S. A SHIP गलबताचीं अवजारें काढून टाकणें. To S. A TREE झाडाच्या फांद्या, साली वगैरे काढून टाकणें. To S. A COW चिटणें, चिटून काढणें. To S. TOBACCO तंबाकूचीं डेखें काढून टाकणें. To S. A SCREW स्क्रूचे आंटे घांसून काढणें.] २ *to plunder* नागवणें, बुचाडणें, धुऊन टाकणें, नागवण करणें.

Strip *n.* चिंधी *f*, चिंधूक *n*, चिंधुकली *f*, चिंधोटी *f*, फाळा *m*, फाळी *f*. २ झेड *f*. ३ पट्टी *f*, चिरोटी *f*.

Stripe (strīp) [Low Ger. *stripe*, a stripe.] *n. a long narrow band on a surface of a different colour* पट्टी *f*, पट्टा *m*, काडी *f*, लकीर *f*, सळी *f*; as, "*Stripes* on soldier's trousers." २ फीत *f*; as, "Sergeant's *stripes.*" [To GET ONE'S STRIPES (नवीन) फीत मिळणें, बढती मिळणें. To LOSE ONE'S S.s फीत कमी होणें, कमी पगारावर येणें. ] ३ *stroke of a lash* फटका *m*, फटकारा. ४ *mark of a lash* वळ *m*.

Stripe *v. t. to form stripes in different colours* आडव्याउभ्या रंगित पट्ट्या काढणें, रंगित सळ्या भरणें. Striped *pa. t.* & *pa. p.* Stri'ping *pr. p.*

Striped *a.* पट्ट्यापट्ट्या काढलेला, सळ्या भरलेला, पट्टे काढलेला, पटाईत (वाघ). [GOLD OR YELLOW S. सोनसळी (लुगडें, &c.). S. IN THE FORM OF DAGGERS कट्यारीदार, कट्यारी. ] २ *having raised seams* दंडी, दंडारा.

Stripling (strip'ling) [Dim. of Strip.] *n. a youth* (not sufficiently grown to manhood) पोऱ्या *m*, आडबाप्या *m*, सोळवर्षी *m*.

Strip'ped *pa. t.* & *pa. p.* Strip'ping *pr. p.* of Strip.

Strip'ped *a.* नागवा केलेला, वस्त्रहीन केलेला. २ काढलेला, उतरलेला. ३ नागवलेला.

Strip'per *n.* नागवा करणारा *m*, वस्त्रहीन करणारा *m*. २ नागवणारा *m*, बुचाडणारा *m*.

Strive (strīv) [Of Old French origin.] *v. i. to make efforts* (for something) झटणें, यत्न -प्रयत्न

-आयास -सायास -प्रयास करणें, मेहनत -श्रम -कष्ट घेणें -करणें, झटून उद्योग करणें; intensively जोर करणें, ऊर फोडणें, भगीरथ प्रयत्न करणें, जीव देणें, जीव टाकणें, उरस्फोड करणें, अट्टाहास करणें. २ (*with* or *against* an opponent) झुंजणें, झगडणें, तंडणें. ३ *to vie with* बरोबरी करणें, स्पर्धा करणें, सर करणें, सर लावणें. [To S. TOGETHER OR WITH EACH OTHER मोठेपणाकरितां झगडणें -झुंजणें.] Strove *pa. t.* Striv'en *pa. p.*

Striv'er *n.* झगडणारा *m*, झुंजणारा *m*. २ झटून उद्योग [करणारा *m*, झटणारा *m*.

Striv'ing *pr. p. a.* झगडणारा. २ झटून उद्योग करणारा.

Strobile (stro-b'il) *n.* (*bot.*) स्ट्राबिल जातीचें फळ *n*. हें लांबोडें व खवलेदार असतें, व यामध्यें बीजें अंडाशयांत झांकलेलीं असतात. हें फळ पुष्कळ फुलें एकत्र होऊन होतें. उदाहरणार्थ, हॉपवृक्षाचें फळ *n*.

Stroke (strōk) [A. S. *strican*, to strike.] *n.* ठोका *m*, टोला *m*, आघात *m*, प्रहार *m*, धसका *m*, चपेट *f*, झटका *m*, झटकारा. [S. OF THE PULSE नाडीचा ठोका *m*. S. OF A BAT ब्याटचा टोला *m*. BY A S. OF LIGHTNING विजेच्या आघातानें, वीज पडून. S. OF THE HEART हृदयाचा ठोका *m*. SUN-STROKE उन्हाची तिरिप *f*. FINISHING S. जीव घेणारा टोला *m*. S. OF PARALYSIS पक्षघाताचा झटका *m*.] २ (of a stick, cane) फटका *m*, फटकारा *m*. ३ *sounding stroke* तडाखा *m*, कडाखा *m*, कचका *m*, दणका *m*, रामरट्टा *m*. ४ (of a sword) घाव *m*. ५ *single effort put forth* झपाटा *m*, दम *m*, दणका *m*. ६ *one complete performance of a recurrent action or movement* (पिस्टनची वगैरे) फेरी *f*. ७ वल्ह्याचा फटका *m*. ८ (पेन्सिलीचा, लेखणीचा) फटका *m*, फटकारा *m*, फांटा *m*. ९ रेघा *f*, रेषा *f*, रेखा *f*, फांटा *m*, फटकारा *m*. [FINISHING STROKES (OF A PICTURE) शेवटचा हात *m*.] १० (of a clock) ठोका *m*, टोला *m*. ११ (of a swimmer) झांप *f*, झेंप *f*, थाप *f*, छाप *f*. [S. OF AFFLICTION OR CALAMITY, &c. दुःखाचा किंवा दुर्दैवाचा घाला *m*. S. OF BUSINESS धंद्यांत मिळालेलें घबाड *n*. S. OF GENIUS प्रचंड बुद्धीचें काम *n*. MASTERLY S. उस्तादी कसब *n*.]

Stroke *v. t. to pass the hand gently and repeatedly in the same direction* हात फिरविणें, चाकचोपी -चाकीचोपी करणें; as, "To S. one's beard." [To S. ONE DOWN कोप शांत करणें.] २ (by way of endearment) कुरवाळणें, गोंजारणें, (पाठीवरून) हात फिरविणें.

Stroll (strōl) [Of doubtful origin.] *v. i.* रमणें, इकडेतिकडे फिरणें, रमतेरमते फिरणें, उनाडणें, हिंडणें, फेरफटका करणें, सहल करणें. Strolled *pa. t.* & *pa. p.*

Stroll *n.* रमणें *n*, फेरफटका *m*, सहल *f*, रपेट *f*, विहार *m*. [To TAKE A S. फेरफटका करणें, चक्कर मारून येणें.]

Stroll'er *n.* फेरफटका करणारा *m*, फिरणारा *m*.

Stroll'ing *n.* फेरफटका करणें *n*. S. *pr. p. a.* फेरफटका करणारा, हिंडणारा, फिरणारा, फिरता; as, "S. players."

Stroll'ingly *adv.* रमतेरमते, रमतगमत.

**Strong** ( strong ) [ A. S. *strang*, strong. ] *a.* ( of persons ) मजबूत, जोरदार, बळकट, खंबीर, दांडगा, बळवान्, प्रबळ, समर्थ, सशक्त, जोमदार, जोमाचा, जबर, पराक्रमी, सतेज, तेजस्वी. २ ( of things ) मजबूत, बळकट, कणखर, सणसणीत, जोरदार, संगीन, भक्कम, जिवट. ३ भारी; as, "S. candidate." ४ जहाल, कडक; as, "S. drink." ५ *energetic* जोराचा, परिणामकारक, उत्साहाचा, निश्चयाचा, अमोघ; as, "S. effort." ६ अनियमित, ज्यांच्या भूतकाळाचीं व भूतभूतकाळाचीं रूपें अनियमित होतात अशीं ( क्रियापदें ). ७ ( wind, tide ) जोराचा, झपाट्याचा, सपाट्याचा, तडाख्याचा. ८ ( smell, scent ) उग्र, उग्रट. ९ ( cloth, thread ) घनवट, जिवट, धडधाकड, धडवती, धडोतीचा. १० ( language ) सणसणीत, कडक. ११ ( *med.* ) गुणकारी, गुणकारक, जालीम, जळाल, जाज्वल्य. [To WAX S. जोरावणें, बळावणें. THE S. सशक्त मनुष्यें *n. pl.* BY THE S. ARM OR HAND शक्तीनें, दांडगाईनें. S. BOX ( दरोडेखोरांना फोडतां न येणारी ) भक्कम तिजोरी *f.* S. BREATH दुर्गंधि *f.* S. BUTTER खंवट लोणी *n.* S. DRINK दारू *f,* मादक पेय *n.* S. HAND दांडगाई *f,* जबरदस्ती *f,* जबरी *f.* S. MARKET ( हळुहळु ) चढलेले बाजारभाव *m. pl.* S. ONION तिखट कांदा *m.* S. ROOM ( दरोडेखोरांना फोडतां न येणारी व्यांकेंतील ) मजबूत खोली *f.* S. TEA कडक चहा *m.* S. WATER मादक पेय *n.*]

**Strong-built** *a.* मजबूत बांध्याचा, दांडगट.

**Strong-hold** *n.* किल्ला *m.*

**Strong'ly** *adv.* जोरानें, मजबूत.

**Strong-minded** *a.* ( *esp.* of women ) करारी, ठामविचाराचा, निग्रही.

**Strong-mindedness** *n.* करारीपणा *m,* निग्रहिपणा *m.*

**Strong-smelling** *a.* उग्र, उग्रट. २ *of strong and diffusive odour* घमघमीत.

**Strongylus** ( stron'-gi-lus ) *n.* ( *med.*) मूत्रपिंडांतील एक कृमि *m,* मासे खाणाऱ्या प्राण्यांत हे कृमि होतात; परंतु मासे खाणाऱ्या मनुष्यांतहि केव्हां केव्हां आढळतात.

**Strop** ( strop ) [Older form of Strap.] *n.* (न्हाव्याचें) पलाटणें *n.* S. *v. t.* पलाटण्यावर वस्तऱ्याला धार लावणें. Strop'ped *pa. t.* and *pa. p.* Stropping *pr. p.*

**Strove,** *pa. t.* of Strive.

**Struck, Striken** *pa. p.* (of Strike) हाणलेला, मारलेला, हत (as, हतभाग्य, हतवीर्य ), आहत (as, दैवाहत).

**Struc'tural** *a.* बांधणीचा, रचनेचा, घडणीचा, &c.

**Structure** ( struk'tūr ) [L. *structura -structum*, to build.] *n.* ( घराची ) बांधणी *f,* ( शरीराची ) रचना *f,* बांधा *m,* ( यंत्राची ) बनावट *f,* ( खडकाची ) मांडणी *f,* ( दागिन्याची ) घडण *f,* घाट *m.* २ *building* घर *n,* इमारत *f;* as, "A fine marble S." ३ ( *med.* ) रचना *f.* [NERVOUS S. ज्ञानतंतुरचना *f.*]

**Strug'gle** *n.* धडफडणें *n,* हातपाय झाडणें *n.* २ तडफड *f,* तडफडाट *m,* धडफड *f,* धडफडाट *m,* आपटाआपट *f,* आदळआपट *f,* कलह *m.* [S. FOR EXISTENCE जीवनार्थकलह, जीवनकलह.] ३ *violent effort* उरस्फोड *f,*

आटाआट *f*, प्रयास *m*. ४ युद्ध *n*, संग्राम *m*, झटापट *f*. ५ झोंबी *f*, झोंबाझोंबी *f*. ६ झगडणें *n*, झगडा *m*.

Struggle ( strug'l ) [Of doubtful origin.] ( with contortions of the body ) *v. i. to make violent efforts to get free* धडफडणें, तडफडणें, हातपाय झाडणें -आदळणें -आपटणें, तडफड -धडफड करणें -मांडणें, आपटाआपट *f* -आदळआपट *f*. करणें -मांडणें. २ *to use great efforts* आटोकाट प्रयत्न करणें, जीव देऊन -जीव तोडून काम करणें. ३ *to wrestle, to strive* झोंबी करणें, झोंबाझोंबी करणें. ४ दांडगा प्रयत्न करणें; as, "*Struggled* to express himself." ५ ( with difficulties ) झगडणें, गटकळ्या खाणें. Strug'gled *pa. t.*

Strug'gler *n*. धडफडणारा *m*. २ झगडणारा *m*.

Strug'gling *pr. p*. धडफडणारा. २ झगडणारा.

Stru'ma, Strumous, Same as Scrofula, Scrofulous.

Strumpet ( strum'pet ) [L. *stuprum*, dishonour-*struprare*, to debauch.] *n*. कसबीण *f*, बाजारवसवी *f*.

Strung *pa. p*. of String गोंवलेला, गुंफलेला, गुंफित &c.

Strut ( strut ) [ Of Low German origin. ] *n*. धिरा *m*, तीर *m*. S. *v. t*. धिरा लावणें, तीर लावणें.

Strut ( strut ) [ Of Low German origin. ] *v. i*. नटूनथटून चालणें, मिरवणें, ठुमकणें, ठमक्यानें -नखऱ्यानें -अकडीनें चालणें, ठुमकत -मिरवत चालणें. २ ऊर काढून चालणें, उताणा चालणें. Stru'tted *pa. t. & pa. p*.

Strut *n*. ठुमकणें *n*, मिरवणें *n*. २ अक्कड *f*, ठमका *m*, नखरा *m*.

Strut'ter *n*. ठमकणारा *m*, ठमकत चालणारा, अक्कडबाज.

Strut'ting *pr. p*. S. *v. n*. ठमकत चालणें *n*.

Strut'tingly *adv*. नटूनथटून, ठमकत, ठुमकत, मिरवत.

Strychnia ( strik'-ni-a ) [ Gr. *strychnos*, a kind of nightshade. ] *n*. ( *med.* ) कुचल्याचें सत्त्व *n*, कुचल्याचें विष *n*.

Strychnine ( strik'nin ) *n*. कुचल्याचें विष *n*.

Stub ( stub ) [ Of Anglo-Saxon origin. ] *n*. खुंट *m*, धस *m*, धसकट *n*, सुळा *m*, सुळका *m*, सुळकी *f*, शल्य *n*, ठोंबा *m*, बुंधा *m*. २ ( पेन्सिल, विडी, कुत्र्याचें शेंपूट वगैरेचें ) खुंटण *n*, खुंट *m*. ३ नालाची झिजलेली मेख *f*. ४ (चेक दिल्यावर राहिलेला) चेकबुकांतला तुकडा *m*.

Stub *v. t*. खुंट खणून काढणें, खुंट खुरपून काढणें. २ बुंधापर्यंत तोडणें, खुंटापर्यंत तोडणें, बुंध्यावर हाणणें -मारणें.

Stub'bed *pa. t. & pa. p*. Stub'bing *pr. p*.

Stubble ( stub'l ) [L. *stipula*, stubble.] *n*. ( धान्य कापल्यावर राहिलेला ) खुंट *m*, कुडसर *m*. २ (दाढीचा) खुंट *m*.

Stubborn ( stub'orn ) [Lit. fixed like a stub, A. S. *styb*, a stub.] *a*. हट्टी, आग्रही, दुराग्रही, अडेल, अडील, खलेल. Stub'bornly *adv*. हट्टानें, आग्रहानें, दुराग्रहानें, दुराग्रह धरून, अडेलपणानें.

Stub'bornness *n*. हट्टीपणा *m*, आग्रहीपणा *m*. हट्ट *m*, आग्रह *m*, दुराग्रह *m*.

Stubby ( stub'i ) *a*. खुंट असलेला, बुंधे असलेला.

Stucco (stuk'ō) [Of Italian origin.] *n.* चुन्याचा गिलावा *m*, सन्दला *m*. २ गिलाव्याचें काम *n*. S. *v. t.* चुन्याचा गिलावा करणें. Stucco'ed *pa. t.* and *pa. p.* Stuccoes *n. pl.* Stucco-ceiling *n.* गिलाव्याचें छत *n*.

Stucc'oer *n.* चुन्याच्या गिलाव्याचें काम करणारा *m*.

Stuck *pa. p.* of Stick.

Stuck-up *a. conceited, insolently exclusive* आढ्यतेचा, तोऱ्याचा, मान वर करून चालणारा, ताठ. २ (collar) खडा, उभा, ताठ.

Stud (stud) A. S. *studu*, a post, a nail, ] *n. an ornamental nail* चमकी *f*. २ *an ornamental knob* बिनडोक्याचा बोलट *m*. ३ शर्टाचें बटन *n*, कॉलरचें बटन *n*. ४ *an embossed nail* गुलमेख *f*. S. *v. t.* चमक्या -गुलमेखा जडणें -जडविणें. २ (मजबुतीकरितां) गुलमेखा मारणें. Stud'ded *pa. p.* गुलमेखा जडवलेला. २ जडित, खचित. [S. WITH PRECIOUS STONES रत्नखचित, रत्नजडित. S. WITH PEARLS मौक्तिकखचित.] Stud'ding *pr. p.*

Stud (stud) [A. S. *stod*, a stud.] *n.* पैदाशीकरितां घोडे व घोड्या. २ (शर्यतीचे किंवा शिकारीचे) घोडे *m. pl*. ३ घोड्यांचें पैदासघर *n*.

Stud-book *n.* घोड्यांच्या वंशावळीचें पुस्तक *n*.

Stu'dent *n.* विद्यार्थी *m*, विद्याभ्यासी *m*, शिकणारा *m*, शिष्य *m*. २ विद्याव्यासंगी *m*, विद्याव्यसनी *m*. ३ शिष्यवृत्ति मिळविणारा *m*, शिष्यवृत्तिधारी *m*.

Stu'dentship *n.* शिष्यवृत्ति *f*, छात्रवृत्ति *f*.

Stud-farm *n.* घोड्यांचें पैदासघर *n*.

Stud-horse *n.* वळू घोडा *m*.

Stud'ied *pa. t.* of Study. S. *pa. p. a.* अभ्यास केलेला, शिकलेला. २ पूर्वी योजून ठेवलेला, पूर्वयोजित, पूर्वसंकल्पित. ३ मुद्दाम केलेला, बुद्धिपुरःसर केलेला.

Stu'dio *n.* (चितारी, खोदकाम करणारा आणि प्रकाशलेखक यांची) काम करण्याची खोली *f*. (a) चित्रगृह *n*. (b) मूर्तिगृह *n*. (c) प्रकाशलेखगृह *n*. Studios *pl.*

Stu'dious *a.* अभ्यासी, खूब अभ्यास करणारा, विद्येची गोडी असणारा, विद्याव्यासंगी. २ *diligent, pains-taking* मेहेनती, उद्योगी. ३ जाणूनबुजून केलेला, मुद्दाम केलेला.

Stu'diously *adv.* अभ्यासांत, अभ्यास करून. २ उद्योगपूर्वक, परिश्रमानें. ३ जाणूनबुजून, मुद्दाम.

Stu'diousness *n.* अभ्यासिपणा *m*, विद्याव्यासंग *m*. २ उद्योगिपणा *m*, उद्योग *m*.

Stud'y *n.* अभ्यास *m*, विद्याभ्यास *m*, पढणें *n*, शिकणें *n*, अध्ययन *n*, व्यासंग *m*, विद्याव्यासंग *m*. [CLOSE S. परिशीलन *n*, पुरा अभ्यास *m*. DISCURSIVE OR DESULTORY S. उडतउडत अभ्यास, वरवरचा अभ्यास *m*. A BROWN STUDY डोक्यांतील विचारांचें भ्रमण *n*.] २ अभ्यासाची खोली *f*. ३ भाषण पाठ करणारा (नट) *m*. ४ विशेष अभ्यास *m*, शोधपूर्वक अभ्यास; as, "*Studies* in Shakespeare." ५ शिकण्याचा विषय *m*, अध्ययनाचा विषय *m*. ६ विशेष लक्ष पुरविण्याचा विषय *m*. ७ विशेष प्रयत्न *m*; as, "It shall be my S. to please him." ८ (हात बसण्याकरितां काढलेलें) अभ्यासाकरितां रेखाचित्र *n*. ९ *a treatise* ग्रंथ *m*. Stud'ies *n. pl.*

Study (stud'i) [L. *studeo*, I am eager or zealous.] *v. t. to read in order to learn* अभ्यास करणें, अध्ययन करणें *g. of o.*, शिकणें. [To S. FOR THE BAR ब्यारिस्टरीचा अभ्यास करणें. To S. UP (A SUBJECT) (एखादा विषय परीक्षेकरितां) अभ्यासानें तयार करणें.] २ *to form and arrange by thought* विचार (पूर्वीं) करणें, विचार (पूर्वीं) करून ठेवणें, तजवीज *f* -योजना *f* -रचना (पूर्वीं) करून ठेवणें. ३ *to con over* विचार करणें, ध्यान करणें, मनांत घोळवणें, मनन करणें. [To S. OUT (पुष्कळ विचार करून) शोधून काढणें.] ४ प्रयत्न करणें, दक्षता ठेवणें, काळजी घेणें; as, "He *studies* to avoid disagreeable topics." S. *v. i.* शिकणें, विद्याभ्यास -अभ्यास -अध्ययन करणें. २ *to meditate* मनन करणें, चिंतन करणें. ३ *to strive, to endeavour diligently* झटणें, उद्योग करणें. ४ काळजी घेणें.

Stud'ying *pr. p.* अभ्यास करणारा, अध्ययन करणारा.

Stuff (stuf) [O. Fr. *estoffe* -L. *stuppa*, tow.] *n. materials of anything* उपादान *n*, वस्तु *f*, द्रव्य *n*, सामान *n*. २ *essence, elemental part* तत्त्व *n*, दम *m*; as, "There is no *stuff* in him." ३ *sterling qualities* अस्सल गुण *m. pl.* ४ माल *m*; as, "Some S. they call petrol." [FOOD STUFFS धान्यें *n. pl.*, दाणागोटा *m*. GREEN S., GARDEN S. ओला भाजीपाला *m*. DOCTOR'S S. औषध *n*.] ५ *any woollen fabric* (opposed to silk, cotton, or linen fabrics) लोंकरीचा कपडा *m*. ६ *valueless matter, refuse* सटरफटर सामान *n*, किरकोळ सामान *n*. ७ *possessions generally* (*esp.* household furniture) चीजवस्त *f*, जिंदगी *f*, मालमत्ता *f*, सामानसुमान *n*. ८ (*naut.*) वंगण *n*, लुब्री *f*.

Stuff *v. t. to pack, to cram* चिकार भरणें, ठेंचून -खेंचून -गच्च -दाट -रगडून -खचून -दपटून -कोंदून -ठांसून -दडपून -चोंदून भरणें; as, "To S. cushion with down." [STUFFED BIRDS, STUFFED BEASTS पेंढा भरलेले पक्षी किंवा पशू. STUFFED FOWL (शिजविण्याकरितां) पुरण घातलेलें बदक *n*. To S. A CHILD मुलाच्या तोंडांत अन्न कोंबणें. STUFFING-BOX प्याकिंग व गलान (GLAND) बसविण्याची पेटी *f*.] २ *to press into receptacle* कोंदणें, चोंदणें, चोंदडणें, खचणें, ठांसणें, खोसणें, खचून भरणें. ३ (the nose, &c.) *to block up* चोंदणें, कोंदणें, बंद करणें, बुजवणें. S. *v. i. to feed gluttonously* कचकावून खाणें, ओ होय तों जेवणें, भरगच्ची जेवण जेवणें, कोंदणें, दपटणें. २ कातडीं तयार करणें. Stuff'ed *pa. t. & pa. p.* S. *a.* दाट भरलेला, ठांसलेला, कोंदलेला. [To BE STUFFED चोंदणें, कोंदणें, कोंदाटणें.]

Stuff'er *n.* (जनावरांच्या) चामड्यांत पेंढा भरणारा *m*.

Stuff'ing *n.* पुरण *n*, मसाला *m*. २ भरण *n*, भराव *m*.

Stuff'y *a.* बंद झालेला, बुजलेला; as, "S. valley." २ (सामानसुमानानें) गच्च भरलेली (खोली), कोंदट.

Stultify (stul'ti-fī) [L. *stultus*, foolish, and *facere*, to make.] *v. t.* (of act or statement) *to reduce to absurdity* मूर्खपणाचें ठरविणें. २ *to exhibit* (one-

self ) *in a ridiculous light* आपलें हंसें करून घेणें.
Stul'tified *pa. t.* and *pa. p.* Stul'tifying *pr. p.*

Stumble ( stum'bl ) [ Of Icelandic origin.] *v. i.* अडखळणें, ठेंच लागणें, ठोकर *f.* खाणें -लागणें. २ *to make blunders in doing something* घोडचुका करणें. ३ ( with *on* or *upon* ) अवचित सांपडणें, अकल्पित सांपडणें -कळणें -भेटणें, all with *in. con.* S. *v. t.* अडखळवणें, ठोकर -ठेंच देणें -खावयास लावणें. २ *to perplex* गोंधळवणें, घोंटाळ्यांत -बुचकळ्यांत घालणें -पाडणें, घोंटाळा *m* -घोळ करणें. Stumbled *pa. p.*

Stum'ble *n.* अडखळणें *n*, ठेंचळणें *n.* २ ठेंच *f*, ठोकर *f.*

Stum'bler *n.* अडखळणारा *m*, ठेंच खाणारा *m.*

Stum'bling *pr. p.* अडखळणारा, ठेंच खाणारा.

Stumbling block, Stumbling place, Stumbling stone अडचण *f*, धोंड *f*, आडचें *n.*

Stump (stump) [Of Icelandic origin.] *n.* (तोडलेल्या झाडाचा, मोडलेल्या दांताचा, कापलेल्या अवयवाचा, झिजलेल्या पेन्सिलीचा, जळून गेलेल्या सिगारेटचा, झिजलेल्या बरासाचा ) खुंट *m*, खुंटारी *m*, खोड *n*, बुंधा *m*, खुटण *n*, खुंटी *f.* [ SHARP S. सुळा *m*, सुळका *m.* ] २ (*of a worn article*) बुंठण *n*, ढुंटण *n*, थोंट *n*, थोंटण *n*, बोंटूक *n.* ३ ( cricket ) खुंट *m*, स्टम्प. [ MIDDLE S. मध्यखुंट, मधला खुंट *m.* OFF S. पैलखुंट *m*, हातखुंट *m.* LEG S. जवळचा खुंट *m.*] S. *v. i.* दणदणणें, दणदणं -दणकन् चालणें, पाय हापटीत चालणें. २ ( cricket, with *out* ) स्टम्पआऊट करणें, गाभडणें. ३ बुंधापर्यंत तोडणें, तोडून ठोंबा करणें. ४ (निवडणुकीचे वेळीं) मतदारांना व्याख्यानें देत फिरणें.

Stump'ingly *adv.* दणकर, दणदण.

Stump'-orator *n.* खळबळ उडवून टाकणारा व्याख्याता *m*, (मनोवृत्ति) खळबळवून टाकणारीं व्याख्यानें देणारा *m.*

Stump'-oratory *n.* खळबळ उडवून देणारें वक्तृत्व *n.*

Stump'y *a.* गिड्डा, गट्ट. २ थोटा, बुंटा, लांडा.

Stun ( stun ) [A. S. *stun*, a din.] *v. t. to knock senseless* ( by a blow ) तडाखा देऊन मूर्च्छित करणें, रट्टा मारून बेसावध -बेहोष करणें. २ *to deafen* कानठाळ्या बसविणें, बहिरा करणें. [ TO BE STUNNED कानठाळी बसणें *g. of s.* ] ३ *to surprise completely* आश्चर्यचकित करणें, थक्क करणें, अक्कल गुंग करणें.

Stung *pa. p.* (of Sting) नांगी मारलेला, दंशित, डसलेला.

Stunk *pa. p.* of Stink.

Stun'ned *a.* बेसावध केलेला. २ कानठाळ्या बसविलेला.

Stun'ner *n.* आश्चर्यचकित करणारा. २ थक्क करणारें कृत्य *n.*

Stun'ning *pr. p.* बेसावध करणारा. २ कानठाळ्या बसविणारा. ३ थक्क करणारा.

Stunt (stunt) [A. S. *stunt*, blunt.] *v. t.* ( *esp.* in *pa. p.* ) *to check growth or development of* खुरटवणें, वाढ खुंटवणें, वाढ मोडणें *g. of o.*

Stunt'ed *a.* खुरटलेला, खुरटा, खुजट, खुजा, खुरटवलेला. [ TO BE OR TO BECOME S. खुरटणें, खुरगटणें. ]

Stunt'edness *n.* खुजटपणा *m*, खुरटेपणा *m.*

Stupe ( stūp ) [Gr. *stuppe*, a tow.] *n.* फ्लानेलनें शेकणें *n.* २ शेकण्याकरितां फ्लानेलचा तुकडा *m.* S. *v. t.* (गरम पाण्यांत भिजविलेल्या ) फ्लानेलनें शेकणें.
Stupefac'tion *n.* अक्कल ठिकाणावर न राहणें *n*, शुद्ध कमती होणें *n*, धुंदी *f*, गुंगी *f*, बेसावधपणा, बेहोषपणा.
Stupefac'tive *a.* धुंदी आणण्याचा धर्म असणारा, loosely धुंदी आणणारा, गुंगी आणणारा, गुंग करणारा.
Stu'pefier *n.* धुंदी आणणारा *m*, &c.
Stupefy (stū'pe-fī) [L. *stupere*, to be struck senseless, and *facere*, to make.] *v. t.* गुंग करणें, धुंद करणें, गुंगविणें, गुंगी -धुंदी आणणें. Stupefied *pa. t.*
Stu'pefying, Same as Stupefactive.
Stupendous ( stū-pen'dus ) [L. *stupere*, to be amazed.] *a.* फारच मोठा, विलक्षण. २ चकभूल पाडणारा, आश्चर्यकारक, विस्मयकारक.
Stupen'dousness *n.* अतिशय मोठेपणा *m.* २ विस्मयकारकता *f*, आश्चर्यकारकता *f.*
Stupid (stū'pid) *a.* गुंगी आलेला, धुंदी आलेला, गुंग, धुंद. २ *deficient in understanding* मूर्ख, मूढ, जड, मंद, बुद्धीचा जड, मंदबुद्धि, मूढमति, मठ्ठ, मठ्ठ्या, दगड्या, बुद्धिहीन, बेवकूब. ३ *done without reason or judgment* अविचारानें केलेला, अविचाराचा, मूर्खपणाचा.
Stupid'ity, Stu'pidness *n.* धुंदपणा *m*, गुंगपणा *m*, गुंगी *f*, धुंदी *f*, सुस्ती *f.* २ मूर्खपणा *m*, बुद्धीचा जडपणा -मंदपणा, मंद मति *f*, मंद बुद्धि *f*, मूढता *f*, मोह *m.*
Stupor (stū'-por) *n.* गुंगी *f*, धुंदी *f*, झांपड *f*, बेहोषपणा *m*, बेसावधपणा *m*, बेशुद्धि *f*, बेशुद्धपणा *m*, व्यामोह *m.*
Stur'diness *n.* (शरीराचा) बळकटपणा *m*, धट्टेकट्टेपणा *m*, राकटपणा *m*, कणखरपणा *m.*
Sturdy ( stur'di ) [Of doubtful origin. ] *a.* बळकट, राकट, कणखर, धट्टाकट्टा, धटिंगण, दांडगा. Sturdier, *comparative*; Sturdiest, *superlative.*
Stur'geon *n.* स्टर्जन जातीचा मासा *m.*
Stutter ( stut'ėr ) [Of German origin.] *v. i. to stammer* तोतरें बोलणें, चोचरें बोलणें.
Stutt'erer *n.* चोचरें बोलणारा *m.* Stutt'ering *n.* चोचरें बोलणें *n.*
Sty ( stī ) [A. S. *stigan*, to step up.] *n.* रांजणवाडी [*f*, आंजुर्ली *f.*
Sty ( stī ) [Of German origin.] *n.* डुकरवाडा *m.* २ कुंटणखाना *m.* S. *v. t.* डुकरवाड्यांत ठेवणें.
Style ( stīl ) [L. *stilus*, style. स्टाइल शब्दाचा मूळ अर्थ मेण लावलेल्या पाटीवर अक्षरें कोरण्याची, व तीं पुसून टाकण्याची शलाका असा आहे. ] *n.* सळई *f*, शलाका *f.* २ लेखणी *f*, टांक *m.* ३ ( of a dial ) शंकु *m.* ४ ( *astron.* ) शंकूचा कांटा *m.* ५ स्त्रीकेसरनलिका *f*, परागवाहिनी *f*, स्त्रीकेसराचा दांडा *m.* ६ ( *civil engin.* ) उभी दांडकी, बाही *f.* ७ ( लेखन ) पद्धति *f*, रीति *f*, धर्ती *f*, सरणी *f*, शैली *f.* ८ धाटणी *f*, धर्ती *f*, धाटी *f*, ढेव *f*, ठेवण *f*, मोडणी *f*, डौल *m*, ढब *f.* ९ किताब *m.* १० श्रीमंती डौल *m*, थाट *m*, श्रीमंती रहाणी *f.* ११ चित्रणपद्धति *f.* Style *v. t.* म्हणणें, किताब देणें.

Sty'let ( stī-let ) [ Of O. Fr. origin. ] *n.* मूत्रशलाकेची ताठ तार *f,* मूत्राशयांत घालण्याची सळई *f.*

Sty'lish *a.* भपकेबाज, डौलबाज, ऐटी, ऐटींत राहणारा -मिरवणारा, पोषाखाच्या नव्या नव्या तऱ्हांचा शोकी.

Stylograph ( stī'l-ō-graf ) *n.* आंगच्या शाईचा टांक *m.*

Sty'loid *a.* ( *anat.* ) कीलकाकृति (शंखास्थीचा उंचवटा ). [ S. PROCESS *n.* हाडाचें लेखणीसारखें टोंक *n,* कीलकाकृति अस्थ्यग्र *n.*]

Styptic ( stip'tik ) [ Gr. *styphein,* to contract. ] *a.* रक्त बंद करणारा, रक्तस्तंभक. S. *n.* रक्तस्तंभक *n.*

Sua'sion *n.* ( opposed to force ) *persuasion* उपदेश *m,* मन वळविणें *n;* as, "Moral S."

Suave ( swāv ) [ L. *suavis,* Sk. स्वादु, sweet. ] *a.* *bland, soothing* गोड, मधुर, सौम्य, मोहक, शामक; as, " S. person, speech, manners, medicine, &c."

Suavity (swā-v'i-ti) *n.sweetness of speech* गोडबोलेपणा *m,* गोडपणा *m,* मधुरता *f,* माधुर्य *n.* २ *politeness of manners* सभ्यपणा *m,* शिष्टपणा *m,* मार्दव *n.*

Sub-acid *a.* आंबटगोड.

Sub-acute *a.* ( *med.* ) मध्यमजोराचा.

Sub-agent *n.* धाकटा दलाल *m,* पोटदलाल *m.*

Sub-altern (sub'al-tern) [L. *sub,* Sk. उप, and *alter,* Sk. अन्य, other.] *n.* क्याप्टनच्या खालचा लष्करी अंमलदार *m,* सबआल्टर्न. २ ( logic ) परस्परावलंबी सिद्धान्त *m,* सामान्यविशेष *m.* S. *a.* सबआल्टर्न. २ ( logic ) परस्परावलंबी, सामान्यविशेष.

Subalter'nate *n.* ( logic ) परस्परानुयायी सिद्धांत *m,* सामान्यविशेष *m.* S. *a.* परस्परानुयायी, सामान्यविशेष. २ खालच्या प्रतीचा; as, "S. kinds."

Subaquatic, Subaqueous *a.* पाण्यांत रहाणारा, जलचर. २ पाण्याखालीं होणारा, जलेभव; as, "S. deposits." ३ पाण्यांत उपयोगीं पडणारा, जलोपयोगी; as, "S. helmet."

Sub-branch *n.* उपशाखा *f,* पोटशाखा *f.*

Sub'-class *n.* उपवर्ग *m,* उपभेद *m.*

Sub'-committee *n.* पोटकमिटी *f.*

Sub-con'scious *a.* अर्धवट जागा, अर्धप्रबुद्ध, अर्धजागृत.

Sub-con'tract *n.* पोटकंत्राट *n.*

Sub-contract'or *n.* पोटकंत्राटदार *m.*

Sub-constellation *n.* ( *astron.* ) अवान्तर तारापुंज *m.*

Sub-con'trary *a.* अनुविपरीत.

Sub-cotangent *n.* उपकोस्पर्शरेखा *f,* अवान्तरकोस्पर्शरेखा.

Sub-crep'itant rhonchus *n.* ( *med.* ) कुडकुड रव *m,* कुडकुड शब्द *m.*

Sub-cutaneous *a.* ( *med.* ) त्वग्निम्नस्थ.

Sub-divide' *v. t.* पोटभाग करणें, पोटभाग पाडणें.

Sub-div'ision *n.* वांट्याचा वांटा *m,* अंशांश *m,* पोटभाग *m.* २ ज़िल्ह्याचा भाग *m,* प्रांत *m.*

Sub-divi'sional *a.* प्रांताचा; as, "S. officer."

Subdual, Same as Subduing q. v.

Subduce' *v. t.* वजा करणें.

Sub-due ( sub-dū' ) [L. *sub,* under, and *ducere,* to lead.] *v. t. to conquer* जिंकणें, वश -स्वाधीन करणें

-करून घेणें, पादाक्रांत करणें, जित -पराजित करणें, वठणीस -जेरीस आणणें, हुकमांत -अंमलांत -ताब्यांत आणणें, हस्तगत -सर करणें; intensively भुईस -जमिनीस -धुळीस मिळविणें, लोळवणें, मारून चुना करणें, मारून पीठ करणें. २ *to destroy the force of* (-चा) जोर नाहींसा करणें, (-ची) नांगी मोडणें; as, "To S. fever." ३ *to tame* (as a child) वठणीस आणणें, नरम करणें, काबूंत -कह्यांत -कबजांत आणणें -ठेवणें. ४ *to soften* कमी करणें, फिका करणें; as, "To S. the brilliancy of colours." ५ दमन करणें.

Subdued' *pa. p.* जिंकलेला, वठणीस आणलेला, नरम केलेला, &c. [To BE SUBDUED वठणीस येणें.] २ *not glaring in colour* कमी झकाकीचा, फिका.

Subdu'er *n.* जिंकणारा *m*, वठणीस आणणारा *m*, &c.

Subdu'ing, Subdu'al *n.* जिंकणें *n*, वठणीस आणणें *n*, जेरीस आणणें *n*, दमन (as, इंद्रियदमन) *n*.

Sub-du'plicate *a.* (*math.*) उपद्विगुण (गुणोत्तर).

Sub-ed'itor *n.* उपसंपादक *m*, दुय्यम संपादक *m*.

Sub-ed'itorship *n.* उपसंपादकाची जागा *f*. २ उपसंपादकाची कारकीर्द *f*. ३ उपसंपादकाचें काम *n*.

Sub-epidermal *a.* बाह्यत्वचेच्या खालचा.

Suberose (sub-e-rōs') [L. *sub*, under, and *erosus* -*e*, out, and *rodere*, *rosum*, to gnaw.] *a.* बुचासारखी रचना असणारा, फुसफुशीत, काष्ठरोधरचनावत्.

Sub-group *n.* पोटग्रुप *m*, पोटगट *m*, धाकटी टोळी.

Sub-head *n.* पोटसदर *n*.

Sub-heading *n.* पोटसदर *n*. २ पोटमथळा *m*.

Sub-inspector *n.* सबइन्स्पेक्टर *m*, खालचा इन्स्पेक्टर.

Sub-involution *n.* (*med.*) प्रसूतीनंतर गर्भाशयाचें पूर्ण आकुंचन न होतां तो सैल राहणें *n*, हीनसंकोच *m*.

Subja'cent *a.* खालीं असलेला, खालचा, अधःस्थित.

Subject (sub'-jekt) [L. *sub*, under, and *jacere*, to throw.] *v. t. to subdue* जिंकणें, वश करणें. २ *to expose, to make liable* पात्र करणें, योग्य -जोगा करणें, आस्पद करणें. ३ *to put within the power of* अंमलांत आणणें, अंमलाखालीं आणणें, स्वाधीन करणें. ४ *to cause to undergo* भोगावयास -सोसावयास लावणें, भोगावयास भाग पाडणें; as, "To S. a person to a rigid test." ५ (hypnotism) मूर्च्छनेचा प्रयोग करणें, वशीकरण करणें, मूर्च्छनेच्या अमलाखालीं आणणें.

Sub'ject *a.* अंमलाखालचा, अंमलांतला; as, "S. to a foreign rule; S. to the laws of nature." २ हुकमांतला, ताबेदार, हुकुमबंदा, परतंत्र, पराधीन, परवश, परस्वाधीन; as, "A S. province, tribe." ३ *exposed to, liable to* योग्य, जोगा, पात्र; as, "S. to disease." [S. TO *adv.* अटीवर, गृहीत धरून, (अटीनें) बांधलेला. S. TO CORRECTION चुकीची दुरुस्ती करण्याच्या अटीवर.]

Sub'ject *n.* प्रजा *f*, रयत *f*. २ (*gram.*) कर्ता *m*. ३ (*logic*) उद्देश्य *n*. ४ (*philo.*) द्रष्टा *m*, विषयी *m*. ५ *the substratum of anything* अधिष्ठान *n*, अधिकरण *n*. (b) स्थान *n*, आधार *m*, आश्रय *m*. ६ (of any opera-

tion ) विषय *m*, आश्रय *m*, अधिष्ठान *n*, अधिकरण *n*, पात्र *n*. ७ *theme of discussion* विषय *m*, प्रकरण *n*, गोष्ट *f*, प्रतिपाद्य *n*. ८ (*anat.*) छेदनार्थ शव *n*, फाडण्याकरितां घेतलेलें प्रेत *n*. ९ विशिष्टप्रकृतीचा मनुष्य *m*; as, "Hysterical S." १० ( hypnotism ) विधेय *m*.

Sub'jected *pa. p.* अंमलांत आणलेला, जिंकलेला. २ -वर मूर्च्छनेचा प्रयोग केलेला, वश केलेला, &c.

Subjec'tion *n.* जिंकणें *n*, वश करणें *n*, अंमलांत आणणें *n*. २ ( hypnotism ) मूर्च्छनोत्पादन *n*, वशीकरण *n*, मूर्च्छन *n*. ३ ताबेदारी *f*, अधीनता *f*, अंकितपणा *m*, परवशता *f*, पारतंत्र्य *n*, पराधीनता *f*, आज्ञाधीनता *f*. [ IN S. TO ताब्यांत, अंमलांत. TO ACKNOWLEDGE S. ताबेदारी -अंकितपणा कबूल करणें, दांतीं -तोंडीं तृण धरणें. TO REDUCE TO S. ताब्यांत आणणें, वठणीस आणणें.]

Sub'jectist *n.* विषयिविज्ञानवादी *m*.

Subject'ive *a.* ( *gram.*) कर्तृवाच्य. २ अधिष्ठाननिष्ठ, अधिकरणनिष्ठ, आत्मगत, विषयिगत, नैज, प्रत्यक्, अन्तःसृष्टिविषयक. [ S. SCIENCE अन्तःसृष्टिशास्त्र *n*, आत्मविद्या *f*. S. PHILOSOPHY अन्तःसृष्टिविज्ञान *n*.]

Subject'ivism *n.* विषयिविज्ञानवाद *m*, विषयी हा सर्व ज्ञानाचें अधिष्ठान आहे असा वाद *m*.

Subject'ivist *n.* विषयिविज्ञानवादी *m*.

Subjectiv'ity *n.* अधिष्ठाननिष्ठता *f*, अन्तःसृष्टिसंबंधिता *f*. २ ( *philos.* ) नैजवाद *m*, स्वानुभववाद *m*.

Subject-matter *n.* विषय *m*.

Sub-join' *v. t.* खालीं जोडणें, खालीं -बाजूला लिहिणें.

Sub-judicæ *a.* (law ) चौकशी चाललेला ( खटला).

Sub-jugate ( sub'-jōō-gāt ) [L. *sub*, Sk. उप, and *jugum*, Sk. युग्म, a yoke.] *v. t.* जिंकणें, अंमलांत आणणें, कह्यांत -ताब्यांत आणणें.

Subjuga'tion *n.* जिंकणें *n*, ताब्यांत आणणें *n*.

Sub'jugator *n.* जिंकणारा *m*, ताब्यांत आणणारा *m*, &c.

Subjunctive ( sub-junk'tiv ) [L. *sub*, Sk. उप, and *jungere*, to join.] *n.* ( *gram.*) संशयार्थ *m*.

Sub-king'dom *n.* उपकोटि *f*. [पोटपट्टा *m*, पोटकौल *m*.

Sub-lease' *v. t.* कुळानें पोटकुळास पट्ट्यानें देणें. S. *n*.

Sublet' *v. t.* पोटभाड्यानें देणें.

Sublimate ( sub'-li-māt ) [L. *sublimare*, to raise.] *v. t.* ऊर्ध्वपातन *n*. करणें, उष्णतेच्या योगानें घनस्थितींतून एकदम बाष्पस्थितींत नेऊन थंड करून पुनः घन करणें, घनाचा बाष्प व बाष्पाचा घन करणें, फूल ( तयार ) करणें. S. *a.* ऊर्ध्वपातित, (घनाचा बाष्प करून) बाष्पाचा घन केलेला, फुलासारखा तयार केलेला, फूल केलेला. S. *n.* ऊर्ध्वपातित पदार्थ, फूल *n*. [CORROSIVE S. रसकर्पूर *m*, रसकापूर *m*.]

Sublima'tion *n.* ऊर्ध्वपातन *n*, फूल ( तयार ) करणें *n*.

Sublime' *v. t.* ( घनाचा बाष्प करून नंतर ) बाष्पाचा घन करणें, फूल करणें. २ ऊर्ध्वपातन करणें, ऊर्ध्वपातनानें शुद्ध करणें. S. *v. i.* ऊर्ध्वपातन होणें, फूल होणें. २ ऊर्ध्वपातनानें शुद्ध होणें.

Sublime ( sub-līm' ) [L. *sublimare*, to lift up.] *a.* उदात्त, अत्युच्च, अत्युत्कृष्ट, प्रशस्त, उन्नत, अतिश्रेष्ठ.

Subliminal (sub-lim'i-nal) [L. *sub*, under and *liminis*, the door.] *a.* अर्धवट जागा, अर्धजागृत.

Sublim'ity, Sublime'ness *n.* उदात्तपणा *m*, अत्युच्चपणा *m*, उत्कृष्टपणा *m*, श्रेष्ठपणा *m*.

Sublu'nar, Sub'lunary *a.* (*lit.*) चंद्राखालचा. २ इहलोकींचा, भूलोकाचा, ऐहिक.

Sub-luxa'tion *n.* अपूर्ण संधिभ्रंश *m*, अर्धविश्लेष *m*.

Submarine' *a.* समुद्रांतला, समुद्रतळचा, समुद्रतलस्थ.

Submarine' *n.* पाणबोट *f*, अन्तर्जलबोट *f*, अन्तर्जलनौका *f*.

Sub-ma'xillary *a.* (*med.*) (of glands) खालच्या दाभाडाखालील (पिंड), हनुलाला (पिंड).

Sub-membranous *a.* थोडासा आवरणत्वचेसारखा.

Submerge (sub-merj') [L. *sub*, under, and *mergere*, to plunge.] *v. t.* बुडविणें, मज्जन *n.* करणें. २ (*math.*) निमज्जन करणें. Submerged' *pa. p.* बुडविलेला, मग्न, निमग्न. Submer'ging *pr. p.* S. *n.* बुडविणें *n*, मज्जन *n*, निमज्जन *n*.

Submerg'ence *n.* बुडणें *n*, मज्जन *n*, निमज्जन *n*.

Submerse' *v. t.* Same as Submerge.

Submer'sion *n.* बुडणें *n*, मज्जन *n*, निमज्जन *n*.

Submis'sion *n.* दबणें *n*, वश होणें *n*, हार जाणें *n*, शरण जाणें *n*, वश असणें *n*. २ नम्रपणा *m*. ३ अधीनता *f*.

Submis'sive *a.* आज्ञेंत राहणारा, हुकमांत राहणारा, आज्ञानुवर्ती, हुकूम पाळणारा, शरणागत, हार खाणारा. २ नम्र, नम्रतेचा, नम्रपणाचा, नम्रतायुक्त.

Submis'sively *adv.* आज्ञेंत राहून, हार खाऊन, शरण येऊन, शरण जाऊन. २ नम्रपणानें.

Submis'siveness *n.* आज्ञानुवर्तित्व *n*. २ नम्रता *f*, नम्रपणा *m*.

Submit (sub-mit') [L. *sub*, Sk. उप, and *mittere*, to send.] *v. t. to surrender oneself for control* (usually with *to* or *unto* and the reciprocal pronoun) शरण जाणें, शरण येणें, हुकमांत -सत्तेंत -अधिकारांत -दावांत राहणें -असणें -वागणें, (स्वतःला दुसऱ्याच्या) स्वाधीन करणें -असणें -अंकित असणें. २ *to present for consideration or decision* पुढें मांडणें, पुढें ठेवणें, (कोर्टाकडे वगैरे) सोंपविणें; as, "To S. a thing to a man's inspection." ३ *to represent deferentially* मोठ्या अदबीनें किंवा सन्मानानें पुढें मांडणें; as, "I S. that this is a false inference." ४ पसंतीकरितां पाठविणें; as, "To S. estimates, &c." S. *v. i. to give way, to yield* शरण जाणें, शरण येणें, शरणागत होणें, वश होणें, दबणें. २ भांडण्याचें -लढण्याचें -वाद करण्याचें सोडणें, हार घेणें -पत्करणें, हात टेंकणें -जोडणें. ३ *to make submission* आज्ञेंत राहणें, हुकमांत -वचनांत -कह्यांत राहणें -वागणें -असणें, (-ची) आज्ञा पाळणें, (-ला) वश -अधीन होणें -असणें, हुकुमबंदा होणें -असणें.

Sub-mul'tiple *n.* (*math.*) अवान्तर अपवर्त्य *m*.

Sub-normal *n.* अवान्तर मुख्यलंब *m*, उपसंपर्कलंब *m*.

Sub-normal *a.* नेहमींपेक्षां कमी, ठराविक प्रमाणापेक्षां कमी; as, "S. temperature."

Sub-office *n.* (मुख्य हपिसा) खालचें हपिस *n*.

Subo'rdinacy *n.* ताबेदारी *f*, सेवकसंबंध *m*, अधीनता *f*.

Subordinate ( sub-or'di-nāt ) [ L. *sub*, Sk. उप, and *ordinis*, order. ] *a. of inferior importance or rank* खालचा, हाताखालचा, खालच्या पायरीचा, खालच्या दर्जाचा; as, " S. officers." २ *secondary* गौण, अप्रधान. [ S. SENTENCE गौण वाक्य. ] ३ *under the control of* ( -च्या ) ताब्यांतला, (च्या) हुकमांतला, हुकुमबंदा, अधीन, आयत्त. Subor'dinate *v. t.* ( with *to*) गौण स्थान देणें, कमी प्रतीचा लेखणें.

Subordina'tion *n.* खालची पायरी *f*, खालचा दर्जा *m*, गौण स्थान *n*. २ गौणता *f*, अप्रधानता *f*. ३ ताबेदारी *f*.

Suborn ( sub-orn' ) [ L. *sub*, Sk. उप, and *ornare*, Sk. वर्ण्, to adorn. ] *v. t.* लांच देऊन खोटे साक्षी तयार करणें, ( लांच देऊन ) खोटें बोलवणें, बधवणें.

Suborna'tion *n.* लांच देऊन खोटे साक्षी तयार करणें *n*.

Sub-poena ( sub-pē'-na ) [ L. *sub*, under, *poena*, penalty. ] *n.* ( law ) कोर्टाचें साक्षीस आव्हान *n*, साक्षीसमन्स. S. *v. t.* साक्षीसमन्स बजावणें. Sub-poenaed, Sub-poenad, Subpoena'd *pa. t.* & *pa. p.*

Sub-quadruple *a.* उपचतुर्गुण ( गुणोत्तर ).

Sub-quin'tuple *a.* उपपंचगुण ( गुणोत्तर ).

Sub-race *n.* अवांतर जाति *f* ( not उपजाति ).

Sub-registrar *n.* (दस्तैवज नोंदणारा) सबरजिस्टर *m*.

Sub-satur'ation *n.* उपसंपृक्तता *f*.

Subscribe ( sub-skrīb' ) [ L. *sub*, under, and *scribere*, to write. ] *v. t. to write one's name* नांव घालणें, नांव लिहिणें. २ ( a motto ) खालीं लिहिणें. ३ (दस्तैवजावर) सही करणें, सही घालणें, दस्तूर -दस्खत करणें, सही करून कबूल करणें -मान्य करणें. ४ (वर्गणीच्या पट्टींत -यादींत ) नांव घालणें, नांव लिहिणें -मांडणें. S. *v. i. to agree* कबूल होणें, कबूल -मान्य -संमत होणें -असणें. २ ( एखाद्या ) फंडाला देणें. ३ ( वर्तमानपत्राकरितां, मासिकाकरितां वगैरे ) वर्गणीदार होणें. Subscribed *pa. p.* खालीं सही केलेला. २ वर्गणीदार झालेला. ३ देण्याचें कबूल केलेला, देण्याचा संकल्प केलेला. [ SUBSCRIBED CAPITAL संकल्पित (देण्याचें कबूल केलेलें) भांडवल. ]

Subscrib'er *n.* वर्गणीदार *m*. २ खालीं सही करणारा *m*.

Subscrib'ing *v. n.* खालीं नांव लिहिणें *n*. २ वर्गणी देणें *n*.

Subscrip'tion *n.* सही करणें *n*. २ खालीं लिहिलेलें नांव *n*, सही *f*, दस्खत *f*. ३ वर्गणी *f*, चंदा *m*. [S. LIST वर्गणीचा कागद *m*, टीप *f*, याद *f*, यादी *f*, पट्टी *f*. ]

Sub-section *n.* पोटकलम *n*.

Sub'sequence *n.* मागून येणें *n*, अनुगमन *n*.

Subsequent ( sub'-sē-kwent ) [ L. *sub*, Sk. उप, and *sequere*, to follow. ] *a.* मागून झालेला, नंतरचा, मागूनचा, पाठीमागचा, पुढचा, पुढला, पश्चात्कालीन.

Sub'sequently *adv.* मागून, मागाहून, मग, नंतर.

Sub-serve ( sub-sėrv' ) [ L. *sub*, Sk. उप, and *servire*, to serve.] *v. t. to serve as a means in promoting an end* ( -च्या ) कामास येणें, ( -च्या ) कामास -उपयोगास पडणें, कामाचा -उपयोगी होणें, कामीं पडणें, मूळ हेतूचें पोषण करणें.

Subser'vience, Subser'viency *n.* उपयोग *m*, उपयुक्तता *f.* २ छंदानुवर्तन *n*, तंत्र *n.*
Subser'vient *a.* उपयोगाचा, उपयोगी, उपयुक्त, कामाचा. २ पोषक. ३ दुसऱ्याच्या तंत्रानें वागणारा.
Subserv'ing *pr. p. a.* Same as Subservient.
Subside (sub-sīd') [L. *sub*, Sk. उप, and *sidere*, Sk. सद्, to sit.] *v. i. to sink in level* खालीं बसणें, खालीं जाणें, थिरावणें, स्थिर होणें. (b) (जमीन) दबणें. २ (आरामखुर्चींत) पडणें. ३ *to become tranquil* बसणें, (वारा) पडणें, उतरणें, थिरावणें, कमतावणें, खालावणें, शांत होणें. ४ *to abate* (-चा) उतार *m* -उपशम *m.* होणें. ५ *to be reduced* (a swelling) उतरणें, मावळणें, जिरणें.
Subsi'dence, Subsi'dency *n.* (जमीन) खालीं बसणें *n*, दबाव *m*, बसणें *n*, थिरावणें *n.* २ बसणें *n*, पडणें *n.* ३ उतार *m*, उपशमन *n.* ४ (सूज) उतरणें *n.*
Subsid'iary *a. serving to assist or supplement* कुमकेचा, मदतीचा, अंगभूत. [S. FORCE कुमकेची फौज *f.*]
Subsidiary system कुमकेची (फौज ठेवण्याची) पद्धति *f.*
Subsidies *n. pl.* (of subsidy) पैशाचें साहाय्य *n.*
Subsi'ding *pr. p.* खालीं बसणारा, स्थिर होणारा. २ उतार पडणारा. ३ उतरणारी (सूज).
Sub'sidize *v. t. to pay subsidy to* पैशाचें साहाय्य करणें, पैशाचा आश्रय देणें.
Subsidy (sub'si-di) [L. *sub*, Sk. उप, and *sidere*, Sk. सद्, to sit.] *n.* पैशाचें साहाय्य *n.*
Subsist (sub-sist') [L. *sub*, under, and *sistere*, Sk. स्था, to stand.] *v. i.* असणें. २ निर्वाह *m* -गुजारा *m* -पोटगुजारा *m* -पोटाचें चालणें *g. of s.*, पोट चालवणें -भरणें. ३ *to inhere* मूळचा असणें. S. *v. t. to maintain, to support* पोसणें, पाळणें, संभाळणें, बाळगणें, चालवणें with *g. of o.*, पालनपोषण -उदरपोषण करणें, खर्च *m* -निर्वाह *m*, योगक्षेम *m.* चालवणें. Subsisted *pa. p.* पोसलेला, पाळलेला, पालित, पोषित.
Subsist'ence *n.* आहेपणा *m*, अस्तित्व *n*, स्थिति (S.). २ निर्वाह *m*, उपजीविका *f*, गुजारा *m*, पोटगुजारा *m*, गुजराण *n*, उदरपोषण *n.* ३ निर्वाहाचें साधन *n.*
Subsist'ent *a. existent* असणारा, अस्तित्वविशिष्ट.
Sub-soil *n.* भूपृष्ठाखालची जमीन *f*, अधोभूमि *f.*
Substance (sub'stans) [L. *sub*, under, and *stare*, Sk. स्था, to stand.] *n.* (Sk. logic) द्रव्य *n.* २ सत्त्व *n*, तत्त्व *n*, तत्त्वार्थ *m.* ३ *material, matter* जड द्रव्य *n*, जड पदार्थ *m*, जड वस्तु *f.* ४ सारांश *m*, सार *n*, गर्भ *m*, गर्भितार्थ *m*, तत्त्वार्थ *m.* ५ *estate, wealth* संपत्ति *f*, धन *n*, पैसा *m*, धनदौलत *f*, ऐवज *m*, ऐपत *f.*
Substan'tial *a. actually existing, real* प्रत्यक्ष, मूर्तिमंत, वास्तविक. २ *solid, stout, thick* ठळक, ऐवजदार, दळदार, सकस, कसदार, दडदडीत, दडस, दाट, घण, घणसर, घट्ट, घटमूट, भक्कम, बळकट, ठोक, ठोकळ, कुब्बल, खंबीर, संगीन. (b) खरा, वास्तविक. [S. JUSTICE खरा न्याय *m*, वास्तविक न्याय *m.*] ३ (of

honours) मोठा, भक्कम. ४ *wealthy* पैसेवाला, मातबर, ऐपतदार, बुटीवाला. ५ *material* ठळक, महत्त्वाचा.

Substan'tialism *n.* (*philos.*) द्रव्यास्तित्ववाद, द्रव्यवाद.

Substan'tially *adv.* तत्त्वतः, वस्तुतः, अर्थतः. २ ठळकपणानें, ठोकळपणानें.

Substan'tialness, Substantial'ity *n.* द्रव्यत्व *n*, वास्तवत्व *n*, वस्तुसत्ता *f*, वास्तवता *f*. २ भक्कमपणा *m*, खंबीरी *f*, बळकटी *f*. ३ खरेपणा *m*, भक्कमपणा *m*. ४ मातबरपणा *m*, गब्रूपणा *m*, ऐवजदारी *f*, ऐपतदारी *f*.

Substan'tiate *v. t.* तत्त्वरूप -वस्तुरूप करणें. २ (जास्त पुराव्यानें) भक्कमपणा आणणें, मजबुती आणणें, पुरवणी करणें.

Substan'tiated *pa. p.* भक्कमपणा आणलेला, खरा केलेला.

Substan'tiating *a.* भक्कमपणा आणणारा, खरा करणारा.

Substantia'tion *n.* भक्कमपणा आणणें *n.*

Substantive (sub'-stan-tiv) *n.* (*gram.*) नाम *n*, विशेष्य *n*, द्रव्यवाचक *n.* S. *a.* वस्तुविशिष्ट, वास्तविक. २ महत्वाचा, खरा, भक्कम. ३ मूळ, वास्तविक, खरा; as, "S. appointment." ४ मूळ सूचनेच्या रूपाचा; as, "S. motion."

Substi'tuent *n.* प्रतिनिधिद्रव्य *n.*

Substitute (sub'sti-tūt) [L. *sub*, under, and *statuere*, Sk. स्थापय्, to set.] *v. t.* *to put in the place of another* बदली ठेवणें, बदल योजणें, बदला -मोबदला -ऐवजीं -जागीं -स्थानीं -ठेवणें, वारचा -वांटचा -बदली -बदल्या देणें -ठेवणें, प्रतिनिधि म्हणून ठेवणें -घालणें -योजणें -वापरणें. २ (law) समन्स अपरोक्ष बजावणें. ३ (*chem.*) आदेश *m.* करणें. ४ (*math.*) स्थानापन्न करणें.

Sub'stitute *n.* (of persons) बदली *m*, बदल्या *m*, वारचा *m*, वांटचा *m*, प्रतिनिधि *m.* २ (*chem.*) आदेश.

Sub'stituted *pa. p. a.* बदलीं ठेवलेला, प्रतिनिधि म्हणून ठेवलेला. २ (*math.*) स्थानापन्न.

Substituted service *n.* (law.) (समन्साची) अपरोक्ष [बजावणी *f.*

Substitu'tion *n.* ऐवजीं ठेवणें *n*, बदली ठेवणें *n*, मोबदला ठेवणें *n.* [S. of letters आदेश *m.*] २ (math.) उत्थापन (पद) योजणें *n*, स्थानापन्न (पद) योजणें *n.* ३ ऐवजीं पदार्थ *m.* ४ (*chem.*) आदेशक्रिया *f.*

Substitu'tional *a.* बदलीचा, मोबदला ठेवण्याचा. २ बदली ठेवलेला. ३ आनुकल्पिक. ४ आदेशभूत.

Substitu'tionary, Same as Substitutional.

Substratum (sub-strā'tum) [L. *sub*, under, and *stratum*, Sk. स्तर, a layer.] *n.* *an under stratum* ख़ालचा थर *m*, तळचा थर *m.* २ (metaphysics) अधिष्ठान *n.*

Sub-sul'tus tendinum *n.* (*med.*) स्नायुपुच्छ एकदम आकुंचन पावणें *n*, आंचका *m*, कंडराकंप *m*, इच्छेवांचून अवयव हालणें *n.* पुष्कळ दिवसांच्या भयंकर तापामुळें आलेल्या अशक्ततेचें हें लक्षण आहे.

Sub-tangent *n.* अवांतरस्पर्शरेखा *f*, उपस्पृक्रेखा *f.*

Sub-tenancy *n.* पोटभाड्यानें घेणें *n.*

Sub-tenant *n.* पोटभाडोत्री *m*, पोटभाडोत *m.*

Subtend *v. t.* (*math.*) अन्तरित करणें.

Subterfuge (sub'tėr-fūj) [L. *subter*, under, and *fugere*, to flee.] *n. evasion* पळवाट *f*, फट *f*, खिडकी (*fig.*) *f*, सोडवण *n*, छिद्र *n*.

Subterranean (sub-te-rā'nē-an) [L. *sub*, and *terra*, the earth.] *a. lying under ground* जमिनींतला, जमिनीखालचा, भूमीखालचा. २ (*bot.*) भूमिगत, भौम.

Subterra'neous, Same as Subterranean.

Subtile (sub'til) [L. *sub*, under, *tela*, a web. Subtile = Woven fine.] *a. rare* बारीक, पातळ, सूक्ष्म. २ *delicately constructed* नाजूक, बारीक, तलम. ३ *refined* बारीक, सूक्ष्म. [S. BODY सूक्ष्म शरीर.] ४ *shrewd* सूक्ष्मशोधी, सूक्ष्मदर्शी.

Sub'tilise *v. t.* विरळ करणें, सूक्ष्म करणें. २ कीस काढणें.

Sub'tility *n.* बारीकपणा *m*, पातळपणा *m*, सूक्ष्मता *f*. २ नाजूकपणा *m*, तलमपणा *m*.

Subtle (sut'l) [See Subtile.] *a.* लुच्चा, कावेबाज, धूर्त. २ सूक्ष्म, बारीक. ३ लुच्चेगिरीचा, धूर्तपणाचा.

Subt'lety, Subt'leness *n.* धूर्तता *f*, लुच्चेगिरी *f*.

Subtract (sub-trakt') [L. *sub*, Sk. उप, under, and *trahere*, to draw.] *v. t. to deduct* वजा करणें, काढणें, काटणें, घेणें, बाद करणें -घालणें, अंतर काढणें. २ (math.) वजा करणें, व्यवकलन करणें. Subtracted *pa. p.* वजा केलेला, काढलेला, काटलेला, व्यवकलित.

Subtrac'ter *n.* वजा करणारा *m*, व्यवकलन करणारा *m*.

Subtract'ing *v. n.* वजा करणें *n*, व्यवकलन करणें *n*.

Subtrac'tion *n.* वजा करणें *n*, काढणें *n*, घेणें *n*. २ वजाबाकी *f*, व्यवकलन *n*. [COMPOUND S. विविध वजाबाकी *f*. THE REMAINDER AFTER A S. बाकी *f*.]

Sub'trahend *n.* बाद करावयाचा अंक *m*, बादांक *m*.

Sub-triplicate *a.* उपत्रिगुण (गुणोत्तर).

Suburb (sub'urb) [L. *sub*, Sk. उप, near, and *urbus*, a city.] *n. the outlying district of a city* शहराच्या आसपासचीं खेडीं *n. pl.*, नगरोपान्त *m*.

Subur'ban *a.* शहराच्या आसपासच्या खेड्यापाड्यां-संबंधीं, आसपासच्या खेड्यापाड्यांतला. [S. SERVICE (of railway) आसपासच्या गाड्यांची जाये *f*.]

Suburbs, Same as Suburb.

Subver'sion *n.* पालथें पाडणें *n*, मोडणें *n*, ध्वंसन *n*. (b) (state) पाडापाड *f*, ध्वंस *m*, विध्वंस *m*, नाश *m*.

Subver'sive *a.* (with *of*) पालथें पाडणारा, मोडणारा, नाश करणारा.

Subvert (sub-vėrt') [L. *sub*, Sk. उप, and *vertere*, Sk. परिवृत्, to turn.] *v. t. to overthrow, to upset, to effect destruction* (पालथें) पाडणें, नाहींसें करणें, ध्वंस *m* -नाश *m*. करणें, मोडणें, पाडून -मोडून देणें -टाकणें, लयास नेणें, नष्ट करणें; as, "To S. religion, monarchy." Subver'ted *pa. t.*, S. *pa. p.* पाडलेला, मोडलेला, ध्वंसित, ध्वस्त.

Subver'ter *n.* पालथें पाडणारा *m*, मोडून टाकणारा *m*.

Subver'ting *pr. p.* पाडणारा, मोडणारा, ध्वंस करणारा.

Succeda'neous *a.* गौण, गौणभूत, अनुकल्पित. [S. MEASURE OR MODE पर्याय *m*.]

**Succedaneum** ( suk-sē-dā'ne-um ) [L. *succedaneus* -*sub*, Sk. उप, and *cedare*, to go.] *n. substitute* (one falls back upon in default of another) अनुकल्प *m*, गौणकल्प *m*.

**Succeed** ( suk-sēd' ) [L. *sub*, Sk. उप, and *cedare*, to go.] *v. i. to follow in order* मागाहून येणें, मागून येणें, पाठीमागून -पाठीवर येणें -जाणें -चालणें, क्रमानें -अनुक्रमानें -ओघानें येणें -होणें, पुढें येणें, नंतर येणें. २ *to take the place previously occupied by another* ( -च्या ) जागीं -ठिकाणीं -स्थानीं येणें, ( -च्या) जागेवर -कामावर -पदावर येणें. ३ ( of persons ) *to prosper* जिंकणें, जय मिळविणें, यश मिळविणें, निभावणें, तडीस -शेवटास जाणें, पार जाणें, पार पडणें, जय -यश येणें *in. con.*, फत्ते होणें *g. of s.* ४ ( of measures ) *to terminate as desired* फलद्रूप होणें, लागू होणें, साधणें, जयास जाणें, पार जाणें, पार पडणें, गुणास येणें.

**Succeed'** *v. t. to take the place of* जागीं येणें *g. of o.*, ठिकाणीं -स्थानीं -स्थानावर -जाग्यावर -कामावर -पदावर -अधिकारावर येणें *g. of o.* २ *to follow* ( -च्या ) मागें जाणें, मागून -मागाहून जाणें.

**Succeed'er** *n.* पाठीमागून येणारा *m*, पाठीमागें आलेला *m*, मागचा *m*, पाठीवरचा *m*. २ ( -च्या ) जागीं येणारा *m*.

**Succeed'ing** *pr. p.* पाठीमागून येणारा. २ ( -च्या ) जागीं -कामावर येणारा.

**Success'** *n.* ( of persons ) जय *m*, विजय *m*, यश *n*, बरकत *f*, सिद्धि *f*. [Without S. यश आल्याशिवाय, फुकट, व्यर्थ. Nothing succeeds like success यशासारखें यशस्वी यशच.] २ *favourable issue* यश *n*, जय *m*, सिद्धि *f*. ३ *attainment of wealth, or fame or position* यश *n*, बरकत *f*, भरभराट *f*.

**Success'ful** *a.* ( of persons ) यशस्वी, विजयी, जयी, कृतकृत्य. २ ( of actions ) लागू, शेवटास जाणारा -गेलेला, सिद्धीस जाणारा -गेलेला, सफल, गुणावह.

**Success'fully** *adv.* यशस्वितेनें, यश मिळेल अशा रीतीनें.

**Success'fulness** *n.* यशस्विता *f*, विजयिता *f*, यशस्विपणा.

**Succes'sion** *n. a following in order* परंपरा *f*, क्रम *m*, अनुक्रम *m*, परवड *f*. [In close and quick S. पाठोपाठ, लागोपाठ, मागोमाग. Natural S. समन्वय *m*.] २ *a series of things in succession* परंपरा *f*, हार *f*, रांग *f*, माळ *f*, मालिका *f*. ३ *lineage* वंश *m*, वंशपरंपरा *f*, वंशावलि *f*. ४ *right of succeeding to another* उत्तराधिकार *m*. ५ *right of succeeding to an estate* वारसा *m*, वारसाचा हक्क *m*. [S. Act गादीवर कोणीं कसेंकसें बसावें याविषयीं कायदा *m*, गादीच्या वारशाचा कायदा *m*. S. Certificate (कोर्टानें दिलेलें) वारसाचें सर्टिफिकेट *n*, वारसाचा दाखला *m*, वारसपत्र *n*.] ६ *heirs* वारस *m. pl.*

**Succes'sional** *a.* पारंपरिक, परंपरेचा, ओळीनें लागलेला.

**Succes'sive** *a.* पाठोपाठचा, परंपरेनें येणारा, परंपरेनें आलेला, अनुक्रमाचा, यथाक्रम, क्रमानुयायी, क्रमागत, परंपरागत, परंपरायात, पारंपरिक, आनुक्रमिक.

**Succes'sively** *adv.* एकामागें एक, एकापाठीमागें एक, अनुक्रमानें, परंपरेनें, अनुक्रमशः, अनुक्रमतः.

Success'less *a.* यश नसलेला, अयशस्वी, अपेशी.
Succe'ssor *n.* पाठीमागून येणारा *m.* २ वारस *m.*
Succinct ( suk-sinkt' ) [L. *sub*, Sk. उप, and *cingere*, to gird.] *a. briefly expressed* संक्षिप्त, संक्षेपाचा, संकलित, थोडक्यांत आणलेला, अल्पविस्ताराचा. Succinct'ly *adv.* संक्षेपानें, संक्षेपेंकरून, थोडक्यांत. Succinct'ness *n.* संक्षिप्तपणा *m.*
Suc'cory *n.* चिकोरी नांवाचें फळ *n.* याचें कॉफीसारखें पेय करतात.
Suc'cose *a.* ( *bot.* ) *sappy* रसभरित, रस असलेला.
Succour ( suk'ur ) [L. *sub*, Sk. उप, and *currere*, to run.] *v. t.* मदत करणें, कुमक *f* -साहाय्य करणें. S. *n.* मदत *f*, कुमक *f*, साहाय्य *n.*
Succ'ulence *n.* रसाळपणा *m*, रसभरितपणा *m.*
Succulent ( suk'ū-lent ) [L. *succus*, juice.] *a. juicy* रसाळ, रसभरित, रसमय, रसप्रचुर.
Succumb ( suk-um' ) [L. *sub*, Sk. उप, and *cumbere*, to lie down. ] *v. i. to be overcome, to be forced to give way* चांकणें, डगमगणें, दबणें, दबकणें, बें *n.* करणें -म्हणणें; as, "To S. to grief, temptation, &c." (b) *to die* मरणें; as, "To S. to an illness."
Succus ( suk'us ) [L.] *n.* ( *med.* ) पिळून काढलेला रस *m*, आपरस. [ S. ENTERICUS क्षुद्रांत्ररस *m.* S. GASTRICUS आमाशयांत तयार होणारा पाचकरस, जाठररस.]
Succussion ( su-ku'-shun ) [L. *succussum*, to shake below.] *n.* ऊर तपासण्याकरितां मनुष्याला हालवणें. छातींत पाणी आहे किंवा काय हें यानें पाहतात.
Such ( such ) [ Of Anglo-Saxon origin. ] *a.* असा, असला, असल्या जातीचा, यासारखा, या जातीचा, या प्रकारचा, ईदृश; as, "S. beauty as yours." २ तसा, तसला, तादृश, त्यासारखा, त्या जातीचा, त्या प्रकारचा. ३ इतका, इतका मोठा; as, "S. a fright." ४ अमुक, अमका, फलाणा; as, "S. a person." [ S. AS यासारखा, त्यासारखा.] S. *pron.* जो; as, "S. as sit in darkness."
Suck ( suk ) [ A. S. *sucan*, to suck.] *v. t.* चुपणें, चुंफणें, चोखणें, चुंफून घेणें, चोखून घेणें, चुंबणें, तोंडानें ओढणें, चुंफा घेणें *g. of o.*, चोषण करणें *g. of o.* [ A CHILD'S SUCKING STICK रिंगणें *n*, चुंफणें *n*, चोफणें *n.* SUCKING CHILD आंगावरचें मूल *n*, तान्हें मूल *n.* S. BARRISTER नवशिका ब्यारिस्टर.] २ ( *fig.* ) मिळविणें, प्राप्त करून घेणें; as, "To S. in knowledge, To S. advantage." ३ *to draw milk or liquid from* चुपणें, ओढणें, ओढून घेणें, स्तनपान करणें *g. of o.*, अंगावर पिणें, दूध पिणें *g. of o.* [ To S. DRY चुपून कोरडा करणें. SUCKED ORANGE निःसत्त्व केलेली वस्तु *f.* To S. ONE'S BRAINS (आपल्या फायद्याकरितां) दुसऱ्याच्या कल्पना काढून घेणें. ] ४ तोंडांत जीभ फिरविणें. [To S. IN, To S. UP शोषून घेणें. To S. THE UDDER लुचणें.] SUCK-ING PUMP पाणी वर खेंचणारा पंप *m.*] S. *v. i.* स्तनपान करणें, अंगावर पिणें, स्तन पिणें. (b) लुचणें.
Suck *n.* आंगावर पिणें *n.* ( b ) लुचणें *n.* २ स्तनपान *n.*
Sucked *pa. p.* चुंफलेला, चोखलेला.
Suck'er *n.* चुंफणारा *m*, चोखणारा *m*, चोषक *m.* २

स्तनपान करणारा *m*, अंगावर पिणारा *m*, तान्हा *m*. (b) लुचणारा. २ ( *bot.* ) चोषक खोड *n*, चोषक दंड *m*. ४ *piston of suction pump* सक्शनपंपचा दट्ट्या. ५ *pipe through which liquid is drawn by suction* चोषणनलिका *f*, (डब्यांतून) तेल काढण्याची नळी *f*. ६ (*mach.*) कांहीं पंपांतील व्हालवाली वाटी *f*.

Suck'ing *pr. p.* चुंफणारा, चोखणारा, चोपक. २ अंगावर पिणारा, तान्हा. (b) लुचणारें ( वासरूं ).

Sucking-bottle *n.* लहान मुलाची दुधाची बाटली *f*.

Suckle ( suk'l ) *v. t.* स्तन देणें, ( अंगावर ) घेणें, ( अंगावर ) पाजणें, अमा देणें.

Suck'ling *n.* अंगावरचें मूल *n*, तान्हें मूल *n*. २ लुचणारें वासरूं *n*. ३ ( *fig.* ) अगदीं नवशिका *m*. S. *a.* तान्हा, अंगावरचा.

Suc'tion *n.* खेंचून घेणें *n*, चोखून घेणें *n*. २ हवा काढून घेणें *n*, रिक्तावकाश करणें *n*, रिक्तावकाशीकरण *n*. ३ चुंफणें *n*, चोखणें *n*, चुंफा *m*, चोप *m*, चोषण *n*.

Suction pump *n.* Same as Sucking Pump.

Sudamina ( sū-dam'i-na ) [ L. *sudor*, sweat. ] *n.* ( *med.* ) तीव्र ज्वरानंतर घामामुळें येणाऱ्या पुटकुळया.

Su'datory *a.* घाम आणणारा, स्वेदोत्पादक (वाफारा वगैरे).

Sudden ( sud'en ) [ L. *subitus*, coming stealthily -*sub*, Sk. उप, and *ire*, to go. ] *a.* एकाएकींचा, अकस्मात्चा, एकाएकीं आलेला, आकस्मिक, अकल्पित. [ ALL OF A SUDDEN अकस्मात्, एकाएकीं. ] Sud'denly *adv.* एकाएकीं, अवचित, अवचितां, अकल्पित, अकस्मात्, अचानक. Sud'denness *n.* आकस्मिकपणा *m*, अचानकपणा *m*, आकस्मिकत्व *n*.

Sudor ( sū'-dor ) [ L. ] *n.* ( *med.* ) घाम *m*, स्वेद *m*.

Sudorif'erous *a.* स्वेदवाहक; as, "S. canals."

Sudori'fic *n.* घाम आणणारें औषध *n*, स्वेदोत्पादक *n*, स्वेदन *n*. S. *a.* घाम आणणारा, स्वेदोत्पादक.

Suds ( sudz ) [ Of Anglo-Saxon origin. ] *n. pl.* साबणाचें ( फेंसाळ ) पाणी *n*.

Sue ( sū ) [O. Fr. *suir* -L. *sequi*, to follow.] *v. t. to prosecute in a lawcourt* खटला करणें, (-वर) फिर्याद करणें, वाद सांगणें, खटला उभा करणें. S. *v. i.* (-करितां) विनंति करणें, अर्ज -प्रार्थना करणें, (लग्नाकरितां स्त्रीची) आराधना *f* -आर्जव *n* -प्रार्थना *f* -विनवणी *f*. करणें. Sued *pa. t. & pa. p.* Su'ing *pr. p.*

Suet ( sū'et ) [L. *sebum*, fat.] *n.* (बकऱ्याच्या किंवा बैलाच्या गुर्दावरील ) चरबी *f*.

Suffer ( suf'ėr ) [L. *sub*, under, and *ferre*, to bear.] *v. t. to undergo, to experience* (as pain, loss, grief) सोसणें, सहन करणें, भोगणें, कंठणें, काढणें, अनुभवणें. २ *to permit* परवानगी देणें, or देणें in combination with another verb; as, जाऊं देणें, येऊं देणें, अडथळा *m* -आडकाठी *f*. न करणें, नको न म्हणणें. ३ *to be acted upon* (नुकसान) सोसणें, खाणें, बसणें *in. con.*, लागणें *in. con.*, होणें *in. con.* S. *v. i.* सोसावें लागणें, दुःख *n*. भोगणें, श्रम *m* -क्लेश -शरीरभोग *m. pl.* -भोग *m. pl.* भोगणें -अनुभवणें, दुःखी असणें, (दुःख)

कंठणें, दुःखांत असणें. [To S. FOR ONE'S FOLLY तोंडांत खाणें. ( used *fig.* )] २ *to sustain injury* नुकसान होणें, नुकसानी -खराबी होणें, धक्का -नुकसान बसणें *in. con.*, -( a limb or member ) दुखवणें, दुखावणें. ३ (of condemned man) फांशीं जाणें; as, "Was to S. the next morning."

Suff'erable *a.* सहन करण्याजोगा, सहनीय, सह्य.

Suff'erance *n.* सोसणें *n*, सहन करणें *n.* २ क्षमा *f*, शांति *f.* ३ परवानगी *f*, कानाडोळा *m*, अनिषेध *m*, अप्रतिबंध *m.* [TENANCY ON S. मुदत संपल्यावरहि कबजा असणें *n.* TENANT ON S. मुदतीबाहेरील कूळ *n.*]

Suff'ered *pa. t.* S. *pa. p.* सोसलेला, अनुभविलेला. २ परवानगी दिलेला. [सोसावें लागणारा.

Suff'erer *n.* सोसणारा *m*, भोगणारा *m*, दुःखित, कष्टी *m.*

Suff'ering *v. n.* (often *pl.*) सोसणें *n*, दुःख अनुभवणें *n.* २ दुःख *n*, व्यथा *f*, क्लेश *m. pl.*, शरीरभोग *m. pl.*, ताप *m.*

Suff'ering *pr. p.* सोसणारा, सहन करणारा, दुःखी, कष्टी.

Suffice ( suffīs' ) [L. *sub*, under and *facere*, to make.] *v. i. to be enough* पुरणें, पुरेसें असणें, पुरें होणें, पुरें पडणें, पुरवठा येणें *g. of s.* [To MAKE TO S. पुरविणें, पुरवून पुरवून करणें.] S. *v. t. to meet the needs of* गरज भागविणें, पुरणें, पुरेसें होणें.

Suffi'ciency *n.* पुरवठा *m*, पुरव *m*, पर्याप्ति *f.* २ पुरतेपणा *m*, पुरेपणा *m.*

Suffi'cient *a.* पुरा, पुरता, पुरेसा, पुरण्याजोगा, पाहिजे तितका, जितक्यास तितका, पर्याप्त. [S. REASON पर्याप्त हेतु.]

Suffi'ciently *adv.* पुरे, बस, पुरता, पुरा, पाहिजे तितका.

Suffix ( suf'iks ) [L. *sub*, under, and *figere*, to fix.] *n.* उत्तरगामी प्रत्यय *n.* S. *v. t.* उत्तरगामी प्रत्यय लावणें -जोडणें.

Suffocate ( sufō'-kāt ) [L. *sub*, and *fauces*, throat.] *v. t.* दम *m.* कोंडणें, दम कोंडून मारणें, श्वास -श्वासोच्छ्वास कोंडणें -कोंडून मारणें, गळा दाबून मारणें, नरडी दाबून मारणें, कोंडमार *m* -कोंडमारा *m* -श्वासावरोध करणें. S. *v. i.* दम कोंडणें, गुदमरणें, श्वास कोंडून मरणें.

Suffo'cated *pa. p.* दम कोंडलेला, दम कोंडून मारलेला.

Suffo'cater *n.* दम कोंडणारा *m*, दम कोंडून मारणारा *m.*

Suffo'cating *pr. p.* श्वास कोंडणारा, दम कोंडणारा.

Suffoca'tion *n.* दम कोंडणें *n*, दम कोंडून मारणें *n*, श्वास कोंडणें *n*, गुदमरणें *n.* २ कोंडमारा *m*, कोंडमार *m*, श्वासरोध *m.*

Suff'ragan ( suf'ra-gan ) Also called Suffragan bishop ( बिशपचा किंवा मेट्रापॉलिटन बिशपचा दीक्षा दिलेला ) मदतनीस बिशप.

Suffrage ( suf'rāj ) [ L. *saffragari*, to vote for. ] *n.* मत *n*, पसंती *f*, अनुमति *f*, संमति *f*; as, "A S. for free trade." २ (पार्लमेंटच्या निवडणुकींत ) मत देण्याचा अधिकार *m*, मताधिकार *m.* [MANHOOD S. (वयांत आलेल्या सर्व ) पुरुषांना मत देण्याचा अधिकार *m.* WOMAN SUFFRAGE (वयांत आलेल्या सर्व ) स्त्रियांना मत

देण्याचा अधिकार *m.* UNIVERSAL S. (वयांत आलेल्या सर्व ) स्त्रीपुरुषांना मत देण्याचा अधिकार *m.*]

Suffragette' *n.* **मताभिलाषी स्त्री** *f.*

Suf'fragist *n.* **स्त्रियांना मत देण्याचा अधिकार असावा असें म्हणणारा** *m,* **स्त्रीमतवादी** *m.*

Suffuse ( suf-fū'z ) [ L. *sub,* under, and *fundere,* to pour. ] *v. t. to overspread or cover, as with a fluid* **(आंतून वर येऊन) व्यापणें, भरणें, भरून -व्यापून टाकणें.** Suffu'sed *pa. p.* **व्यापलेला, व्याप्त, भरलेला.** [S. WITH BLOOD रक्तानें भरलेला, रक्तबंबाळ झालेला. S. WITH TEARS आसवांनीं भरलेला.]

Suffu'sion *n.* **व्यापणें** *n,* **भरणें** *n.*

Sugar ( shoog'ar ) [Fr. *sucre* -Sp. -Ar. -Pers. *shaker,* Sk. **शर्करा,** sugar. ] *n.* **साखर** *f,* **शर्करा** *f.* [ COARSE S. OR *Gud* गूळ *m.* LUMP S. साखरेच्या वड्या *f.* BIG BALL OF COARSE S. भेली *f,* ढेप *f,* रवा *m.* SOFT S. पिठीसाखर *f.* S. BOILER गुळव्या *m,* साखर करणारा *m.* BEET S. बीट ( वनस्पतीची ) साखर *f.* CANE S. उंसाची साखर *f.* FRUIT S. फलशर्करा *f,* फळांतून काढलेली साखर *f.* GRAPE S. द्राक्षशर्करा *f.* MILK S. दुग्धशर्करा *f.* STARCH S., POTATO S. पिष्टशर्करा *f.* WHITE S. सफेत साखर. BROWN S. गुळी साखर. GRANULATED S. रवेदार साखर.] **२ गोड भाषण** *n,* **आर्जव** *n,* **खुशामत** *f.* **३** ( *chem.*) **रासायनिक साखर** *f.* S. *v. t.* **साखर घालणें, गोड -मिष्ट -शर्करायुक्त करणें. २ गोड शब्दांत सांगणें, गोड वाणीनें सांगणें.**

Sugarcandy *n.* **खडीसाखर** *f,* **मिस्त्री** *f.*

Sugarcane *n.* **ऊंस** *m,* **इक्षु** *m.*

Sugar-coated *a.* **शर्करावगुंठित.**

Sugar-coloured *a.* **साखरेच्या रंगाचा.**

Sugared *pa. p.* **साखर घातलेला, साखरेचा, शर्करायुक्त.**

Sugar-house *n.* **गुऱ्हाळ** *n,* **साखरेचा कारखाना** *m.*

Sugar-loaf *n.* **साखरेचे निमुळते गोळे** *m. pl.*

Sugar-mill **चरक** *m,* **गुऱ्हाळ** *n,* **रगाडा** *m,* **घाणा** *m.*

Sugar of lead *n.* **शिशाचें लवण** *n.* **हें साखरेसारखें पांढरें दिसतें म्हणून याला** Sugar **म्हणतात.**

Sugar-refinery *n.* **साखर स्वच्छ करण्याचा कारखाना** *m.*

Sug'ary *a.* **गोड, मिष्ट, साखरेचा. २** *fond of sugar* **साखऱ्या, गोड्या, गोडखाऊ.**

Suggest ( su-je'st ) [ L. *sub,* and *gerere, gestum,* to carry.] *v. t. to cause idea to present itself* **सुचविणें, सूचना -सूचित करणें, व्यंग्योक्तीनें सुचविणें.** [To S. ITSELF TO ONE सुचणें.] Sugge'sted *pa. p.* **सुचविलेला, सूचित.** [S. MEANING व्यंग्यार्थ.] Sugge'ster *n.* **सुचविणारा** *m,* **सूचना करणारा** *m,* **सूचक** *m.* Sugge'sting *pr. p.* **सुचविणारा, सूचना करणारा.** Sugges'tion *n.* **सुचविणें** *n.* **२ सूचना** *f.* **३ सुचविलेली गोष्ट** *f.* Sugge'stive *a.* **सूचना करणारा, सुचविणारा, सूचक.**

Suici'dal *a.* **आत्मघाताचा, आत्मघातक, आत्मघाती.**

Suicide ( sū'i-sīd ) [ L. *sui,* of himself and *cædere,* to kill.] *n. self-murder* **आत्महत्या** *f,* **आत्मघात**

*m*, आत्मवध *m*. [ To commit S. जीव देणें.] २ *self-murderer* आत्महत्या करणारा *m*.

Sui-generis *of its own kind, singular* आपल्याच तऱ्हेचा, अनन्यसामान्य, स्वसमान.

Suit ( sūt ) [Fr. *suit*, a suit.] *n.* अर्ज *m*, विनंति *f*, प्रार्थना *f*. २ ( एखाद्या स्त्रीची ) विवाहाकरितां प्रार्थना *f*, विवाहप्रार्थना *f*, मागणी *f*. ३ खटला *m*, ( not फिर्याद which is Plaint ) मुकदमा *m*, वाद *m*, दावा *m*. [Withdrawal of a S. खटला काढून घेणें, loosely फिर्याद काढून घेणें. Original S. अस्सल मुकदमा *m*. Criminal S. फौजदारी खटला. Civil S. दिवाणी दावा *m*.] ४ ( of cards ) बाजू *f*, बाजी *f*, रंग *m*. ५ *set of men's clothes* जोड *m*. ६ ( of armour, &c. ) जोड *m*. ७ ( R. ) *suite* परिवार *m*.

Suit *v. i.* जुळणें, मिळणें, मिळणींत असणें, बसणें, जमणें, जुगणें, लागणें, जम *m*. बसणें *g. of s.* reciprocally. २ *to be convenient* सोईचा होणें, सोईस्कर असणें; as, "That date will S."

Suit *v. t.* योग्य करणें, जुगवणें, मिळविणें, मिळेसा करणें, जमवणें, मेळ *m* -जम -जवा *m*. बसवणें *g. of s.*, *recip.* २ *to fit* शोभणें, साजणें. ३ *to please* पटणें *in. con.*, पसंत -मान्य असणें *in. con.* ४ (of food, climate, &c. मानवणें, मानणें. Suited *pa. t.* and *pa. p.*

Sui'table *a.* योग्य, लायक, जोगता, जोगा, यथायोग्य, उपयोगी, उपयुक्त, उचित, यथोचित, विहित, अनुरूप.

Sui'tableness *n.* लायकपणा *m*, युक्तता *f*, उचितपणा *m*.

Sui'tably *adv.* योग्य, यथायोग्य, यथायुक्त, लायक.

Suite ( swēt ) [ Fr. ] *n. retinue* परिवार *m*, इतमा *m*. २ माळा *f*, माळका *f*, हार *f*.

Sui'tor *n.* (law ) पक्षकार *m*. २ अर्ज करणारा *m*, अर्जदार *m*. ३ मागणी करणारा *m*, मागणी घालणारा *m*, विवाह-प्रार्थना करणारा *m*.

Sulaphat *n.* ( *astron.* ) ऊर्वशी राशि *f*.

Sulcate ( sul'-kāt ) [ L. *sulcus*, a furrow. ] *a.* ( *bot.* ) *furrowed* खांचदार; as, "S. stem."

Sulcus ( sul'kus ) [L.] *n.* (*med.*) परिखा *f*, खांच *f*.

Sulk ( sulk ) [ A. S. *solcen*, slow. ] *v. i. to be sullen* दुर्मुखणें, गाल फुगवणें, खुंटून बसणें, फुरगुटणें.

Su'lkiness *n.* कुरठेपणा *m*, घुमेपणा *m*. २ खळ *f* ( with the verb येणें; as, खळाला येणें ), दुर्मुखलेपणा *m*.

Sulks *n. pl. a fit of sullenness* फुरगुट *n*, दुर्मुखता *f*.

Su'lky *a.* घुमा, घुस्या, कुरठा. २ दुर्मुखलेला, दुर्मुख, फुरगुटलेला, खळ घेतलेला. [फुरगुटलेला, घुस्या.

Sullen ( sul'en ) [L. *solus*, alone.] *a.* दुर्मुखलेला,

Su'llenness *n.* दुर्मुखलेलेपणा *m*. २ घुमेपणा *m*.

Su'llier *n.* बिघडविणारा *m*. २ कलंक लावणारा *m*.

Sully ( sul'i ) [ A. S. *sylian*, to defile. ] *v. t. to soil* बिघडविणें, मळविणें. २ *to stain* कलंक लावणें, डाग -बट्टा -कालिमा -काळोखी लावणें. Sull'ied *pa. t.* and *pa. p.* Sul'lying *pr. p.*

Sully *n. stain, blot* कलंक *m*, डाग *m*, बट्टा *m*, कालिमा.

Sul'phate *n.* गंधकाम्लाचा क्षार *m*, गंधकित *m*. [S. OF COPPER ताम्रगंधकित *m*, मोरचूद. S. OF IRON लोहगंधकित, हिराकस *m*.] [*m*, गंधकिल.
Sul'phide *n.* गंधक व दुसरें मूलद्रव्य यांचा संयुक्त पदार्थ
Sulphide of arsenic *n.* (*med.*) मनःशीळ *n*.
Sul'phite *n.* *a salt of sulphurous acid* गंधकाम्लाचा क्षार *m*, गंधकित.
Sulphur (sul'-fėr) [L.] *n.* गंधक *m*, धातुवैरी *m*. [FLOWERS OF S. गंधकाचें फूल *n*. MILK OF S. कृत्रिम रीतीनें केलेली गंधकाची पांढरी पूड *f*.] [ओपवणें.
Sul'phurate *v. t.* गंधकसंयुक्त करणें. २ गंधकाच्या धुरानें
Sul'phurator *n.* गंधकाच्या धुरानें ओपवण्याची भट्टी *f*.
Sulphu'reous *a.* गंधकाचा, गंधकमय, गंधकयुक्त.
Sul'phuretted *a.* *combined with sulphur* गंधकसंयुक्त, सगंधक. [S. HYDROGEN गंधकसंयुक्त उज्ज. हा एक घाणेरड्या वासाचा वायू आहे; याचा पृथक्करणाचे कामीं फार उपयोग होतो. याला HYDROGEN SULPHIDE = उज्जगंधकिल असेंहि म्हणतात.]
Sulphu'ric *a.* गंधकक. [S. ACID तेजाब *m*, गंधककाम्ल *n*.]
Sul'phurous *a.* (*chem.*) *containing sulphur in its lower combining proportion* गंधक; as, "S. acid = गंधकाम्ल." [*m*, गरमी *f*, शिजणें *n*.
Su'ltriness *n.* गरमा *m*, उकाडा *m*, उबाळा *m*, उष्मा
Sultry (sul'tri) [From the root of Swelter.] *a.* (of weather) उकाड्याचा, गरम, उष्म्याचा, उबाळ्याचा, गदमदण्याचा. [TO BE S. उकडणें, उवावणें, उवणें, शिजणें. ALL THESE VERBS ARE IMPERSONAL.]
Sum (sum) [L. *summum*, highest.] *n.* बेरीज *f*. २ (*math.*) संकलन *n*, समाहार *m*, बेरीज *f*. ३ रक्कम *f*. ४ उदाहरण *n*. ५ एकंदर आकार *m*, एकंदर बेरीज *f*, एकूण जमा *f*, गोळाबेरीज *f*. ६ *substance* हांशील *n*, सारांश *m*, तात्पर्य *n*, इत्यर्थ *m*, निष्कर्ष *m*. [S. AND SUBSTANCE गोळाबेरीज *f*, तात्पर्यार्थ *m*, इत्यर्थ *m*, भाग *m*.] S. *v. t.* बेरीज करणें. २ मिळवणें, एकंदर -एकवट करणें. ३ (with *up*) (सांगितल्याची) गोळाबेरीज करणें, आटोप करून सांगणें, समारोप -उपसंहार करणें.
Summaris'ation *n.* सारांशरूपानें सांगणें *n*.
Sum'marise *v. t.* (-चा) सारांश असणें. २ सारांशरूपानें सांगणें, सारांश *m*. काढणें.
Su'mmarily *adv.* संक्षेपानें, संक्षेपतः, संक्षेपेंकरून.
Su'mmary *n.* संक्षेप *m*, सारांश *m*, सारसंग्रह *m*.
Summary *a.* संक्षेपाचा, सांक्षेपिक, संक्षिप्त. २ (proceedings) आटपता, आटपसर, आटपत्या रीतीचा, संक्षिप्त रीतीचा. [S. CONVICTION संक्षिप्त चौकशीनें गुन्हा शाबीत करणें. S. DISMISSAL संक्षिप्त चौकशीनें फिर्याद काढून टाकणें प्रतिवादीस नोटीस न काढतां मुकदमा अगर अपील काढून टाकणें. S. JURISDICTION संक्षिप्त रीतीनें चौकशी करण्याचा अधिकार *m*. S. POWER संक्षिप्त रीतीनें चौकशी करण्याचा अधिकार *m*, तोंडी शिक्षा देण्याचा अधिकार *m*.]
Summa'tion *n.* बेरीज करणें *n*, समाहरण *n*, समाहार *m*. [S. OF SERIES श्रेढीचें सर्वधन *n*.] [रूपानें सांगितलेला.
Summed *pa. t.* S. *pa. p.* बेरीज केलेला. २ सारांश-

Summer ( sum'ér ) [A. S. *sumer*, summer.] *n.* उन्हाळा *m*, ग्रीष्मकाल *m*. [HEAT OR HEIGHT OF S. ऐन उन्हाळा *m*, भर उन्हाळा *m*. S. HOUSE उन्हाळ्यांत रहाण्याचें घर *n*, उन्हाळी बंगला *m*.]

Summersault, Same as Somersault.

Summerset, Same as Somersault.

Sum'ming *v. n.* गोळाबेरीज करणें. २ ( *law*, with *up* ) सारांश सांगणें *n*, समारोप करणें *n*. [S. UP OF EVIDENCE पुराव्याचा सारांश सांगणें. ]

Summit ( sum'it ) [L. *summum*, highest.] *n. top* शिखर *n*, कळस *m*, उपरिभाग *m*, चूडा *f*. २ *highest point* कळस *m*, सीमा *f*, परमावधि *f*.

Summon ( sum'un ) [L. *sub*, secretly, and *monere*, to warn.] *v. t.* सत्तेनें बोलावणें, सत्तेनें बोलावून आणणें, बोलावूं पाठविणें. २ ( law ) ( साक्षीदाराला किंवा पक्षकाराला ) समन्स पाठविणें, बोलावणें, आव्हान करणें. ३ ( with *up* ) गोळा करणें. [To S. UP COURAGE, RESOLUTION धैर्य -धीर धरणें,] Summ'oned *pa. t.* and *pa. p.* Sum'moning *pr. p.*

Sum'moner *n.* सत्तेनें बोलावणारा *m*, आव्हान करणारा *m*.

Sum'mons *n.* सत्तेनें बोलावणें *n*, कोर्टानें बोलावणें *n*, आव्हान *n*, समन्स *n*.

Summons case *n.* ( law ) फिर्याद दाखल झाल्यावर आरोपीस हजर राहण्याचा लेखी हुकूम ज्यांत सुटतो असा खटला *m*, समन्सचा खटला *m*.

Summum bonum *n. the highest good* निःश्रेयस् *n*, परमपुरुषार्थ *m*, परमार्थ *m*.

Summum genus *n.* परसामान्य *n*.

Sumptuary (sumpt'ū-ar-i) [L. *sub*, up, and *emere*, to buy.] *a.* व्ययनियमाचा, व्ययनियमविषयक. राजाच्या खर्चाच्या नियमांसंबंधीं. [ S. ALLOWANCE (पगाराबाहेरचा) पाहुण्यांच्या भोजनाचा खर्च.]

Sumptuous ( sumpt'ū-us ) [L. *sumptus*, cost.] *a. costly* मोठ्या खर्चाचा, मोठ्या मोलाचा, उंच, बहुमोली. [S. DINNER चमचमीत जेवण. ] २ *magnificent* उमदा, भडक, झळक, भळभळीत; as, "S. apparel."

Sumpt'uously *adv.* मोठा खर्च करून, मोठ्या खर्चानें.

Sumpt'uousness *n.* मोठा खर्च *m*, मोठें मोल *n*, बहुमूल्यता *f*. २ भडक *f*, झळक *f*, भळभळीतपणा *m*.

Sun *v. t.* उन्हांत ठेवणें, उन्हांत घालणें, उन्हांत वाळविणें. २ सूर्यपुट देणें. S. *v. i.* उन्हांत बसणें. Sunned *pa. p.* and *pa. p.* Sun'ning *pr. p.*

Sun ( sun ) [ L. *sol*, the sun. ] *n.* सूर्य *m*. [ BELONGING TO THE S. सौर. DISC OF THE S. सूर्यबिंब *n*, सूर्यमंडल *n*. EARLY MORNING S. बालसूर्य, सकाळचा सूर्य. FIGURE OF THE S. FOR WORSHIP सूर्ययंत्र *n*. HALF YEARLY PASSAGE OF THE S. अयन *n*. MANSION OF THE S. सूर्यनक्षत्र *n*, महानक्षत्र *n*. MERIDIAN S. तरुण सूर्य, मध्यान्हींचा सूर्य. REGION OF THE S. सूर्यमंडल *n*, सूर्यलोक *m*. STROKE OF THE S. लूक *f*, तिरीप *f*, झळ *f*. UNDER THE S. आभाळाखालीं, अलमदुनियेंत. To SWEL-

पोशीव. २ ( *colloq.* of land or plant ) *produced by cultivation* लागवडीस आणलेला, लागवड केलेला. (b) लावून केलेला. ३ *submissive, spiritless* दीन, गरीब, लेचापेचा, मेंगा, मेषपात्र, नामर्द, पराक्रमहीन, नेभळट, नामर्दपणाचा, मेंगेपणाचा, नेभळटपणाचा; as, "T. acquiescence." ४ *flat, vapid, insipid* पचपचीत, मुळमुळीत, पुळपुळीत, निस्तेज, नरम; as, "T. description." ५ *subdued* जिंकलेला.

Tame *v. t. to domesticate* माणसाळणें, माणसाळवणें, माणसाच्या सवईचा करणें, गरीब -मेंढरासारखा करणें, गाय करणें, मऊ करणें, वठणीस आणणें. २ ( हिंस्र जनावर वगैरे ) शिकवणें. ३ जिंकणें, दमन करणें; as, "To T. passions."

Tame'able *a.* माणसाळण्याजोगा. २ शिकवण्याजोगा. ३ वठणीस आणण्याजोगा. ४ दमन करण्याजोगा.

Tamed *pa. p.* माणसाळलेला. २ वठणीस आणलेला, मऊ केलेला. ३ शिकवलेला. ४ जिंकलेला, दमन केलेला.

Tame'ly *adv.* मेषपात्रपणानें, मेंगेपणानें, नामर्दपणानें.

Tame'ness *n.* माणसाळलेलेपणा *m*, गरीबपणा *m*. २ पचपचीतपणा *m*, मचमचीतपणा *m*. ३ लेचेपेचेपणा *m*, मेंगेपणा *m*, नामर्दपणा *m*, नामर्दी *f*, पराक्रमहीनता *f*.

Ta'mer *n.* माणसाळवणारा *m*. २ वठणीस आणणारा *m*. ३ शिकवणारा *m*; as, "Lion-*tamer*."

Ta'ming *v. n.* माणसाळणें *n*. २ वठणीस आणणें *n*. ३ शिकवणें *n*. ४ दमन *n*.

Tamper ( tam'-per ) [ From the root of Temper.] *v. i.* ( with *with* ) *to meddle unfairly or injuriously* ( *with* ) लुडबुडणें, लुचा -लांडा कारभार करणें, उगाच ढवळाढवळ करणें, मध्येंच हात घालणें, नसती उठाठेव *f.* करणें. २ *to exert secret influence* ( गुप्त ) संधान बांधणें, (गुप्त मसलत करून) फितविणें, ( आंतून संधान बांधून नीति वगैरे ) बिघडविणें, भ्रष्टविणें. ३ ( with *illness* ) घालघसरीवर घालणें.

Tam'pered *pa. t.* and *pa. p.* Tam'pering *pr. p.*

Tampon ( tamp'on ) [ Of Dutch origin.] *n.* (कापूस, कपडा, इत्यादिकांचा रक्त थांबविण्याकरितां वापरलेला ) बोळा *m*, गुडदी *f*. T. *v. t. to plug* ( *wound, etc.* ) *with a tampon* बोळा घालून रक्त थांबविणें.

Tan ( tan ) [ Fr. *tan*, bark of young oak.] *v. t. to turn (hides) into leather* ( कच्चीं कातडीं ) कमाविणें, रांपवणें, रांपत घालणें, तयार करणें. २ (skin, etc.) *to make brown by exposure to the sun* ( उन्हानें ) काळा करणें, काळेपणा *m*. आणणें, काळवंडवणें. ३ *to treat* ( *imitation marble* ) *with hardening process* ( कृत्रिम संगमरवरी दगड ) कठिण करणें. T. *v. i. to become brown by exposure to the sun* ( उन्हानें ) काळा होणें, काळवंडणें, काळेपणा येणें. Tanned *pa. p.*

Tan *n. bark used for tanning* ( युरोपांतील ओक वृक्षाची किंवा आपल्या इकडील बाभळ, तरवड वगैरे झाडांची ) कातडीं कमाविण्याची साल *f*, specifically बाभळीची साल *f*, तरवडाची साल *f*.

Tandem ( tan'dem ) [ M. E. *tandem*, at length ( of time ) ] *adv.* ( of horses in harness ) *one behind another* एकामागून एक. [TO DRIVE T. एकामागून एक घोडे जोडलेल्या गाडींतून जाणें.] T. *n. a carriage with horses tandem* एकामागून एक घोडे जोडलेली गाडी *f*, टॅंडम *f*.

Tang ( tang ) [Of Icelandic origin.] *n.* (विळा -चाकू -कानस वगैरेंचा ) मुठींत गेलेला भाग *m*, वारंग *m*.

Tang ( tang ) [ M. E. *tang*, sting.] *n. strong taste or flavour* उग्र वास *m*, उग्र चव *f*. २ *characteristic property* विशेष धर्म *m*.

Tang ( tang ) [ Imitative. ] *v. t.* and *i.* टॅंग -टॅंग आवाज करणें -होणें. Tang *n.* टॅंग -टॅंग आवाज *m*.

Tan'gency *n.* स्पर्शज्यास्थिति *f*, स्पर्शज्यासंबंध *m*.

Tangent ( tan'-jent ) [ L. *tango*, I touch. ] *n. a line touching a curve ( but not cutting it )* स्पर्शज्या *f*, स्पर्शरेषा *f*. [ TO FLY OFF AT A T. ओझरता जाणें. २ विचाराची किंवा आचाराची दिशा एकदम पालटणें. T. OF AN ANGLE कोनस्पर्शज्या *f*.]

Tangent-galvanometer *n.* स्पर्शज्याविद्युन्मापक.

Tangen'tial *a.* स्पर्शज्येसंबंधी, स्पर्शरेषेचा.

Tangen'tially *adv.* स्पर्शरेषेंत.

Tangible ( tan'-ji-bl ) [ L. *tangere*, to touch.] *a. perceptible by touch* स्पर्शानें कळण्यासारखा, स्पर्शनीय, स्पर्शज्ञेय. २ *definite, clearly intelligible* ठळक, स्पष्ट, दिसण्यासारखा, प्रत्यक्ष.

Tan'gibleness, Tangibil'ity *n.* स्पर्शनीयता *f*, स्पर्शज्ञेयता *f*. २ स्पष्टपणा *m*, ठळकपणा *m*.

Tan'gibly *adv.* स्पर्श करण्यासारख्या रीतीनें. २ स्पष्टपणानें, ठळकपणानें.

Tangle ( tan'-gl ) [ Of Scandinavian origin.] *v. t. to intertwine ( threads, etc. ) in confused mass* गुंतवणें, गुरफटवणें, गळफटणें, गळफाटणें, गोंधळणें, गुंतागुंत *f* -गुंडाळा *m.* करणें. २ *to complicate* भानगडीचा करणें, गुंतागुंतीचा करणें; as, "A *tangled* affair." Tan'gle *v. i. to become involved in confused mass* गुंतणें, गुंतागुंत *f* -गुलागूत *f*. होणें. T. *n. a confused mass of intertwined threads* गूत *f*, गुंतागुंत *f*, गुंडाळा *m*, गांठी *f. pl.*, गुंताडा *m*, अढा *m*. २ लढा *m*, गुंतागुंत *f*, घोंटाळा *m*; as, "Business is in a T."

Tan'gled *pa. p.* गुंतवलेला, गुंतागुंतीचा, भानगडीचा.

Tan'glesome *a.* गुंतागुंतीचा, घोंटाळ्याचा.

Tank ( tank ) [ Portuguese *tanque* -L. *stagnum*, a pool. ] *n. a large cistern or reservoir ( for water )* टांकें *n*, टांकी *f*, हौद *m*, तलाव *m*, तळें *n*. Tank-engine *n. a locomotive which has its tank for water over the boiler* टांकीवालें इंजन *n*. T.-car, T.-vessel *n. a car or vessel specially built for the carrying of oil ( petroleum )* पेट्रोलियम (ग्यासलेट) नेण्याची गाडी *f*, तेलाची गाडी *f*. ( b ) तेलाची बोट *f*.

Tan'nable *a*. कमाविण्याजोगें ( कातडें ).
Tan'ner *n*. कातडीं कमाविणारा *m*, कातडीं कमाविण्याचा धंदा करणारा *m*, formerly ढोर *m*.
Tan'nery *n*. कातडीं कमाविण्याचा कारखाना *m*.
Tannic *a*. बाभळीच्या सालीपासून निघालेलें किंवा काढलेलें. [T. ACID बाभळीच्या सालीपासून काढलेलें अम्ल.]
Tannin ( tan'in ) [Fr. ] *n*. हिरड्यांमधील किंवा बाभळीच्या सालीमधील कातडीं कमाविण्याचें द्रव्य *n*. ट्यानिक अम्ल *n*.
Tan'ning *v*. *n*. कातडीं कमाविणें *n*.
Tanning drum *n*. कातडीं कमाविण्याची दोण *f*.
Tanning paddle *n*. कातडीं कमाविण्याचा पंखा *m*.
Tanning tub *n*. कातडीं कमाविण्याचें टीप *n*.
Tan-pit *n*. रावणी *f*, चांभाराची कुंडी *f*.
Tantaliza'tion *n*. आशा लावून निराशा करणें *n*, चाळवणें *n*, चाळवणी *f*, आशा लावणें *n*, चाळवणूक *f*, झुलवणी *f*.
Tantalize ( tan'-ta-līz ) [ From *Tantalus*, in Greek mythology, who died of starvation, though food and water were only just beyond his reach.] *v. t. to tease or torment by raising false hopes* आशा लावून निराशा करणें, चाळवणें, चाळवणी दाखवणें, चाळवणूक *f*. करणें, आशेस लावणें, झुलवणें, झुलवणी *f*. दाखविणें.
Tan'talized *pa. p*. चाळवलेला, चाळवणी दाखवलेला.
Tan'talizer *n*. चाळवणारा *m*, आशेस लावणारा *m*.
Tan'talizing *pr. p*. T. *a*. आशा दाखवणारा, चाळवणीचा, चाळवणी दाखवण्याचा.
Tantamount ( tan'-ta-mownt ) [ Fr. -L. *tantum*, so much + Amount.] *a. equivalent* बरोबर, सम, समतोल, सारखा.
Tan-yard *n*. Same as Tannery.
Tap ( tap ) [ A. S. *tæppa*, tap.] *n. a short pipe with a stopper, through which liquids are drawn* ( दारू काढून घेण्याचें पिपाचें ) आंटेवालें तोंड *n*, आंटेवालें भोंक *m*. २ *plug used to close an opening in a cask* गुडदी *f*, बूच *n*. ३ *tap-room* दारूचा गुत्ता *m*; as, "Found him in the *tap*." ४ *an instrument for cutting threads of internal screws* टाप *m*, नर *m*, चर *m*. [T. AND DIE नरपाटी.] T.-room, Tap-house *n*. दारूचा गुत्ता *m*, दारूचें दुकान *n*. Tap-root *n*. *chief descending root of a plant* धरणमूळ *n*, ( खालीं जाणारें ) मुख्य मूळ, आदिमूल *n*, किंकरी मूळ *n*, पाळ *n*; उ० गाजर, मुळा. ( Tap-root हें द्विदल वनस्पतींना असतें. जोंधळा, गहूं वगैरे एकदल वनस्पतींना नसतें ).
Tap *v. t. to furnish cask with tap* ( पिंपाला ) टाप लावणें -बसवणें. २ *to pierce* ( *a cask* ) *to let out liquid* भोंक पाडणें, तोंड पाडणें. ( b ) भोंक पाडून ( दारू वगैरे ) काढणें. ३ ( *surg.*) *to give vent to fluid* ( *accumulated in body* ) ( शस्त्रप्रयोगानें अन्तर्गळांतील ) पाणी काढणें. ४ *to draw sap from tree by cutting into it* ( तोंड पाडून, भोंक पाडून

झाडांतील ) रस काढणें. ५ *to apply to or solicit* ( person ) *for* अर्ज *m*. करणें, विनंति *f*. करणें, भोंक पाडणें ( jocosely ). ६ *to broach* ( *subject*) ( विषयासंबंधानें ) बोलणें काढणें. ७ *to divert part of current to intercept message* (तारायंत्रांतील) वीज दुसऱ्या तारेवर घेणें. ८ (वीज दुसऱ्या तारेवर घेऊन) बातमी काढून घेणें. Tapped *pa. t.* and *pa. p.*

Tap'ping *pr. p.* T. *n.* ( *surg.*) ( भोंक पाडून ) पाणी काढणें *n.*

Tap ( tap ) [ Imitative.] *v. t. to strike lightly* थाप *f*. मारणें, थापटी *f*-मारणें, थापटी देणें, ठोठावणें, ठोकणें; as, "*Tap* the door with your knuckles." २ *to cause* ( *thing* ) *to strike lightly against* ( नें ) ठोठावणें, ठोकणें; as, "*Tapped* his stick against the window." T. *v. i. to strike gentle blow* ( *at* ) ( -वर ) थाप मारणें, ठोकणें. २ ठक् आवाज करणें.

Tap *n. light blow, rap* थाप *f*, थापट *f*, थापटी *f*, थापड *f*, थापडी *f*, टचका *m*, टिचकी *f*. २ *sound of this* टिचकी *f* ( आवाज ); as, "Heard a *tap* at the door." ३ (*of the hand, upon a tabor*) थाप *f*, हात *m*. ४ ( तारायंत्रांतील शब्द पुरा झाल्यावरचा ) ठक् *m* (आवाज ).

Tape (tāp) [A. S. *tæppe*, ribbon.] *n. a narrow band* (*for tying*) फीत *f*, टेप *f*. २ *a narrow band of strong fabric rotating on pulleys in machinery* नवार *f*, नाडी *f*, नाडा *m*. ३ *continuous strip of paper in receiving instrument of recording telegraph* (ग्राहकांत बसविलेली ) कागदाची पट्टी *f*. ४ ( लांबीरुंदी मोजण्याची ) टेप *f*.

Tape *v. t. to furnish, or tie up, with a tape* फीत *f*. लावणें, नवार *f*. लावणें. २ फितीनें -नाडीनें बांधणें.

Taper ( tā'-per ) [ A. S. *tapor*, a taper.] *n. a small wax-candle* बारीक मेणबत्ती *f*. T. *a. narrowing towards the point* निमुळता, निमोळता, चिंचोळा होत जाणारा, चिंचोळा; as, "T. fingers." T. *v. i. to narrow gradually towards the point* निमुळता होत जाणें, निमुळता असणें. T. *v. t. to cause to grow gradually less* निमुळता करणें, चिंचोळा करणें; as, "The upper part is *tapered off* to a point." Ta'pered *pa. t.* and *pa. p.* Ta'pering *pr. p.* T. *a.* निमुळता, चिंचोळा, शुंडाकृति. Ta'peringly *adv.* निमुळता होत होत. Ta'perness *n.* निमुळतेपणा *m*, चिंचोळेपणा *m*.

Tapestry ( tap'-es-tri ) [ Fr. -L. -Gr. *tapes*, a carpet. ] *n.* बुटीदार कापड *n*, बुटेदार कापड *n*, नकशीदार भिंतीचे पडदे *m. pl.*

Tape-worm *n.* फितीसारखा लांब जंत *m*, पट्टकृमि *m*. हे जंत गोमांस व डुकराचें मांस खाणाऱ्या लोकांस होतात.

Tapir ( tā'pir ) [ From Brazilian *tapyra*, tapir.] *n.* दक्षिण अमेरिकेंतील एक जातीचा रानडुकर *m*, टेपिर *m*.

Tapis ( tap'-is or ta-pē' ) [ Fr. *tapis*, carpet.] *n. carpet* सतरंजी *f*. [To BE ON OR UPON THE T. विचारांत असणें.]

Tappet ( tap'et ) [ Tap + -*et.*] *n.* ( *weaving*) पावडीला दाबण्याकरितां खालच्या दांड्यावर बसविलेला जुळा तुकडा *m*, पावडीचा दांडा *m*.
Tap-room, See under Tap No. 1.
Tap-root, See under Tap No. 1.
Tar ( tär ) [A. S. *teorō*, or *teru*, tar.] *n.* डामर *n*, डांबर *n*, सरलरस *m*, सर्जेरस *m*.
Tar *v. t. to smear with tar* डामर लावणें -फांसणें. Tarred *pa. t.* and *pa. p.* Tar'ring *pr. p.*
Tar ( tär ) [ Abbr. of tarpaulin.] *n. a sailor* खलाशी *m*.
Tarandus (English name, Rein-deer) *n.* (*astron.*) हरिण *f.* ही राशि उत्तरगोलार्धांत आहे.
Tarazed (Latin name, Gamma Aquilæ) *n.* (*astron.*) श्रवण *f.* गरुडराशींतील एक तारा *f*.
Tardy (tär'di) [L. *tardus*, slow.] *a. slow, sluggish* सुस्त, मंद, थंड, आळशी. २ (*med.*) बरें होण्याला बरेच दिवस लागणारा (रोग), चेंगट. ३ *done late* उशिरां केलेला, मागाहून केलेला; as, "T. reform."
Tare ( tār ) [ Fr. -Ar. *tarha*, to throw down or away.] *n. allowance made for weight of box in which goods are packed* बारदान *n*, आभंड *n*.
Tare *v. t. to ascertain weight of ( box, etc. )* (मालाच्या पेटीचें वगैरे) बारदान ठरविणें.
Target (tär'-jet) [A. S. *targe*, a small shield.] *n. a shield* ढाल *f.* २ *a mark for firing at* निशाण *n*, लक्ष्य *n*. [T. -PRACTICE चांदमारी *f.*] ३ (*fig.*) लक्ष्य *n*.
Targeteer' *n. a soldier armed with a target* ढाल असलेला शिपाई *m*, ढालकरी *m*.
Tariff (tar'-if) [O. Fr. *tariffe*, arithmetic -Sp. *tarifa*, tariff -Arab. *ta'rif*, information, knowledge.] *n. a list of duties or customs to be paid on imports or exports* जकातींचा निरखनामा *m*, जकातींचा तक्ता. २ *import or export duties collectively* (आयात किंवा निर्गत मालावरील) जकाती *f. pl.* ३ *law imposing such duties* जकातीचा (बसविणारा) कायदा *m*. ४ *duty on particular class of goods* ( विशिष्ट मालावरील ) जकात *f.* [PREFERENTIAL T. सवलतीची जकात *f.* RETALIATORY T. उलट जकात *f*, जीं राष्ट्रें आपल्या मालावर जकात बसवितात त्यांच्या आपल्या देशांत येणाऱ्या मालावर बसविलेली जकात *f.* TARIFF REFORM जकातपद्धतीची सुधारणा *f.*] ५ *list of charges* किमतींची यादी *f*, दरांची यादी *f*; as, "Refreshment T." RAILWAY T. निरनिराळ्या मालावरील रेलवेच्या भाड्यांची यादी *f.*] T. *v. t.* जकातींचा निरखनामा करणें.
Tarnish ( tär'-nish ) [Fr. *ternir* -O. High Ger. *tarnen*, to obscure.] *v. t. to destroy the lustre of* विटविणें, मळविणें, डाग *m*. पाडणें, मळकट -विटका -मजीत करणें. २ (*fig.*) *to stain* कलंक लावणें, बट्टा *m*. आणणें -लावणें, डाग *m*. लावणें. T. *v. i. to lose lustre* विटणें, मळणें, विटका -मळका -मजीत होणें -होत जाणें. T. *n.* विटणें *n*, मळणें *n*. २ डाग *m*, बट्टा *m*,

कलंक *m.* Tar'nished *pa. t.* T. *pa. p.* विटलेला, विटका, मळका. २ डाग लावलेला, कलंक लावलेला. Tar'nishing *pr. p.*

Tarpaulin (tär'-po-lin) [Tar+*pauling*, covering.] *n. canvas tarred or made waterproof* डामर लावलेलें कापड *n*, ताडपत्री *f.* २ *sailor's tarred or oiled hat* खलाशाची मेणकापडाची टोपी *f*, ताडपत्रीची टोपी *f.* ३ (*colloq.*) *a sailor* खलाशी *m.* Also spelt as Tarpauling.

Tarry (tar'i) [L. *tardus*, slow.] *v. i.* ( only in literature ) *to remain, to lodge* राहणें, वस्ती करणें, ठरणें. २ *to wait for* राहणें, खोळंबणें, खोळंबून राहणें. ३ *to delay to come or appear* वेळ लावणें.

Tar'ry *a.* काळा, डामरासारखा. २ डामर फांसलेला.

Tarsus ( tär'sus ) [Gr. *tarsos*, flat surface.] (*anat.*) *collection of bones between lower leg and metatarsus* पादास्थि *n.* [TARSAL BONES पादकूर्चास्थि.]

Tart ( tärt ) [A. S. *teart*, sharp, severe.] *a. sharp-tasted, acid* ( घसा ) जाळीत जाणारा, (छाती) जाळणारा, आंबट. २ *cutting, biting* मर्मभेदक, झोंबणारा; as, "A T. rejoinder." Tart'ness *n.* झणझणीतपणा *m.* २ मर्मभेदकत्व *n*, मर्मभेदकपणा *m.*

Tartar ( tar'-tar ) [Of French origin.] *n.* (दारूच्या पिंपाला आंतून लागणारा) तांबडा कीट *m.* २ दांतांवरचें कीट *n*, दांतांवरील सायटें *n*, दंतमल *m*, बुरशी *f.*

Tartaric acid *n.* दारूच्या पिंपाला लागणाऱ्या किटापासून काढलेलें अम्ल *n.* हें चिंचेपासूनहि निघतें.

Tartarus ( tār'ta-rus ) [L. -Gr. *tartaros.*] *n. hell* यमलोक *m*, नरक *m.*

Tar'trate *n.* टार्टारिक अम्लाचा (एखाद्या बेसशीं संयोग होऊन झालेला) क्षार *m.*

Tasimeter ( tasi'-mētėr ) [Gr. *tasis*, stretching and *meter*, measure.] *n. electrical apparatus for measuring changes in temperature, moisture, etc.* हवेंतील ओलावा व उष्णमान मोजणारें विद्युद्यंत्र *n.*

Task ( täsk ) [L. *tasca*, tax.] *n. a piece of work imposed* नेमून दिलेलें काम *n.* २ (in prison language) वर्दी *f.* ३ जिकिरीचें काम *n.* ४ *a lesson at school* धडा *m*; as, "Has done his *task*." [T. CLASS (तयार न केलेले) धडे तयार करून घेण्याचा वर्ग *m.* ५ *a work voluntarily undertaken* ( स्वतः होऊन ) शिरावर घेतलेलें काम *n*; as, "An arduous T." [To TAKE A PERSON TO T. *to accuse him of fault* शब्द *m.* ठेवणें. २ *to rebuke him for doing* झाडणें, झाडून टाकणें, समज *f.* देणें.]

Task *v. t. to assign a task to* काम नेमून देणें, वर्दी नेमून देणें, काम माथीं मारणें. २ *to exact labour from* काम करून घेणें, (-वर ) कामाचा बोजा घालणें.

Task-master *n.* काम नेमून देणारा *m*, काम माथीं मारणारा. २ काम करून घेणारा *m.* Task-mistress *n. fem.*

Tassel ( tas'-sel ) [O. Fr. -L. *taxillus*, a small die.]

*n. a bunch of silk hanging as an ornament* रेशमी गोंडा *m*, झुबका *m*. २ *the hanging flowers of some plants* झुबकेदार फुलें *n. pl.*, फुलांचा झुबका *m*. T. *v. t. to furnish with tassel* गोंडे *m. pl.* लावणें, झुबके लावणें. Tas'selled *pa. t.* T. *pa. p.* झुबकेदार, गोंडे लावलेला. Tas'selling *pr. p.*

Taste ( tāst ) [O. Fr. *taster* -L. *taxare*, to touch repeatedly -*tangere*, to touch.] *v. t. to learn flavour of ( food, &c. ) by taking it into the mouth* ( जिभेवर ठेऊन ) रुचि पाहणें, चाखणें, खुमास पाहणें, चव *f* -आस्वाद *m* -स्वाद *m*. घेणें -पाहणें; as, "T. this cheese." २ *to eat small portion of* ( especially after a negative ) चाखणें, चव *f*. घेणें, -पाहणें, तोंडांत घालणें; as, "He has not *tasted* food for three days." ३ *to perceive the flavour of* रुचि *f*. समजणें, स्वाद *m*. समजणें, स्वादज्ञान *n* -रसज्ञान *n*. होणें; all with *in. con.*; as, "Can T. nothing when you have a cold." ४ *to relish*, आवडणें, गोड लागणें; as, "Cannot T. a joke against himself." ५ *to have experience of* अनुभव घेणें, रुचि घेणें. ६ (in Bible) सोसणें; as, "He should not T. death for every man."

Taste *v. i. to try the flavour of anything* ( by eating or drinking a little only ) स्वाद पाहणें, चव घेणें, लज्जत पाहणें, रुचि पाहणें; as, "To T. of each kind of wine." २ लागणें, वाटणें, स्वाद असणें *in. con.* [To T. WELL गोड लागणें, गोड वाटणें, गोड असणें.] ३ (with *of*) *to smack of* लागणें, स्वाद *m* -छटा -वास-गन्ध *m* -ध्वनि -चुणुक येणें -मारणें *g. of o.* ४ *to eat sparingly* थोडें खाणें; as, "For, age but *tastes* of pleasures, youth devours." ५ अनुभव घेणें, आस्वाद *m*. घेणें; as, "To T. of nature's bounty."

Taste *n.* ( -the act. ) आस्वाद *m*. घेणें *n*, चव *f*. घेणें *n*. २ ( sensation ) स्वाद *m*, आस्वाद *m*, रुचि *f*. ३ (sense) रसनेंद्रिय *n*, रसना *f*, जिव्हा *f*, तोंड *n*. [To LOSE ONE'S T. तोंड वाईट होणें, तोंडाची गोडी *f* -चव *f* -रुचि *f*. जाणें *g. of s.* LOSS OF T. अरुचि *f*. ] ४ ( as in substances ) चव *f*, गोडी *f*, रुचि *f*, स्वाद *m*, आस्वाद *m*, मजा *f*, लज्जत *f*, रस *m*, टेस ( corruption of *E. Taste*). ५ *relish sexual or intellectual* गोडी *f*, चव *f*, रुचि *f*, अभिरुचि *f*, आवड *f*. [ACCORDING TO ONE'S T. यथारुचि. TO SUIT THE T. OF रुचणें, मानणें, रुचीस उतरणें.] ६ *nice perception* रसज्ञता *f*, रसिकता *f*. [DEVOID OF T. अरसिक, अरसज्ञ. HAVING T. रसिक, रसज्ञ.] ७ *style, manner in accordance with good usage* ( प्रचलित ) अभिरुचि *f*, सदभिरुचि *f*. ८ *fondness or liking* चट *f*, चटक *f*, आवड *f*, चवणा *m*, लज्जत *f*, हौस *f*. [To GET A T. FOR चटावणें. ] ९ *smack* स्वाद *m*, छटा *f*, वास *m*, गन्ध *m*, ध्वनि *m*, लकीर *f*, छाया *f*, लज्जत *f*, चुणुक *f*. १० *small quantity given as a specimen* मासला *m*. ११ ( *Shakes.*) अनुभव *m*.

Tasted *pa. p.* चाखलेला, आस्वादित. २ *having a particular taste* स्वादाचा, चवीचा, स्वादयुक्त.

Taste'ful *a.* चवदार, रुचकर, मजेदार, गोड, मिष्ट, चणचणीत, खमंग, चरमरीत, खारटतुरट, रोचक, खुमासदार, सुरस, स्वादिष्ट. २ *evidencing taste* मौजेचा, खुबीदार, छबदार, मजेचा, मजेदार, रसिक, सुबक, रसज्ञतादर्शक; as, "T. decorations."

Taste'fully *adv.* चवदारपणानें, स्वादिष्टपणानें. २ सुबकपणानें, खुबीनें, मार्मिकपणानें.

Taste'fulness *n.* चव *f*, चवदारपणा *m*, रुचि *f*, गोडी *f*, मजेदारी *f*, चणचणीतपणा *m*, चरमरीतपणा *m*, मिष्टता *f*, रोचकत्व *n*. २ मजेदारी *f*, खुबी *f*, छबदारी *f*.

Taste'less *a.* बेचव, निचव, फिका, विरस, मिळमिळित, नीरस, रुचिहीन, स्वादरहित.

Taste'lessness *n.* बेचवपणा *m*, फिकेंपणा *m*, रसहीनता *f*.

Tast'er *n.* (वाढण्याच्या आधीं) पदार्थांची चव पाहणारा *m*. २ चव पाहण्याचें भांडें *n*, पेला *m*.

Tast'iness *n.* Same as Tastefulness.

Tast'y *a.* Same as Tasteful.

Tatter ( tat'-tėr ) [Iceland. *töturr*, rags.] *n.* (*usu. pl.*) *a rag* पटकुर *n*, वाभारा *m*, सुडकें *n*, सुडका *m*.

Tatterdema'lion *n.* *a ragged fellow* पटकुऱ्या *m*, चिंधोऱ्या *m*.

Tat'tered *a.* *in rags* फाटका, वाभारे गेलेला.

Tattle ( tat'-l ) [Imitative ] *v. i.* and *t.* *to prattle, to gossip* बकणें, बाता *f. pl.* कुटणें -छाटणें, गप्पा *f. pl.* छाटणें -मारणें, बकबकणें, चकाट्या *f. pl.* पिटणें. T. *n.* *trivial talk* गप्पा *f. pl.*, बाता *f. pl.*, चकाट्या *f. pl.* Tat'tled *pa. t.* and *pa. p.* Tat'tler *n.* गप्पीदास *m*, गप्पा मारणारा *m*, बकणारा, बडबड्या, लघळ, तोंडाळ. Tat'tling *pr. p.*

Tattoo ( tat-tōō' ) [Polynesian.] *n.* *the pricking-in of figures with colouring matter on the skin* गोंदणें *n*, गोंधलें *n*. T. *v. t.* गोंदणें. Tattooed' *pa. t.* and *pa. p.* Tattoo'ing *pr. p.*

Tattoo ( tat-tōō' ) [ Imitative. ] *n.* *a beat of drum recalling the soldiers to quarters* सोजिरांना बराकींत बोलविण्याचा ड्रम *m*, टाट्ट *m*.

Taught (tawt) *pa. t.* of Teach. T. *pa. p.* शिकविलेला, शिक्षित, अध्यापित.

Taunt ( tawnt ) [O. Fr. *tanter*, *tenter*, to provoke.] *v. t.* टोमणा *m.* मारणें, टोंचून बोलणें, टोंचणें, बोंचणे, लावून -बोंचून -खोंचून -घालून पाडून बोलणें. Taunt *n.* टोमणा *m*, बोचणी *f*, बोचणें *n*, उपरोधिक शब्द *m*.

Taunted *pa. t.* and *pa. p.*

Taunt'er *n.* लावून बोलणारा, टोंचून बोलणारा *m*, टोमणा मारणारा.

Taunt'ing *pr. p.* T. *a.* उपरोधिक, उपरोधाचा.

Taunt'ingly *adv.* टोमणा मारून, लावून, टोंचून, खोंचून.

Taurus ( taw'-rus ) [L. -Gr. *tauros*, a bull. ] *n.* ( *astron.* ) *one of the signs of the zodiac, the Bull*

वृषभराशि *m.* [ TAURI GAMMA ( *astron.*) रोहिणी. TAURI BETA ( *astron.*) अग्नि. TAURI PIE ( *astron.*) कृत्तिका. TAURI 133, 135 ( *astron* ) आर्द्रा. TAURI 113, 116, 117 ( *astron.*) मृगशीर्ष.]

Tautolog'ic,-al *a.* पुनरुक्तीचा, द्विरुक्तीचा. [बोलून.

Tautolog'ically *adv.* पुनरुक्तीनें, द्विरुक्तीनें, तेंच तेंच

Tautol'ogise *v. i.* द्विरुक्ति करणें, पुनरुक्ति करणें.

Tautol'ogist *n.* तेंच तेंच फिरून बोलणारा, पुनरुक्ति करणारा *m.*

Tautology ( taw-tol'-o-gi ) [Fr. -Gr. *tautos*, the same, and *logos*, a word.] *n. saying the same thing twice over in different words* पुनरुक्ति *f*, द्विरुक्ति *f*; as, "Arrived one after the other in succession."

Tavern ( tav'-ern ) [ Fr. -L. *taberna*, a hut. ] *n. public house for supply of food and drink* खाण्यापिण्याचें दुकान *n*, टावर्न. इंग्रजी टावर्नमध्यें दारूहि विकत मिळते. Tavern-keeper *n.* टावर्नवाला *m.*

Tawdry (taw'-dri) [ From St Audrey, at whose fair near Ely, gaudy articles were sold.] *a. showy but worthless, gaudy* दिखाऊ, देखणाऊ, ढबीचा, पोशाखी, बेगडीशोभेचा, कल्हईचा, (मुलामी) शोभेचा. T. *n. cheap or excessive finery* दिखाऊपणा *m*, पोशाखी शोभा *f*, बेगडी शोभा *f*. Taw'drily *adv.* दिखाऊपणानें. Taw'driness *n.* दिखाऊपणा *m*, मुलामी शोभा *f*, बेगडी शोभा *f*.

Tawny (taw'-ni) [From the root of Tan.] *a. brownish yellow* पिंगट, पिंगळा, पिंवळसर, पिंगा, कपिल. Taw'niness *n.* पिंगटपणा *m*, पिंवळसरपणा *m.*

Tax (taks) [Fr -L. *taxa -tango*, I touch.] *v. t. to impose tax (on persons, goods, etc.)* कर *m.* बसविणें, पट्टी *f* -दस्त *m.* बसविणें. २ *to make demands upon* ( -वर ) बोजा बसविणें, ( -वर ) भार घालणें. ३ *to charge person with fault* ( -वर ) दोषारोप करणें, दोष लावणें. Taxed *pa. t.* T. *pa. p.* कर बसविलेला, दस्ताचा, कराचा. [ HALF-TAXED निमदस्ती. SUB-TAXED धारेएहसानी. TAXED IN CASH नगदी. TAXED IN KIND ऐनजिनसी.] Tax'ing *pr. p.*

Tax *n. a charge made by a government on property, income, etc.* कर *m*, सारा *m*, पट्टी *f*, सरकारपट्टी *f*, चावडी *f*, सरकारधारा *m*, दिवाण *n.* [CLOSING OR CLEARING INSTALMENT OF A T. झाडवाकी *f*. EXEMPT FROM T. गैरदस्त, बिनकराचा. HALF T. निमसारा *m.* HOUSE T. घरपट्टी *f*. LAND T. धारा *m*, फाळा *m*, सारा *m.* PERSON PAYING IT धारेकरी. INSTALMENT OF T. हप्ता *m.* REMITTED TAX or SUB-TAX एहसान *n.* SETTLED or REGULAR T. कायम धारा. EXTRA T. सवाई *f*, वरताळा *m.* T. IN CASH OR MONEY नक्त बाब *f*, नक्ती बाब *f*. T. LEVIED UPON THE EARING OF THE CROP तुसारपट्टी *f*. T. ON EXPORTS AND IMPORTS जकात *f*. T. ON WELLS विहीरहुंडा *m.* T. ON MARRIAGE

OF WIDOWS पाटदाम *m.* T. ON SHOP-KEEPERS AND ARTISANS मोहतरफा *m.* T. UPON FIELDS AND ENCLOSURES सारा *n.* TAX TO DEFRAY CONTINGENT CHARGES सादिलवारपट्टी *f.* T. TO SUPPLY A DEFALCATION तोटापट्टी *f.* T. UPON LOWEST CLASSES अडाणपट्टी *f.* TO ASSIGN OR APPORTION A T. हिस्सेरसी *f.* करणें -बसवणें, फाळा *m.* फाडणें, खापणी *f.* करणें, फाळणी *f.* करणें, पट्टी *f.* फाडणें -फाळणें -तासणें. ] २ *strain or heavy demand* ( *on* ) बोजा *m*, भार *m.*

Tax'able *a.* कर वसविण्यास पात्र, कर वसविण्यास योग्य, साऱ्याचा, वसुली, दस्ती. [T. MINIMUM कर आकारण्याची कमीत कमी रक्कम *f.*] [*f* -योग्यता *f.*

Tax'ableness, Taxabil'ilty *n.* कर वसविण्याची पात्रता-

Taxa'tion *n.* कर बसविणें *n*, कर *m*, पट्टी *f.*

Tax-collector, Tax-gatherer *n.* कर वसूल करणारा, वसुलदार, वसुल्या, तहसिलदार, जकातदार.

Tax-free *a.* बिनकराचा, विनसाऱ्याचा, दस्तबाद.

Taxi ( tak's-i ) [Abbr. of taxi-cab.] *n.* *a cab, esp. motor-cab fitted with a taximeter* घड्याळवाली क्याब ( गाडी ) *f.* (b) घड्याळवाली मोटार (गाडी).

Taxi-cab *n.* Same as Taxi. [ Taxidermy.

Tax'idermist *n.* कातडीं खारवून भरणारा *m.* See

Taxidermy ( taks'-i-dėr-mi ) [ Fr. -Gr. *taxis*, arrangement + *derma*, skin.] *n.* *the art of preserving and stuffing the skins of animals* पूर्वीसारखीं जिवंत दिसण्याकरितां शिकारी किंवा इतर प्राण्यांचीं कचीं कातडीं कांहीं द्रव्यांनीं कुंस गळूं न देतां खारवून तीं पेंढ्यानें भरण्याची कला *f*, कातडीं खारवून भरण्याची कला *f.*

Taximeter ( tax'i-mētėr ) [Fr. *taxe*, tariff, and Meter.] *n.* *an automatic device fitted to a cab and indicating distance traversed and fare due* क्याब (गाडी) किंवा मोटार ( गाडी ) किती चालली व तिचें भाडें किती झालें हें आपोआप सांगणारें घड्याळ *n*, मोटारचें घड्याळ *n*, क्याबचें घड्याळ *n.*

Taxing master *n.* सालिसिटरांचीं बिलें तपासणारा ( हायकोर्टाचा अधिकारी ) *m.*

Taxis ( tak'sis ) [Gr. *tassein*, to arrange.] *n.* अन्तगेळ परत पोटांत लोटण्याची क्रिया *f*, दावून अन्तगेळ पोटांत लोटणें *n*, अंत्रसंस्थापन *n.*

Tax-payer *n.* कर देणारा *m.*

Taygeta *n.* नितली *f*, कृत्तिकापुंजांतील दुसरी तारा.

Tea ( tē ) [Fr. *the*'-Chinese *ch'a.*] *n.* ( plant ) चहाचें झाड *n.* २ ( *leaves of this*) चहाचीं पानें *n. pl.*; as, "Black, green *tea.*" ३ *a drink made from it* चहा ( तयार केलेला ) *m.* ४ *an infusion of leaves of other plants* काढा *m*, चहा *m.* (b) *an infusion of beef* रस्सा *m*, सुरवा *m.* ५ *a light after-noon meal with tea* तिसरे प्रहरचा फराळ *m* -चहा *m.* T.-cup *n.* चहाचा पेला *m.* [STORM IN A T.-CUP क्षुल्लक गोष्टीचा बाऊ *m*, क्षुल्लक गोष्टीचें महत्व *n.*] T.-kettle *n.* किटली *f.*

T.-party *n.* चहापार्टी *f*, चहापानसमारंभ *m.* Tea-pot *n.* चहादाणी *f.* T.-service, T.-set *n.* (कप, पेले, बशा, चमचे वगैरे) चहाचा संच *m.* T.-spoon *n.* चहाचा (लहानसा) चमचा *m.* Tea-spoonful *n.* चहाचा चमचाभर. T. garden *n.* चहा पिण्याची सार्वजनिक बाग *f.* T. plantation चहाचा मळा *m.* T. planter *n.* चहाचा मळेवाला *m.* T. urn *n.* चहाचें पाणी ठेवण्याचें किंवा कढवण्याचें भांडें *n.* T. taster *n.* (केलेल्या) चहांची चव घेऊन त्यांची प्रत लावणारा *m*, चहापरीक्षक.

Tea *v. t. to take tea* चहा घेणें -पिणें; as, "We *tea* at four." २ *to give tea to* (a person) चहा देणें. Teaed *pa. t.* and *pa. p.* Teaing *pr. p.*

Teach (tēch) [A. S. *tæcan*, to teach.] *v. t. to give knowledge to* शिकविणें, पढविणें, सांगणें, उपदेश *m.* देणें, शिक्षण *n.* देणें, अध्यापन *n.* करणें. Taught *pa. t.* and *pa. p.*

Teach'able *a.* (of person) *apt to learn, docile* शिकविण्यासारखा. (b) शिकण्याची हौस असलेला. २ (of subject) *that can be taught* शिकविण्याजोगा, शिक्षणीय, शिक्ष्य.

Teach'er *n.* शिक्षक *m*, शिकविणारा *m*, गुरु *m*, अध्यापक *m*, वस्ताद *m.* [ACQUIRED FROM A T. गुरुमुखागत. SPIRITUAL T. गुरु *m*, आचार्य *m.*]

Teach'ing *pr. p.* शिकविणारा. T. *n.* शिकविणें *n*, शिक्षण *n.* २ *doctrine* शिकवण *f*, तत्त्व *n*; as, "The *teachings* of the Church."

Teak (tēk) [Malay.] *n.* (-the tree) सागवान *m*, साग *m*, साया *m*, सायला *m.* २ (-the wood) सागवान *m*, साग *m*, साया *m*, सायला *m.* [OF T. सागवानी, सागवानाचा. PLANTATION OR FOREST OF T. सागबाग *f*, सागरान.]

Teal (tēl) [Etymology dubious.] *n. a small fresh-water duck* पाणकोंबडा *m*, पाणकुकडा *m.*

Team (tēm) [A. S. *team*, a team (of oxen, etc.).] *n. two or more beasts of burden harnessed together* जोत *n*, सांगड *f.* २ *a set of players on one side in a game* एका बाजूचे गडी *m. pl.*, मंडळी *f*, बाजू *f*, संघ *m.* ३ *a set of persons working together* टोळी *f*, बरोबर काम करणारे लोक *m. pl.* T. *v. t. to harness* (*horses, etc.*) *in a team* जोड *f.* घालणें, सांगडणें.

Team'ster *n.* सांगड हाकणारा *m*, जोत हाकणारा *m.*

Teapoy (tēp'-oi) [From Hind. *tipai.*] *n. a small three-legged table for tea, etc.* तिपायी *f*, तिवई *f.*

Tear (tār) [A. S. *teran*, to tear.] *v. t. to pull apart* फाडणें, फाडून टाकणें, विदारण *n.* करणें— soundingly टरकन् or टरकर (*intens.* टरटर, टरटरां, टरारां) फाडणें, टरकवणें, टरकावणें. [TO TEAR IN OR TO PIECES फाडफाडून घेणें -टाकणें, तुकडे *m. pl.* करणें, तुकडेतुकडे *m. pl.* करणें. TO T. AND PULL ASUNDER विसकटणें, विसकटाविसकट करणें.] २ *to lacerate* बुचकरणें, बोचकरणें, बुचकुरणें. ३ *to pull violently*

(*lit. and fig.*) तोडणें, ओढणें, ओढून काढणें; as, "A babe *torn* from the breast." ४ *to pull violently at* उचकटणें, उपटणें, उखळणें, उघडणें; as, "*Tore at* the cover of the parcel." [To T. ONE'S HAIR दुःखानें -निराशेनें -रागानें केंस उपटणें.] T. *v. i. to lend itself to tearing* फाटणें, फाळा *m.* निघणें, फाळा जाणें *g. of s.*–soundingly टरकन् -टरकर (intensively टरटर -टरटरां -टरारां -टराटर -धसकन्) फाटणें, धसकणें; as, "*Tears* easily." २ *to run or walk hurriedly* धडकावून जाणें -चालणें, धसकावून जाणें, धसकावणें; as, "*Tore* down the hill." Tore, Tare (Bible) *pa. t.* Torn *pa. p.* Tear'er *n.* फाडणारा *m.*

Tear *n. rent in cloth* चीर *f*, फाळा *m.*

Tear (tēr) [A. S. *tear*, tear.] *n.* अश्रु *m*, असू or आसूं *n.* [CROCODILE T.s नक्राश्रु *m. pl.* FLOOD OF T.s अश्रुधारा *f*, अश्रुपूर *m.* FLOWING OR TRICKLING OF T.s अश्रुपात *m.* T.-DROP अश्रुबिंदु *m*, टीप *n.* T. OF AFFECTION प्रेमाश्रु *m.* TO BURST INTO T.s रडें कोसळणें. TO SHED T.s अश्रु ढाळणें -गाळणें. TO STREAM (TEARS) पाण्यानें डोळे भरून येणें.]

Tear'ful *a. abounding with tears* अश्रूंनीं भरलेला, डबडबलेला, डबडबीत; as, "T. eyes." २ (of news) *sad, mournful* दुःखकारक, उदासवाणा.

Tear'fully *adv.* रडत रडत, डोळयांत आंसवें आणून.

Tear'ing *pr. p.* T. *a.* फाडणारा. २ *violent, overwhelming* जोराचा, धसक्याचा; as, "T. pace, T. rage."

Tear'less *a.* अश्रुहीन, डोळयांत टीप न येणारा. (b) *unfeeling* कठोर (मनाचा).

Tease (tēz) [Of Anglo-Saxon origin.] *v. t. to comb or card as wool* पिंजणें, पिंजारणें. २ *to scratch as cloth to raise a nap* फूल येण्याकरितां (टीझेल वनस्पतीवर) घांसणें. ३ *to vex with importunity, jests &c., to torment* त्रास देणें, छळणें, गांजणें, छेडणें, जाचणें, चाळवणें, त्रासवणें, सतावणें, तळतळावणें, गांजणूक *f* -जाचणूक *f* -जाचणी *f* -छळणूक *f* -छळ *n* -छेडणूक *f* -चाळवणूक *f* -कांचणी *f* -कुचाळी *f* -कुचेष्टा करणें *g. of o.*, जाच *m* -काच *m.* देणें. Teased *pa. p.* पिंजलेला. २ गांजलेला.

Tea'ser *n.* पिंजणारा *m.* २ गांजणारा *m*, गांजणूक *f.* करणारा *m*, छलक *m*, त्रास देणारा *m.*

Tea'sing *pr. p. a.* पिंजणारा. २ गांजणारा, छळणारा. ३ त्रासाचा, किचकट, किचरट, खचरट, खिस्तीचा.

Tea'sing *v. n.* पिंजणें *n.* २ गांजणें *n.*

Teat (tēt) [A. S. *tit*, a teat.] *n. nipple (of woman)* स्तनाग्र *n*, बोंडी *f*, बोंड *n*, चूचुक *m.* २ *dug of a beast* आंचळ *m*, आसड *m*, सड *m*, स्तन *m.* [BLIND T. खुंट *m.* CLOT WHICH FORMS DURING MILKING OF THE T. खीळ *f*, खुंव *m.* OF TWO T.s दुसडी.] ३ (मुलांस तोंडांत धरण्यासाठीं देण्याचें) रबराचें बोंड *n.*

Technic (tek'nik) *a.* (R.) कलेचा. T. *n.* (*usu. pl.*) परिभाषा *f.* २ प्रक्रिया *f.*

**Technical** ( tek'nik-al ) [Gr. *technikos*, ( allied to Sk. तक्ष्, to carve ) -Gr. *techne*, art. ] *a.* कलाविषयक, व्यवहारोपयोगी, कलेचा, कलेसंबंधीं. २ विशिष्ट कलेचा, विशिष्ट कलेसंबंधीं. ३ यांत्रिककलेचा, यांत्रिककलाविषयक, पारिभाषिक, परिभाषाविषयक, सांकेतिक. [ T. COLLEGE कलाभुवन *n*, कलाशिक्षणगृह *n*. T. EDUCATION कलाशिक्षण *n*.]

**Technical'ity** *n.* ( विशेष ) विधि *m*, बाब *f*; as, "Legal *technicalities*." २ पारिभाषिक शब्द *m*.

**Tec'hnically** *adv.* कलेच्या दृष्टीनें. २ परिभाषेनें. ३ कलेंत, उद्योगधंद्यांत. ४ विशिष्ट क्रियेच्या किंवा उपचाराच्या दृष्टीनें. ५ ( आवश्यक ) विधीच्या दृष्टीनें.

**Technique'** *n.* प्रक्रिया *f*, पद्धति *f*. २ (एखाद्या) कलेंतील कौशल्य *n*.

**Technol'ogist** *n.* कलाविज्ञानपटु *m*, कलाविज्ञानवेत्ता *m*.

**Technol'ogy** *n.* ( निरनिराळ्या व्यवहारोपयोगी जसें, साबण, साखर, मेणबत्त्या, कातडीं रंगविणें, ) कलांसंबंधीं शास्त्रीय व सोपपत्तिक माहिती *f*, कलाविज्ञान *n*. [T. OF SUGAR साखर तयार करण्याची शास्त्रीय व सोपपत्तिक माहिती *f*, शर्कराविज्ञान *n*.] २ ( कलाविषयक ) परिभाषा *f*.

**Ted** ( ted ) [Old Norse *tedhja*, to spread manure.] *n. v. t. to turn over and spread out to dry* ( कापून वाळत टाकलेलें गवत) खालींवर करणें, पसरणें, पसरून टाकणें.

**Tedious** ( tē'-di-us ) [ L. *tædium*, weariness. ] *a. wearisome, tiresome, irksome* कंटाळवाणा,. कंटाळा येण्याजोगा, त्रास येण्याजोगा, लांबलचक, पाल्हाळिक, कंटाळ्याचा, चेंगट, चेंगटाईचा, चरपट्या, चऱ्हाट्या. २ लांबलेला. [T. LABOUR लांबलेला प्रसव *m*, कुंठित प्रसूति *f*.]

**Te'diously** *adv.* कंटाळवाणेपणानें. २ पाल्हाळानें.

**Te'diousness** *n.* कंटाळवाणेपणा. *m*.

**Te'dium** *n.* कंटाळवाणेपणा *m*, कंटाळा *m*.

**Teem** ( tēm ) [ A. S. *team*, offspring. Teem शब्दाचा धात्वर्थ प्रसवणें असा आहे.] *v. t.* (with *with* ) *to be prolific, to abound in* प्रचुर असणें in. con., and मध्यें of the subject, मय -युक्त असणें, (in comp.) in. con., ऊत येणें in. con. and ला of *acc.*, ( ची ) रेलचेल *f* -महामुरी असणें in. con.; as, "Forests T. with snakes." Teem *v. i.* पुष्कळ -रगड असणें, ओतप्रोत असणें; as, "Fish *teem* in these waters."

**Teem'ing** *a.* पुष्कळ, रगड, फार, मनस्वी, अतोनात; as, "The *teeming* millions of India." २ प्रचुर, मय, पूर्ण, परिपूर्ण ( all in comp. ).

**Teen** ( tēn ) [ O. E. *tene*, *pl.* of Ten.] *suffix of numbers from thirteen to nineteen* तेरापासून एकोणीसपर्यंतचे आंकड्यांना लावण्याचा प्रत्यय *m*.

**Teens** *n. pl.* तेरापासून एकोणीसपर्यंतचें वय *n*, विशी *f*; as, "To be in one's *teens*."

**Teeth** *pl.* of tooth.

Teeth *v. i. to grow or cut teeth* दांत येणें, दांत फुटणें, दांत उगवणें *in. con.*, दांतांचा उद्गम होणें.

Teeth'ing *n.* (प्रथमच) दांत येणें *n*, दंतोद्गम *m*, दंतोद्भव *m*.

Teetotal (tē-tō'tal) [Prob. from a stammering pronunciation of the word Total by Richard Turner of Preston in 1833.] *a.* मद्यपानत्यागाचा, मद्यपाननिषेधक, दारू सोडण्याचा, मद्यत्यागाचा; as, "T. pledge."

Teeto'taller *n.* मद्यत्यागी *m*. Also Teetotaler.

Tegmen (teg'men) [L.] *n.* मस्तिष्कतंतुत्वचा *f*.

Tegument (teg'ū-ment) [L. *tegumentum -tegere*, to cover+ment.] *n.* आवरण *n*, वेष्टन *n*, टरफल *n*, भूंस *n*, तूंस *n*.

Teinoscope (tī'nō-skōp) [Gr. *teinein*, to stretch, +Scope.] *n.* त्रिपार्श्वदूरदर्शक *m*. यांत दोन त्रिपार्श्व असतात. रंगांचें अपायन (Aberration) काढून टाकण्यासाठीं व पदार्थांचे आकार लहानमोठे करण्यासाठीं हे एकत्र जोडलेले असतात.

Telau'tograph *n. telegraph that reproduces writing* (स्वतःच) तार लिहिणारें तारायंत्र *n*.

Telegram (tel'e-gram) [Gr. *tele*, Sk. तिरस्, distant, and *gramma*, a word.] *n.* (तारायंत्रांतून पाठविलेली) तार *f*, विद्युत्संदेश *m*, तारेंतील बातमी *f*.

Telegraph (tel'e-graf) [Gr. *tele*, + *graphein*, (allied to Sk. गृभ्, to be filled) to write.] *n.* तारायंत्र *n*, विद्युत्संदेशयंत्र *n*. [DIAL T. डायलचें तारायंत्र *n*.] T. *v. t.* तार पाठवणें, तार करणें.

Telegra'pher *n.* तारमास्तर *m*. २ तारायंत्रकलापटु.

Telegraph'ic *a.* तारायंत्राचा, तारायंत्रानें पाठविलेला, तारेचा. [T. MONEY-ORDER तारेची मनीआर्डर.] Telegraph'ically *adv.* तारेनें.

Telegraph -indicator *n.* तारायंत्राचा कांटा *m*.

Telegra'phist *n.* तारमास्तर, तारायंत्रें करण्यांत प्रवीण.

Tel'egraphy *n.* तारायंत्र तयार करण्याची विद्या *f*. २ तारायंत्रांतून बातमी पाठविण्याची विद्या *f*, तारायंत्र चालविण्याची विद्या *f*, तारेचें काम *n*. [WIRELESS T. बिनतारी तारायंत्र *n*.]

Teleolog'ical *a.* हेतुदर्शक. २ हेतुवादासंबंधीं.

Teleology (tel-e-ol'-ōji) [Gr. *telos -eos*, end, and *logos*, discourse.] *n. the doctrine of final causes* विशिष्ट कार्य विशिष्ट हेतूकरितां घडलेलें आहे असा वाद *m*, हेतुवाद *m*.

Telepathy (tel'ē-path-i) [Gr. *tele*,+Pathy.] *n. action of one mind on another at a distance through emotional influence without communication through senses* दूरच्या दोन लोकांच्या मनांत एकाच वेळीं एकच भावना येणें *n*, समभावना *f*.

Telephone (tel'e-fōn) [Gr. *tele*, and *phone*, a sound, allied to Sk. भण्, to speak.] *n.* बोलण्याचें तारायंत्र *n*, तिरोभणनयंत्र *n*, शब्दवाहक तारायंत्र *n*.

[STRING T. सुताचें ( बोलण्याचें ) तारायंत्र. T. RECEIVER टेलिफोनची (घेण्याची) नळी *f*. T. TRANSMITTER टेलिफोनची (मधून बोलण्याची) वाटी *f*.]

Telephone *v. t.* टेलिफोन करणें, टेलिफोनमधून बोलणें.

Tele'phoner *n.* टेलिफोन करणारा.

Telephonic *a.* बोलण्याच्या यंत्राचा, टेलिफोनचा.

Tel'ephonist *n.* टेलिफोन करणारा *m.* २ टेलिफोनच्या यंत्रांची माहिती असणारा *m*, टेलिफोन बसविणारा *m.*

Telescope ( tel'e-skōp ) [ Gr. *tele*, and *skopein*, to see.] *n.* दुर्बीण *f.* दूरदर्शक *m*, दूरवीक्षणयंत्र *n.* [ACHROMATIC T. नीरंग दु. APLANATIC T. गोलापायनरोधक दु. ASTRONOMICAL T. ज्योतिषदु. EQUATORIAL T. दिवादूरदर्शक. FRONT VIEW T. सन्मुखदु. PHOTOGRAPHIC T. ग्रहांचे फोटो घेणारी दु. REFLECTING T. परावर्तक दु. REFRACTING T. वक्रीभवनीय दु.]

Telescop'ic, -al *a.* दुर्बिणीचा, दुर्बिणीच्या विषयींचा. २ ( star ) दुर्बिणींतून दिसणारा, फ़ार दूरचा. Telescop'ically *adv.* दुर्बिणीनें, दुर्बिणींतून पाहून.

Tel'escopy *n.* दुर्बिणी तयार करण्याची कला *f.* २ दुर्बीण वापरण्याची कला *f.*

Telespectroscope ( tel-ē-spek-tros-skōp ) [ Gr. *tele*, +Spectroscope. ] *n.* दूरवर्णदर्शक ( दुर्बीण ), दूरविभादर्शक ( यंत्र ). [ Spectroscope =वर्णदर्शक or विभादर्शक.]

Tell ( tel ) [ A. S. *tellan*, to say, to count.] *v. t. to relate* सांगणें, बोलणें. २ *to utter* सांगणें, उच्चारणें, तोंडाबाहेर -ओंठाबाहेर काढणें; as, "You *told* a lie." ३ *to give information or description of* सांगणें, कळवणें, ऐकवणें, सुनावणें, जाहीर -श्रुत करणें, निवेदन करणें; as, "He *told* me about his difficulties." ४ *to distinguish* ( फरक ) ओळखणें, निराळा करणें; as, "Cannot T. them apart." ५ *to assure* खात्रीनें सांगणें; as, "I can *tell* you it is not so easy." ६ *to count* मोजणें, गणणें, गणना *f.* करणें; as, "*Tell* a hundred." [TO TELL OFF, *to detach for duty* कामावर पाठवणें, कामगिरीकरितां वेगळा -निराळा काढणें.] Tell *v. i. to produce marked effect* परिणाम करणें, परिणाम *m.* होणें *g. of s.* लागू होणें, सफल होणें; as, "Every blow *tells*."

Tel'ler *n.* सांगणारा etc. २ ( पार्लमेंटांतील ) मतें मोजणारा. ३ (बँकेंतील) पैसे मोजून देणारा व घेणारा *m.*

Tel'ling *pr. p.* Tel'ling *a. having great effect* परिणामकारक, लागू होणारा, लागू झालेला, लागू पडणारा-पडलेला.

Tel'l-tale *n.* चुगलखोर *m*, चहाडखोर *m*, चुगल्या करणारा *m.* २ ( *fig.* used attrib. ) *thing or circumstance that reveals person's thoughts, conduct, etc.* बोधक, सूचक; as, "*Telltale* face, etc."

Tellurium ( tel-lū'-ri-um ) [ L. *telluris*, the earth.] *n.* रसायनशास्त्रांतील 'भौम' नांवाचें अधातु मूलद्रव्य *n.*

Temerity ( te-mer'i-ti ) [ Fr. *temerite* -L. *temere*, by chance, rashly. ] *n. rashness* अविचार *m*, साहसिपणा *m*, साहस *n*, उतावळ *f.*

Temper ( tem'pėr ) [L. *tempere*, to combine properly ·*tempus*, a bit cut off, a portion of time.] *v. t. to mix in due proportion, to modify by mixture* **माफक करणें, बेताचा करणें, ( मिसळून -मिसळ करून ) सुमाराचा -नेमस्त -नरम ·गरमनरम -समधात करणें.** [To T. HOT WATER BY POURING IN COLD WATER विसावणें, विसण -विसाण घालणें. COLD WATER POURED INTO HOT TO T. IT विसाण *n*, विसण *n.*] २ **( माती वगैरे ) कमावणें.** ३ *to soften* **सौम्य करणें, नरम -मृदु करणें;** as, "To T. justice with mercy." ४ (metals) *to bring to a proper degree of hardness* **पाणी देणें, पाणी चढवणें, कठिण करणें.** ५ **(पियानो) योग्य सुरांत लावणें.**

Tem'per *n.* **मिश्रण** *n*, **मिसळ** *f.* २ (of metals) **पाणी** *n.*

Tem'per *n.* **स्वभाव** *m*, **प्रकृति** *f.* २ *temperament* **मिजाज** *f*, **मिजास** *f*, **वृत्ति** *f.* [IN A GOOD T. खुषींत, मजेंत. IN A BAD T. रागावलेला, क्रोधयुक्त. TO LOSE ONE'S T. रागावणें. OUT OF T. रागावलेला, संतापलेला. TO TRY THE T. OF सत्त्व घेणें. ] ३ *irritability, passion* **राग** *m*, **क्रोध** *m*, **रागीटपणा** *m.*

Temperament (tem'pėr-a-ment) *n.* **स्वभाव** *m*, **प्रकृति** *f*, **प्रकृतिस्वभाव** *m*, **देहस्वभाव** *m*, **तब्बेत** *f*, **मिजास** *f*, **अंगस्वभाव** *m.* [BILIOUS T. पित्तप्रकृति *f*, तापटपणा *m.* LYMPHATIC T. कफप्रकृति *f*, शांतपणा *m.* NERVOUS T. वातप्रकृति *f*, चंचलपणा *m*, भित्रेपणा *m.* SANGUINE T. (वाघासारखी) उत्साही प्रकृति *f*, उत्साही स्वभाव *m*, उत्साह *m.*]

Tem'perance *n.* **नेमस्तपणा** *m*, **नेमस्त आचरण** *n*, **नेमस्त वृत्ति** *f*, **मितव्यवहार** *m*, **मितभोजन** *n*, **मिताहार** *m.* २ **( दारूच्या बाबतींत ) नेमस्तपणा** *m*, **मितपान** *n.* ३ *total abstinence* ( from alcoholic drinks ) **मद्यपानत्याग** *m*, **मद्यत्याग** *m*, **मद्यपाननिषेध** *m.* [T. MOVEMENT मद्यपाननिषेधक चळवळ *f.* T. SOCIETY मद्यपाननिषेधक मंडळ *n.*]

Temperate ( tem'pėr-āt ) *a.* ( of persons ) *moderate, abstemious* **नेमस्त, मिताहारी** ( opposed to gluttonous), **नेमस्त -मेजकें खाणारा** *m*, **मितभोजी.** २ (opposed to a drunkard ) **नेमस्त पिणारा, माफक पिणारा, मितपानी.** ३ ( of qualities ) *not excessive in degree* **नेमस्त, बेताचा, माफक, सुमाराचा, परिमित, मित.** ४ *not marked with passion* **नेमस्त, नेमस्तपणाचा.** ५ *of mild temperature* **समशीतोष्ण;** as, "T. zone."

Tem'perately *adv.* **नेमस्तपणानें, माफकपणानें, परिमितपणें, मितव्यवहारपूर्वक, बेतानें.**

Tem'perateness *n.* Same as Temperance.

Tem'perature ( tempėr-ā-tūr ) [ L. *temperatura* -*tempero*, of time.] *n. degree of heat* **उष्णमान** *n*, **उष्णतेचें प्रमाण, थंडीचें प्रमाण** *n.* [HIGH T. अति उष्णमान. LOW T. कमी उष्णमान. TO TAKE ONE'S T. उष्णमान पाहणें, ताप *m.* पाहणें.]

*N. B.*—**उष्णमान** or **उष्ण** is restricted to degree of heat; while **उष्णता** is restricted to quantity of heat.

Tem'pered *a.* (मिसळून) माफक केलेला, बेताचा केलेला. [ WELL-TEMPERED ( mortar ) कमाउ, कमावलेला.] २ पाणी दिलेला. ३ ( of a particular temper ) स्वभावाचा, प्रकृतीचा, शील ( in *comp.*).

Tempest ( tem'pest ) [ Lit. 'A portion of time, a season, weather, bad weather' -L. *tempus*, time.] *n.* (*lit.* and *fig.*) तुफान *n*, वादळ *n*.

Tempes'tuous *a.* तुफानाचा, वादळाचा, तुफानी.

Tem'plate, Same as Templet.

Temple ( tem'pl ) [ Fr. -L. *templum*, a temple -Gr. *temenos*, a piece of ground cut off.] *n.* देऊळ *n*, देवळ *n*, देवालय *n*, मंदिर *n*.

Temple ( tem'pl ) [ Fr. -L. *tempora*, the temples.] *n. one of the sides of the head above the cheek* कानशील *n*, आंख *m*, शंख *m*, शंखस्थान *n*, कानपट्टी *f*.

Temple of a loom मागाचा टंपल *m.* [ टंपल is a corruption of English Temple.] कपड्याला ताण देण्याकडे याचा उपयोग करतात.

Templet ( tem'-plet ) [ Fr. *templet*, stretcher -L. *templum*, small timber.] *n.* टंप्लेट ( a corruption of Templet ), बरोबर आकार आणण्यासाठीं तयार केलेलें गेज *n*, कांडें *n*.

Temporal ( tem'pōr-al ) *a.* ( as opposed to spiritual ) प्रापंचिक, ऐहिक, इहलौकिक, ह्या जन्माचा, संसाराविषयींचा, प्रपंचाविषयींचा; as, "T. concerns." २ *civil* or *political* ( oppos. to *spiritual* ) लौकिक; as, "Lords T."

Tem'poral *a.* कानशिलाचा, आंखाचा. [ T. BONE शंखास्थि *n*. T. MUSCLE ( आंखाच्या ठिकाणीं किंवा शंखाच्या ठिकाणीं असणारा ) शंखक (स्नायु) *m*.]

Temporal'ity *n.* ऐहिक हित *n*, ऐहिकहितसंबंध *m.* २ ( in *pl.* ) स्थावर उत्पन्न *n*.

Tem'porarily *adv.* तात्पुरता, दोन दिवस, आठपंधरा दिवस, हंगामी.

Tem'porariness *n.* तात्पुरतेपणा *m*, हंगामीपणा *m*, अनित्यता *f*, अशाश्वतत्व *n*, चंचलत्व *n*.

Temporary ( tem'pōr-ar i ) [ L. *tempus*, time.] *a.* तात्पुरता, हंगामी, टेंपरवारी ( corruption of Temporary ), दोनदिवसांचा, कच्चा, चारदिवसांचा, अचिर, अचिरस्थायी, अल्पकालिक, अशाश्वत, क्षणिक, क्षणभंगुर.

Temporisa'tion *n.* प्रसंग पाहून वागणें *n*, प्रसंगानुवर्तन *n*.

Temporise (tem'por-īz) *v. i. to comply with the time or occasion* काळ पाहून वागणें, वेळ पाहून चालणें, काळ *m*-रंग *m*-समय पाहून वागणें -चालणें, वारा वाहील तशी पाठ देणें, प्रसंग पाहून वागणें, प्रसंगानुवर्तन -समयानुवर्तन करणें, (काळवेळाप्रमाणें) आजउद्यां करणें.

Tem'poriser *n.* काळवेळ पाहून चालणारा *m*,काळाप्रमाणें वागणारा, प्रसंगानुवर्ती *m*, समयानुवर्ती, समयानुसारी.

Temporo-maxillary *a.* कानशिलाखालचा, दाभाडाचा.

Tempt ( tempt ) [ Fr. -L. *tendere*, to stretch.] ( Bible ) *to put to trial* परीक्षा *f.* पाहणें, सत्त्व *n*.

पाहणें, परीक्षा *f.* घेणें; as, "Ye shall not T. th Lord your God." Deut. VI. 16. २ *to try to persuade esp. to evil, to entice* मोह *m.* घालणें, मोहपाश *m* -मोहनी *f.* घालणें, भुलवणें, लोभविणें, भुरळ घालणें.

Tempta'tion *n.* ( Bible ) परीक्षा *f.* २ पारख *f,* परीक्षा पाहणें *n.* ३ मोह पाडणें, मोह *m,* मोहनी *f,* भुरळ *f,* भूल *f.*

Tempted *pa. p.* परीक्षा पाहिलेला, पारखलेला. २ मोह घातलेला, भुरळ घातलेला.

Tempt'er *n.* ( Bible ) परीक्षक *m,* परीक्षा पाहणारा *m.* [THE T. सैतान *m.*] २ मोह घालणारा *m,* लोभविणारा *m.*

Tempt'ing *a.* मोहक, मोह घालणारा, मोह पाडणारा, मोहणारा, भुरळ घालणारा, भुरळ पाडणारा.

Ten *a.* दहा, दश. T. *n.* दहाचा आंकडा, दहा ( संख्या ). [ AGGREGATE OF T. दशक *m,* दसक *m.* T. OF SUIT OF CARDS दहिल्या *m,* दसक्या *m,* दश्शा *m.*]

Tenable ( ten'a-bl ) [ L. *tenere,* to hold.] *a.* ( R. ) ( of a fortress) *capable of being held or defended* लढविण्याजोगा, संरक्षण करण्याजोगा, संरक्षणीय, राखण्याजोगा. २ *capable of being maintained* टिकाऊ, टिकण्यासारखा, चालायाजोगा, समर्थन करण्याजोगा, समर्थनीय, स्थापन करतां येण्याजोगा; as, "T. argument."

Tenacious ( tē-nā'shus ) [L. *tenex -tenere,* to hold.] *a.* (R.) *retaining or holding fast, sticky* चिकटणारा, चिकटून राहणारा, चिकट; as, "T. metal, T. clay." २ ( of memory ) धारणेचा, धारणाशक्तिविशिष्ट. [OF T. MEMORY आठवणीचा धड, स्मृतीचा -सारणाचा धड.] ३ *persistent in a course or purpose* चिकाटीचा, चिकट, चिवट, आग्रही, निश्चयाचा, कराराचा, करारी. Tena'-ciously *adv.* चिकाटीनें, निश्चयानें.

Tena'ciousness *n.* Same as Tenacity.

Tena'city *n.* चिकटपणा *m.* (b) चिवटपणा *m.* २ धारणा *f,* धारणाशक्ति *f.* ३ चिकाटी *f,* करारीपणा *m.*

Tenaculum ( tē-nak'ū-lum ) [ L. *tenere,* to hold.] *n.* (पकडण्याचा) आंकडा (शस्त्र), ओढून धरण्याचें शस्त्र *n.*

Tenancy ( ten'an-si ) [ Fr -L. *tenere,* to hold.] *n. a temporary holding of land or property* वहिवाट *f,* वहिवाटीचा हक्क *m.* [JOINT T. समाईक वहिवाट *f,* समाईक वहिवाटीचा हक्क *m.*]

Tenant ( ten'-ant ) [Fr. -L. *tenere,* to hold.] *n. one who holds land, paying rent to the land-lord* कूळ *n,* रयत *f.* २ *one who occupies a house for rent* भाडेकरी *m,* भाडोत्री *m.* ३ ( law ) मालक *m.* [T.s IN COMMON समविभागी मालक, अविभक्त मिळकतींत ज्यांचे हिस्से निश्चित आहेत असे मालक *m. pl.* JOINT T.s समाईक मालक, सहाधिकारी मालक, मिळकतींत आपला अमुक हिस्सा आहे असें ज्यांना निश्चयपूर्वक म्हणतां येत नाहीं असे समाईक मालक *m. pl.* A T. HAVING NO RIGHT OF OCCUPANACY उपरीकूळ *n.* ] [ भाड्यानें घेणें.

Ten'ant *v. t. to occupy as tenant* कूळ म्हणून करणें. २

Ten'antable *a. fit to be occupied by a tenant* कुळानें घेण्याजोगा. २ *in a state of good repair* दुरुस्त किंवा सुस्थितींत असलेला, राहण्यासारखा, राहण्यालायक.

Ten'antless *a.* कूळ नसलेला. २ भाडेकरी नसलेला.

Ten'antry *n. the tenants of one land-lord* (एका सावकाराचीं) कुळें *n. pl.*, रयतावा *m.*

Tend (tend) [Fr. -L. *tendere*, to stretch.] *v. i. to be moving or directed* कलणें, झुकणें, लवणें, वळणें, तोलणें, झोक *m* -कल *m.* असणें, लक्ष्य *n* -धोरण *n.* असणें; as, "This *tends* to the same conclusion."

Tend (tend) [Shortened from Attend.] *v. t. to take care of, to look after* राखणें, पाळणें, निगा *f* -बरदास्त करणें -राखणें *g. of o.*, खबर *f* -समाचार *m.* घेणें, जोपासना *f.* करणें.

Ten'dency *n. inclination or leaning* (*toward, to*) प्रवृत्ति *f*, कल *m*, झुकाव *m*, झोक *m*, ओढ *f*, ओढा *m*, वळण *n*, कटाक्ष *m*, रोंख *m.*

Tender (ten'-der) [From the root of Attend.] *n. a small vessel attending on a larger one* पुरवठ्याचें जहाज *n*, पुरवणीजहाज *n.* २ (इंजिनाच्या पाठीमागचा) कोळशाचा व पाण्याचा डबा *m.*

Tender (ten'-der) [L. *tendere*, to stretch.] *n. an offer* देणें *n*, पुढें करणें *n.* २ टेंडर *n*, (कंत्राटाकरितां) मागणीचा अर्ज *m.* [देणें, पुढें करणें.

Tend'er *v. t. to offer* (*for purchase or acceptance*)

Tender (ten'-der) [Fr. *tendre* -L. *tener*, tender.] *a. soft, not hard or tough* मऊ, नरस, मृदु, कोंवळा, कोमल, नाजूक, हिरवा, हळवट, कच्चा. २ *easily touched or wounded* नाजूक, स्पर्शासह, थोडें दाबलें असतां दुखणारा, दुखरा, लवकर दुखण्याजोगा. ३ *susceptible to pain or grief* कोवळा, हळवा, नरम, कोमल. ४ *loving or affectionate* कोमळ, मायाळू, दयाळू, आर्द्र, कोमलहृदय, कृपावान्, कृपावंत. ५ *requiring careful handling* नाजूक; as, "A T. subject." ६ *pathetic* मनोवेधक, द्रव आणणारा; as, "T. expression."

Tender-hearted *a.* मनाचा कोंवळा, कोमल अंतःकरणाचा. Tender-heartedly *adv.* कोमल अंतःकरणानें, कळवळ्यानें. Tender-heartedness *n.* मनाचा कोंवळेपणा *m.*

Ten'derly *adv.* नाजूकपणानें. २ दयाळूपणानें.

Ten'derness *n.* नाजूकपणा *m*, मऊपणा *m*, नरमपणा *m.* २ नाजूकपणा *m*, स्पर्शासहत्व *n.* ३ कोंवळेपणा *m*, हळवेपणा *m.* ४ चित्ताची कोमलता *f* -आर्द्रता *f*, कोमलांतःकरण *n*, मायाळूपणा *m*, दयाळूपणा *m.* ५ मनोवेधकपणा *m.* [कंडरासदृश.

Ten'dinous *a.* कंडरामय, कंडरांचा, कंडरेसारखा,

Tendon (ten'-don) [Fr. -L. *tendere*, to stretch.] *n. a cord of fibrous tissue joining a muscle to a bone* कंडरा *f*, स्नायुपुच्छ *n*, स्नायवग्र *n*; या कंडरेच्या योगानें स्नायु हाडाशीं बद्ध होतो. [ACHILLES T. घोडशीर *f*, वीणशीर *f*, धोंडशीर *f*.]

Tendril ( ten'-dril ) [Fr. -L. *tener*, tender.] *n.* ताणा *m*, तंतु *m*, लताकर *m*, प्रतान *n*. २ ( *bot.*) सूत्रकोष्ठ *n*, हा एक खोडाचा प्रकार आहे. (b) सूत्रपर्ण *n*. सुतासारखें पान *n*.

Tenement ( ten'-ē-ment ) [Fr. -L. *tenere*, to hold.] *n. a holding, esp. a house* (कोणाहि इसमाचे ताब्यांतील) स्थावर मिळकत *f*. (b) घर *n*, मकाण *n*. २ (law) *any kind of permanent property, lands, etc., held of a superior* खंडानें केलेली वतनवाडी *f*, खंडानें केलेला जमीनजुमला *m*. [PATRIMONIAL LANDS AND TENEMENTS वडिलार्जित वतनवाडी *f*- जमीनजुमला *m*. SERVIENT T. दुसऱ्याने हकाचा बोजा असलेली इस्टेट *f*.] ३ *set of apartments used by one family* एकाच घरांतील एका कुटुंबाच्या वापराकडे असलेल्या खोल्या *f*, गाळा *m*. ४ ताबा *m*.

Tenesmus ( tē-nes'mus ) [Gr. *teinein*, to stretch.] *n.* ( *med.*) शौचाचे वेळीं गुदद्वारांत कळ येणें, मुरडा होणें, शौचाला पुरें झालें नाहीं असें वाटणें, कुंथण्यानें उपशमन पावणारी गुदस्थानाच्या वरच्या भागीं होणारी वेदना, प्रवहण *n*.

Tenet ( ten'-et ) [L. *teneo*, I hold.] *n. a principle, dogma, or doctrine of a person or school* मत *n*, तत्त्व *n*, सिद्धान्त *m*.

Ten'fold *a.* दसपट, दशगुणित.

Tennis ( ten'-is ) [Fr. -L. *teneo*, I hold.] *n. a game with balls and rackets* टेनिस खेळ *m*. T.-ball *n*. टेनिस खेळण्याचा चेंडू *m*. T.-court *n*. टेनिस खेळण्याचें आंगण *n*.

Tenon ( ten'-un ) [Fr. -L. *tenere*, to hold.] *n.* ( *carpentry* ) कुसूं *n*, कूंस *n*. २ ( of a door, window-shutter, &c. ) वात्या *m*, वाता *m*, वाथा *m*. [SLIP OF WOOD TO RECEIVE A T. वातेरपट्टी *f*, वातेरफळी *f*, वातेर *n*, वातेरें *n*.]

Tenon ( capsule of ) *n*. बुबुळाचें बाह्यवेष्टण *n*.

Tenor ( ten'-or ) [L. *tenere*, to hold.] *n. settled or prevailing course or direction* ओघ *m*, वळण *n*, धारा *m*, तंत्र *n*. २ *general purport, drift (of speech, writing* ) रोंख *m*, धोरण *n*, झोंक *m*, भाव *m*, अभिप्राय *m*. ३ ( *law* ) *true intent* रोंख *m*, भावार्थ *m*. ४ ( *music* ) मध्यसवन *n*, द्वितीयसवन *n*, मध्य *m*, मध्यस्थानांतील स्वर *m*, मध्यस्वन *m*.

Tenotomy ( teno-to'mi ) [Gr. *tenon*, a tendon, and *tomme*, a cutting.] *n*. स्नायुपुच्छ कापणें *n*, कंडराच्छेदनक्रिया *f*.

Tense ( tens ) [L. *tempus*, time.] *n*. ( *gram.*) काळ *m*. [IMPERFECT T. अपूर्णकाळ *m*. FUTURE T. भविष्यकाळ *m*. PERFECT T. पूर्णकाळ *m*. PRESENT T. वर्तमानकाळ *m*.]

Tense ( tens ) [L. *tendere*, to stretch.] *a.* ( of cord, membrane, etc.) *stretched tightly* ताणलेला, ताठ,

T. *n.* *transgression of law or right* (कायद्याचें) उल्लंघन *n*, (हक्काचें) अतिक्रमण *n*, हुकूम तोडणें *n*, हुकमावांचून जाणें *n*, आज्ञोल्लंघन *n*, सीमोल्लंघन *n*, (बेकायदेशीर) सीमातिक्रम *m*, आगळीक *f*, अन्याय *m*, अपराध *m*. २ (law) अतिक्रमण *n*.

Tres'passer *n.* हुकमावांचून जाणारा *m*, हुकूम तोडणारा *m*, आगळीक करणारा *m*. २ अतिक्रमण करणारा *m*.

Tress (tres) [Fr. *tresse*, threefold -Gr. *treis*, three.] *n.* (विशेषतः लहान मुलीच्या किंवा स्त्रीच्या) केंसांचा झुबका *m*, केंसांची बट *f*, पेडू *f*. (b) झुलूप *n*. [DISHEVELLED OR LOOSE T. झिपरी *f*, झिपटी *f*, झिंगी *f*, झिंजी *f*, झिंजोटी *f*.] २ (*pl.*) (बायकांच्या डोक्यावरील) बटा *f. pl.* T. *v. t.* *to arrange* (hair) *in tresses* (chiefly in *pa. p.*) पेडू करणें, बटा करणें.

Tressed *a.* पेडू असलेला, बटा असलेला. २ पेडू केलेला.

Tret (tret) [Norm. Fr. *trelt*, deduction] *n.* *an allowance to purchasers of 4 lb. on every 104 lb. for waste* एकशेंचारावर चार अशी कसर *f* -कडता *m* -कांटा *m*.

Trevet, Same as Trivet which see.

Triad (trī'ad) [L. *trias*, *triadis* -Gr. *trias*, *triados* -*treis*, Sk. त्रि, three.] *n.* *the union of three* त्रिकूट *n*, त्रय *n*, त्रिक *n*. २ (*chem.*) त्रिमूल्य *n*. ३ (*mus.*) स्वरत्रयी *f*.

Triadelphous (trī-a-del'fus) [Gr. *tria*, Sk. त्रि, three; *adelphos*, a brother.] *a.* (*bot.*) पांचपांच तंतूंचा एक असे तीन गुच्छ झालेला (पुंकेसर), त्रिगुच्छी (पुंकेसर). उ. भोपळा, कांकडी.

Trial (trī'al) [See Try.] *n.* *process or mode of testing the qualities of a thing, experimental treatment* परीक्षा *f*, पारख *f*, कसोटी *f*, अजमाव *m*, परीक्षण *n*. [TO MAKE A T. OR TRIALS अजमावून पाहणें, कसोटीला लावणें. ON T. अजमावण्यावर, पसंतीवर; as, "Bicycle hired on T." TO GIVE ONE A T. परीक्षा घेणें, अनुभव पाहणें.] २ *hardship* दुःख *n*, संकट *n*, अडचण *f*; as, "Old age has many *trials*." ३ (law) चौकशी *f*. [TRIAL-ASCENTS (WITH AN AEROPLANE) अजमाइषी यानोड्डान. TRIAL-TRIP (जहाज कसें काय चालतें हें पाहण्याकरितां) अजमाइषी सफर *f*.] ४ अनुभव *m*, पसंती *f*, नमुना *m*; as, "T. order."

Triangle (trī'an-gl) [Fr. -L. *tres*, Sk. त्रि, three, and *angulus*, an angle.] (*math.*) त्रिकोण *m*, त्रिकोणाकृति *f*, त्रिभुज *m*. [ACUTE-ANGLED T. लघुकोनत्रिकोण *m*. EQUILATERAL T. समभुजत्रिकोण *m*. ISOSCELES T. समद्विभुजत्रिकोण *m*. RIGHT-ANGLED T. काटकोन त्रिकोण, समकोण त्रिकोण *m*. SCALENE T. विषमभुजत्रिकोण *m*. SOLID T. भरींव त्रिकोण, घनत्रिकोण. OBTUSE-ANGLED T. विशालकोन त्रिकोण. SEGMENT OF THE BASE OF A T. आबाधा *f*. VERTICAL ARM OF A T. कोटि *f*. T. OF FORCES प्रेरणात्रिकोण *m*.] २ त्रिकोणाकृति हत्यार *n*, त्रिकोण *m*. ३ (*naut.*) (ओझीं वर घेण्याकरितां) तिकडें *n*, कैंची

*f.* ४ (*mus.*) त्रिकोण ( वाद्य ) *m.* हें वाटोळया लोखंडी दांड्यानें वाजवितात. ५ ( *astron.* ) त्रिभुजाकार नक्षत्र-पुंज *m.* ६ त्रिकोणी क्षेत्र *n*, चिमटा *m*, कातर *f.*

Triangled *a.* तीन कोन असलेला तिकोनी.

Triang'ular *a.* तिकोनी, त्रिकोणाकृति, त्रिकोण. २ *three-concerned* तिहींचा संबंध असलेला, तिरंगी. [T. MATCH तिरंगी सामना. T. TREATY त्रिकुटाचा तह *m*, त्रिकूटसंधि.]

Triang'ulate *v.t. to divide* (area, &c.) *into triangles* त्रिकोण पाडणें, त्रिकोण करणें. २ *to determine* (height, distance, &c.) *thus* त्रिकोण पाडून (उंची, अंतर, वगैरे ) ठरविणें, त्रिकोणानें मोजणें.

Triangula'tion *n.* त्रिकोण पाडणें *n*, त्रिकोणीकरण *n.*

Triangulum Australis ( English name, the Southern Triangle ) *n.* दक्षिण त्रिकोण *f.* ही राशि दक्षिण गोलार्धांत मक्षिकेच्या उत्तरेस आहे.

Triangulum Borealis (English name, the Northern Triangle) *n.* उत्तरत्रिकोण *f.* ही राशि उत्तरगोलार्धांत मेषराशीच्या उत्तरेस आहे.

Triangulum Minor ( English name, the Little Triangle ) *n.* लघुत्रिकोण *f.* ही राशि उत्तरत्रिकोण राशीच्या दक्षिणेस आहे.

Trib'al *a.* जातीचा, वर्गाचा.

Tribe ( trīb ) [ L. *tribus*, orig. applied to one of the three divisions of the ancient Roman people -*tri*, *tres*, three.] *n.* ( रानटी लोकांची ) जात *f.* २ ( प्राचीन रोमन किंवा हिब्रु लोकांतील ) जाति *f*, वर्ग *m.* ३ कुल *n*, कुळ *n*; as, "The twelve *tribes* of the Israelites." ४ ( *biol.* ) कुल *n.* ५ ( *usu.* contempt. ) *a set of persons esp. of one profession* जात *f*, गण, वर्ग; as, "The whole T. of parasites."

Tribe *v. t.* (R.) जाती लावणें, वर्ग करणें, वर्ग लावणें.

Tribes'man *n.* रानटी जातीचा मनुष्य *m*, रानटी मनुष्य *m.* २ ( स्वतःच्या ) जातीचा मनुष्य *m.*

Tribulation ( trib-ū-lā'shun ) [L. *tribulare*, to afflict.] *n. severe suffering or trial* दुःख *n*, संकट *n*, आपत्ति *f*, विपत्ति *f.*

Tribunal (trī-bū'nal) [L.] *n. judgment seat* न्यायाधीशाची (बसण्याची) खुर्ची *f*, न्यायासन *n.* २ *court of justice* न्यायाचें कोर्ट *n*, न्यायसभा *f.*

Tribune (trib'-ūn) [L. *tribunus* -*tribus*, a tribe.] *n.* प्राचीन रोमन राज्यांतील प्लेबियन लोकांनीं सेनेट व कान्सल यांपासून आपल्या हक्कांचें व स्वातंत्र्याचें संरक्षण करण्याकरितां नेमून दिलेला अंमलदार *m*, ट्रिब्यून. २ ( *esp.* as title of newspaper ) *champion of the people* लोकांचा कैवारी *m.*

Trib'utary *a. paying tribute* खंडणी देणारा, खंडणी भरणारा, सामंत, मांडलिक. २ *contributory, auxiliary* पोषक, पूरक. ३ ( of river ) *serving to swell a large river* मोठ्या नदीला मिळणारी ( लहान नदी ). ४ *paid in tribute* खंडणीचा, कररूप. T. *n.* खंडणी

देणारा *m*, मांडलिक (राजा) *m*. २ खंडणी देणारें संस्थान *n*, मांडलिक संस्थान *n*. ३ मोठ्या नदीला मिळणारी लहान नदी *f*, उपनदी *f*.

Tribute (trib′-ūt) [L. *tributum-tribuere*, to assign -*tribus*, a tribe.] *n*. खंडणी *f*, कर *m*, करभार *m*. २ खंडणी देण्याची स्थिति *f*, मांडलिकपणा *m*; as, "Was laid under T." ३ (*fig.*) *contribution, esp. thing done, said, given, as mark of respect, &c.* खंडणी (*fig.*) *f*; as, "The T. of a tear." (b) प्रशंसा *f*, स्तुति *f*; as, "The *tributes* of her admirers".

Trice (trīs) [Ger. *trissen*, hauling rope.] *v. t.* (*naut.*) दोरखंडानें वर उचलणें -खेंचणें -घेणें.

Trice (trīs) [Probably from Sp. *tris*, clink of breaking glass.] *n. a very short time, an instant* पळ *n*, क्षण *m*, त्रुटि *f*. [IN A T. पळमात्रांत, क्षणार्धांत एका चुटकींत, हां हां म्हणतां, पापणीस पापणी लावी तों.]

Tricen′tenary *n*. तीनशें वर्षांचा काळ *m*. २ त्रिशतसांवत्सरिक उत्सव *m*. [त्रिशद्वार्षिक.

Tricen′nial *a*. तीस वर्षांचा, दर तीस वर्षांनीं होणारा,

Triceps (trī′seps) [L. *tres*, three, and *caput*, head.] *a*. (of muscle) *three-headed* त्रिशिरस्क. Triceps *n*. त्रिशिरस्क स्नायु *m*.

Trichiasis (trik′-ē-asis) [Gr. *thrix*, *trichos*, hair.] *n*. (*med.*) पापणीचे केंस आंतील बाजूस वळून ते बुबुळास खुपणें, पक्ष्मोपरोध *m*. २ लघ्वींत केंस उत्पन्न होण्याचा रोग *m*. ३ प्रसवणाऱ्या स्त्रियांचे स्तनास होणारा विकार *m*. ४ केंसांची जटा होण्याचा रोग *m*, जटिलकेशरोग *m*.

Trichome (trī′kōm) [Gr. *trichos*, hair.] *n*. (*bot.*) बाह्यत्वचेंतून निघालेला केंस किंवा कोशेटा.

Trick (trik) [O. Fr. *tricher*, to beguile.] *n. an artifice or stratagem* (usually with a dishonest intent) युक्ति *f*, लुच्चेगिरी *f*, हिकमत *f*, कुलंगडें *n*, छक्केपंजे *m. pl.*; as, "A T. in trade." २ *a sly, dexterous or ingenious procedure fitted to puzzle or amuse* खेळ *m*, हातचलाखी *f*; as, "A bear's tricks, A juggler's *tricks*." ३ *mischievous or annoying behaviour* चेष्टा *f. pl.*, पोरचेष्टा *f. pl.*, पोरचाळे *f. pl.*, माकडचेष्टा *f*, माकडचाळे *m. pl.*; as, "The *tricks* of boys." ४ *a particular habit or manner* खोड *f*, लकब *f*, टेव *f*; as, "A T. of drumming with the fingers." ५ (*naut.*) (सुकाणूंवरची दोन तास कामाची) पाळी *f*, फेरी *f*. ६ *artifice* कळ *f*, युगूत *f*, किल्ली *f*.

Trick *v. t. to deceive by a trick* (person, often *out of* a thing, *into* doing) फसवणें, हुलकावणें, गोता देणें, गोत्यांत घालणें. २ (*usu.* with *out* or *up*) *to dress, to decorate* सजवणें, नटवणें, शृंगारणें, चट्टीपट्टी *f* -शानशोकी *f*. करणें. as, "People lavish it profusely in *tricking up* their children in fine clothes, and yet starve their minds." [To BE TRICKED OUT *or* UP नटणें, सजणें.]

Trick′er *n*. फसविणारा *m*, लुच्चा *m*.

Trick'ery *n.* फसवेगिरी *f*, लुच्चेगिरी *f*. २ नटवेपणा *m*.
Trick'iness *n.* लुच्चेपणा *m*, लुच्चा स्वभाव *m*.
Trick'ish *a.* लुच्चा, लबाड, युक्तिबाज.
Trick'ishly *adv.* लबाडीनें, फसवेगिरीनें.
Trick'ishness *n.* लबाडी *f*, फसवेगिरी *f*.
Trickle ( trik'l ) [M. E. *triklen*, probably for *strik-len*, freq. of *striken*, to go.] *v. i.* (with *down*, *off*, *along* ) *to flow in a small gentle stream* थेंब थेंब गळणें, पाझरणें, ओझरणें, ओघळणें, ओहळणें, बारीक धारेनें वाहणें, ओघळ -ओहळ -गळती लागणें -चालणें *g. of s.*, गळती धरणें, झरणें, टिपकणें, झिरपणें. T. *v. t.* पाझरवणें, ओघळ लावणें, थेंबथेंब ओतणें.
Trick'ling *pr. p.* पाझरणारा, ओझरणारा, झरणारा, टिपकणारा, झिरपणारा. T. *n.* पाझर *m*, ओझर *m*, गळती *f*, ओघळ *m*, ओहळ *m*, बारीक धार *f*.
Trick'ster *n.* लबाड *m*, लुच्चा *m*, फसव्या *m*.
Tric'ky *a.* हिकमती, लुच्चा, छक्केपंजे लावणारा.
Tricolour, Tricolor (trī'kul-or)[L. *treo*, Sk. त्रि. three, and *color*, colour. ] *n.* फ्रान्सचें ( तिरंगी ) निशाण *n*.
Tricycle (trī'si-kl) [Gr. *tri*, Sk. त्रि, three, and *kyklos*, circle, wheel.] *n.* तिचाकी ( बसण्याची गाडी *f* ), ट्रायसिकल. T. *v. i.* ट्रायसिकलवर बसून जाणें.
Tri'cyclist *n.* ट्रायसिकलवर बसणारा *m*.
Trident ( trī-'dent ) [Fr. -L. *tres*. Sk. त्रि, three, and *dens*, *dentis*, Sk. दंत, tooth.] *n.* त्रिशूल *m*, त्रिशूळ *m*, पिनाक *m*. २ *the sceptre of Neptune, as God of the sea* वरुणास्त्र *n*. Tri'dent, Tri'dented *a.* तीन दांते असलेला, तिदांती. २ तीन सुळे पुढें आलेला, त्रिदंती.
Tridimen'sional *a.* तीन परिमाणांचा, परिमाणत्रयात्मक लांबी, रुंदी व उंची असलेला.
Trid'uan *a.* तीन दिवस टिकणारा -चालणारा, तीन दिवसांचा, तीनदिवशी, त्रिदिनात्मक, त्र्यैहिक. २ *happening every third day* दर तीन दिवशीं होणारा.
Tried *pa. p. a. proved, tested* कसाला लावलेला, कसोटी लावलेला, कसोटीस उतरलेला, परीक्षा पाहिलेला, खात्रीचा; as, "A T. friend."
Triennial ( trī-en'yal ) [L. *tres*, Sk. त्रि, three, and *annus*, a year.] *a. lasting three years* तीन वर्षांचा, तिसाली, तिवर्षी; as, "T. plants, &c." २ *happening every three years* तीन तीन वर्षांनीं येणारा -होणारा, तिसाली, त्रैवार्षिक. Triennial *n.* त्रिवर्षायु वनस्पति *f*. २ मृताच्या आत्म्याच्या शांतीकरितां तीन वर्षेंपर्यंत प्रत्यहीं म्हणण्याचा मास *m*. ३ त्रैवार्षिक उत्सव *m*.
Trienn'ially *adv.* तीन तीन वर्षांनीं, तिसालां.
Tri'er *n.* प्रयत्न करणारा *m*. २ प्रयोग करणारा *m* ३ कसास लावणारा *m*, परीक्षा करणारा *m*.
Trifid ( trī'fid ) *a.* ( *bot.* ) त्रिधाच्छिन्न; as, "T. leaves."
Trifle ( trī'fl ) [ O. Fr. *trufle*, mockery.] *n. thing, fact, or circumstance of slight value or importance* क्षुल्लक गोष्ट *f*, क्षुल्लक बाब *f*, यःकश्चित् गोष्ट *f*.(b) तणसरी *f*, सुताचा तोडा *m*. (c) पै, पैपैसा; as, "Spare

a T. for the porter." [A T. (*adv.*) अमळ, कांहींसा, थोडासा; as, "Seems a T. angry."] २ बदाम, पिस्ते, मिठाई वगैरे घालून केलेलें पक्वान्न *n.*

Trifle *v. i. to act or talk with levity* पचकलपणानें बोलणें. (b) पचकलपणा करणें, छचोरपणा करणें. २ *to indulge in light or trivial amusements* क्षुल्लक गोष्टींत वेळ गमावणें, खेळणें, खेळ करणें, गमणें, रिकामा कारभार *m.* करणें, खेळत बसणें, माशा *f. pl.* मारणें -मारीत बसणें. [To T. WITH (-ची) थट्टा *f* -खेळ करणें, थट्टेवारी नेणें.] T. *v. t.* उधळणें, उधळपट्टी करणें; as, "To T. time, To T. away money."

Tri'fler *n.* (वेळ) गमावणारा *m*, &c. २ पचकल *m*, छचोर [*m.*

Tri'fling *pr. p.* खेळणारा, गमणारा, रिकामटवळा. २ छचोर. T. *a. trivial* क्षुल्लक, क्षुद्र, किरकोळ, हलका, लहान, तुच्छ, जमेंतला न खर्चांतला, एरझेर, कवडीकिंमतीचा. T. *n.* खेळणें *n*, गमणें *n*, रिकामटवळेपणा *m.* २ छचोरपणा *m*, पचकलपणा *m.*

Trifoliate (trī-fō'li-āt) [L. *tres*, Sk. त्रि, three, and *folium*, a leaf.] *a.* त्रिदली, तीन दलें असलेला.

Triform (trī'-form) *a. having a triple form* तीन स्वरूपांचा, त्रिविध; as, "T. antagonism."

Trifurcate (trī-fur'kāt) [L. *tri*, *tris*, Sk. त्रिः, thrice, and *furca*, a fork.] *v. i. to divide into three parts* तीन विभाग होणें -पडणें. (b) तीन फांटे फुटणें.

Trifurc'ate,-d *a.* तीन फांद्यांचा, तिफांदी, तीन फांट्यांचा, तिफांटी. २ तीन बेचक्यांचा.

Trifurc'ation *n.* तीन विभाग होणें *n*, तीन विभाग पडणें *n.* २ तीन फांटे फुटणें *n.*

Tri'gamist *n.* तीन वेळ लग्न झालेला *m*, तिजवर *n.* (b) तीन वेळ लग्न लागलेली स्त्री *f.* २ (एकाच वेळीं) तीन बायका असणारा (पुरुष) *m.* (b) (एकाच वेळीं) तीन नवरे असणारी (स्त्री) *f.*

Trigamous (trig'am-us) [Gr. *tri*, Sk. त्रि, three, and *gamos*, marriage.] *a.* तीनदां लग्न झालेला -केलेला. २ (एकाच वेळीं) तीन नवरे असणारी (स्त्री). (b) (एकाच वेळीं) तीन बायका असणारा (पुरुष).

Trig'amy *n.* तीन वेळ लग्न करणें *n.* (b) तीन वेळ लग्न झाल्याची स्थिति *f.* २ (a) (एकाच वेळीं) तीन बायका करणें *n.* (b) (एकाच वेळीं) तीन नवरे करणें *n.*

Trigger (trig'-ėr) [Dut. *trekker* -*trekken*, to pull.] *n.* (of a gun) घोडा *m*, कळ *f*, सरिफी *f*, लबलबी *f.*

Trigger-guard *n.* पालखी *f.*

Trigon of the bladder *n. triangle of the bladder* मूत्राशयाच्या बाजूस असणारा एक त्रिकोणाकार भाग *m.*

Trigonomet'rical *a.* त्रिकोणमितीचा, त्रिकोणमितिविषयक. २ त्रिकोणमितीच्या नियमांनीं केलेला. [T. SURVEY त्रिकोणमित भूमापन *n.*]

Trigonomet'rically *adv.* त्रिकोणमितीनें, त्रिकोणमितीच्या नियमांनीं.

Trigonometry (trig-ō-nom'e-tri) [Gr. *trigonon*, a triangle, and *metron*, a measure.] *n.* त्रिकोणमिति

*f.* [PLANE T. सरल त्रिकोणमिति *f.* ALGEBRAICAL T. बैजत्रि०.]

Trihe'dron *n.* (*math.*) त्रिफलक *m.* [फलक=SIDE OR FACE.]

Tri-lateral (trī-lat'ėr-al) [L. *tres*, Sk. त्रि, three, and *latus*, side.] *a.* तीन बाजू असलेला, तीन बाजूंचा, त्रिभुज, त्रिभुजात्मक, त्रिपार्श्व.

Trilingual (trī-ling'wal) [L. *tres*, Sk. त्रि, three, and *lingua*, tongue.] *a.* तीन भाषांचा, त्रिभाषिक.

Triliteral (trī-lit'ėr-al) [L. *tres*, Sk. त्रि, three, and *litera*, a letter.] *a.* तीन अक्षरांचा, त्र्यक्षर.

Trill (tril) [It. *trillare*, to shake.] *n.* सरांटा *m* (with the verb घेणें or वाजवणें), रेफाराचा सकंप उच्चार *m*, कंप घेणें *n*.

Trill *v. t.* सरांटे घेणें, सरांटे घेऊन गाणें -म्हणणें -वाजवणें -आळवणें, कंप घेणें, कंप घेऊन गाणें, रेफाराचा सकंप उच्चार करणें. T. *v. i.* सरांटे घेऊन म्हणणें, सरांटे निघणें, कंप येणें. Trilled *pa. t.* and *pa. p.* Trill'ing *pr. p.*

Trillion (tril'yun) [Fr. -L. *tres*, Sk. त्रि, three, and Low L. *millio*, a million.] *n.* प्रयुत घन *m*, एकावर अठरा शून्यें देऊन झालेला आंकडा *m*.

Trilobate *a.* तिपाळी, त्रिपालिक. (पालि=Lobe.)

Trilobite (trī'lō-bīt) *n.* (*geol.*) Trilobitia वर्गांतील अश्मीभूत संधियुक्त प्राण्यांची पोटजात *f*, त्रिपालिका जाति *f*.

Trim (trim) [A. S. *trymian*, to strengthen, to set in order, *-trum*, firm.] *a.* *in good order, well arranged, neat* ठीक, ठाकठीक, ठीकठाक, ठिकस-ठाकस, ठाकसठिकस, चाकचोप, निटस, नेटका, सुरेख, व्यवस्थित केलेला, व्यवस्थित लावलेला, बेतसूद.

Trim *v. t.* *to make trim, to adjust* सारखा करणें, नीट -नीटनेटका -ठीक -व्यवस्थित करणें. २ निटावणें, सुधारणें, ओजवणें, दुरुस्त -सुरेख -चाकचोप -चकपक करणें. ३ *to dress, to decorate* सजवणें, शोभिवंत -शोभेसा करणें, सुशोभित करण. ४ *to clip, to curtail, to lop* कातरणें, कापणें, कातरून -कापून सारखा नीटनेटका -शोभिवंत करणें. (b) छाटणें, छाटून सारखा करणें; as, "To T. a tree." (c) (a lamp) (कातरून) मोठा ठळक करणें. ५ (carpentry) तासून सारखा -तुळतुळीत -बेताचा करणें, सालणें, छाटणें. ६ (*naut.*) (सामानसुमान व उतारू लावून दोन्हींकडे) सारखा कलता करणें, समभार -समतोल करणें.

Trim *v. i.* (दोन्ही बाजूंकडे) सारखा राखणें. २ काळ पाहून चालणें. ३ (राजकीय बाबतींत) मधला मार्ग स्वीकारणें. Trim'med *pa. t.* and *pa. p.*

Trim'ly *adv.* चापूनचोपून, नीटनेटकेपणानें, बेतसूदपणानें.

Trim'mer *n.* (कपडे कापून) नीटनेटके करणारा *m*. २ काळ पाहून वागणारा *m*, रंग पाहून वागणारा *m*. ३ कापण्याचें हत्यार *n*. (b) कातरण्याचें हत्यार *n*.

Trim'ming *n.* (*usu.* in *pl.*) *ornamental parts esp. of a garment* (कपड्याची) दाल *f*, फीत *f*, तुई *f*. २ बशांचे वगैरे नकशीदार कांठ *m. pl.* ३ बेतसूद किंवा नमुनेवजा कापणें *n*. ४ (*photo.*) कर्तन *n*, प्रान्तकर्तन *n*.

Trim'ness *n.* ठाकठीकपणा *m*, चकपकपणा *m*, चाकचोपी *f.* २ खुबी *f*, खुमास *f*, कतरबेत *m.*

Tri'-monthly *a.* तिमाही, प्रत्येक तीन महिन्यांनीं (प्रसिद्ध) होणारा, त्रैमासिक. [unity."

Trinal ( trī'nal ) [From Trine.] *a.* त्रयात्मक; as, "T.

Trine ( trīn ) [ L. *tres*, Sk. त्रि, *trinus*, three. ] *a.* त्रयात्मक, तीन भागांचा (केलेला), तिहेरी; as, "T. dimensions; T. aspersion." Trine *n.* (*astron.*) *the aspect of planets distant from each other 120° or one-third of the zodiac* १२० अंशांची दृष्टि *f.*

Tringle ( tring'l ) [Of French origin. ] *n.* पडद्याची शीग *f.* २ छप्परपलंगाची दांडी *f.* ३ (*gunn.*) उटी *f.*

Trinita'rian *n.* व्यक्तित्रयात्मक देवमताचा अनुयायी *m*, व्यक्तित्रयात्मकदेववादी *m.* T. *a.* व्यक्तित्रयात्मक देवमताचा.

Trinity ( trin'i-ti ) [L. *trinitas*, *tres*, Sk. त्रि, three.] *n.* ( amongst the Hindus ) त्रिमूर्ति; as, ब्रह्मा, विष्णु, and महेश. २ (amongst the Christians) (with *the*) व्यक्तित्रयात्मक देव *m*; as, "God the Father, God the Son, and God the Holy Spirit." ३ व्यक्तित्रयात्मक देवमत *n.* ४ तिहींचा समुच्चय *m.* (b) तीन असणें *n.*

Trinket ( trink'et ) [Of M. E. origin.] *n. trifling ornament, jewel, &c., worn on the body* किडूकमिडूक *n.* (b) (*pl.*) किरकोळ दागदागिने *m. pl.*

Trinoculous ( trī-no'-kū-lus ) [L. *tri*, Sk. त्रि, three, and *oculus*, an eye. ] *a.* त्रिनयन, त्रिलोचन, तीन डोळ्यांचा.

Trino'mial *a.* ( *math.* ) त्रिपद, तीन पदें असलेला.

Trio ( trē'ō ) [L. *tres*, Sk. त्रि, three.] *n.* त्रिकूट *n*, त्रिक *n*, त्रितय *n.*

Trip (trip) [ Of Low German origin.] *v. i. to move with short, light steps* ठमकणें, ठमकत चालणें. २ चैनीचा प्रवास करणें, फेरी करणें. येरझार-*f*: सफर करणें; as, "To T. to Europe." ३ *to slip, to fail* चुकणें, चूक करणें, घसरणें, चुकून पाऊल पडणें. ४ *to err in speech* अडखळणें, लागणें, स्खलन होणें *g. of s.* ५ *to stumble and fall* अडखळणें, ठेंचळणें, ठोकर *f.* खाणें or with *in. con.* लागणें, ठेंच लागणें.

Trip *v. t.* ( *usu.* with *up* ) *to cause to stumble by striking one's feet from under him* उलथून पाडणें, ठोकर मारून पाडणें, पाय सारून -पाय लोटून -पाय सरकवून पाडणें; as, "To T. up a man in wrestling." २ (R.) चुकींत धरणें, चुकींत पकडणें. Trip'ped *pa. t.* and *pa. p.* Trip'ping *pr. p.*

Trip *n. nimble step* ठमकत चालणें *n*, ठमकत चाल *f.* २ अडखळणें *n*, ठोकर *f*, ठेंच *f.* ३ चूक *f*, चुकी *f*, तफावत *f.* ४ *journey to and from* खेप *f*, फेरी *f*, फेरा *m*, येरझार *f*, जाये *f.* [BY THE T. फेरीवर, उक्ता. EMPTY T. हेलपटा *m*, धिरटी *f*, येजा *f*, जाये *f*, फेरा, फिरका, हिसका *m*, गोता *m*, खेटे *m. pl.*, झोंका *m*, यात्रा *f.* THAT MAKES FREQUENT TRIPS जाये करणारा, खेप्या, खेटेघाल्या. TO MAKE

EMPTY TRIP OR TRIPS खेटे घालणें.] (b) सफर; as, "Trips to the moon." ५ *a catch by which a wrestler supplants his antagonist* पकड *f*, पेंच *m*.

Tri'partite *a*. (*bot.*) तीनदां विभागलेलें, त्रिधाविभक्त. २ तीन भागांचा, त्रिखंड, त्रिभाग, त्र्यंगी. [T. TREATY त्र्यंगी करार *m*.]

Tripe (trīp) [Of doubtful origin.] *n*. रवंथ करणाऱ्या प्राण्यांचा मुख्य कोठा *m*.

Tripedal *a*. तीन पाय असलेला, त्रिपाद.

Tri'petalous *a*. तीन पाकळ्यांचें (फूल), त्रिपटल.

Triph'thong *n*. त्र्यक्षर *n*, तीन स्वरांचा संयुक्त स्वर *m*.

Tri'ple *a*. *threefold, treble* तिहेरी, तिहेरा, तिप्पट, त्रिगुण. [T. ALLIANCE त्रिकूटसंधी.] २ *of three strings* तिपदरी, तिपेडी, तिसुती. [TRIPLE STAR (*astron.*) त्रिगुणनक्षत्र.]

Tri'ple *v. t.* तिप्पट करणें, तिप्पट वाढवणें. T. *v. i.* तिप्पट वाढणें -होणें -असणें.

Trip'let *n*. तीन चरणांचा यमक असणारी कविता *f*.

Triplicate (tri-pli'kāt) [L. *triplicare*, to fold thrice.] *n*. तिसरी नकल *f*, तिसरी प्रत. T. *a*. तिहेरी, तिपदरी. २ तिप्पट. [T. RATIO (*math.*) घनात्मक प्रमाण.]

Tri'plicate *v. t.* (एका प्रतीवरून) तीन प्रती काढणें.

Tripod (trī'pod) [L. *tripus*, Sk. त्रि, three, *pous, podos*, Sk. पद, foot.] *n*. तिवई *f*, तिपाई *f*.

Tripos (trī'-pos) *n*. (Cambridge University) (*list of successful candidates in*) *honours examination* गौरवपरीक्षा *f*, सन्मानपरीक्षा *f*.

*N. B.*—Tripos हा शब्द Tripod म्हणजे तिवई या शब्दापासून निघालेला आहे. कारण पुष्कळ वर्षांपासून केंब्रिज युनिव्हर्सिटीमध्यें एम्. ए. पास झालेल्या विद्यार्थ्यानें तिपाईवर किंवा वाटोळ्या स्टुलावर बसून सुरवातीला कांहींतरी औपरोधिक भाषण करावें, अशी चाल होती. पुढें ही भाषण करण्याची चाल बंद पडली, व भाषणाच्या ऐवजीं या तीनपायी स्टुलावर एका बाजूला, विनोदात्मक ल्याटिन कविता लिहिण्याचा व दुसऱ्या बाजूला पास झालेल्या उमेदवारांचीं नांवें लिहिण्याचा प्रघात सुरू झाला. नंतर ट्रिपासवर लिहिलेल्या यादीवरून पास झालेल्या उमेदवारांची सन्मानाची किंवा गौरवाची परीक्षा असा सध्यांचा अर्थ निघाला.

Trip'per *n*. पेंच करून पाडणारा *m*. २ ठमकत चालणारा *m*. (*b*) नर्तक. ३ चैनीचा प्रवास करणारा *m*.

Trisect (trī-sekt') *v. t.* तीन सारखे भाग करणें.

Trisec'tion *n*. तीन सारखे भाग करणें *n*.

Trismus (tris'mus) [Gr. *trizein*, to gnash.] *n*. *lockjaw* दांतखिळी बसणें *n*, हनुग्रहवात *m*.

Trisylla'bic, Trisylla'bical *a*. तीन अवयवांचा, तीन अक्षरांचा, त्र्यक्षर, त्र्यक्षरी.

Trisy'llable *n*. तीन अवयवांचा शब्द *m*, त्र्यवयवी शब्द.

Trite (trīt) [L. *tritus*, rubbed.] *a*. उष्टा, जुना, उच्छिष्ट, लोकोच्छिष्ट, क्षुद्र, क्षुल्लक; as, "T. remark."

Trite'ness *n*. उष्टेपणा *m*, जुनेपणा *m*, उच्छिष्टत्व *n*.

Tritheism (trī'-thē-zm) [L. *tres*, Sk. त्रि, three, and *theos*, Sk. देव, God.] *n*. देवत्रयवाद *m*, पिता, पुत्र,

आणि पवित्र आत्मा या तीन निरनिराळ्या व्यक्ती आहेत, व एकांत तिन्ही नाहींत असा वाद *m.*

Tri'theist *n.* देवत्रयवादी *m.*

Trit'urable *a.* वाटण्याजोगा -सारखा. (b) उगाळण्याजोगा.

Triturate ( trit'ū-rat ) [ L. *triturare*, to rub.] *v. t. to grind to a fine powder* वाटणें. (b) उगाळणें. (c) बारीक कुटणें.

Tritura'tion *n.* वाटणें *n.* &c. (b) उगाळणी *f.* (c) कुट्टन बारीक चूर्ण करणें *n*, चूर्णीकरण *n.*

Triumph ( trī'umf ) [L. *triumphus*, a public rejoicing for a victory. ] *n. a solemn procession in honour of a victor* जयाची मिरवणूक *f.* २ *victory* जय *m*, विजय *m.* ३ *a joy for success* जयानन्द *m*, विजयानन्द, जयहर्ष *m.* T. *v. i. to celebrate a victory* जयोत्सव -जयसमारंभ करणें. २ *to obtain a victory* ( *over* ) जय मिळवणें, जय -विजय पावणें -मिळवणें, विजयी होणें, जय *m* -फत्ते *f.* होणें *g. of s.*, जयास -यशाकाभास जाणें -येणें. ३ *to exult over a success* जयजय -जयजयकार -जयानन्द करणें, नाचणें. ४ ( with *over* ) *to insult a person upon an advantage gained* (जयाचा) तोरा, मिरवणें, ऐट दाखविणें, ( दुसऱ्याचा ) तोरा *m* -नक्षा *m.* उतरणें.

Triu'mphal *a.* जयोत्सवाचा, जयसमारंभाचा, जयोत्सवविषयक, जयसूचक, जयासंबंधी, जयविषयक, जय and विजय ( used in *comp.*, as, जयस्तंभ ).

Triu'mphant *a.* जयसूचक, जयपर, जयाचा. २ विजयी, जय पावलेला, जय मिळालेला; as, "Athena, War's *triumphant* maid." [ CHURCH T., See under Church. ]

Triu'mphantly *adv.* जयोत्सवानें, जयाच्या थाटानें, जयोत्सव करीत, जयोत्सवपूर्वक, वाजत, वाजतगाजत, गाजावाजानें, मिरवत, डौलानें, मिरवणुकीनें. २ जय मिळवून, विजयी होऊन. ३ जयजय -जयजयकार करून.

Triu'mpher *n.* जय करणारा *m*, जयोत्सव करणारा *m.*

Trium'vir *n.* ट्रायमव्हिरेटपैकीं एक *m.* Triumviri, Triumvirs *n. pl.*

Triumvirate ( trī-um'-vir-āt) [L. *tres*, Sk. त्रि, three, and *vir*, a man.] *n.* ( प्राचीन रोमन लोकांतील राजकीय हेतूकरितां वरिष्ठ सत्ताधाऱ्यांचें ) त्रिकूट *n*, त्रय *n.*

Triune ( trī'ūn ) [ L. *tres*, Sk. त्रि, three, and *unus*, one.] *a. three in one* त्र्यात्मक एक; as, "T. Godhead."

Tri'-valence *n.* ( *chem.* ) त्रिमूल्यकत्व *n.*

Tri'-valent *a.* ( *chem.* ) त्रिमूल्यक.

Tri'vet *n.* तिवई *f.*

Trivial ( triv'i-al ) [ L. *trivialis*, at the cross roads -*tres*, -*trivium*, a place where three ways meet Sk. त्रि, three, and *via*, a way.] *a. of small value or importance* क्षुल्लक, क्षुद्र, हलका, जमेंत नसलेला, जमेस न धरण्याजोगा, जमेंतला न खर्चांतला, किरकोळ, बारीकसारीक; as, "T. matter; T. objections." २

( of person ) *shallow, lacking ability or mora quality* अवडंबरी, उथळ, खरी बुद्धिमत्ता नसलेला. ३ *commonplace, humdrum* तोचतोच, कंटाळवाणा, नेहमींचा; as, "The T. round of daily life." ४ (*bot.* and *zool.*) *popular, not scientific* प्रचारांतलें (नांव).

Trivial'ity *n.* क्षुल्लकपणा *m*, क्षुद्रपणा *m*, &c.

Tri'vialness *n.* क्षुल्लकपणा *m*, क्षुद्रपणा *m*, &c.

Trivium ( triv'-i-um ) [ L. *tres*, Sk. त्रि, three, and *via*, a way.] *n.* ( व्याकरण, भाषासौंदर्य आणि न्याय या तीन उदार कलांचें ) त्रितय *n.*

Tri'-weekly *a.* आठवड्यांतून तीनदां होणारा -निघणारा, त्रिसाप्ताहिक; as, "A T. newspaper." T. *n.* आठवड्यांतून तीनदां प्रसिद्ध होणारें वर्तमानपत्र *n*, त्रिसाप्ताहिक *n.*

Trocar ( trō'kar ) [ Fr. *trois*, three, *carre*, side.] *n.* जलोदर रोगांत पाणी काढण्याकरितां भोंक पाडण्याचें शस्त्र *n*, व्रीहिमुख यंत्र *n.*

Trochanter ( trō-kan'tėr ) [ Gr. *trechein*, to run.] *n.* ( *anat.* ) जंघास्थीच्या वरच्या टोंकांवर असणाऱ्या दोन टेंगळांपैकीं एक *n*, शिखरक *n.* [ T. MAJOR महा शिखरक *n.* T. MINOR लघुशिखरक *n.*]

Trochee ( trō'kē ) [Gr. *trochos*, a running.] *n.* (in verse ) स्वरित आणि अस्वरित या क्रमाच्या शब्दावयवांचा झालेला कवितेचा चरण.

Trochis'ens *n.* औषधी वडी *f*, औषधी गोळी *f*.

Trochlea ( trok'-lē-ah ) [ Gr. *troxos*, a wheel.] *n.* ( अस्थिकूर्चेतील ) गडगडी [ गडगडी = Pulley. ] *f*, वर्तुलक (कूर्चास्थि).

Trochoid (*math.*) त्रिच्छेद *m.*

Trod *pa. t.* Trodden *pa. p.* of Tread तुडवलेला, पायानें मळलेला, &c.

Troll ( trōl ) [Of O. Fr. origin.] *v. t. to move circularly* वाटोळें फिरविणें -वळविणें; as, "To dress and *troll* the tongue, and roll the eye." २ *to sing the parts of in succession, as of a catch or round* कडवीं अनुक्रमानें म्हणणें. (b) स्पष्ट व जोरानें म्हणणें -गाणें. ३ गळानें मासे धरणें. ४ *to circulate as a vessel in drinking* फिरविणें, भोंवतालें पाठविणें. ५ मोहविणें, भुलविणें. Trolled *pa. t.* and *pa. p.* Troll'ing *pr p.*

Troll *v. i. to roll* ( वाटोळें ) लोळणें. २ *to move about* फिरणें, जाणें; as, "To T. in a coach and six." ३ *to fish* गळानें मासे मारणें -धरणें. ४ मोठ्यानें गाणें -म्हणणें.

Troll *n.* वाटोळें फिरणें *n.* २ अनुक्रमानें म्हणण्याचें गीत *n.*

Trolley, Troll'y *n.* ट्राली *f*, लाडीस *n.*

Trollop ( trol'op ) [From *troll*, to run about.] *n. a slatternly woman* गबाळ बायको *f*, जोगस्मा *f*. २ *a prostitute* नगरभवानी *f*, गांवभवानी *f*.

Troop ( trōōp ) [Fr. *troupe*, troop.] *n. a collection, a multitude* मंडळी *f*, जमाव *m*, समुदाय *m*, झुंड *f*, तांडा *m*; as, "A T. of school-children, friends, &c." (b) ( of monkeys ) साईर *n.* २ ( *usu. pl.* ) *soldiers, an army* सैन्य *n*, सेना *f*, लष्कर *n.* ३ ( of

cavalry ) रिसाला *m*, पथक *n*. [साठ घोडेस्वार, दोन लेफ्टनंट व एक क्याप्टन मिळून एक रिसाला होतो.] [ COMMAND OF A T. रिसालदारी *f*. COMMANDER OF A T. रिसालदार *m*.] ४ डूमवर वाजविलेला क्विक्मार्च *m*. ५ *company of performers* सरकशीची मंडळी *f*, नाडे-भोरप्यांची मंडळी *f*.

Troop *v. i.* जमणें, गोळा होणें. २ *to march in company or haste* घाईघाईनें मार्च किंवा कूच करणें.

Troop *v. t.* रेजिमेंटच्या निरनिराळ्या ट्रुप्स करणें.

Trooped *pa. t.* and *pa. p.* of Troop.

Troop'er *n*. घोडेस्वार *m*, सवार *m*, स्वार *m*. २ खासगी घोडेस्वार *m*. ३ रिसाल्याचा घोडा *m*.

Troop'ing *v. i.* घाईघाईनें जाणारा. २ एकत्र होणारा -जमणारा. [ TROOPING SEASON ( लष्कराच्या ठिकठिकाणीं ) सैन्य जाण्यायेण्याचा हंगाम.]

Trope ( trōp ) [L. *tropus* -Gr. *trepein*, to turn.] *n*. ( *rhet.* ) रूपकालंकार *m*.

Trophic ( trof'ik ) [ Gr. *trophe*, food.] *a*. ( *med.*) पोषणनियामक, पोषणाध्यक्ष; as, "T. nerves."

Tro'phied *a*. *adorned with trophies* पुष्कळ जयचिन्हें असलेला, जयचिन्हांनीं शृंगारलेला; as, "T. arches."

Trophy ( trō'-fi ) [ Fr. *trophe* -L. *tropæum* -Gr. *trope*, a turning ; -Gr. *trepein*, to turn to flight. आपण जय मिळवून शत्रूला पळवून लावल्याची सूचक खूण असा Trophy याचा धात्वर्थ आहे.] *n*. जयाची निशाणी *f*, जयाची खूण *f*, जयचिन्ह *n*, जयस्मारक *n*. Trophies *pl*.

Tropic ( trop'ik ) [L. *tropicus* -Gr. *tropikos*, relating to a turning.] *n*. *one of the two circles limiting the apparent annual movement of the sun north and south of the equator* अयनसीमा *f*, अयनवृत्त *n*, अयनरेखा *f*, अयनान्त *m*, क्रान्तिसीमा *f*, दक्षिणोत्तरायणसीमा *f*. [ T. OF CANCER कर्कवृत्त *n*. T. OF CAPRICORN मकरवृत्त *n*.] २ ( *pl.*) उष्णकटिबंध *m*. *pl*.

Tropic *a*. उष्णकटिबंधाचा.

Trop'ical *a*. अयनवृत्ताचा, अयनवृत्तविशिष्ट, अयनवृत्तांमधला, अयनान्ताचा. [T. REVOLUTION अयनपरिक्रमण *n*. T. YEAR सायनवर्ष *n*, सांपातिक सौरवर्ष *n*.] २ उष्णप्रदेशांत होणारा; as, "A school of T. medicines."

Trop'ical ( from Trope ) *a*. रूपकाचा, आलंकारिक, लाक्षणिक.

Trot (trot) [Of French origin.] *v. i.* दुडक्या चालीनें चालणें, दुडकी चालणें, दुडदुड -दुड्डुदुड्डु -तुरतूर -तुरूतुरू चालणें. २ (*fig.* ) *to get away, to take oneself off* घोडा हांकणें. T. *v. t.* *to ride at a trot* घोडा दुडदुड चालवणें -हांकणें. Trott'ed *pa. p.* Trot'ting *pr. p.*

Trot *n*. दुडकी चाल *f*, दुडकी *f*.

Troth ( troth ) [ Of Anglo-Saxon origin.] *n*. खरें *n*, सत्य *n*, प्रामाणिकपणा *m*.

Trot'tingly *adv*. दुडुकदुडुक, दुड्डुदुड्डु, तुरूतुरू. २ ( of a horse ) तुर्की चालीनें.

न
]
A
.
-
y

ी

-
)

Troubadour ( trōō'ba-dōōr ) [Of French origin.] *n.* फ्रान्स देशांतील अकराव्यापासून तेराव्या शतकापर्यंत झालेल्या सामान्य कवींचा वर्ग *m.* हे कवी गांवोगांव फिरून नवीन कवनें रचून तीं सरदार व राजे यांना म्हणून दाखवीत. आपलेकडील कोंकीवाले वैरागी व हे Troubadour कवी यांत बरेंच साम्य आहे.

Trouble ( trub'l ) [ Fr. *troubler* -L. *turbare,* to disturb -L. *turba,* a disorderly group -*turba,* a disorder; cf. Sk. त्वर्, to hasten.] *v. t.* (a) *to disturb* अस्ताव्यस्त करणें, अव्यवस्थित करणें, दाणादाण *f.* करणें, हालवणें, चाळवणें. (b) *to agitate* क्षुब्ध करणें, प्रक्षुब्ध करणें, त्रासवणें, संतापवणें; as, "Dont let it T. you." [ To POUR OIL ON THE TROUBLED WATERS भांडण *n* -तंटा मिटवणें.] २ *to afflict* त्रास देणें, दुःख देणें, इजा *f.* करणें -देणें, पिडणें, ताप देणें, छळणें, गांजणें, भंडावणें, उपद्रव *m.* देणें -करणें, हैराण करणें, हाडांला खिळून असणें; as, "I am *troubled* with neuralgia; How long has it been *troubling* you?" ३ *to give occasion for labour to* ( used in polite phraseology ) तसदी *f.* देणें. (b) ( with one's self ) तसदी *f.* घेणें, श्रम *m. pl.* घेणें, त्रास *m.* करणें -घेणें, चिंता *f* -काळजी *f.* करणें -वाहणें; as, "Never T. yourself about those faults which age will cure."

Trouble *v. i. to be disturbed or worried* त्रासणें, त्रास *m.* करणें -घेणें, संतापणें, त्रास करून घेणें, संताप *m.* करून घेणें, काळजी *f.* करणें -वाटणें, व्यग्र होणें; as, "Do'nt you T. about it; *Troubled* countenance." २ *to be subjected to inconvenience or exertion* (chiefly in polite formulas) तसदी *f.* घेणें, त्रास *m.* करणें, श्रम करणें.

Trouble *n. vexation, affliction* त्रास *m*, कष्ट *m*, दुःख *n*, हाल *m*, पीडा *f*, क्लेश *m.* (b) संकट *n*, आपत्ति *f*, विपत्ति *f*, आपदा *f*, पेंच *m*, किचाट *n*, कचाट *n*, लचांड *n*, खेकटें *n*, झेंगट *n*, लफडा *m*, घोरपड *f*, गंडांतर *n*, संक्रांत *f*, लिगाड *n*; as, "Till this great *trouble* came upon them; Life is full of small *troubles.*" २ *disease* विकार *m*, पीडा *f*, हैराणी *f*; as, "Liver *troubles;* Digestive *troubles.*" ३ *annoyance, molestation* त्रास *m*, दुःख *n*, पीडा *f*, उपद्रव *m*, इजा *f*, तसदी *f*, नड *f*, छळ *m*, छळणूक *f*, गांजणूक *f*, जाचणूक *f.* ४ *inconvenience, unpleasant exertion* त्रास *m*, अडचण *f*, पेंच *m*, गैरसोय *f*, व्याप *m*, श्रम *m*, मेहनत *f*, खटपट *f*, कष्ट *m*, कटकट *f*, उपसर्ग *m*, उपद्याप *m*, पीडा *f*, दगदग *f*, यातायात *f*, अटापीट *f.* [No T. (as a polite formula) (कांहीं) त्रास नाहीं, अडचण नाहीं. To BE IN T. पेंचांत -अडचणींत असणें. To GET INTO T. पेंचांत येणें -सांपडणें. २ टीकेस किंवा शिक्षेस पात्र होणें. To TAKE THE T. तसदी *f.* घेणें.]

Troubled *pa. t.* T. *pa. p.* पिडलेला, त्रासलेला, दुःख दिलेला, दुःखी, दुःखित, कष्टी, संतापित, संतप्त, पीडित, आर्त (esp. in *comp.* as, क्षुधार्त, तृषार्त, &c.), तसदी

दिलेला -घेतलेला -पडलेला. २ क्षुब्ध, प्रक्षुब्ध, खवळलेला, उसळलेला (as, waters).

Troub'ler *n.* दुःख देणारा *m*, त्रास देणारा *m*, इजा करणारा *m*, पिडणारा *m*, &c.

Troub'lesome *a. vexatious, annoying* त्रासदायक, त्रास देणारा, दुःखदायक, दुःख देणारा, उपद्रव देणारा -करणारा, उपद्रवाचा, त्रासाचा, जाचाचा, जाचक, जाच करणारा, इजा देणारा, इजा करणारा, दुःखावह, कष्टावह, क्लेशावह, कष्टदायक. २ *wearisome, tedious* त्रासदायक, कंटाळा आणणारा, कंटाळवाणा, खचरट, किचकट, खिस्तीचा, जिकिरीचा, खष्ट, क्लिष्ट. ३ (of persons) *teasing* त्रासदायक, खणपटीस बसणारा, बोकांडीस बसणारा, खणपट्या, जीवखाऊ, जिकीर करणारा.

Troub'lous *a.* (*archaic*) *full of troubles, agitated, disturbed* दुःखाचा, संकटाचा. २ गडबडीचा, अस्वस्थतेचा, अशांततेचा, खडतर, नष्ट; as, "T. times."

Trough (trof) [Of A. S. origin.] *n.* दोण *f*, (गुरांकरितां) कोठिंबा *m*. (b) टांकी *f*, हौद *m*. २ *a long narrow channel* पाट *m*, पन्हळ *m*. ३ (of the sea) दोन लाटांमधील खोलगट जागा *f*, खोली *f*. ४ a *large tray* मोठें ताट *n*.

Trounce (trowns) [O. Fr. *tronconner*, to cut -*truncus*, maimed.] *v. t. to beat severely, to flog* (*lit* and *fig.*) चाबकानें झोडपणें, खरपूस मार देणें.

Trousers (trow'zėrz) [O. Fr. *trousses*, breeches worn by pages.] *n. pl.* विजार *f*, पायघोळ चोळणा *m*. (b) (in prison language) चड्डी *f*. [LARGE OR LOOSE T. तुमान *f*.]

Trousse (trōōs) [Fr.] *n.* शस्त्रवैद्याची शस्त्रांची केस *f*.

Trousseau (trōō-sō') [Fr.] *n.* (नवीन लग्न झालेल्या) वधूचे किरकोळ पोषाखाचे कपडे *m.pl.*, वधूचीं वस्त्रें *n. pl.*

Trout (trowt) [Of A. S. origin.] *n.* ट्राउट नांवाचा गोड्या पाण्यांतील मासा *m*.

Trowel (trow'el) [Fr. *truelle* -L. *trua*, a ladle.] *n.* (of masons) करणी *f*, कर्णी *f*, थापी *f*. २ (of gardeners) थापी *f*.

Trowsers, Same as Trousers.

Troy-weight (troi'-wāt) [From Troyes in France.] *n.* (सोनें, रुपें आणि जड जवाहीर मोजण्याचें) ट्राय वजन *n*. ट्राय वजनांत बारा औंसांचा एक पौंड धरतात.

Tru'ancy *n.* उनाडपणा *m*, हिंडगेपणा *m*.

Truant (trōō'-ant) [O. Fr. *truand*, a vagrant.] *n. a child who stays away from school without leave* उनाड मुलगा *m*, उनाड पोर *n*, (शाळेंत न जातां) उनाडकी करणारा *m*. २ *an idler* (generally) उनाड, भटक्या *m*. T. *a.* (of person, character) उनाड, हिंडगा, डंडगा. [To PLAY T. उनाडणें, उनाडकी करणें.]

Truant School *n.* उनाड पोरांकरितां शाळा (औद्योगिक).

Truce (trōōs) [From the root of True.] *n. temporary peace or cessation of hostilities* तात्पुरता तह *m*,

मुदतीचा तह *m.* [FLAG OF T. तहाचा बावटा *m.*] २ *intermission* विश्रांति *f,* विसांवा *m.* [T. OF GOD पवित्र दिवसांत खासगी भांडणें विसरून जाणें.]

Truck (truk) [Gr. *trochos*, a wheel.] *n.* गाडा *m.* २ (आगगाडीचा) उघडा डबा *m*, उघडी वाघीण *f.* ३ स्टेशनवरील हातगाडी *f*, लाडीस *n.* ४ बिनधावेचें चाक *n.* T. *v. t.* ट्रकमध्यें भरून नेणें, ट्रकांत घालून नेणें.

Truck (truk) [Fr. *troquer* -Sp. *trocar*, perh. a corr. of L. *trans*, across or over, and *vicis*, change.] *v. t. to barter, to trade* (मालाची) देघे करणें, सौदा *m* -व्यापार करणें. २ *to exchange* (as goods for goods) (मालाची) अदलाबदल *f.* करणें. T. *n. exchange, barter, traffic* अदलाबदल *f*, देघे *f*, सौदा *m*, व्यापार *m*, उलाढाल *f.* २ *small wares* चिल्हर माल *m*, किरकोळ माल *m*, किरकोळ जिन्नस *m*, किरकोळ जिन्नसपानस *m.* ३ (*colloq.*) *rubbish* गाळ *m*, घाण *f*, गाळसाळ *m*, कचराकुचरा *m.* ४ (*fig.*) *nonsense* भलतीच गोष्ट *f*, भलतेंच *n*; as, "Shall stand no T."

Truck'age *n.* (मालाची) अदलाबदल करण्याची पद्धत *f.*

Truck'age *n.* उघड्या वाघिणींतून नेणें *n.* (Waggon = वाघीण). २ उघड्या वाघिणीचें भाडें *n.*

Truckle (truk'l) [L. *trochus*, a wheel.] *n.* लहान चाक *n*, लाडिसाचें बिडाचें चाक *n.*

Truck'le *v. t. to move on rollers* चाकावर फिरविणें.

Truck'le *v. i. to submit obsequiously* हांजीहांजी करणें, (पुढें) नाक घांसणें, पदर पसरणें; as, "Religion itself is forced to T. to worldly policy."

Truckle-bed *n. a low bed on wheels that may be pushed under another* चाकांवरचा (लोटतां येणारा) बिछाना *m.*

Truck'ler *n.* हांजीहांजी करणारा *m.*

Truck-system *n.* मजुरीबद्दल (रोख पैसा न देता त्या किंमतीचा) माल देण्याची पद्धत *f.* २ मजुरांनीं ठरींव ठिकाणाहूनच माल घेण्याची पद्धत *f.*

Truc'ulence *n.* रानटीपणा *m*, क्रूरपणा *m.* २ घातुकपणा *m.*

Truculent (truk'ū-lent) [L. *truculentus* -*traix*, wild, fierce.] *a. very fierce, cruel* भयंकर, रानटी, क्रूर, दुष्ट; as, "The T. inhabitants of Scythia." २ *destructive* विनाशक, घातक; as, "T. plagues."

Trudge (truj) [Allied to Tread and Trot.] *v. i. to travel with labour and effort* पाय फांसटीत चालणें, पाय फांसटणें -झिजवणें, पायपिटी *f* -पायघांशी *f.* करणें, येजा *f* -जाये *f.* करणें, वणवण -वतावता फिरणें. [To T. BACKWARDS AND FORWARDS हेलपाटे खाणें-घेणें.]

Trudging *pr. p.* T. *v. n.* पाय फासटणें *n*, पायपिटी *f*, पायपीट *f*, पायघांशी *f*, येजा *f*, जाये *f.*

True (trōō) [A. S. *treowe*, true.] *a. real* खरा, सत्य, सच्चा, अस्सल, वास्तविक, वास्तव, यथातथ, यथार्थ; as, "A declaration is T. when it states the facts." [T. AND FALSE सदसत्.] २ *agreeable with*

*nature or fact* खरा, सत्य, सच्चा, रास्त, यथातथ, यथार्थ, ऋत. [ To TURN OUT T. खरें ठरणें.] ३ *true-speaking* खरा, खरें बोलणारा, सत्यवक्ता, सत्यवादी. ४ *observant of truth, honest* (ढोंगी नव्हे) खरा, सच्चा, सत्य, प्रामाणिक. (b) बरोबर, इमानी, इमानाचा. ५ *conformable to a rule or pattern* अस्सलबरहुकूम काढलेला, खरा, यथामूल; as, "T. copy; A T. likeness of the original." ६ ( weight or measure ) खरा, रास्त, नक्की. ७ (a woman) इमानी, सद्गुणी.

**True** *v. t.* (हत्यार, चाक, चौकट) हवेंतसें बसविणें, हव्या त्या आकाराचें करून घेणें. [ इमानी मनुष्य.

**True-blue** *a.* पूर्ण खरा, पूर्ण प्रामाणिक. T. *n.* पूर्ण

**True-born** *a.* अस्सल, शुद्ध रक्ताचा, शुद्ध.

**True-bred** *a.* चांगल्या रीतिभातींचा, सुविनीत, खानदानींत वाढलेला, उत्तम वळण लावलेला.

**True-hearted** *a.* शुद्ध अंत:करणाचा.

**True-horizon** *n.* गर्भक्षितिज *n.*

**True love** *n.* प्रेमाचें मनुष्य *n*, प्रेमपात्र *n*, प्रिया *f.* २ प्रेम करणारा *m*, प्रेमी *m*, प्रिय *m*.

**True-motion** *n.* वास्तविक गति *f.*

**True'ness** *n.* खरेपणा *m*, सच्चेपणा *m*, सत्यता *f.*

**True-time** *n.* गर्भकाल *m.*

**Truism** ( trū'-i-zm ) [From true.] *n. a self-evident truth* स्वत:सिद्ध गोष्ट *f.* २ *a hackneyed truth* शिळा सिद्धांत *m*, उष्टा सिद्धांत *m*.

**Tru'ly** *adv.* खरोखर, खराच, वास्तविक, वास्तविकपणानें, यथार्थदृष्ट्या. २ रास्तपणानें, बरोबर. ३ मनापासून, खराच ( as, in the phrase I am, yours truly ). ४ मुळाप्रमाणें, तंतोतंत, अस्सलबरहुकूम.

**Trump** ( trump ) [Of doubtful origin.] *n. a trumpet* तुतारी *f*, कर्णा *m*. T. *v. t.* कर्णा वाजविणें, कर्णा फुंकणें.

**Trump** ( trump ) [ From Triumph. ] *n.* हुकूम *m*, हुकुमाचें पान *n*. [ T. CARD हुकमाचें पान *n*, हुकुम *m*. २ (*fig.*) *valuable resource* महत्वाचें साधन, महत्वाचा इलाज *m*.] २ ( *colloq.* ) *a person of admirable courage, resource, &c.* हिय्याचा मनुष्य *m*, अरंवशाचा मनुष्य *m*, कर्तबगारीचा मनुष्य *m*. [ To PUT A PERSON TO HIS TRUMPS ( *fig.* ) *to reduce him to his last resources* निर्वाणीवर आणणें -बितवणें.] T. *v. t. to defeat* (*card*) *with a trump* हुकमानें घेणें -मारणें. Trumped *pa. t.* and *pa. p.* Trumping *pr. p.*

**Trump** ( trump ) [ Fr. *tromper*, to deceive. ] *v. t. to deceive or impose upon* फसविणें, ठकविणें. २ *to concoct* बनावट ( तोहमत ) करणें, खोटा आरोप आणणें. [ To T. UP A CHARGE खोटी -बनावट फिर्याद करणें, बनावट आरोप करणें.] Trumped *pa. t.* and *pa. p.*

**Trumpery** ( trump'ėr-i ) [ Fr. *tromper*, to deceive, *lit.* 'to blow a trumpet ( in order to attract the public ).'] *n. something showy but worthless* दिखाऊ पण टाकाऊ वस्तु *f*, भपकेदार चीज *f*, कवडीकिंमतीची वस्तु -माल *m*. २ *idle talk* हवें तें बोलणें

n, शुष्क गप्पा f. pl. T. a. showy but worthless दिखाऊ पण टाकाऊ, खोटा, कवडीकिंमतीचा -मोलाचा; as, "T. furniture." २ delusive, shallow पोकळ, भ्रामक, शुष्क; as, "T. arguments."

Trumpet (trump'et) [Fr. trompette, dim. of trompe.] n. तुतारी f, करणा m, कर्णा m. [SPEAKING T.s बोलण्याचे कर्णे m. pl.] [TO BLOW ONE'S OWN T. आपलीच आपण स्तुति करणें. T. CALL तुतारी वाजवून केलेलें आव्हान n. २ (fig.) urgent summons to action कार्य करण्यास आव्हान n.] २ sound of a trumpet तुतारीचा आवाज m. ३ (fig.) स्तुतिपाठक m. T. v. t. तुतारी वाजवून जाहीर करणें, तुतारी f -कर्णा m. वाजवणें g. of o. २ to sing the praises of (-ची) थोरवी f -मोठेपणा m. सांगणें, (-चा) बडिवार सांगणें -करणें. T. v. i. (of elephant) गर्जना f. करणें.

Trum'peter n. तुतारींत लष्करी सूचना वाजविणारा m, कर्णा वाजविणारा m, कर्णेकरी m, तुताऱ्या m. २ स्तुतीचा कर्णा वाजविणारा. (b) निंदेचा कर्णा वाजविणारा.

Trumpet-flower n. (Bignonia Suaveolens) गजरगोटी f, गजरी f, सागरगोटी f. [SEED OF THE T. गजरगोटा m, गजरा m, गजगा m.]

Trumpet-tongued a. तुतारीसारख्या आवाजाचा, कर्ण्या- [सारख्या आवाजाचा.

Truncate (trun'kāt) [L. truncus, maimed.] a. (bot.) बुंडाकार, सोंडेसारखा; as, "T. leaf or feather." २ (अग्रहीन) बुंडाकार (शंख).

Truncheon (trun'-shun) [Fr. troncon -L. truncus, the stem of a tree.] n. सोटा m, सोडगा m, दांडकें n, दंडुका m. २ गदा f.

Trundle (trun'dl) [A. S. trendel, a circle, a wheel.] n. a little wheel लहान चाक n. २ a kind of low-wheeled cart सखल चाकांचा गाडा m. ३ a rolling motion वाटोळी गति f. ४ a trundle-bed चाकांवर फिरणारा बिछाना m. T. v. t. to roll (a thing) on little wheels चाकांवर फिरवणें -चलवणें; as, "To T. a bed." २ to cause to roll फिरवणें, घुळवणें, घुळत जाईसा करणें; as, "To T. a hoop or a ball." T. v. i. to move on small wheels चाकांवर फिरणें. २ to roll or to go by revolving (as a hoop) फिरणें, घुळणें, घुळत येणें-जाणें, घरंगळत जाणें, वाटोळा फिरत जाणें. Trun'dled pa. p. Trun'dling pr. p.

Trundle-bed n. चाकांवर फिरणारा बिछाना m.

Trunk (trunk) [L. truncus, a stock.] n. (bot.) (of a tree) खोड n, स्कंध m, कांड n, कांडें n, पेड n, प्रकांड n. [NAKED OR BARE T. खोड n, स्थाणु m.] २ (of man or animal) धड n, शरीराचें कांड n. [HEADLESS T. धड n, कबंध m.] ३ main part of any structure धड n, मुख्य भाग m, मधला भाग m, पोट n. ४ main line of railway or canal (रेल्वेचा किंवा कालव्याचा) मुख्य फांटा m, मुख्य रस्ता m, मुख्य प्रवाह m. ५ (प्रवासांतील कपड्यांची) पेटी f, प्रवासी पेटी f. ६ (esp. of an elephant) सोंड f. ७ (हवा जाण्या-

करितां वगैरे ) बंब *m*. ८ पाणी नेण्याचा पन्हळ *m*. ९ ( of an insect ) किड्याची सोंड *f*, किड्याचें तोंड *n*.

Trunk'ful *n*. ट्रंकभर ( कपडे वगैरे ).

Trunk-line *n*. ( आगगाडीचा) मुख्य रस्ता *m*, मुख्य मार्ग *m*. (b) ( कालव्याचा ) मुख्य फांटा *m*.

Trunnion ( trun'yun ) [Fr. *trognon*, a stalk -*trone*, a stump.] *n*. ( of a cannon ) कानपा *m*. २ ( in a steam-engine) खुंटी *f*, पीन *f*.

Trunn'ioned *a*. कानपे असलेला, कानपे बसवलेला.

Truss ( trus ) [O. Fr. *trosser*, to bind together -L. *trotus*, twisted.] *n*. ( of roof, bridge, &c. ) कैंची *f*. २ ( of hay, &c. ) गठ्ठा *m*, भारा *m*, बिंडा *m*, जोंबडा *m*. (b) ( of rice-straw ) लाटा *m*. ३ *compact terminal flower-cluster* गुच्छ *m*. ४ *large corbel supporting monument* कार्बेल *m*, घोडा *m*. ५ (*naut.*) *heavy iron fitting securing lower yards to mast* कैंची *f*. ६ ( for hernia ) दाब *m*, पट्टा *m*, चाप *m*.

Truss *v. t.* कैंचीवर सांवरून धरणें, कैंचीचा आधार देणें. २ (R ) *to pack closely* खचून -दडपून भरणें. ३ गच्च बांधणें, गच्च आंवळणें. Trussed *pa. t.* and *pa. p.*

Truss-beam *n*. कैंचीला बांधणारें आडवें बीम *n*.

Trust ( trust ) [ M. E. *trusten*, to trust.] *n*. *confidence* विश्वास *m*, भरंवसा *m*, श्रद्धा *f*, निष्ठा *f*, इतबार *m*; as, "Our *trust* is in God." २ *confident expectation* विश्वास *m*, भरंवसा *m*, आशा *f*, उमेद *f*, खात्री *f*. ३ *person or thing confided in* विश्वासाचा मनुष्य *m*, विश्वासाचें ठिकाण *n*, विश्वासस्थान *n*, विश्वासभूमि *f*, विश्वासपात्र *n*; as, "He is our sole T." ४ *reliance on the truth of a statement without examination* अंधविश्वास *m*, अंधश्रद्धा *f*, भोळा भाव *m*; as, "Takes everything on T." ५ *commercial credit* पत *f*, उधार *m*. [ ON T. उधार, आंगावर, जातीवर. TO BUY UPON T. उधार घेणें -आणणें -नेणें. TO SELL UPON T. उधार देणें, आंगावर -हातावर -जातीवर देणें.] ६ *responsibility arising from confidence reposed in one* विश्वासाचें काम पत्करल्यामुळें येणारी जबाबदारी *f*, विश्वास *m*; as, "Am in a position of T." [ BREACH OF T. विश्वासघात *m*.] ७ *thing or person committed to one's care* ठेव *m*, न्यास *m*, जिम्मा *m*, दिम्मत *f*, तैनात *f*, हवाला *m*. (b) ठेवीमुळें येणारी जबाबदारी *f*, जिम्मेदारी *f*; as, "Have fulfilled my T." ८ ( commerce ) *a combination of companies to control* ( for their own advantage ) *the production or sale of particular articles, or to regulate a particular branch of business* व्यापारी संघ *m*. ९ इस्टेट ताब्यांत देण्याकरितां योग्य दस्तैवज वगैरे करणें, ट्रस्टी नेमणें. १० ट्रस्टीच्या ताब्यांतील इस्टेट *f*.

Trust *v. t. to place confidence in* विश्वासणें, विश्वास ठेवणें with वर of *o*., पातणें. २ *to consign* (thing, to person, &c.) पातणें, सोंपणें, हवालणें, विश्वासानें ठेवणें -देणें. ३ *to allow credit to* (customer, for goods)

( माल ) उधार -उधारीनें -उधारीवर देणें -विकणें. ४ *to hope confidently* (usually with a phrase or infinitive clause as the object) विश्वास ठेवणें, आशा करणें, उमेद बाळगणें; as, "I T. to hear better news." T. *v. i.* विश्वास ठेवणें. २ आशा ठेवणें -धरणें -बाळगणें, विश्वास *m* -खातरी *f.* असणें. ३ उधार -उधारीनें ( माल ) देणें.

Trust-deed *n.* इस्टेट ट्रस्टींच्या ताब्यांत दिल्याचा [ दस्तैवज *m.*

Trusted *pa. p.* विश्वास ठेवलेला. २ विश्वास असलेला, विश्वासाचा, खात्रीचा. ३ विश्वासानें ठेवलेला.

Trust-estate *n.* ट्रस्टींच्या ताब्यांतील इस्टेट *f.*

Trustee' *n.* (दुसऱ्याच्या वतीनें इस्टेटीची व्यवस्था पाहणारा ) व्यवस्थापक *m*, जिम्मेदार *m*, ट्रस्टी *m*.

Trustee'ship *n.* ट्रस्टीची जागा *f*, ट्रस्टीचें काम *n*.

Trust'er *n.* विश्वास ठेवणारा *m*.

Trust'ful *a.* विश्वास ठेवणारा, विश्वासाचा. २ विश्वास ठेवण्यासारखा, विश्वसनीय, विश्वासूक, विश्वासपात्र.

Trust'fully *adv.* विश्वासानें, विश्वास ठेऊन, विश्वासपूर्वक

Trust'fulness *n.* विश्वासूपणा *m*, विश्वसनीयता *f.*

Trust'ily *adv.* विश्वास ठेऊन.

Trusti'ness *n.* विश्वासपात्रता *f.* २ विश्वासयोग्यता *f.*

Trust'ing *a.* विश्वास ठेवणारा, विश्वास धरणारा. २ भाविक, श्रद्धाळू. ३ विश्वासानें ठेवणारा, पातणारा.

Trust'ingly *adv.* विश्वासानें, विश्वास धरून -ठेवून.

Trust'less *a.* अविश्वासूक, गैरविश्वासी.

Trust-money *n.* (दुसऱ्याचे पंच म्हणून ताब्यांत असलेले ) ट्रस्टचे पैसे.

Trust'worthiness *n.* विश्वासपात्रता *f*, विश्वासयोग्यता *f*, इमानीपणा *m*, इमानदारी *f.* २ विश्वसनीयता *f.*

Trust'worthy *a.* विश्वासू, विश्वासूक, विश्वासाचा, विश्वास ठेवण्यासारखा, भरंवशाचा, खातरीचा, विश्वासयोग्य, विश्वासपात्र.

Trust'y *a* विश्वासाचा, विश्वास ठेवण्याजोगा, विश्वासपात्र, विश्वासयोग्य. Trus'tier, comparative; Trust'iest, superlative.

Truth *n.* खरें *n*, सत्य *n*, खरेपणा *m*, सत्यता *f*, सच्चेपणा *m*, अस्सलपणा *m*, वास्तविकपणा *m*, वास्तविकता *f*, यथार्थता *f*, याथातथ्य *n*. २ खरेपणा *m*, रास्तपणा *m*. ३ सत्यवक्तेपणा *m*, सत्यवादित्व *n*. ४ सत्यता *f*, सत्यशीलता *f.* ५ खरेपणा *m*, हुबेहुबपणा *m*. ६ नक्कीपणा, रास्तपणा *m*. ७ *true state of things* खरी गोष्ट *f*, खरी हकीकत *f*, खरा मजकूर *m*, सत्यवृत्तांत *m*, वास्तविक ( घडलेला ) प्रकार *m*. ८ *an established principle* सत्य *n*, तत्त्व *n*, सिद्धान्त *m*. [GOD'S T., GOSPEL T. सर्वस्वीं खरी गोष्ट *f* -विधान *n*. IN T. खरें पाहतां, वास्तविक. INVESTIGATION OF T. सत्यान्वेषण *n*, तत्त्वान्वेषण *n*. THAT KNOWS T. तत्त्ववित्. HOME TRUTHS स्वतःसंबंधानें न रुचणाऱ्या गोष्टी *f. pl.*] ९ योग्य ठिकाण *n*, योग्य जागा *f*; as, "The wheel is out of *truth*."

Truth'ful *a.* खरा, सत्य, ( नेहमीं ) खरें बोलणारा. २

विश्वास ठेवण्याजोगा, विश्वासपात्र, विश्वसनीय. ३ वस्तुस्थितीला धरून, वास्तविक.

Truth'fully *adv.* खरेपणानें, खरें बोलून. २ वास्तविकपणें.

Truth'fulness *n.* खरेपणा *m*, विश्वासपात्रता *f.* २ वास्तविकपणा *m*.

Truth'less *a.* (of statement) खोटा, असत्य. २ (of person) खोटा, असत्य भाषण करणारा, वचन न पाळणारा, बोलण्यांत फिरणारा, अविश्वासपात्र.

Try (trī) [Fr. -L. *tero -tritare*, to rub.] *v. t. to purify or refine* (as metals) (गाळून -रस करून) शुद्ध करणें. २ *to prove by experiment, to test* ताडणें, ताडून पाहणें; as, "To T. weights or measures." (b) अजमावून पाहणें, परीक्षा पाहणें; as, "To T. a man's opinions." ३ *to subject to severe trial* परीक्षा पाहणें, सत्त्व पाहणें. ४ *to test by use* वापरून पाहणें, प्रत्यक्ष अनुभव घेणें, परीक्षा *f* -प्रचीति *f.* घेणें, घेऊन पाहणें; as, "To T. a remedy for a disease." ५ *to bring to the test* पाहणें, कसून पाहणें, पारखणें, पडताळणें, पडताळून पाहणें, पारख करणें, कसोटी पाहणें. ६ *to strain* ताण पाडणें, ताण देणें; as, "Repeated disappointments *try* one's patience." (b) ताटकळवणें, ताटकळी *f* -ताटकळा *m.* आणणें; as, "The light *tries* one's eyes." ७ (*law*, a person, for, on a charge of) (खटला) चालवणें, चौकशी करणें. ८ *to settle, to decide* (अजमावून) निकाल *m.* लावणें; as, "To T. rival claims by a duel." ९ *to experience* अनुभवणें, अनुभव घेणें, स्वतः सोसणें. १० *to essay, to attempt* प्रयत्न करणें, हातीं घेणें, करणें, करून पाहणें, अदमास पाहणें, प्रयत्न करून पाहणें. ११ (with *on*, as a garment) घालून पाहणें.

Try *v. i.* प्रयत्न करणें, खटपट करणें, करून पाहणें, यत्न -उद्योग करणें -करून पाहणें, झटणें, फांसा टाकून पाहणें. Tried *pa. t.* and *pa. p.* Try'ing *pr. p.*

Try'ing *pr. p.* परीक्षेचा, परीक्षा पाहणारा, आणीबाणीचा, कसास लावून पाहणारा, अडचणीचा; as, "T. occasion or position."

Tryma (trī'ma) [Gr. *tryma*, a hole.] *n.* (*bot.*) अक्रोडाच्या जातीचें फळ *n*, अक्षोटक.

Trypsin (trip'sin) [Gr. *tribein*, to rub.] *n.* स्वादुपिंडाच्या रसांतील पाचक तत्त्व *n*, स्वादुपिंडरसतत्त्व *n.*

Tsar *n.* (रशियाचा) झार *m.*

Tub (tub) [Of doubtful origin.] *n.* (लांकडाचें) पिंप *n*, टीप *n.* २ (लोणी, धान्य, चहा वगैरे मोजण्याचें) मापाचें पिंप *n.* (b) पिंपभर. ३ आंघोळीच्या पाण्याचें पिंप *n.* (b) पिंपांत केलेलें स्नान *n.* ४ (mining) (अशुद्ध धातु, कोळसे वगैरे भरण्याची) बालडी *f*, पिंप *n.* T. *v. i.* पिंपांत बसून स्नान करणें. Tubbed *pa. t.* and *pa. p.* Tub'bing *pr. p.*

Tub'al *a.* नलिकेसंबंधी, नलिकान्तर्गत. [T. PREGNANCY नलिकान्तर्गत गर्भधारणा *f.*]

Tub'bish *a.* पिंपासारखा, लठ्ठसर.

Tub'by *a.* पिंपाच्या आकाराचा. २ लठ्ठ. ३ ( of musical instrument ) फुटक्या आवाजाचा, भद्या आवाजाचा.

Tube ( tūb ) [L. *tubus*, a pipe.] *n.* नलिका *f*, नळी *f*. (b) loosely नळ *m*, नळा *m*, नळकट *n*, नळकूट *n*, नळकांडें *n*, नळकांडी *f*, पन्हळ *m*, पन्हळी *f*. २ रंग ठेवण्याची धातूची नळी *f*. [T. COLOURS नळींत ठेवण्याचे रंग.] ३ *main body of wind-instrument* वायुवाद्याची नळी *f*. ४ ( *anat.*) नाडी *f*, नाड *f*, धमनी *f*, शीर *f*.

Tube-bender *n.* पाइपाच्या तोंडाची कडा बाहेर वळवून [टाकण्याचें यंत्र *n*.

Tube-cutter *n.* पाइप कापण्याचा कटर.

Tube-expander *n* पाइपाचें तोंड फुलविण्याचें यंत्र *n*.

Tuber ( tū'bėr ) [L. *tuber*, a swelling.] *n.* जमिनींतलें गोळ्यासारखें खोड (stem) *n*, ग्रंथिकोष्ठ *n*, हें खोड जमिनींत तयार होऊन पुष्कळ जाड होतें. याच्या वरच्या बाजूला डोळे उत्पन्न होतात. उ० बटाटा.

Tu'bercle *n.* सूक्ष्म ग्रंथि *m*, लहान गांठ *f*. (b) क्षयरोगग्रंथि *m*, क्षयग्रंथि *m*, क्षयरोगांत ( उत्पन्न ) होणारी गांठ *f*. क्षयरोगाचे जन्तू श्वासोच्छ्वासाबरोबर शरीरांत जाऊन फुप्फुसें, यकृत्, प्लीहा, वृक्क, मूत्राशय, सांधे, आंतडीं, व पाठीचा कणा इत्यादि ठिकाणचें द्रव्य कुजवून व तेथें पू उत्पन्न करून असल्या गांठी किंवा ग्रंथि उत्पन्न करतात. २ (*bot.*) मूळाची गांठ *f*, ग्रंथिल मूळ. ३ पानावर आलेला फोड *m*.

Tubercle bacilli क्षयरोगजन्तु *m. pl.*

Tuber'cular *a.* सूक्ष्मग्रंथि असलेला. (b) सूक्ष्मग्रंथि झालेला. २ सूक्ष्मग्रंथीसारखा; as, "T. excrescence." ३ क्षयरोगग्रंथि झालेला, क्षयी, क्षयाचा; as, "T. patient." [T. CONSTITUTION क्षयप्रकृति.] ४ ( *bot.*) ग्रंथिल, गांठीगांठीचा.

Tuber'culate *a.* ग्रंथिल, गांठी असलेला.

Tuberculin ( tū'bėr-külin ) [L. *tuberculum* -*tuber*, a swelling.] *n.* क्षयप्रतिबंधकरस *m*. हा रस क्षयग्रंथींपासून तयार करतात, व हा अंगांत घातल्यानें रोगाचा प्रतिबंध करण्याची शक्ति अंगांत उत्पन्न होते.

Tuber'culose, Tuber'culous *a.* सूक्ष्मग्रंथि असलेला, लहान गांठी असलेला. २ (*med.*) क्षयरोगाच्या सूक्ष्मग्रंथि असलेला, क्षयग्रंथिविकृत; as, "T. liver." ३ क्षयग्रंथिजन्य, क्षयग्रंथीपासून झालेला.

Tuberculo'sis in the luungs *n.* कफक्षय *m*.

*N. B.*—Tuberculosis in the lungs, Consumption, and Pulmonary Phthisis are only different names for the same disease कफक्षय रोग *m*.

Tuberif'erous *a.* ग्रंथिकोष्ठधारी.

Tu'beriform *a.* ग्रंथिकोष्ठाच्या आकाराचा, ग्रंथिकोष्ठाकार.

Tuberose ( tūb'-rōz ) *n.* गुलछबू *m*, निशिगंध *m*.

Tu'berose *a.* गांठाळ, ग्रंथिल.

Tuberos'ity *n.* ग्रंथिलता *f*, गांठाळपणा *m*. २ गोंडेरेपणा *m*. ३ (*anat.*) पिंड *m*, अर्बुद *n*.

Tuberous ( tu'-bėr-us ) [L. *tuberculum*, dim. of

Tuber.] *a.* गांठाळ, ग्रंथिल. २ *having a tufted head* गोंडेरी, गोंडेरा, गोंड्याचा.

Tu'bing *n.* नळाची लांबी *f.* २ नळ्या *f. pl.* ३ नळ्या करण्याचें सामान *n.*

Tu'bular ( tūbū-lėr ) [L. *tubulum*, dim. of Tube, +*-ar* or *-ous.*] *a.* नळीच्या आकाराचा, नळीसारखा, नलिकाकार. [ T. BREATHING अपस्तम्भशाखाध्वनि *m*, अपस्तम्भनलिकाध्वनि *m*, नळींत फुटल्यासारखा आवाज *m.*] २ पुष्कळ नळ्या असलेला. ३ वाटोळा; as, "T. surface."

Tubular boiler *n.* (पितळेच्या ) नळ्यांचा बायलर *m*, नळ्यावाला बायलर *m.* [ नळांचा पूल *m.*

Tubular bridge *n.* (आगगाडी जाण्याचा) बोगद्यासारखा

Tu'bulated *a.* नळीच्या आकाराचा, नळाच्या आकाराचा. २ लहान नळी असलेला. ३ लहान लहान नळ्या असलेला. ४ लहान लहान नळ्यांचा केलेला.

Tu'bule *n.* लघुनलिका *f*, लहान नळी *f.*

Tu'bulous *a.* नलिकाकृति, नळीच्या आकाराचा.

Tuck ( tuk ) [A. S. *tucian*, to pull.] *n. end to be tucked* खोंचा *m*, खोंचण *n*, ओंचा *m*, कांचा *m*, कच्छ *m.* २ ( in a garment ) *a fold* दुमड *f*, मुरड *f*, चुणी *f*, चूण *f.* T. *v. t.* ( with *in* or *up* ) *to gather up* वर सांवरणें, वर खोंवणें, सांवरून खोंवणें, दुमडून खोंवणें, ओंचे खोंवणें, मुरडून खोंवणें. २ ( with *in* ) *to insert between* खोंवणें, खोंचणें, खुपसणें. ३ (with *in*) *to cram* (*food*) तकटून भरणें. ४ मुरड घालणें, चुणी पाडणें; as, "To T. a dress."

Tuesday ( tūz'-dā ) [O. E. *Tiwes dæg.* Tiwes is genetive of Tiw, god of war, and *dæg*, day.] *n.* मंगळवार *m*, भौमवार *m.*

Tuft ( tuft ) [Of Teutonic origin.] *n.* झुबका *m*, झुमका *m*, पुंजका *m*, गोंडा *m*, गुच्छ *m*, स्तबक *m*, तुरा *m*, पल्लव *m*; as, "T. of flowers." २ *tufted head of certain flowers* गेंद *m*, गोंडा *m.* ३ ( of trees ) *clump* झुबका *m*, बेट *n.* ४ *plume, crest* तुरा *m*, चूडा *f*, शिखा *f*, अवतंस *m.*

Tuft *v. t. to furnish with tufts* झुबके लावणें. २ (टांके मारून चटईला वगैरे ) गोंडे लावणें.

Tuft *v. i. to grow in tufts* बेट होणें -येणें. (b) झुबका येणें -असणें, गोंडा येणें.

Tufted *pa. t.* and *pa. p.* T. *a.* गोंडेरा, गोंडेदार, झुबकेदार, झुमकेदार, चूडावान्, गोंडी; ( as, गोंडी जास्वंद, गोंडी मखमल ).

Tug ( tug ) [Closely connected with Tuck.] *v. t. to pull with great effort* मोठ्या श्रमानें -बळानें ओढणें, बळ करून ओढणें -ओढ देणें. Tugged *pa. t.* and *pa. p.* Tug'ging *pr. p.* Tug *n.* झटापट *f*, ओढ *f*, खेंचाखेंच *f*, ओढाताण *f*, खेंच *f.* २ दुसरें गलबत ओढणारी लहान आगबोट *f.* Also called Tug-boat. ३ ( चामड्याचा जिनाला अडकविलेला ) हलका *m.*

Tug of war *n.* दोरी ओढण्याचा खेळ *m*, दोरओढा-

ओढी *f.* २ *supreme contest* जंगी लढत *f.* (b) जोराची झटापट *f.*

Tuition ( tū-ish'-un ) [L. *tuitus*, to see.] *n.* देखरेख *f.* २ शिकवणें *n*, शिकवणी *f.* ३ शिकवणी *f*, शिकवणीचा पगार *m.*

Tulip ( tū'lip ) [Of French origin.] *n.* ट्यूलिप नांवाचें फूल *n.* २ बंदुकीचा कानपा *m.*

Tumble ( tum'bl ) [Of A. S. origin.] *v. i.* ( with *off, over, from, down* ) *to fall suddenly* पडणें. २ (of waves or sick person ) *to roll or toss up and down or from side to side* लोळणें, गडबडां लोळणें. ३ *to move, walk, run in a headlong fashion* कोसळणें, ढांसळणें, धोधावणें, ढकलणें, वरंगळणें. ४ *to perform acrobatic feats* कोल्हांट उड्यांचा खेळ करणें, नाडेभोरप्याचा खेळ करणें.

Tum'ble *v. t.* पाडणें, ढकलून -लोटून पाडणें. २ *to disorder, to rumple* गुधडा घालणें; as, "To T. clothes." ३ *to disarrange, to disorder* गोंधळवणें, घोंटाळा *m* -गोंधळ *m* -उलटापालट *f.* करणें *g. of o.*, अस्ताव्यस्त करणें. ४ ( पशु, पक्षी वगैरे, गोळी मारून ) पाडणें. ५ (झिलई देण्याच्या पेटींत घालून ) झिलई देणें. Tumbled *pa. t.* and *pa. p.* Tum'bling *pr. p.*

Tumble *n.* पडणें *n.* २ कोल्हांट उडी *f.* ३ अस्ताव्यस्त स्थिति *f.*

Tum'bler *n.* पडणारा *m.* २ घोलांट उड्या मारणारा *m*, कबूतरी उड्या मारणारा *m*, कोल्हांटी *m*, कैकाडी *m*, डोंबारी *m.* ३ ( पाडली तरी ) वर उठणारी बाहुली *f*, *pop.* ठकायमावशी *m.* ४ (पाणी पिण्याचें) टंबरेल *n.* ५ गिरेबाज *m*, लोटण *m* ( कबूतर ).

Tumbling barrel *n.* (आंत घातलेल्या लहान जिनसांना) झिलई देण्याचें पिंप *n.*

Tumbling box *n.* ( आंत घातलेल्या बारीक जिनसांना ) झिलई आणण्याची पेटी *f.*

Tumbling wheel *n.* (आंत घातलेल्या जिनसांना) झिलई आणण्याचें पोकळ चाक *n.*

Tumbrel ( tum'-brel ) [O. Fr. *tumbrel -tomber*, to fall.] *n.* ( *mil.* ) *a two-wheeled cart for carrying tools, ammunition* ( हत्यारें, दारूगोळा नेण्याची ) छपरी गाडी *f*, युद्धसामग्री नेण्याचा खटारा *m*, रणगाडा *m.* २ *a dung-cart* सोनखताची गाडी *f.*

Tumefac'tion *n.* ( *path.* ) *a swelling* ( *esp.* on the body ) शरीरावर आलेली सूज *f.* (b) गांठ येणें *n.* (c) गांठ *f*, बेंड *n*, स्फोट *m*, स्फोटक *m*, शोथ *m.*

Tu'mefy, Tu'mify *v. t.* (*lit.* and *fig*[illegible] *cause to swell* सुजवणें, सुजावयास लावणें, फु[illegible] फुगावयास लावणें; as, "To swell, *tumefy*, stiffen, not the diction only, but the tenor of the thought." T. *v. i.* सुजणें, फुगणें.

Tumes'cence *n.* सूज *f.*

Tumes'cent *a.* सुजलेला, सुजणारा.

**Tumid** ( tū'-mid ) [ L. *tumere*, to swell. ] *a.* ( of parts of body ) *swollen* सुजलेला, फुगलेला, सुजीर, फुगीर. २ ( *fig.* ) ( of style ) *bombastic* फुगवून लिहिलेला, पोकळ भपक्याचा, ढबदार, ढबीचा, डौलाचा, शब्दावडंबराचा, सजवलेला.

**Tumid'ity, Tu'midness** *n.* सूज *f*, फुगवटी *f*. २ ( *fig.* ) पोकळ भपका *m*, ढब *f*, आव *m*. ( b ) शब्दावडंबर *n*.

**Tu'midly** *adv.* सुजून. २ पोकळ भपक्यानें. (b) शब्दावडंबरानें, सजवलेल्या भाषेनें.

**Tumour** ( tū'mėr ) [L. *tumio*, I swell.] *n.* *a morbid swelling of any part of the body* आवाळूं *n*, वाळूक *n*, बेंड *n*, अर्बुद *n*. Sk. [ A T. IN THE GROIN BEHIND THE EAR वळ *m*. INDOLENT AND SYMPATHETIC T. अवधाणा *m*, वाधाणा *m*. SUPPURATING T. GENERALLY केसतुड *n*, उठाणूं *n*. T. IN ANO आरई *f*, आर *f*. TO FORM AGAIN -(A BURST T.) डंबारणें, डंबारा धरणें, खपली धरणें. FATTY T. वसामय ग्रंथी *f*. FIBROUS T. तंतुमय ग्रंथी, आवाळूं. FIBRO-NUCLEATED T. कणतंतुमय ग्रंथी *f*. GLANDULAR T. मांसपिंडमय आवाळूं. TUMOROUS GROWTH शरीरावर किंवा शरीरांत नवीन वाढलेला भाग *m*. OVARIAN T. अंतःफलग्रंथी ( अंतःफल= ovary ) *f*. T.s IN THE PELVIS AND VAGINA कटीरमार्गांतील व योनिमार्गांतील ग्रंथी. MALIGNANT T. दुष्ट आवाळूं, घातुक आवाळूं. BENIGN T. निरुपद्रवी आवाळूं.] Also spelt Tumor.

**Tu'mular** *a.* चबुत्रेवजा, चबुत्र्यासारखा.

**Tumult** (tū'-mult) [L. *tumere*, to swell.] *n.* *commotion of a multitude esp. with confused cries* गडबड *f*, गोंधळ *m*, कोलाहल *m*, बैदा *m*, दंगल *f*, धांदल *f*, गलबल *f*, धामधूम *f*, अंदाधुंदी *f*, धुमाकूळ *m*, हुल्लड *f*, गर्दी *f*, दणका *m*, धूम *f*. २ *confused and excited state of mind* संक्षोभ *m*, क्षोभ *m*, खळबळ *f*, अस्वस्थता *f*; as, "The T. within him had subsided."

**Tumul'tuary** *a.* दंगा उत्पन्न करणारा, दंग्याचा, बखेड्याचा, गोंधळाचा; as, "T. skirmish." २ *agitated, restless* क्षुब्ध, खवळलेला, अस्वस्थ, शांति नसलेला, मनाचें स्वास्थ्य नसलेला; as, "Men without religion live in a T. state."

**Tumul'tuous** *a.* गोंधळाचा, गडबडीचा, धांदलीचा, दंगलीचा, तुंबळ, बेबंद; as, "T. fight." २ *conducted with disorder, confused, boisterous* अव्यवस्थित, घोंटाळ्याचा, गोंधळाचा; as, "Tumultuous assembly." ३ *agitated* ( as with conflicting passions ) क्षुब्ध, खळबळ उडालेला; as, "T. breast." ४ *turbulent, violent* घोंटाळा उपस्थित करणारा, दंगा उपस्थित करणारा; as, "T. speech."

**Tumul'tuously** *adv.* धांदलीनें, गडबडीनें, घोंटाळा उडवून, धांदल माजवून.

**Tumul'tuousness** *n.* दंगल *f*, गडबड *f*, गर्दी *f*.

**Tumulus** ( tū'-mū-lus ) [ L. *tumere*, to swell.] *n.* *a mound of earth raised as a tomb or a monument* ( प्राचीन काळीं पुरलेल्या लोकांच्या थडग्यावर केलेला छत्रीवजा ) चबुत्रा *m*. Tumuli ( tū-mū-li ) *n. pl.*

Tun ( tun ) [ O. E. *tunne*, tun. ] *n.* ( दारूचें ) मोठें पिंप *n.* T. *v. t. to store ( liquor ) in a tun* पिंपांत (सांठवून) ठेवणें.

Tu'nable *a.* सुरांत लावण्याजोगा, मेळ बसवण्याजोगा.

Tune (tūn) [From the root of Tone.] *n. melody or air* तान *f*, आलाप *m.* [T. AND TIME तालसूर.] २ *correct intonation in singing or playing* स्वर *m*, सूर *m*, चाल *f*, गति *f*, राग *m*, रागिणी *f.* [TO TELL THE T. BY HEARING THE STRING SOUNDED (*fig.*) सुतानें स्वर्गास जाणें. ] (b) *due adjustment of instrument* स्वर *m*, सूर *m*, स्वरमेळ *m*, स्वरांचा जम *m* -मिलाफ *m*, स्वरैक्य *n.* [THAT IS OUT OF T. बदसूर, अपसूर.] ३ *agreement, harmonious relation* मेळ *m*, जम *m*, मिलाफ *m*, ऐक्य *n*, साधर्म्य *n.* [IN T. WITH THE INFINITE अनंताशीं साधर्म्यांत.] ४ *suitable mood* अनुरूप भाव *m*, वृत्ति *f*, तार *f*, लहर *f.* [TO BE IN T. FOR सूर *m. pl.* वाहणें *g. of s.* TO CHANGE ONE'S T., TO SING ANOTHER T. वृत्ति वदलणें, वृत्ति पालटणें, वृत्तींत फरक पडणें, भाषणाचा रोंख बदलणें. ]

Tune *v. t. to put* (*piano*) *in time* लावणें, सुरांत -स्वरांत लावणें, स्वर *m.* मिळवणें -जमवणें, स्वरांचा जम *m* -मेळ *m.* करणें. २ *to adjust* (*a thing to circumstance etc.,*) (परिस्थितीशीं वगैरे) जमवून घेणें, मिळतें घेणें, मिलाफ करणें. ३ (*poet.*) *to produce* (*music*) गाणें; as, "Lark *tunes* his song." ४ *to express or celebrate in music* गाऊन साजरा करणें, गाण्यांत उच्चारणें -कळवणें. T. *v. i.* (*lit.* and *fig.*) *to be in harmony* (*with*) ( -शीं ) मेळ *m.* असणें, जम असणें, मिलाफ असणें -होणें. Tuned *pa. t.* and *pa. p.*

Tun'eful *a. melodious, musical* सुस्वर. Tun'efully *adv.* सुस्वरतेनें, सुरावर. Tun'efulness *n.* सुस्वरता *f.*

Tun'eless *a. not in time* सुरांत नसलेला, बेसूर.

Tun'er *n.* ( पेटी वगैरे ) सुरांत लावणारा *m.*

Tungsten (tung'-sten) [Scan. *tung*, heavy, and *sten*, stone.] *n.* रसायनशास्त्रांतील 'तुंगस्थ' नांवाचें धातुमूलद्रव्य *n.*

Tunic (tū'-nic) [Fr. -L. *tunica*, tunic.] *n.* (*bot.*) *loose membranous skin of an organ* वरचें वेष्टण *n*, त्वचा *f.* २ *a short coat worn by soldiers, policemen, etc.* शिपायाचा अंगाबरोबरचा ट्यूनिक (डगला.).

Tunicate, Tu'nicated *a.* (*bot.*) त्वचावगुंठित (कंदविशेष); उ० गुलछबूचा कांदा *m.*

Tu'nicle *n.* (*bot.*) *fine or delicate tunic* अगदीं पातळ [ त्वचा *f.*

Tun'ing *pr. p.* Tuning Fork *n.* ( *phys.* ) स्वरशूल *m.*

Tunnel (tun'el) [From the root of Tun.] *n. a long under-ground passage (esp. on railways)* बोगदा *m.* २ ( ससे, घुशी वगैरे प्राण्यांनीं केलेलें ) बीळ *n.* ३ खाणींतील रस्ता. ४ ( कारखान्याच्या ) धुराची गल्ली *f.* T. *v. t. to make or bore a tunnel* बोगदा पाडणें; as, "To T. a mountain." २ *to furnish with a tunnel*

बोगदा पाडणें. २ बीळ करणें -पाडणें. Tun'nelled *p. t.* and *pa. p.* Tun'nelling *pr. p.*

Tunnel-borer *n.* बोगदा पाडण्याचें यंत्र *n.*

Tup (tup) [M. E. *tupple*, tup.] *n. male sheep, ram* मेंढा *m*, टपूर *m*. २ *striking face of steam-hammer* (वाफेनें चालणाऱ्या) हातोड्याचें तोंड *n*.

Turban (tur'ban) [Etymology dubious.] *n.* पागोटें *n*, पगडी *f*, मुंडासें *n*. T.-binder *n.* पगडबंद *m*.

Turbid (tur'-bid) [L. *turbidus -turba*, a crowd.] *a.* (of liquid) *muddy* गढूळ, खडूळ, गदळ, राड, कलुष. २ (*fig.*) *confused, disordered* गोंधळाचा, गोंधळलेला.

Turbid'ity, Tur'bidness *n.* गढूळपणा *m*, खडूळपणा *m*, कलुषता *f*.

Tur'bidly *adv.* गढूळपणानें, खडूळपणानें, गढूळ -खडूळ [होऊन.

Tur'binate *a.* भोंवऱ्यासारखा, व्यस्तशंकूसारखा, क्षुद्रशुक्तिकाकार. [TURBINATED BONE शुक्तिकास्थि. INFERIOR TURBINATED BONE अधःशुक्तिकास्थि. INFERIOR TURBINATED CREST अधरालिकास्थि. SUPERIOR TURBINATED CREST उत्तरालिकास्थि. SUPERIOR TURBINATED PROCESS ऊर्ध्वशुक्तिकापक्ष *m*. MIDDLE TURBINATED PROCESS मध्यशुक्तिकापक्ष *m*. ]

Turbine ( tur'bin ) [L. *turbo, turbinis*, a whirl.] *n.* ( *mech. eng.* ) *a rotary engine, consisting of a large wheel with buckets or vanes on the circumference or fixed to an axle or shaft* चक्की *f*. (a) पाणचक्की *f*. (b) पवनचक्की *f*. (c) वाफचक्की *f*.

Tur'bulence, Tur'bulency *n. riot and disorder* दंडेली *f*, दांडगाई *f*, दंगेबाजी *f*, बंडखोरी *f*, पुंडाई *f*, खलेली *f*, टोंगाई *f*, उद्दामपणा *m*, उर्मटपणा *m*.

Turbulent ( tur'-bū-lant ) [ From the root of Turbid.] *a. disorderly, riotous* दंगेखोर, दांडगा, दंडेल, दंगेबाज, बंडखोर, खलेल, धासधुस्या, शिरजोर, धांदल्या, उर्मट, उद्दाम.

Turf ( turf ) [A. S. *turf*, turf.] *n. earth thickly matted with roots of grass* गवताचा भुईतळ *m*, गवताची जमीन *f*, गवताळ जमीन *f*. [THE T. *the race-course* शर्यतींचें पटांगण *n*. २ *the profession of horse-racing* (घोड्यांच्या) शर्यतींचा धंदा *m*. A CLOD OR LUMP OF T. पेंड *m*. SPADE USED IN TURNING UP T. पेंडस *m, n*.] T. *v. t. to cover ground with turf* (जमीन) गवताची करणें, गवताळ करणें.

Turfy *a.* गवताळ, गवतासारखा.

Turges'cence, Turgid'ity, Tur'gidness *n.* तांबडा होऊन फुगणें *n*, सूज *f*.

Turges'cent *a.* तांबडा होऊन फुगणारा, सुजणारा.

Turgid (tur'-jid) [L. *turgidus, -turgere*, to swell.] *a. morbidly swollen* सुजलेला, फुगलेला. २ (of speaking or writing) *pompous in style* फुगवून लिहिलेला, अवडंबराचा, डौलाचा, डौली.

Turk *n.* तुर्क *m*, तुर्क मनुष्य *m*, टर्कींतला रहिवाशी *m*.

Turkey (tur'-ki) [Formerly supposed to have come from Turkey.] *n.* 'टर्की' नांवाची कोंबड्याची जात *f.*

Turkey (tur'ki) *n.* तुर्कस्थान *n.*

Turkey-red *n.* टर्कीरेड नांवाचा टिकाऊ तांबडा रंग *m.*

Turk'ish *a.* तुर्कस्थानचा, तुर्कस्थानासंबंधी -विषयीं. (b) तुर्क लोकांचा -विषयीं. [T. BATH तुर्की स्नान. यांत प्रथम बाष्पस्नान घालून मागाहून मालीस करतात.] T. *n.* तुर्क-लोकांची भाषा *f*, तुर्की भाषा *f.*

Turmeric (tur'-mer-ic) [Perhaps from Arabic.] *n.* (*the plant*) हळद *f*, हरिद्रा *f.* (-*the root*) हळद *f*, हरिद्रा *f.* Certain kinds of *Turmeric* are आंबे-हळद, गांठीहळद, दारूहळद, [illegible]खंडी हळद. [CLOVE OF T. हळकुंड *n*, हळखुंड *n.* LEATHER BAG FOR T. -POWDER वाघी *f*, भंडारी *f.* OF OR BELONGING TO T. हळदीचा, हरिद्र. T. -AS SCRAPED AND COLOURED (IN PREPARATION FOR कुंकूं) रवा *m.* T. (CURCUMA ZANTHORRIZON) BOILED IN GOAT'S MILK रसांजन *n.* T. -COLOURED हळदिवा. T.-POWDER (ESP. AS USED IN OFFERINGS) भंडार *m.* T. -PAPER हळदीचा कागद *m.*]

Turmoil (tur'-moil) [Perhaps from *moil* with intensive *tur.*] *n. agitation* तळमळ *f*, संताप *m*, ताप *m.* २ *trouble* खवदव *f*, खटपट *f*, दगदग *f*, घालमेल *f.*

Turn (turn) [A. S. *tyrnan* -L. *tornere*, to turn in a lathe.] *v. t. to give rotatory motion to, to move on axis* फिरवणें, फिरेसा करणें, भोवंडणें, परिभ्रमण *n.* करविणें *g. of o.*; as, "Crank *turns* the wheel." २ *to change from one side to another, to invert* उलटणें, उलथणें, उलटा -उरफाटा करणें, पालटणें, पाल-टून टाकणें, उलथा करणें; as, "*Turns* everything upside down." ३ (*fig.*) *to revolve mentally* डोक्यांत घोळवणें, मनन करणें; as, "I have *turned* the matter over and over in my mind." ४ *to give a new direction to* फिरवणें, वळवणें, मुरडणें, तोंड *n* -रोंख *m.* फिरवणें -वळवणें *g. of o.*, कल *m.* देणें; as, "T. your face this way." ५ *to move to the other side of, to go round* (च्या) बाजूस जाणें, वळसा घालणें; as, "T. the flank of an army." ६ *to cause to go, to send* परतवणें, जावयास लावणें, घालवणें; as, "He never *turned* a beggar from his door." ७ *to put* घालणें, ओतणें; as, "*Turn* it out into a basin." ८ *to change in nature, form, condition, to cause to become* फिरवणें, पालटणें, फेर-फार करणें, रूप बदलणें; as, "To T. water into wine." (b) (milk, etc.) आंबटावणें, आंबवणें, आंबट-पणा *m.* आणणें, विकृत करणें; as, "Thunder will T. milk sour." (c) (stomach) *to nauseate* कळमळ[illegible]णें, कळमळ *f* -मळमळ *f.* आणणें -येईसें करणें; as, "The sight of raw meat *turns* my stomach."(d) (head) फिरवणें, घेरी आणणें; as, "Overwork has *turned* his brain." (e) (head) *to intoxicate* फिरवणें,

वारें शिरवणें, वेड *n.* भरवणें; as, "Success has *turned* his head." (f) (passage) *to translate* उतरणें, तर्जुमा करणें; as, "How would you *turn* this passage." ९ *to shape (object) in lathe* कातणें, कांतणें, कातून तयार करणें.

Turn *v. i. to move as on axis, to receive rotatory motion* फिरणें, भोवणें, परिभ्रमण *n.* होणें *g. of s.*; as, "The wheel *turns.*" २ *to change from one side to another* फिरणें, पालटणें, उलटणें, परतणें; as, "The whole world has *turned* topsy-turvy." ३ *to take a new direction* फिरणें, मुरडणें, तोंड *n* -रोख *m.* फिरणें, वळणें, वांकणें; as, "River *turns* to the right." [To T. AND TWIST ABOUT (AS IN YAWNING) वळेपिळे -अळेपिळे *m. pl.* -अळोकेपिळोके *m. pl.* -देणें OR *inversely* येणें. To T. AND TOSS ABOUT (FROM SICKNESS) चळवळ करणें, धडपडणें, घालमेल *f.* करणें.] ४ *to change in nature, form, or condition* फिरणें, बदलणें, फेर *m* -फेरफार *m.* होणें *g. of s.*, होणें; as, "Joy has *turned* to bitterness." (b) (milk) आंबणें, आंबट होणें; as, "Milk will *turn* sour." (c) (head, brain) डोकें *n.* फिरणें, घेरी *f* -चक्कर *f.* येणें, तिरमिरणें, भोवणें *in. con.* ५ (of material) *to lend itself easily to treatment in lathe* कातलें जाणें, कातणें. ६ *to depend* अवलंबून असणें with वर of *o.*, टेंकणें, अडकणें, नेट असणें *with* वर *of o.*, राहणें -असणें *with* वर *of o.*; as, "Everything *turns* on his answer." Special uses with adverbs and prepositions: To T. about दुसरीकडे तोंड फिरवणें, दुसऱ्या बाजूस वळणें. T. against (च्या) विरुद्ध उठणें -जाणें. T. down, *to reduce flame (of gas, lamp) by turning tap* (ज्योत) लहान करणें. २ *to fold down* दुमडणें, दुमटणें, दुमतवणें. T. in, *to incline inwards* आंतल्या बाजूस वळणें; as, "His toes *turn* in." T. off, *to check passage of (water, gas, etc.) by means of tap* (पाणी, वगैरे) बंद करणें. २ *to achieve, to produce* (काम) करणें, उरकणें. ३ *to dismiss (servant) from employment* नोकरीवरून दूर करणें, घालवणें, हकालणें, काढणें. T. on (*adv.*), *to give free passage to (water) by turning tap* पाणी चालू करणें, नळ सोडणें. T. on (*prep.*) *to depend upon* अवलंबून असणें, टेंकणें, अडकणें; as, "Everything *turns on* his answer." २ *to become hostile to* (च्या) विरुद्ध उठणें -असणें. T. out, *to expel* घालवणें, घालवून देणें, काढून देणें, उच्चाटन *n.* करणें, हांकून देणें. २ *to cause to point or incline outwards* बाहेर काढणें; as, "T. out your toes." ३ *to produce (goods, etc.)* (माल) तयार करणें, काढणें. ४ *to bring to view* उघडून दाखवणें, पुढें मांडणें; as, "He made him T. out his pockets." ५ *to assemble for duty* जमणें, निघणें, तयार होणें; as, "Fifteen men *turned out.*" ६ *to be found, to prove to be the case* ठरणें, उतरणें; as, "This *turns* out to be true."

T. over, *to upset* उलथणें, उलथून पाडणें, उलटणें. २ *to transfer conduct of ( thing to person )* दुसऱ्यावर सोंपवणें, दुसऱ्याच्या नांवें करणें, दुसऱ्याचे स्वाधीन करणें; as, "To T. over business to another man," ३ *to do business to the amount of* ( -चा ) धंदा करणें, ( -पर्यंत ) उलाढाल करणें; ( पर्यंत ) व्यवहार करणें; as, "He *turns* over Rs. 500 per week." ४ (*pop.*) उलटून पहा. T. round तोंड फिरवणें. (b) मुरडणें, फिरणें. २ *to adopt new opinions or policy* नवीन मतें किंवा धोरण स्वीकारणें. T. to ( *prep.* ) *to apply oneself to (work)* (कामास) लागणें. T. to (*adv.*) *to begin work* कामास आरंभ करणें. T. up, *to disinter* उकरणें, उकरून वर काढणें; as, "Plough *turns up* skulls." २ *to make one's appearance* येणें, हजर होणें, तोंड दाखविणें; as, "He *turned up* an hour late." ३ ( of event, opportunity ) *to happen* घडणें, होणें. T. upon, Same as T. on.

Turn *n. rotary motion* फेरा *m*, फेर *m*; as, "A single T. of the handle." २ *change of direction or position* ( पालटलेलें ) स्वरूप *n*, नवी दिशा *f*, वळण *n*; as, "Complaint took a favourable T." ३ *deflected part, bend* वळण *n*, वांकण *n*, वांक *m*, मोड *f*; as, "He walked along a T. of the river." ४ *formation* वळण *n*, थाट *m*, ठेवण *f*, डौल *m*; as, "The T. of an ankle." ५ *disposition, tendency* मनाचा कल *m*, मनाचा झोक *m*, डौल *m*, वळण *n*, धोरण *n*; as, "A humorous T." ६ *short walk, ride, drive, etc.* फेरी *f*, फेरफटका *m*, फेरा *m*, रपेट *f*; as, "Take a T. in the garden." [ To TAKE A T. चक्कर मारून येणें.] ७ *coming successively to each of several persons* पाळी *f*, खेप *f*, बारी *f*, वेळ *f*; as, "It is your T. to watch." [ BY T.s आळीपाळीनें, फेरपाळीनें, हेरफेरानें, क्रमानें.] ८ ( *pl.*) *menses* ( पाळीनें येणारा ) विटाळ *m*. ९ *each round in a coil of rope* आटा *m*, विळखा *m*, अढी *f*, अढा *m*, वेढा *m*, पेंच *m*, फेरा *m*, वळसा *m*. १० (*print.*) *inverted type as temporary substitute for missing letter* ( टायपांतील अक्षरें खुटलीं असतां त्यांच्या जागीं खुणेकरितां घातलेला ) उलटा टाईप. T. -bench *n*. घड्याळें करणाराचा लहानसा चरक *m*. T. -cap *n*. चिमणीवरील फिरती टोपी *f*. T. -coat *n*. आपलीं मतें किंवा पक्ष कारणावांचून सोडणारा *m*, स्वपक्षत्यागी *m*. T.-cock *n*. (मुख्य नळापासून पाणी सोडणारा) खजिन्यावरचा नळवाला *m*. T.-key *n*. *a person in charge of prison keys* (किल्ल्या ठेवणारा) चावीवाला (तुरुंगाचा) अधिकारी *m*. T.-out *n. coming out for duty* कामाकरितां बाहेर निघणें *n*. २ *a strike of employees* मजुरांचा संप *m*. ३ *assembly of persons* ( मौज पाहण्यास जमलेल्या ) लोकांचा समुदाय *m*. ४ *equipage* गाडीघोडा वगैरे सरंजाम *m*, परिवार *m*. ५ *quantity of goods manufactured in a given time* ( कारखान्यांत वगैरे ) निघालेला माल *m*, निपज *f*. T. -over *n*. धंद्यांतील उलाढालीची रक्कम *f*. २

दुसऱ्या पानावर गेलेला ( वर्तमानपत्रांतील ) लेख *m.* T.-screw *n.* स्क्रूची चावी *f*, स्क्रूड्रायव्हर *m*, कुऱ्हाड *m.* T. -sole *n.* सूर्यकमळ *n*, सूर्याचें फूल *n.* T. stile *n.* चाक *n*, चाकाचा दरवाजा *m.* T. -table *n. a circular revolving platform for reversing locomotives* (आगगाडीचीं इंजनें उलटीं करण्याकरितां वाटोळें फिरतें टेबल.

Turned *pa. t.* and *pa. p.* [ To be T., *to have passed the age of* उलटणें; as, "He is T. 40=त्याची चाळिशी उलटली."]

Turn'er *n.* फिरवणारा *m*, फिरणारा *m.* २ (*esp.*) कातकाम करणारा *m*, कातणारा, कातारी. ३ उलथणें *n*, उलथा *m*, कलथा *m*, काविलथा *m.* (b) खुरपी *f*, उचटणें *n*, हातखोरणें *n.*

Turn'ery *n. the art of turning* कातकामाची कला *f*, कातकाम *n.* २ *things made or ornamented by turning* कातीव वस्तु, कातकामाच्या वस्तु *f. pl.*

Turn'ing *pr. p.* T. *n.* फिरवणें *n*, फिरणें *n*, etc. २ (*esp.*) *the use of lathe* कातकाम *n.* ३ *place where a road meets another* वळण *n*; as, "Stop at the next T." ४ ( *med.* ) ( गर्भ फिरवून बाहेर काढण्याचा ) गर्भविवर्तनप्रयोग *m.* ५ (*pl.*) कातकामाचा पडलेला चुरा *m.*

Turning-point *n.* क्रांतीची वेळ *f*, क्रांतिकारक मर्यादा *f.*

Turnip (tur'nip) [Of A. S. origin.] *n.* टरनिप नांवाचें फळ *n*, सलगम.

Turpentine ( tur'-pen-tīn ) [ Gr. *terebin-thos*, the turpentine tree.] *n. the resinous juice of certain trees* ( *esp. pines* ) टरपेन्टाइन *n*, टरपेनतेल *n*, पाइन वृक्षाचा चीक *m.*

Turnpike *n.* जकातीचा (नाक्यावरील) दरवाजा *m.*

Turpitude ( tur'-pi-tūd ) [L. *turpis*, base.] *n. baseness, depravity* नीचपणा *m*, हलकटपणा *m*, क्षुद्रपणा *m.*

Turquoise ( tur-kovz', tur-kēz' ) [ From Turkey, whence it was first brought.] *n. a precious stone of a greenish-blue colour* फिरोजा *m*, पेरुजा *m*, पेरोजा *m*, पेरोज *m*, वैडूर्य *m.*

Turret ( tur'-et ) [ Dim. of Tower.] *n. a small tower* मनोरा *m*, प्रासादशृंग *n*, शिरोगृह *n.* २ (*mil.*) *low, flat usually revolving tower for gun and gunners in a ship or fort* बोटींतील फिरता मनोरा *m.*

Turretship *n.* तोफांच्या मनोऱ्यांचें जहाज *n.*

Turtle ( tur'-tl ) [ A. S. *turtle*, -L. *turtur*, a turtle -dove.] *n.* टर्टल पक्षी *m.* (एक कबूतरांची जात ).

Turtle ( tur'-tl ) [From Tortoise.] *n. a sea-tortoise* (समुद्रांतील) कांसव *n*, समुद्रकूर्म *m*, समुद्रकच्छ *m.*

Tuscan *n.* इटालींतील टस्कनी प्रांताचा रहिवाशी *m*, टस्कन *m.*

Tush ( tush ) *interj. pshaw* छिः, छिछी, छी, छत्.

Tusk ( tusk ) [ A. S. *tusc*, tusk.] *n. a long pointed tooth* ( *of certain animals, as the boar, etc.* ) सुळा

*m*, सुळका *m*, दंष्ट्रा *f*. T. *v. t. to thrust or tear up with tusks* सुळ्यांनीं भोंसकणें, सुळ्यांनीं फाडणें -चिरणें.

Tusked *a*. सुळ्यांचा, दंती, दंष्ट्री, सुळे असलेला.

Tusk'er *n*. *elephant with developed tusks* सुळे असलेला हत्ती *m*.

Tusser, Tussur, Tussore ( tus'-ėr ) [ Sk. *tassara*, a shuttle. ] *n*. ओकच्या पानावर वाढणारा रेशमाचा किडा *m*, तसर नांवाचा रेशमी किडा *m*. २ ( या व इतर किड्यांपासून तयार झालेलें) तसर रेशीम. Tusser-silk *n*. Same as Tusser.

Tussicular (tus-i'-cu-lar) [L. *tussicularis-tussicula* dim. *of tussis*, cough. ] *a*. ( *med.* ) *of a cough* खोकल्याचा.

Tussle ( tus'-l ) [A. S. *tæsan*, to pull to pieces.] *n*. *struggle, scuffle* झोंबाझोंबी *f*, झटापट *f*, ओढाओढी *f*, ओढाताणी *f*, झोंबी *f*, धक्काधक्की *f*. T. *v. i.* झोंबाझोंबी करणें, ओढाताणी *f* -धक्काधक्की *f*. करणें. Tussled *pa. t.* & *pa. p.* Tus'sling *pr. p.*

Tut ( tut ) *interj.* थत्त, हत्त, छत्त, फें, छिछी, हुडुत्त.

Tutelage ( tū-te-lāj ) [ L. *tūtor*, I watch, guard.] *n*. *guardianship* पालकत्व *n*. २ *period of being under this* नेणतेपणाचा काळ *m*, नेणतेपणा *m*, अज्ञानाचा काळ *m*, अज्ञानदशा *f*.

Tu'telar, Tu'telary *a*. *serving as a guardian, protective* रक्षण करणारा, राखणारा, रक्षणकारी, रक्षिता. [ T. DEITY OF A FAMILY कुळदैवत *n*, आराध्यदेवता *f*, आराध्यदैवत *n*.] २ *of a guardian* पालकाचा.

Tutenag ( tū'-te-nag ) [ Fr. *tutenague*, probably from Arabic *tutiya*, an oxide of zinc. ] *n*. *zinc imported from China* ( चीनमधून आणलेलें ) जस्त *n*, ट्युटेनाग नांवाचें जस्त.

Tutor ( tū'-tor ) [ L. *tutor*, I watch.] *n*. *a private teacher, esp. one having general charge of person's education* खाजगी शिक्षक, मास्तर *m*. २ (*Eng. Univ.*) ( इंग्लिश युनिव्हर्सिटींतील खालच्या वर्गांतील विद्यार्थ्यांना शिकविणारा) ट्यूटर *m*. ३ (*law*) *guardian of a minor* अज्ञानाचा पालक *m*. T. *v. t.* शिकवणें. २ ( साक्षीदार ) पढवून तयार करणें.

Tutorage *n*. शिक्षकाचें काम *n*, मास्तरपणा *m*, मास्तरकी *f*.

Tu'toress *n*. शिक्षकीण *f*, मास्तरीण. २ पालकीण *f*.

Tutor'ial *a*. शिक्षकाचा. २ शिक्षणाचा, शिक्षणासंबंधी. ३ शिकविण्याच्या उपयोगाचा.

Tu'torship *n*. शिक्षकत्व *n*, मास्तरपणा *m*. २ पालकत्व *n*. ३ शिक्षकाची जागा *f*. (b) शिक्षकाचें काम *n*.

Twaddell ( twa-del ) [From the inventor's name.] *n*. *hydrometer for liquids heavier than water* ( पाण्यापेक्षां जड द्रवांकरितां ) जलगुरुत्वमापक *m*, ट्वॅडेल.

Twaddle (twad'-l) [Imitative.] *n*. *silly, empty talk* भाकडकथा *f*, जल्पना *f*, वाग्जल्प *m*, जल्प *m*. T.

*v. i.* भाकडकथा सांगणें, उगाच बडबड *f.* करणें, बडबडणें. Twad'dled *pa. p.* Twad'dling *pr. p.*

Twain (twān) [A. S. *twegen*, two.] *n. two persons or things* जोडी *f*, जोड *m*; as, "To cut in T." Twain *a. two* दोन.

Twang (twang) [Imitative.] *v. i. to make ringing metallic sound* टणत्कार करणें, टणत्कारणें. T. *v. t. to cause to make a ringing sound* टणत्कार करविणें. २ *to speak with a nasal sound* नाकांत बोलणें -उच्चारणें, गोंगणें, गेंगणें, गोंगावणें. T. *n. sound of tense string when plucked* टणत्कार *m*. २ *a nasal tone* गेंगणें *n*, गोंगणें *n*, नाकांत बोलणें *n*, नाकांतला उच्चार *m*. [THAT HAS A T. गुणगुणीत, गिणगिणीत, गुणगुण्या.] Twanged *pa. p.* Twang'ing *pr. p.*

'Twas, Contraction of it was.

Tweak (twēk) [A. S. *twiccian*, to twitch.] *v. t. to pull sharply and quickly* चिमटून ओढणें, चिमटीनें ओढणें. T. *n. twitch, sharp pull* चिमटा *m*.

Tweel, Same as Twill.

Tweezers (twē-z'ėrs) [Fr. *etui*, old form *estuy*, a case.] *n. pl.* (केंस उपटण्याचा) चिमटा *m*.

Twelfth (twelfth) *a.* बारावा, द्वादश. T. *n.* बारावा हिस्सा *m*, द्वादशांश *m*.

Twelve (twelv) [A. S. *twelf*, twelve.] *a.* बारा, द्वादश. T. *n.* बाराचा आंकडा *m*, द्वादशांक *m*, बारा.

Twelve-month *n. a year* वर्ष *n*, बारा महिने *m. pl.* [FOR, DURING, THE T. बारा महिने, बारमास, बारमाही, बारमहा. OF OR BELONGING TO A T. बारमाही.]

Twen'tieth *a.* विसावा, विंशतितम. T. *n.* विसावा हिस्सा *m*, विंशतितमांश *m*.

Twenty (twen'ti) [O. E. *twentig-twegen*, two.] *a.* वीस, विंशति. [T. ONE एकवीस. T.-TWO बावीस *or* बेवीस. T.-THREE तेवीस. T.-FOUR चव्वीस, चोवीस. T.-FIVE पंचवीस. T.-SIX सव्वीस. T.-SEVEN सत्तावीस. T.-EIGHT अठ्ठावीस. T.-NINE एकुणतीस. AGE OF T. विशी *f*. AGGREGATE OF T. विशी *f*.] T. *n.* वीस, विसाचा आंकडा -अंक *m*. T.-fold *a.* वीसपट.

Twice (twīs) [A. S. *twā*, two.] *adv. two times* (*of multiplication*) दुणें; as, "T. 3 is 6." २ *on two occasions* दोन वेळ, दोनदां, दोन वेळां, दुबार, द्विवार. ३ *doubly* दुप्पट, द्विगुणित; as, "T. as strong."

Twig (twig) [O. E. *twig.*] *n. a small shoot or branch* डाहळी *f*, डाहळा *m*, शिरकुटी *f*, शिरपुटी *f*, शिपटी *f*, फोक *f*, फोकाटी *f*, उपशाखा *f*, अग्रशाखा *f*. २ (*anat.*) *a small branch of artery* धमनीची शाखा *f*.

Twilight (twī-līt) [M. E. *tur*, *-twa*, two + light.] *n.* संध्या *f*, संधिप्रकाश *m*. २ *the faint light after sunset* संध्याकाळ *f*, संध्याराग *m*, तिनीसांज *f*, तिनीसांजा *f*, गोधूळ *f*, गोरज *n*. [AT OR DURING T. तिनसांजां, तिनीसांजां. HEIGHT OF T. भर तिनीसांज *f*, करकरीत तिनीसांज *f*, कातरवेळ *f*. IMPERFECT T. फुटकी

तिनीसांज *f*.] २ *the faint light before sunrise* धुंदूक *n*.

Twill ( twil ) [ A. S. *twā*, two.] *n*. *a fabric with small raised ribs* ट्विल नांवाचें कापड *n*, ट्विल *n*.

Twin ( twin ) [ A. S. *twā*, two.] *a*. *being one of children born at a birth* जुळा, जुवळा, जावळा, यम (in *comp*.), यमल. २ (*bot*.) *growing in pairs* यमल. T. *n*. *one of two children born at the same birth* जुळें मूल *n*, जुळें *n*. [T.s आवळेजावळे, आवळींजावळीं, आवळ्या-जावळ्या *f*. *pl*.] २ *exact counterpart of a person or thing* हुबेहुब प्रतिमा *f*, हुबेहुब नक्कल *f*, सारखी वस्तु *f*. [ THE TWINS मिथुनराशि *m*.]

Twine ( twīn ) [A. S. *twīn*, twine.] *n*. *string* सुतळी *f*, दोरी *f*, सडा *m*, शणसूत्र *n*. २ *coil*, *twist* वेटोळें *n*; as, "Snaky T.s." (b) वेढा *m*, वेष्टन *n*, पिळा *m*. T. *v*. *t*. *to form* ( *string* ) *by twisting strands together* वळणें. २ *to coil*, *to wind* गुंडाळणें, वेटाळणें; वेढणें. T. *v*. *i*. *to coil round* वेढणें, वेढा -वळसा घालणें, वेष्टणें, वेटाळें घालणें. ( b ) ( of plants ) (सर्पाकृति) वळसे घालीत वाढणें -वाढत जाणें. Twined *pa*. *t*. and *pa*. *p*. Twi'ning *pr*. *p*.

Twinge ( twinj ) [ Imitative.] *v*. *t*. *to affect with sharp darting pain* टोंचणें, शिळकवणें, चमक भरवणें, चमकवणें; as, "Conscience *twinged* him." T. *v*. *i*. ( एकदम ) शिळक येणें -उठणें; as, "The side *twinges*." T. *n*. *sharp darting pain* शिळक *f*, चमक *f*, कचक *f*, करक *f*. २ ( of conscience ) टोंचणी *f*, चटका *m*, चरका *m*, चुरचूर *f*. Twinged *pa*. *t*. & *pa*. *p*. Twing'ing *pr*. *p*.

Twin'ing *a*. वेढणारा, वेष्टणारा. २ (of plant) (आधाराभोंवतीं सर्पाकृति ) वळसे घालीत वाढणारा.

Twinkle ( twin'-kl ) [ A. S. *twynclian*, to twinkle.] *v*. *i*. ( of light, star ) *to sparkle* चमकणें, लिकलिकणें. २ ( of eyelids ) *to move rapidly up and down* लवणें, स्फुरणें, स्फुरण *n*. होणें *g*. *of s*., पलख *m*. मारणें, उघडझांक करणें, निमेषोन्मेष होणें *g*. *of s*., डोळ्यांची उघडझांक होणें, डोळे लिकलिकणें, डोळे मिचकणें, डोळा उघडणें. ३ (of eyes) *to sparkle* (*at*) चमकणें, फुरफुरणें. Twinkled *pa*. *t*. and *pa*. *p*.

Twin'kle *n*. *quick*, *tremulous light* चमक *f*, लिकलिक *f*. २ *twitching of the eyelid* लवणें *n*, स्फुरण *n*, उन्मेष *m*, निमेषोन्मेष *m*, उघडझांक *f*. ३ *sparkle of the eyes* चमक *f*; as, "A humorous T."

Twin'kling *pr*. *p*. T. *n*. *the time of one wink of the eye* पलख *n*, निमेष *m*, निमिष *m*. [IN A T., IN THE T. OF AN EYE क्षणार्धांत.]

Twirl ( twurl ) [ Frequentative of O. E. *thweran*, to turn.] *v*. *t*. *to revolve rapidly* गरगर फिरवणें, गरगरां -गिरगिरां फिरवणें, गरगरवणें; as, "To T. the wheel." T. *v*. *i*. *to whirl* गरगर -गरगरां फिरणें, गरगरणें, घिरटी *f* -घरटी *f*. घालणें, गिरटी *f* -गिरटें *n* -गिरकी *f* -गिरकांडा *m*. देणें -मारणें -घेणें. T. *n*.

*rapid circular movement* गिरकी *f*, गिरकांडा *m*, गिरकांडी *f*, गिरटी *f*, घिरटी *f*, फेरा *m*.

Twist (twist) [O. E. *twist*, twist.] *n. thread made by winding two or more strands about one another* सडा *m*, वेंट *m*, वेंठ *m*. [Triple T. तिसुती.] २ *a roll of bread, tobacco, in the form of twist* वेंट *m*, वेंठ *m*, वेंटी *f*, वेंटणें *n*, वेंटली *f*. ३ *act of twisting* पिळणें *n*, वळणें *n*, मुरगळणें *n*, मुरडणें *n*. ४ *condition of being twisted* पीळ *m*, वळ *m*, पिरगळा *m*, मुरगळा *m*, मुरड *f*, पिळा *m*, पेंच *m*. ५ *cloth twisted and wrung* पिळा *m*. ६ (as of the bowels) (आंतडीं) पिळवटणें *n*, पिळणें *n*, पीळ *m*.

Twist *v. t. to wind (strands) one about another* गुंडाळणें, लपेटणें, वेष्टणें, वेंटाळणें. २ *to form (rope) thus* गुंडाळून तयार करणें, वळणें, (दोरी) काढणें -वळणें. ३ *to give spiral form to* मुरगळणें, मुरगाळणें, मुरडणें, पिळे देणें, पिळवटणें, पिळगुटणें, पिळणें; as, "T. it into a serpentine form." ४ *to wrench out of natural shape* वळवणें, ओढणें, ओढून घेणें, विपरीत करणें; as, "He wants to T. my words into an admission of error."

Twist *v. i. to be united by winding* पिळणें, पिळवटणें. २ *to writhe* मुरगळणें. ३ *to bend* वळणें, वांकणें, वांकण घेणें. ४ *to revolve* गुंडाळणें, लपेटणें.

Twisted *pa. t.* T. *pa. p.* वळलेला, वळींव. २ पिळलेला. ३ मुरगाळलेला. ४ व्यावृत्त.

Twistedness *n.* पीळ *m*, पिरगळा *m*, मुरगळा *m*.

Twis'ting *pr. p.*

Twit (twit) [A. S. *āetwitan*, to reproach.] *v. t.* (a person with fault) *to reproach, to upbraid* दोष देणें, निंदा करणें, नांवें ठेवणें, टोमणा मारणें -देणें, नाकांत काड्या *f. pl.*, घालणें, ओठावणें, टेपलणें.

Twitch (twich) [A. S. *twiccian*, to pluck.] *v. t. to pull (a thing) with light jerk* हिसकणें, हिसडणें, हांसडणें, हिसका देणें. T. *v. i.* (of features) *to move or contract spasmodically* वाताच्या झटक्यानें आंखडणें. T. *n. a sudden pull or jerk* हिसका *m*, हिसडा *m*, असडा *m*, आंचका *m*, कचका *m*. २ *sudden involuntary movement* वाताच्या झटक्यानें आंखडणें *n*. Twitched *pa. t.* and *pa. p.* Twitch'ing *pr. p.*

Twitter (twit'-ėr) [Imitative.] *v. i. to chirp* चिवचिवणें, किलकिलणें, किलबिलणें, चिंवचीव *f* -किलकिल *f* -चूंचूं *n*. करणें -मांडणें. T. *n. the noise of the singing of birds* चिवचीव *f*, कलकल *m*, किलकील *f*, किलबील *f*, चूंचूं *n*, चिवचिवाट *m*, कुलकुलाट *m*, किल्लाट *m*. Twit tered *pa. p.* Twit'tering *pr. p.*

Two (tōō) [A. S. *twā*, two.] *a.* दोन, बे, दु (in comp. as, दुकाठी, दुखंड), द्वि (in comp.; as, द्विपद); -of human beings दोघे (fem. दोघी, neut. दोघें). T. *n.* दोन. २ दोहोंचा आंकडा *m*. ३ जोडी *f*, दुकल *f*. [In T. दोन तुकडे, दुधड, द्विधा. The T. दोन्ही. T. and

A HALF अडीच.] T.-edged *a.* (of sword) दुधारी. २ (*fig.*) (of argument) *ambiguous* द्व्यर्थी. T.-fold *a.* *double* दुप्पट, द्विगुणित. २ दुहेरी. T.-fold *adv.* *doubly* दुपटीनें. T.-handed *a.* दोन हातांचा, द्विहस्त, द्विहस्तक. २ (of sword) दोन हातांनीं वापरण्याचा. ३ (of game) दोघांचा, दोघांनीं खेळण्याचा. ४ (of saw) दोघांचा, दोघांनीं चालवण्याचा. T.-handed *a.* दुदांडी, दोन मुठींचा. T.-headed *a.* दोन मस्तकांचा, द्विमूर्ध, द्विमस्तक. २ दोन वरिष्ठ (अधिकारी) असलेला. T.-line *a.* (printing) (एखाद्या जातीच्या टायपांच्या) दोन ओळींची जागा व्यापणारा, दोन ओळींचा, दुप्पट मोठा; as, "T. line pica." T.-lipped *a.* (*bot.*) पिहितमुख. T.-sided *a.* दोन बाजू असलेला, द्विपार्श्व. T.-tongued *a.* दोन जिभांचा, द्विजिह्व. २ फसवणारा, बेभरंवशाचा, दुतोंड्या. T.-way *a.* (in plumbing, of cock) दोन तोट्यांचा, दोन तोंडांचा, दुहेरी.

Tympan (timpan) [From *tympanum.*] *n.* *stretched sheet of membrane* अंतस्त्वचेचा ताणलेला भाग *m.* २ *frame for equalising pressure in some printing presses* (कागदावर दाब सारखा आणण्याकरितां) पिनवाली फ्रेम *f,* टिंपॅन *n.*

Tympanitis (tim-panī'tēs) [Gr. *tympanon,* a kettledrum.] *n.* *flatulent distention of the belly* पोटांत वात धरणें, पोट फुगणें, आध्मान *n.*

Tympanit'ic *a.* वायुग्रस्त (पोट), आध्मात.

Tympanum (tim'pan-um) [L. -Gr. *tympanon, typanon,* a kettledrum, *typtein,* to strike.] *n.* (*anat.*) कानांतील ज्या भागावर हवेचा आघात होऊन ध्वनि उत्पन्न होतो तो भाग *m,* कर्णदुंदुभि, कर्णभेरी, कर्णान्तःपटल, कर्णमूलफलक. २ (*archite.*) पानाचा मधला भाग *m.* (b) लिंटेल व कमान यांच्या मधील भाग *m.* ३ हातराहाट *m.*

Type (tīp) [Fr. -L. *typus,* type -Gr. *tuptō,* I strike.] *n.* *symbol, illustration* उदाहरण *n,* दाखला *m;* as, "Water may serve as a T. of instability." २ *prophetic similitude* प्रतिरूप *n,* प्रतिरूपक *n,* दर्शक चिन्ह *n;* as, "Paschal lamb is a T. of Christ." ३ *characteristic specimen of a class* नमुना *m,* मासला *m;* as, "An admirable *type* of modern athlete." ४ *a class of things having common characteristics* जात *f,* प्रकार *m,* वर्ग *m;* as, "Her beauty was of another *type.*" ५ (*biol.*) *main division of animal or vegetable kingdom having common characteristics* मुख्य जाति *f,* प्रधान जाति *f,* नमुना *m,* वर्ग *m;* as, "The vertebrate T." ६ (Fine Arts) नमुना *m.* ७ *device on either side of medal or coin* नाण्यावरील खूण *f* -चिन्ह *n.* ८ (printing) टाइप *m,* खिळा *m,* छाप *m,* ठसा *m.* T. *v. t.* नमुनेवजा असणें. २ टाइपरायटरनें लिहिणें. T.-high *a.* (of woodcut) खिळ्याइतका उंच. T.-metal *n.* खिळ्यांची धातु *f.* (यांत शिसें, कथील व अँटिमनी असतात). T.-setter *n.* खिळे

जुळणारा *m*, खिळे जोडणारा *m*, जोडारी *m*, जुळारी *m*. T.-setting *n*. खिळे जुळणें, खिळे जोडणें. T.-write *v. t.* टाइपरायटरनें लिहिणें. T.-writer *n*. टाइपरायटर ( नांवाचें यंत्र ) *n*. २ टाइपरायटरनें लिहिणारा *m*.

Type-founder *n*. टाइप ओतणारा *m*.

Type-foundry *n*. टाइप ओतण्याचा कारखाना *m*.

Typhlitis (tif-lī'tis) [Gr. *typhlos*, blind.] *n*. (*med.*) *inflammation of the cæcum and vermiform appendix* आंतड्यांच्या पुच्छवतीनामक भागाचा दाह *m*, पुच्छवतीदाह. (पुच्छवती = cæcum).

Typhoid ( tī'foid ) [Gr. *typhōdes* -*typhos*, smoke or stupor.] क्षतांत्रसन्निपातज्वराचा. T. *n*. क्षतांत्रसन्निपातज्वर *m*.

Typhoid bacillus *n*. आंत्रज्वरजन्तु *m*.

Typhoid fever *n*. ( Same as Enteric Fever ) क्षतांत्रसन्निपातज्वर *m*, shortened into क्षतांत्रज्वर, still more shortened into आंत्रज्वर. या तापांत अंगावर उगवण येतें व आंतड्यांना क्षतें पडतात.

*N. B.*—Typhoid आणि Typhus हे दोन्ही ताप आपल्या इकडचे नसून पाश्चात्य लोकांच्या दळणवळणानें इकडे म्हणजे हिंदुस्थानांत आले असें कांहीं विद्वानांचें मत आहे.

Typhoon' *n*. ( चीनमध्यें उत्पन्न होणारें ) वादळ, टायफून.

Typhus (tī'fus) [Gr. *typhos*, smoke, hence stupor arising from fever.] *n*. *fever marked by eruption of purple spots, great prostration and usually delirium* ( गलिच्छ जागेंत राहणाऱ्या गरीब लोकांत होणारा ) प्रलापकसन्निपातज्वर *m*. या तापांत आंगावर उगवण येतें, नेहमीं ग्लानि असते, व मनुष्य बडबडूं लागतो. इंग्रजींत याला Jail Fever (कैद्यांना होणारा) कारागृहसन्निपात, व Ship Fever ( दर्यावर्दी लोकांना होणारा ) नाविक ज्वर अशींहि नांवें आहेत.

Typ'ical *a*. *serving as a type* विशिष्ट वर्गाचा, विशिष्ट जातीचा, विशिष्टजातिदर्शक; as, "A T. plant." २ *symbolical, emblematic* सूचक, व्यंजक, लाक्षणिक, संज्ञिक, बोधक, उद्बोधक. ३ *characteristic of a type* नमुनेदार, नमुन्याचा, नमुनेवजा; as, "T. structure."

Typ'ically *adv*. नमुनेदारपणानें.

Typ'icalness *n*. नमुनेदारपणा *m*.

Typ'ified *pa. t.* T. *pa. p.* सूचित, बोधित. २ नमुना झालेला, नमुनेवजा असलेला.

Typ'ify *v. t. to foreshadow* सुचवणें, बोधवणें, दाखवणें. २ नमुना होणें, नमुनेवजा असणें.
Typ'ist *n.* टाइपरायटरनें लिहिणारा *m.*
Typog'rapher *n.* छापण्याची कला जाणणारा *m*, मुद्रणकलापटु *m.* २ मुद्रक *m.*
Typograph'ic, -al *a.* मुद्रणाचा, छापण्याच्या कलेचा. [T. ERROR मुद्रणदोष, छापखान्याची चुकी *f.*]
Typog'raphy *n. art of printing* मुद्रणकला *f*, छापण्याची कला *f*, छापणें *n*, मुद्रण *n.* २ *character or appearance of printed matter* छपाई *f*; as, "The T. was admirable."
Tyrannic, Tyra'nnical *a. acting like or characteristic of a tyrant* जुलमी, जुलूम करणारा, प्रजोपद्रवी, प्रजापीडक. २ *arbitrary, despotic* जुलमाचा, जबरदस्तीचा, जबरदस्त, जालीम, कहरी.
Tyra'nnically *adv.* जुलूम करून, जुलमानें, जबरदस्तीनें.
Tyra'nnicalness *n.* जुलमीपणा *m*, जबरदस्ती *f*, जालीमपणा *m*, कहरीपणा *m.*
Tyra'nnicide *n. killer of a tyrant* जुलमी राजाचा वध करणारा *m.* २ *killing of a tyrant* जुलमी राजाचा खून *m*, जुलमी राजाचा वध *m.*
Tyr'annize *v. t.* and *i. to rule despotically or cruelly (over person, etc.)* जुलूम करणें, जुलुमजास्ती करणें, जुलुमजास्ती मांडणें, जुलमानें राज्य करणें.
Tyr'annized *pa. t.* and *pa. p.* Tyr'annizing *pr. p.*
Tyr'annous *a.* Same as Tyrannical.
Tyr'annously *adv.* Same as Tyrannically.
Tyr'anny *n. despotic or cruel exercise of power* जुलूम *m*, जुलुमजास्ती *f*, जबरी *f*, जबरदस्ती *f*, जोर *m*, जोरा *m*, कहर *f.* २ *rule of a tyrant* जुलमाचें राज्य *n*, जुलुमपादशाही *f.* (b) प्रजापीडन *n*, प्रजोपद्रव *m.*
Tyrant (ty'-rant) [Fr. -L. -Gr. *turannous*, an absolute monarch, tyrant.] *n. an oppressive or cruel ruler* जुलमी राजा *m*, जुलमानें राज्य करणारा *m*, प्रजापीडक *m.* २ *a cruel master* जुलमी धनी *m.*
Tyre *n.* Incorrect for Tire, which see.
Tyro (tī'-rō) [L. *tīro*, a beginner.] *n. a beginner in any art, science or branch of work* नवशिका *m*, नवशिक्या, शिकाऊ, नूतनाभ्यासी. Ty'ros *n. pl.*
Tzar, Same as Czar.

U u) इंग्रजी वर्णमालेंतील एकविसावें अक्षर. हें स्वर आहे. याचीं अनेकवचनें Us, U's अशीं लिहितात. २ U च्या आकाराची वस्तु *f*; as, "U-tube."

उत्पत्ति: इजिप्शन चित्रलिपींत व फिनिशन लिपींत इंग्रजी U या अक्षराचें दर्शक अक्षर नाहीं. ग्रीकभाषेंतील दगडावर खोदण्याच्या किंवा मोठ्या V अक्षराच्या आकारापासून जुन्या हस्तलिखित ग्रंथांतील व सध्यांच्या पत्रव्यवहारांतील U या आकाराच्या अक्षराची उत्पत्ति झाली असें युरोपियन वर्णविदांचें मत आहे. पुढें हळूहळू V हें रूप व्यंजनदर्शक ( चिन्ह ) समजलें जाऊं लागून तज्जन्य U हें रूप स्वरदर्शक ( चिन्ह ) म्हणून समजलें जाऊं लागलें.

उच्चार: इंग्रजी भाषेंतील U या अक्षराचे सहा उच्चार आहेत; जसें, Use, Unite, Rude, Full, Up, Urn. परंतु, साधारण मनुष्याच्या बोलण्यांत U चे पुढें दिलेले चारच उच्चार आढळून येतात. (a) यू ( उच्चार ); जसें, Unit, Useful. ( b ) उ ( उच्चार); जसें, Bull, Pull. ( c ) ऊ ( उच्चार ); जसें, Ruse, Truth. (d) अ ( उच्चार ); जसें, Uncut, Unknown. कधींकधीं U चा उच्चार इ असाहि होतो; जसें, Busy.

Note: In nouns and adjectives where U begins the word and has the sound yū, use the article *a* and not *an*; as, "A unit; A unicorn; A useful product"; but, "An unknown man."

संक्षेप: U. K. = United Kingdom. U. S. = United States ( of America ). U. S. A. = United States of America. ult. = ultimo. Univ. = University.

Ubiquita'rian ( ū-bik'ui-tāri-an ) *n.* ख्रिस्ताचें शरीर सर्व ठिकाणीं आहे असें मानणारा *m*, ख्रिस्तसर्वव्यापित्ववादी *m*. (b) प्रभुभोजनांत ख्रिस्ताचें मांस व रक्त भाकर आणि द्राक्षासव यांत प्रत्यक्ष आहेत असें मानणारा *m*. U. *a.* ख्रिस्ताच्या शरीराच्या सर्वव्यापित्वासंबंधीं.

Ubiquitous ( ū-bik'wi-tus ) *a.* सर्वव्यापी, सर्व ठिकाणीं असणारा, सर्वव्यापक, विश्वव्यापक.

Ubiquity ( ū-bik'wi-ti ) [ Fr. *ubiquite* -L. *ubique*, everywhere.] *n. existence everywhere at the same time, omnipresence* सर्वव्यापिता *f*, विश्वव्यापिता *f*. २ सर्वत्रविद्यमानता *f*.

Udder ( ud'er ) [ A. S. *uder*, udder.] *n. the milk vessel of a female* ( esp. of a lower animal ) ओंटी *f*, कांस *f*. [ SIDE OR HALF OF AN U. पाखें *n*, पाखर. To GET A DISTENDED U. कांस घालणें, कांसेस लागणें.]

Udometer ( ū-dom'ē-tėr ) [ L. *udus*, damp, + *o* + *meter*.] *n. rain-gauge* पर्जन्यमापक *m*, पर्जन्यकुंड *n*, ( an old word for Udometer ).

Ugli'ness *n.* कुरूपता *f*, विरूपता *f*, बदसुरत *f*, विद्रूपपणा *m*, विद्रेपणा *m*, वैरूप्य *n*.

Ugly ( ug'li ) [ Icelandic.] *a. deformed, hateful, offensive to the eye* विद्रूप, विरूप, विद्रा, कुरूप, बदसुरत. [EXCESSIVELY UGLY OR DEFORMED अष्टवक्र, pop. अष्टावक्र.]

Ukase (ū-kās') [Russ. *ukazu*, ordinance, or edict.] *n. edict of Russian Government* रशियन सरकारचें आज्ञापत्र *n.*

Ulcer ( ul'sėr ) [Fr. *ulcere* -L. *ulcus*; Gr. *helkos*, a sore, wound.] *n. a dangerous sore or wound discharging pus* व्रण *m*, क्षत *n*, सपूयक्षत *n.* [CALLOUS U. खरव्रण. CHRONIC U. विलंबीव्रण, जीर्णव्रण. ECZEMATOUS U. पामाव्रण. EXUBERANT U. समृद्धव्रण. FUNGOUS U. अंकुरितव्रण. GOUTY U. वातरक्तज व्रण. HEALING U. विरोपमाणव्रण, भरणारा व्रण. IDIOPATHIC U. रक्तादि दोषांमुळें शरीरांत जे आपोआप व्रण उत्पन्न होतात ते, स्वाभाविकव्रण, निजव्रण. INFLAMED U. दाहीव्रण. INFLAMMATORY U. शोथोत्पादक व्रण, शोथपूर्वक व्रण. IRRITABLE U. क्षुब्धव्रण, क्षोभितव्रण. PAINFUL U. सरुजव्रण. PERFORATING U. (पायाच्या तळव्यांत सुरू होणारा ) वेधकव्रण, आरपार भोंक पाडणारा व्रण. PHAGEDENIC U. प्रसर्पी व्रण, चरणारा व्रण, पसरणारा व्रण. RODENT U. ध्वंसकव्रण. SCORBUTIC U. रक्तपैत्तिक व्रण. SIMPLE U. शुद्धव्रण, सामान्यव्रण. SLOUGHING U. कोथोत्पादक व्रण. SYPHILITIC U. फिरंगोपदंशजव्रण, गरमीपासून झालेला व्रण. TUBERCULOUS U. क्षयज व्रण. VARICOSE U. शिराज व्रण. हा पायांच्या निःशक्त झालेल्या शिरांच्या संबंधानें उत्पन्न होतो. शिरावृद्धिज व्रण. VIRULENT U. जाळपुळी *f*, पूतिव्रण. WEAK U. निःशक्तव्रण. WIDE SPREADING U. चाळणपुळी.] २ (*fig.*) *moral blemish* कालिमा *m*, कलंक *m*, डाग *m*.

Ul'cerable *a.* व्रण होणारा, व्रण पडणारा.

Ul'cerate *v. i. to become ulcerous* व्रण -क्षत -जखम *f.* होणें -पडणें. U. *v. t. to affect with an ulcer* व्रण होऊन त्रास देणें.

Ulcera'tion *n.* व्रण होणें *n.* २ *an ulcer* व्रण *m*, जखम *f*, क्षत *n.*

Ulcered *a.* व्रण झालेला, क्षत पडलेला.

U'lcerous *a.* क्षत झालेला. २ क्षतासारखा. [U. HOLE भगेंद्र *n.*]

Uliginose (ū-lij'i-nōs) [L. *uliginosus* -*uligo*-*uliginis*, moisture -*uvere*, to be wet.] *a. growing in muddy places* चिखलांत उगवणारा.

Ulna ( ul'na ) [L. *ulna*, Gr. *ōlenē*, the arm.] *n. the larger of the two bones of the forearm* मनगटाच्या दोन हाडांपैकीं मोठें हाड *n*, अंतःप्रकोष्ठास्थि *n*, अरत्नि *f.* [L. Ulna and Sk. अरत्नि seem philologically to be the same.]

Ul'nar *a.* अंतःप्रकोष्ठाचा, अंतःप्रकोष्ठीय. २ अंतःप्रकोष्ठाभिमुख.

Ulotrichan ( ūlo'tri-kan ) [ Gr. *oulos*, woolly.] *n. the woolly-haired division of mankind* केंसाळ माणसें *n. pl.* U. *a.* लोंकरीसारख्या केसांचा.

Ulterior ( ul-tē'ri-or ) [L. *ultirior*, that is beyond.] *a. on the further side, further* पलीकडील, पलीकडचा. २ अंतःस्थ, आंतला, गुप्त.

Ultimate ( ul'ti-māt ) [L. *ultimus*, the last, super-

lative of *ulter.*] *a. furthest, last* शेवटचा, शेवटला. २ (physics) अंतिम, चरम. ३ दूरचा, विप्रकृष्ट, अत्यंत दूरचा.

Ul'timately *adv.* शेवटीं, सरतेशेवटीं, अंतीं, परिणामीं, अखेर, अखेरीस.

Ultimatum ( ul-ti-mā'tum ) [ L. *ultimus*, last.] *n. the final proposal of terms to the opposite party, rejection of which leads to rupture or declaration of war* निदानचा खलिता *m*, निदानींचा -निर्वाणींचा शब्द *m*, सरशेवटचा खलिता *m*, निर्वाणींचा निरोप *m*.

Ultimo ( ul'ti-mo ) [L. *ultimus, last.*] *adv. in the last month* गेल्या महिन्यांतील, गतमासांतील.

Ultimogeniture ( ultimō-je-n'i-tur ) [ L. *ultima*, last. of. E. Primogeniture.] *n.* फक्त कनिष्ठ मुलासच बापाची मालमत्ता मिळावी हा कायदा *m*, कनिष्ठपणाचा कायदा *m*.

Ultra ( ul'traw ) [L. *ultra*, beyond.] *prefix* ( of place) पलीकडचा; as, "Ultra-marine." २ अतिशय, कट्टा, जहाल, जास्त, मनस्वी; as,"Ultra-conservative, Ultra -liberal."

Ultra *a.* शेवटचा, निर्वाणींचा, कडक, जहाल, कट्टा; as, "U. measures; U. reformer."

Ultra *n.* शेवटचे उपाय सुचविणारा *m*.

Ultra-marine ( ultraw-mar-ēn ) *a. situated beyond the seas* समुद्रापलीकडचा. U. *n.* अल्ट्रामरीन नांवाचा निळा रंग *m*.

Ultramontane ( ul-tra-mon'tān ) [L. *ultra*, beyond and *montanus, -mons*, a mountain.] *a. being beyond the mountain* डोंगरापलीकडचा. २ (*fig.*) *holding extreme views as to the Pope's rights and supremacy* पोपच्या सत्तेचा फाजील कैवारी.

Ultra-mundane ( ultraw-mun-dān ) [L. *ultra*, beyond, and Mundane.] *a. being beyond the world* पारलौकिक, परलोकाचा. २ *beyond the world or solar system* भूमंडळाच्या पलीकडचा, सूर्यमंडळाच्या पलीकडचा.

Ultra-vires ( ultraw-vīr'es ) [ L. *ultra*, beyond, and *virus*, poison.] *adv.* ( कोडताच्या, संस्थेच्या, किंवा व्यक्तीच्या ) अधिकाराबाहेर.

Ultrazodiacal (ultra-zō-di a'kl) [L. *ultra*, beyond and Zodiacal.] *a. beyond the zodiac* राशिचक्राच्या बाहेरचा.

Ululation (u-lū-la'shun) [L. *ululare*, to howl.] *n. howling, outcry* टाहो फोडणें *n*, धाय मोकलणें *n*.

Ul'ulate *v. i.* टाहो फोडणें, धाय मोकलणें.

Umbel ( um'bel ) [L. *umbella*, dim. of *umbra*, shade.] *n.* (*bot.*) *a form of flower in which a number of stalks, each bearing a flower, radiate from one centre* छत्राकृति मंजरी *f*, चमर *n*, छत्री *f*; as, शेपू, कोथिंबीर, गाजर.

Umbellif'erous *a.* छत्राकृति फुलें येणारें (झाड), छत्रधारी.

Umber (um'bėr) [L. *umbra*, shade, kind of fish.] *n. a brown pigment* अंबरजातीचा तांबडसर रंग *m*.

Umbilic, Umbilical (um-bil'ik,-al) [L. *umbilicus*, the navel.] *a.* नाभीचा, नाभिसंबंधीं, नाभ्य, नाभिगत. [U. CORD नाळ *n*, गर्भनाडी *f*, नाभिनाडी *f*. U. CORD AS SWOLLEN वेंड *n*, वोंगा *m*. U. HERNIA नाभिवृद्धि *f*. U. REGION नाभिचक्र *n*, नाभिमंडल *n*. UMBILICAL CONTEMPLATION नाभीकडे दृष्टि लावून वसण्याची ध्यानमुद्रा *f*, पलस्ताभूचरी *f*?]

Umbil'icate *a.* नाभीच्या आकाराचा, नाभ्याकृति.

Umbil'icular *a.* नाभीचा, नाभिविषयक, नाभ्यभिमुख.

Umbil'icus *n.* नाभि *f*, वेंबी *f*, नाभिकमल *n*.

Um'biliform *a.* नाभ्याकृति ( शंख ), नाभ्याकार.

Umbo (u'mbō) [L. *umbo*, Gr. *ambon*, boss, pulpit.] *n.boss of shield esp. in centre* ढालीचा मधला उचललेला भाग *m*.

Umbra (um'bra) [L. *umbra*, a shade.] *n.* (*astron.*) *that part of the shadow of earth or moon within which sun is entirely hidden* घनच्छाया *f*, प्रच्छाया *f*.

Umbrage (um'brāj) [M. F. *umbrage* -Fr. *ombrage* -L. *umbra*, a shadow.] *n. offence* रुसवा *m*, गैरमर्जी *f*, असंतोष *m*. [To TAKE U. AT रुसणें, रागावणें, वाईट मानणें, वाईट वाटून घेणें.] २ (*poet.*) *shade* छाया *f*.

Umbrageous (um-brāj'us) [L. *umbraticus* -*umbra*, shadow.] *a. shady, forming shade* सांवली पाडणारा, सांवली करणारा; as, "U. trees or foliage." २ छायेचा, छायामय; as, "U. caves."

Umbrella (um-brel'a) [Lit. 'a little shade,' It. *ombrella*, L. *umbrella*, an umbrella.] *n.* छत्री *f*, आतपत्र *n*. [STICK OF AN UMBRELLA दांडी *f*. THE UMBRELLA OF ROYALTY OR STATE छत्र *n*. U. BORNE OVER RAJAS &c. IN THEIR PROCESSIONS अवदागीर *n*, अवदागिरी *f*. BEARER OF IT अवदागिऱ्या *m*.]

Umph, *interj.* अं:, छे:.

Umpire (um'pīr) [M. E. *impier* -*impair*, unlike -L. *impar*, uneven.] *n. a third person called in to decide a dispute, arbitrator* तिऱ्हाईत *m*, पंच *m*, त्रयस्थ *m*, मध्यस्थ *m*.

Um'pireship *n.* पंचपणा *m*, तिऱ्हाईतपणा *m*, मध्यस्थी *f*.

Un ( un ) *prefix* इंग्रजी नकारार्थी उपसर्ग. कधींकधीं क्रियापदाचा किंवा ed, ing, able या प्रत्ययांनीं अन्त होणाऱ्या विशेषणांचा नकारार्थ दाखविण्याकरितां Un हा उपसर्ग योजितात. कधींकधीं नामालाहि Un हा उपसर्ग लावितात; as, "To Unman." Un या इंग्रजी उपसर्गाचें मराठी भाषांतर करतांना बरेच वेळां पुढील मराठी उपसर्ग योजितात: (a) अ आणि अन्; जसें, अशक्त, असमर्थ, अनुपयुक्त. (b) उ; जसें, उसकणें, उचकटणें, उस्तरणें. (c) गैर; जसें, गैरवाकबगार, गैरचालीचा, गैरशिस्त. (d) बे; जसें, बेइलाज, बेइमान. (e) ना; जसें, नालायक, नाखुष. (f) निर्; जसें, निर्वात. (g) वि; जसें, विजोड, विलग.

Una'ble *a.* असमर्थ, अक्षम.

Unaccept'able *a.* नापसंत, अग्राह्य, नापसंतीचा, नामंजूर, अमान्य, अग्रहणीय, अस्वीकार्य.

Unaccepted *a.* नापसंत, नामंजूर, अस्वीकृत, अनंगीकृत.

Unaccom'modated *a.* जागा न दिलेला, सोय न केलेला.

Unaccomm'odating *a.* मिळतें न घेणारा, सोय न करणारा, उपयोगीं न पडणारा. २ मिळतें न घेण्याचा (स्वभाव), तक्रारी.

Unaccom'panied *a.* बरोबर कोणी नसलेला, सोबतीवांचूनचा, एकाकी, असहाय.

Unaccom'plished *a.* अपुरा, कच्चा, शेवटास न गेलेला, (पुरा) न मिळविलेला, (पुरा) न संपादन केलेला. २ *deficient in accomplishments* (पुरें) कौशल्य नसलेला, कलाकौशल्य येत नसलेला.

Unaccount'able *a.* हिशेब देतां न येण्यासारखा, कारण सांगतां न येण्यासारखा. २ *mysterious* गूढ, गहन. ३ तर्क बांधतां न येण्यासारखा, विलक्षण. ४ *not responsible* बिनजबाबदारीचा, जबाब -झाडा -हिशेब -कारण देण्यास न बांधलेला.

Unaccus'tomed *a.* बिनसरावाचा, बिनसंवईचा, बिनराबत्याचा, अनभ्यस्त.

Unacknowl'edged *a.* मान्य न केलेला, अनंगीकृत, अस्वीकृत. २ *not noticed* पोंच न दिलेला.

Unacquaint'ed *pa. p. a.* अपरिचित, गैरसाहित, गैरमाहितगार, गैरवाकबगार, अनभिज्ञ.

Unacquired' *pa. p. a.* असंपादित, अप्राप्त, अलब्ध.

Unadapted *pa. p. a.* जुळता न केलेला, मिळता न केलेला, अयोग्य, अनुपयोगी.

Unadora'ble *a.* अपूज्य, अपूजनीय.

Unadorned' *a.* अलंकार नसलेला, अनलंकृत, अभूषित.

Unadul'terated *a.* निर्भेळ, बिनमिसळीचा, भेसळ न केलेला, भेळ न केलेला, अमिश्रित, निरा, कोरें (दूध).

Unadvised' *a.* अविचाराचा, साहसाचा, अविवेकाचा, उतावळेपणाचा; as, "U. measures." २ *not prudent* अविचारी, धसक्या, उतावळा; as, "U. person."

Unaffect'ed *a. not affected* जसाच्या तसा, अविकृत, निर्विकार. २ *not moved* गहिंवर न आलेला, द्रव न आलेला, द्रव न सुटलेला, कठिण; as, "U. heart." ३ *unfeigned* खरा, मनापासूनचा, अकृत्रिम, as, "U. sorrow."

Unaffectionate *a.* ममता नसणारा, प्रेम नसणारा, [प्रेमशून्य.

Unagitated *pa. p. a.* न खवळलेला, अक्षुब्ध, शांत.

Una'ided *pa. p. a.* मदत नसलेला, बिनमदतीचा, बिनकुमकेचा, एकटा, असहाय.

Unal'ienable *a.* दुसऱ्यास बेचन करतां न येणारा. फरोक्त करून देतां न येणारा, अन्यादेय.

Unallowable *a.* निषेध्य, मनाई करण्यासारखा, अकार्य.

Unallowed *a.* निषिद्ध, मनाई केलेला, अविहित.

Unalloyed' *a.* निर्भेळ, मिसळ किंवा भेसळ नसलेला, चोख (gold), खरा, शुद्ध.

Unal'terable *a.* बदलतां न येणारा, फेरफार करतां न येणारा, फिरवतां न येणारा. २ (*philo.*) अपरिवर्तनशील.

Unambig'uous *a.* स्पष्ट, असंदिग्ध, असंशयित, अद्व्यर्थ.

Unanimity (ū-na-nim'i-ti) [L. *unus*, one, and

*anima*, (Sk. अन्, to breathe) the soul.] *n.* ऐकमत्य *n*, एकमत *n*, ऐक्य *n*, एकी *f*, चित्तैक्य *n*, मतैक्य *n*, एकचित्तता *f*, संप (Guj.), एकदिल *m*.

Unan'imous *a.* एकचित्त, एकदिल, एकमत, समभाव. २ *formed by unanimity* एकदिलाचा, सर्वानुमत, सर्वसंमत.

Unan'imously *adv.* सर्वानुमतें, एकमतानें, एकदिलानें.

Unannealed *pa. p. a.* निताव, न तापवलेला.

Unan'swerable *a.* निरुत्तर, अखंडनीय, खंडन करतां न येणारा, खोडून टाकतां न येणारा.

Unanx'ious *a.* काळजी नसलेला, चिंता नसलेला, निर्घोर, बिनघोर, वीतचिन्त, निश्चिंत, बेफिकीर.

Unappar'ent *a.* न दिसणारा, अदृश्य, अनुत्कट, अस्पष्ट, अव्यक्त, अप्रकट.

Unappe'asable *a.* सांत्वन करतां न येणारा, समजावतां न येणारा, शांत करतां न येणारा, असांत्वनीय.

Unappeased' *pa. p. a.* सांत्वन न केलेला, सांत्वन न झालेला, अशांत.

Unapprehens'ive *a.* शंका न येणारा, निःशंक, शंकाहीन, शंकारहित. Unapprehen'siveness *n.* निःशंकपणा *m*, शंकाराहित्य *n*.

Unapprised' *a.* पूर्वी सूचना न दिलेला, असूचित.

Unapproach'able *a.* जवळ जातां न येणारा, जवळ पोंचतां न येणारा, दुर्गम. २ अगम्य, अप्राप्य.

Unapproved' *a.* पसंत नसलेला, नापसंत, अमान्य.

Unapt' *a.* लागू न पडणारा, अनुचित, अप्रस्तुत, अयोग्य, भलताच; as, "U. illustration."

Unarmed' *a.* निःशस्त्र, शस्त्रहीन, शस्त्ररहित, बिनहत्यार.

Unartific'ial *a.* अकृत्रिम, साधा, सहज, स्वाभाविक.

Unascertain'able *a.* निर्णय करतां न येणारा, अनिर्णय. २ खात्री न होण्यासारखा.

Unascertained' *a.* खात्री करून न घेतलेला. २ निर्णय न केलेला, निर्णय न झालेला, अनिर्णीत. [अप्रार्थित.

Unasked' *a.* न विचारलेला. २ न मागितलेला, अयाचित,

Unas'pirated *a. pronounced or written without an aspirate* महाप्राणोच्चार (ह्) नसलेला, अल्पप्राणोच्चारयुक्त, अल्पप्राण. [अनुत्साही.

Unaspir'ing *a. unambitious* महत्त्वाकांक्षा नसलेला,

Unass'ailable *a.* हल्ला चढवतां न येण्यासारखा, अनाक्रमणीय. २ (argument) खंडन करतां न येणारा, खोडून टाकण्यास अशक्य, अखंडनीय.

Unassayed' *pa. p. a.* (कस पाहण्याकरितां) ताव न दिलेला, निताव, कस न पाहिलेला, कसास न लावलेला.

Unas'sisted *pa. p. a.* बिनमदतीचा, बिनकुमकेचा.

Unassociated *pa. p. a.* दुसऱ्याच्या साहचर्यांत नसणारा, असहचरित. २ संबंध नसलेला.

Unassum'ing *a.* साधा, निगर्वी, बिनआढ्यतेचा, बिनदिमाखाचा, तोरा न मिरविणारा, निरभिमानी.

Unassured *a.* आश्वासन न दिलेला -मिळालेला, अनाश्वासित. २ *not insured against loss* विमा न उतरलेला; as, "U. goods."

Unattached' *pa. p. a.* न जोडलेला. २ अनासक्त, (वर) आसक्ति किंवा प्रेम नसलेला. ३ जप्त न केलेला (property). ४ (a) पलटण नेमून न दिलेला. (b) अर्ध्या पगारावरचा.

Unattain'able *a.* मिळण्यास कठिण, असाध्य, अप्राप्य, [अलभ्य.

Unattained' *pa. p. a.* प्राप्त न झालेला, न मिळालेला, अप्राप्त, अलब्ध.

Unattend'ed *a.* सडा, सख्या स्वारीनिशीं, गडीमाणूस घेतल्याशिवाय, एकटा. [विनसाक्षीचा.

Unattest'ed *pa. p. a.* साक्ष न घातलेला, विनसाक्षी,

Unauspi'cious *a.* अमंगल, अशुभ. [माण.

Unauthe'ntic *a.* अविश्वसनीय, प्रमाणावांचूनचा, अप्र-

Unau'thorised *pa. p. a.* (सहीशिक्यानिशीं) मंजूर न केलेला, अधिकाराचा शिक्का न मारलेला, बिनशिक्याचा. २ परवानगी न दिलेला, अधिकार न दिलेला बिनहुकमाचा. ३ विधिहीन, अविधि.

Unautho'ritative *a.* अनधिकाराचा, अधिकारशून्य.

Unautho'ritativeness *n.* अधिकारशून्यता, अप्रमाणता *f.*

Unavail'ing *a.* निरर्थक, निष्फळ, निरुपयोगी.

Unavoid'able *a.* टाळतां न येणारा, चुकवतां न येणारा, अनिवार्य, निवारणाशक्य; as, "U. troubles." २ *necessary* आवश्यक, अवश्य होणारा.

Unaware *a.* माहिती नसलेला, ठाऊक नसलेला. २ लक्ष नसलेला, गैरसावध.

Unaware', Unawares' *adv.* एकाएकीं, अकस्मात्, अचानक. (b) पूर्वयोजना नसतां, पूर्व तयारी नसतां, एकदम, अवचित. [AT UNAWARES अकस्मात्.]

Unbacked *pa. p. a.* पाठिंबा नसलेला, आधार नसलेला. २ (a horse) पैज न लावलेला. ३ (a horse) खोगीर न चढवलेला, स्वारीस तयार न झालेला, न शिकवलेला.

Unbag' *v. t.* पिशवींतून बाहेर काढणें, -ओतणें.

Unba'ilable *a. incapable of being bailed* जामिनावर सोडतां न येणारा (गुन्हा).

Unbal'anced *pa. p. a.* समतोलपणा नसलेला, तोल न राखलेला, समभाव न राखलेला, वैषम्यापन्न.

Unbar' *v. t.* गज काढणें, बोलट काढणें. २ (मार्गांतील) अडथळा काढणें, प्रतिबंध काढणें. Unbarred *pa. t.* and *pa. p.* Unbar'ring *pr. p.*

Unbat'ed *a. undiminished* कमी न केलेला, कमी न झालेला, अन्यूनीकृत.

Unbear'able *a.* असह्य, सहन करतां न येण्यासारखा, सहन करण्यास अशक्य, असहनीय.

Unbe'aten *a.* (*path, &c.*) बिनमळलेला, बिनमळणीचा, अक्षुण्ण. २ *not surpassed* (-वर) ताण न केलेला, हार न खालेला, पहिल्या प्रतीचा; as, "U. record."

Unbeaut'iful *a. ugly* कुरूप.

Unbecom'ing *a.* अयोग्य, न शोभणारा, अनुचित, गैरशिस्त; as, "U. speeches." २ *not suited to the wearer* न शोभणारा, बेताचा नसलेला; as, "U. hat."

Unbegot'ten *a.* गर्भसंभवाशिवायचा, अयोनिसंभव, स्वयंभू. २ अनादि, शाश्वत, सनातन.

Unbelief' *n. incredulity, disbelief, esp. in divine revelation or in a particular religion* अश्रद्धा *f*, अविश्वास *m.*

Unbeliev'able *a.* अविश्वसनीय, विश्वास ठेवतां न येण्यासारखा, विश्वास न वसण्यासारखा.

Unbeliev'er *n.* विश्वास नसणारा *m*, अविश्वासी *m*, अभाविक *m*, अश्रद्धालु *m*.

Unbeliev'ing *a.* विश्वास नसणारा, श्रद्धा नसणारा, अविश्वासी, अश्रद्धालु.

Unbend' *v. t. to change from bent position* ( a bow, &c. ) सरळ -ताठ करणें, उतरणें, दोरी सोडणें *g. of o.* २ *to relax* ताण कमी करणें, ढिलें सोडणें, विसांवा देणें; as, "To U. the mind from study."

Unbend'ing *a. unyielding, resolute* न नमणारा; ताठ, आग्रही, निश्चयी, न वांकणारा.

Unbenefici'al *a.* तोट्याचा, नुकसानाचा, गैरफायद्याचा.

Unbeseem' *v. t. to be unworthy* (-ला) न शोभणें, (ला) उचित नसणें.

Unbi'ased *a. impartial* पूर्वग्रह नसलेला, निष्पक्षपाती, निष्पक्षपाताचा, समतोल, उभयपक्षीं समान.

Unbib'lical *a. not in or authorised by the Bible* बायबलांत न सांपडणारा, बायबलाचें प्रमाण नसणारा, बायबलाचा आधार नसणारा -नसलेला. २ बायबलाविरुद्ध.

Unbid', Unbid'den *a.* न बोलावलेला, अनाहूत. २ (करावयास) न सांगितलेला, हुकूम न दिलेला. (b) स्वयंस्फूर्त, स्वयंस्फूर्तीचा.

Unbind' *v. t.* सोडणें, मोकळा करणें, बंद *m* -बंधन *n.* सोडणें; as, "To *unbind* prisoner's arms." (b) गांठ सोडणें; as, "To U. a load." Unbound *pa. t., pa. p.*

Unbla'mable *a.* अदूषणीय, निर्दोष, निष्पाप.

Unbleached *a.* बिनओपवलेला, बिनओपवणीचा.

Unblem'ished *a.* डाग न लागलेला, निष्कलंक, निर्दोष.

Unblessed, Unblest' *a.* आशीर्वाद न दिलेला, आशीर्वादविहीन. (b) हतभाग्य, कपाळकरंटा, फुटक्या नशिबाचा.

Unblood'ed *a.* (of horse) *not thoroughbred* चांगली अवलाद नसलेला, कमजात, कमअवलाद.

Unblown' *a.* न उमललेला, अस्फुट, अविकसित, अप्रफुल्ल.

Unblush'ing *a.* निलाजरा, निर्लज्ज, कोडगा.

Unboiled *a.* बिनशिजवलेला. २ (of milk, oil, butter, &c.) बिनतापवलेला, न कढवलेला, बिनकढाचा.

Unbone' *v. t.* Same as to Bone. (मांस शिजतांना) हाडें बाहेर काढणें.

Unbon'net *v. t.* and *v. i.* (सलाम करतांना) टोपी काढणें. Unbon'neted *a.* टोपी काढलेला -नसलेला.

Unbored *a.* ( ear, pearl, &c.) बिनटोंचलेला, अविद्ध, अच्छिद्रित. (b) वेज न पाडलेला.

Unborn' *a.* जन्मास न आलेला, न जन्मलेला, अजात. २ नसणारा, अस्तित्वांत नसलेला. ३ पुढला, पुढील; as, "Generations yet *unborn.*"

Unbos'om *v. t.* ( दुसऱ्याला विश्वासानें ) आपलें हृद्गत सांगणें, मन मोकळें करून सांगणें.

Unbound' *a.* न बांधलेला, सुटा, मोकळा. २ कव्हर न चढवलेला; as, "U. book."
Unbound'ed *a.* अमर्याद, अपरंपार, फार, अप्रतिहत.
Unbrace' *v. t.* विजारीचे खांदेबंद सोडणें.
Unbri'dled *a.* लगाम काढलेला, बिनलगामी, बेलगामी. २ उच्छृंखल, अनावर; as, "U. passions."
Un-British *a.* ब्रिटिश मनुष्याला न शोभणारा. २ ब्रिटिश शीलाला न शोभणारा, ब्रिटिश शीलाविरुद्ध.
Unbroken *a.* न तुटलेला, बिनतुटलेला, अभंग. २ (a horse) न शिकवलेला. ३ *uninterrupted* मध्यें खळ नसलेला, अखंडित, अविरत; as, "U. slumbers, peace, &c." ४ *not surpassed* सारखा, (-वर) ताण न झालेला; as, "U. record."
Unbroth'erly *a.* भावाला न शोभणारा. २ भ्रातृप्रेम नसलेला.
Unbruised *a.* न खरचटलेला, न लागलेला, न ठेंचलेला, [न चेंचलेला.
Unburd'en *v. t.* *to free from a burden* ओझें उतरणें, ओझें खाली -कमी करणें. २ *to ease (the mind) by telling one's trouble or anxiety* मनावरचें ओझें हलकें करणें.
Unburnt' *a.* (a brick, &c.) बिनभाजलेला, कच्चा, [अभर्जित.
Unbut'ton *v. t.* बटनें काढणें.
Uncage' *v. t.* पिंजऱ्यांतून बाहेर काढणें -सोडणें.
Uncaged *pa. p.* पिंजऱ्यांतून सोडलेला.
Uncalled' *pa. p.* न बोलावलेला, अनाहूत, अनिमंत्रित. २ (with *for*) कारणावांचूनचा, चोंबडेपणाचा.
Uncan'did *a.* (मनाचा) कपटी, अप्रांजल.
Uncan'ny *a.* *weird, mysterious* भेसुर, उग्र, भयंकर.
Uncanonic, Uncanc'nical *a.* अशास्त्र.
Uncared -for *a.* *disregarded, neglected* (-कडे) लक्ष न दिलेला, हेळसांड केलेला, हेळसांड झालेला.
Uncart' *v. t.* खटाऱ्यांतून माल खालीं उतरणें.
Uncaused' *a.* अकर्तृक, अकारण, स्वयंभू.
Unce'asing न खळणारा, सारखा, अव्याहत, निरंतर, अखंड, सतत, अक्षय. Unce'asingly *adv.* निरंतर, नित्य; सारखा, एकसारखा, खंड न पडतां, खळ न पडतां.
Unceremo'nious *a.* बेमुरवतीचा, बिनभिडेचा, शिष्टाचाराकडे लक्ष न पुरविणारा, शिष्टाचार न पाळणारा. २ *wanting in courtesy* शिष्टाचारविहीन, असभ्य. ३ (colloq.) घरच्यासारखा वागणारा, सलगीचा.
Uncertain (un-ser'tān) *a.* *not certainly known* अनिश्चित, बिनखात्रीचा, बिनभरंवशाचा, अनिश्चयात्मक, संशयित. २ *not confident* खात्री नसलेला, निश्चय नसलेला. ३ *changeable* अस्थिर, बदलणारा; as, "U. temper, weather, &c."
Uncer'tainty, Uncer'tainness *n.* अनिश्चितपणा *m*, संशयितपणा *m*, वानवा *m*, अन्न *n*, संशय *m*, संदेह *m*, संदिग्धता *f*. २ अस्थिरता *f*.
Unchan'geable *a.* न बदलणारा, न बदलण्यासारखा, फेरफार न होणारा, अविकारी, अविकार्य, अव्यय.
Unchanged' *a.* न बदललेला, अविकृत. २ (a coin) बंदा.

Unchan'ging *a.* न बदलणारा, अविकारी.
Unchar'itable *a.* अनुदार. २ दोषदर्शी, छिद्रान्वेषी, दोषदृष्टि. ३ प्रेमशून्य, कृपाशून्य, कठोर, निर्दय.
Unchar'itableness *n.* अनुदारता *f.* २ दोषदृष्टि *f.* ३ निर्दयपणा *m*, कठोरपणा *m*.
Unchaste *a.* व्यभिचारी, शिनळ, जार, जारकर्मी, वाडगा, भ्रष्ट. २ धेडगुजरी, भ्रष्ट, अशुद्ध, संकीर्ण ( language ).
Unchecked' *pa. p. a.* न आवरलेला, अनर्गल, कह्यांत न ठेवलेला, काबूंत न ठेवलेला, दाब्यांत न ठेवलेला.
Unchris'tian *a.* अख्रिस्ती, ख्रिस्ती नसलेला. २ ख्रिस्ती धर्माविरुद्ध,ख्रिस्त्याला न शोभणारा. (b) क्रूरपणाचा, क्रूर.
Unchurch' *v. t.* धार्मिक बहिष्कार घालणें.
Uncial ( un'shal ) [ Lit. 'an inch long.' L. -*uncia*, a twelfth part, an inch.] *a.* (प्राचीन हस्तलिखित ग्रंथांतील) मोठ्या वाटोळया अन्शल अक्षरांच्या लिपीचा, अन्शल लिपीचा.
Un'ciform ( un'si-form ) [ L. *uncus*, a. hook.] *a.* (*bot.*) बडिशाकृति, आंकड्याच्या आकाराचा, फणधर. २ (*anat.*) फणधर.
Uncir'cumcised *a.* सुंता न केलेला, बिनसुंती. २ (*fig.*) *heathen*, *unregenerate* यहुदीतर, ( सुन्ता इत्यादि विधींनीं ) संस्कृत न झालेला, अपुनर्जात.
Uncir'cumspect *a.* बेसावध, गैरसावध.
Uncircumstan'tial *a.* बारीकसारीक गोष्टी न देणारा, बिनतपशिलाचा. २ प्रत्यक्ष ( पुरावा ).
Unciv'il *a.* ( *orig.* ) रानटी. २ *rude* असभ्य, बेमुरवत, उर्मट, अमर्यादशील. [हीन, असंस्कृत.
Unci'vilized *a. barbarous* रानटी, जंगली, विद्याचार-
Unclaimed *a.* बेवारशी, निवारशीक, बिनवारशी. [ U. LETTER बेवारशी पत्र.]
Unclasp' *v. t.* हूक काढणें. २ ( हातांची ) मिठी सोडवणें.
Uncle ( un'kl ) [O. Fr. ( Fr. *oncle* ) -L. *avunculus*, extension of *avus*, a grandfather.] *n. father's brother* चुलता *m*, काका *m*, पितृव्य *m*. [ WIFE OF A PATERNAL U. चुलती *f*, काकू *f*, काकी *f*.] ( b ) *mother's brother* मामा *m*, मावळा *m*, मातुल *m*. [ WIFE OF MATERNAL U. मामी *f*.] (c) *husband of maternal aunt* मावसा *m*. २ *any elderly man* म्हातारा *m*, आजोबा *m*, काका *m*. [ UNCLE SAM अमेरिका ( देशाचें टोपणनांव ). २ अमेरिकन लोक.]
Unclean' *a. dirty* मळलेला, मळका, मळीण, अस्वच्छ. २ ( Bible ) *ceremonially impure* अशुद्ध, अपवित्र, अशुचि, विटाळाचा, नापाक; as, "U. animals." ३ *morally impure* मलिन, अपवित्र, निंद्य, दूषणीय; as, "U. affections."
Unclean'ly *a.* घाणेरडा, मळका, मळीण.
Uncleansed *a.* साफ न केलेला, न धुतलेला ( दांत ).
Unclinch' *v. t.* ( मूठ वगैरे ) उघडणें.
Uncloak' *v. t.* ( वरचा ) डगला काढणें -काढून ठेवणें. U. *v. i.* ( वरचा ) डगला काढणें -उतरणें.
Unclog' *v. t.* (मार्गांतील) अडचणी काढून टाकणें, (मार्ग) साफ करणें, खुला करणें.

Unclose' *v. t.* उघडणें. Unclosed' *pa. p.* उघडलेला.
Unclothed' *a.* उघडा, विवस्त्र, नग्न (केलेला).
Unclouded' *a.* निरभ्र, स्वच्छ. २ दुःखाची छाया न पडलेला, शोकाची छाया न पडलेला. [सोडणें.
Uncock' *v. t.* (वार न होईल अशा रीतीनें बंदुकीचा) घोडा
Uncoil' *v. t.* वेंटाळें सोडवणें.
Uncoin' *v. t.* (धातूचें) नाण्याचें स्वरूप नाहींसें करणें.
Uncoined' *a.* नाणें न पाडलेला; as, "U. silver." २ शुद्ध, अकृत्रिम.
Uncol'oured *a.* रंग न दिलेला. २ (*fig.*) *not exaggerated* फुगवून न सांगितलेला, न फुगवलेला, खरा, जशाचा तसा; as, "U. account."
Uncomely (un-kum'-li) *a.* *unbecoming* अयोग्य, अनुचित. २ न शोभणारा, बेढब, बेडौल.
Uncom'fortable *a.* (a person) चैन नसलेला, बरें नसलेला, अस्वस्थ. [To FEEL U. बरें न वाटणें, चैन न पडणें. २ अवघड वाटणें.] २ (a place) गैरसोईचा. ३ (as a season) उदास, उदासीन, उजाड.
Uncommer'cial *a.* *not engaged in commerce* व्यापारांत न गुंतलेला, अव्यापारी. २ *not in the spirit of commerce* अव्यापारी दृष्टीचा, अव्यापारी. ३ *contrary to the principles of commerce* व्यापारी तत्त्वांच्या विरुद्ध, अव्यापारी, व्यापारी तत्त्वांविरुद्ध.
Uncomm'on *a.* *rare* विरळा, विरळ. २ *unusual* असाधारण, अपूर्व, अलौकिक, लोकोत्तर, विलक्षण, असामान्य. Uncomm'only *adv.* फारच, विलक्षण, अतिशय. Uncomm'onness *n.* विरळपणा *m*, अपूर्वाई *f*. २ अलौकिकपणा *m*, विलक्षणपणा *m*. [बोलणारा.
Uncommu'nicative *a.* मुखदुर्बळ, अगदींच थोडें
Uncompounded *a.* बिनमिसळीचा, असंकीर्ण, अमिश्रित, २ केवल, शुद्ध.
Uncom'promising *a.* बिनतडजोडीचा, पडतें न घेणारा, आग्रहाचा, दुराग्रहाचा, आग्रही, दुराग्रही.
Unconce'ivable *a.* कल्पना करतां न येणारा, कल्पनातीत, अतर्क्य.
Unconcern' *n.* *carelessness* औदासीन्य *n*, ताटस्थ्य *n*, बेफिकीरी *f*, अनास्था *f*, अनुत्साह *m*.
Unconcerned' *a.* बेफिकीर, बेपर्वा, काळजी किंवा चिंता नसलेला, निष्काळजी, उदासीन, तटस्थ.
Unconclu'sive *a.* *inconclusive* निर्णय न झालेला, अनिर्णीत, अर्धवट राहिलेला.
Uncondi'tional *a.* *absolute* बिनअटीचा, बिनशर्तीचा, सपशेल; as, "U. surrender." [बंध.
Unconditioned *a.* उपाधिरहित, अवस्थातीत, निष्प्रति-
Unconfined' *a.* मर्यादित न केलेला, खुला, मोकळा, अडकवून न ठेवलेला. २ ऐसपैस, प्रशस्त, विस्तीर्ण.
Unconfor'mable *a.* न जुळणारा. २ (*geol.*) असमान्तर, समान्तर रेषेंत नसलेला; as, "U. strata."
Uncongo'nial *a.* न मानवणारा, अननुकूल, प्रतिकूल.
Unconnec'ted *a.* न जोडलेला. २ संबंध नसलेला, संदर्भ सुटलेला, असंगत, विसंगत, असंलग्न, संबंधशून्य. ३ (रक्ताचा) संबंध नसलेला.

Unconnec'tedness *n.* असंबंध *m*, असंगति *f*, असंदर्भ *m*.
Uncon'querable *a.* अजिंक्य, जिंकतां न येणारा, जिंकण्यास अशक्य, अजेय.
Uncon'quered *a.* न जिंकलेला, अजित, अपराजित.
Uncon'scionable *a.* *not guided or restrained by conscience* सदसद्विवेकबुद्धीला न पटणारा. २ *unreasonable* बुद्धीला न पटणारा, गैरवाजवी.
Uncon'scious *a.* *insensible* बेशुद्ध, शुद्धि नसलेला, धुंद, निस्संज्ञ, जड, अचेतन, अबुद्धिपूर्वक, अबुद्धिपुरस्सर; as, "U. progress."
Uncon'sciousness *n.* बेशुद्धी *f*, बेशुद्धपणा *m*. २ निस्संज्ञता *f*, जडता *f*, अचेतनता *f*.
Uncon'secrate *v. t.* *to deprive of its consecrated character* पूज्यता काढून घेणें, पवित्रता काढून घेणें.
Uncon'secrated *a.* (विधिपूर्वक) पवित्र न केलेला, अनभिमंत्रित, असंस्कृत, दीक्षा न दिलेला.
Unconsigned *a.* (रेल्वेनें) न पाठविलेला (माल). २ हवाली न केलेला, स्वाधीन न केलेला.
Unconstitu'tional *a.* बेसनदशीर. २ (of measures, acts, &c.) (ठरींव) राज्यपद्धतीविरुद्ध.
Unconstrained' *a.* मनमोकळा, (कोणत्याहि प्रकारचा) दाब-दडपण नसलेला, बंध नसलेला, निर्बंध.
Unconstraint' *n.* मोकळेपणा *m*, अप्रतिबंध *m*.
Uncontaminated *a.* अदूषित, अभ्रष्ट, सोंवळा.
Uncontemplated *a.* *unexpected* अकल्पित, अतर्कित.
Uncontes'ted *a.* (an estate, &c.) लढा नसलेला, निर्वेध. २ सामन्याशिवायचा; as, "He carried away the prize U."
[न येण्यासारखा.
Uncontro'llable *a.* अनावर, अनिवार, ताब्यांत ठेवतां
Uncontrolled' *a.* ताब्यांत नसलेला. २ बिनअटकावाचा, निरंकुश, अनिर्गल, अप्रतिबंध.
Unconven'tional *a.* शिष्टाचारानें बद्ध न झालेला, शिष्टाचाराबद्ध. २ स्वतंत्र वृत्तीचा, स्वतंत्र बाण्याचा.
Uncon'versant *a.* (with *with* and *in*) गैरवाकबदार, गैरमाहितगार, अनभिज्ञ, अनभ्यस्त.
Uncooked *a.* न शिजलेला, कच्चा, हिरवा, अपक्व.
Uncork' *v. t.* बूच काढणें. २ (*colloq.*) (मनांतील विचार किंवा विकार) ओकून टाकणें.
[न केलेला.
Uncorrected *a.* (तपासून) शुद्ध न केलेला. २ संस्कार
Uncoun'ted *a.* न गणलेला, बिनमोजलेला, अगणित.
Uncou'ple *v. t.* (रेल्वेच्या डब्यांच्या) कड्या काढणें, वेगळें करणें. २ (बांधलेले शिकारी कुत्रे) सोडणें.
Uncourt'eous *a.* असभ्य, रानटी, बिनमाणुसकीचा, बेमुरवती, बेमुरवत.
Uucourt'liness *n.* असभ्यता *f*, अशिष्टता *f*, रानटीपणा *m*.
Uncourt'ly *a.* असभ्य, अशिष्ट, रानटी.
Uncouth (un-kōōth') [A. S. *un*, not, and *cunnan*, to know.] *a.* (appearance) ओबडधोबड, कुरूप. २ (manners or language) अडाणी, अनाडी, हेंगाडा, विलक्षण, वेडावांकडा, वेडाविद्रा.
Uncouth'ness *n.* ओबडधोबडपणा *m*, कुरूपपणा *m*. २ अडाणीपणा *m*, अनाडीपणा *m*.

Unco'venanted *a.* करारानें बद्ध न झालेला. २ *not promised by covenant* बिनसनदी. [UNCOVENANTED CIVIL SERVICE बिनसनदी मुलकी नोकरी.]

Unco'ver *v. t.* उघडणें, झांकण *n* -ढांकण *n.* काढणें -उघडणें *g. of o.* २ (*mil.* of front line) *to expose* (the line behind) *by wheeling to right or left* (पुढच्या रांगा डावीकडे किंवा उजवीकडे हालवून) मागच्या रांगा माऱ्यांत आणणें.

Unco'ver *v. i.* (सलामाकरितां) टोपी काढणें.

Uncovered *a.* उघडलेला, झांकण काढलेला, उघडा, अनावृत. २ (सलामाकरितां) टोपी काढलेला.

Uncreate' *v. t.* संहार करणें, नाश करणें.

Uncrea'ted *a.* निर्माण न केलेला, अनिर्मित. २ *existing without being created* अज, सनातन, स्वयंभू; as, "God is an U. being."

Uncriti'cal *a.* गुणदोषविवेचनाक्षम, विवेचनाक्षम, गुणदोषविवेचन करण्यास असमर्थ, अचिकित्सक. २ गुणदोषविवेचनपद्धतीच्या विरुद्ध, विवेचनपद्धतिबाह्य.

Uncross' *v. t.* (क्रूसासारखे एकमेकांवर ठेवलेले पाय किंवा हात) सरळ सोडणें, सरळ करणें.

Uncrossed' *a.* आडव्या रेघा न मारलेला (चेक, चक). २ निराशा न केलेला; as, "To be *uncrossed* in love."

Uncrown' *v. t.* राजाला पदच्युत करणें.

Uncrowned *pa. p.* राज्याभिषेक न झालेला, मुगुट नसलेला, अनभिषिक्त. २ *having power but not name of a king* (राजाचा अधिकार असलेला) राजसत्ताधारी अनभिषिक्त (मनुष्य).

Unction (unk'shun) [L. *unctio -unguere, unctum,* to anoint.] *n. anointing with oil or unguent for medical purposes* मलम लावणें *n*, तेल लावणें *n.* २ (R. C. Ch.) (धार्मिक संस्कार म्हणून) उटणें लावणें *n*, तैलाभ्यंजन *n*, तैलानुलेपन *n.* [EXTREME U. अन्तकालचा तैलाभ्यंजनविधि *m.*] ३ *thing used in anointing* (a) मलम *n.* (b) तैल *n.* ४ (*fig.*) *soothing or flattering words or talk or circumstance* (अन्तःकरणाला) आराम देणारें भाषण *n*, शांति आणणारें भाषण *n*, शांति आणणारी गोष्ट *f.* ५ *fervent or sympathetic quality in words or tone caused by or causing deep religious or other emotion* (भाषेंतील) धार्मिकभावनापोषक गुण *m.* ६ *affected enthusiasm* पोकळ (भक्तीचा) आवेश *m.*

Unc'tuous *a.* चिकट, स्निग्ध, चिकण. [U. SUBSTANCE चोपड *f*, मवागी *f*, मवाळी *f.* SOFTENED BY SOME U. SUBSTANCE मवाळ, मवाळ केलेला.] २ (earth, soil) चिकण, मऊ.

Unc'tuousness *n.* चिकटपणा *m*, चिकणपणा *m*, चिकणाई *f*, ओपट *m*, स्निग्धता *f.*

Uncul'tivated *a.* लागवड न केलेला, बिनलागवडीचा, नाकीर्द, पडीत, नाकीर्दीचा. २ अशिक्षित, अडाणी, नें शिकलेला, असंस्कृत.

Uncurbed' *a. unrestrained* कह्यांत न टेवलेला, अनावर, निरर्गल, निरंकुश, संयमन न केलेला.

Uncus'tomed *a. not liable to duty* बिनजकाती. २ *having paid no duty* जकात न भरलेला.

Unda'ted *a.* तारीख नसलेला, तारीख न घातलेला.

Undaun'ted *a. bold, intrepid* हिंमती, निधडा, निर्भय.

Undecayed *a.* न कुजलेला, न सडलेला, अशीर्ण.

Undecaying *a.* न कुजणारा, न सडणारा.

Undeceive' *v. t.* भ्रम *m.* उडवणें, भ्रम *m.* दूर करणें, भ्रम *m.* घालवणें, डोळे उघडणें *g. of o.*

Undeci'dable *a.* निकाल लावतां न येणारा, अनिर्णेय.

Undeci'ded *a. not settled* निकाल न लागलेला, बिननिकालाचा, अनिर्णीत, अभोगत; as, "The point is still U." २ *that has not formed his resolution, irresolute* निश्चय न केलेला, अकृतनिश्चय, अनिश्चित, डळमळीत; as, "He stood U."

Undeci'dedness *n.* अनिश्चितपणा *m*, अनिश्चय *m*, अनिर्धार *m*, अनिर्णय *m.*,

Undefended *a.* संरक्षण नसलेला, असंरक्षित. २ (law) बचावासाठीं वकील नसलेला, बचाव न केलेला.

Undefiled' *a. pure* भ्रष्ट न केलेला, न बाटवलेला, अदूषित, अभ्रष्ट, निर्मल.

Undefi'nable *a. that cannot be described* व्याख्या करतां न येण्यासारखा, लक्षण करण्यास अशक्य, अनिर्वचनीय, अनिर्वाच्य, लक्षणातीत.

Undefined *a.* व्याख्या न केलेला, लक्षण न सांगितलेला, लक्षण न दिलेला. २ स्पष्ट न सांगितलेला, मोघम.

Undeliverable *a.* बटवडा करितां न येणारें (पत्र).

Undelivered *a.* न दिलेला, न झालेलें (व्याख्यान). २ बटवडा न केलेला.

Undemonstrated *a.* सिद्ध न केलेला, असिद्ध.

Undemonstrative *a.* मनांतील विचार व्यक्त न करणारा, शांतवृत्ति, स्थिरबुद्धि.

Undeni'able *a.* नाहीं म्हणतां न येणारा, अबाधित, निराकरणाक्षम, निर्विवाद; as, "U. good."

Under *prep. beneath, below, &c.* खालीं, खालता, खालतीं, खालतें. २ *in subjection to* खालीं, हुकमांत, अमलांत, ताब्यांत, हाताखालीं, स्वाधीन. ३ *less than &c.* खालीं, कमी *&c. with* पेक्षां *of o.* ४ *with the cover or pretext of* निमित्तानें, मिषानें. ५ (misfortune, pain, &c.) *in* आंत, मध्यें. ६ *in the time of* आंत, मध्यें, समयीं, वेळेस *all with g. of o.* ७ *undergoing* च्या स्थितींत; as, "U. repairs." ८ *in accordance with* खालीं, प्रमाणें. [U. the cover or protection of (च्या) आड, आडून.]

Under *a. nether, inferior* खालचा, खालील, खालला, अधःस्थ; as, "*Under*wear." २ *subordinate* खालचा, (in comp., as, आडगडी, आडबंदर, &c.) हाताखालचा.

Under *adv.* (used chiefly in a few idiomatic phrases) खालीं, खालच्या स्थितींत, हलक्या स्थितींत; as, "To bring U.; To keep U. &c."

Un'derbred *a. of inferior breeding or manners* उचित शिक्षण न मिळालेला, रीतभात नसणारा.

Un'dercurrent *n. a current flowing beneath the surface of water* अधःप्रवाह *m*, खालचा प्रवाह *m*. २ (*fig.*) *an obscure, hidden or unseen influence or tendency* अन्तःप्रवृत्ति *f*.

Underdone, Underdressed *a.* (an article of cookery) हिरवा, कच्चा, अपक्व. [To BE U. कच्चा राहणें, कच्चा असणें.]

Under-exposed' *a.* कमी वेळ उजेडांत ठेवलेला, अचिर- [प्रकाशित.

Under-exposure *n.* कमी वेळ उजेडांत ठेवणें *n*, कमी वेळ उजेड पाडणें *n*, अचिरप्रकाशन *n*.

Underdrain' *n.* जमिनीखालील गटार *n*.

Underfoot' *adv.* पायाखालीं; as, "To trample U."

Undergo' *v. t. to endure* सोसणें, भोगणें, कंठणें, काढणें. Underwent *pa. t.* Undergone *pa. p.*

Under-grad'uate *n.* पदवीपरीक्षेच्या आधींची परीक्षा झालेला *m*, अन्डरग्राज्वेट *m*.

Underground *a.* जमिनीखालचा, भुईतला, भूमिगत; as, "U. stem." २ तळघराचा, भुयाराचा, भुयारांतला; as, "U. apartment." U. *adv.* जमिनीखालीं, भुईंत, जमिनींत. २ भुयारांत.

Undergrowth *n.* झुडपें *n. pl.*

Un'derhand *a. hidden, secret* गुप्त, गुपचुपीचा, चोरटा, लपंडावाचा. २ *deceitful* लुच्चेगिरीचा, कपटाचा. ३ (cricket) खांद्याखालून केलेली (चेंडूची फेंक). U. *adv. by fraudulent means* लुच्चेगिरीनें, कपटानें, चोरून, लपतछपत, लपूनछपून. २ (cricket) (हाताला) खालच्या बाजूनें हिसका देऊन, खांद्याखालून.

Underived *a.* सिद्ध (as opposed to derived साधित), सांसिद्धिक, स्वतःसिद्ध, निसर्गसिद्ध.

Underlay *v. t.* खालून आधार देणें. २ (*print.*) (टाइपांच्या छतका उंच करण्याकरितां स्टिरियो, ब्लाक वगैरेंच्या) खालीं पुष्टिपत्र घालणें, पुरण घालणें. Underlaid *pa. t.* and *pa. p.* Underlay'ing *pr. p.*

Underlay' *v. i.* (*geol.*) लंब रेषेशीं कोन करणें.

Underlie' *v. t.* खालीं असणें; as, "A stratum of clay *underlies* the surface of gravel." २ (च्या) मुळांत असणें, (चा) पाया असणें; as, "A doctrine *underlying* a theory." Underlay' *pa. t.* Underlain' *pa. p.*

Underline' *v. t.* (as a word) (च्या) खालीं (जोर देण्याकरितां) रेघ काढणें, खालीं रेघ मारणें.

Underling (un-dër-ling) [Under + suffix *-ling.*] *n. an inferior servant* कनिष्ठ प्रतीचा नोकर *m*, खालच्या प्रतीचा नोकर *m*. २ बगल्या *m*, हस्तक *m*. ३ *a mean person* क्षुद्र मनुष्य *m*.

Underly'ing *pr. p.* खालीं असणारा, मुळाशीं असलेला.

Underman' *v. t.* (वाजवीहून) कमी माणसें नेमणें -ठेवणें, पुरेशीं माणसें न ठेवणें; as, "To U. a ship."

Undermanned' *a.* कमी माणसें नेमलेला -असलेला.

Un'dermentioned *a.* खालीं उल्लेख केलेला, खालीं लिहिलेला, खालीं नमूद केलेला.

Undermine' *v. t.* खालीं (खणून) पाडणें, खालीं (खणून) ढांसळवणें, पाया (खणून) पाडणें, न टिकेसा करणें; as, "Rivers U. their banks." २ सुरुंग लावणें, सुरुंग लावून पाडणें. ३ *to injure* (person, reputation, &c.) *by secret means* गुप्तपणानें धक्का पोंचवणें, नुकसान पोंचवणें, (चोरट्या उपायांनीं) नाहींसा करणें. ४ *to injure, to wear out,* (health, &c.) *insidiously or imperceptibly* (हळूहळू) क्षीण करणें, अशक्त करणें, ढांसळवणें.

Un'dermost *a.* अगदीं तळचा, सर्वांच्या खालचा.

Underneath' *adv.* खालीं, खालच्या जागेंत. U. *prep.* खालीं.

Underpay' *v. t. to pay insufficiently* (कामगारांना) कमी पगार देणें, कामाच्या मानानें पगार न देणें. Underpaid' *pa. t.* and *pa. p.* Underpay'ment *n.* कमी पगार देणें *n*, योग्य वेतन न देणें.

Un'derpeopled *a.* कमी लोकवस्ती असलेला.

Un'derplot *n.* उपसंविधानक *n*, उपकथा *f.* २ गुप्त कट *m*, गुप्त योजना *f.*

Underprize' *v. t.* (वाजवीपेक्षां) किंमत कमी लावणें, कमी दर लावणें, कमी किंमतीचा मानणें -समजणें.

Underprop' *v. t.* खालून टेंकू *m* -नेटाचा *m.* देणें.

Underquote' *v. t. to offer at a lower price than another* (दुसऱ्यापेक्षां) कमी किंमतीस लावणें -विकणें, कमी भाव लावणें.

Underrate' *v. t. to rate under the value* (वाजवीपेक्षां) कमी किंमत करणें, दर कमी करणें, भाव कमी करणें.

Undersaturated *a.* अधस्संपृक्त.

Undersecretary *n.* हाताखालचा -दुय्यम सेक्रेटरी.

Undersell' *v. t.* (दुसऱ्यापेक्षां) कमी दरानें विकणें. Undersold *pa. t.* and *pa. p.*

Undershot *a.* (of a water-wheel) खालील पाण्याच्या जोरानें फिरणारी (पाणचक्की).

Undersign' *v. t.* खालीं सही करणें.

Undersigned *a.* खालीं सही केलेला -करणारा.

Undersized *a.* (नेहमींपेक्षां) लहान आकाराचा.

Understand (un-der-stand') [A. S. *understandan,* to stand under or in the midst of a thing.] *v. t.* *to comprehend, to perceive the meaning of* (-चा) अर्थ समजणें, कळणें, लक्षांत येणें, उमजणें, समज पडणें, जाणणें, (आपा) येणें -समजणें; as, "Does not U. what you say." २ *to grasp mentally, to perceive the significance of* (-चें) ग्रहण -आकलन करणें, ध्यानांत -डोक्यांत -लक्षांत येणें, (-चें) ज्ञान होणें, (मर्म) समजणें -कळणें, येणें; as, "Do not quite U. your difficulty, could never U. mathematics." ३ *to learn, to suppose to mean* कळणें, समजणें, माहीत होणें, वाटणें, समजूत होणें, समज होणें. ४ *to imply* अध्याहार करणें; as, "The Verb may be either expressed or *understood.*"

Understand *v. i. to have the use of the intellectual faculties, to learn* समजणें, कळणें, समजूं लागणें.

Understanded (Pr. Bk.) used for Understood.

Understand'ing *n. intelligence* जाणीव *f*, बुद्धि *f*, बुद्धिमत्ता *f*, उमज *m*, समज *m*, मति *f*, ग्रहणशक्ति *f*, ज्ञानशक्ति *f*, अक्कल *f*, समजूत *f*; as, "Has an excellent U." [ OBJECT OF U. बुद्धिविषय *m*. OF FEEBLE U. बुद्धीचा दुबळा. SLOW OF U. मतिमंद, मंदमति.] २ *power of apprehension* आकलनशक्ति *f*, सूक्ष्म विचार करण्याची शक्ति *f*. ३ *agreement, harmony* समजूत *f*, सलोखा *m*, स्नेहभाव *m*, गोडी *f*. [ TO BRING TO A RIGHT U. समजावणें, समजूत *f*-समजी *f*. करणें. TO COME TO A RIGHT U. समजूत पडणें, जुगणें, घडी बसणें *g. of o.*] ४ *thing agreed upon* करार *m*, कबुली *f*, बोली *f*, भाषा *f*, भाषण *n*, बोलणें *n*.

Understate *v. t.* ( वास्तविकाहून ) कमी सांगणें.

Understood *pa. t.* and *pa. p.* ( of Understand. ) समजलेला, कळलेला, ग्रहण केलेला, &c. २ अध्याहृत.

Un'derstrapper *n.* बगल्या *m*, हस्तक *m*.

Un'derstudy *n. one who studies theatrical part in order to play it at short notice in the absence of the usual actor* ( नेहमींच्या नटाच्या गैरहजेरींतला ) बदली नट *m*.

Undertake' *v. t. to bind oneself to perform, to promise* ( to do ) पतकरणें, अंगावर -माथ्यावर -डोईवर घेणें, कबूल करणें, पतकर घेणें. २ *to engage in, to enter upon* हातीं घेणें, हातीं धरणें. U. *v. i.* (*colloq.*) *to manage funerals* प्रेताची -प्रेतयात्रेची व्यवस्था करणें ( प्रेत नेणें, खाडा खणणें, वगैरे ). Undertook *pa. t.* Undertaken *pa. p.* पतकरलेला, कबूल केलेला. २ हातीं घेतलेला.

Underta'ker *n.* ( एखादें काम ) पतकरणारा *m*, कबूल करणारा *m*. २ हातीं घेणारा *m*. ३ स्मशानयात्रेची सर्व व्यवस्था पाहणारा *m*.

Underta'king *n.* पतकरणें *n*, कबूल करणें *n*. २ हातीं घेणें *n*. ३ हातीं घेतलेलें काम *n*, शिरावर घेतलेलें काम *n* -कार्य *n*. (b) मोठें ( अवघड ) कार्य *n*, धाडसाचें काम *n*. [ BOLD OR HAZARDOUS U. जिवावरचें काम *n*, धाडसाचें काम *n*. GREAT OR ARDUOUS U. हत्तीचें मढें *n*.] ४ (law) ( लेखी किंवा तोंडी ) कबुली *f*, वचन *n*. ५ *management of funerals* स्मशानयात्रेची व्यवस्था *f*.

Undertenant *n.* पोटभाडेकरी *m*, पोटभाडोत्री *m*.

Underthrow' *n.* ( *geol.* ) अधोभंगविस्तार *m*.

Un'dertone *n. an under or low tone* हलका आवाज *m*, बारीक आवाज *m*.

Undertook *pa, t,* of Undertake.

Undervalua'tion *n.* कमी किंमत लावणें. २ कमी दर *m*, कमी किंमत *f*.

Undervalue *v. t.* किंमत कमी करणें, दर कमी करणें. २ तुच्छ मानणें, हलका मानणें.

Un'dervest *n.* आंतला शर्ट *m*.

Under way *adv.* चालू, मार्गांत; as, "The ship is *under way*."
Un'derwear *n.* आंतले कपडे *m. pl.*, आंगाबरोबरचे कपडे *m. pl.*
Underwent *pa. t.* of Undergo.
Under-wood *n.* झुडपें *n. pl.*, झाडी *f.*
Un'derworld *n.* अधोलोक *m.* २ पाताळ *n*, अधोविश्व *n.*
Under-writer *n. insurer* जहाजांच्या विम्यांचा दलाल.
Undescri'bable अवर्णनीय, वर्णन करतां न येण्यासारखा, वर्णन करण्यास अशक्य, अनिर्वाच्य, वर्णनातीत.
Undeserved' *a.* योग्यता नसतां मिळालेला, कांहीं न करतां मिळालेला, गैरवाजवी. Undeserved'ly *adv.* योग्यता नसतां, पात्रता नसतां, गुण नसतां, कांहीं केलें नसतां.
Undeser'ving *a.* (with *of*) योग्यता नसलेला, बिनयोग्यतेचा, नालायक, अपात्र, अयोग्य.
Undesigned' *a.* पूर्वीं योजना न केलेला, पूर्वीं उद्देश नसलेला, अपूर्वकल्पित, अनुद्दिष्ट.
Undesi'gning *a.* सरळ, सरळ स्वभावाचा, निष्कपट स्वभावाचा, कंत्राटें किंवा कुलंगडीं न रचणारा.
Undesi'rable *a.* हवा असें न वाटणारा, अनिष्ट, अस्पृहणीय.
Undesired' *a.* न इच्छिलेला, अनिच्छित, अनिष्ट.
Undesir'ous *a.* इच्छा नसलेला, इच्छा नसणारा.
Undestroyed *a.* नाश न केलेला, अनुध्वस्त.
Undeter'minable *a.* निर्णय करतां न येण्यासारखा, अनिर्णेय. [२ लुप्त. (मान=Form).
Undeter'minate *a.* (*math.*) ठरवितां न येण्यासारखा.
Undeter'mined *a.* न ठरवलेला, बिनठरवलेला. २ (*math.*) अनिर्णीत. ३ (a person) अनिश्चयी.
Undeveloped *a.* पूर्ण विकास न झालेला, अपरिणत, अविकसित. [ UNDEVELOPED LAND (इमारतीकडे वगैरे न लावलेली) शेतीची जमीन. ]
Unde'viating *a.* आडवाटेस न जाणारा, सरळमार्गी.
Undevout' *a.* भक्तिहीन, भक्तिरहित.
Undid *pa. t.* of Undo.
Undiges'ted *a.* (as food) न पचलेला, आम. [U. FOOD आमांश *m*, आम.] २ (thoughts) मनांत न बिंबलेला, अपक्क, अपरिपक्क. ३ *not arranged* विल्हेवारी न केलेला, विषयवारी न केलेला, अवर्गीकृत.
Undig'nified *a.* थोरपणाला न शोभणारा, अप्रौढ, अप्रशस्त, गांभीर्य नसलेला, पोरकट.
Undiminished *a.* कमी न झालेला, अन्यूनीभूत.
Undiscer'nible *a.* सूक्ष्म फरक काढतां न येण्याजोगा, ओळखतां न येण्यासारखा.
Undisc'iplined *a.* अशिक्षित, शिस्त न लावलेला, शिकवून तयार न केलेला, न शिकलेला, बिनकवायती, बिनतालमी. २ शिस्त न लागलेला.
Undiscov'erable *a.* शोधून काढतां न येण्यासारखा.
Undiscrim'inating *a.* (मनानें) सूक्ष्म भेद न पाहणारा, सूक्ष्म भेद न काढणारा, असूक्ष्मभेददर्शी.
Undiseased *a.* निरोगी, रोग नसलेला, निरामय, निकोप.
Undisguised' *a.* उघडा, अप्रच्छन्न, बिनपडद्याचा. २ *frank* निष्कपट, ( मनाचा ) मोकळा, स्पष्ट.

Undispu'ted *a.* बिनतक्रारीचा, तक्रारीवांचूनचा, निर्विवाद; as, "*Undisputed* possession."
Undissem'bled *a.* निष्कपट, अकपट, उघडा.
Undisting'uishable *a.* फरक करतां न येण्यासारखा, भेद करतां न येण्यासारखा. [अप्रसिद्ध.
Undist'inguished *a.* फरक न केलेला. २ *not eminent*
Undistributed *a.* (*logic*) अव्याप्त. [THE FALLACY OF U. MIDDLE अव्याप्त हेतूचा हेत्वाभास.]
Undisturbed *a.* निरुपद्रव, उपद्रवहीन, उपद्रव नसलेला, निर्वेध, बिनउपाधीचा. २ (mind) अव्यग्र, अक्षुब्ध.
Undivi'ded *a.* न विभागलेला, बिनवांटलेला, अविभक्त, अखंडित, अखंड, सबंद, सलग. २ (attention) एकाग्र, अनन्यासक्त.
Undo' *v. t. to reverse* रद्द करणें, फिरवणें, उलटवणें, मोडणें, नाहींसा करणें, न केलासा करणें, पूर्वावस्थेवर आणणें, पूर्ववत् करणें. २ *to loose, to untie* (बंद वगैरे) सोडणें, (वटणें वगैरे) काढणें, उखळणें, निखळणें. (b) गुंतागुंत सोडवणें, गांठ सोडणें. ३ *to unravel* उलगडणें, उलगडा करणें. ४ *to ruin* नाश करणें. ५ *to impoverish* नुकसान करणें, दरिद्री करणें, कंगाल करणें. Undid *pa. t.* Undone' *pa. p.*
Undo'ing *v. n. the reversal of what has been done* फिरवणें *n*, उलटवणें *n*, मोडणें *n*, पूर्वस्थितीवर आणणें *n*. २ *ruin* नाश *m*, नुकसान *n*.
Undone' *a.* रद्द केलेला. २ उखळलेला, उकललेला. ३ सोडलेला. [TO BECOME U. (A GARMENT) सुटणें, फिटणें.] ४ न केलेला. ५ नाश केलेला, नाश झालेला.
Undoubt'ed *a.* संशय नसलेला, संशय न राहिलेला, निःसंशय, अशंकित, असंदिग्ध.
Undoubt'edly *adv.* असंशयित, असंशयात्मक, निःसंशय, अवश्य, खात्रीनें.
Undoubt'ful *a.* शंका नसलेला, निःसंशय, शंकारहित.
Undout'ing *a.* शंका न घेणारा, निःसंशय, निःशंक मनाचा.
Undress *v. t.* कपडे काढणें, कपडे उतरणें. २ जखमेवरील पट्टी काढणें.
Undressed *a.* कपडे काढलेला -उतरलेला, विवस्त्र. २ (food) कच्चा, हिरवा, आम, कोरडा (कोरडी भिक्षा). [U. RICE, PULSE, &c. GIVEN TO MENDICANTS कोरान्न *n*, आमान्न *n*.] ३ (धुऊन) पट्टी न बांधलेली (जखम).
Undue' *a. not due, not yet owing* मुदत न भरलेला, लागू न झालेला; as, "U. debt." २ *wrong* अयोग्य, गैरवाजवी; as, "U. advantage." ३ *inordinate, excessive* अमर्याद, बेसुमार; as, "U. rigour."
Undulate ( un'dū-lat ) [L. *undulatus*, way -*unda*, a wave.] *v. i.* हेलकावे खाणें, आंदोलन पावणें, उतार-चढ -चढउतार होणें and with *in. con.* असणें *g. of s.* U. *v. t.* हेलकावे देणें, आंदोलन करणें.
Undulated *pa. p. a.* आंदोलित, मागेंपुढें हाललेला.
Undulating *pr. p. a.* हेलकावा खाणारा, आंदोलक.
Undula'tion *n.* आंदोलन *n*, हेलकावा *m*, चढउतार *m*.
Un'dulatory *a.* आंदोलन पावणारा, चढउताराचा,

चढताउतरता, तरंगाकार, लहरीरूप. [U. THEORY (of light) लहरीरूप कल्पना *f.*]
Undu'ly *adv.* गैरवाजवी. २ *excessively* बेसुमार, अमर्याद. [नसणारा.
Undū'tiful, Undu'teous *a.* कर्तव्यविमुख, सेवेस तत्पर
Undy'ing *pr. p. a.* न मरणारा, अविनाशी, अमर, अजरामर; as, "U. fame."
Unearned' *a.* फुकट मिळालेला, फुकट मिळविलेला.
Unearth' *v. t. to drive (fox, &c.) from an earth, to dig up* बिळांतून (बाहेर) हुसकावणें, खणून बाहेर काढणें. २ (*fig.*) *to bring to light* बाहेर काढणें -आणणें, शोध लावणें; as, "To U. a rare manuscript."
Unearth'ly *a.* भूलोकांत न दिसणारा, भूलोकांत दुर्मिळ.
Uneas'iness *n.* अस्वस्थपणा *m*, अस्वस्थता *f*, अस्वास्थ्य *n*, कसेंचसें *n*, चैन नसणें *n*.
Une'asy *a.* अस्वस्थ, आराम नसलेला, चैन नसलेला.
Une'atable *a.* खाण्यास अयोग्य, अभक्ष्य, अभक्षणीय.
Uneat'en *a.* न खाल्लेला, अभुक्त.
Unedge' *v. t.* बोंथट करणें.
Uned'ucated *a.* अशिक्षित, शिक्षण न मिळालेला, निरक्षर.
Uneffec'tual *a.* अपरिणामकारी, गुण नसणारा, अगुणकारी.
Unelas'tic *a.* अस्थितिस्थापक, मिसमिशीत, लिबलिबीत, विसविशीत.
Unembod'ied *a.* देहांतून बाहेर गेलेला, देह सोडलेला, मुक्त. २ *not organised* विस्कळित, पांगलेला, एके ठिकाणीं न जमवलेला; as, "U. militia."
Unemployed' *a.* रिकामा, खाली, निरुद्योगी, बेकार, बेरोजगार, मोकळा, घरीं बसलेला. २ (as capital) (धंद्यांत) न गुंतलेला, न गुंतवलेला.
Unemployedness *n.* बेरोजगारपणा *m*, रिकामपणा *m*, बेकारपणा *m*, रोजगार नसणें *n*. २ (भांडवल) गुंतलेलें नसणें *n*. [बेकारपणा *m*.
Unemploy'ment *n.* रोजगार नसणें *n*, उद्योग नसणें *n*,
Unenclosed' *a.* कुंपण नसलेला, बिनकुंपणाचा, बिनवंड्यांचा.
Unencumbered (estate) *a.* (कर्जाचा) बोजा नसलेला.
Unen'ding *a.* न संपणारा, शेवट न होणारा. २ सतत असणारा, शाश्वत.
Unenduring *a.* न टिकणारा, अशाश्वत, अनित्य, अस्थिर.
Unenergetic *a.* अनुत्साही, निरुत्साही, निस्तेज, शिथिल.
Unengaged' *a.* रिकामा, खाली, मोकळा, निरुद्योगी.
Un-English *a.* इंग्रजांच्या शिलाविरुद्ध. २ इंग्रजी भाषेच्या (संप्रदाया) विरुद्ध, अशुद्ध इंग्रजी.
Unenjoined *a.* अविहित, शास्त्रानें न सांगितलेला, अनादिष्ट.
Unenjoyed *a.* न भोगलेला, अनुपभुक्त, अभुक्त.
Unen'vious *a.* हेवा नसलेला, परोत्कर्षसहिष्णु.
Une'qual *a. not equal* कमजास्त, अधिकउणा, असमान, असम. २ *not level* उंचनीच, असम, असमान. ३ *not adequate or sufficient* अपुरा. ४ *unfit* अयोग्य, अक्षम, कार्याक्षम, असमर्थ, नालायक.
Une'qualled *a.* अनुपम, निरुपम, अद्वितीय, अपूर्व, बरोबरी न केलेला.

Une'qually *adv.* उंचसखल. २ अधिकउणेपणानें, न्यूनाधिक भावानें, अधिकउणा, कमजास्त.

Unequiv'ocal *a.* असंदिग्ध, स्पष्ट, सुस्पष्ट, अद्व्यर्थ.

Uner'ring *a.* न चुकणारा, बिनचूक, अचूक, असोघ, अचूकसंधानी. Uner'ringly *adv.* अचूक, बिनचूक.

Unessen'tial *a.* बिनजरूरीचा, अनावश्यक. २ अनंगभूत.

Une'ven *a.* उंचसखल, उंचनीच, खालवर, असमान, असम. २ ( poetry ) विषम, असम; as, "U. feet." ३ विषम; as, "3, 7, and 11 are U. numbers."

Uneven'ly *adv.* उंचसखल, उंचनीच. २ विषम प्रमाणांत.

Uneven'ness *n.* उंचसखलपणा *m*, उंचनीचपणा *m.* २ असमता *f.* ३ विषमता *f.*

Unexam'pled *a.* अनुपम, निरुपम, अपूर्व, अद्वितीय.

Unexcelled' *a.* वर सरशी न केलेला -झालेला, अप्रतिम.

Unexcep'tionable *a.* बिनहरकतींचा, निर्दोष, अबाधित.

Unex'ecuted *a.* पार न पाडलेला, न केलेला. २ अंमलबजावणी न केलेला, अंमल न केलेला. ३ न बजावलेला.

Unexercised' *a.* उपयोग न केलेला.

Unexhaust'ed *a.* न संपलेला, न थकलेला.

Unexpec'ted *a.* अनपेक्षित, अकल्पित, अतर्कित, आकस्मिक.

Unexpe'ctedly *adv.* अकल्पित, अचानक, एकाएकीं, अकस्मात्.

Unexpen'sive *a.* बिनखर्चाचा.

Unexpe'rienced *a.* अनुभव नसलेला, अननुभवी.

Unexpired' *a.* ( of lease, &c. ) मुदत न भरलेला, चालू, न संपलेला, अपुरी.

Unexplored' *a.* शोध न केलेला. २ शोध न लागलेला.

Unfa'ding *a.* न विटणारा, अवीट, फिका न पडणारा. २ अम्लान.

Unf'ailing *a.* खात्रीचा, न चुकणारा, अचूक, अमोघ. २ कमी न पडणारा, सारखा; as, "U. supply."

Unfair' *a.* ( a person ) खोट्या व्यवहाराचा, खोट्या चालीचा, बेइमानी, अप्रामाणिक. २ ( practice ) गैरवाजवी, गैररीतीचा, गैरमार्गाचा, खोटा, लुच्चेगिरीचा, अन्यायाचा, गैररास्तपणाचा, गैररास्त.

Unfair'ness *n.* व्यवहारांतला खोटेपणा *m*, खोटा व्यवहार *m*, खोटी चाल *f.* २ गैरवाजवीपणा *m*, गैररास्तपणा *m.*

Unfaith'ful *a.* बेइमान, बेइमानी, निमकहराम, अप्रामाणिक, खोटा, खोटसाळ. २ ( in Christian Theology ) खिस्तावर विश्वास नसलेला, अविश्वासी.

Unfaith'fulness *n.* बेइमानी *f*, निमकहरामी *f*, अप्रामाणिकपणा *m*, खोटेपणा *m*, खोटसाळपणा *m.* २ अविश्वासिपणा *m*, अविश्वास *m.*

Unfal'tering *a.* न अडखळणारा. २ (*fig.*) ठाम, निश्चित.

Unfash'ionable *a.* बेडौल, बिनघांटाचा, हव्या त्या आकाराचा न करतां येणारा.

Unfas'ten *v. t.* उघडणें. २ सोडणें ( बंद, वगैरे ).

Unfa'thered *a. fatherless* बाप मेलेला. २ *having no acknowledged father* अपितृक. ३ *not acknowledged by its author* उत्पादकानें आपला म्हणून न म्हटलेला; as, "An U. theory."

Unfath'omable *a.* तळ न लागणारा, अगाध, अपरंपार. २ (*fig.*) बुद्धीस अगम्य, तर्कास अगम्य, अतर्क्य, गहन.
Unfa'vourable *a.* अनिष्ट, अननुकूल, प्रतिकूल, अप्रसन्न.
Unfa'vourableness *n.* अनिष्टता *f*, अननुकूलता *f*.
Unfeath'ered *a.* पिसें काढलेला, पंख कापलेला.
Unfe'eling *a.* निर्दय, दयाहीन, निष्ठुर, निर्घृण, मनास कांहीं न वाटणारा.
Unfeigned' *a.* खरा, अकृत्रिम, निष्कपट, वास्तविक.
Unfett'ered *a.* मोकळा, अनर्गल, बन्धनरहित, लोढणें नसलेला.
Unfig'ured *a.* चित्रें नसलेला, साधा, अचित्रित. २ *literal* अनलंकारिक.
Unfinished *a.* अपुरा, अपुरता, अधुरा, असमाप्त, अपूर्ण, कच्चा. २ शेवटचा हात न दिलेला, शेवटचा संस्कार न केलेला, शेवटची सफाई न केलेला.
Unfit' *a.* अयोग्य, न जुळणारा. २ अनुपयोगी, अयोग्य, अनुपयुक्त, अक्षम, नालायक.
Unfit *v. t.* अयोग्य -नालायक -अक्षम करणें, अयोग्यता *f* -नालायकी *f*. आणणें.
Unfit'ness *n.* अयोग्यता *f*, अनुपयोगिपणा *m*, नालायकी *f*, अनुपयुक्तता *f*.
Unfitted *a.* अयोग्य. २ *not furnished with fittings* (छतावर किंवा भिंतीवर) फिटिंग्ज न केलेला.
Unfix' *v. t.* निखळणें, हालवणें, ढिला करणें, अस्थिर -चंचल करणें; as, "To U. a bayonet; To U. the mind."
Unfixed' *a.* अस्थिर, अध्रुव, अस्थायी.
Unfledged' पंख न फुटलेला. २ (*fig. of a person*) तरबेज न झालेला.
Unfli'nching *a.* न खचणारा, न डगमगणारा, न कचरणारा, धिराचा.
Unfold' *v. t. to open out, to expand* उलगडणें, उघडणें, उकलणें, पसरणें. २ *to reveal* कळवणें, प्रगट करणें, प्रसिद्ध करणें, जाहीर करणें; as, "To U. one's designs."
Unfold'ment *n.* विकास *m*, विकासन *n*; as, "The U. of the instinctive powers."
Unforbearing *a.* सहन न करणारा. २ अक्षान्त.
Unforbidd'en *a.* निषिद्ध न केलेला, बिनमनाईचा, अनिषिद्ध, अवर्जित.
Unforced' *a.* स्वाभाविक, सहज, बिनजुलमाचा, सहजस्फूर्तीचा.
Unfordable *a.* बिनपायउताराचा, उतार नसलेला.
Unforeseen' *a.* अगाऊ कल्पना नसलेला, अगाऊ अटकळ न केलेला. २ आकस्मिक, अडचणीचा.
Unforgiv'ing *a.* क्षमा न करणारा, अक्षमावान्, निर्दयपणाचा, दीर्घ द्वेषी.
Unforgiv'ingness *n.* अक्षमा *f*, दीर्घद्वेष *m*.
Unfor'tunate *a.* (of persons) दुर्दैवी, अभागी, भाग्यहीन, दुर्भागी, दैवहीन, अपेशी, करंटा, कपाळफुटका, फुटक्या कपाळाचा -दैवाचा -नशिबाचा, भद्या. २ (of measures, affairs, &c.) दुर्दैवाचा, दुर्दैवी, अनिष्टकारक, अनर्थकारक.
Unfor'tunately *adv.* दुर्दैवानें, दुर्दैवेंकरून, दुर्दैववशात्.

Unfor'tunateness *n.* दुर्दैव *n*, अपेश *n*, दुर्भाग्य *n*.
Unfoun'ded *a.* अमूलक, निर्बीज, मिथ्या.
Unfreque'nted *a.* आडवळणाचा, गैरवळणाचा, आडवळणी, बिनवहिवाटीचा, गैरराबत्याचा, अक्षुण्ण.
Unfrequen'tedness *n.* आडवळण *n*, गैरराबता *m*, आडवळणीपणा *m*.
Unfrien'dliness *n.* वांकडें *n*, अमित्रता *f*.
Unfriend'ly *a.* बिनसलोख्याचा, शत्रुभावाचा, वैराचा.
Unfruit'ful *a.* निष्फळ, फलरहित, निरर्थक. [नता *f*.
Unfruit'fulness *n.* निष्फळता *f*, निरर्थकता *f*, फलही-
Unfulfilled *a.* पुरा न झालेला, पुरा व्हावयाचा, अपूर्ण.
Unfurl' *v. t.* ( शिडें वगैरे ) सोडणें, पसरणें, फडकवणें.
Unfur'nished *a.* ( टेबल, खुर्च्या, पलंग, वगैरे ) सरंजाम नसलेला, न सजवलेला, बिनसरंजामी. २ ( a lamp ) रिकामा, रिकामका, रिता, रिक्त. ३ पुरवठा न केलेला.
Ungain'ly *a.* *awkward*, *uncouth* बेढब, बेडौल, विशोभित.
Ungear' *v. t.* *to put out of gear* ( शक्ति आणि काम यांचा ) जम तोडणें, जोडणी सोडवणें, जोड तोडणें.
Ungen'erous *a.* अनुदार, अनुदार मनाचा, क्षुद्र, कृपण.
Ung'enial *a.* न मानवणारा.
Ungentle' *a.* असौम्य, कठोर. २ असभ्य, दांडगा, ग्राम्य.
Ungen'tlemanly *a.* (सभ्य) गृहस्थास न शोभणारा, असभ्य, गृहस्थानुचित.
Ungird' *v. t.* कमर सोडणें, कमरबंद *m*. सोडणें.
Unglov'e *v. t.* हातमोजे काढणें.
Ungov'ernable *a.* न आवरतां येणारा, काबूंत न राहणारा, अनिवार, अनावर. [अनावर.
Ungov'erned *a.* *unbridled* बेलगामी, अवश, स्वैर,
Ungrace'ful *a.* बेढब, बेडौल, विशोभित, ओबडधोबड.
Ungrace'fulness *n.* बेढबपणा *m*, बेडौलपणा *m*, ओबडधोबडपणा *m*, विशोभितपणा *m*.
Ungra'cious *a.* न आवडण्याजोगा, न पसंत पडण्याजोगा. २ (act) दांडगटपणाचा, असभ्य.
Ungramma'tical *a.* ( व्याकरणदृष्ट्या ) अशुद्ध, चुकीचा.
Ungrate'ful *a.* कृतघ्न, उपकार न जाणणारा, उपकार न स्मरणारा, अनुपकारी, निमकहराम, अकृतज्ञ. २ *disagreeable*, *irksome* कंटाळवाणा, नावडता, त्रासदायक; as, "Harsh sounds are U. to the ear."
Ungrate'fulness *n.* कृतघ्नपणा *m*, अकृतज्ञता *f*, अनुपकारिपणा *m*, निमकहरामी *f*. २ कंटाळवाणेपणा *m*.
Ungroun'ded *a.* निराधार. २ खोटा.
Ungrudg'ing *a.* सढळ, उदार. [नखीचा.
Ungual ( ung'wal ) [ L. *unguis*, a claw.] *a.* नखाचा,
Unguar'ded *a.* न रक्षिलेला, अरक्षित. २ बेसावध.
Unguent (ung'went) [L. *unguere*, to anoint.] *n.* उटी *f*, उटणें *n*.
Unguentum *n.* मलम *n*.
Unguic'ulate *a.* (*bot.*) नखपटली.
Unguis ( ung'wis ) [L.] *n.* पाकळी निमुळती होऊन झालेला नखासारखा भाग *m*, नखासारखें पटल *n*, नख-

पटल *n.* ३० पिंक, मोहरी, इत्यादिकांचीं फुलें.

Unhack'neyed *a.* गैरराबत्याचा, अनुच्छिष्ट, अशिळा.

Unhal'low *v. t.* बाटवणें, भ्रष्ट करणें. २ अपवित्र मानणें.

Unhal'lowed *a.* अपवित्र मानलेला, भ्रष्ट, नापाक.

Unhand' *v. t. to take one's hands off, to release from one's grasp* हातांतून सोडणें, हात सोडून देणें.

Unha'ndsome *a. ugly* कुरूप. २ *illiberal* अनुदार.

Unhap'py *a. wretched* दुःखी. २ *unfortunate, calamitous* दुःखप्रद, दुःखदायक, दुःखाचा. ३ दुर्दैवी, अभागी, अयशस्वी; as, "*Unhappy* in the choice of friends." ४ असुगम, वाईट, अप्रसन्न, अनाल्हादकारक, असुखकारक; as, "U. choice of words."

Unharmed' *a.* इजा न झालेला, नुकसान न झालेला, दुखापत न झालेला.

Unharm'onious *a.* बेसूर, बदसूर, विस्वर.

Unhar'ness *v. t. to take the harness off* खोगीर काढणें. २ शस्त्रास्त्रें काढून ठेवणें, शस्त्रास्त्रें उतरून ठेवणें.

Unhaz'ardous *a.* बिनजोखमाचा, निर्जोखमी.

Unhead' *v. t.* झांकण काढणें; as, "To U. a cask."

Unheal'thiness *n.* रोगटपणा *m*, सदारोगिपणा *m.* २ रोगिपणा *m*, बाधकपणा *m*, रोगजनकत्व *n.*

Unheal'thy *a. habitually indisposed* सदारोगी, रोगेला, रोगिष्ठ, रोगट. २ *unfavourable to health, insalubrious* रोगट, बाधक, रोगकारक.

Unheard *a.* न ऐकलेला, बिनऐकलेला, अश्रुत. [U. OF AND UNTHOUGHT OF, *utterly unknown* ध्यानीं मनीं नसलेला.] २ *obscure* अप्रसिद्ध, कोनाकोंपऱ्यांतला.

Unheated *a.* (metals, &c.) निताव, नितावी, बिनतावी, बिनतावाचा, अतप्त. २ (oil, butter, milk, &c.) अकढा, निकढा, बिनकढाचा, न कढवलेला -तापवलेला, निरसा.

Unhe'eded *a.* दुर्लक्ष केलेला, उपेक्षित, अवमानित.

Unheed'ing *a. careless* लक्ष न देणारा, बेफिकीर.

Unhes'itating *a.* कांकूं न करणारा, ठाम, निश्चयाचा, निःशंकपणाचा.

Unhe'sitatingly *adv.* बेलाशक, बेधडक, निःसंशय, निर्भ्रान्त, बिनदिक्कत, बेदिक्कत, कांकूं न करतां.

Unhewn *a.* बिनघडलेला, बिनटांकीचा, बिनसुतकीचा.

Unhinge' *v.* बिजागरीं *n. pl.* -सांधे *m. pl.* -टांके *m. pl.* &c. उखळणें -काढणें -ढिले करणें -&c. *g. of o.* २ (as mind) डळमळणें, ठिकाणावर नसणें, स्थिरता नाहींशी होणें all with *in. con. with instrumental of s.*

Unhinged *pa. p. a.* बिजागरीं उखळलेला. [To be U. (*fig.*) *to feel prostrated* घळघळणें, टांके *m. pl.* ढिले होणें *g. of s.*, गळणें.]

Unhistor'ical *a.* इतिहासांत नसलेला, अनैतिहासिक. २ *not in accordance with history* इतिहासविरुद्ध.

Unho'liness *n.* अपवित्रपणा *m*, अपवित्रता *f*, अशुद्धता *f*, अशुद्धि *f.*

Unho'ly *a. impure* अपवित्र, अशुद्ध, अशुचि, अमंगल.

Unhon'oured *a.* असन्मानित, असत्कारित.

Unhook' *v. t. to loose from a hook* हूक काढणें.

Unhorse' *v. t. to throw down from a horse* घोड्यावरून खालीं पाडणें, घोड्यावरून खालीं आणणें; as, "To U. a rider." २ (गाडीला जुंपलेला) घोडा सोडणें; as, "To U. a carriage."

Unhous'e *v. t. drive from the house* घरांतून हांकून देणें -घालवून लावणें -काढून देणें.

Unhu'manise *v. t.* माणुसकी -मनुष्यपणा नाहींसा करणें.

Unhurt' *a.* दुखापत न झालेला, न दुखवलेला, धक्का न लागलेला -पोंचलेला.

Unhurt'ful *a.* दूजा न करणारा, अपकार न करणारा, [अबाधक.

Unhusk' *v. t.* Same as to Husk.

Unhusked *a.* (rice, &c.) असडा, असडी, तूस न काढलेला. २ (cocoanut, betelnut, &c.) असोला, असोल्या.

Unicel'lular *a.* एकपेशीमय.

Unicorn (ū'ni-korn) [L. *unus*, one, and *kornu*, perhaps allied to Sk. शृंग, a horn.] *n.* गेंडा *m*, एकशृंग *m*.

Unicorn (*astron.*) [L. Monoceros.] शृंगाश्व नांवाची तारा *f*, शृंगाश्व.

Unidiomat'ic *a.* भाषासंप्रदायविरुद्ध, भाषणसंप्रदाय- [विरुद्ध.

Unification *n.* एक करणें *n*, एकीकरण *n*, संयोजन *n*, तादात्म्य *n*.

Uniform (ū'ni-form) [L. *unus*, one, and *forma*, a form.] *a.* एकसारखा, एकरूपाचा, एकजातीचा, एकतऱ्हेचा -ढौलाचा -रंगाचा -प्रकारचा, एकरूप. २ (*math.*) एकसारखा, सारखा, सम. [U. MOTION समगति *f*.] ३ (*philos.*) सरूप. (cf. सरूपतामुक्ति.). ४ *of one tenor* एकसारखा, सारखा, बरावर, समान.

Uniform *n.* एकजात पोषाख *m*, एकसारखा पोषाख *m*.

Unifor'mity *n.* सारखेपणा *m*, एकसारखेपणा *m*, एकथाट *m*, एकरूपता *f*, समरूपता *f*. २ (प्रार्थना, उपासना, इत्यादिकांची) एकरूपता *f*. [ACT OF U. एकरूपतेचा कायदा.]

U'niformly *adv.* सारखा, एकसारखा, एकाच रीतीनें. [U. ACCELERATING MOTION समवर्धमान गति *f*.]

Unify *v. t.* एक करणें, एकीकरण करणें, तादात्म्य करणें, संयोजन करणें.

Uniliteral (ū-ni-lit'ér-al) [L. *unus*, one, and *litera*, a letter.] *a. consisting of one letter only* एकाक्षरी, एकच अक्षर असणारा -असलेला; as, "U. word."

Uniloc'ular *a.* (*biol.*) *having one cell or cavity only* एकाशय; as, "U. capsule."

Unimag'inable *a.* कल्पनेबाहेरचा, अकल्पनीय, अचिंत्य, अतर्क्य, कल्पनातीत.

Unimag'ined *a.* अकल्पित, अचिंतित, अतर्कित.

Unimpaired' न बिघडलेला, न ढासळून गेलेला (health), शाबूत.

Unimpas'sioned *a.* आवेशशून्य, अचल मनोविकार नसलेला. (b) बिनजोराचा, बिनआवेशाचा, मचाळ.

Unimp'eachable *a.* (सार्वजनिक रीतीनें) दोषारोप न

करतां येण्यासारखा, निर्दोष, अदूषणीय, अनिंद्य.
Unimpeached *a.* अदूषित, अनिंदित. [लहान, लघु
Unimpo'rtant *a.* बिनमहत्वाचा, उपेक्षणीय, हलका,
Unimpregnated *a.* गर्भधारणा न झालेला, गर्भ न राहिलेला, गर्भधारणाशून्य. २ (आंत) न भरलेला.
Uninfected *a.* (मलमूत्रादि संसर्गानें) न बिघडलेला, दूषित न झालेला, अदूषित.
Uninflamed *a.* अनुद्दीप्त, अप्रदीप्त, अदीपित, अतापित, असंतापित, अतप्त, असंतप्त.
Uninflam'mable *a.* पेट न घेणारा, न चेतणारा, अज्वालाग्राही, अज्वलनशील, अदाह्य. [अपरिचित.
Uninforme'd *a.* माहिती नसलेला. २ ज्ञान नसलेला,
Unin'genious *a.* युक्तिशून्य, युक्तिहीन, कल्पकबुद्धिशून्य.
Uninge'nuous *a.* कुडा, कपटी, कुटिल, अप्रांजल, असरल.
Uninhab'itable *a.* वस्ती करण्यास अयोग्य, अवास्य.
Uninhab'ited *a.* उजाड, निर्जन, निर्मनुष्य, विजन, वस्तिहीन, बिननांवता, बेचिराख, बेचिराग.
Uninitiated *a.* बिनमुंडलेला, असंस्कारित, संस्काररहित, संस्कारहीन, अजातसंस्कार, अदीक्षित, अनुपदिष्ट. २ (एखाद्या विषयांत) प्रवेश न केलेला.
Unin'jured *a.* इजा न झालेला, न दुखावलेला.
Uninstru'cted *a.* न शिकवलेला, अशिक्षित.
Unintel'ligent *a.* बुद्धीचा जड, बुद्धीचा मंद, जडबुद्धि.
Unintel'ligible *a.* न समजण्यासारखा, समजण्यास कठीण, दुर्बोध. २ (*philos.*) बुद्धीच्या पलीकडचा, इंद्रियातीत.
Unintended, Uninten'tional *a.* हेतु नसलेला, अहेतुक, अहेतुपूर्वक, अहेतुपुरःसर, सहजींचा.
Uni'nterested *a.* हितसंबंध नसलेला, स्वार्थसंबंध नसलेला, स्वार्थरहित, स्वार्थशून्य.
Unin'teresting *a.* अमनोरंजक, अचित्तवेधक, अहृदयंगम.
Unintermi'tted, Unintermit'ting *a.* खळ नसलेला, न खळणारा, अविरत, निरंतर, अखंड, अखंडित.
Unintermit'tedness *n.* अखंडपणा *m*, निरंतरता *f*.
Unintermit'tingly *adv.* निरंतर, सतत, संतत, अखंड, खळ पडल्याशिवाय, एकसारखा, अविच्छिन्न.
Uninterrup'ted *a.* खळ न पडलेला, अव्याहत, अविच्छिन्न, अस्खलित, अविरत, अखंडित, खंड न पडलेला.
Uninven'ted *a.* (बुद्धीनें) शोधून न काढलेला. २ अकल्पित, नव्यानें न रचलेला, पूर्वींचा. [युक्तिविरहित.
Uninven'tive *a.* कल्पनाशक्तिशून्य, अकल्पक, युक्तिशून्य,
Uninvited *a.* न बोलावलेला, बिनबोलावलेला, अनाहूत, अनिमंत्रित. २ आमंत्रण रद्द केलेला.
Uninviting *a.* *unattractive, repellent* अचित्ताकर्षक, मन न घेणारा, कंटाळा आणणारा.
Union (ūn'yun) [Fr. -L. *unio* -*unis*, *unus*, one.] *n.* *uniting* एक करणें *n*, एकत्र करणें *n*, ऐक्य करणें *n*, जोडणें, मिलाफ करणें, एकोपा करणें. २ *being united* एक होणें, ऐक्य होणें -असणें *n.* ३ *coalition, junction* एकी *f*, मिलाफ *m*, संयोग *m*, जोड *m.* ४ *matrimony, marriage* (विवाहानें झालेला) ऐक्यसंबंध *m*, ऐक्य

n. ५ *concord, agreement* एकपणा *m*, एकोपा *m*, ऐक्य *n*, एकी *f*. (b) मेळ *m*. [U. OF SOUNDS स्वरमेळ.] ६ *a whole resulting from a combination of parts* संघ *m*. [TRADES U. व्यापारी संघ *m*.] ७ *kind of joint or coupling for pipes* सांधा *m*. ८ (*chem.*) मिलाफ *m*, संयोग *m*.

Un'ionist *n*. ट्रेडयुनियनचा सभासद *m*. २ (ग्रेटब्रिटन आणि आयर्लंड यांचें अविभक्त पार्लमेंट असावें, आयर्लंडला स्वराज्य मिळून त्याचें वेगळें पार्लमेंट असूं नये असें म्हणणारा) अविभक्ततावादी *m*, संयुक्तमतवादी.

Union-jack एकीचें निशाण. (It is the flag of England.)

Uni'parous *a. producing one at a birth* एकप्रसू, एका वेळीं एकच पोर प्रसवणारी.

Unipla'nar (*math.*) एकधरातलीय.

Unipo'lar (Induction) *a*. एकध्रुवीय. [एकमात्र.

Unique' *a. single in its kind* अनन्यसाधारण, विलक्षण,

Unirrigated *a*. कालव्याच्या पाण्यानें न भिजविलेला, कालव्याच्या पाण्यानें लागवडीस न आणलेला.

Unisex'ual स्त्रीकेसर किंवा पुंकेसर यांपैकीं एकच असलेलें (पुष्प), एकलिंगी. उ. पोपया, भोपळा इत्यादि.

U'nison *n*. (in music) नादैक्य *n*, स्वरैक्य *n*, स्वरमेळ *m*, एकतान *f*, एकताल *m*. [THAT IS IN STRICT U. सायसंगीत.] २ ऐक्य *n*, ऐकमत्य.

U'nisonance *n*. एकतालता *f*, एकतानता *f*, एकस्वरता *f*.

Unisonant (ū'-niso-nant) [L. *unus*, one, *sonans*, *pr. p.* of *sonare*, Sk. स्वन्, to sound.] *a. being in unison* एक तालांत असणारा, एक सुरांत असणारा.

Unit (ū'nit) [L. *unus*, one.] *n*. एक *m*, एकांक *m*, एकम् *m*. [U. OF HEAT उष्णतेचा ए. U. JAR ए. पात्र. U. OF RESISTANCE विद्युत्प्रतिबंधाचा ए. U. OF STRESS दाबाचा ए. U. OF VALUE मूल्याचा ए. U. OF WORK कामाचा ए. ए.=एकम्.] २ (*philos.*) व्यक्ति *f*, व्यष्टि *f*, एकबीज *n*.

Unitarian (ū-ni-tā'ri-an) L. *unitas*, unity -*unus*, one.] *n. one who asserts the unity of the Godhead as opposed to the Trinity, and ascribes divinity to God the Father only* ईश्वर एकात्मक आहे, व पिता, पुत्र व पवित्र आत्मा असा त्रयात्मक नाहीं असें मानणारा ख्रिस्ती *m*, एकात्मकेश्वरवादी *m*.

Unita'rianism *n*. एकात्मकेश्वरवाद *m*. २ एकात्मकेश्वर-संप्रदाय *m*.

U'nitary *a*. एकंचा. [U. THEORY (*chem.*) एकाणुक-सिद्धांत. U. SYSTEM (of arithmetic) एकमानगणित.]

Unite (ūnīt') [L. *unus*, one.] *v. t. to make into one* एक करणें, एकत्र करणें, जोडणें, मिळवणें, सांधणें, एकीकरण -संयोग करणें *g. of o.*, संयुक्त करणें. २ *to make to agree* एकपणा -ऐक्य -एकोपा करणें *g. of o.*, एक करणें, एकचित्त -एकदिल -एकमन करणें. U. *v. i. to become one* एक होणें, एकत्र होणें, संयोग होणें *g. of s.*, मिळणें. २ *to agree* मिळणें, एकदिल -संमत होणें.

Unit'ed *pa. t.* U. *pa. p.* जोडलेला, मिळवलेला, एक

झालेला, एक केलेला, संयुक्त. [ UNITED STATES संयुक्त संस्थानें. UNITED COUNTRIES (पोष्टाच्या व्यवस्थेसंबंधानें) गटांत सामील केलेले देश. UNITED KINGDOM संयुक्त राज्य, (ग्रेटब्रिटन आणि आयर्लंड). UNITED PROVINCES संयुक्त प्रांत.] २ एक केलेला, एकचित्त, एकमत, एकदिल, एका मनाचा, एका विचाराचा.

Uni'tedly *adv.* मिळून, मिळणीनें, एकोप्यानें, एकदिलानें.

U'nity *n.* एकपणा *m*, ऐक्य *n*, एकी *f.* २ *agreement* ऐक्य *n*, मिलाफ *m*, मेळ *m*, एकदिल *m*, एकचित्त *n*.

Univ'alence *n.* ( *chem.* ) एकमूल्यकत्व *n*.

Univ'alent *a.* एकमूल्यक.

Univalve ( ū'ni-valv ) *a. having one valve or shell only* एककवची (मृदुमांसप्राणी). U. *n. a shell of one valve only* एककवची शिंपा *m*, एककवची शुक्तिका *f.* २ *a mollusc whose shell is composed of a single piece* एका कवचांत राहणारा मृदुमांसप्राणी *m*.

Universal ( ū-ni-vėr'-sal ) [ L. *unus*, one, and *vertere*, *versum*, to turn.] *a.* (of place) सर्व ठिकाणचा, सार्वत्रिक, सर्वव्यापी, सर्वव्यापक, विश्वव्यापी, सर्वगत, सर्व जगाचा, सर्व विश्वाचा, विश्वाचा. २ *of or belonging to or done by all persons or things in the world* सर्वांचा, सर्वांविषयींचा, सर्वसंबंधी, सर्वविषयक, सर्वसाधारण, सर्वांना लागू पडणारा सार्वजनिक, सार्वजनीन. ३ (logic) सार्वत्रिक, सामान्य. [ Universal PROPOSITION सार्वत्रिक सिद्धान्त, सामान्य सिद्धान्त. U. AFFIRMATIVE PROPOSITION सामान्यविधायक सिद्धान्त, अन्वयव्याप्तिसिद्धान्त, अन्वयव्याप्तिप्रतिज्ञा. U. NEGATIVE PROPOSITION सामान्यनिषेधक सिद्धान्त *m*, व्यतिरेकव्याप्तिसिद्धान्त, व्यतिरेकव्याप्तिप्रतिज्ञा *f.* U. DISTRIBUTION व्याप्ति *f.*]

Univer'salism *n.* सर्वमुक्तिवाद *m*, न्यायाच्या दिवशीं सर्व आत्म्यांना मुक्ति मिळेल असें ख्रिस्ती लोकांचें मत *n*.

Universal'ity *n.* सर्वव्यापिता *f*, विश्वव्यापिता *f*, सर्वव्यापकत्व *n*, सार्वत्रिकत्व *n*, सार्वत्रिकता *f*, सर्वसंबंधिता *f*, सर्वसाधारण्य *n*.

Univer'sally *adv.* सर्वत्र, सर्व ठिकाणीं, सर्व स्थळीं, सर्वतः. २ सर्वांस, सर्वांविषयीं, सर्वांसंबंधीं. ३ व्यापक रीतीनें.

Universal maxims परसामान्य तत्त्वें *n. pl.*

Universe (ū'-ni-vėrs) *n. the whole system of created things* विश्व *n*, जग *n*, जगत् *n*, जगती *f*, सृष्टि *f*, भूतसृष्टि *f*, ब्रह्मसृष्टि *f*, प्रत्यक्षसृष्टि *f*, त्रिभुवन *n*, त्रैलोक्य *n*, ब्रह्माण्ड *n*, ब्रह्मगोल *m*. [ SOUL OF THE U. जगदात्मा *m*, विश्वात्मा *m*, परमात्मा *m*, ब्रह्म *n*. THE DOCTRINE OF THE NON-EXISTENCE OF THE U. जगन्मिथ्यात्ववाद *m*.]

University ( ū-ni-vėr'si-ti ) *n.* विश्वविद्यालय *n*, युनिव्हर्सिटी *f.* २ विश्वविद्यालयाचे सभासद *m. pl.* ३ युनिव्हर्सिटींतील क्रिकेट वगैरे खेळांतील भिडू *m. pl.*, युनिव्हर्सिटीटीम *f.* [[U. TERMS एकार्थी पदें.]

Uni'vocal *a.* (contrasted with *equivocal*) एकार्थी.

Unjust' *a.* ( of agents) अन्यायी, बेइनसाफी, अन्यायमार्गी. २ (of actions) अन्याय्य, अन्यायाचा, बेइनसाफाचा, बेइनसाफी, गैरवाजवी.

Unjust'ly *adv.* अन्यायानें, अन्यायेंकरून, बेइनसाफानें, अधर्मानें, गैरइनसाफानें, अन्यायतः, नाहक, गैरवाजवी.

Unkempt ( un'kemt ) [ Prefix *un-*, and A. S. *cemban*, to comb.] *a. uncombed* न विंचरलेला, साफसूफ न केलेला. २ *rough, unpolished* पालिस न केलेला, खडबडीत, ओबडधोबड.

Unkenn'el *v. t. to drive from a kennel or hole* घरांतून -बिळांतून उठविणें -बाहेर हांकून लावणें; as, "To U. a fox." २ *to rouse from secrecy or retreat* लपून बसण्याच्या ठिकाणाहून उठविणें.

Unkind' *a.* निर्दय, निष्ठुर, ममता नसणारा, दया न येणारा, कठोर, कृपाशून्य.

Unkind'ly *adv.* निर्दयपणानें, दयेवांचून, ममतेवांचून, गैरममतेनें, कठोरपणानें. २ बाधेलसा, जाचेलसा, नडेलसा; as, "The food sits U. upon his stomach."

Unkind'ness *n.* निर्दयपणा *m*, निष्ठुरता *f*, कठोरपणा *m*.

Unking' *v. t.* राजपद काढून घेणें, पदच्युत करणें.

Unknelled ( un-neld' ) *untolled* (मृत्युसूचक) घंटा न वाजविलेला.

Unknit ( un-nit' ) *v. t. to seperate or loose what is knit or knotted* सोडवणें, उलगडणें, उस्तरणें.

Unknot ( un-not' ) *v. t. to free from knots* गांठ सोडणें.

Jnknow'able *a.* अज्ञेय.

Unknow'ing *a. ignorant* अज्ञ, न जाणणारा, अजाणता, [ नेणता.

Unknow'ingly *adv.* न कळत, न जाणतां, न समजतां.

Unknown' *a.* माहीत नसलेला, अपरिचित, अनोळखी, अनोळखीचा, गैरमाहितीचा, अज्ञात. २ *unseen* न पाहिलेला, न देखलेला. ३ ( algebra ) अव्यक्त.

Unla'boured *a.* सहजस्फूर्तीचा, स्वाभाविक, अकृत्रिम, अपरिश्रमसाध्य, स्वयंस्फूर्त; as, "U. poetry." २ मशागत न केलेला; as, "U. fields." ३ परिश्रमानें न मिळविलेला; as, "U. harvest."

Unlace' *v. t. to loose the dress of* ( पोषाखाचे, बुटाचे ) बंद सोडणें.

Unlade' *v. t.* ओझें -माल उतरणें -काढणें, खाली -रिकामा [ करणें.

Unlaw'ful *a.* बेकायदा, बेकायदेशीर, गैरकायदेशीर, कायद्याविरुद्ध. २ ( Bible ) अधार्मिक, धर्मविरुद्ध, धर्मशास्त्राविरुद्ध, अशास्त्र.

Unlaw'fully *adv.* बेकायदेशीरपणानें, कायदा मोडून -सोडून -तोडून, गैरकायदेशीरपणानें.

Uulaw'fulness *n.* बेकायदेशीरपणा *m*, गैरकायदेशीरपणा *m*. २ शास्त्रविरुद्धता *f*, अधार्मिकता *f*.

Unlead' *v. t.* ( जुळलेल्या मजकुरांतील ) लेडा काढणें.

Unlearn' *v. t.* विसरणें, विसरून जाणें; as, "Indians now-a-days are *unlearning* their vernaculars." २ सोडणें, टाकणें; as, "To U. a bad habit."

Unlear'ned *a.* न शिकलेला, विद्या नसलेला, विद्याविहीन, अज्ञानी, अज्ञ, अनभ्यस्त. २ अभ्यासानें न मिळालेला, अनभ्यासप्राप्त. ३ विद्वत्ताविहीन.

Unlea'vened *a.* न आंबवलेला, बिनखमिरी, बिनफुगवलेला, बेखमीर.

Unless (unles') [Formerly *on les, on lesse,* in phrase *on lesse, that,* in less than.] *conj.* खेरीज, शिवाय, वांचून; as, "I will not go U. you come, =तुम्ही आल्याखेरीज -तुम्ही आल्यावांचून मी जाणार नाहीं. I will come tomorrow U. it should be raining पाऊस न पडला तर -पाऊस पडत नसला तर मी उद्यां येईन."

Unlet'tered *a.* निरक्षर, विद्या नसलेला, न शिकलेला.

Unli'censed *a.* परवाना नसलेला, बिगरपरवाना, लेसन नसलेला. [लेसन is a corruption of English licence.] २ *unrestrained* निरर्गल, बेतालपणाचा.

Unlike' *a.* निराळा, वेगळा, असमान, असम, असदृश, अतुल्य, भिन्न, विलक्षण. २ (*math.*) असमान.

Unlike'lihood, Unlike'liness *n.* असंभव *m.*

Unlike'ly *a.* असंभवनीय, असंभाव्य, न होण्याजोगा, न होण्यासारखा.

Unlike'ness *n.* भिन्नता *f*, निराळेपणा *m*, असमानता *f*, विषमता *f*, असाम्य *n*, असादृश्य *n*.

Unlim'ited *a.* अनंत, अमर्याद, अमर्यादित, अपरंपार.

Unline' *v. t. to remove the lining* अस्तर काढणें.

Unload' *v. t.* (माल -ओझें) उतरणें -काढणें *g. of o.*, खाली -रिता करणें. २ (बंदूक) रिकामी करणें.

Unlock' *v. t.* कुलूप काढणें, कुलूप उघडणें. २ (हृद्गत) दुसऱ्याला सांगणें.

Unlooked for *a. unexpected* अनपेक्षित, अकल्पित, कल्पनेबाहेरचा, आकस्मिक.

Unloose' *v. t. to make loose, to set free* सोडणें, मोकळा करणें, बन्धमुक्त करणें.

Unlove'liness *n.* असौंदर्य *n*, अलावण्य *n*, असौष्टव *n*.

Unlove'ly *a.* असुंदर, अरम्य, अमनोहर.

Unluck'ily *adv.* दुर्दैवानें, दुर्दैवेंकरून, कमनशिबानें.

Unluck'y *a.* दुर्दैवी, कमनशिबी, दुर्भागी, अभागी. २ *not resulting in success* अपयशाचा, कमनशिबाचा, दुर्भाग्याचा, दुर्दैवाचा. ३ *inauspicious* अभद्र, अशुभ, अमंगल, दग्ध.

Unmak'e *v. t.* (आकार, गुण, इत्यादि) नाहींसा करणें. २ [(laws) रद्द करणें.

Unman' *v. t. to dispirit* पराक्रमभंग *m.* करणें *g. of o.*, पराक्रमहीन -हीनपराक्रम करणें. २ *to deprive of men* मनुष्यें *n. pl.* काढणें, माणसें कमी करणें; as, "To U. a ship." ३ वीर्यशून्य करणें, पौरुषहीन करणें.

Unman'ageable *a.* व्यवस्था करितां न येणारा. २ (horse, &c.) आटोक्यांत ठेवतां न येणारा, कह्यांत ठेवतां न येणारा, अनिवार, बेफाम.

Unmanifested *a.* अव्यक्त, अप्रकट, अप्रगट.

Unman'like *a.* बायकी, पोरकट, पुरुषास न शोभणारा.

Unman'ly *a.* पुरुषास न शोभणारा, पौरुषास न शोभणारा. २ (conduct) भित्रेपणाचा. ३ नीचपणाचा, नीच.

Unmann'ored *a.* दांडगा, असभ्य, आडदांड, रीत नसलेला.
Unman'nerliness *n.* गैरशिस्तपणा *m*, अशिष्टता *f*, असभ्यता *f*.
Unman'nerly असभ्य, गैरशिस्त, असभ्यवृत्ति.
Unmanured' *a.* खत नसलेला, खत न घातलेला, बिनखती.
Unmarked' *a. having no mark* बिनखुणेचा, खूण नसलेला, निशाणी नसलेला, बिननिशाणीचा. २ *unobserved* न पाहिलेला, न बघितलेला, लक्ष लावून न पाहिलेला, अलक्षित.
Unmarried' *a.* अविवाहित, लग्न न झालेला, निंबा.
Unmask' *v. t.* उघडा करणें. [तीय. २ विजोड.
Unmatched' जोड नसलेला, बिनतोडीचा, अप्रतिम, अद्वि-
Unmatured *a.* कच्चा, हिरवा, अपक्क.
Unme'aning *a.* अर्थशून्य, अनर्थक, पोकळ, रिकामा, रिकामका, रिता, वायफळ.
Unmean'ingness *n.* अर्थशून्यता *f*, अर्थराहित्य *n*.
Unmeant' *a. unintended* मनांत नसलेला, अनिच्छित.
Unmeas'ured *a.* न मोजलेला, बिनमोजलेला, अपरिमित, अमोज. २ *irregular* निर्यमक; as, "U. verse."
Unme'ditated *a.* पूर्वी विचार न केलेला, पूर्वी न ठरविलेला, अचिन्तित, अपूर्वचिन्तित.
Unmer'ciful *a.* निर्दय, दयाहीन, निष्ठुर, निष्करुण. Unmer'cifully *adv.* निर्दयपणानें, निष्ठुरपणानें. Unmer'cifulness *n.* निर्दयपणा *m*, निष्ठुरपणा *m*.
Unmer'ited *a.* फुकट मिळालेला, परिश्रम न करितां मिळालेला. २ गैरवाजवी.
Unmind'ful *a.* (with *of*) निष्काळजी, बेफिकीर, गैरसावध. Unmind'fulness *n.* निष्काळजीपणा *m*.
Unmin'gle *v. t. to separate things mixed* मिसळलेल्या वस्तु निराळ्या करणें. [(grain) निखेड.
Unmin'gled *a.* बिनमिसळीचा, निर्भेळ, अमिश्रित. २
Unmoles'ted *a.* निरुपद्रव, उपद्रवरहित.
Unmoor' *v. t. to loose from being moored or anchored* नांगर वर घेणें, जहाज (सोडून) हाकारणें.
Unmoun'ted *a.* बिनघोड्यावरचा (पोलिस). २ (कागदावर) न चढविलेला (फोटो, वगैरे). ३ (कोंदणांत) न बसविलेला.
Unmoved' *a.* स्थिर, न हालवलेला. २ *unaffected* न द्रवलेला, अंतःकरणांत चलबिचल न झालेला. ३ *unchanged in purpose* अचल, कायम, न बदललेला, स्थिर. [पडदा काढणें -काढून घेणें.
Unmuff'le *v. t. to take a muffle or covering from*
Unmu'sical *a.* बेसूर, बदसूर, कर्णकटु. २ (ear) गायनांत अनभिज्ञ, बिनपारखी.
Unmu'tilated *a.* छिन्नविच्छिन्न न केलेला, अच्छिन्नभिन्न.
Unmuzz'le *v. t. to take a muzzle off* मुस्कें काढणें, मुस्कें सोडणें.
Unnail *v. t.* खिळे काढणें. २ *to unfasten by removing nails* खिळे काढून मोकळा करणें.

Unnamed' *a.* नांवाचा निर्देश न केलेला, नांव न घेतलेला, अनामनिर्दिष्ट, निनांवी.
Unnat'ural *a.* अस्वाभाविक, स्वधर्मविरुद्ध, स्वभावविरुद्ध, स्वजातिविरुद्ध. २ *contrary to the laws of nature* अस्वाभाविक, निसर्गविरुद्ध, निसर्गबाह्य, सृष्टिक्रमाबाहेरचा, सृष्टिक्रमबाह्य, विलक्षण, गैररीतीचा.
Unnec'essarily *adv.* कारणावांचून, गरजेवांचून, अगत्यावांचून, विनाकारण, जरूरीशिवाय, उगाच, उगीच, उगेंच.
Unnec'essariness *n.* निष्कारणपणा *m*, अनावश्यकता *f*.
Unnec'essary *a.* निष्कारण, बिनजरूरीचा, नम्रता, अनवश्यक, कारण नसलेला. [ धर्मास विरुद्ध.
Unneigh'bourly *a.* शेजारधर्मास न शोभेसा, शेजार-
Unnerve' *v. t. to deprive of strength* कमजोर -कमकुवत करणें, बळ -जोर नाहींसा करणें *g. of o.*, निर्बळ -बलहीन करणें. (b) घाबरवणें, घाबरवून सोडणें.
Unnum'bered *a.* असंख्य, असंख्यात, अगणित.
Unobjec'tionable *a.* हरकत न घेण्यासारखा, आक्षेप न घेण्यासारखा, आक्षेपाक्षम, अदूषणीय.
Unobserved' *a.* न बघितलेला, न पाहिलेला, अलक्षित, अनिरीक्षित.
Unobstruc'ted *a.* बिनअटकावाचा, बिनहरकतीचा, न रोधलेला, निर्विघ्न, अप्रतिबंध, निष्प्रतिबंध, अबाधित.
Unobtainable *a.* अप्राप्य, अलभ्य, असाध्य, दुर्लभ.
Unobtained *a.* अप्राप्त, अलब्ध, असंपादित, न मिळवलेला.
Unoc'cupied *a.* वापरांत नसलेला, रिकामा, रिकामका रिता, खाली. २ *unemployed* रिकामा, निरुद्योगी.
Unoffen'ding न चिडवणारा, न चिथवणारा, न खिजवणारा, राग न आणणारा. २ निरुपद्रवी, गरीब.
Unopened *a.* ( bales or packages ) न उघडलेला, बिनउघडलेला, सबंध. [२ प्रतिस्पर्धी नसलेला.
Unoppose'd *a.* अटकाव -अडथळा न झालेला, अप्रतिहत.
Unor'ganised *a.* विस्कळित, अव्यवस्थित, सुव्यवस्थित न केलेला, व्यवस्था न लावलेला, सुसंघटित नसलेला.
Uno'rnamented *a.* अलंकार नसलेला, अलंकारविहीन, अनलंकृत, अभूषित, अमंडित.
Unostent'atious *a.* बिनडौलाचा, बिनभपक्याचा, साधा.
Unor'thodox *a.* अपुराणप्रिय, प्राचीन चालीरीतींचा निरभिमानी, परंपरागत पक्षाभिमान नसलेला.
Unowned' *a.* निवारशी, निवारशीक, अस्वामिक.
Unpack' *v. t. to open and take out* सोडणें, काढणें, उपसून काढणें. [लेला.
Unpaged *a.* पानांचे आंकडे न घातलेला. २ पानें न पाड-
Unpaid *a.* हांशील न भरलेलें ( पत्र ), नाटपेट. २ पगार नसलेला, बिनपगारी; as, "U. candidate."
Unpalatable *a.* बेचव, अरुचिकर. २ *disagreeable* (advice) नावडता, न रुचणारा, अप्रिय.
Unparliame'ntary *a.* पार्लमेंटच्या वहिवाटीविरुद्ध ( भाषा, वगैरे). २ असभ्य, शिष्टाचारविरुद्ध.
Unparalleled *a.* जोड नसलेला, तुलना नसलेला, अद्वितीय, अतुल, अतुल्य, अप्रतिम, अनुपम, निरुपम, अपूर्व.

Unpar'donable *a.* क्षमा न करण्यासारखा, अक्षम्य.
Unpardoned *a.* माफी न दिलेला, क्षमा न केलेला.
Unparticularized *a.* अविवक्षित, अविशेषित.
Unpausing *a.* न थांबणारा, निरंतरचा.
Unpeopled वस्ती नसलेला, निर्जन.
Unperc'eivable *a.* अगोचर, इंद्रियागोचर.
Unperceived *a.* न पाहिलेला, लक्षांत न आलेला, अलक्षित. [भूमीवर) न केलेला.
Unperformed' *a.* न केलेला, अकृत, असाधित. २ (रंग-
Unpersua'dable *a.* समजूत करतां न येण्यासारखा, वळवतां न येण्यासारखा, आग्रही.
Unperturbed *a.* न क्षोभविलेला, अक्षुब्ध, निरुद्विग्न.
Unphilosoph'ic,-al *a.* तत्त्वान्वेषणाक्षम, तत्त्वज्ञान्याला अयोग्य, तत्त्वज्ञानपद्धतिविरुद्ध, तत्त्वज्ञानशक्तिशून्य, तत्त्वज्ञानाविरुद्ध.
Unpick' *v. t.* टांके तोडणें. [अखंड, सलग.
Unpieced *a.* *not made up of pieces* एकसंध, एकसंधी,
Unpin' *v. t.* पिना *f. pl.* काढणें *g. of o.* as, "To U. a frock, a frame." Unpinned *pa. t.* and *pa. p.*
Unplaced' *a.* यादींत दाखल न केलेला.
Unplea'sant *a.* *disagreeable* अप्रिय, नावडता, बरा न लागणारा, नावडीचा, अपसंत, अप्रीतीचा, विषम.
Unploughed *a.* न नांगरलेला, बिननांगरलेला.
Unpoe'tic, Unpoet'ical (passage) नीरस, काव्यरसशून्य, अहृदयंगम. २ (mind) कवित्वशक्तिशून्य.
Unpoisonous *a.* अविषारी, बिनविषाचा, निर्विष, गोडा.
Unpo'lished *a.* *unelaborated* पालिस न केलेला, अपरिष्कृत, साधा. २ *impolite* असभ्य, अशिष्ट, ग्राम्य.
Unpollu'ted *a.* अदूषित, अभ्रष्ट, निर्दूषित, निर्मल.
Unpo'pular *a.* अलोकप्रिय, लोकांचे नावडीचा, लोकांचे नापसंतीचा.
Unpopularity *n.* अप्रियता *f.* लोकांचा नावडतेपणा *m.*
Unpos'ted *a.* पोष्टांत न टाकलेला; as, "An U. letter." २ पुरी माहिती नसलेला.
Unpounded *a.* (*rice, &c.*) असडा, असडी.
Unpra'ctised *a.* (*of persons*) गैरवापरलेला, गैरवहिवाटलेला, अनभ्यासी, अनभ्यस्त, कोरा, नवखा, नवा, अननुभवी.
Unpre'cedented *a.* अभूतपूर्व, अजातपूर्व, अपूर्व.
Unprej'udiced *a.* *impartial* (पूर्वग्रहानें) अदूषित, अपूर्वग्रहदूषित. [कल्पित, अपूर्वचिंतित.
Unpreme'ditated *a.* पूर्वी विचार न केलेला, अपूर्व-
Unprepared *a.* बिनतयारीचा, तयारीवांचूनचा, तयार नसलेला, सिद्ध नसलेला. २ पूर्वी तयार न केलेलें (भाषण), प्रसंगस्फूर्त.
Unprescribed' *a.* अविहित, अनुक्त, अविध्युक्त.
Unpreten'ding *a.* साधा, खोटा डौल न करणारा.
Unpreven'table *a.* अनिवार्य, टाळतां न येणारा.
Unpreven'ted *a.* न निवारलेला, अनिवारित, अवारित.
Unpriced' *a.* किंमती न ठरविलेला; as, "U. goods."

Unprin'cipled *a.* दुराचारी, दुराचरणी, दुर्वृत्त, नीतितत्त्वां- प्रमाणें न वागणारा, बंधनें न जुमानणारा.

Unproduc'tive *a.* (*of soil*) नापीक, निपिकी, बिनपिकी. २ *fruitless* कोरडा, निरर्थक, निष्फल, अनुत्पादक.

Unprofes'sional *a.* (विशिष्ट) धंदा न करणारा; as, "An U. singer." २ धंद्याच्या बाहेरचा; as, "U. critic." ३ धंद्याच्या संप्रदायाविरुद्ध, धंद्याविरुद्ध.

Unpro'fitable *a.* बिननफ्याचा, बिनफायद्याचा, गैर- फायदेशीर, बिनकिफायतीचा, कोरडा, निरर्थक, विफल.

Unprof'itableness *n.* निरर्थकपणा *m*, फलराहित्य *n*.

Unprofitably *adv.* फळावांचून, व्यर्थ, निष्फळ, फुकट.

Unprohibited *a.* न निषेधलेला, गैरमनाईचा, अनिषिद्ध.

Unpropi'tiable *a.* दुराराध्य, दुर्वश.

Unpropiti'ous *a. inauspicious* अशुभ, अमंगल, अनिष्ट.

Unpropi'tiousness *n.* अशुभता *f*, अनिष्टता *f*.

Unpropor'tionate *a.* बिनप्रमाणाचा, अप्रमाणाचा.

Unpropor'tioned *a.* प्रमाणांत नसलेला -न बसविलेला.

Unpros'perous *a.* खालावलेला, खालावत चाललेला, भरभराट नसलेला, अयशस्वी.

Unpros'perousness *n.* खालावलेली स्थिति *f*.

Unprotec'ted *a.* अरक्षित, असंरक्षित, संरक्षण नसलेला, संरक्षण न केलेला.

Unproved' *a.* सिद्ध न केलेला, स्थापित न केलेला, शाबीत न केलेला, नाशाबीत. २ *untested* कसाला न लावलेला, न ताडलेला, बिनताडलेला, अपरीक्षित.

Unprovi'ded *a.* (पैशाची वगैरे) पुढची तरतूद न केलेला. २ (सामानसुमानाचा) पुरवठा न केलेला.

Unprovoked' *a.* बिनचिथवणुकीचा, बिनचिडवणीचा, बिनकुरापतीचा, न चिथवलेला, चिथवणूक नसलेला.

Unpu'blished *a.* प्रसिद्ध न केलेला, अप्रसिद्ध. २ अ- प्रकाशित (ग्रंथ वगैरे).

Unpun'ishable *a.* शिक्षा करितां न येण्यासारखा, अदंड्य.

Unpun'ished *a.* शिक्षा न केलेला, अदंडित.

Unqual'ified *a.* योग्यता नसलेला, योग्य गुण नसलेला, अयोग्य, नालायक, अनुपयुक्त. २ सर्यादित न केलेला, मर्यादारहित, सपशेल, बिनअटीचा, बिनकसरीचा. [U. APOLOGY सपशेल माफी *f*.] ३ योग्य परीक्षा न उतर- लेला; as, "An U. Candidate." ४ कायद्याच्या दृष्टीनें योग्यता न आलेला; as, "A minor *unqualified* by age." ५ संपूर्ण, पुरा; as, "U. success."

Unquen'chable *a.* भागवितां न येणारा, शान्त न करतां येणारा, न विझवावयाचा &c., अशमनीय.

Unquenched *a.* न विझवलेला, अशमित, न भागविलेली (तहान).

Unque'stionable *a.* निर्विवाद, अशंकनीय, निस्संश- [याचा, निस्संशय.

Unques'tioned *a.* (ज्याच्या संबंधानें) शंका नाहीं असा, शंका नसलेला, अशंकित, निःशंक, प्रश्न नसलेला, निर्विवाद. [विचारणारा, अशंकाशील.

Unques'tioning *a.* शंका न घेणारा, कां म्हणून न

Unqu'iet *a.* अस्वस्थ, अशांत, शांतिहीन -शून्य -रहित, क्षुब्धतेचा, अस्वस्थतेचा; as, "U. times."

Unqui'etness *n.* अस्वस्थपणा *m*, अशांतपणा *m*, अशांति *f*, शांतिराहित्य *n*.

Unrav'el *v. t. to disentangle, to free from complication* उकलणें, उलगडणें, उलगडा *m*. उकल *m*. -फाड *m*. &c. करणें *g. of o.*, गुंता *m*. काढणें -सोडवणें *g. of o.*

Unravelled *pa. p.* उकललेला, उलगडलेला. [To GET U. उलगडणें.]

Unread' *a.* (of a book) न वाचलेला. २ (of a person) (एखाद्या विषयाचें) वाचन न झालेला.

Unread'iness *n.* तयारी नसणें *n*, सिद्धता नसणें *n*, बिनतयारी *f*.

Unread'y *a.* तयार नसलेला, बिनतयारीचा. २ *slow*, [*awkward* धिमा, सुस्त.

Unr'eal *a.* खोटा, अतात्विक, अवास्तविक, अवास्तव, अतथ्य, असत्, आभासात्मक, भ्रमात्मक.

Unreal'ity *n.* खोटेपणा *m*, अवास्तविकपणा *m*, अतात्विकत्व *n*, अतथ्यता *f*.

Unrea'sonable *a.* गैरवाजवी, अवाजवी, गैरहिशेबाचा, अयोग्य, असमंजस, अयुक्तिसिद्ध, अयुक्तिक, अयुक्तीचा. २ *excessive* फार, अतिशय, बेसुमार, जबर; as, "U. demands." ३ युक्तिवाद -बुद्धिवाद न ऐकणारा, हेकट.

Unrea'sonableness *n.* गैरवाजवीपणा *m*, असमंजसपणा *m*, अयोग्यता *f*. २ अतिशयपणा *m*, बेसुमारपणा *m*.

Unrea'sonably *adv.* गैरवाजवी, गैरहिशोबानें, असमंजसपणानें. २ बेसुमारपणानें, अमर्याद, फार.

Unrea'soned *a.* तर्काला धरून न ठरविलेला, अतर्कसिद्ध, अशास्त्रसिद्ध, गैरशिस्त, गैरवाजवी; as, "U. habits."

Unrea'soning *a.* विचार न करणारा, बुद्धिवाद न ऐकणारा, हेकट, आग्रही.

Unre'compensed *a.* योग्य मोबदला न मिळालेला -न [दिलेला.

Unrecor'ded *a.* नमूद न केलेला, लिहून न टेवलेला, अलिखित, न नोंदलेला.

Unredeemed' *a.* (of promise) पुरा न केलेला, न पाळलेला. २ (of bills) *not fulfilled* भरपाई न केलेला. ३ *not recalled by payment* (खंडणी देऊन) बंधनमुक्त न केलेला. ४ *not taken out of pawn* (गहाण) न सोडवलेला. ५ (of faults) *not mitigated or relieved* (by merits) (गुणांनीं) तीव्रता कमी न केलेला (दुर्गुण).

Unreel' *v. t.* आंख्या उलगडणें.

Unrefined' *a. not purified* शुद्ध न केलेला, मळी न काढलेली (साखर), अशुद्ध, शोधन न केलेला. २ ग्राम्य, रानटी, जंगली, असंस्कृत.

Unreflecting *a.* अविचारी, अविचारशील, असमंजस.

Unrefreshed *a.* ताजातवाना न केलेला -न झालेला.

Unrefuted *a.* खंडन न केलेला, अखंडित, अनिराकृत.

Unregar'ded *a.* लक्ष न दिलेला, उपेक्षित, अवमानित.

Unregen'eracy *a.* मूळची पापदशा *f*, मूळची पापस्थिति *f*.

Unregen'erate *a. not renewed in heart* मूळच्या पापदशेचा, मूळच्या पापस्थितीचा, अपुनर्जात.

Unreg'istered *a.* पटांत न दाखल केलेला, न नोंदलेला. २ (post) रजिस्टर न केलेला, अनरजिस्टर्ड, न लिहून ठेवलेला, बिननोंदलेला.
Unrein' *v. t.* लगाम ढिली सोडणें, लगाम ढिली करणें.
Unrelen'ting *a. cruel* निर्दय, क्रूर, बिनकळवळ्याचा, कठीण, कठोर, कडवा, पाषाणहृदय.
Unreligious *a.* धर्माशीं संबंध नसलेला, धर्मशून्य.
Unremem'bered *a.* आठवण न ठेवलेला, अस्मृत, आठवण न झालेला.
Unremit'ting *a.* सदोदित सारखा, कमजास्त न होणारा, एकसारखा चालणारा -चाललेला, ढिला न होणारा -न झालेला, बिनढिलाईचा, एकनेटाचा, अविरत.
Unremit'tingly *adv.* एकसारखा, एकसहा.
Unremunerative *a.* लाभशून्य, बिनफायद्याचा.
Unrepealed' *a.* रद्द न केलेला, अजातलोप.
Unrequi'eted *a.* परत न दिलेला; as, "U. affection."
Unreserved' *a.* मोकळ्या मनाचा, असंकोची, असंकोचशील वृत्तीचा, खुला. २ *without anything kept back* निश्शेष, पुरा, पूर्ण. ३ (seats) राखून न ठेवलेला.
Unreservedly *adv.* कांहींहि राखून न ठेवतां, मोकळ्या मनानें, मन मोकळें करून. २ निश्शेष, पुरतेपणीं.
Unresis'ting *a.* अप्रतिरोधक, अनिवारक, अनिवारणकर्त्ता, अप्रतिकारकर्त्ता.
Unresolved' *a. undetermined* अकृतनिश्चय, अकृतसंकल्प. २ (doubts or problems) निवृत्ति न झालेला, समाधान न झालेला, न सोडवलेला. ३ *not seperated into constituent parts* पृथक्करण न केलेला.
Unrespected *a.* अनादृत, अमानित.
Unrest' *n. lack of rest, disturbed or agitated condition of person or nation* अस्वस्थता *f*, अशान्तता, अशान्ति *f*, अस्वास्थ्य *n*, गडबड *f*; as, "The Indian U."
Unrestrained' *a. uncurbed, uncontrolled* बेबंद, बेलगाम, अनावर, अनिवारित, उच्छृंखल, निरंकुश, अयंत्रित, अनियंत्रित, अबद्ध. २ *unreserved, free, easy, familiar* बिनसंकोचाचा, संकोचावांचूनचा, असंकोचाचा, खुलाशाचा, संकोचरहित.
Unrevealed' *a.* प्रगट न केलेला, प्रसिद्ध न केलेला, अप्रसिद्ध, अप्रकट, अप्रगट, अनाविष्कृत.
Unrevised *a.* न तपासलेला.
Unrewar'ded *a.* बक्षीस न दिलेला -न मिळालेला, इनाम न दिलेला, फळ न मिळालेला, निष्फळ.
Unrid'dle *v. t.* कोडें सोडवणें, कोडें उकलणें.
Unr'ighteous *a.* (*of persons*) अधर्मी, अधर्मिष्ठ, अधर्मनिष्ठ, अधार्मिक, पापाचारी, अनीतिमान्. २ (*of acts, &c.*) अधर्माचा, अन्यायाचा, अयथान्याय.
Unrigh'teousness *n.* अधर्म *m*, अनीति *f*, अन्याय *m*, अधर्माचार *m*, अन्यायाचार *m*, अधर्माचरण *n*.
Unripe' *a.* बिनपिकलेला, कच्चा, हिरवा, अपक्व.
Unripe'ness *n.* कच्चेपणा *m*, हिरवेपणा *m*, अपक्वता *f*.
Unri'valled *a. unequalled* प्रतिस्पर्धी नसलेला, बिनसरीचा, अनुपम, निरुपम, अतुल, अतुल्य, अप्रतिम.

Unrivalledness *n.* अनुपमता *f*, निरुपमता *f*.
Unrobe′ *v. t.* *to take a robe off* (-वरचा) कोट काढणें.
Unroll′ *v. t.* (गुंडाळी *f.*) उकलणें *g. of o.*, सोडणें, (कपड्यांचें) ठाण उलगडणें, रोळ उलगडणें.
Unroof′ *v. t.* छप्पर काढणें -उस्तरणें -उतरणें -उलगडणें.
Unroot′ *v. t.* *to tear up by the roots* (मुळासकट) उपटून टाकणें, मुळें धरून उपटणें.
Unruf′fled *a.* *calm* संथ, अक्षुब्ध.
Unruled′ *a.* (कोणत्याहि राजाचें) शासन नसलेला, अशासित, अंमलाखालीं नसलेला. २ रेघा न मारलेला, न आंखलेला.
Unru′liness *n.* शिरजोरपणा *m*, बेहुकमीपणा *m*, बेफामपणा *m.*
Unru′ly *a.* शिरजोर, बेहुकमी, बेलगामी, आवरतां न येणारा, अनावर, बेफाम.
Unsadd′le *v. t.* *to take the saddle off* जीन -खोगीर उतरणें -काढणें. २ *to throw from the saddle* (घोड्यावरून) खालीं पाडणें.
Unsafe′ *a.* भयाचा, जोखमाचा, धोक्याचा, असुरक्षित.
Unsafe′ness, Unsafety *n.* भय *n*, जोखीम *n.*
Unsaid′ *a.* न सांगितलेला, अकथित, अनुक्त.
Unsa′lable *a.* Same as Unsaleable.
Unsale′able *a.* न विकण्यासारखा, विकण्यास अयोग्य, अविक्रेय. २ मागणी नसलेला, न खपणारा.
Unsal′ted *a.* न खारावलेला, अळणी, अलवण.
Unsan′ctified पवित्र न केलेला, अपवित्रीकृत.
Unsan′itary *a.* *unhealthy* रोगट, अनारोग्यकारक.
Unsatisfa′ctory *a.* असमाधानकारक, गैरखातरीचा.
Unsat′urated *a.* (*chem.*) असंपृक्त, पूर्णपणें न मुरलेला.
Unsatura′tion *n.* (*chem.*) असंपृक्तता *f.*
Unsaved *a.* (*esp.* in a religious sense) तारण न केलेला. २ अमुक्त, उद्धार न केलेला.
Unsa′vouriness *n.* बेचवपणा *m*, निचवपणा *m*, स्वादराहित्य *n.*
Unsa′voury *a.* *insipid* बेचव, बेमजा. २ *disagreeable* न रुचणारा, नापसंत.
Unsay′ *v. t.* (शब्द, वचन वगैरे) परत घेणें. Unsaid *pa. t. & pa. p.*
Unscathed′ *a.* *not harmed or injured* इजा न झालेला, दुखापत न झालेला.
Unscrew′ *v. t.* मळसूत्र *n.* काढणें *g. of o.*, उखळणें, स्क्रू काढणें.
Unscrip′tural *a.* (वेद, बायबल, कुराण वगैरे) धर्मग्रंथांत न सांगितलेला, अविहित.
Unscru′pulous *a.* उलट्या काळजाचा, दिक्कत नसणारा, पापपुण्याचा विचार नसणारा.
Unseal′ *v. t.* *to remove the seal of* सील काढणें. २ *to open what is sealed* सील फोडून उघडणें.
Unseam′ *v. t.* *to open the seams* उसवणें, उस्तरणें.
Unse′asonable *a.* असमयोचित, अवेळेचा, अकाळाचा, बेवक्ताचा, समयानुचित, असमयानुरूप. [U. TIME अवेळ *f*, अकाळ *m.*]
Unsea′sonableness *n.* असमयौचित्य *n*, अवेळ *f*, असमय *m*, अनवसर *m*, असमयानुरूप्य *n.*
Unsea′sonably *adv.* अवेळीं, अकाळीं, भलत्याच वेळीं.

Unsea'soned *a.* (wood, &c.) न वळसावलेला, बिन-वळसावलेला, न रांपवलेला, पक्का न केलेला. २ (food, &c.) बिनमसाल्याचा.

Unseat' *v. t. to throw from a seat* (on horse-back) खालीं पाडणें. २ *to depose* (M. P. &c.) *from seat* पदच्युत करणें, जागा काढून घेणें. ३ बसलेल्या जागे-वरून उठवणें.

Unseated *pa. p. a.* खालीं पाडलेला. २ पदच्युत केलेला, जागा काढून घेतलेला. ३ *not provided with seats* बैठका नसलेला.

Unsecta'rian *a.* ( संकुचित ) जात्यभिमान नसलेला, आपल्याच जातीचा अभिमान नसलेला.

Unseem'ly *a.* न शोभणारा, अयोग्य, गैरशिस्त; as, "An U. outbreak of temper."

Unseen' *a.* ( पूर्वीं ) न पाहिलेला, न देखलेला. २ *invisible* न दिसणारा, अदृश्य.

Unsel'fish *a.* अस्वार्थी, अस्वार्थदृष्टि, निःस्वार्थी.

Unser'viceable निरुपयोगी, अनुपयोगी, कामांतून गेलेला, अनुपयुक्त, निरुपयुक्त, टाकाऊ. [पणा *m.*

Unser'viceableness *n.* निरुपयोगिपणा *m*, अनुपयोगि-

Unset' *v. t.* कोंदणांतून बाहेर काढणें.

Unsett'led *a.* फैसल्ला न झालेला, बिननिवाड्याचा. २ अनिर्णीत, अनिश्चित, ठाम न केलेला. ३ बिनबंदोबस्ताचा, अव्यवस्थेचा, अव्यवस्थित. ४ अस्थिर, चंचल.

Unsett'ledness *n.* अनिर्णीत स्थिति *f*, अनिश्चय *m*, अनिर्णय *m*. २ अव्यवस्था *f*, अव्यवस्थित स्थिति *f*. ३ अस्थिरपणा *m*, चंचळपणा *m*.

Unsex' *v. t. to deprive* (*usu.* woman) *of the qualities of the sex* मनुष्याचे (विशेषतः स्त्रियांचे) नैसर्गिक धर्म नाहींसे करणें; as, "Higher education *unsexes* the sex."

Unshackled *a.* बिनबेडीचा, बंद सोडलेला, बंधनरहित.

Unsha'ken *a.* न हालवलेला. २ स्थिर, न डगमगलेला.

Unsheathe' *v. t.* म्यानांतून काढणें, उसपणें, उपसणें.

Unshell' *v. t.* Same as to Shell.

Unshelled *a.* सोललेला.

Unsheltered *a.* बिनआश्रयाचा, निराश्रित, उघडा.

Unship' गलबतांतून (माल, उतारू) उतरणें.

Unshod' *a.* नाल काढून टाकलेला ( घोडा ).

Unshoe' *v. t.* नाल काढून टाकणें.

Unshrinka'ble *a.* न आटणारा; as, "U. flannel."

Unsigh'tly *a. ugly* विद्रूप, बेढब, विशोभित.

Unsized' *a.* पांजण न दिलेला, खळ न दिलेला, बिनखळीचा, बिनपांजणीचा. [अचतुर.

Unskil'ful *a.* नाकसबी, अकुशल, कुशलता नसलेला,

Unskil'fulness *n.* अकुशलता *f*, अचतुरता *f*.

Unskilled' *a.* नाकसबी, कसब न शिकलेला, अनिष्णात, कौशल्यहीन, बिनकसबी, बिनवाकबगार.

Unslaked (lime) ( chem. ) भाजलेला (परंतु पाण्यांत न भिजविलेला). [नसलेला.

Unsloping *a.* निढाळ, बिनढाळ, बिनढाळाचा, उतार

Unsmeared *a.* बिनमाखलेला, अलिप्त.

Uns'ociable *a.* एकलकोंडा, एकलकोट, माणूसघाण्या.

Unso'cial *a.* समाज करून न राहणारा, असमाजप्रिय. २ एकलकोंडा, एकलकोट.

Unsoldered *a.* बिनडांकी, बिनडांकाचा.

Unsolicited *a.* बिनमागितलेला, अप्रार्थित, अयाचित.

Unsoli'citous *a.* काळजी नसणारा, निष्काळजी, बेफिकीर.

Unsophis'ticated *a.* सरल, सरळ, अदूषित, अस्सल, चोख. २ साधा, बिनलुच्चाईचा, खरा, सच्चा.

Unsought' *a.* बिनशोधलेला, बिनधुंडलेला, बिनहुडकलेला, अनन्वेषित. २ *unsolicited* अप्रार्थित, अयाचित, न मागितलेला.

Unsound' *a. not sound, diseased, morbid* बिघडलेला, विकृत, लुकसान; as, "U. lung." २ *rotten* बिघडलेला, सडलेला; as, "U. fruit." ३ *ill-founded, erroneous, fallacious* चुकीचा, युक्तिविरुद्ध, सदोष, असमर्पक, पोकळ. ४ (of members of the body) अधू, लुला, अशक्त, दुर्बळ, दुबळा.

Unsound'ness *n.* बिघडलेलेपणा *m*, बिघाड *m*, विकृति *f*. २ सडलेलेपणा *m*, सडकेपणा *m*. ३ असमर्पकता *f*, सदोषता *f*, पोकळपणा *m*. ४ अधूपणा *m*, दौर्बल्य *n*. [U. OF MIND मानसिक दौर्बल्य *n*, वेड *n*.]

Unspar'ing *a.* मनमुराद, सढळ, विपुल, रेलचेलीचा, ओतप्रोत; as, "U. praise." २ कमी न करणारा, कसर न करणारा, कुचराई न करणारा; as, "U. in his efforts." ३ *merciless* कडक, कठोर, गय न करणारा, दयामाया न करणारा; as, "U. criticism."

Unspea'kable *a.* ( अतिशय चांगलें किंवा वाईट असल्यामुळें ) अनिर्वचनीय, अनिर्वाच्य, अवाच्य, अवचनीय, वर्णनातीत, शब्दातीत. [वक्षित.

Unspecified *a.* विशेष उल्लेख न केलेला, अविशेषित, अवि-

Unspell' *v. t.* भुरळ काढून घेणें.

Unspont'aneous *a.* कृत्रिम, असहजस्फूर्तीचा, सक्तीचा.

Unspot'ted *a.* ठिपके नसलेला. २ बिनडाग, कलंकहीन, निष्कलंक, निर्दोष.

Unsta'ble, Unstead'fast *a. not fixed, rickety* अस्थिर, अध्रुव. २ (*fig.*) *fickle, inconstant* अस्थिर, अधीर, क्षणिकचित्त, क्षणिकबुद्धि, अस्थिरचित्त, चंचल.

Unst'ableness, अस्थिरता *f*, अध्रुवता *f*. २ अधीरपणा *m*, अस्थिरता *f*, अस्थिरबुद्धि *f*, अस्थैर्य *n*.

Unstained' *a.* अदूषित, अकलंकित, डाग नसलेला.

Unstead'fastness *n.* अस्थिरता *f*, अस्थिरबुद्धि *f*.

Unstead'iness *n.* चंचळपणा *m*, अस्थिरता *f*. २ अस्थैर्य *n*, चांचल्य *n*, चलबिचल *f*.

Unstead'y *a. irresolute* चंचळ, अस्थिर, अधीर. २ *mutable, variable* चंचळ, अस्थिर, चलबिचल होणारा.

Unstint'ed *a.* रेलचेल, भरपूर, ओतप्रोत, मुबलक.

Unstitch *v. t.* टांके उसवणें.

Unstop' *v. t. to remove stopper from* बूच काढणें. २ *to free from hindrance* हरकती किंवा अडथळे काढून

टाकणें. ३ *to draw out the stops of an organ* वाद्यांच्या भोंकांवरील आंगटे किंवा फळी काढून टाकणें.

Unstop'per *v. t.* बाटलीचें कांचेचें बूच काढणें.

Unstrained *a.* ताण न दिलेला. २ बिनसक्तीचा. ३ न चाळलेला.

Unstrap *v. t.* (बिछान्याच्या वगैरे) वाद्या सोडणें.

Unstri'ated रेषारहित, रेषा नसलेला.

Unstring' *v. t.* (a harp &c.) तारा *f. pl.*, -&c. काढणें -सोडणें -उतरणें. २ *to relax* सैलावणें, ढील &c. करणें, ढिला करणें. ३ *to take from a string* सरांतून काढणें.

Unstudied *a. unpremeditated* अपूर्वकल्पित, स्वाभाविक, अकृत्रिम, स्वयंस्फूर्तीचा, अप्रयत्नकृत; as, "U. ease; U. eloquence."

Unsubdued' *a.* न जिंकलेला, अजित, अवश, अवशीभूत, अवशीकृत. २ (*the passions or flesh; or attributively*) अदमित, अदान्त, असंयमित, दमन-संयम न केलेला.

Unsubstan'tial *a. slight, flimsy* निर्जीव, पोकळ, फुसका, निःसत्त्व, निःसार, असार, रिकामा, रिकामका, रिता. २ *unreal* अवास्तविक, अवास्तव.

Unsubstantiated *a.* पुराव्यानें मजबूत न केलेला, खरा न केलेला, खरा न झालेला.

Unsuccess'ful *a.* (of persons) अयशस्वी, यश न आलेला, अपेशी, अकृतार्थ. २ (of measures) अयशस्वी, निष्फल, अफल, अकार्यसंपादक. [कार्य केल्यावांचून.

Unsuccess'fully *adv.* जय न मिळवितां, अपेश घेऊन,

Unsu'itable *a.* अयोग्य, अनुपयोगी, नालायक, अयुक्त, अनुपयुक्त, अनुचित. २ *incongruous* विजोड, विसंगत.

Unsuit'ableness *n.* अनुपयोगिपणा *m*, निरुपयोगिपणा *m*, अनुपयुक्तता *f.* २ विजोडपणा *m*, विसंगतपणा *m*.

Unsuit'ed *a.* न शोभणारा, न जुळणारा.

Unsu'llied *a.* निर्दोष, निर्मल, स्वच्छ, बिनडाग, निष्कलंक, निर्दूषित.

Unsuppor'ted *a. not upheld* आधारावांचूनचा, बिनआधारी, बिनआधाराचा, निराधार. २ *not assisted* बिनपाठबळाचा, बिनपाठपुराव्याचा, आश्रय नसलेला.

Unsurpassed' *a.* (वर) ताण न केलेला, (वर) सरशी न केलेला, मागें न टाकलेला, अपूर्व. [अपरिवेष्टित.

Unsurrounded *a.* न वेढलेला, बिनवेढलेला, अवेष्टित,

Unsuspe'cting *a.* साधा, साधाभोळा, शंका न घेणारा.

Unsuspi'cious *a.* शंका नसणारा, शंकारहित, शंका न येणारा, शंका न घेणारा, असंशयास्पद.

Unswayed' *a.* ताब्यांत नसलेला, दाब नसलेला.

Unswep't *a.* न झाडलेला, असंमार्जित.

Unswer'ving *a.* न ढळणारा, अढळ, दृढ, अचल.

Unsworn' *a.* शपथेवर न सांगितलेला, शपथ न घेतलेला; as, "U. witness." [उच्चारलेला.

Unsyl'labled *a.* अवयव न पाडलेला, अवयव स्पष्ट न

Unsymmet'rical *a.* समप्रमाण नसलेला, असमप्रमाण, आकारशुद्ध नसलेला, मध्यरेषेपासून सारखा नसलेला, प्रमाणशून्य, प्रमाणांत नसलेला, बिनप्रमाणाचा. २ (*bot. chem.*) असमप्रमाण.

Unsympathetic *a.* सहानुभूति नसलेला, सहानुभूति न दाखविणारा, सहानुभूतिशून्य. [ न दाखविणारा.
Unsympathizing *a.* सहानुभूति न वाटणारा, सहानुभूति
Unsystema'tical *a.* अव्यवस्थित, पद्धति नसलेला.
Untain'ted *a. not putrescent* बिनलागलेला, न डागळलेला, न नासलेला. २ *unsullied* अदूषित, निष्कलंक, कलंक न लागलेला.
Untalented *a.* अबुद्धिमान्, बुद्धिमत्ता नसलेला.
Unta'mable *a.* वठणीस न आणतां येणारा, माणसाळवितां न येणारा.
Untamed' *a.* वठणीस न आणलेला, न माणसाळलेला.
Untar'nished *a.* चकाकी कमी न झालेला. २ डाग न लागलेला, निष्कलंक ( reputation ).
Unta'sted *a.* बिनचाखलेला, अनास्वादित.
Untaught' *a.* ( of person, subject ) न शिकविलेला, अशिक्षित. २ माहिती नसलेला, अज्ञान.
Untaxed' *a.* कर न बसविलेला. २ *not charged with any fault* दोषारोप न केलेला.
Unteach' *v. t.* ( शिकविलेलें ) विसरविणें.
Unteam' *v. t.* ( नांगराचें ) जोत सोडणें.
Untechnical *a.* अशास्त्रीय, ठराविक पद्धतीविरुद्ध.
Untem'pered *a.* कठिण न केलेला; as, "U. steel." २ घट्ट न केलेला; as, "U. mortar." ३ कमी न केलेला, सौम्य न केलेला; as, "U. severity."
Unten'able *a.* (a post or fortress) राखण्यास अयोग्य, रक्षण्यास अशक्य. २ ( a doctrine ) असमर्थनीय, न टिकणारा, समर्थन न करतां येणारा, लेचापेचा.
Unten'antable *a. not fit to be occupied* रहाण्यास निरुपयोगी, सोडकळीस आलेला.
Unten'anted *a. empty* रिकामा, खाली, वस्ती नसलेला.
Unthank'ful *a.* कृतघ्न, अकृतज्ञ, अनुपकारी.
Unthank'fulness *n.* कृतघ्नता *f*, अकृतज्ञता *f*.
Unthinkable *a.* कल्पना करतां न येणारा, अतर्क्य. २ (*colloq.*) *unlikely* असंभवनीय, अशक्य.
Unthink'ing *a. inconsiderate* अविचारी, अविवेकी, दूरवर नजर न देणारा; as, "U. youth." २ *not indicating thought or reflection* विचार केल्याचें न दर्शविणारा; as, "U. face." [ करितां.
Unthink'ingly *adv.* विचार केल्यावांचून, विचार न
Unthought *a.* (with *of*) अकल्पित, कल्पना नसलेला.
Unthread' *v. t. to take thread out of* (needle) दोरा बाहेर काढणें; as, "To U. a needle." २ *to find one's way out of* ( चक्रव्यूहांतून ) रस्ता काढणें, वाट काढणें, चालणें; as, "To U. a devious path."
Unthrif'tily *adv.* उधळेपणानें, उधळपट्टी करून.
Unthrif'tiness *n.* उधळेपणा *m*, उडाऊपणा *m*.
Unthrifty' *a.* उधळ्या, उडाऊ. [करणें.
Unthrone' *v. t.* सिंहासनावरून काढणें, राजपदच्युत
Unti'dily *adv.* गबाळपणानें, अव्यवस्थितपणानें, गचाळपणानें. [ स्थितपणा *m*.
Unti'diness *n.* गचाळपणा *m*, गबाळपणा *m*, अव्यव-

Unti'dy *a.* गचाळ, गबाळ, अव्यवस्थित, नीटनेटका नसलेला, बिनचाकचोपीचा. [ करणें, फेडणें.

Untie' *v. t. to loosen, to unbind* सोडणें, मोकळा

Untied' *pa. p.* सोडलेला, फेडलेला.

Until (until') [O. E. *until*, until.] *prep.* (used of time) *to, upto, till, before* पावेतों, पर्यंत, तागाईत, पूर्वीं; as, "He will not come *until* the end of this month." U. *conj. as far as, up to the time that* तावत्काल, तावत्कालपर्यंत, तोंपर्यंत, तिथपावेतों; as, "But the rest of the dead lived not again *until* the thousand years were finished."

Untile' *v. t.* ( छपरावरील ) कौलें काढणें, कौलें उतरणें.

Untill'able *a.* लागवडीस आणतां न येण्याजोगा, लागवडीस न येणारा. [ पडीत.

Untilled' *a.* बिनलागवडीचा, बिनलावणीचा, नाकीर्द,

Untime'ly *a.* अकालिक, अवेळीं झालेला, अवेळीं आलेला, अकालीन, अकालज.

Untinned *a.* ( culinary utensil. ) कल्हई न केलेला, बिनकल्हईचा, निकल्हईचा. [ अश्रान्त.

Untir'ing *a.* न थकणारा, न दमणारा. २ अविश्रान्त,

Un'to *prep.* स, ला, ना, तें, पावेतों, पर्यंत.

Untold' *a.* न सांगितलेला, अकथित, अनुक्त. २ न मोजलेला, अगणित, अपरंपार, असंख्य; as, "U. money."

Untomb' *v. t.* थडग्यांतून बाहेर काढणें.

Untooth' *v. t.* दांत पाडणें, दांत पाडून टाकणें.

Untouchable *a.* अस्पृश्य.

Untouched' *a.* न शिवलेला, न स्पर्शलेला, अस्पृष्ट, बिनशिवलेला. २ *remaining unaffected by use* अनामत. ३ हात न लावलेला.

Unto'ward *a. perverse, self-willed* कुटिल, दुराग्रही, शिरजोर, बेहुकमी, करनकर, करनकऱ्या; as, "U. generation." २ *awkward, ungraceful* वेडावांकडा, अडाणपणाचा, विजात; as, "U. manner." ३ *inconvenient, troublesome, unfortunate* गैरसोईचा, प्रतिकूल ( circumstances ), विरुद्ध ( wind ), उलट, दुर्दैवाचा.

Untrained' *pa. p. a.* ( इष्ट ) शिक्षण न मिळालेला -न दिलेला, ( इष्ट ) वळण न लागलेला -न लावलेला. २ ( horse ) वठणीस न आणलेला, न शिकवलेला. ३ ( teacher ) ( सरकारी ट्रेनिंग कालेजांतील शिक्षकाचें ) योग्य शिक्षण न दिलेला, अध्यापनाची परीक्षा न दिलेला.

Untried' *pa. p. a.* पारख न केलेला, अपरीक्षित. २ करून न पाहिलेला, अनुभव न घेतलेला, अननुभूत, अजमावून न पाहिलेला. [ "U. path."

Untrod'den *a.* न तुडवलेला, न मळलेला, अक्षुण्ण; as,

Untru'e *a.* असत्य, अनृत, खोटा, अयथार्थ, मिथ्या.

Untruly *adv.* खोटेपणानें, असत्यपणें.

Untrust'ful *a. not trusting* विश्वास न ठेवणारा. २ *untrustworthy* गैरविश्वासाचा, अविश्वसनीय.

Untrust'worthy *a.* गैरविश्वासाचा, गैरविश्वासू, अविश्वसनीय, बिनभरंवशाचा, बिनखात्रीचा, अप्रामाणिक.

Untruth' *n.* असत्य *n*, खोटें *n*, अनृत *n*.

Untu'nable, Untuneful *a.* बेसूर, बदसूर, विस्वर.
Untu'tored शिकवून किंवा पढवून तयार न केलेला, शिकवणी न दिलेला (as evidence, witness, &c.).
Untwine', Untwist *v. t.* उकलणें, उलगडणें, उलगडा *m* -उलट *m. f.* करणें *g. of o.*
Untwine, Untwist *v. i.* उकलणें.
Untwined, Untwisted उकललेला, उकलींव.
Unukanhai (*astron.*) [ Latin name alpha serpentis.] *n.* भुजंगराशींतील पहिली तारा.
Ununctuous *a.* रुक्ष, अस्निग्ध, अचिक्कण, बिनचिकणाईचा, स्नेहरहित. [*f*, अस्निग्धता *f.*
Ununctuousness *n.* रुक्षता *f*, रुक्षपणा *m*, बिनचिकणाई
Unused' *a.* बिनवापरलेला, बिनवहिवाटलेला, कोरा. २ अभुक्त. ३ अक्षुण्ण. ४ बिनसंवईचा, बिनसरावाचा, अनभ्यस्त, अपरिचित.
Unu'sual *a.* शिरस्त्याबाहेरचा, चालीरीतीबाहेरचा, लोकरूढीच्या विरुद्ध. २ असामान्य, लोकोत्तर, विलक्षण.
Unusually *adv.* शिरस्त्याबाहेर, फार, अतिशय. Unusualness *n.* रूढीविरुद्धता *f.* २ असामान्यपणा *m*, लोकोत्तरता *f*, विलक्षणपणा *m.*
Unut'terable *a.* उच्चारतां न येणारा, अनुच्चारणीय.
Unvan'quished *a.* अजित, न जिंकलेला.
Unvariable *a.* न बदलणारा, फेरफार न होणारा. २ (*math.*) अविकारी.
Unva'ried *a.* न बदललेला, न बदलणारा, तोच तो, न्यूनाधिक्यरहित. [एकरूप.
Unva'rying *a.* न बदलणारा, एकसारखा, एकसुती,
Unveil' *v. t.* बुरखा -बोखारा काढून टाकणें, बुरखा काढणें, अनावरण करणें. [ Unveiling Ceremony अनावरणसमारंभ.] २ (a portrait) अनावरण करणें, उघडा करणें.
Unven'omous *a.* निर्विष, अविष, गोडा, अविषारी.
Unversed' *a.* बिनरावलेला, बिनघसवटलेला, बिनवापरलेला, अनभ्यस्त, गैरवाकबगार, अनभिज्ञ. २ *not put in verse* काव्यांत न रचलेला, काव्यांत न बांधलेला.
Unviti'ated *a.* अदूषित, अभ्रष्ट. २ (*log.*) अदुष्ट.
Unwalled *a.* तट नसलेला, बिनतटाचा, प्राकाररहित.
Unwa'rily *adv.* बेसावधपणानें, गैरसावधपणानें, असावधपणानें. [असावधपणा *m.*
Unwa'riness *n.* गैरसावधपणा *m*, बेसावधपणा *m*,
Unwar'like *a.* बिनलढाऊ, निर्वीर्य, हीनपराक्रम, निष्पराक्रम, रणविमुख.
Unwar'rantable *a. unjustifiable* आधार देतां न येणारा, बिनआधाराचा, बिनपुराव्याचा, बिनप्रमाणाचा; as, "U. statement; U. act." ३ *improper, illegal* अयोग्य, अविहित, गैरवाजवी, गैरशिस्त.
Unwarr'anted *pa. p. a.* गैरसनदी, बिनसनदी. २ बिनहुकमाचा, बिनपरवानगीचा. ३ आधारावांचूनचा, बिनप्रमाणाचा. ४ अयोग्य, अविहित. ५ च्या गुणावद्दल हमी न दिलेला.
Unwa'ry *a.* असावध, गैरसावध, गैरहुशार, बेसावध.
Unwashed' *a.* न धुतलेला, बिनधुतलेला, अप्रक्षालित.

Unw'ater *v. t. to free* (as a mine) *by pumping out the water* ( यंत्रानें ) पाणी उपसून काढणें -टाकणें.
Unwa'tered *pa. p. a.* पाणी उपसून काढलेला (mine). २ पाणी न मिसळलेला, विनपाण्याचा; as, "U. milk." ३ पाणी न पाजलेला (horse). ४ पाणी न मारलेला, विनपाण्याचा ( as cooked vegetable ). ५ *not supplied with water* पाणी न पुरवलेला (soil), विनपाण्याचा.
Unwa'vering *a.* विनधरसोडीचा, स्थिर, ठाम. [ (मूल).
Unweaned' *a.* अंगावरचा, अंगावरला, विनतोडलेलें
Unwea'ried *a.* न दमलेला, अश्रांत, न थकलेला.
Unwel'come *a.* अनिच्छित, अप्रिय, दुःखकारक, दुःखाचा ( news ), नको असलेला, येण्यास नकोसा ( guest ).
Unwell' *a.* आजारी, प्रकृति बरी नसलेला, अस्वस्थ. [ To BE U. बरें न वाटणें. *in. con.*]
Unwhole'some *a.* अपथ्यकर, वावडा, अपथ्याचा, बाधक, अपथ्यकारक, रोग आणणारा, रोगकारक -जनक, अस्वास्थ्यकारक, विषम. २ अहितकारक, अपकारक, विरुद्ध.
Unwhole'someness *n.* वावडेपणा *m*, बाधकपणा *m*, रोगजनकत्व *n.* २ अहितकारकता *f*, अपकारकता *f*.
Unwiel'diness *n.* अवजडपणा *m*, बोजडपणा *m*.
Unwiel'dy विनअटोपाचा, विनअटोपसर, अवजड, बोजड, मोधळा, म्हशा.
Unwill'ing *a.* नाखुप, नाराज. [ U. WORKER नाखुषीनें काम करणारा.] [ होऊन.
Unwill'ingly *adv.* नाखुषीनें, नाराजीनें, नाखुप -नाराज
Unwill'ingness *n.* नाखुषी *f*, नाराजी *f*.
Unwind' *v. t.* उकलणें, उलगडणें, सोडणें, वेढे *m. pl.* -वळसे काढणें -सोडणें *g. of o.*, उलट *f.* करणें *g. of o.*
Unwind *v. i.* उकलणें, उवळणें.
Unwise' *a.* (of persons) वेडा, अज्ञान, बेअकली, बुद्धिहीन, असमंजस, असुज्ञ. २ (of measures, acts &c.) वेडेपणाचा, मूर्खपणाचा, बेवकुबीचा, अज्ञानाचा, अविचाराचा, विनशहाणपणाचा, बिनअकलेचा.
Unwished' *a.* न इच्छिलेला, अनिच्छित, अनिष्ट.
Unwitnessed *a.* बिनसाक्षीचा, साक्षीवांचूनचा.
Unwit'tingly *adv. ignorantly, unconsciously* अजाणतां, न जाणतां, नेणतां, नेणतेपणीं, नकळत.
Unwon'ted *a.* नेहमीं न होणारा, सरावांत नसलेला, विलक्षण; as, "U. changes." २ अपरिचित, सवय नसलेला; सराव न झालेला; as, "A child U. to strangers."
Unwooded *a.* बिनझाडाचा, निर्वृक्ष. २ बिनझाडीचा.
Unwork'manlike *a.* नाकसवी, कसब्याला न शोभणारा.
Unwo'rthiness अयोग्यता *f*, नालायकी *f*, बिनलायकी *f*, अपात्रता *f*. २ अनुचितपणा *m*. ३ विशोभितपणा *m*.
Unwor'thy *a. undeserving, wanting merit* अयोग्य, नालायक, बिनलायकीचा, अनधिकारी, अपात्र, योग्यताहीन. २ *unbecoming, unsuitable* अयोग्य, नालायक, अनुचित, विशोभित, न शोभणारा.
Unwound *a.* उकललेला, वेढे काढलेला, उकलींव.

Unwoun'ded *a.* जखमी न झालेला, घायाळ न झालेला, बिनजखमी, बिनघावाचा, बिनवाराचा, अक्षत.

Unwritt'en *a.* बिनलिहिलेला, बिनलेखाचा, बिनकलमी, अलिखित. [ U. LAW रूढी *f*, चाल *f*, वहिवाट *f.* ]

Unyie'lding *a.* चिकाटीचा, न नमणारा, हार न खाणारा, (शत्रूपुढें) मान न वांकवणारा.

Unyoke' *v. t.* जोखड सोडणें, जोखडापासून सोडणें.

Unzea'lous *a.* अनास्थेचा, बिनआस्थेचा, बिनकळकळीचा.

Up (up) [Of Anglo-Saxon origin.] *adv. towards a higher place* वर, वरता, वरतीं, वरतें, ऊर्ध्व; as, "Lives four floors *up.*" २ *from a lower to a higher position* वर, वरता. [To BE U. AND DOING उठणें व उद्योग करणें. To BE UP LATE AND EARLY उशिरानें निजणें व लौकर उठणें. THE HOME SECRETARY IS U. होमसेक्रेटरी बोलावयास उठला.] ३ *in a state of approaching* कडे, जवळ; as, "The child came *up* to me." ४ *up the coast* वर, वरता, वरतीं, वरतें, कडे; as, "The ship sails *up* the river." ५ (with *to*) पर्यंत, भर; as, "*Up* to a seer." (b) पर्यंत; as, "*Up* to Monday; *Up* to 100.°" ६ *completely* साफ, पुरा; as, "To eat *up*; To drink *up*, &c." ७ *at an end, over* पुरा, समाप्त; as, "It is all *up* with him त्याची आशा नाहीं." [To BE UP TO करीत असणें. २ (-ला) पुरा असणें. CORN IS UP धान्य महाग झालें आहे. To RUN UP (A BILL, &c.) फुगवणें, वाढूं देणें. UP AND DOWN इकडेतिकडे. UP! STAND UP उभा रहा. To BE UP IN ARMS लढाईस सज्ज होणें -तयार असणें -सिद्ध होणें. To BE UP संपणें, खलास होणें; as, "Time is up." To BE HARD UP चणचणीत असणें.]

Up *prep.* वर.

Up *a.* वरचा, वर जाणारा; as, "*Up* stroke, *Up* line, [ *Up* train," &c.

Up *n.* (in the phrase ups and downs) [ UPS AND DOWNS चढउतार, उंचसखल जागा किंवा स्थळें, निम्नोन्नत भूमि. २ (*fig.*) *good and bad fortune* बरीवाईट स्थिति *f*, भरतीओहोटी *f*, सुखदुःख *n.*]

Upbraid (up-brād') [A. S. *up*, and *bregdan*, to braid.] *v. t.* दोष देणें, दोष लावणें, दोष ठेवणें. २ (with *for*) *to reprove severely* फजिती करणें; as, "To U. one for bad conduct." Upbraided *pa. p.*

Up'bringing *n.* संगोपन *n*, वाढवणें *n.* (b) शिक्षण *n.*

Up'cast *n.* (चेंडू) वरून फेंकणें *n*, वरची फेंक *f.*

Up'country *adv. toward the interior* देशाच्या आंतल्या बाजूस, देशाच्या आंत. Upcountry *n. the interior of a country* देशाचा आंतील भाग *m.* Upcountry *a.* किनाऱ्यापासून दूरचा; "U. districts."

Upgrowth *n.* वाढ *f*, विस्तार *m.*

Upheav'al *n.* (*Geol.*) उत्क्षेप *m*, वर फेंकणें *n.*

Upheave (up-hēv') [Up and A. S. *hebban*, to lift.] *v. t.* वर काढणें, वर फेंकणें, उत्क्षेप करणें.

Uphill (up'hil) [Up and Hill.] *a. ascending* चढणीचा, चढावाचा, चढणीवरचा. २ *difficult* कठिण,

अवजड, छातीफोड, दगडफोड; as, "It is an U. task." U. *adv. up a hill* वरच्या बाजूस, चढणीकडे; as, "Riding U."

Uphold' *v. t. to hold up, to support* उचलून धरणें, सांवरून धरणें, कायम ठेवणें; as, "To U. old practices." २ *to confirm* कायम करणें, कायम ठेवणें; as, "To U. decision, verdict, &c. Upheld *pa. t.* and *pa. p.* Uphold'ing *pr. p.*

Upholder *n.* उचलून धरणारा *m*, सांवरून धरणारा *m*.

Upholster ( up-hōl'ster ) [ *Up* and Dut. *holster*, a pistol case. A. S. *helan*, to cover.] *v. t. to furnish with hangings, carpets, &c.* (पडदे, गालिचे चटया, इत्यादि) सरंजामी सामान विकणें -पुरविणें. २ खुर्च्या वगैरेकरितां अभ्रे, गिर्द्या, वगैरे विकणें -पुरवणें.

Uphol'sterer *n.* (पडदे, गालिचे, चटया, खुर्च्या इत्यादि) सरंजामाच्या सामानाचा व्यापारी *m*.

Uphol'stery *n.* सरंजामाचें सामान *n*.

Up'keep *n.* वरची दुरुस्ती *f*, वरची व्यवस्था *f*. २ वरदुरुस्तीचा खर्च.

Upland ( up'land ) *n. highland as opposed to meadows, riversides &c.* उंचावरची -उंचवट्याची जागा *f*, माळजमीन *f*, पठार *f*. U. *a. high in situation* उंच, उंचावरचा.

Uplift ( up-lift' ) *v. t. to raise aloft* वर उचलणें, वर करणें. U. *n.* वर उचलणें *n*, उन्नति करणें *n*, उन्नति *f*.

Upon ( upon' ) *prep.* वर, वरता, वरतीं, उपरि.

Upper *n.* बुटाचा वरचा भाग *m*; as, "To be on one's uppers हलाखींत असणें." २ (*pl.*) (थंडीचें निवारण करण्याकरितां बुटावर बसविण्याचें ) गेटर *n*.

Upper ( up'er ) [ A. S. *up*, up.] *a.* (comparative of up ) *higher in place* वरचा, वरला, वरील, उपरिस्थित, ऊर्ध्वस्थ, उपरितन. २ *higher in dignity, &c.* वरचा, वरच्या प्रतीचा, वरला, मुख्य, प्रधान, वरिष्ठ, श्रेष्ठ. *Upp'ermost, Up'most* ( *superlatives*).

Upperhand ( up'er-hand) *n. superiority, advantage* वरचष्मा *m*, वरपगडा *m*.

Up'permost *a.* अतिशय वरचा, सर्वांत वरचा, अतिश्रेष्ठ.

Uppermost *adv.* सर्वांच्या वर, सर्वांत वर, सर्वांत प्रथम.

Upright ( up'-rīt ) *a. right, in an erect position* उभा, ताठ उभा. २ *honest, just* सरळ, सरळमार्गी.

Upright *adv.* उभा, सरळ, ताठ.

Up'rightly *adv.* नेकीनें, न्यायानें, सरळपणानें.

Up'rightness *n.* सरळपणा *m*, प्रामाणिकपणा, नेकी *f*, सचोटी *f*, सरलता *f*.

Upri'sing *n.* (बिछान्यावरून) वर उठणें. २ बंड *n*.

Uproar ( up'rōr ) [ Dut. *oproer* A. S. *hreran*, to stir.] *n. noise and tumult, clamour* गडबड *f*, गलका *m*, गलबला *m*, गलगा *m*, गर्दी *f*, हूल *f*, हुलड *f*, कल्ला *m*, कोलाहल *m*, कल्लोळ *m*, आरडाओरड *f*, बैदा *m*, हाकाटी *f*, दंगा *m*, गलगलाट *m*, गोंगाट *m*. [TO MAKE AN OUTRAGEOUS UPROAR धिंगाणा घालणें, घर डोईवर घेणें, गर्दी *f*. करणें.]

Uproar'ious *a.* गोंगाटाचा, आरडाओरडीचा, गलबल्याचा.

Uproot (up-rōōt') *v. t. to tear up by the roots* मुळांसुद्धां उपटणें -उपटून काढणें, निर्मूलन करणें.

Upset (up-set') [Lit. 'to set up.'] *v. t. to turn upside down, to overthrow* उलटणें, लवंडणें, उलथापालथा करणें, उलथणें, पालथणें. २ *to disturb the composure or temper of* (मनाचें) स्वास्थ्य बिघडविणें, शांतता -शांति नाहींशी करणें. ३ *to disturb the digestion of* पचन बिघडविणें. ४ चाकाची धाव लहान व जाड करणें. [ पहिली बिट *f.*

Upset price *n.* लिलांवांत पुकारलेली पहिली किंमत *f.*

Upshot (up'shot) [Lit. 'What is shot up or turns up.'] *n. conclusion, final issue* निकाल *m*, परिणाम *m*, शेवट *m*, निष्पन्न *n*, अखेर *f*, अखेरचा निकाल *m*. २ *the general effect, the long and short* शेवट *m*, सर्वसाधारण परिणाम *m*, सारांश *m*, इत्यर्थ *m*.

Upside (up'sīd) *n. the upper side* वरची -वरली बाजू.

Upside-down *adv. in complete confusion* उलथापालथा, उलटापालटा, उलटपालट, उलटासुलटा.

Upsidedown *a.* उलटासुलटा, उलथापालथा.

Upstairs' *adv.* वरच्या मजल्याकडे, वरच्या मजल्यावर.

Upstairs' *a.* वरच्या मजल्यावरचा.

Upstart (up'stärt) [L. *up* and Start.] *n. one suddenly risen from humble position in life* नवा श्रीमंत *m*, आजकालचा *m*, उपटसूळ *m*.

Up'stream *adv.* प्रवाहाच्या विरुद्ध.

Up'stroke *n.* अक्षराचा वरचा फांटा *m*.

Upthrow' *n. (geol.)* ऊर्ध्वभंग *m*. ( as opposed to Downthrow अधोभंग.)

Upward (up'ward) [*Up* and *ward.*] *a. directed up or to a higher place* वर, वरती, वरलीकडे, ऊर्ध्व.

Upward, Upwards *adv.* वर, वरच्या बाजूला, वरलीकडे.

Urachus (ū'rakus) [ Gr. *ouron*, urine, and *hew*, to hold.] *n.* (*med.*) मूत्राशयशीर्षापासून नाभीपर्यंत असणारी रज्जु *f*, गर्भावस्थेंतील गर्भकोशाचा शिल्लक राहिलेला भाग *m*, नालबंधन *n*.

Urāēmia (ūrēmia) [Gr. *ouron*, urine *aima*, blood.] *n.* (*med.*) मूत्रजमूर्च्छा *f*, लघ्वी बंद होऊन तींतील विषारी पदार्थ रक्तांत शिरल्यामुळें येणारी मूर्च्छा *f*.

Uranium (ū-rā'ni-um) [ Gr. *ouranos*, heaven.] *n.* रसायनशास्त्रांतील एक मूलधातु, वरुण.

Uranus (ūra-nus) [ L. -Gr. *ouranos*, heaven.] *n.* (*astron.*) वरुण *m*. यालाच हर्षल असेंहि म्हणतात. कारण, हा ग्रह १७८१ मध्यें हर्षल नांवाच्या ज्योतिर्विदानें शोधून काढला.

*N. B.* :—Uranus, Herschel and वरुण are three different names for the same planet.

Urate (ū'rāt) [L. *uras* -Gr. *ouron*, urine.] *n.* (*med.*) मूत्रक्षार *m*, लघ्वींतील क्षार *m*.

Urban ( ur'ban ) [L. *urbs*, a city.] *a. belonging to a city* शहरी, शहराचा, शहरांत राहणारा, -असणारा.

Urbane ( urbān' ) [ See Urban.] *a. civilized, refined* सुधारलेला, शिष्ट, सभ्य. (b) शहरच्या चालीचा.

Urban'ity *n.* सभ्यपणा *m*, शिष्टपणा *m*, सभ्यता *f*. (b) शहरची रीतभात *f*.

Urceolate ( ur'-siō-lāt ) [ L. *urceolus*, a pitcher.] *a.* (*bot.*) कुंभाकार, चंबूसारखा, दोहों बाजूंस निमुळता व मध्यें फुगवट.

Urchin ( ur'chin ) [ L. *ericius*, a hedge-hog.] *n.* द्वाड मूल *n*, खट्याळ मूल *n*.

Urea ( ūr'e-a ) [Gr. *ouron*, urine.] *n. soluble colourless crystalline compound contained in the urine of mammals* मूत्रसत्त्व *n*, मूत्रांतील मुख्य घटक *m*, मौत्रक (newly coined). मूत्रसत्त्व (urea) रक्तांत राहिलें असतां त्याचे अपायकारक परिणाम होऊन मनुष्य बेशुद्ध होतो, त्यास आंचके येतात व तो शेवटीं मृत्यु पावतो. पटकी वगैरे रोगांत मूत्र बंद झाल्यामुळें हा पदार्थ रक्तांत सांचतो.

Ureter ( ū-rē'-ter ) [Gr. *ouron*, urine.] *n.* मूत्रनलिका *f*, मूत्रवाहक नलिका *f*, (ही नळी वृक्कापासून मूत्राशयापर्यंत असते ) मूत्रवह *f*, गवीनी *f*. (both the last words in सुश्रुत.)

Urethra ( ūrē'-thra ) [ Gr. *ourere*, to make water.] *n.* ( *med.*) *duct by which urine is discharged from the bladder* मूत्रस्रोत *m*, मूत्रमार्ग *m*, मूत्रपथ *m*.

Ure'thral *a.* मूत्रमार्गासंबंधीं. [U. FEVER मूत्रमार्गांत सळई घातल्यामुळें येणारा ज्वर *m*, मूत्रपथज्वर *m*. U. DISCHARGES मूत्रस्रोतोत्पन्न स्राव *m*. (परमा नव्हे). U. STRICTURE मुख्यत्वें करून पूयशुक्र ( परमा ) वगैरे विकारांमुळें मूत्रमार्गांत जखम होऊन तो एके ठिकाणीं अगदीं आकुंचन पावतो व त्यामुळें लघ्वी बंद होते असा विकार *m*, मूत्रकृच्छ्र.]

Urethritis (ūrē'thrī-tis) *n.* मूत्रस्रोतोदाह *m*, मूत्रमार्गदाह *m*.

Urge ( urj ) [ L. *urgere*, to press, to drive. Urge शब्दाचा धात्वर्थ पुढें ढकलणें किंवा हाकलणें असा आहे.] *v. t. to drive forcibly, to impel* पुढें ढकलणें, ( पुढची ) ओढ देणें, डौंचणें, डंवचणें. २ *to hasten* ( घाईनें ) पुढें ढकलणें, ( पुढचा ) नेट देणें, (पुढचा) ताण देणें, तांतडी -तांतड करणें -लावणें. ३ *to entreat or exhort earnestly or persistently* तगादा करणें, गळ घालणें, खणपटीस बसणें. ४ *to advocate* ( measure, &c. ) *pressingly* आग्रहानें -आग्रहपूर्वक पुढें मांडणें -ढकलणें. ५ *to ply* (person) *hard with argument or entreaty* उठावणी करणें, उद्युक्त करणें. ६ *to dwell persistently or emphatically upon* टुमणी लावणें, तगादा करणें -लावणें, जोरानें किंवा पुनः पुनः तोच मुद्दा पुढें मांडणें. U. *v. i. to press importunately* गळ घालणें, खणपटीस बसणें, गळचिपीस बसणें.

Urged *pa. t.* and *pa. p.* Urging *pr. p.*

Ur'gency *n.* जरूरी *f*, निकड *f*, तांतड *f*, तांतडी *f*, अडचण *f*, नेट *m*, ताण *m*, गरज *f*.

Ur'gent *a. pressing* जरूरीचा, ताबडतोबीचा, निकडीचा, तगाद्याचा, तांतडीचा, घाईचा, त्वरेचा. (b) नेटाचा. [U. TELEGRAM जरूरीची तार *f.*] २ खणपटीस बसलेला, उत्सुक; as, "Was U. with me for (or to disclose) further particulars."

Ur'gently *adv.* ताबडतोब, घाईनें, निकडीनें, तांतडीनें.

Ur'ger *n.* पुढें ढकलणारा *m*, डौंचणारा *m.* २ तांतड लावणारा *m.* ३ गळ घालणारा *m*, खणपटीस बसणारा *m.* ४ आग्रहानें पुढें मांडणारा *m.* ५ उठावणी करणारा *m.* ६ टुमणी लावणारा *m.*

Urging *pr. p.* पुढें ढकलणारा, डौंचणारा. U. *v. n.* पुढें ढकलणें *n*, डौंचणें *n.* २ तांतड लावणें *n.* ३ गळ घालणें *n*, खणपटीस बसणें *n.* ४ आग्रहानें पुढें मांडणें *n.* ५ उठावणी करणें *n.* ६ टुमणी लावणें *n.*

Uric acid *n.* मूत्राम्ल *n.*

U'rinal *n.* मुतण्याचें तस्त *n.* २ मुत्री *f.*

U'rinary *a.* मूत्राचा, मूत्रसंबंधी. [U. ORGANS मूत्रोत्पादक इंद्रियें *n. pl.* U. DISEASES मूत्रगत रोग *m. pl.* U. AFFECTIONS GENERALLY मूत्रदोष *m*, मूत्रकृच्छ्र *n.* U. CALCULUS मुतखडा *m.*] २ मूत्रासारखा, मूत्रसदृश.

Urinary *n.* (खताकरितां मूत सांठविण्याची) मूतखळी *f.*

Urine (ū'rin) [Fr. *urine* -L. *urina*, Sk. वारि, water.] *n.* मूत्र *n*, मूत *n*, लघ्वी *f*, इराकत *f*, पिसाब *m*, लघुशंका *f.* [DISCHARGE OF U. मूत्रोत्सर्ग *m.* MILKY U. मूत्रशुक्र. PASSING OF BLOOD IN U. रक्तप्रमेह. PASSING MUCOUS U. लालामेह. PERSON MORBIDLY AFFECTED IN U. मेह झालेला, प्रमेही, प्रमेहित. SCALDING OF U. मूत्रदाह *m.* OBSTRUCTION OF U. SEE UNDER OBSTRUCTION. RETENTION OF U. SEE UNDER RETENTION. SUPPRESSION OF U. SEE UNDER SUPPRESSION. WHITE SEDIMENT IN U. खर.]

Urinom'eter *n.* लघ्वीचें विशिष्टगुरुत्व मोजण्याचें यंत्र *n.*

Urn (urn) [L. *urna*, a water pot, properly a vessel of burnt clay -*urere*, to burn.] *n.* चंबू *m*, सुरई *f.* २ *a vessel in which the ashes of the dead were anciently deposited* अस्थिपात्र *n.* ३ चहा किंवा कॉफी गरम ठेवण्याचें भांडें *n*, चहापात्र *n.*

Uroscopy *n.* मूत्रपरीक्षा *f.*

Ursa Major (*astron.*) [English name the Great Bear.] बृहदृक्ष. ही राशि उत्तरगोलार्धांत आहे. यांत धर्म, भीम, अर्जुन, नकुल, पुलहक्रतु, सहदेव, पुलस्त्य, अत्रि, अंगिरा, वसिष्ठ, अरुंधती आणि मरीचि या मुख्य तारा आहेत.

Ursa Minor (*astron.*) [English name the Lesser Bear.] *n.* लघु ऋक्ष. यांत ध्रुवमत्स्य आणि उत्तरध्रुव या मुख्य तारा आहेत.

Usage (ū'zāj) [Fr. -L. *usus*, usage.] *n. treatment* वापरणूक *f*, वापर *m*, वापरणें *n*, वागवणूक *f*; as, "Damaged by rough U." २ (law) प्रघात *m*, प्रचार *m*, वहिवाट *f*, रीत *f*, चाल *f*, धारा *m*, रिवाज *m*, मामूल *m.* ३ (of words) प्रयोग *m*, रूढी *f*, प्रवृत्ति *f.*

Use *n.* *using, employment, application to a purpose* उपयोग *m*, वापर *m*, वापरणें *n*, कामाला लावण *n*; as, "Taught him the U. of the globes." २ *right or power of using* उपयोग *m*, वापरण्याचा हक्क *m*; as, "Stipulated for the U. of the piano." (b) वापरण्याची शक्ति *f*; as, "Lost the U. of his right arm." ३ *availability, utility* उपयोग *m*, उपयुक्तता *f*; as, "A blunt knife is of U. for this work." ४ *custom, familiarity* संवय *f*, सराव *m*, अभ्यास *m*, वहिवाट *f*; as, "Long U. has reconciled me to it." ५ *want* उपयोग *m*, जरूर *f*, गरज *f*, आवश्यकता *f*; as, "I have no U. of it." ६ (law) (ताब्यांत नसलेल्या मिळकतीचा) उपयोग *m*. ७ उपयोग *m*, वापर *m*, वहिवाट *f*. [ To BE IN U. वापरांत -वहिवाटींत असणें. To BE IN CONSTANT OR MUCH USE घसवटणें.] ८ प्रघात *m*, प्रचार *m*. [ To BE IN GENERAL U. सार्वत्रिक प्रचार -प्रघात असणें *g. of s.*]

Use (ūz) [L. *usus*, to use.] *v. t.* *to put to some purpose* उपयोग करणें, उपयोगांत आणणें, कार्सी -कामास लावणें. २ *to avail oneself of* (-चा) उपयोग करून घेणें, फायदा करून घेणें. ३ वागवणें, (शीं) वर्तन करणें; as, "He *uses* me as a dog." ४ *to bring under wear and tear* उपयोगांत आणणें, वापरणें, वापरांत आणणें, वहिवाटीस -वहिवाटीखालीं घसवटीस -घसवटीखालीं आणणें -घालणें -लावणें. ५ *to consume by employment* खर्चणें, खर्च करून संपवणें, खर्चून टाकणें, खपवणें, संपवणें. Used *pa. t.* and *pa. p.*

Use *v. i.* ( usually in the *pa. p.* ) *to be accustomed* वहिवाट *f* -चाल *f* -रीत -संप्रदाय असणें. This use is very idiomatically rendered by the habitual perfect tense either of a single verb or of the verb असणें continued with another verb; as, जेव्हां काम पडे तेव्हां तो जाई or जात असे.

Used *a.* कामास लावलेला. (b) वहिवाटलेला, वापरलेला, रुळलेला, अभ्यस्त. [To BE USED TO अभ्यास *m* -वहिवाट *f* -सराव *m* -संवय पडणें -असणें -लागणें, रुळणें.] २ वापरलेला, भोगलेला, उपयुक्त, वहिवाटींत आणलेला, घसवटलेला. ३ खाल्लेला, खर्चलेला, खलास केलेला. [ To BE U. खलास होणें, संपणें, सरणें.]

Use'ful *a.* उपयोगी, उपयोगाचा, कामाचा, हिताचा, उपयुक्त, उपकारी, कारणी, कारणिक, फायद्याचा. [ To BECOME USEFUL कामास -उपयोगीं -उपयोगास येणें -पडणें.]

Use'fulness *n.* उपयोग *m*, उपयुक्तता *f*, उपयोगिता *f*.

Use'less *a.* निरुपयोगी, अनुपयोगी, उपयोगाशिवायचा, उपयोगहीन, उपयोगरहित, अनुपयुक्त, अप्रयोजक.

Uselessness *n.* निरुपयोगिपणा *m*, निरुपयुक्तता *f*, अनुपयोग *m*, निरुपयोग *m*, अनुपयोगिता *f*.

User *n.* उपयोग करणारा *m*, वापरणारा *m*. २ (law) *continued use or employment of a right* हक्क चालू ठेवणें *n*.

Usher (ush'er) [ O. Fr. *ussier* -Fr. *huissier* -L. *ostiarius*, a door-keeper, *ostium*, a door.] *n.* *one*

*whose business it is to introduce strangers to a person of high rank* (नव्या मंडळीची) ओळख करून देणारा *m*, दिवाणखान्यांत नेणारा *m*. २ *under-teacher* उपशिक्षक *m*, उपगुरु *m*. U. *v. t. to introduce* ओळख करून देणें, भेट करविणें, भेटविणें. २ *to forerun* अगोदर येणें, अगोदर जाणें.

Usual (ū'zhū-al) [L. *usualis, usus*, use.] *a. common, occurring in ordinary use* नेहमींचा, ठराविक, सदोदितचा, चालीचा, रीतीचा, रिवाजाचा, रहाटीचा, वहिवाटीचा, शिरस्त्याचा, प्रचारांतला, यथासंप्रदाय.

U'sually *adv.* बहुधा, बहुतकरून, बहुशः, प्रायः, नेहमीं.

U'sualness *n.* नेहमींचा संप्रदाय *m*, चाल *f*, रीत *f*, रिवाज *m*, रहाटी *f*, प्रचार *m*. २ नेहमींचेपणा *m*.

Usufruct (ū'zu-frukt) [L. *usus*, use, and *fructus*, fruit.] *n.* (law) *right of enjoying the use and advantages of another's property short of destruction or waste of its substance* भोगवटा *m*, उपभोग *m*, भोग *m*, फलभोग *m*. (b) भोगवट्याचा हक्क *m*.

Usufruc'tuary *n.* (law) भोगवट्याचा हक्क असणारा *m*, भोगवटेकरी *m*, भोगवटेवाला *m*.

Usurer (ū'zhėr-ėr) [Lit. 'a using.' L. *usura -utor -usus*, to use.] *n. a money-lender for interest* जबर व्याज घेणारा *m*, व्याजखाऊ *m*, व्याजखोर *m*.

Usurp (ū-zurp') [Fr. *userpo* from *usu-rapere*, to seize to one's own use -*usus*, use and *rapere*, to seize.] *v. t. to take possession of by force without right* बळकावणें, बळकावून घेणें, दपटणें, दपटून घेणें, रगडून घेणें. Usurp'ed *pa. t.* and *pa. p.*

Usurpa'tion *n.* बळकावणें *n*, दपटणें *n*, दडपणें *n*.

Usurp'er *n.* बळकावणारा *m*, दपटणारा *m*, दडपणारा.

U'sury *n.* (*excessive*) *interest on money lent* जबर व्याज *n*, अन्यायाचें व्याज *n*, व्याज *n*. २ *practice of taking interest* व्याजखोरी *f*, वृद्धिजीविका *f*.

Usus (ū-sus) [L.] *n. use* रूढी *f*, चाल *f*, प्रवृत्ति *f*.

Utensil (ū-ten'sil) [Fr. *utensile* -L. *utensilis*, fit for use -*uti*, to use.] *n.* भांडें *n*, पात्र *n*. [CULINARY UTENSIL पाकपात्र *n*, पाकभांड *n*. CULINARY UTENSILS COMPREHENSIVELY OR INDEFINITELY हांडींभांडीं *n. pl.*, हांडींमडक्कीं *n. pl.*, हांड्यामडक्या *f. pl.*]

Uterine (ū'te-rin) [Fr. *uterin* -L. *uterinus -uterus*, the womb.] *a.* गर्भाशयाचा. [U. TYMPANY गर्भवायु *m.*] २ *born of the same mother by a different father* (निराळ्या बापापासून पण) एकाच आईच्या पोटीं आलेला, एकक्षेत्री (Not सावत्रभाऊ).

Uterus (ū'terus) [L. *uterus*, the womb.] *n. the womb* गर्भाशय *m*, गर्भस्थान *n*, गर्भशय्या *f*. [INVERSION OF U. गर्भाशय उलटा होणें. INVOLUTION OF U. मोठा झालेला गर्भाशय आकुंचन होऊन पुन्हां पूर्ववत् होणें. OBLIQUITY OF U. गर्भाशयाचा तिरकसपणा *m*. RUPTURE OF U. गर्भाशय फाटणें.]

Utilita'rian *n. one who considers only the usefulness of anything* उपयुक्ततावादी *m*.

Utilita'rianism *n.* उपयुक्ततावाद *m.*

Utility (ū-til'i-ti) [L. *utilis*, useful, *-utor*, to use.] *n. usefulness* उपयोग *m*, उपयोगिता *f*, उपयुक्तता *f*.

Utiliz'ation *n.* उपयोग करून घेणें *n*, उपयोग *m*, सदुपयोग *m.*

Utilize (ū'til-iz) [Fr. *utilizer* -L. *utor*, to use.] *v. t. to make useful, to put to profitable use* उपयोग करून घेणें, उपयोगांत आणणें, चांगल्या कामीं लावणें, फायदा करून घेणें. Utilized *pa. p.* Utilizing *pr. p.*

Utmost (ut'most) [A. S. *utemest*, utmost.] *a. in the highest degree, excessive* पराकाष्ठेचा, परमावधीचा, आत्यंतिक, अतिशयित, अतिमात्र. २ *most distant* फार दूरचा, फार लांबचा, मर्यादेपलीकडचा -बाहेरचा, कडेचा, शेवटचा. U. *n. the highest degree, excess* पराकाष्ठा *f*, कमाल *f*, शिकस्त *f*, बेहद्द *f*, सीमा *f*. [AT THE U. निदानीं.] २ *the extreme part of* शेवट *m*, सरशेवट *m.*

Utopia (ū-to'pi-a) [Gr. *ou*, not and *topos*, place.] *n.* सर्वसुखाची (काल्पनिक) नगरी *f*, काल्पनिक सुराज्य *n.*

Uto'pian *a.* काल्पनिक सुराज्यासंबंधीं. २ *imaginary, fanciful* काल्पनिक, कल्पनेंतला, मनःकल्पित, मनोराज्यांतला.

Utricle (ū-tri'kl) [L. *utriculus*, dim. *uter*, a bag.] *n.* (*bot.*) पेशीच्या भित्तीच्या आंतील जीवनाधार रसाचें अस्तर *n*, मूलजीवनाधारत्वचा *f*, प्रसेविका *f*. २ आवृतफलजाति ( गुलबास, नागरमोथा ).

Utricular *a.* मूलजीवनाधारत्वचेचा, मूलजीवनाधारत्वचा असलेला, मूलजीवनाधारत्वचायुक्त.

Utter (ut'er) [Lit. "To send out or forth."] *v. t. to speak, to pronounce* उच्चारणें, बोलणें, म्हणणें, उद्गारणें, उच्चार करणें. २ *to divulge, to declare* उच्चारणें, बोलणें, वदणें, सांगणें, तोंडावाटे काढणें, ओंठाबाहेर काढणें, जगजाहीर करणें, प्रसिद्ध करणें, ( बातमी इ. ) बाहेर फोडणें. [ चिण्यासारखा.

Ut'terable *a.* उच्चारण्याजोगा, उच्चारणीय, बोलून दाख-

Ut'terance *n.* उद्गार *m*, उच्चार *m*, उच्चारण *n.* २ (*pl.*) भाषण *n.*

Uttered *pa. p. a.* उच्चारलेला, उच्चारित, तोंडावाटे काढलेला, बोललेला, बोलून दाखविलेला.

Ut'terer *n.* बोलणारा *m*, सांगणारा *m*, उच्चारणारा *m.*

Utt'erly *adv. completely* पूर्णपणें, सर्वतोपरी, पुरापूर.

Uvula (ū'-vū-la) [L. *āvūla-uva*, a grape.] *n.* (*anat.*) पडजीभ *f*, काकलक *m*, उपजिव्हा *f*, अधोजिव्हिका *f*, तालुजिव्हा *f*, लोळा *m*, घटिका *f*. २ *a similar process in bladder* लोळी *f*. Uvulæ *n. pl.*

U'vular *a.* पडजिभेचा, पडजिभेसंबंधी.

Uvulitis *n.* पडजिभेचा दाह *m*, उपजिव्हादाह *m.*

Uxorious (ugz-ō'-ri-us) [L. *uxōrius -uxor*, a wife. *a. excessively or foolishly fond of one's wife* बाईलवेडा, स्त्रीलंपट, स्त्रीवेल्हाळ, भार्यासक्त.

Uxo'riousness *n.* बाईलवेडेपणा *m*, भार्यासक्ति *f*.

V (vē) इंग्रजी वर्णमालेंतील बाविसावें अक्षर. हें व्यंजन आहे. याचीं अनेकवचनें Vs, V's, Vees अशीं लिहितात. २ व्हीच्या आकाराची वस्तु *f.* ३ रोमन अंकलिपींत पांचाच्या आंकड्याबद्दल V हें अक्षर योजितात.

उत्पत्ति : अर्लि ग्रीक भाषेंतील V या अक्षरापासून सध्यांच्या इंग्रजी भाषेंतील V या अक्षराची उत्पत्ति झाली असें युरोपिअन वर्णविदांचें मत आहे.

उच्चार: व्हीचा उच्चार व्हसारखा होतो.

संक्षेप: V. = Vice. V. C. = Vice-Chancellor. V. = Victoria. V. C. = Victoria Cross. V. O. = Victorian Order. Va. = Virginia. Viz. = namely. Vol. = Volume. vv. = Verses.

Vacancy (vā'kan-si) [See Vacant.] *n. being vacant, empty, or unoccupied* रिकामी जागा *f,* खाली जागा *f.* २ *emptiness of mind* शून्यपणा *m,* शून्यमनस्कता *f.* ३ *an unoccupied post* ( रिकामी ) जागा *f,* असामी *f,* खाली जागा *f;* as, "Has a V. on his staff."

Vacant ( vā'kant ) [ Fr. -L. *vacans -vacare,* to be empty.] *n. not occupied, empty* रिकामा, खाली, न भरलेला. २ ( an office or post ) खाली, रिकामा; as, "Applied for a V. post in the Treasury." ३ *not mentally active* रिकामा, शून्य, शून्यमनस्क; as, "His mind seems completely V." ४ *thoughtless, stupid* मूर्खपणाचा, वेडेपणाचा, कांहींतरी; as, "Given up to V. frivolities." ५ *unoccupied with business* रिकामा, खाली, रिकामटेका, फुरसतीचा, अवकाशाचा, रिकामपणाचा. [बावळटासारखें.

Va'cantly *adv.* शून्यतेनें, शून्यदृष्टीनें, शून्यमनस्कतेनें,

Va'cantness *n.* शून्यावकाश *m,* शून्यस्थळ *n.* २ रिकामी जागा *f.* ३ ( of mind ) शून्यपणा *m,* शून्यता *f,* शून्यमनस्कता *f.*

Vacate ( va-kāt' ) [ L. *vacare,* to be empty.] *v. t. to quit possession of* रिकामा करणें, रिता करणें, खाली करणें, रिकामा करून देणें, सोडणें, सोडून जाणें.

Vaca'tion *n. freedom from occupation* रिकामपणा *m,* अवकाश *m,* फुरसत *f.* २ *recess of courts, &c.* सुटी *f.*

Vaccinate ( vak'sin-āt ) [ L. *vaccinus,* of a cow.] *v. t. to inoculate* ( with lymph from the cow ) *as a preventive against small-pox* देवी *f. pl.* काढणें, देवी टोंचणें, फोड्या काढणें, गोस्तनदेवींची लस शरीरांत घालणें, गव्याधान *n.* करणें.

Vaccin'ation *n.* देवी काढणें *n,* देवी टोंचणें *n,* गव्याधान *n.* [PRIMARY V. पहिल्यानें देवी काढणें *n.* RETRO-VACCINATION मनुष्याचे आंगावरील लस पुन्हां गाईवर घालणें. RE-VACCINATION पुन्हां देवींचा प्रयोग करणें *n.* ARM TO ARM V. एका मुलाचे किंवा मनुष्याचे दंडावर उठलेल्या देवींची लस दुसऱ्या मुलाचे दंडांत टोंचणें *n.* CALF TO ARM V. वासरावरील लस काढून ती मनुष्याचे दंडावर किंवा अंगावर टोंचणें. SPURIOUS V. देवी अव्यवस्थेशीर उठणें *n.*]

Va'ccinator *n.* **देवीडाक्टर** *m*, **देवी टोंचणारा** *m*, **देवी काढणारा** *m*. २ **देवी टोंचण्याचें शस्त्र** *n*.

Vaccine ( vak'sin ) [ L. *vaccinus -vacca*, a cow.] *n. lymph from a vaccine vesicle or a cow-pox vesicle* **देवींची लस** *f*. [ GLYCERINATED V. वासरावरील पुळीची खपली काढून त्यांत ग्लिसरिन मिसळून जी लस होते ती, ग्लिसरिनमिश्रित लस *f*. LANOLINATED V. वासरावरील पुळीची खपली काढून त्यांत ल्यानोलिन मिसळून जी लस होते ती; ल्यानोलिनमिश्रित लस *f*.] V. *a*. **देवी काढण्यासंबंधी, देवी काढण्याच्या उपयोगाचा.**

Vacci'nia ( vak-si-nia ) *n*. **गोस्तनदेवी** *f. pl*., **गाईच्या स्तनावर ( टोंचून ) येणाऱ्या देवी** *f. pl*.

Vac'cinifer *n*. **लस देणारें मूल.** २ **लस देणारी गाय.**

Vaccino-syphilis *n*. **मुलाची लस वापरल्यास क्वचित्‌प्रसंगीं होणारा गर्मीचा रोग** *m*.

Vacillate ( vas'i-lāt ) [L. *vacillare*, to sway to and fro.] *v. i.* **इकडून तिकडे -तिकडून इकडे हालणें, मागेंपुढें होणें.** २ *to waver* **कांकूं करणें, धरसोड करणें, डळमळणें, डळमळीतपणा असणें, अनिश्चितपणा असणें.**

Vacilla'tion *n*. **मागेंपुढें** *n*. २ *hesitation* **कांकूं** *n*, **डळमळीतपणा** *m*, **अनिश्चितपणा** *m*, **धरसोड** *f*.

Vacuity ( va-kū'it-i ) [L. *vacuitas -vacuus*, empty.] *n. emptiness* **रिकामेपणा** *m*, **शून्यपणा** *m*. २ *space unoccupied* **रिकामी जागा** *f*, **पोकळी** *f*.

Vacuole ( vak'ū-ōl ) [ L. *vacuus*, empty.] *n*. (*bot.*) **विवर** *n*, **खळगी** *f*.

Vacuum ( vak'ū-um ) [ L. *vacuus*, empty.] *n. a vacant or empty space* **शून्यावकाश** *m*, **रिक्तावकाश** *m*, **निर्वात स्थळ** *n*; as, "Torricellian V." Vacua *pl*. [V. BRAKE निर्वात ब्रेक *m*. हा आगगाडीच्या डब्यांना ( ते थांबवण्याकरितां ) लावलेला असतो. V. CLEANER वारा ओढून घेऊन केर काढण्याचें यंत्र *n*, केराचें निर्वात यंत्र *n*. V. TUBE निर्वात नलिका *f*. V. GAUGE हवा काढून घेतल्यामुळें पडणारा दाब मोजण्याचें यंत्र *n*, निर्वात दावाचें घड्याळ *n*, व्हाक्युअमघड्याळ *n*.]

Vade-mecum ( vā'dē-mē'kum ) [Lit. 'go with me.' -L. *vadere*, to go, *me*, abl. of *ego*, I, *cum*, with.] *n. a handbook* **नेहमीं जवळ बाळगण्याचें पुस्तक** *n*, **हस्तपुस्तक** *n*.

Vagabond (vag'a-bond) [Fr. -L. *vagari*, to wander.] *n. wanderer, vagrant* **भटक्या** *m*, **भटकणारा** *m*, **घरनादाराचा** *m*. २ *an idle and worthless fellow* **उडाणटप्पू** *m*, **अलाणटप्पू** *m*. ३ (*colloq.*) *scamp, rascal* **ठक** *m*, **उचल्या** *m*, **भामट्या** *m*. V. *a*. *wandering* **भटकणारा, भटक्या.** २ *having no settled home* **घरदार नसलेला, उडाणटप्पू.**

Vag'abondage *n*. **भटकेपणा** *m*. २ **उडाणटप्पूपणा** *m*.

Vagary ( va-gār'i ) [ L. *vagari*, to wander.] *n. a wild freak* **लहर** *f*, **हुकी** *f*, **तरंग** *m*, **वेड** *n*. Vagaries *n. pl*.

Vagina (va-ji'na) [L. *vagina*, a sheath. या शब्दाचा धात्वर्थ कोप किंवा पिशवी असा आहे.] *n.* गर्भाशयाचें मुख *n*, अपत्यपथ *m*, योनिमार्ग *m*, loosely योनि *f*. [PLUGGING THE V. योनिमार्गांत बोळे घालणें *n*. RIGIDITY OF V. AND PERINEUM योनि व विटप यांचा ताठपणा *m*.] २ (*bot.*) डेंख. Vaginæ *n. pl.*

Vagi'nal *a.* योनीचा, योनिमार्गाचा, योनिमार्गांत होणारा. [V. DOUCHE योनिमार्ग धुऊन काढण्याचा विधि *m*, उत्तरबस्तीप्रयोग *m*. V. OUTLET योनिमुख *n*. V. POLYPUS योनिमार्गांत होणारा ग्रंथि *m*.]

Vaginismus (va-ji-nis'-mus) [L. *vagina*, a sheath.] *n.* स्त्रीसंग करण्याचा प्रयत्न केला असतां योनिद्वार जोरानें आकुंचन पावून दुखणें, (संगप्रतिरोधक) योनिसंकोच *m*.

Vagini'tis *n.* योनिमार्गदाह *m*, अपत्यपथदाह *m*.

Vagitus Uterinus *n.* गर्भाशयांत मुलाचें रडणें *n*.

Vagrancy (vā'gran-si) [L. *vagans -vagari*, to wander.] *n.* फिरत राहणें *n*, भटकत राहणें *n*. २ भीक मागणें *n*. ३ भटकेपणा *m*, उनाडकी *f*, उनाडणें *n*.

Va'grant *a. wandering without any settled dwelling* भटकणारा, रस्त्यांतून फिरणारा, घरदार नसलेला, बिनघराचा. २ उनाडणारा, भीक मागणारा.

Vague (vāg) [Fr. -L. *vagus*, wandering.] *a. unsettled, indefinite* मोघम, संदिग्ध, अस्पष्ट, अनिश्चित, लटपटीचें (उत्तर), अभोगत, सवडीचा.

Vague'ly *adv.* मोघम, संदिग्धपणानें.

Vague'ness *n.* मोघमपणा *m*, संदिग्धपणा *m*, अनिश्चितपणा *m*.

Vail (vāl) [See Veil.] *n.* बुरखा *m*.

Vain (vān) [Fr. *vain* -L. *vanus*, empty.] *a. unavailing, fruitless* व्यर्थ, वृथा, पोकळ, कोरडा, भाकड, वांझा, निरर्थक, असार, मोघ. [IN V. व्यर्थ, वृथा.] २ *unreal, shadowy* रिकामा, रिता, रिक्त, पोकळ, निरर्थक. ३ *ostentatious, vain-glorious* गर्विष्ठ, दिमाखी, पतरासी, अभिमानी, अहंकारी, डौल्या, डामडौल्या, फुशारकीखोर, बढाईखोर, अवडंबऱ्या.

Vainglo'rious *a. conceited, proud* गर्विष्ठ, दिमाखी, दिमाखाचा, दिमाखदार, पत्राजखोर, डौली.

Vainglo'ry *n. conceit, pride* डौल *m*, दिमाख *m*, अभिमान *m*, तोरा *m*, शेखी *f*, पत्राज *f*. [TO EXHIBIT OR MANIFEST V. फुशारकी मिरवणें, फुशारकी मारणें.]

Vain'ly *adv.* व्यर्थ, उगा, वायां, वृथा, उगीच, उगीचचे उगीच, एरवीं, पोकळ. २ अभिमानानें, शेखीनें, डौलानें.

Vain'ness *n.* पोकळपणा *m*, कोरडेपणा *m*, वृथात्व *n*.

Vale (vāl) [Fr. *val* -L. *vallis*, a valley.] *n.* दरी *f*.

Valediction ( val-ē-dik'shun ) [ L. *vale*, farewell, and *dicere*, to say.] *n. a farewell* जातेवेळचा आशीर्वाद *m*, प्रास्थानिकस्वस्तिवचन *n*.

Valedictory (val-ē-dik'tor-i) *a.* जातेवेळच्या आशीर्वादाचा, प्रास्थानिकाशीर्वादात्मक.

Valence (vā'lens) [L. *valere*, to be strong.] *n.* (*chem.*) मूल्यकत्व *n*.

Va'lency *n.* (*chem.*) मूल्यकत्व *n.*
Valet (val'et) [Fr.] *n. a servant* खवास *m*, खिदमतगार *m*, खिदमतदार *m*, हुजऱ्या *m*.
Valetudinarian (val-ĕ-tūd-in-ār'i-an) [L. *valetudinarius* -*valere*, to be strong.] *a. sickly, invalid* जन्मरोगी, सदारोगी, पिंडरोगी. V. *n.* जन्मरोगी *m*, सदारोगी *m*.
Valetudinar'ianism *n.* जन्मरोगिपणा *m*, सदारोगिपणा *m*.
Valetu'dinary *a.* जन्मरोगी, सदारोगी.
Valiant (val'yant) [Fr. *vaillant* -L. *valens, valentis* -*valere*, to be strong. Cf Sk. बल.] *a. strong, brave* शूर, मर्द, जवानमर्द, पराक्रमी, बलवान्, शौर्यशाली, विक्रमशाली. Val'iantly *adv.* शूरपणानें, मर्दाईनें, बहादुरकीनें, पराक्रमानें, पराक्रमेंकरून. Val'iantness *n.* शूरपणा *m*, मर्दपणा *m*, पराक्रम *m*.
Valid ( val'id ) [ L. *validus* -*valere*, to be strong.] *a. sound, cogent, just* बळकट, सबळ, जोराचा, दृढ, टिकाऊ. २ *good in law, having legal force* कायदेशीर, कायद्याला धरून, कायद्याचा आधार असलेला.
Valid'ity *n.* बळकटपणा *m*, जोर *m*, टिकाऊपणा *m*. २ कायदेशीरपणा *m*, खरेपणा *m*.
Valid'ly *adv.* कायदेशीरपणानें, खरेपणानें.
Vallecula ( va-lek'ū-la ) [L.] *n.* (*bot.*) *a groove or furrow* प्रणाली *f*, खोयण *f*.
Valley ( val'i ) [Fr. *vallee, val*, a vale.] *n. a hollow between hills* दरी *f*, खिंड *f*. २ *a plain bordering on a river* थडी *f*, थड *f*. Used in composition with the name of the river; as, गंगथडी the valley of the Godavery, भीमथडी *f*, निरथडी, &c. the valley of the Bheema, Nira, &c.
Valorous ( val'ur-us ) [ L. *valere*, to be strong.] *a. intrepid, courageous* शूर, पराक्रमी, मर्द, जवानमर्द. २ शौर्याचा, पराक्रमाचा मर्दुमकीचा; as, "V. deeds." Val'orously *adv.* शूरपणानें, मर्दपणानें, मर्दाईनें.
Valour (val'ur) [L. *valor*, -*valere*, to be strong.] *n. courage, boldness* शौर्य *n*, पराक्रम *m*, मर्दाई *f*, जवानमर्दी *f*, मर्दुमकी *f*.
Valuable ( val'ū-a-bl ) [ See value.] *n. precious, worthy* मौल्यवान्, किंमतीचा, मोलाचा, मोठे किंमतीचा, मोठे योग्यतेचा, महामूल्य, जड (जवाहीर). [ V. CONSIDERATION ( law ) योग्य किंमतीचा मोबदला, द्रव्याचा मोबदला.]
Valu'ation *n. the act of valuing* किंमत करणें *n*, किंमत ठरवणें *n*, मोल ठरवणें *n*. २ *value set upon a thing* केलेली किंमत *f*, ठरवलेलें मोल *n*. ३ *estimated worth* अंदाजी किंमत *f*, अंदाजी मोल *n*.
Value ( val'ū ) [ O. Fr. *value* -L. *valere*, to be strong.] *n. worth, price* मोल *n*, किंमत *f*. [V. PAYABLE PARCEL देयमूल्य बंगी *f*. ] २ *goodness, importance* चांगुलपणा *m*, किंमत *f*, योग्यता *f*, हिशेब *m*, हिशोब *m*, पाड *m*, मान *n*, बिशात *f*. The

last four words are used chiefly *with a neg. con.* or *implic.* V. *v. t. to set value on* किंमत करणें, मोल करणें, किंमत लावणें -ठरवणें. २ *to estimate, to rate highly* लेखणें, मानणें, गणणें, मेजणें, मोजणें, चांगला -उत्तम समजणें -मानणें, विचारणें, पुसणें.

Val'ueless *a. worthless* कवडीकिंमतीचा, निरुपयोगी.

Val'uer, Valua'tor *n.* किंमत करणारा *m*, किंमत ठरवणारा *m*.

Valvate (val'vāt) [From Valve.] *a.* (*bot.*) चिकटलेल्या पडद्यासारखा, कांठ परस्परांस लागलेला, पार्श्वांतलग्न.

Valve (valv) [Fr. -L. *valva*, a folding door.] *n. a folding door* घडीचें दार *n*, दुतलफी दार *n*, दुझडपी दार *n*. २ *lid or cover to open in one direction and to close in another* पडदा *m*, एकांगी पडदा *m*, एकांगी दार *n*. ३ (*mech. eng.*) व्हाल (corruption of English Valve), पडदा *m*, दरवाजा *m*. [SAFETY V. सेफ्टीव्हाल, संरक्षक पडदा *m*. STOP V. इस्टापव्हाल. SLIDE V. सरकपडदा.] ४ (*anat.*) पडदा *m*. [TRICUSPID OR THREE-PEAKED V. त्र्यंकुशपडदा.] ५ (*bot.*) शकल *n*.

Vamp (vamp) [Fr. *avant-pied*, the fore-part of the foot.] *n. the upper leather of a shoe* बुटाचा वरचा पंजाकडील भाग *m*, बुटाचा पंजा *m*. V. *v. t. to piece with something new* नवाजुना करणें.

Vampire (vam'pīr) [Fr. -Servian *vampir.*] *n. a (supposed) ghost which sucks the blood of its victims* निजलेल्या मनुष्यांचें रक्त पिणारें (काल्पनिक) भूत *n*. २ *an extortioner* सक्तीनें पैसे वसूल करणारा *m*, सक्तीनें पैसे उकळणारा *m*.

Van (van) [Fr. *avant* -L. *ab ante*, from before.] *n. the front part* (of an army, fleet, &c.) अघाडी *f*, बिनी *f*, फौजेचा मोहरा *m*, फौजेचें तोंड *n*. [GENERAL OR OFFICER OF THE V. बिनीवाला. V. AND REAR अघाडीपिछाडी. TO STAND (AND FIGHT) IN THE V. तोंडीं लागणें.]

Vanadium (va-nā'-dium) [From Vanadis, goddess in Scandinavian mythology.] *n.* रसायनशास्त्रांतील एक मूलतत्त्व *n*, 'वनाट.'

Vandal *n.* जर्मनींतील व्हॅन्डाल नांवाचे प्राचीन लोक. ह्यांनीं गाल, स्पेन, उत्तर आफ्रिका व रोम येथें स्वाऱ्या करून तेथील मौल्यवान् ग्रंथ व कलाकौशल्याचीं कामें यांचा विध्वंस केला. २ कलाकौशल्याच्या कामांचा विध्वंस करणारा.

Vand'alism *n.* कलाकौशल्यविध्वंसक बुद्धि *f*.

Vane (vān) [A. S. *fana*, a small flag.] *n.* (वायूची गति दाखविणारा) वातकुक्कट *m*. २ *one of the blades of a windmill* पवनचक्कीचा पंख *m*.

Van-guard *n.* अघाडीची पहिली रांग *f*, बिनी *f*.

Vanilla (va-nil'a) [Latinised from Fr. *vanille* -Sp. *vainilla* -*vaina* -L *vagina*, a sheath.] *n.* व्हानिला फळ *n*. २ व्हानिला फळाचा अर्क *m*, व्हानिला *m*. हा आइस्क्रीममध्यें व चाकोलेटमध्यें सुवासाकरितां घालतात.

Vanish (van'ish) [L. *vanescere*, to pass away -*vanus*, empty.] *v. i. to disappear, to be lost* नाहींसा होणें, दिसेनासा होणें, अदृश्य होणें, अन्तर्धान पावणें, तिरोधान *n.* पावणें, उडणें, गप्प होणें, गायब होणें.
Vanished *pa. t.* V. *pa. p.* नाहींसा झालेला, अदृश्य झालेला, अंतर्हित, तिरोहित, लुप्त.
Vanishing fraction *n.* लुप्त अपूर्णांक *m.*
Vanishing line *n.* अंतर्हित रेखा *f*, लोप पावणारी रेखा *f*.
Vanishing point *n.* लोपस्थानबिंदु *m*, अंतर्हितबिंदु *m.*
Vanity (van'-i-ti) [See Vain.] *n. empty pride or ostentation* पोकळ डौल *m*, वृथाभिमान *m*, पोकळ गर्व *m*, वृथा गर्व *m*, ऐट *f*. २ *idle show* अवडंबर *n*, आडंबर *n*, रिकामी ऐट *f*, डामडौल *m.* ३ *empty pleasure* शुष्क चैन *f*, रिकामी चैन *f*, आंबट शोक *m.*
Vanquish (vank'wish) [Fr. *vaincre* -L. *vincere*, to conquer.] *v. t. to conquer* जिंकणें, जय मिळवणें, पराभव करणें.
Vanq'uishable *a. capable of being vanquished* जिंकतां येण्यासारखा, पराभव करण्यासारखा, जेय.
Vanq'uisher *n.* जिंकणारा *m*, जेता *m.*
Vantage (van'tāj) *n. advantage* सोय *f*, फायदा *m.*
Vantage-ground *n.* सोईचें ठिकाण *n*, सोईची जागा *f*. २ सोय *f*, संधि *f*.
Vantage -point *n.* सोईस्कर ठिकाण *n.* २ संधि *f*.
Vapid (vap'id) [L. *vapidus*, vapid.] *a. insipid, spiritless* पाणचट, पचपचीत, सळमळीत, मुळमुळीत, नीरस, फिका, फिक्का, बेकस. Vapid'ity, Vapi'dness *n.* पाणचटपणा *m*, पचपचीतपणा *m*, सळमळीतपणा *m*, मुळमुळीतपणा *m*, फिकेपणा *m*, बेकसपणा *m.*
Vap'idly *adv.* पाणचटपणानें, सळमळीतपणानें.
Vaporarium *n.* बाष्पस्नान *n*, वाफारा घेणें *n.* २ बाष्पस्नानयंत्र *n*, वाफारा घेण्याचें यंत्र *n.*
Vaporifi'c *a.* (*chem.*) बाष्पकारी, उडून जाणारा.
Vaporiza'tion *n.* वाफ होणें *n*, वाफ करणें *n*, बाष्पीभवन *n*, बाष्पीकरण *n.*
Va'porize *v. i.* बाष्प होणें, बाष्प बनणें. V. *v. t.* बाष्प [करणें, वाफ करणें.
Va'porizer *n.* तेलाची वाफ तयार करण्याचें भांडें *n*, तैलबाष्पपात्र *n*, तैलबाष्पकर *n*, बाष्पकर *n.*
Va'porous *a. full of vapours* वाफेचा, वाफ असलेला, बाष्पमय, बाष्पप्रचुर, सबाष्प, बाष्परूप; as, "V. air of the valleys." २ निराधार, शुष्क; as, "V. speculations."
Vapour (vā'pur) [Fr. -L. *vapor*.] *n.* वाफ *f*, बाष्प *n*, सजलबाष्प *n.* २ (loosely) *mist* धुकें *n.* [SATURATED V. संपृक्त बाष्प *n*, सजल बाष्प *n.* V. BATH वाफारा *m*, बाष्पनिमज्जन *n.*] ३ (*med.*) *remedial agent to be inhaled* औषधिद्रव्याच्या वाफेचा अपकारा *m.* ४ *unsubstantial thing* निराधार गोष्ट *f*, कल्पनाजाल *n*, भ्रम *m*; as, "For, what is your life? It is even a *vapour* that appeareth for a little time, and then vanisheth away."

Vapour *v. i. to pass off in vapour* वाफ होणें, वाफेच्या रूपानें निघून जाणें. २ *to boast, to brag* वल्गना करणें, बढाया मारणें, ( तोंडाची ) वाफ दवडणें. V. *v. t.* वाफ करणें, वाफ बनविणें, वाफेच्या रूपानें बाहेर सोडणें.

Variable (vā'ri-a-bl) [Fr. -L. *variabilis.*] *a. changeable* बदलणारा, कमीजास्त होणारा, चंचल, अस्थिर. २ (*math.*) चल, विषम, विकारी, विकारक्षम. [ V. VELOCITY विषम वेग.] ३ (*astron.*) *changing in brightness* बदलणारा, कमीजास्त होणारा.

Variance ( vā'ri-ans ) *n. dissimilarity, difference* अंतर *n*, भेद *m*, तफावत *f*. २ *discord, disagreement* वांकडें *n*, बेबनाव *m*, वैमनस्य *n*, वितुष्ट *n*, तंटा *m*, भांडण *m*.

Varia'tion *n. change* फेर *m*, बदल *m*, पालट *m*. २ *difference* भेद *m*, फरक *m*. ३ (*astron.*) विकार *m*, तिथिसंस्कार *m*. [ ANNUAL V. वार्षिक विकार *m*. V. OF THE MOON चंद्रविकार *m*, चंद्राच्या गतीचा विकार *m*.] ४ (*math.*) विकार *m*, वैषम्य *n*, चलन *n*. [ VARIATION OF COMPASS होकायंत्राचें चलन *n*.] ५ (*pol. eco.*) अस्थिरता *f*, बदल *m*, फेरफार *m*, कमीजास्त होणें *n*.

Varicella ( va-ri-se'-la ) [ L. dim. of variola.] *n. chicken-pox* कांजिण्या *f. pl.*, मसूरिका *f. pl.*

Varicocele ( va-r'i-kō-sēl ) [ L. *varix*, a dilated vein.] *n.* वृषणांतील धातुवाहक शिरा जाड झाल्यामुळें होणारा ग्रंथि *m*, वृषणग्रंथि *m*.

Varicose Veins *n. pl.* वाईट रक्त जमल्यामुळें शिरा मोठ्या होऊन त्यांची गांठ होणें.

Variegate ( vā'ri-e-gāt ) [ L. *variegatus* -*varius*, various, and *agere*, to make.] *v. t. to mark with different colours* चित्रविचित्र करणें, नानारंगी करणें, बहुरंगी करणें.

Va'riegated *a.* चित्रविचित्र, कर्बुर, बहुरंगी, कबरा.

Varieg'ation *n.* चित्रविचित्रपणा *m*, विचित्रपणा *m*.

Variety ( va-ri'e-ti ) [L. *varietas* -*varius*, various.] *n. the quality of being various* विविधता *f*, नानाविधपणा *m*. २ ( as of a species or kind ) जात *f*, प्रकार *m*, भेद *m*. ३ *many and different kinds* निरनिराळे प्रकार *m. pl.*, निरनिराळ्या प्रकारच्या वस्तू *f. pl.* This sense is best rendered by the use of some adjective for various with the noun required; as, a variety of turbans नानातऱ्हेचीं पागोटीं; a great variety of fruits बहुत प्रकारचीं फळें.

Variety-show *n.* ( नाच, गाणें, फार्स, वगैरेंचा ) मिश्र जलसा *m*.

Variety-theatre *n.* मिश्र जलसे होणारें नाटकगृह *n*.

Variola ( vā-ri'ō-la ) [ L. *varius*, various, spotted.] *n. small-pox* देवी *f. pl.*

Variorum ( vā-ri-ō'rum ) [ From the full Latin '*editio cum notis variorum.*'] *a. a term applied to an edition of some work in which the notes of various commentators are inserted* सर्वटीकासंग्राहक ( आवृत्ति ).

**Various** (vā'ri·us) [L. *varius.*] *a. varied, different* निरनिराळा, निरनिराळ्या प्रकारचा, परोपरीचा, तऱ्हेतऱ्हेचा, परीपरीचा, अनेक, अनेकतऱ्हेचा, अनेकप्रकारचा, अनेक जातींचा, नानातऱ्हेचा, नानाप्रकारचा, नानाजातींचा, नानाविध, बहुविध, विविध. २ *variegated* चित्रविचित्र; as, "A rural seat of V. view."

**Va'riously** *adv. in various ways* अनेकतऱ्हेनें, अनेकरीतीनें, अनेकप्रकारानें, नानाप्रकारें, बहुप्रकारें, परोपरी. **Va'riousness** *n.* नानाविधता *f*, बहुविधता *f*, बहुप्रकारता *f*, नानाप्रकार *m. pl.*, बहुप्रकार *m. pl.*

**Varix** (va'-riks) [L.] *n.* अशुद्ध रक्तवाहिन्या किंवा शिरा फुगून त्यांची गांठ होणें *n.*

**Varlet** (vär'let) [O. Fr. *varlet.*] *n. a scoundrel* पाजी *m*, हरामखोर *m*, लुच्चा *m*, नीच *m*.

**Varnish** (vär'nish) [Fr. *vernis* -L. *vitrum*, glass.] *v. t.* वार्निस करणें, रोगण *n.* लावणें, रोगण देणें -करणें -चढवणें. २ (*fig.*) *to give a fair appearance to* वार्निस करणें (*fig.*), दोषाची तीव्रता कमी करणें. **Varnished** *pa. t.* V. *pa. p.* वार्निस केलेला, रोगण लावलेला, रोगणी.

**Var'nish** *n.* वार्निस *n*, रोगण *n.* २ *any gloss or palliation* वार्निस करणें *n*, दोषाची तीव्रता कमी करणें, वार्निस (*fig.*).

**Vary** (vā'ri) [L. *variare* -*varius.*] *v. t. to make different, to modify* बदलणें, फिरवणें, पालटणें, फेरफार *m.* करणें, रूपभेद *m* -रूपांतर *n.* करणें *g. of o.*

**Vary** *v. i. to change* बदलणें, फिरणें, फेरफार *m.* होणें *g. of s.* २ *to be dissimilar, to differ* भेद *m* -फेर *m* -फेरफार *m.* असणें *g. of s. recip.*, भिन्न असणें. ३ (*pol. eco.*) कमीअधिक होणें -असणें, फरक पडणें, फरक होणें -असणें. ४ (*math.*) विकार पावणें. [To V. DIRECTLY समप्रमाणांत विकार पावणें, समप्रमाणांत असणें, परस्पर समविकार पावणें. To V. INDIRECTLY व्यस्त प्रमाणांत असणें, परस्पर व्यस्तविकार पावणें.]

**Vas** (vas) [L.] *n.* (*anat.*) नलिका *f*, स्रोत *m.* [VAS DEFERENS शुक्रवहनलिका *f*.]

**Vascular** (vas'kū lar) [L. *vasculum*, *dim.* of *vas*, a vessel.] *a. of or relating to the vessels* शिरांचा, वाहिनींचा, वाहिनींसंबंधी. २ पुष्कळ शिरा असलेला, अशुद्धवाहिन्या पुष्कळ असलेला, शिरामय, वाहिनीमय. ३ (*bot.*) वाहिनीमय.

**Vascular'ity** *n.* शिरामयता *f*, अशुद्धवाहिनीमयता *f*.

**Vase** (vāz) [Fr. -L. *vasum* or *vas.*] *n.* (मातीचें, धातूचें, कांचेचें किंवा दगडाचें) भांडें *n*, व्हेझ. २ नकशी काढलेलें व्हेझ *n.* ३ (चंबूच्या आकृतीचें) खोदकामाचें व्हेझ *n.* [VASE-PAINTING व्हेझला रंग देणें.]

**Vaseline** (vas'e·lin) [Gr. *wasser*, water, and Gr. *elaion*, water.] *n.* पेट्रोलियम तेलापासून निघालेली चरबी *f*, व्हासिलिन *f*. हिचा मलमें तयार करण्याकरितां उपयोग करतात.

Vassal (vas'al) [L. *vassalis*, a servant.] *n. one who holds land from, and renders homage to, a superior* पोटजहागिरदार *m.* २ *a dependant, a retainer* रयत *f*, प्रजा *f*, ताबेदार *m*, कूळ *n*.
Vass'alage *n.* रयतपणा *m*, रयताचा *m*, ताबेदारी *f*.
Vast (vast) [L. *vastus*, waste.] *a. of great extent* अफाट, विस्तीर्ण, फार मोठा, अवजड, अवाढव्य.
Vast'ly *adv.* फारच, अतिशय.
Vast'ness *n.* अफाटपणा *m*, विस्तीर्णपणा *m*, अतिशयपणा *m*.
Vat (vat) [Dut. *vat*.] *n.* लांबोडें मोठें पिंप *n*.
Vatican (vat'i-kan) [Fr. -It. *Vaticano* -L. *Mons Vaticanus*, a hill in Rome.] *n.* (रोम येथील) व्हाटिकन टेंकडीवरील (पोपचा व इतर) राजवाडे *m. pl.* २ *papal authority* पोपची सत्ता *f*, पोपचा अधिकार.
Vaticinate (va-tis'i-nāt) [L. *vaticinari*, -*atus*, to prophesy -*vates*, a seer.] *v. t. to prophesy* भविष्य सांगणें, भविष्य वर्तवणें.
Vault (vawlt) [L. *volvere*, *volutum*, to roll.] *n. continued arch* घुमट *m*, वाढवलेली कमान *f*, मेघडंबरी *f*, डेरा *m*, कटाह *m*. [CELESTIAL V. आकाश *n*, अण्डकटाह *m*.] २ *a cellar* भुयार *n*, तळघर *n*. ३ *a repository for the dead* शवालय *n*, शवागार *n*. V. *v. t. to arch* कमान उभारणें, कमान करणें -देणें.
Vault (vawlt) *n. a leap or a spring* उडी *f*, कमान *f*. V. *v. i. to leap* उडी मारणें, कमान टाकणें.
Vaul'ted *a.* कमानदार, मेहेरापदार.
Vaunt (vawnt') [L. *vanitas*, vanity, -*vanus*, vain.] *v. i. to brag, to boast* फुशारकी *f.* मारणें, शेखी *f.* मिरवणें, शेखीच्या गोष्टी *f. pl.* सांगणें, वल्गना करणें. V. *v. t. to boast of* बढाई सांगणें, फुशारकी *f* -प्रतिष्ठा *f.* सांगणें -मिरवणें *g. of o.*
Vaunt *n.* फुशारकी *f*, शेखी *f*, बढाई *f*.
Vaun'ter *n.* फुशारकी *f.* सांगणारा *m*, बढाई मारणारा *m*.
Veal (vēl) [O. Fr. *veel*, -L. *vitellus*, dim. of *vitulus*; Gr. *italos*, a calf.] *n. the flesh of a calf* वासराची सागुती *f*, गोवत्समांस *n*.
Vectis (vek'-tis) [L. *vehere*, to carry.] *n.* गर्भशंकु *m*, प्रसूतिप्रयोगांत उपयोगीं पडणारा एक प्रकारचा टेंका *m*. हें शस्त्र आहे.
Vector (vek'tor) [L. -*vehere*, *vectum*, to convey.] *n.* (*math.*) चलनाभिज्या *f*.
Veer (vēr) [L. *virare*, to turn.] *v. i. to change direction, as the wind* फिरणें, दिशा *f.* पालटणें, तोंड फिरणें, वळणें. [To V. ABOUT कोंडाळणें, घोटाळणें, गोंधळणें.] २ *to change one's mind* बेत फिरणें, फिरणें, बदलणें. V. *v. t. to turn, to shift* वळवणें, हालवणें, बदलणें. २ (a ship) सुकाणूं फिरवणें, (जहाजाची) दिशा बदलणें.
Vega (vē'ga) *n.* (*astron.*) *the brightest star in the constellation Lyra* स्वरमंडलराशींत अभिजिताची पहिली तारा.

Vegetable (vej'e-ta-bl) [L. *vegetabilis*, animating -L. *vegetare*, to quicken.] *n.* वनस्पति *f*, उद्भिज्ज *n.* (b) भाजी *f*, शाक *f*, तरकारी *f*. [V. ALBUMEN उद्भिज्ज बलक *m*. V. SAP वनस्पतिरस *m*. V. KINGDOM वनस्पतिकोटी *f*, उद्भिज्जकोटी *f*. WILD ESCULENT V. रानभाजी *f*.] २ (*pl.*) (*compreh.* or *laxly*) भाजीपाला *m*, शाकपाला *m*, शाकभाजी *f*. V. *a. belonging to plants* वनस्पतीचा, वनस्पतिसंबंधी. २ शाकभाजीचा.

Vegeta'rian *n. one who holds that vegetables are the only proper food for man* शाकाहारी *m*, शाकभोजी *m*, वनस्पत्याहारी *m*. V. *a. consisting of vegetables* कन्दमुळांचा, शाकभाजीचा, वनस्पतीचा; as, "V. diet."

Veg'etate *v. i. to grow by roots and leaves, to sprout* (मुळें आणि पानें यांनीं पोषणद्रव्याचें शोषण करून) वनस्पतीप्रमाणें वाढणें. (b) मोड येणें, कोंम येणें, अंकुर येणें -फुटणें. २ *to live an idle or monotonous life* (पशूप्रमाणें) आळसांत वाढणें, आळसांत आयुष्य घालवणें. ३ (*med.*) मांसांकुर वाढणें, मांसांकुरवृद्धि होणें; as, "A *vegetating* papule."

Vegeta'tion *n. process of growing, as a plant* (वनस्पतीप्रमाणें) वाढणें *n*, मोड फुटणें *n*. (b) अंकुरोद्गम *m*. २ *plants in general* झाडझुडूप *n*, झाडझाडोरा *m*, गवतझाड *n*, हिरवळ *f*. [LUXURIOUS OR WILD V. रान *n*, जंगल *n*. OVERRUN WITH WILD V. जंगलगर्द.] ३ (*med.*) मांसांकुरवृद्धि *f*, मांसांकुर *m*.

Vehemence, See under Vehement.

Vehement (ve'he-ment) [L. *vehemens* -*ve*, out of, and *mens*, mind.] *a. forcible, violent* जोराचा, झपाट्याचा, तडाक्याचा, जबर, जबरदस्त, दांडगा, प्रचंड, जाज्वल्य. २ *ardent, fervent, eager* उत्साहाचा, आवेशाचा, आवेशी, उत्साही. Ve'hemence *n.* जोर *m*, बळ *n*, झपाटा *m*, तडाखा *m*, कडाका *m*. २ *fervour* आवेग *m*, आवेश *m*, जोर *m*, उत्साह *m*.

Ve'hemently *adv.* जोरानें, झपाट्यानें, तडाख्यानें, कडकडून. २ आवेशानें, उत्साहानें, आवेशपूर्वक.

Vehicle (vē'hi-kl) [L. *vehiculum* -*vehere*, to carry.] *n. any kind of carriage or conveyance* गाडी *f*, वाहन *n*, यान *n*. २ (in medicine) वहन *n*. ३ (*fig.*) साधन *n*, मार्ग *m*; as, "He used the press as a V. for his political opinions."

Vehicular *a.* गाडीवजा, गाडीसारखा उपयोगीं येणारा; as, "V. contrivance." २ वाहनाचा, वाहनसंबंधी, वाहनविषयक, गाड्यांचा. [V. TRAFFIC गाड्यांची रहदारी *f*, गाड्यांची वाहतुक *f*, गाड्यांची जाये *f*.]

Veil (vāl) [L. *velum*, a curtain.] *n. a curtain* पडदा *m*. २ *a cover for the face* बुरखा *m*, ओढणी *f*. [To TAKE THE V. जोगीण बनणें.] ३ *a cover, a disguise* पडदा *m*, आडपडदा *m*, बुरखा *m*, व्याज (S.) *m*, मिष *n*. V. *v. t. to cover with a veil* बुरखा घेणें, बुरखा घालणें. २ (*fig.*) *to conceal* झांकणें, लपविणें, लपवून ठेवणें, छपविणें; as, "*Veiled* resentment."

Veil'ing *n.* बुरखा घालणें *n*, बुरखा घेणें *n*, झांकणें *n*. २ बुरखा *m*. ३ बुरख्याचें कापड *n*.

Vein (vān) [Fr. *veine* -L. *vena*, vein.] *n*. शिरा *f*, शीर *f*, नस *f*, अशुद्धरक्तवाहिनी *f*. [HEPATIC V. यकृतांतील शिरा *f*. PORTAL V. कोष्ठगत शिरा *f*. PULMONARY V. फुप्फुसायात शिरा *f*.] २ (of a leaf) शीर *f*, शिरा *f*. ३ *a streak in wood or stone* दोरा *m*, शीर *f*. ४ *mood* वृत्ति *f*; as, "Said in a humorous *vein*."

Veined *a*. शिरा असलेला, शिराळ, शिरामय.

Veinlet *n*. उपशिरा *f*.

Velamen (velā-m'en) [L. *velamen*, covering.] *n*. मस्तिष्काची आवरणत्वचा *f*. Velamina *n. pl*.

Velamentum *n*. मस्तिष्काची आवरणत्वचा *f*. Velamenta *pl*.

Vellum (vel'um) [O. Fr. *velin* -Low L. (*charta*, paper) *vitulina*, of a calf -L. *vitulus*.] *n*. *a finer kind of parchment* मृदुचर्मपत्र *n*. २ मृदुचर्मपत्रावरचा हस्तलेख *m*, चर्मपत्रलेख *m*, चर्मलेख *m*.

Velocity (vē-los'i-ti) [L. *velocitas* -*velox*, swift.] *n*. *swiftness* वेग *m*, जव *m*. [ANGULAR V. कोणात्मक वेग *m*.]

Velorum (English name Sail) *n*. (*astron*.) शीड *n*.

Velvet (vel'vet) [Low L. *velluetum* -*villutus* -L. *villus*, shaggy hair.] *n*. *silk stuff* मखमल *f*, मखमाल *f*. V. *a*. मखमली, मखमलीचा.

Vena Cava *n*. बृहत्शीर *f*, धोंडशीर *f*. [SUPERIOR VENA CAVA ऊर्ध्वबृहत्शिरा, वरची धोंडशीर *f*. INFERIOR VENA CAVA अधोबृहत्शिरा *f*, खालची धोंडशीर *f*.]

Venal (vē'nal) [L. *venalis* -*venus*, sale.] *a*. *mercenary* लांचखाऊ, लांचखोर. २ *held for sale* (उघड) विक्रीस मांडलेला. ३ *that may be got for a price* किंमत देऊन मिळणारा.

Venal'ity *n*. लांचखोरी *f*, लांचलुचपत *f*. २ *prostitution of talents or services for a reward* द्रव्याकरितां बुद्धीचा दुरुपयोग करणें *n*, द्रव्याच्या आशेनें बुद्धि वाईट कामास लावणें *n*, द्रव्याकरितां बुद्धीचा दुरुपयोग *m*.

Venation (ve-nā'shun) [From vein.] *n*. (*bot*.) शिरारचना *f*, शिरांची मांडणी *f*. [MULTICOSTATE V. (अनेक) मध्यशिरामय शिरारचना *f*. PARALLEL V. समांतरशिरारचना. RETICULATE V. जाळीदार -जालाकार शिरारचना *f*. UNICOSTATE V. एकमध्यशिरा (असलेली) शिरारचना *f*.]

Vend (vend) [L. *vendere* -*venus*, sale.] *v. t*. *to sell* विकणें, विक्रय *m*. करणें *g. of o*.

Vendee' *n*. *the person to whom a thing is sold* विकत घेणारा *m*, क्रेता *m*.

Ven'der (but in law Ven'dor) *n*. *a seller* विकणारा *m*, विक्रेता *m*, विक्या (in *comp*.), बेचनेवाला *m*, बेचनार *m*.

Ven'dible *a*. विकण्याजोगा, विक्रेय.

Ven'dibles *n. pl*. विक्रीचे पदार्थ *m. pl*., विक्रेय वस्तु *f. pl*.

**Veneer** (ve-nēr′) [From the root of Furnish.] *v. t. to cover* (furniture, &c.) *with a thin layer of wood* फर्दीजोडणी *f.* करणें. २ *to disguise with artificial attractiveness* कोशेव्यानें झांकून टाकणें.

**Venerable** (ven′e-ra-bl) [L. *venerabilis* -*venere*, to venerate.] *a. that may be venerated* पूज्य, पूजनीय, मान्य, माननीय, आदरणीय, आदरार्ह, पूजार्ह. २ *sacred* पवित्र, पूज्य. ३ *aged* वृद्ध, वयस्क; as, "A V. parent."

**Ven′erableness** *n.* पूज्यता *f*, पूजनीयता *f*, मान्यता *f.* २ पवित्रता *f.*

**Venerate** (ven′e-rāt) [L. *venerari*, to venerate.] *v. t. to pay great respect or honour to* (-चा) आदर करणें, (-ची) बूज *f* -मान *m.* राखणें -ठेवणें. २ *to regard with the greatest respect* परमपूज्य मानणें.

**Veneration** *n.* (the *act*) आदर करणें *n*, बूज *f.* ठेवणें *n*, पूज्य मानणें *n.* २ *reverance* आदर *m*, आदरबुद्धि *f*, पूज्यभाव *m.* ३ *awe* (आदरयुक्त) दरारा *m*, सादरभय *n.*

**Venereal** (vē-nē′rē-al) [L. *venereus* -*Venus*, *Veneris*, the goddess of love.] *a. pertaining to or arising from sexual intercourse* संभोगाचा, संभोगजन्य, मैथुनसंबंधी, मैथुनविषयक. २ (of a disease) फिरंगोपदंशाचा, गरमीचा, वीसनखीचा. [V. DISEASE गरमी *f*, उपदंश *m*, दुःख *n.* V. ULCER गरमीचा चट्टा.] ३ *exciting desire for sexual intercourse* उद्दीपक, वाजीकरणाचा. ४ *curing venereal diseases* उपदंशावरचा, उपदंशावर गुणकारी, उपदंशशामक; as, "V. medicines."

**Venesection** (vē-nē-sek′shun) [L. *vena*, a vein, *sectio*, cutting.] *n.* शीर तोडणें *n*, शिरावेध *m*, शिरा तोडून रक्त काढणें *n*, शीरतोडणी *f*, शिरामोक्ष *m.*

**Venetian Blinds** *n. pl.* झुलक्या *f. pl.* [FIXED VENETIAN BLINDS कायमच्या झुलक्या *f. pl.* MOVABLE VENETIAN BLINDS फिरत्या झुलक्या *f. pl.*]

**Vengeance** (venj′ans) [Fr. *Venger*. See Revenge.] *n. revenge* सूड *m*, प्रतिकार *m*, बदला *m*, प्रतिक्रिया *f*, प्रतिफल *n.* [TO TAKE V. सूड *m.* घेणें, सूड उगवणें. I WILL HAVE V. नरडीचा घोट घेईन, नरडीचें रक्त पिईन, नरडी फोडीन. WITH A V. THIS PHRASE IS WELL RENDERED BY अनर्थ *m* -एकगजब मांडणें, शर्थ -पराकाष्ठा करणें; AS, "HE BEAT WITH A V. त्यानें मारण्याचा अनर्थ मांडला."]

**Venge′ful** *a. vindictive* खुनशी, आकशी, आकसखोर.

**Venial** (vē′nial) [Fr. L. *venialis*, pardonable -*venia*, pardon.] *a. pardonable, excusable* क्षम्य, क्षमा करण्याजोगा, उपेक्षणीय, लघु; as, "V. fault."

**Venison** (ven′izn) [Fr. *venaison* -L. *venari*, to hunt.] *n.* हरणाची सागुती *f*, हरणाचें मांस *n*, मृगमांस *n.*

**Venom** (ven′um) [L. *venenum*, *poison.*] *n.* विष *n*, जहर *n*, गरल *n.* २ *spite, malice* द्वेष *m*, दुष्टपणा *m*, द्वेषबुद्धि *f.*

Ven'omous *a. poisonous* विषाचा, विषारी, विखाराचा. २ *spiteful* दुष्टपणाचा, द्वेषबुद्धीचा. ३ *mischievous* पाजी, दुष्ट; as, "A V. writer." Ven'omously *adv.* दुष्टपणानें, दुष्टबुद्धीनें, विष कालवून, विष पसरून, विष ओकून. Ven'omousness *n.* विषारीपणा *m*, विषार *m.* २ दुष्टपणा *m.* ३ पाजीपणा *m.*

Venous (vē'nus) [L. *venosus -vena*, a vein.] *a. contained in a vein* शिरेचा, शिरेंतला. [V. BLOOD शिरागत रक्त *n*, अशुद्ध रक्त *n*, दुष्ट रक्त *n*, काळसर रक्त *n.*]

Vent (vent) [Fr. -L. *ventus*, wind.] *n. an aperture, passage* दार *n*, द्वार *n*, दरवाजा *m*, उच्छ्वास *m*, वाट *f.* [V. HOLE उच्छ्वास *m*, श्वास बाहेर जाण्याकरितां केलेलें छिद्र *n.* TO GIVE V. TO (-ला) वाट काढणें, वाट करणें, व्यक्त करणें.] २ (for water) उघडी *f*, दार *n.* ३ बंदुकीचा काना *m.* V. *v. t. to let out, to pour forth* सोडणें, मोकळा करणें, काढणें, रस्ता *m* -वाट *f.* करणें.

Ventilate (ven'ti-lāt) [L. *ventilare -ventulus*, dim. of *ventus*, the wind.] *v. t. to open to the free passage of air* वारा खेळेसा करणें. २ *to fan with wind* वाराविणें, वाऱ्यास देणें. ३ *to expose to examination and discussion* वाटाघाट *f.* करणें, चर्चा करणें, चारचौघांत मांडणें, प्रसिद्ध करणें. ४ बोलून दाखविणें.

Ventilation (ven-ti-lā'shun) *n.* (-*the act*) वारा खेळेसा करणें *n*, वाराविणें *n.* २ *supply of air* वारा खेळण्याची सोय (दारें, खिडक्या, झोंकें वगैरे). ३ *act of examining and making public* चारचौघांत मांडणें *n*, वाटाघाट *f*, जाहीर चर्चा *f.* ४ बोलून दाखविणें.

Ven'tilator *n. a contrivance for introducing fresh air* जाळी *f*, बंब *m*, वातमार्ग *m.*

Ventral (ven'tral) [L. *ventralis -venter*, the belly.] *a. belonging to the belly* पोटाचा, पोटांतला, उदरस्थ. २ (*bot.*) पुढचा, पुरोगत. [VENTRAL SUTURE पुढची शिवण *f*, पुरःसीवनी *f.*]

Ventricle (ven'-tri-kl) [L. *ventriculus*, dim. of *venter*, the belly.] *n.* खोलगा *m*, पोकळ जागा *f*, विवर *n.* २ (*anat.*) महाहृत्पुट *n*, जवनिका *f*, हृदयाचा पोटाच्या आकारासारखा आशय *m.* [VENTRICLES OF THE BRAIN मेंदूचें विवर *n*, मस्तिष्कविवर *n.* RIGHT V. दक्षिणमहाहृत्पुट *n*, दक्षिणजवनिका *f.* LEFT V. वाममहाहृत्पुट *n*, वामजवनिका *f.*]

Ventriloquism (ven-tril'ō-kwizm) [L. *ventriloquus*, speaking from the belly -*venter*, the belly, *loqui*, to speak.] *n. the art of speaking as from a distance* गारुडवाणी *f*, ऐंद्रजालिक वाणी *f.*

Venture (ven'tūr) [Short for Adventure.] *n. hazard* धाडस *n*, जोखीम *n*, धोका *m.* २ *an uncertain undertaking* जोखीम *n*, जोखमाचें काम *n.* V. *v. i. to dare* धजणें, धमक *f* -हिंमत असणें. २ (with *on* or *upon*) *to run a risk* धाडस करणें, जोखीम घेणें -उचलणें -पत्करणें, जोखीम आंगावर घेणें. V. *v.*

Drying सुकविणें.
Drying machinery कपडा सुकविण्याचा सांचा.
Duck bill मागावरील एक प्रकारची टोकर.
Dust removing apparatus (खात्यांतील) धूळ भूस, वगैरे आकर्षण करून बाहेर काढण्याची योजना.
Eccentric संत्री. (corr. of eccentric.)
Edge (in weaving) कांठ.
Electric driving (रश्शीच्या अगर पट्ट्याच्या ऐवजीं) विजेची मोटार जोडून सांचे किंवा यंत्रें चालविणें.
Emery grinder सराणी (फिरती).
Emery filleting सराणीची पट्टी.
End (in weaving) ताण्याचा दोरा.
Erector जोडकाम करणारा.
Extractor ओढून काढण्याचें साधन.
Eye नेढें.
Eye-bolt (कोणताही वजनदार) दागिना उचलण्याकरितां वर्तुळाकार डोक्याचा बोलट, हायबोल (corr. of English eye-bolt).
Eyes of heald डोळे, भोकें.
Fabric वीण.
Fancy Weaving नकशीच्या कापडाचें विणकाम.
Faucet नळाचें मोठें तोंड. यांत दुसऱ्या नळाचें धाकटें तोंड बसवून सांधा करितात.
Feather-key दांड्यावर किंवा चक्रावर स्क्रू वगैरे लावून कायम केलेली चावी.
Fender Bracket शाफ्टिंगचा कमान आधार.
Ferrule लांकडी किंवा धातूचें नळीच्या आकाराचें वूच.
Ferrule-extractor वूच वगैरे बाहेर ओढून काढण्याचें एक साधन.
File कानस. F. *v. t.* कानस मारणें.
Finger for frog पट्टी.
Finishing Department धोबीखातें, इस्तरीखातें.
Fire आग.
Fire appliances आगीपासून बचाव करण्याचीं साधनें.
Fire Bar बारी.
Fire-box लोकोमोटिव बायलरचा चुला.
Fire Bridge बॉयलरच्या चुल्यामधील विटांचा पूल, बिरिज.
Engine and Boiler Fittings एंजिनला किंवा बॉयलरला जोडण्याचें सामान.
Flange फलान्ज, कालर.
Flanges (of the beam) बिमाच्या बाजूचीं चक्रें, थाळ्या.
Flat iron पाटा.
Flatter सटांबर *m.* (corr. of Set hammer.)
Flue चुला.
Flushed cloth भरदार कापड, घट्ट विणलेलें कापड.
Fluting दंदूरा. (?)
Flux संमिश्रक द्रव्य. याच्या योगानें दोन धातूंचा मिलाफ होतो.
Fly-spindle पेटींतली शीग.
Fly-wheel एन्जिनचें चक्कर.

Folding घड्या घालणें.
Folding department घडीखातें.
Fork कांटा.
Foundry ओतकामाचा कारखाना *m*, ओतींव कामाचे सांचे बनविण्याचा कारखाना, फाउन्ड्री.
Frog or Buffer ठोकर.
Fulcrum ठेंच, जोर घेण्याचा लाग, टेंकू *m*.
Fuller टोपण.
Fullering tool तोंड फुलविण्याची छिनी.
Galloway-tubes (बायलरमधलें पाणी खालींवर चांगलें खेळण्याकरतां चुल्यांत तिरकस बसविलेल्या) टेपरट्यूब्स. (निमुळत्या नळया).
Gas governor धुराच्या वायूचा जोर कमीजास्त करण्याचें [साधन.
Gas producing plant कोळशापासून उपयुक्त धूर (gas) बनविण्याचा चुला.
Gassing frames (धुराच्या ज्योतीमध्यें) सुतावर असलेले फाजील तंतू जाळून तें सतेज करण्याचा सांचा.
Gauge-glass (of a Boiler) पाण्याची उंची दाखविणारी नळी, शिशी.
Gin सरकी काढण्याचें यंत्र.
Girder गरडर, लोखंडी बहाल, बीम.
Gland गलांड, ग्यालन (Corruption.), पाकिंग (packing) बसविण्याची जागा *f*.
Governor गवनेर, इंजिनची गती समतोल ठेवणारी एक योजना. (फिरत्या गोळ्यांची).
Grinding stone निसणा. (फिरता).
Gudgeon क्रासहेडची पिन, क्रासहेडची चावी.
Gun-metal कांसें. It is an alloy of copper and tin.
Gunwale(The upper edge of a ship) बहाण, बहाणी.
Gusset-stay बायलरला पऱ्याचे मजबुतीकरतां रिव्हेट केलेले टेंके.
Ball plane Hammer गोल डोक्याची हातोडी.
Cross plane Hammer चापट टोंकाची हातोडी.
Planing Hammer वल्ली.
Sledge Hammer घण.
Smoothing Hammer मटारणा.
Hand-saw लोखंड (वगैरे धातु) कापण्याची हातकरवत.
Handvice हातशेगडा.
Hank कळी, सुताची लडी -आटी -मुठा -मुट्ठी. ८४० वार लांब किंवा सात Skeins म्हणजे एक Hank.
Hank indicator सांच्यावर माल किती निघाला हें मोजण्याचें यंत्र.
Hatch-way फाळका (marine).
Head-stock बाहुली (of a lathe).
Heald वई.
Heald-staves वयांच्या काड्या -लकड्या.
Heald yarn वया करण्याचें सूत.
Heaters (air) उष्णमान वाढविण्याचीं साधनें.
Heck जोग (lease) पाडण्याची चौकट.
Hexagonal सहापाटी, सहा कोनांचा.
Hob वरम चक्रला दांते पाडण्याचा कटर.

Hobbing (a worm wheel) वरम चक्रला दांते पाडणें.
Hoists पाळणे.
Hole दार, द्वार.
Hose piping कॅनव्हसचे ( सुती ) नळ.
Ingot लगड, गुल्ली.
Injector (loco-type fitting) (वाफेच्या ज्योतीबरोबर आकर्षण करून) बायलरमध्यें पाणी लोटणारें यंत्र.
Jack ( bottle ) सीधा जॅक, दूमकळस *m.*
Hydraulic Jack पाण्याचा ( दाबानें चालणारा ) जॅक.
Traversing Jack मागेंपुढें सरकविण्याचा जॅक.
Jack-plane मुठीचा रंधा.
Jacquards चित्रविचित्र विणकामाकरितां छिद्रें पाडून कल्पनाचित्रें काढण्याचे कागद.
Jet-condenser *n.* पाण्याच्या फवाऱ्यानें वाफेचें पाणी करण्याचें पात्र *n.* [ टॆंप्लेट.
Jig पुन्हा पुन्हा आंखण्याचा त्रास वांचविण्यासाठीं केलेलें
Jockey-pulley गाईड पुली.
John Bull रॅचेट ब्रेस लावण्याचा एक क्रस्प.
Keelson बायलरची खुर्ची.
Key चावी, खुंटी, पाचर *f.*
Feather-key (दांड्यावर किंवा चक्रावर) स्क्रू लावून कायम केलेली चावी.
Key-way चावीचा गाळा.
Kingpost ( कैंचीचा ) मधला खांब *m*, थडीआ.
Lags खिळे ( Dobby ).
Lath कांडें, मापाची ( लांकडी ) पट्टी, आधाटी *f.*
Leafy पानेंपाचोळा असलेला ( कापूस ).
Leather belting चामड्याचा पट्टा. [ तेल).
Linseed oil आळशीचें तेल. ( Boiled linseed oil बईल
Loom-handle मागाचा चाप.
Loom-side मागाची दिवाळ.
Loops of heald भोंकें, वह्यांचे डोळे. [ यंत्रें.
Mercerising machinery सुताला चकाकी आणणारीं
Mixing मिळवणी करण्याचें खातें.
Mixing stacks कापसाच्या मिश्रणाचे ढीग.
To let off motion ( weaving ) ताण्याच्या बिमावरील सूत उकलणें.
To take up motion ( weaving ) कापड गुंडाळणें.
Mud-hole बायलरांतील चिखल बाहेर काढण्याचें द्वार.
Mule गाडीखातें.
Doubling mule दुहेरी दोरा पिळून वळण्याची गाडी.
Spinning mule सूत वळून गुंडाळण्याची गाडी. (A machine in which the yarn is twisted when the mule comes out and wound when it goes back).
Palm-stay बायलरच्या पत्र्यास जोर देणारा टेंका.
Parting-sand ओतकामाच्या दोन पेट्यांमधील (मातीचा मिलाफ होऊं न देणारी ) वाळू.
Picker machinery मागावरील धोटा मारणारी चामड्याची बाहुली करण्याचीं यंत्रें. (या बाहुलीला कामकरी लोक घोडी म्हणतात.)

Picking box पिकर किंवा चामड्याची वाहुली फिरण्याची पेटी *f.* ह्रिलाच Shuttlebox असेंहि म्हणतात.
Picking plate पिकिंग बाक्सची एक बाजू *f.*
Piecing सूत जोडणें.
Joiner's plane तंगाचा रंधा, फिलफिलाचा रंधा.
Rebate plane एकधारी रंधा, एकधाऱ्या.
Trying plane ओलवायचा रंधा.
Plain Weaving साध्या कापडाचें विणकाम.
Plough नांगर, एक प्रकारचा रंधा.
Taper tomy bar टामीबार, निमुळती कटवणी.
Power hammer हवेच्या किंवा वाफेच्या जोरावर चालणारा घण.
Preparatory machinery कापूस मिसळल्यापासून सूत काढण्याच्या सांच्यांवर येईपर्यंत कापसाची वात ज्या यंत्रांमधून जाते तो सर्व यंत्रसमुदाय.
Press दाबून बांधणारें यंत्र.
Bundling Press सुताचें बंडल बांधणारें यंत्र.
Profiling लांकूड किंवा धातु मशीनवर कापण्यापूर्वी जो आकार पाहिजे तो आणण्यासाठीं कटर घासून धार काढणें.
Pumping machinery पाणी खेंचण्याचें यंत्र.
Queen post बाजूचा खांब ( कैंचीचा ), पार्श्वस्तंभ.
Ramie चीनमधील एक प्रकारच्या गवती तंतूंच्या रश्श्या, दोरखंडें वगैरे करण्याचीं यंत्रें.
Green-sand ओतींव कामाच्या सांच्याची वाळूमिश्रित दमट माती.
Scriber
Scribing block } सफरगेज, सरफेसगेज, रेघविण्याच्या कामीं अगदीं बारीक टोंक असलेली खालींवर होणारी एक लोखंडी पेन्सिल.
Scutcher लेप बनविण्याचा सांचा.
Scutcher Grids कापसाचा लेप काढणाऱ्या सांच्याची चाळण.
Selvage किनारी.
Shed (in weaving) पेला.
Sight-feed-lubricator तेल सोडण्याचा सांचा. यांतील तेल वर जातांना नजरेस पडतें.
Split motion (loom) मागाच्या वया खालींवर करणारी गति.
Spot market अनेक जातींचा माल विक्रीकरितां येतो ती पेठ.
Stamping machine (cloth) कपड्यावर छाप मारण्याचा सांचा. २ दाबून पत्र्यांचीं भांडीं करण्याचें यंत्र *n.*
Steam trap वाफेच्या नळ्यांतील पाणी काढणारी पेटी.
Taking-up roller
(Emery roller) } कोटरोल.
Toggle bars समांतर तोंडाच्या शेगड्यांत स्क्रूच्या ऐवजीं वापरलेला दांडा.
Tongue in plane तंगाचा पात.
Top cross rail कमान.
Tread पायरी, टप्पा.
Tube तोटी.
Tubular banding गोपाची रश्शी.
Twine and cord रश्शी, दोरी, सुतळी.
Tympanum लिंटेलच्या वरचा कमानीचा आंतला भाग.
V Block व्ही या अक्षराच्या आकाराचा रेघविण्याच्या कामीं वापरण्याचा लोखंडी तुकडा.

Valve पडदा, व्हाल, दरवाजा.
Safety valve सेफ्टी व्हाल.
Stop valve इस्टाप व्हाल.
Warp-beaming machine ताण्याचा सांचा.
Warping frame *n.* साळा *m.*
Warp reels ताण्याचा दोरा गुंडाळण्याचे राहाट.
Wasty तंतू आंखूड असल्यामुळें वरचेवर तुटणारा (कापूस).
Water-softening installation पाणी शुद्ध बनविण्याचा यंत्रसमुदाय.
Wave उभी रेखा.
Weft pirn कांडी.
Weft-rod *n.* शीग ( मागाची ).

## MEDICAL TERMS.

Abdominal ring *n.* पोटाचे आंतील आंगठीसारखें छिद्र *n.*
Abortion *n.* गर्भपात *m.* [Criminal abortion *n.* सदोष गर्भपात *m.* Incomplete A. अपूर्ण गर्भपात *m.* Inevitable A. अपरिहार्य गर्भपात *m.* Threatened A. दुष्परिहार्य गर्भपात *m.*]
Abscess of the breast *n.* स्तनांत पू होणें *n*,स्तनाचें गळूं.
Absolute alcohol *n.* सुरावीर्य *n*, मद्यार्क.
Accession *n.* (*med.*) आक्रमण *n.*
Acetabulum वंक्षणोलूखल *n.*
Actual cautery *n.* (*med.*) लास *m.* [मेदोद्रव्य *n.*
Adipocēre *n.* मेण व चरबी यांचें मिश्रण *n*, सिक्थ-
Complemental air *n.* (*med.*) फुप्फुसपूर्णकारी वायु *m.*
Alimentary canal *n.* (*med.*) अन्नमार्ग *m.*
Alkaline *a.* (*med.*) अनाम्ल, आल्कलीसारखा, आल्कलीचे धर्म असलेला, आल्कलीधर्मी.
Amber *n.* तृणस्फटिक.
Amnion *n.* (*med.*) गर्भोदककोश, गर्भसंरक्षककोश.
Anabolism *n.* ( शरिरांतील रासायनिक ) चयक्रिया (प्रतिलोमक्रिया, विघटनात्मक क्रिया *f.*) See Metabolism in the body of the book.
Anæsthetic *a.* ज्ञानशक्ति हरण करणारें ( औषध ), ज्ञानशक्तिहारक. A. *n.* ज्ञानशक्तिहरण करणारें औषध *n*, ज्ञानशक्तिहर *n*, ज्ञानशक्तिहारक *n*, चेतनाहारक.
Anodyne *n.* वेदनास्थापन *n*, वेदना शमविणारें औषध *n.*
Antalgic *n.* पीडाशामक *n*, दुःख कमी करणारें औषध *n*, दुःखशामक औषध *n*, प्रशमनीय *n.*
Anterior *a.* ( *anat.*) पुढला. [A. chamber पुरोभाग *m.*]
Anterior fontanel *n.* ब्रह्मरंध्र *n*, ब्रह्मतालुक *n.*
Anterior iliac spine पुरोजघनधाराकूट *n*, shortened into पुरोजघनकूट *n.*
Anterior opening of the orbit ( of the eye ) नेत्रगुहाद्वार *n.* [Posterior opening of the orbit (of the eye ) नेत्रगुहामूल *n.*]
Anticolic *n.* शूलप्रशमनीय *n.*
Antitoxic *a.* विषघ्न, विष मारणारा.
Aplastic lymph *n.* असंमेलनकारी लसिका *f.*
Aponeurosis *n.* ( *anat.*) खोळ?

Appendage *n.* आनुषंगिक भाग *m.*
Areola *n.* स्तनावरील रंगाचा गर्का *m*, कुचराग *m.*
Fore-arm *n.* अग्रबाहु *m*, प्रकोष्ठ.
Arsenical rash (also called eczema arsenicale) *n.* फार दिवस सोमल घेत गेल्यानें आंगावर उठणारा पुरळ *m.*
Subclavian artery *n.* अधोजत्रुधमनी *f.*
Articular capsula *n.* स्नायुकोष *m.*
Articular facette *n.* (*med.*) संधिभाग *m.*
Articular processes संधींचे कर्णतुल्य भाग *m. pl.*, संधिपक्ष *m. pl.*
Articular tubercle हनुसंध्यर्बुद *n.*
Ascending ramus कूट.
Ascending ramus of ischium कुकुंदर कूट.
Ascending ramus of pubis बस्तिगुहोत्तरशृंग.
Asepsis *n.* (*med.*) *absence of septic matter* सडलेला किंवा कुजलेला नसणें *n*, शुद्धि *f*, कोथाभाव *m.*
Asphyxiating gas *n.* श्वासावरोधक धूर *m*, विषारी धूर *m.*
Auricle *n.* लघुहृत्पुट *n.* [RIGHT A. दक्षिण लघुहृत्पुट *n.* LEFT A. वामलघुहृत्पुट *n.*]
Auricular region कर्णदेश *m.*
Automatic action *n.* स्वयंभू क्रिया *f.*
Axillary border कक्षानुगाधारा *f.*
Tubercle bacilli कफक्षयजन्तु *m. pl.*
Ballottement *n.* (*med.*) गर्भापासून दुसऱ्यास आघात *m*, गर्भप्रत्याघात *m.*
Bandage *n.* बंधन *n.* [REVERSE BANDAGE *n.* उलट बंधन *n.* ROLLER BANDAGE *n.* गुंडाळलेलें बंधन *n.* SPICA (TO THE GROIN) BANDAGE *n.* जांघेला बंधन बांधणें *n.* SPICA (TO THE SHOULDER) BANDAGE *n.* स्कन्धबंधन *n.* FIGURE-OF-8-BANDAGE *n.* दोन विंदुकल्यांच्या आकाराचें बंधन,आठाच्या आंकड्यासारखें बंधन *n.*]
Base of the skull करोटीतल *n.*
Basilar portion मूलभाग *m.*
Bed-rest *n.* पाठटेकण *n.*
Bicuspid (teeth) द्व्यग्रदंत, अग्रचर्वणक.
Biliary colic *n.* पित्ताशयांतून पित्ताचे खडे खालीं उतरतांना कळ निघणें *n.*
Blistering fluid *n.* फोड आणणारा द्रव *m.*
Bone *n.* अस्थि *n.*
Atlas चूडावलयास्थि.
Axis *n.* दन्तचूडास्थि *n.*
Body (of a bone) पिंड *m.*
Body of the sphenoid bone जतूकाशरीर.
Carpal bone पाणिकूर्चास्थि.
Coccyx *n.* अनुत्रिकास्थि *n.*
Cuboid घनाकार अस्थि (घन = anvil), घनास्थि.
Cuneiform (tarsal bone) त्रिकोणप्रायकूर्चास्थि, कोणकास्थि. [INTERNAL C. अंतःकोणक. MIDDLE C. मध्यकोणक. EXTERNAL C. बाह्यकोणक.]

Frontal bone अग्रकपाल.
Humerus प्रगण्डास्थि ( not प्रकोष्ठास्थि ).
Hyoid bone कण्ठिकास्थि.
Ischium *n.* कुकुन्दरास्थि *n.*
Lachrymal bone अश्रुपीठास्थि.
Occipital bone *n.* पश्चिमकपालास्थि.
Os innominata श्रोणिफलक.
Os magnum मध्यकूट.
Parietal bone पार्श्वकपालास्थि *n.*
Pin-bone रम्प मध्यें पुढें आलेलें हाड.
Pisiform वर्तुलाकार, वर्तुलक. (applied to a bone of the wrist ).
Pubis *n.* भगास्थि. [BODY OF PUBIS भगपीठ *or* लिंगपीठ. ASCENDING RAMUS OF P. भगास्थि-उत्तरशृंग. DESCENDING RAMUS OF P. भगास्थि -अधरशृंग.]
Sphenoid bone *n.* जतूकास्थि *n.*
Squamous portion of temporal bone शंखचक्र *n.*
Temporal bone शंखास्थि.
Wormian bone कपालचक्रकास्थि.
Breast-pump *n.* दुग्धोच्छोषक, स्तनांत सांखलेलें दूध ओढून घेण्याची नळी *f.*
Bridge of the nose नासासेतु.
Bright's disease *n.* मूत्रांतून अल्ब्यूमेन जाणें, वृक्करोग, मूत्रपिंडरोग, नाळगुद.
Bursa *n.* स्नायुश्लेष्मधरकोश *m.*
Canine teeth रदनक *m. pl.* शूलदंत, सुळेदांत *m.*
Capsular ligament *n.* स्नायुकोशबन्धन *n.*
Caput Succedaneum *n.* ( गर्भाच्या ताळूवर होणारा ) शीर्षगुल्म *m.*
Carneous mole मांसल तीळ *m.*
Carotid canal मातृका सुरंग ?
Carunculæ myrtiformes ( अपत्यपथाजवळ होणारे ) लवंगासारखे मांसाचे अंकुर *m. pl.*, लवंगसदृश मांसांकुर *m. pl.*
Cauda-equina सुषुम्नाचामर.
Cerebellum *n.* अनुमस्तिष्क *n.*
Choroid *n.* नेत्रमध्यावरण *n.*
Circular facet or socket of a rib स्थालक.
Coccyx *n.* गुदास्थि *n*, माकडहाड *n*, अनुत्रिकास्थि *n.*
Colon *n.* मोठ्या आंतड्याचा आडवा ( दुसरा ) भाग.
Condyle महार्बुद *n.*
Corpus callosum *n.* (*med.*) मस्तिष्कार्धसंधिस्थान *n.*
Corpuscular *a.* कणमय, कणाकणांचा.
Corpus luteum *n.* ( *med.* ) पिंवळी ग्रंथि *f*, पीतगुलिका *f.*
Cosmetic *a.* वर्ण्य, वर्णकर.
Cotyloid cavity वंक्षणोलूखल.
Cranium *n.* शिर:संपुट *n.*
Cribriform plate चालनीपटल *n.*
Crista Galli शिखरकंटक *m.*
Deadly poison मारक विष *n.*

Decapitation *n.* गर्भग्रीवाच्छेद *m.*
Decapitatory *a.* गर्भग्रीवाच्छेदक.
Decidua *n.* गळून पडणारी गर्भावरील त्वचा *f*, गलन्तीत्वचा *f*, गलन्ती *f.* [D. REFLEXA फिरलेली गलन्ती *f*, परावर्तित गलन्ती *f.* D. SEROTINA मिथ्याकोश *m.* D. VERA सत्यकोश *m.*]
Delivery by application of forceps चिमट्यानें मुलाचें डोकें ओढून प्रसूति करणें.
Demulcent *a.* मार्दवकर, ओपट, चिक्कण.
Dental Canals पश्चिमदंतिकाख्यविवर *n.*
Dentine *n.* दांताच्या बाह्य आवरणापासून आंत अगदीं मध्य विवरापर्यंत असलेले सूक्ष्म नलिकामय द्रव्य, दंतद्रव्य.
Depression खातोदर *n.*
Descending ramus of pubis बस्तिगुहाधःशृंग.
Diaphoretic *n.* स्वेदोपग *n.* घर्मोत्पादक.
Difficult labour *n.* संकटानें प्रसव *m*, कृच्छ्रप्रसूति *f*, कष्टप्रसूति.
Digitorium पादांगुली.
Dipsomania *n.* अतिमद्यप्राशनेच्छा *f.*
Discus proligerus *n.* सूक्ष्म गर्भाचा आधारभूत गर्का *m*, भ्रूणाधारकला *f.*
Dorso-anterior पुढें पृष्ठ आहे असा, पुरतःपृष्ठ.
Dorso-posterior पाठीमागें पृष्ठ आहे असा, पश्चात्पृष्ठ.
Dorsum epiphü कर्णान्तर्द्वार *n.*
Dorsum Sella सुषुम्नापीठ.
Draw-sheets ओढचादरी *f. pl.*
Duodenum *n.* स्नेहपाचनी *f*, लहान आंतड्याचा (सुरवातीचा) पहिला भाग.
Drying up stage of a disease रोगाचा खपल्या पडूं लागल्याचा काळ *m.*
Ear *n.* कर्ण *m*, कान *m.* [EXTERNAL E. बाह्यकर्ण. INTERNAL E. अन्तःकर्ण. MIDDLE E. मध्यकर्ण.]
Ectropium *n.* (*med.*) पापणीचें बाह्यवलन *n.*
Effused *a.* निःसृत, बाहेर पाझरलेला.
Effusion *n.* दाहजन्य स्राव *m.*
Elimination *n.* बहिर्निष्कासन *n.*
Embryology *n.* गर्भविज्ञान *m*, गर्भशास्त्र *n.*
Eminence *n.* (*anat.*) टेंगूळ *n*, कुंभ *m.*
Eminentia arcuata श्रोतृच्छदिकूट.
Emission *n.* (*med.*) वीर्यस्राव *m*, वीर्यस्खलन *n*, आशुविक्षेपण *n*, रात्रीं न कळतां स्वप्नावस्था होणें.
Emprosthotonos *n.* अन्तरायाम *m*, आंत अथवा पुढें वळणें *n.*
Enchondroma *n.* (*med.*) अस्थीची कूर्चामय ग्रंथि.
Enepidermic *a.* कातडीवर लावलेलें (पलिस्तर, वगैरे).
Enteralgia *n.* सर्व पोट व विशेषें करून बेंबीजवळील भाग दुखणें, पोटशूळ *m.*
Enteritis *n.* लहान आंतडीं सुजणें *n*, लघ्वंत्रदाह *m.*
Entropium *n.* (*med.*) पापणीचें अन्तर्वलन *n.*
Epicranial *a.* मस्तकाच्या वरचा.

Epicranium *n.* मस्तकाचा वरचा भाग *m.*
Epididymis *n.* ( *med.* ) उपरेतपिंड *m.*
Epigastric region *n.* जठराच्या वरचा भाग *m*, जठरोर्ध्व-प्रदेश *m*, जठरप्रदेश.
Epiglottis *n.* गोजिव्हिका *f*, श्वासनलिकेवरील झांकण.
Epiphora *n.* ( *med.* ) डोळ्यांतून पाणी गळणें *n.* हा डोळ्यांचा विकार आहे.
Epiploitis *n.* शोफ *m*, आंतड्यांतील वसामय पडद्याची [ सूज *f.*
Epispadias *n.* (*med.*) शिश्नाच्या वरच्या भागीं झालेली मूत्राशयाची विपरीत वाढ *f.*
Epithelioma *n.* (*med.*) बाह्यत्वचेवर, किंवा श्लेष्मल त्वचे-वर कॉलिफ्लॉवर सारखा उत्पन्न होणारा एक दुष्टग्रंथी, मांसार्बुद, त्वचेवर असणारें कणाकणांचें झांकण *n.*
Epithelium *n.* (*med.*) उपलेपकधातु *f.* [STRATIFIED E. स्तरीभूत उपलेपकधातु. TRANSITIONAL E. संक्रमिष्णु उपलेपकधातु *f.* CILIATED E. सांकुर उपलेपकधातु *f.*]
Equination *n.* घोड्याची लस गाईवर टोंचणें *n*, अश्व-लसिकाधान *n.*
Erectile *a.* फुगणारा, उत्थापक.
Erotomania *n.* ( *med.* ) विषयोन्माद *m*, स्त्रीसंभोगाचें [ वेड *n.*
Eschar-causing *a.* अर्शकर, मांसाचा मोड उत्पन्न करणारा.
Ethmoidal canal अन्तःझर्झरक विवर *n.*
Ethmoidal spine झर्झरास्थित्रिकोणकंटक.
Eustachian tube *n.* कर्णेंद्रियाची नळी *f*, कर्णनलिका *f.*
Evacuant *n.* विसर्जक औषध *n*, generally मलमूत्र-विसर्जक औषध *n.*
Exanthema *n.* ( *med.* ) पुरळ येणारा ज्वर *m.*
External auditory meatus *n.* कर्णकुहर *n.*
Extremities *n.* ( *med.* ) शाखा *f. pl.* [UPPER E. ऊर्ध्व शाखा. LOWER E. अधःशाखा. ]
Eye-benefactor *n.* (*med.*) नेत्र्य *n.*
Eye-salve *n.* अंजन *n.*
Facial artery वक्त्रधमनी *f.*
Facial surface मौखिक तल.
Falx cerebri मस्तिष्काच्छादक दात्रिककला *f.* (दात्र= [ Sickle.)
Fat-former *n.* (*med.*) स्थौल्यकर *n.*
Favus *n.* ( एकप्रकारचा ) विषारी खवडा *m.*
Febrifuge *n.* ज्वरघ्न *n*, ताप घालविणारें औषध *n.*
Fibrinous *a.* मिळणारा, जुळणारा, तान्तवासारखा, तन्तुद्रव्यासारखा.
Fistula of the gums दंतनाडीव्रण.
Fistula in the eye नासुर होणें.
Flat part of scapula अंसफलक *m.*
Flatus-producer *n.* वातुल पदार्थ *m.*
Flexor *a.* आकुंचक स्नायु *m.*
Floor भूमि *f*; as, नासागुहाभूमि *f.*
Foetal *a.* गर्भाचा, गर्भगत.
Foetal circulation गर्भगत रुधिराभिसरण *n.*
Fontanel ( anterior ) पुरस्तालु.
Fontanel ( posterior ) पश्चिमतालु.

Foramen *n.* विवर *n*, छिद्र *n.*
Foramen lacerum anticus पक्षान्तरालत्रिकोणविवर.
Foramen magnum ( मध्यस्थ ) महाविवर *n.*
Foramen rotundum वृत्तविवर.
Foramen spinosum मस्तिष्कमध्यस्थकोणविवर *n.*
Anterior Condyloid foramen मूलकोटिपुरोगविवर *n.*
Condyloid foramina मूलकोटिरंध्रमार्ग *m.*
Infra-orbital foramen नेत्रधारीयविवर *n.*
Malar foramen गण्डछिद्र *n.* [छिद्र *n.*
Mastoid foramen गोस्तनछिद्र *n*, गाईच्या स्तनासारखें
Mental foramina अनुचिबुकविवर *n.*
Obturator foramen श्रोणिगवाक्ष *n.*
Optic foramen *n.* दृष्टिनाडीरंध्र *n.*
Posterior palatine foramen पश्चिमतालुविवर *n.*
Supra-orbital foramen अधिभ्रुवछिद्र *n.*
Stylo-mastoid foramen शिफागोस्तनांतरीयछिद्र.
Foramina ovale जांबवविवर *n.*
Foramina of scarpa (a) अग्रतालुपूर्वछिद्र *n.* (b) अग्रतालुपश्चिमछिद्र *n.*
Fossa *n.* खात *n.* खळगा *m*, विवर *n.*
Anterior fossa ( of the skull ) दीर्घिकासिरापरिखा.
Anterior palatine fossa अग्रतालुखात *n.*
Glenoid fossa हनुसंधिस्थालक.
Incisive fossa दंतमूलबिलाख्यखात.
Infra-spinous fossa अधरअंसकपालिकापृष्ठतल *or* अधरांसपृष्ठखात.
Lachrymal fossa अश्रुग्रन्थिधरखात.
Middle fossa मध्यम महाखात *n.*
Nasal fossa नाकपुड्या, नासाखात.
Pituitary fossa पोषणिकाखात *n.*
Posterior fossa पश्चिम महाखात *n.*
Supra spinous fossa अंसकपालिकापृष्ठतल *or* उत्तरांसपृष्ठखात.
Temporal fossa शंखखात *n.*
Fourchette *n.* योनीच्या खालचा भाग *m.*
Frigorific *a.* तृष्णानिग्राहक, तहान कमी करणारा.
Frontal eminence ललाटपुरःकुंभ *m.*
Frontal plate ललाटफलक *m.*
Frontal portion ललाटभाग *m.*
Frontal sinus ललाटकोटरद्वार *m.*
Full bladder *n.* मूत्राशय पूर्ण भरलेला असणें.
Funis *n.* नाल *m*, नाळ *f.*
Fusiform *a.* चातीच्या दांड्यासारखा.
Galactocele *n.* ( *med.* ) स्तनार्बुद, दुग्धार्बुद, स्तनाला होणारें आवाळूं.
Galactorrhœa *n.* अतिदुग्धस्राव *m*, भलत्याच वेळीं स्तनांतून दूध बाहेर येणें *n.*
Gastralgia *n.* पोटशूळ *m*, जठरशूल.
Gastrectomy *n.* अन्न कोठ्यांत घालण्याकरितां पोट फाडणें *n*, जठरच्छेदन *n.* (not उदरच्छेदन which is Cæsarean operation).

Gastritis *n.* ( *med.* ) जठरदाह *m*, पोटाला आंतून सूज येणें, पोटाचा आंतून क्षोभ होणें. [CHRONIC G. आम्लपित्त *n.* SUPPURATIVE *or* PHLEGMONOUS G. सन्निपातछर्दी *f.*]

Gastro-intestinal irritation *n.* जठरान्त्रक्षोभ *m*, जठर व आंतडीं यांस विकृति *f.*

Genial tubercle रसनाकलायक.

Germinal membrane *n.* उत्पत्तीची त्वचा *f*, जनकत्वचा *f*, गर्भधारणेनंतर कांहीं दिवसांनीं गर्भाच्या भोंवतीं ही त्वचा येते.

Germinal Vesicle *n.* उत्पत्तीचा आशय *m*, जननाशय *m.*

Gingivitis *n.* हिरड्या सुजणें *n*, दंतवेष्टदाह.

Glabella *n.* भ्रूमध्यकूर्चक *n.*

Gladiolus उरोमध्यफलक *m.*

Glaucoma *n.* काचबिंदु *m.* या विकारांत डोळ्याच्या बाहुलींत खनिज कांचेच्या रंगाप्रमाणें निळसर हिरवट रंग उत्पन्न होऊन नजर कमी किंवा अगदीं नाहींशी होते. त्यास काचबिन्दु म्हणतात. यांत नेत्रगोल कांचेसारखा घट्ट होतो. हा विकार बहुधा मध्यम वयाच्या किंवा वृद्ध वयाच्या मनुष्यांस होतो.

Glenoid Cavity अंसपीठ. ?

Glioma *n.* वातवाहिनीला होणारा एक दुष्ट ग्रंथि *m.* हा विकार पुष्कळ वेळां डोळ्यांतील ज्ञानतंतूंना होतो.

Glossitis *n.* जिभेचा दाह *m*, जिव्हादाह *m.*

Gonorrhœal conjunctivitis औपसर्गिकमेहजन्य नेत्राभिष्यंद, पूयप्रमेहजन्य विषानें डोळे येणें.

Gonorrhœal Ophthalmia *n.* पूयप्रमेहजन्य नेत्रदाह *m*, नेत्राभिष्यंद *m.*

Gonorrhœal Rheumatism *n.* प्रमेहजन्य संधिवात *m.*

Graafian Follicles or Graafian Vesicles *n.* ग्राफाशय *m*, स्त्रियांचा अण्डाशय *m.*

Glycogen *n.* यकृतामधील साखरेसारखा पदार्थ *m*, यकृतशर्करा *f.*

Gracilis *n.* उर्वन्तःपार्श्विका *f.*

Granulation *n.* अंकुरोद्भवन *n*, मांसाचे अंकुर उत्पन्न होणें, खुपऱ्या, डोळ्यांतील श्लेष्मल त्वचेचा दाह होऊन पापण्यांचे आंतून बारीक कण उत्पन्न होणें.

Granulation and Cicatrization *n.* अंकुरोद्भवन व सिध्मभवन *n.* [सिध्मभवन = माव उत्पन्न होणें.]

Greater Cornua ( कण्ठिकास्थीचें ) महाश्रृंग *n.*

Greater wings बृहत्पक्ष.

Groove *n.* परिखा *f.*

Groove of a rib for intercostal vessels and nerve परशुकानुगा परिखा *f.*

Gurgling sound *n.* गुडगुड शब्द *m*, आटोप.

Hæmatorrhœa *n.* रक्तस्राव *m.*

Hæmatoxis *n.* गर्भाशयांत रक्तसंचय होणें *n.*

Hæmatozic *a.* रक्तदोषासंबंधी.

Postpartum hæmorrhage *n.* प्रसवोत्तर रक्तस्राव *m.*

Hair-follicle *n.* रोमकूप *m.*

Head ( of a rib ) मुण्ड *n.*

Healing by scabbing *n.* खपलीखालीं मेलन *n.*

Helix *n.* वाह्यपालि. [ANTI-HELIX अभ्यन्तरपालि.]

Herpes *n.* विसर्पिणी *f*, इसव, पैण *f*, नागीण *f.* [H. BRACHIALIS भुजगा *f.* ही हातावर होते. H. CERVICALIS ग्रैवेया *f.* ही मानेवर होते. H. FRONTALIS ललाटिका *f.* ही डोक्यावर किंवा ललाटावर होते. H. GESTATIONIS गर्भकालिका *f.* ही गरभारपणांत उत्पन्न होऊन प्रसूतीनंतर नष्ट होते. H. IRIS आधूम्रिका *f.* हिचा रंग कनीनिकेसारखा असून ती हाताच्या पृष्ठावर उद्भवते. H. LABIALIS ओष्ठिका *f.* ही ओंठावर होते. H. PREPUTIALIS मणिच्छदिका *f.* ही मण्याच्या आच्छादनाच्या आंतल्या बाजूस होते. H. ZOSTER मेखलिका *f*, कंवरवेढा *m.* ही एखाद्या अवयवाच्या एका बाजूस उत्पन्न होऊन त्याच्या सभोंवतीं वेढा घालते. H. CIRCINATUS वलयिका *f.* ही वर्तुळाकृति असते.]

Hiatus canalis facialis कर्णिकारंध्र.

Hip-bath *n.* कटिस्नान *n.*

Histology *n.* सूक्ष्मशारीरशास्त्र *n.*

Hot-air-bath *n.* उष्ण हवेचें स्नान *n.*

Hot bottles कढत पाण्याच्या बाटल्या.

Hot-vapour-bath *n.* उष्ण वाफाऱ्याचें स्नान *n.*

Humerus *n.* प्रगण्डास्थि *n.*

Hydrostatic Test *n.* जलपरीक्षा *f.* मूल जिवंत जन्माला आलें आहे कीं नाहीं हें तपासण्याकरितां त्याचीं फुप्फुसें पाण्यांत तरंगतात किंवा नाहीं हें ज्यांत पाहतात अशी परीक्षा *f.*

Hypo-gastric plexus *n.* जठराच्या खालचें जाळें *n*, [जठराधोजाल *n.*

Hypogastric region *n.* बस्तिप्रदेश *m*, जठराखालचा प्रदेश *m.*

Ileum *n.* कुंडलिनी (भिषग्विलास), लहान आंतड्याचा [शेवटला भाग *m.*

Ilium *n.* श्रोणिपक्ष *m*, नितंबास्थि.

Improvised *a.* चालचलाऊ.

Incisors (teeth) कर्तनक दंत *m. pl.*, छेदक दंत *m. pl.*

Inertia uteri *n.* गर्भाशयनिश्चलता *f.*

Inflammation *n.* दाह *m.* [ACUTE I. शीघ्र दाह *m.* CHRONIC I. विलंबी दाह *m.* PASSIVE I. अल्प दाह *m.*]

Infra-hyoid *n.* जिव्हास्थीच्या खालचा.

Infra-orbital canal नेत्राधरीय सीता.

Inhalation *n.* घशांत औषधाची वाफ घेणें, घशांत औषध [ओढणें.

Innominatum os अनामकास्थि, श्रोणिफलकास्थि.

Insertion *n.* बद्धस्थान *n.*

Internal auditory meatus कर्णमहाविवर *n*, कर्णांतर्द्वार.

Internal maxillary vessels आंतरहानव्यवाहिनी *f. pl.*

Interosseous membrane अस्थ्यन्तराला कला *f.*

Inter-vertebral cartilage मणिकील *m.*

Inter-vertebral notch मणक्यामधील खांच *f.*

Intestines पक्वाशय *m.* [SMALL I. पक्वाशय *m*, पच्यमानाशय *m*, क्षुद्रांत्र. LARGE I. बृहदंत्र, मलाशय *m.*]

Intra-uterine *a.* गर्भाशयांतला.

Intravasation *n.* पू वगैरे आंतील भागांत जाणें.

Joint or Articulation संधि *m.* [CONDYLOID A. खलकोर *m*, RECIPROCAL RECEPTION (SADDLE-JOINT) परस्परकोर *m.* TRACHOIDES (PIVOT-JOINT) चक्रकोर.

ATLANTO-AXIAL ARTICULATION चूडावलयदंतचूडसंधि *m.* OCCIPITO-AXIAL ARTICULATION पश्चिमकपालदंत-चूडासंधि *m.* COSTO-VERTEBRAL ARTICULATION परशुका-पृष्ठकशेरुकासंधि *m*, परशुकापृष्ठसंधि *m.* STURNO-CLAVICULAR A. अक्षकोरःसंधि *m.* ACROMIO-CLAVICULAR A. अक्षकांसफलकसंधि *m*, अंससंधि *m.* SHOULDER-JOINT अंससंधि *m.* ELBOW JOINT कूर्परसंधि *m.* GINGLYMUS (HINGE-LIKE-JOINT) संदंशकोर *m.* ENARTHROSIS (BALL AND SOCKET JOINT) उदूखलसंधि *m*, उखळा-मुसळाचा सांधा *m.* GOMPHOSIS (ARTICULATION OF A PEG OR NAIL) दशनोदूखलसंधि *m.* HIP-JOINT श्रोणिसंधि *m*, सामुद्र *m.* ARTHRODIA प्रतरसंधि *m.* SUTURE तुन्नसीवनी *f.* SCHINDYLESIS ग्रस्तसीवनी *f.* RADIO-ULNAR A. प्रकोष्ठान्तरीयसंधि *m.* CARPAL A. करकूर्चान्तरीय संधि *m.* CARPO-METACARPAL A. करतल संधि *m.* PHALANGEAL A. करांगुलिसंधि *m.* TIBIO-FIBULAR A. जंघानुजंघास्थिसंधि *m*, जंघान्तरीयसंधि *m.* ANKLE-JOINT गुल्फसंधि *m.* TARSAL JOINT पाद-कूर्चान्तरीयसंधि *m.* METATARSAL JOINT पादतलसंधि *m.* PHALANGEAL A. पादांगुलिसंधि *m.* TEMPORO-MANDIBULAR ARTICULATION हनुमुंडसंधि *m.* CRANIO-VERTEBRAL ARTICULATION शिरोग्रीवसंधि *m.* OCCIPITO-ATLANTAL ARTICULATION पश्चिमकपालचूडावलय-संधि *m.*]

Joint *n.* संधि [IMMOVABLE J. अचल -स्थिर संधि. MIXED J. मिश्र -संकीर्ण संधि. MOVABLE J. चल -सचेष्ट संधि.]

Jugular fossa मन्याखात.

Jugular vein मन्या *f.*

Jugulum *n.* गळ्याची खळगी *f.*

Katabolism *n.* ( शरिरांतील रासायनिक ) अपचयक्रिया *f.* See Metabolism.

Kiestein *n.* ( गर्भवती स्त्रीच्या ) मूत्रांतील कांहीं द्रव्यांचा समुदाय *m*, मूत्रसन्तानिका *f.* [ धनुकली होणें.

Kyphosis *n.* कटिमणिपश्चान्नमन *n*, कंबरेची उलटी

Laceration *n.* फाटणें, फाजरून फाटणें.

Lachrymal duct पश्चिमाश्रुवाहिका.

Lactation *n.* स्तन्योत्पत्ति *f*, दुधाची उत्पत्ति *f.*

Lateral sinus पार्श्विक सिरापरिखा *f.* [Sinus = सिरा-परिखा.]

Lessor cornua ( कण्ठिकास्थीचें ) लघुशृंग *n.*

Coraco-acromial ligament तुंडांसकसंयोजक ( स्नायु-बंधन ). [बंधन ).

Coraco-clavicular ligament तुंडाक्षकसंयोजक ( स्नायु-

Costo-clavicular ligament पर्शुकाक्षकसंयोजक ( स्नायु-बंधन ).

Ligament or fibrous tissue स्नायुबन्धन *n.*

Ligaments *n. pl.* स्नायुरज्जू. [ CAPSULAR LIGAMENTS कोशरूप स्नायुबन्धनें.]

Ligamentous bands *n. pl.* रज्जुरूप स्नायूबन्धनें *n. pl.*

Ligamentun nuchæ ग्रीवाधराह्य स्नायुरज्जु *m.*

Lightening before labour ( गर्भारस्त्रीचें ) पोट उतरणें.

External oblique line बाह्यतिरश्चीन रेखा *f.*

Ilio-pectilineal line वस्तिकंटिका रेखा.
Inferior curved lines (of occipital bone) अधर-तोरणिका *f*. [तोरणिका.
Superior curved lines (of occiptial bone) उत्तर-
Lochia *n*. प्रसवानंतर होणारा स्राव *m*, सूतिकास्राव *m*.
Lochial discharge *n*. सूतिकास्राव *m*.
Long head of biceps द्विशिरस्क स्नायूंचें दीर्घमूल.
Longitudinal sinus दीर्घिकासिरापरिखा *f*.
Lower jwa हनु *f*, खालचें जाभाड *n*.
Malar prominence *n*. गंडकूट *n*.
Malar tuberosity *n*. गंडार्बुद *n*.
Mammary *a*. स्तनाचा.
Mammary gland *n*. स्तन *m*.
Mammary sympathy स्तनांत होणारा फेरफार *m*.
Mastoid गोस्तनासारखा, गोस्तनाकार.
Mastoid cell गोस्तन कोटर.
Mastoid portion *n*. कर्णमूल पिंड *m*.
Meatus सुरंग (according to Dr. Gana Nath Sen). [SUPERIOR M. ऊर्ध्वसुरंग. MIDDLE M. मध्यसुरंग. INFERIOR M. अधःसुरंग.]
Medulla Oblongata *n*. सुषुम्नाशीर्षक *n*.
Membrane *n*. कला *f*, त्वचा *f*.

*N. B.*—Up to this time Marathi Medical writers used to translate membrane by त्वचा or अन्तस्त्वचा, but the word कला is proposed for membrane by Dr. Gana Nath Sen.

Meningeal artery *n*. मस्तिष्कावरणधमनी.
Metrorrhagia *n*. रजोदर्शनकालाच्या पुढें हि आर्तवस्राव चालू राहणें.
Middle meningeal artery मस्तिष्कमध्यमधमनी *f*.
Molars (teeth) चर्वणक दंत *m. pl*.
Muscle *n*. स्नायु *m*, पेशी *f*. (according to Dr. Gana Nath Sen).
Acromio-clavicular ligament अंसाक्षकसंयोजकस्नायु.
Adductor magnus गरिष्ठ ऊरुव्यूही स्नायु.
Anconeus करोत्तानक स्नायु.
Azygos Uvulæ काकली (स्नायु) *m*.
Brachialis कूर्परद्वारिकस्नायु.
Buccinator *n*. कपोलिकस्नायु *m*.
Complexus शिरोग्रीवपृष्ठीये (स्नायु).
Conoid ligament त्रिकोणिकाख्यस्नायु.
Constrictor of pharynx कंठसंकोचक (स्नायु).
Coraco-brachialis काकौष्ठिकस्नायु.
Corrugator supercilius भ्रूसंकोचकस्नायु *m*.
Crureus or vastus intermidis ऊरुप्रसारकस्नायु.
Deltoid (muscle) अंसप्रच्छदस्नायु.
Depressor alæ nasi नासानमकस्नायु *m*.
Depressor anguli oris सृक्कणीनमकस्नायु *m*.
Depressor labi inferioris अधरावनमकस्नायु.
Digastric द्विगुंफिकस्नायु.
Erector penis शिस्नापहर्षक (स्नायु).

External pterygoid हनुमूलकर्षकस्नायु.
Extensor Carpi करप्रसारकस्नायु.
Flexor Carpi (radialis and ulnaris) पाणिसंकोचकस्नायु.
Flexor hallucis brevis पादांगुष्ठसंकोचकस्नायु.
Flexor sublimis digitorum अंगुलीसंकोचकस्नायु.
Gastrocnemius जंघापिंडिकस्नायु. ( पिंडिका = Calf ).
Gemelli यमलस्नायु.
Genio-hyo glossus चिबुकजिव्हाकण्ठिकस्नायु *m*.
Gluteus नितम्बपिण्डिकस्नायु *m*.
Hyoglossus जिव्हाकण्ठिकस्नायु.
Iliacus श्रोणिपक्षीयस्नायु.
Inferior oblique (muscle of the eye) अधस्तीर्यक्स्नायु.
Infra-spinatus अधरांसपृष्ठिकस्नायु.
Intercostal muscle पर्शुकांतरीकस्नायु.
Inter-occeus membranes कलारूपस्नायु.
Latissimus dorsi कटिपार्श्वप्रच्छदस्नायु.
Levator menti चिबुकोत्क्षेपणी *f*.
Levator anguli scapulæ अंसोन्नामकस्नायु.
Levator labii superioris ओष्ठसमुत्कर्षकस्नायु.
Levator palati तालूत्तोलकस्नायु.
Linea aspera द्विधाराप्राकारिक ( स्नायु ).
Longissimus capitis पृष्ठदंडिकस्नायु.
Lymphatic *n*. रसायनी *f*, रसवहा *f*.
Manubrium उरःफलकग्रैवेयक, उरःग्रैवेयक.
Masseter *n*. हनुकूटकर्षकस्नायु.
Medulla Oblongata सुषुम्नाशीर्षक *n*. [स्नायु.
Middle Constrictor of Pharynx मध्यमकण्ठसंकोचक
Mylo-hyoid muscle मुखभूमिकण्ठिकस्नायु.
Obturator internus अंतस्थश्रोणिगवाक्षीयस्नायु.
Obturator externus बहिःश्रोणिगवाक्षीयस्नायु.
Occipito-frontalis ललाटसंकोचकस्नायु, शिरच्छदस्नायु.
Omo-hyoid muscle अंसकण्ठिकस्नायु *m*. [पेशी *f*.
Orbicularis oris ( a ) मुखमुद्रणी पेशी *f*. (b) कपोलिका
Orbicularis palpebrarum *n*. नेत्रनिमीलक स्नायु *m*, नेत्रनिमीलिनी पेशी *f*.
Palmaris longus करतलप्रसारकस्नायु.
Pectoralis major गरिष्ठ उरःप्रच्छदस्नायु.
Pectoralis minor लघु उरःप्रच्छदस्नायु.
Peroneus पादविवर्तकस्नायु.
Popliteus जानुपृष्ठिकस्नायु.
Pronator radii teres दीर्घकरविवर्तकस्नायु.
Psoas magnus दीर्घकटिलंबी (स्नायु. )
Pyriformis शुंडिकस्नायु.
Quadratus femoris ऊरुचतुरस्रस्नायु.
Quadratus lumbrorum कटिचतुरस्रस्नायु.
Rectus ऋजुस्नायु किंवा ऋजुपेशी. [SUPERIOR R. ऊर्ध्वदर्शिनी, ऋजु ऊर्ध्वस्नायु. INFERIOR R. ऋज्वधःस्नायु, अधोदर्शिनी. INTERNAL R. अंतर्दर्शिनी, अंतरपांगस्नायु. EXTERNAL R. बहिरपांगस्नायु, बहिर्दर्शिनी. ]
Rectus abdominis उदरदंडिकस्नायु.

Rectus Capitis anticus शिरःपूर्वदंडिक ( स्नायु ).
Rectus Capitis Lateralis शिरःपार्श्वदंडिक ( स्नायु ).
Rectus Capitis posticus शिरःपृष्ठदंडिक (स्नायु).
Retrahens aurem कर्णपृष्ठिकस्नायु.
Rhomboideus ( muscle ) अंसापकर्षकस्नायु.
Sartorius *n.* दीर्घायामस्नायु *m.*
Scalenus anticus and medius पुरोग आणि मध्यम पर्शुकाकर्षक (स्नायु). Scalenus posticus पृष्ठगपर्शुकाकर्षक ( स्नायु ).
Semi-membranosus कलाकल्पस्नायु *m.*
Serratus magnus महाअरित्राकारस्नायु. [अरित्र = Saw]
Splenius Capitis शिरोग्रीवविवर्तकस्नायु.
Stapedius कर्णांतरिकस्नायु.
Sterno-hyoid muscle उरःकण्ठिक स्नायु *m.*
Sterno-mastoid उरःकर्णमूलिक स्नायु.
Stylo-glossus शिफारसनिक स्नायु.
Stylo-hyoid muscle शिफाकण्ठिक स्नायु.
Stylo-pharyngeus शिफागलांतरीय स्नायु.
Subclavian अक्षकाधर.
Sub-clavius अक्षकाधरस्नायु.
Sub-scapularis अंसांतरिक स्नायु.
Superior Oblique ( muscle of the eye ) ऊर्ध्वतीर्यक् [स्नायु.
Supra-spinatus ऊर्ध्व अंसपृष्ठीय स्नायु.
Temporalis शंखच्छदस्नायु.
Tensor palati तालूत्तंसक.
Tensor Tarsi अश्रुविसर्जनी पेशी.
Tensor tympani पटहोत्तंसी स्नायु.
Teres major बृहत् अंसाधरिक स्नायु.
Teres minor लघु अंसाधरिक स्नायु.
Tibialis anticus जंघापुरोग ( स्नायु ).
Tibialis posticus muscle जंघानुगस्नायु.
Transversalis abdominis उदरच्छद स्नायु *m.*
Trapezoid ligament चतुरस्त्रिक स्नायु.
Trapezium पृष्ठच्छद स्नायु.
Vertebral border पृष्ठवंशानुगाधारा ( पेशी ).

Nares anterior नाकपुडीचीं पुढील द्वारें *n. pl.*, नासापुरोद्वार *n.*
Nares posterior घशाजवळील नाकपुडीचीं द्वारें *n. pl.*, नासापश्चिमद्वार ( Nares is plural of L. *naris*, nostril ).
Nasal duct बहिरश्रुवाहिका.
Nasal spine झर्झरास्थ्यग्रकंटक.
Naso-palatine groove नासातालुकापरिखा *f.*
Neck ( of a rib ) ग्रीवा *f.*
Notch *n.* परिखा.
Ethmoidal notch नेत्रमहापरिखा.
Great Sacrosciatic notch गृध्रसीद्वार. [गृध्रसी = sciatic muscle.]
Lachrymal notch अश्रुपीठखात.
Sacrosciatic-notch ( क्षुद्रतोरणाकार ) कुकुंदरद्वार.
Spheno-palatine notch तालुजातुक खात *n.*

Supra-capsular notch अंसशिर:कोटर.
Sigmoid notch अर्धचंद्राकार छेद *m*.
Nerve *n*. मज्जातंतु (in current use), नाडी (according to G. N. Sen).
Obstetric binder *n*. ( बाळंतिणीच्या पोटाला बांधलेलें ) [ उदरबंधन *n*.
Occipital condyle शिर:पृष्ठास्थिमूलकोटि.
Occipital crest *n*. पश्चिमालिका *f*.
Occipital protuberance *n*. पश्चिमार्बुद *n*.
Optic Commissure *n*. दृष्टिनाडीयोजिकापरिखा.
Orbital plate *n*. नेत्रच्छदिफलक.
Orbital surface *n*. नेत्रपीठतल.
Orbit of the eye नेत्रगुहा *f*, नेत्रकोटर *n*.
Pacchionian bodies बालग्रंथि, पासिनिअन पिंड.
Palatine canal *n*. तालुकांपरिखा *f*.
Pancreas *n*. अग्न्याशय *m*. जठराग्नि *m*.

*N. B.*—Up to this time Marathi Medical writers used to translate Pancreas by अनामकपिंड or स्वादुपिंड but, it is now proposed that the most accurate word for Pancreas is अग्न्याशय.

Parietal eminence *n*. पार्श्वकुंभ.
Paste कल्क.
Pearl ash पोट्याशम कार्बोनेट.
Pectin पेक्टोजपासून बनलेलें पक्व फळांतील द्रव्य *n*.
Pectose अपक्व फळांत सांपडणारें सेल्युलोजसारखें द्रव्य *n*.
Pelvic cavity *n*. बस्तिगुहा *f*.
Pelvis *n*. श्रोणिचक्र *n*.
Pepperein *n*. मरीचीवीर्य *n*, मिरचींतील कारकद्रव्य *n*.
Petrous portion ( गण्डास्थीचा ) अश्मकूट.
Phalangeal *a*. पादांगुलिसंबंधी.
Pinnæ of the ear कर्णशष्कुल्यौ.
Pituitary body पोपकग्रंथि.
Platysma myoides गलपार्श्वछद *m*.
Posterior *a*. पश्चिम.
Posterior fontanel *n*. शिवरंध्र *n*, अधिपतिरंध्र *n*.
Posterior iliac spine पश्चिमजघनधाराकूट, briefly पश्चिमकूट.
Process *n*. प्रवर्धनक *n*, प्रवर्धन *n*, कूट *n*, कूटक *n*.
Acromion process *n*. अंसकूट *n*.
Alveolar process दंतोदूखलिक प्रवर्धनक.
Clinoid processes गुलिका.
Coracoid process अंसतुंड.
Coronoid process *n*. हनुकूट.
Ethmoidal process झर्झरकूटक, झर्झरप्रवर्धनक.
External angular process बहि:कोटि.
Infra-orbital process नेत्राधरीय प्रवर्धनक *n*.
Internal angular process अन्त:कोटि.
Jugular process मन्याप्रवर्धनक *n*.
Lachrymal process अश्रुवाहिनी कूटक *n*.
Malar process गंडधरकूट.
Mastoid process गोस्तनप्रवर्धनक, गाईच्या स्तनासारखें [ प्रवर्धनक.
Nasal process नासाकूट.

Orbital process अपांगप्रवर्धनक *n*, नेत्रकोटरभूमिश्रृंग.
Palate process तालुफलक.
Pterygoid processes जतुकास्थिचरण.
Sphenoidal process जतुकास्थिसंधायी श्रृंग *n*.
Styloid process शिखाप्रवर्धनक *n*.
Trochanter major *n*. उर्वस्थिमहाशिखरक.
Prostate gland *n*. शुक्राशयपिंड *m*, बस्तिमूलग्रंथि *m*, पौरुषग्रंथि *m*.
Protuberance उत्सेध.
Pterygoid ridge शंखाधरिका रेखा.
Ramus of lower jaw हनुकूट *n*, हनुमूलबन्धन *n*.
Rib पर्शुका, फांसळी. [TRUE R. मुख्य पर्शुका. FALSE R. गौण पर्शुका. ]
Ripe stage (of a disease) (रोगाचा) विकासकाल *m*.
Roof च्छदि ( as नासागुहाच्छदि ), पटल.
Roof of the throat कंठपटल *n*.
Rostrum रसनिका.
Sciatic nerve गृध्रसी नाडी.
Sella turcica दृष्टिनाडीपरिखा *f*.
Semen-improver *n*. शुक्रशोधक, शुक्रधोन ( an old word ).
Shaft of a rib कांड *n*.
Shoulder girdle अंसचक्र.
Sickle-like rib दात्रफलकाकार पर्शुका *f*.[दात्र = Sickle.]
Sigmoid groove *n*. अर्धचंद्रिकासिरापरिखा *f*.
Sinus सिरापरिखा *f*.
Spermatopoietic *a*. शुक्रजनक, धातुवृद्धिकर.
Sphenoidal sinus जातूककोटर *n*.
Spheno-maxillary fissure हनुजातूकखात.
Spine of Ischium कुकुंदरकंटक.
Spine of the palate *n*. तालुपृष्ठकंटक *m*, काकलकंटक *m*.
Spine of scapula अंसप्राचीर.
Sprue (sproo) *n*. हा आंतड्यांचा विकार आहे. तोंड येणें हें या रोगाचें प्रथम लक्षण आहे. यांत पुढें ढाळ होऊं लागतात. अन्न पचत नसल्यामुळें खाल्लेल्या अन्नापेक्षां अधिक मल पडतो. या रोगानें फार अशक्तता येते. हा कष्टसाध्य आहे.
Stage of eruption ( of a disease ) *n*. (रोगाची) विस्फोटावस्था *f*, विस्फोटनकाल *m*, उगवणाची वेळ *f*.
Stage of invasion ( of a disease ) *n*. (रोगाची) आक्रमणावस्था *f*, आक्रमणकाल *m*, रोगानें पछाडण्याची वेळ *f*.
Sternal end ( of a rib ) उरोदंडाचा अग्रकोटि.
Sternutatory *a*. शिरोविरेचनीय.
Styptic *a*. शोणितस्थापक.
Sub-lingual gland जिव्हाधरिका ग्रन्थि *m*.
Sub-maxillary gland हन्वधरीय ग्रन्थि *m*.
Sub-nasal point *n*. नासाग्रकंटक *m*.
Superciliary ridges भ्रूतोरणिका.
Supra-capsular nerve अंसारोही मज्जातंतु.
Suture ( a ) सीमन्त *m*. ( b ) सीवनी *f*.

*N. B.* :—Suture, when it means an interlocking of bones by fibrous membranes without synovial membrane, should be translated into Marathi or Sanskrit by सीमन्त. Suture when surgical should be translated by सीवनी, शिवण.

Basilar suture मूलजातूक सीमन्तिका *f.*

Coronal suture पुरःसीमन्त.

Crucial suture *n.* स्वस्तिकसीमन्तिका *f.*

Lambdoidal suture *n.* कपाळाच्या अस्थीची ग्रीक लॅम्बडा अक्षराकृति सीवनी *f.*

Metopic suture गूढ सीमन्तिका *f.*

Petro-squamous suture शंखचक्राश्मकूट सीमंत -सीम-[न्तिका.

Sagittal suture मध्यसीमन्त.

Temporal suture पार्श्वसीमन्त.

Symphysis menti चिबुकसन्धानिका रेखा *f.*

Synovial bursa श्लेष्मधरकलापुट.

Tarsi खोट.

Temporal fascia शंखावरणी त्वचा.

Temporal plates ( of forehead ) पार्श्वफलक.

Temporal ridge *n.* शंखतोरणिका *f.*

Temporo-Malar Canal *n.* शंखगंडिकरंध्रमार्ग *m.*

Tendon-sheath *n.* कंडरावेष्टन *n.*

Tendo-oculi नेत्रकंडरिका *f.*

Tentorium Cerebelle जवनिका *f.*

Tentorium Cerebri दीर्घिका सिरापरिखा.

Tibia जंघास्थि.

Tissue धातु, पट, पेशीसंघात. [COMPACT T. घनपेशीसंघात, घनसंघात, घनधातु, पार्थिवांशपट. ह्यांत चुन्याचें प्रमाण अधिक असतें व कपालास्थीचें बहिरावरण ह्याचें बनलेलें असतें. CANCELLUS T. सुषिरधातु, सुषिरसंघात *m*, प्राणिजांशपट. हा पुष्कळ स्नायूंचा बनलेला असतो. ह्यापासून नलकास्थि बनतात. सुषिर = HAVING APERTURES OR HOLES.]

Tooth *n.* दंत *m.* [ The full set of teeth in each jaw consists of sixteen. Incissors ( कर्तनक दंत ) four; Canines ( रदनक दंत ) two; Bi-cuspids or Pre-molars ( उपदंष्ट्रा, अग्रचर्वणक), four; and molars ( चर्वणक, दाढ, दंष्ट्रा ) six.

Torcular herophili महावर्त.

Tuberosity ( of a rib ) अर्बुद *n.*

Tuberosity of Ischium कुकुंदरपिंड.

Tympanic plate कर्णमूलफलक.

Tympanum *n.* श्रुतिपटह *m.*

Umbilical Region *n.* नाभिप्रदेश *m.*

Union *n.* ( *med.* ) मेलन *n.* [IMMEDIATE U. तात्कालिक मेलन *n.* PRIMARY U. प्रथम मेलन *n.* GRANULATION AND CICATRISATION अंकुरोद्भवन व सिध्मभवन *n.* SECONDARY U. द्वितीय मेलन *n.* HEALING BY SCABBING खपलीखालीं मेलन *n.*]

Vault of the palate तालुपटल *n.*

Vein *n.* सिरा *f.*

Vertebral prominence महाकंटकिनी.

Voice-improver *n.* स्वर्य *n*, आवाज खुलवणारें औषध *n.*
Wall external बहि:प्राचीर *n*; as, नासाबहि:प्राचीर *n.*
Wall internal अंत:प्राचीर *n*; as, नासांत:प्राचीर *n.*
Wooden dullness *n.* काष्ठनाद *m*, लांकडावर ठोकल्यासारखा नाद *m.*
Xiphoid or Ensiform उरोग्रपत्र. (here पत्र = असिपत्र).

## ZOOLOGY.

Abomasum *n.* गुरांच्या अन्नाशयाची चौथी पिशवी *f.*
Antelope *n.* हरण. [The word हरण is commonly used as a generic term for all kinds of deer, antelope and gazelle. Four-horned antelope चौशिंगा.]
Ant-lion *n.* चोरकिडा *m.*
Anthozoa सरश्मिप्राणी.
Aptera *n.* हीनपक्ष, ज्यांना पंख नाहींत असे कृमी.
Ateuchus *n.* गोळया करणारा किडा *m.*
Balancer *n.* सुकाणूं *n*, कर्ण *m*, द्विपक्ष किड्यांचा पंखाऐवजीं बारीक कंस.
Beetle मुग्दल ( कीटक ). [Black beetle *n.* झुरळ *n.*]
Bever सालिंद्रासारखा प्राणी.
Black buck काळवीट *m*, काळा बामण्या (बोरकी *f.cm.*).
Blue bottle *n.* निळी बाटली (माशी).
Blue bull *n.* नीलगाय *f*, रुई *f.*
Bot-fly *n.* बैलावरील गोमाशी.
Breeze-fly *n.* मेंढरावरची गोमाशी.
Brown-tailed moth *n.* तपकिऱ्या पतंग *m.*
Bustard *n.* माळढोक, बाळेढोक.
Cabbage butter-fly *n.* कोबीच्या कांद्यावरचा पतंग *m.* ही एक प्रकारची कीड आहे व हिला कुणबी लोक होरा असें म्हणतात.
Carabidæ *n. pl.* पेंगळांतले वाघ *m. pl.* हे एक प्रकारचे किडे आहेत.
Carpenter *n.* भोंगा *m*, सुतार *m.* ही एक माशीची जात [आहे.
Cassowary बृहत्कायपक्षी.
Cephalopoda शीर्षपादी मृदुमांसमय प्राणी.
Cetacea *n.* तिमिजातीय सस्तन प्राणी.
Cheiroptera *n.* हस्तपक्षी सस्तन प्राणी.
Chelonia *n.* कूर्मजातीय प्राणी; उ० कांसव.
Civet जवादीमांजर.
Cockchafer *n.* पिकाचा नाश करणारा एक प्रकारचा [किडा *m.*
Cockroach *n.* झुरळ *n.*
Cœlentera रिक्तमध्यप्राणि, गुह्योदरी.
Coleoptera *n.* कोशपक्षकृमि.
Cormorant करढोंक (पक्षी).
Cow-pox *n.* गुरांच्या स्वाभाविक देवी.
Coxa कीटकांच्या पायांचा पहिला भाग *m.*
Crane बगळा *m*, बक *m.*
Cricket *n.* राळ ( किडा ) *f.* [House cricket *n.* घरांत बिळें करून राहणारी राळ नांवाची कीड *f*, गृहझिल्ली *f.* Wood-cricket रानांत राहणारी राळ नांवाची कीड *f*,

वनझिल्ली *f.* Mole cricket पुढचे पाय घुशीसारखे असणारी राळ नांवाची कीड *f.*]
Creinoidea स्कंधशाखाधारी प्राणी.
Crocodilia *n. pl.* नक्रजातीय प्राणी.
Crop विदर्सच्या मागचा भाग *m.*
Curlew क्रौंच.
Cuttlefish समुद्रमाणकी.
Cyrtoneura stabulus *n.* मंदुरामक्षिका (माशी).
Deer *n.* हरण *n.* *N. B.*—सांवर, (male मेरू), डांगर, चितळ, सारंग, भेकर, कंगोली, पिसुरा, पिसोरा, पिसाई आणि गेळें या हरणाच्या जाती आहेत.
Dehorn *v. t.* शिंगें कापणें.
Demosel Crane कांडे कुडकुच *m.*
Diptera द्विपक्ष, ज्यांना दोन पंख आहेत असे कृमी.
Dog-fish श्वानमासा.
Dormouse निद्रालु उंदीर.
Dragon fly *n.* सर्पमाशी *f.*
Drone *n.* मधमाशांची एक जात *f.*
Edentata *n.* दंतहीन प्राणी. उदाहरण स्लोथ, आरमा- [न्दिलो.
Eel साधा वांब.
Escutcheon *n.* गाईच्या स्तनावरचा escutcheon [आकृतीचा भाग.
Florican *n.* खारमोर. खारमोर आणि चरसह्या Florican च्या दोन जाती आहेत.
Formicidæ मुंग्यांची एक जात *f.*
Gad-fly घोडमाशी.
Gall-fly फेनमक्षिका.
Ganoidei *n.* वोंबिलाच्या माशांचा वर्ग *m.*
Gazelle *n.* ग्याझेल; एक हरणाची जात *f.* चिकारा, काळसीपी, कटकद्या या ग्याझेलच्या जाती आहेत.
Geometer *n.* भूमापक (पतंगकिडा).
Ghost-moth *n.* पिशाचपतंग *m.*
Gold-fish *n.* सुवर्णमत्स्य *m.*
Goose *n.* हंस *m.* [CANVAS-BACKED G. नुकटा *m.*]
Grass-hopper *n.* टोळासारखा एक किडा *m.*
Grease-moth *n.* लोणी, तेल, चरबी इत्यादि खाऊन राहणाऱ्या पतंगांची जात *f.*
Green bottle *n.* हिरवी बाटली (माशी).
Grub *n.* कोशपक्षकिड्याचा पूर्वावस्थेंतील नेत्र *n.*
Gyrinidæ *n.* गौळण *f.* हा एकप्रकारचा किडा आहे.
Halters कांहीं द्विपक्षांत पंखांच्या पाठीमागचीं गौण अंगें *n. pl.*
Haustellum रस शोपून घेण्याकरितां विशिष्टरचनायुक्त [मुखांचे प्रकार.
Hedge-hog *n.* शल्य (प्राणी).
Helophilus *n.* शेंपकिडा *m.*
Heron बगळा.
Heterocera *n.* चित्रश्रृंग नांवाचा पतंगाचा वर्ग *m.*
Holoptic *n.* निखिलनेत्र (माशी).
Horse-pox *n.* घोड्यावरील देवी.
Horse-stinger *n.* घोड्याला नांगी मारणारी माशी *f.*
Hydra कळया फुटलेला जलव्याली. या कळया टेंगळासारख्या त्वचेवर दिसतात, व त्या वाढून त्यांस तोंड व मिशा फुटतात.

Hydrozoa *n.* जलव्याली.
Ichneumon fly वेधमक्षिका.
Ichthyosauria *n.* अश्मीभूत समुद्रपल्लिजातीय प्राणी.
Indian bison *n.* गव्या, गवा *m.*
Jack गाढव ( male ).
Jungle cat वौल, भौगा.
King-fisher गण्या.
Labium *n.* कीटकांचा खालील ओंठ *m.*
Labrum *n.* कीटकांचा वरील ओंठ *m.*
Labyri'nthodon (*geol.*) *n.* अश्मीभूत गहनदन्तप्राणी *m.*
Lacertilia पल्लिजातीय प्राणी; उ० पाल, सरडा.
Lapwing टिटवी.
Leopard cat *n.* ( *zool.* ) वाघाटी *f.*
Longicorn *n.* मृगाचा किडा *m*, लांब शिंगाचा किडा *m.*
Mantidæ *n.* खंडोबाचा घोडा *m.* हा एक किडा आहे.
Marsupialia *n. pl.* सकोशसस्तनप्राणिजाति; उ० कांगारू.
[कोश = पोरें ठेवण्याची पिशवी *f.*]
Mason-bee *n.* कुंभारीण *f.* ही एक माशीची जात आहे.
May-fly *n.* शेमटी *f.*
Mermot पहाडी उंदीर.
Mite खव्यांत पडणारा किडा.
Mole *n.* चिचोंद्री *f.*
Musca Domestica Minor *n.* लहान घरमाशी.
Myriapoda *n.* अनेकपदप्राणिवर्ग; उ० घोण *f.*
Myrmicidæ *n.* मुंग्यांची एक जात *f.*
Necrophori *n. pl.* मुडदेफरास किडे *m. pl.*
Notonecita Glanca *n.* पाण्यांतील ढेंकूण *m.*
Ophidia *n.* सर्पजातीय प्राणी.
Painted lady *n.* चित्रविचित्र पंखांचा पतंग *m.*
Peacock butterfly *n.* पंखावर मोराच्या पिसाच्या सारखे डोळे असलेला पतंग *m.*
Pelican पाणकोळी ( पक्षी ).
Pentatoma *n.* ढेंकण्या ( किडा ).
Penterinoid पंचशिखा ( प्राणी ).
Periwinkle घुला, खुबा.
Phasmarossia *n.* उंट *m.* हा एक किडा आहे.
Pheasant कुकण.
Plant-louse *n.* पानऊ.
Pole cat कंसाळ मांजर.
Poneridæ *n.* मुंग्यांची एक जात *f.*
Primate *n.* द्विहस्तक, दोन हातांचा सस्तन प्राणी; उ० [मनुष्य *m.*
Proboscidiana *n.* शुंडाधारी सस्तन प्राणी.
Pteropod *n.* पक्षपादी ( मृदुमांसमय ) प्राणी.
Pterosauria *n.* (सरपटणारे पण पंख असणारे) अश्मीभूत पक्षीजातीय प्राणी.
Pyralina *n.* पतंगांचा एक पोटवर्ग *m.*
Pyrenoids विशिष्टजीवनशरीरें.
Quail *n.* लावा.
Red admiral *n.* तांबडा सरदार नांवाचा पतंग *m.*
Reduvius Personatus *n.* उडणारा ढेंकूण *m.*
Rhopalocera *n.* मुद्गरशृंग ( एक पतंगांचा वर्ग ) *m.*

Rhotalocera *n.* पतंगांचा एक वर्ग *m.*
Rose-beetle *n.* गुलाबावरचा किडा *m.*
Sand stars सिकतातारे ( प्राणी ).
Sarcophaga Carnaria *n.* मांसभक्षिका ( माशी ).
Saw-fish असिपत्रमत्स्य.
Saw-fly क्रकमक्षिका.
Sea-anemone समुद्रकमळ ( प्राणी ).
Sea-gull जलकुक्कुट.
Sea-urchin सामुद्रांड.
Sertularia समुद्रवृक्ष ( प्राणी ).
Shell-fish *n.* शिंपल्यासारखा (दोन कवचांमध्यें असलेला) प्राणी. या वर्गांत पिकळी, गोगलगाय व कालव यांचा समावेश होतो.
Shrew-mouse *n.* कुन्नुद्धिघूस *f.*
Sirenia *n. pl.* तिमिसदृश सस्तनप्राणीजाति.
Slug *n.* पिकळी *f.*
Star-fish *n.* तारकाकृति मासा *m,* कंटकत्वक् मासा *m,* चक्राकार मासा *m.* [माशी *f,* दंशी *f.*
Stomoxys Calcitrans *n.* तीक्ष्ण तोंडाची चावणारी
Stork बक ( पक्षी ).
Struthionidæ *n.* उत्कीरक प्राणी; उ० शहामृग.
Thysanoptera *n.* अन्चलपक्षकृमि. यांच्या पंखांच्या कडेवर बारीक झालरी ह्मणजे अञ्चलाप्रमाणें केंस असतात.
Tick अंड्यांत पडणारा जीव.
Tinea *n.* टिनी नांवाच्या क्षुद्र पतंगांची जाति.
Triste fly *n.* क्षांविक्षीमाशी.
Tubipora पोकळ नलिकारूप कीटक.
Water hen पाणकोंबडी.
Whelk उटंगळ, कोका.
Whirligig *n.* एक प्रकारचा किडा *m.*
White admiral *n.* पांढरा सरदार नांवाचा पतंग *m.*
Wild Boar *n.* डुकर *n.* [AN OLD SOLITARY BOAR एकुल. A FEMALE SOLITARY BOAR कोळ. A VERY SMALL PIG झेंडू.]
Wild dog *n.* कोळसुंदा *m.*
Wood leopard *n.* चित्ता नांवाचा पतंग *m.*
Young buck *n.* पाडस *n.*
Zoophyte प्राणिविशिष्टवृक्ष.

## MISCELLANEOUS WORDS.

Abacus *n.* रंगीत गोट्यांची चौकट *f.*
Absenteeism *n.* गैरहजेरी *f.*
Accountancy *n.* हिशेब खातें *n.*
Acknowledgment fee *n.* पावतीबद्दल फी *f.*
Addressee *n.* पत्र घेणारा मालक *m.*
Advice *n.* ( *com.*) जाब *m,* हुंडी लिहिली आहे हें कळविण्यासाठीं लिहिलेलें पत्र *n.*
Aeroplane *n.* आकाशयान *n.*
Air defence *n.* आकाशयानाच्या हल्ल्यापासून बचाव *m.* (b) आकाशयानाच्या हल्ल्यापासून बचावाची योजना *f.*
Air raid *n.* आकाशयानांतून खालीं बांब टाकून केलेला हल्ला *m.*

Allies *n. pl.* दोस्त *m. pl.*
Almonds in the shell सालांसहित बदाम, आखे बदाम.
Almonds without shell बदामाचे गोळे.
Anatomical museum *n.* शारीरपदार्थसंग्रहालय *n.*
Anti-plague serum प्लेगप्रतिबंधक रस *m.*
Anthrax *n.* गोळी *f.* गुरांचा सांसर्गिक ताप *m.*
Apiculture *n.* मधमाशांची जोपासना *f,* मधुमक्षिका-संवर्धन *n.*
Appellate side अपिलांची शाखा *f,* अपीलशाखा *f.*
Appliances *n.* सरंजाम *m.*
Applied *a.* उपयुक्त, व्यवहारोपयोगी; as, "A. arts, A. [chemistry, &c."
Arboriculture *n.* वृक्षवर्धन *n.*
Areola *n.* (vaccination) रक्तमंडल *n,* (देवी काढल्यावर आठनऊ दिवसांनीं ) देवी काढलेल्या जाग्यासभोंवतीं येणारा लालिमा *m.*
Argument of the mailed fist कवचाच्छादित मुष्टीचा [न्याय *m.*
Artificial fog *n.* ( *mil.*) ( शत्रूला पुढचें कांहीं दिसूं नये म्हणून उत्पन्न केलेलें ) कृत्रिम धुकें *n.*
Ascent *n.* ऊर्ध्वगमन *n.*
Authorized Offices (विशिष्ट) अधिकार दिलेलीं हपिसें.
Bamboo camphor *n.* वंशलोचन *n.*
Barge *n.* मचवा *m.* [Steamer = आगबोट; Launch = लहान बोट; Boat = होडी. ]
Bath *n.* (*photo.*) निमज्जन *n,* बुडविणें *n.* २ (फोटो वगैरे धुऊन काढण्याकरितां रासायनिक) द्रावण ठेवण्याचें पात्र *n,* निमज्जनपात्र *n,* द्रावणपात्र *n.*
Bawm *n.* ( खाण्याचा ) वाम ( नांवाचा मासा) *m.*
Beam-compass *n.* सांगाडी कंपास.
Beche-de-mer *n.* समुद्रांतील जळू, बीचेडेमर.
Beef-steak *n.* गोमांसाचा तुकडा *m.*
Betelnuts, raw, whole, split or sliced सुपारी, कच्ची, सबंध, फोडलेली किंवा काप काढलेली.
Bhing *n.* ( खाण्याचा ) भिंग नांवाचा मासा *m.*
Bill at par बरावर हुंडी *f,* सरभर.
Bill at premium अधिक, उपर, वधारें (Guj.).
Bill at so many days' sight मुदतीची हुंडी *f.*
Bill on demand दर्शनी हुंडी.
Bill to order शहाजोग हुंडी *f.*
Black Quarter *n.* काळीजजाळी. याचीं दुसरीं नांवें आवरी, जहरबाद, सावमला अशीं आहेत. हा गुरांचा भयंकर सांसर्गिक रोग आहे.
Blank endorsement *n.* (*com.*) निनांवी वेचनपत्र *n.*
Bolt सळी *f.*
Bordering pen (नकाशाला) बार्डर काढण्याचें पेन.
Bouie *n.* ( खाण्याचा ) बोय नांवाचा मासा *m.*
Brain *n.* ( कापलेल्या जनावराचा ) भेजा *m,* मगज *m.*
Brisket *n.* छातीचें मांस, सीन्याचें मांस *n,* सीना.
Bristles *n. pl.* सड ( ब्रशासाठीं ).
Broken grain भरडलेलें धान्य *n.*
Buffalo disease or Hæmorrhagic Septicæmia गाल-

गोटू *m.* हा एक गुरांचा सांसर्गिक धामीचा रोग आहे; व औरी, गालफुला हीं याचीं दुसरीं नांवें आहेत.
Buffing knife ( shoe-maker's ) *n.* घोंटणी.
Bumlow *n.* बोंबिल ( नांवाचा मासा ) *m.*
Business hours *n. pl.* कामाचे तास, कामाची वेळ, देवघेवीची वेळ, व्यवहाराची वेळ.
Cabinet ware *n.* पेट्या, खुर्च्या, टेबलें, वगैरे सामान.
Calcium carbonate *n.* खडू *m.*
Calendering department *n.* क्यालेंडर खातें *n*, कपड्याच्या सुरकुत्या वगैरे काढून कपडा साफ करण्याचें खातें *n.*
Calibre gun *n.* मैदानी तोफ *f.*
Carrier *n.* ( law ) वाहक *m*, हुंडेकरी *m.*
Cashew or cajoo kernels काजूगोळे.
Cattle-food *n.* गुरांचा ( खाण्याचा ) दाणा *m.*
Cattle-market *n.* गुरांचा बाजार *m.*
Cess-pool *n.* घाणपाण्याची कुंडी *f*, घाणपाण्याची टांकी *f.*
Cestui qui trust ट्रस्टमिळकतीचा ज्याला फायदा मिळेल असा.
Chaff-cutter *n.* तूस काढणारें यंत्र *n.*
Chair *n.* ( railway ) *iron or steel socket holding rail in place* खुर्ची *f.*
Champerty and maintenance *n.* ( law ) वादवर्धक [करार *m.*
Chase silverware नकशीचीं चांदीचीं भांडीं *n. pl.*
Chauffeur *n.* मोटार हाकणारा *m.*
Chemical products and preparations रसायनक्रियेनें झालेले व तयार केलेले पदार्थ *m. pl.*
Claiming party दस्तैवज करून घेणारा.
Cocoanut-kernels खोबरें ( khopra ).
Cold douche *n.* उंचावरून थंड पाणी ओतून स्नान [घालणें *n.*
Collusion *n.* ( law ) मिलाफ *m.*
Colour रंग *m.* [ Cool C. शांत रंग, थंड रंग, डोळ्यांना सुख देणारा रंग. Local C. मूलरंग. Neutral C. मारलेला रंग, उदासीन रंग. Primary C. प्राथमिक रंग. Secondary C. मिश्र रंग. Tertiary C. उपमिश्ररंग. Warm C. झगझगीत -त्रासेक -दिपविणारा रंग. ]
Composition *n.* बनवलेला रंग *m.* २ ( निरनिराळ्या पदार्थांचा ) मिश्र पदार्थ *m.*
Conflict of laws कायद्यांचा विरोध *m.*
Conjoint account *n.* सामलातखातें *n*, एकत्र हिशोब *m.*
Conscription Act सक्तीच्या लष्करी नोकरीचा कायदा *m.*
Conservancy *n.* स्वच्छता ठेवणें *n*, साफसफाई *f.* [ Conservancy charges भंगीपट्टी *f.* ]
Constructive possession *n.* ( law ) अपरोक्ष ताबा *m.*
Constructive treason *n.* अपरोक्ष राजद्रोह *m*, फक्त प्रत्यंतर पुराव्यावरून शाबीत करतां येणारा राजद्रोह *m.*
Contempt of Court *n.* कोर्टाचा अपमान *m.*
Contributory negligence *n.* ( law ) गुन्ह्यास मदत करणारा प्रमाद *m.*
Copy ( commercial language) *n.* परपेंठ *f*, हुंडी हरवली असतां पहिल्या नकलेवरून केलेली दुसरी नकल *f.*

